श्रीमदाचार्य स्वामी समन्तभद्रविरचित

संस्कृत

# रत्नकरण्ड-श्रावकाचार

यावरील

पं. सदासुखजी विरचित हिन्दी वचनिकेचा मराठी अनुवाद

जीवराज जैन ग्रंथमाला
( मराठी विभाग )

: १ :

— प्रकाशक —

ब्र. जीवराज गौतमचंद दोशी,

अध्यक्ष— जैन संस्कृति-संरक्षक-संघ, सोलापूर.

वि. सं. २०१० ] [ किंमत १० रुपये

जैन संस्कृति-संरक्षक-संघान्तर्गत

जीवराज ग्रंथमाला

( मराठी विभाग )

श्रीमदाचार्य स्वामी समन्तभद्रविरचित

संस्कृत

# रत्नकरण्ड-श्रावकाचार

यावरील

पं. सदासुखजी विरचित हिन्दी वचनिकेचा

मराठी अनुवाद

पुष्प १ लें

अनुवादक :

ब्र. जीवराज गौतमचंद दोशी,

सोलापुर.

प्रकाशक :

जैन संस्कृति-संरक्षक-संघ,

सोलापुर.

मुद्रक :

फुलचंद हिराचंद शाह,

वर्धमान छापखाना, १३५, शुक्रवार, सोलापुर.

ज्येष्ट शु।। ५, वीर सं. २४८०, विक्रम संवत २०१०

शालिवाहन शके १८७६.

प्रति १००० )

( जून १९५४

# अर्पणपत्रिका

कामें ज्या जिंकाया रतिपाणितलावरी दिली टाळी ।
आजन्मस्त्रीत्यागें वीर जिनासम तयास तूं टाळी ॥१॥

अज्ञानास विनाशुनि धर्मा स्थापी प्रभावना-शैलीं ।
देवा समन्तभद्रा, स्वपरोद्धारक तुझी अशी शैली ॥२॥

सन्तत निजात्मचिन्तन तत्त्वज्ञानोपयोगिं तत्परता ।
दुस्तर भववारिधि हा तेणें आला तुला मुने ! तरतां ॥३॥

गुरुकुलरूप महानद वाहति या भारतांत सर्वत्र ।
तूं प्रभवशैल त्यांचा न्हाउनि जन जैन होति सुपवित्र ॥४॥

मुनिधर्मीं अनुरागी श्रावकधर्मप्रपालनीं निरत ।
पाळुनि महाव्रतें तूं झालास समन्तभद्र अघविरत ॥५॥

रत्नत्रयनिधिपालक समन्तभद्रा, समन्तभद्राचा ।
रत्नकरण्डक घे करिं अर्पितसे जीवराज हा साचा ॥६॥

परमपूज्य
१०८ मुनिवर्य श्री-समंतभद्र महाराज
बाहुबली क्षेत्र, ( कोल्हापुर ).

# परमपूज्य १०८ मुनिवर श्री समन्तभद्र महाराज
## यांचें चरित्र.

सांप्रत दिगंबर जैन समाजांत जे मुनि आहेत त्यांत आपल्या कर्तृत्वानें, ज्ञानसंपन्नतेनें व शुद्धाचारानें श्री समन्तभद्र महाराजांनीं एक स्वतःचें असें वैशिष्ट्य निर्माण केलें आहे. त्यांनीं स्वतःच्या आयुष्यांत आपल्या आत्मकल्याणाबरोबर राष्ट्राच्या शैक्षणिक क्षेत्रांत आणि सामाजिक जागृतींत जी मोलाची भर घातली आहे त्याला तर या काळांत तोड नाहीं. संपूर्ण जैन समाज त्यांच्या या अपूर्व कर्मयोगानें चिर ऋणी झाला आहे. या शिवाय त्यांच्यापासून स्फूर्ति घेऊन आमच्यासारखे किती तरी साधारण जीव आत्मोद्धाराला लागले आहेत हा त्यांचा उपकारच होय.

स्वतः महाराज अत्यंत प्रसिद्धि–पराङ्मुख आणि विनयी असल्यामुळें त्यांनीं स्वतःहून आपलें चरित्र आजपर्यंत कोणाला सांगितलें नाहीं म्हणून चरित्राविषयीं संपूर्ण माहिती मिळवून विस्तृतपणें लिहितां आलें नाहीं. तें एक स्वतंत्रच कार्य आहे.

सोलापूर जिल्ह्यांत करमाळे येथें १८९१इ. सनांत एका प्रतिष्ठित गुर्जर हुमड घराण्यांत त्यांचा शुभजन्म झाला. त्यांच्या पित्याचें नांव श्री. कस्तुरचंद शहा व मातेचें नांव 'कंकूबाई' असें होतें.

या दोन्ही धर्मधनांच्या सहवासांत महाराजांचें बालपण गेलें. घरांत व गांवांतील जिनमंदिरांत पुराण–वाचन, जिनगुणगान वगैरे श्रावकांच्या षट्क्रिया सदा चालत असत व आई वडील त्या प्रत्येक क्रियेच्या वेळीं या बाल देवचंदाला जवळ घेऊन बसत. महाराजांच्या बालमनावर त्याचा मोठा परिणाम झाला. वाचायला येऊं लागल्यापासून देवचंद पुराण वाची नि वडील अर्थ सांगत. एकदा मंदिरांत हरिवंशपुराणाचें वाचन चालूं होतें. त्यांतील कथेंत मुनि, साधु यांचें वर्णन आलें म्हणजे बाल देवचंदाला आपणहि त्यांच्याचप्रमाणें व्हावें असें वाटे. मग तेथें वेळ कसला ? सर्वांचें लक्ष चुकवून रोज रात्रीं हा बालक मंदिरांत जाई. जिन्यावर किंवा शिखराच्या पाठीमागें जाऊन दिगंबर बने. प्रसंगी पावसांतहि खड्गासन घालून ध्यान चालूं ठेवी. करमाळ्यांत असेपर्यंत ४।५ वर्षे अखंडपणें रोज हा क्रम सुरूं असे. याप्रमाणें महाराज जन्मजात साधु आहेत. दीक्षाविधि हा त्यांच्या बाबतींत उपचार होय. वयाच्या आठव्या वर्षापासून रात्रीं खाण्यापिण्याचा त्यांनीं प्रतिज्ञापूर्वक त्याग केला होता आणि हें सर्व कोणाच्याहि प्रेरणेशिवाय. अशारितीनें मुनिधर्माला लागणाऱ्या संयमधनाची जोपासना अगदीं बाल्यावस्थेपासून महाराज स्वयंस्फूर्तीनें करीत होते हें पाहिल्यानंतर बुद्धि थक्क होऊन जाते.

महाराजांचें प्राथमिक शिक्षण करमाळ्यांत संपत आलें. मुलाची ही धार्मिक वृत्ति माता-पित्यांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं आपला मुलगा अविवाहित राहूं इच्छितो व मुनिधर्माचा तो अभ्यास करतो हें पाहून त्यांच्या मातोश्रींना धन्यता वाटे. मुलावरील व संसारावरील लोभासाठी ज्या स्त्रीजातीची प्रसिद्धि आहे त्या स्त्रीजातींत मुलाच्या विरक्तवृत्तीबद्दल आनंद मानणारी ही धर्ममाता अपवादात्मकच समजली पाहिजे. वडील मात्र व्यवहाराला अनुसरून मुलाच्या लग्नाच्या चिंतेला लागले. श्री. भोसेकरांची मुलगीहिं ठरविली. पण महाराज लग्नाला तयार होणें अशक्य होतें. त्यांनीं निदान २५ वर्षेपर्यंत तरी आपण लग्न करणार नाहीं अशी प्रतिज्ञा घेतली. पण ती मर्यादा केवळ वडिलांच्या समाधानासाठी होती. करमाळ्याहून पुढील शिक्षणासाठी ते सोलापूरला आले आणि तेथें त्यांना श्री. मोतीचंद करकंबकर हे मित्र भेटले. धर्मभक्त व देशभक्त यांची जोडी जमली.

महाराजांची धार्मिक वृत्ति कधींच दूर होऊं शकली नाहीं. ते आणि मोतीचंदभाई दोघेहि मिळून बार्शीहून कुंथलगिरीला पायीं गेले व तेथें जाऊन दोघांनीहि आजन्म ब्रह्मचारी राहण्याची प्रतिज्ञा केली. ही वयाच्या ९ व्या वर्षाची गोष्ट आहे. यानंतर सोलापूरांतील त्यांचें विद्यार्थी-जीवन अत्यंत पवित्र रीतीनें गेलें. माध्यमिक शिक्षण संपलें. कॉलेजचें जीवन चालू झालें. धर्मशिक्षणासाठी मध्येंच जयपूरलाहि गमन झालें. या कालांत महाराजांच्या वाचनांत दिवसेंदिवस विवेकानंदाचे लेख जास्त येऊं लागले. अमेरिकन जनतेला भारताच्या आत्म्याची खरी ओळख करून देणाऱ्या या महापुरुषाच्या विचारांनीं महाराजांचें मन मोहित झालें. विवेकानंदाप्रमाणें आपणहि हिमालयांत जावें व तपश्चर्या करावी अशी प्रबळ इच्छा झाली आणि आश्चर्याची गोष्ट ही की ज्यूनिअर बी. ए. ची परीक्षा झाल्यावर महाराज हिमालयाकडे निघाले. पण ते दुसऱ्याच कामासाठी.

तें काम म्हणजे गुरुकुलपद्धतीची पाहणी करणें. त्यांना बी. ए. मध्ये येईपर्यंत आपण गुरुकुल स्थापावें अशी इच्छाहि झाली नव्हती. आत्मदर्शनासाठी तळमळणाऱ्या महाराजांनीं ज्यावेळीं विदर्भां-तील प्रसिद्ध धर्मपीठ 'कारंजा' गांठलें. त्यावेळीं तेथें वीरसेन भट्टारक व प्रद्युम्नसाहुजी यांची गांठ पडली; आणि प्रद्युम्नसाहुजींनाहि या धार्मिक ध्येयवादी तरुणाला आपण सोडूं नये अशी इच्छा झाली. त्यांनीं विचारलें 'आपली काय इच्छा आहे?' यावर महाराजांना कांहीं उत्तर देणें क्रमप्राप्त होतें म्हणून ते म्हणाले की 'मला गुरुकुलाची स्थापना करायची आहे.' या उत्स्फूर्त उद्गारां-तूनच महाराजांची गुरुकुल-प्रणाली जन्मास आली. पण त्यांची खरी इच्छा आत्मदर्शनासाठी तप करण्याची होती.

गुरुकुलची कल्पना तर स्फुरली, पण तें चालवायचें कसें? त्याची पद्धति कोणती? याचा महाराजांना अभ्यास करायचा होता. त्यासाठी भारतांतील तत्कालीन गुरुकुलांचें निरीक्षण करणें जरुरीचें होतें. शिवाय तपश्चरणासाठी हिमालय गांठण्याचीहि इच्छा मनांत होतीच. दोन्हीं कामें होतील म्हणून महाराज प्रथम हस्तिनापुरचें जैन गुरुकुल पाहाण्यास गेले. तेथें एकांतवासांतील

कुटींत त्यांनीं १ महिना घालविला. त्यानंतर ते हरिद्वारचें गुरुकुल पाहण्यास गेले. तेथील पद्धतीचा अभ्यास केला. जवळच असलेल्या ' मसुरी 'च्या हिमप्रदेशांत कांहीं काल ध्यान धारणेंत घालवावा म्हणून तेथेंहि ते गेले. परंतु दैवांतच त्यांना हिमालयांतील योगी बनवावयाचें नव्हतें. ते आजारी पडले आणि त्याच अवस्थेंत दक्षिणेंत परत आले. त्यानंतर त्यांनीं कारंजा येथे गुरुकुलाची संस्थापना केली.

हळूं हळूं जनतेला गुरुकुल शिक्षण प्रणालीचें महत्त्व पटू लागलें. बाहुबली, सोलापुर, खुरई, कारकल, रामटेक, गजपंथ, स्तवनिधि इत्यादि अनेक ठिकाणीं गुरुकुलपद्धतीच्या शाखोपशाखा महाराजांच्या नेतृत्वाखालीं निघाल्या. त्याच संस्थेंतून आणि त्याच प्रणालींतून निघालेलीं व आजन्म ब्रह्मचर्यव्रत धारण करून समाजसेवेला वाहून घेणारें कांहीं तपस्वी विद्यार्थी तयार झाले आणि महाराजांचें कार्य उत्तरोत्तर वृद्धिंगत होत चाललें. त्यांना पैसा कधीं कमी पडलाच नाहीं. त्यांच्या व इतर जैन ज्ञातिबंधूंनी लाखो रुपयांची देणगी त्यांच्या कार्याला अर्पण केली.

श्री अतिशयक्षेत्र बाहुबलीला आधुनिक नालंदा बनविण्याची पू. महाराजांची तीव्र तळमळ आहे. जैन धर्माचें अधिकृत शिक्षण येथील व परदेशांतील लोकांना बाहुबली धर्मपीठांतून मिळेल व तेथें नित्य हजारों विद्यार्थी जैनधर्म व इतर लौकिक विषय यांच्या अभ्यासांत मग्न होतील अशी अपूर्व व्यवस्था जैन समाजानें या क्षेत्रावर करावी अशी महाराजांची तीव्र भावना आहे. बाहुबली येथें त्यागी ज्ञानोपासना मंदिर, जैन सिद्धांत विद्यालय, बाहुबलि हायस्कूल, जैन साहित्य उद्धारक मंडळ, अशा अनेक संस्थांची स्थापना करून या सर्वांचा अंतर्भाव ' बाहुबलि विद्यापीठ ' यामध्यें त्यांनीं केला आहे.

या सामाजिक कार्याच्या व्यापांत ते आपला आत्मा कधींच विसरूं शकले नाहींत. १९५२च्या डिसेंबर महिन्यांत महाराजांनीं स्वतःच्या ६१ व्या वर्षसमाप्तीच्या निमित्तानें भगवान् बाहुबलींच्या चरण-सान्निध्यांत मुनिवर्य १०८ प. पू. वर्धमानसागरजी महाराज यांच्या करकमलद्वारें परमपावन भगवती जिनदीक्षा धारण केली. सुमारें बावीस वर्षांचे असतांना कॉलेजमध्यें शिक्षण घेत होते त्याचवेळीं आपल्या रोजनिशींत त्यांनीं ' वयाच्या साठ वर्षानंतर राहिलेलें आयुष्य मुनिजीवनांत व्यतीत करावयाचें ' असा संकल्प लिहून ठेवला होता, तो त्यांनीं मुनिदीक्षा धारण करून पूर्ण केला.

पू. महाराजांच्या पाठोपाठ त्यांच्याच शिक्षणप्रणालींतून तयार झालेले १०५ क्षु. भद्रबाहु महाराज हे त्यांच्या कार्याची धुरा वाहण्यास समर्थ होत आहेत.

पू. समन्तभद्रमहाराजांचें जीवन अत्यंत पवित्र आणि ज्ञान-ध्यान-तप यांनीं युक्त आहे. त्यांनीं खरा मुनिधर्म आचरणांत आणून दाखविला आहे आणि मुनिवरसुद्धा समाजसेवेची कोणती जबाबदारी असते हें स्वतःच्या नित्य समाजसेवेनें सिद्ध करून दाखविलें आहे. त्यांच्या आशीर्वादानें आमचें जीवनहि पवित्र व मंगलमय बनो ही शुभ इच्छा व्यक्त करून त्यांना आम्ही त्रिवार वंदन [illegible]

सोलापूर
८-५-५४

ब्र. जीवराज गौतमचंद

# प्राक्कथन

जैन धार्मिक साहित्याचे स्थूलरीतीनें दोन भाग करणें शक्य आहे. एक तत्त्वज्ञानसंबंधी आणि दुसरा आचारसंबंधी. व्यावहारिक जीवनाच्या दृष्टीनें आचारशास्त्राचें स्थान महत्त्वपूर्ण आहे; कारण सदाचाराच्या द्वारेंच मनुष्य समाजांत आदरणीय आणि वैयक्तिक जीवनांत सुखी होऊं शकतो- आचारशास्त्राचे सुद्धां दोन भाग आहेत. एक मुनि-आचार आणि दुसरा गृहस्थ–आचार अथवा श्रावकाचार. या दोनहि प्रकारच्या आचारांचा द्वादशांग श्रुतांतहि समावेश केला आहे. सामान्यतः प्रथमश्रुत आचारांगांत मुनिधर्माचें आणि सातव्या श्रुतोपासकाध्ययनांत गृहस्थ-धर्माचें प्रतिपादन केलेलें आहे. उपलब्ध दिगंबर जैन साहित्यांत मुनिधर्माचें निरूपण करणारा स्वतंत्र प्राचीनतम ग्रंथ मूलाचार आहे, आणि गृहस्थ-धर्माचें निरूपण करणारा समन्तभद्रकृत रत्नकरण्ड–श्रावकाचार आहे.

या रत्नकरण्ड–श्रावकाचाराची रचना संस्कृत पद्यांत झाली आहे आणि त्याची भाषा आणि शैली सरळ, आकर्षक व हृदयग्राही आहे. दिगंबर समाजांत या ग्रंथाची प्रतिष्ठा फारच मोठी आहे आणि श्रावकांत हा ग्रंथ अत्यंत लोकप्रिय ठरला आहे. कितीतरी धर्माभ्यासी श्रावक हा ग्रंथ कण्ठस्थ करीत आले आहेत आणि प्रसंगानुपात त्याचे श्लोक प्रमाण म्हणून देत आले आहेत. हा ग्रंथ इतका सरळ आणि सुबोध आहे कीं, संस्कृतांत याच्यावर पुष्कळ टीका रचण्याची आवश्यकता भासली नाहीं. या कारणामुळें या ग्रंथावरील एकच प्रभाचंद्राचार्यकृत संस्कृत टीका उपलब्ध आहे. परंतु वर्तमान दक्षिण आणि उत्तरेच्या प्रचलित भाषांत ग्रंथाचीं रूपांतरें आणि विस्तृत भाष्यें पुष्कळ मिळतात. हिंदींत सर्वांगपरिपूर्ण प्राचीन भाष्य स्वनामधन्य पं. सदासुखजींचें आहे. हिंदी भागांत या ग्रंथाचा मोठा आदर आणि प्रचार झाला आहे.

श्री. ब्र. जीवराजभाईंच्या जीवनावर या ग्रंथाच्या स्वाध्यायाचा फारच मोठा प्रभाव पडला आणि त्यांनीं त्यांतील उपदेश आपल्या जीवनांत उतरविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचें फळहि आपण पाहत आहोंत. त्यांनीं गेल्या तीस पस्तीस वर्षांपासून आपली व्यावसायिक प्रवृत्ति सोडून धार्मिक जीवनाचाच अभ्यास केला आहे. एवढेंच नव्हें, तर ' जैन संस्कृति-संरक्षक-संघा ' ची स्थापना करून घरदारसहित आपली सर्व संपत्ति त्या संघाच्या स्वाधीन केली आहे. सध्यां ते अत्यंत शांत, निराकुल आणि सन्तोषमय धार्मिक जीवनाचा अनुभव घेत आहेत.

ब्र. जीवराजजींनीं आपलें ज्ञान निर्मल बनविण्यासाठी आपल्या साहित्यिक योग्यतानुसार या ग्रंथाचा मराठी अनुवाद जवळ जवळ चाळीस वर्षांपूर्वी केला होता. त्यावेळीं ती रचना त्यांनीं

प्रकाशनाच्या दृष्टीनें केली नव्हती. परंतु आम्हाला अशी इच्छा झाली कीं, या ग्रंथाच्या स्वाध्यायानें ब्र. जीवराजभाईना जसा अध्यात्मिक लाभ झाला तसाच तो अन्य श्रावकांनाहि व्हावा, यामुळेंच या ग्रंथाचे प्रकाशन करण्याचा निश्चय केला. हा ग्रंथ मराठी भाषिक जनतेला स्वाध्यायासाठीं अत्यंत उपयुक्त ठरेल अशी आमची आशा आणि विश्वास आहे. या ग्रंथाच्या स्वाध्यायानें त्यांना खरें सुख आणि शांति प्राप्त होईल.

सोलापूर
२१-४-५४

डॉ. आ. ने. उपाध्ये, एम्. ए.
डॉ. हिरालाल जैन, एम्. ए. एल्. एल्. बी.

# – प्र स्ता व ना –

**श्री समन्तभद्राचार्यांचा परिचय**—

जैन समाजाचे प्रतिभाशाली आचार्य, समर्थविद्वान् व पूज्य अशा महान् सत्पुरुषांमध्यें भगवान् समन्तभद्रस्वामींचें स्थान फार मोठें आहे. त्यांच्या नांवाचा ज्यास परिचय नाहीं, असा जैन विरळा. तरी पण त्यांच्या पवित्रतम जीवनकथेचा व निर्मल गुणांचा मात्र समाजांतील बहुंश भागाला परिचय नाहीं, ही गोष्ट खरी. ज्यांना जिनशासनाचा प्रणेता– 'प्रणेता जिनशासनस्य' असें श्रवणबेलगोलच्या शिलालेखांत म्हटलें आहे. अशा धर्मनेत्याच्या जीवनवृत्तान्ताविषयीं एवढें अज्ञान असावें ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. त्या बाबतींत आजपर्यंत अनेक प्रकारांनीं जैनेतिहासकारांनीं शोध करण्याचा प्रयत्न केला पण त्यांत त्यांना यश आलें नाही.

## पितृकुल व गुरुकुल

स्वामी समन्तभद्रांच्या बालकालाची अथवा गृह-जीवनाची कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. त्यांच्या मातापित्यांच्या नांवाचा उल्लेखहि मिळत नाही. 'आप्त-मीमांसा' नामक एका प्राचीन ताडपत्रावर लिहिलेल्या ग्रंथांत—

"इति फणिफणा मण्डलालंकारस्योरगपुरस्याधिपसूनोः श्रीस्वामिसमन्तभद्रमुनेः कृतौ आप्तमीमांसायाम्।"

असा उल्लेख आहे. त्यावरून ते क्षत्रिय राजकुलांत उत्पन्न झालेले राजपुत्र होते व त्यांचे पिता फणिफणामण्डलान्तर्गत उरगपुराचे अधिपति होते. उरगपुर ही त्यांची जन्मभूमि अथवा बाल्यकालभूमि असावी. 'राजावली कथा' नांवाच्या कानडी ऐतिहासिक ग्रंथांत त्यांचा जन्म 'उत्कलिका' नामक गांवीं झाल्याचा उल्लेख आहे. यावरून तें गांव बहुतेक 'उरगपुर' विभागांतच असावें. 'उरगपुर' हें 'उरैयूर' याचेंच संस्कृत भाषेंतील श्रुतिमनोहर रूप असावें. तें 'चोळ' राजाचें सर्वांत प्राचीन राजधानीचें शहर, कावेरी नदीच्या किनाऱ्यावर वसलेलें असून त्याकाळीं त्याचा बंदर म्हणूनहि उपयोग होत असावा.

श्री समन्तभद्रांचा 'स्तुति-विद्या' अथवा 'जिनस्तुतिशतं' या नांवाचा एक अलंकार ग्रंथ आहे. त्यांत 'गत्वैकस्तुतमेव' या नांवचें एक पद्य असून त्यांत कवि व कविकाव्याच्या नांवाचा उल्लेख आहे. तें चित्रबद्ध काव्य असल्यानें अनेक कमलपुष्पकारांत रचलें गेलें आहे. या पद्याचें सहा विभाग (आरे) करून भोंवतीं नऊ गोलांची रचना केली आहे. त्या श्लोकांत जे शब्द आहेत त्यावरून 'शांतिवर्मकृत' 'जिनस्तुतिशतम्' अशीं दोन पदें निघतात. यावरून तो ग्रंथ 'शांतिवर्मा' यांनीं रचिला असावा व शांतिवर्मा हें नांव श्री समन्तभद्रांचें मुनिपद धारण करण्या अगोदरचें त्यांच्या मातापित्यांनीं ठेवलेलें असावें. 'वर्मन्' या शब्दावरून क्षत्रियवंशाचा बोध होतो. कदंब,

गंग व पल्लव वगैरे वंशांत कित्येक राजांची नांवें 'वर्मान्त' नाम धारण करणारी आहेत. कदंब वंशांत 'शांतिवर्मा' नांवाचा एक राजा होता.

पितृकुलाप्रमाणेंच त्यांच्या गुरुकुलाचाहि शोध लागणें दुरापास्त झालें आहे. त्यामुळें त्यांचे गुरु कोण होते हें समजण्यास मार्ग नाही. त्यांच्या कोणत्याहि ग्रंथांत प्रशस्ति लिहिलेली नाहीं. त्यांच्या पश्चात् झालेल्या अनेक आचार्यांच्या ग्रंथांतहि त्यासंबंधी उल्लेख नाहीं. ते मूलसंघ आचार्य–परंपरेंतील एक प्रधान आचार्य होते एवढा उल्लेख फक्त मिळतो. विक्रमाच्या १४ व्या शतकांतील विद्वान् कवि 'हस्तिमल्ल' व 'अय्यपार्य' यांनीं 'श्रीमूलसंघव्योमेन्दुः' अर्थात् मूलसंघरूपी आकाशांतील चन्द्र या विशेषणानें त्यांना भूषविलें आहे.

याशिवाय श्रवणबेलगोलच्या शिलालेखावरून ( नं. ६४ ) श्रीभद्रबाहु श्रुतकेवलींचे शिष्य चंद्रगुप्त; चंद्रगुप्ताचे शिष्य पद्मनंदी अथवा कौंडकुंदमुनि; त्यांचे शिष्य उमास्वाति अपरनाम गृद्ध-पिच्छाचार्य व त्यांचे शिष्य बलाकपिच्छ अशा महान् आचार्यांच्या वंशपरंपरेंतील ते होते यांत शंका नाहीं.

याप्रमाणें स्वामी समन्तभद्रांच्या पितृकुलाचा व गुरुकुलाचा जरी निश्चित निर्णय करतां येत नसला, तरी या गौणबाबींकडे दुर्लक्ष करून त्यांच्या गुणांकडे पाहूं जातां, ते जैन आचार्य परंपरेंतील अत्यंत मोठे व कीर्तिमान् आचार्य होते याविषयीं शंका राहात नाहीं. त्यांची कीर्ति त्यांच्या गुरुकुल अथवा गणगच्छाहून अधिक होती. त्या कीर्तीनें पितृकुलालाहि उल्लंघिलें होते. म्हणून योग्य साध-नांच्या अभावीं त्यांच्या गुरुकुलाचा शोध न लागला, तरी त्यांनीं स्वतःच्या गुणसामर्थ्यानें धर्माची व समाजाची जी सेवा केली आणि स्वतःभोंवती जें वैशिष्ट्यपूर्ण वलय निर्माण करून घेतलें त्याचा विचार करूं.

## गुणपरिचय

श्रवणबेळगोळ शिलालेखांत "गुणतो गणीशः" असें एक विशेषण त्यानां दिलेलें आहे, त्यावरून गुणांच्या अपेक्षेनें 'गणीश' म्हणजे संघाधिपति - आचार्यांचा ईश्वर असा अर्थ निघतो. "समंतभद्र" म्हणजे अंतर्बाह्य सर्वत्र भद्रस्वरूपी. भद्र शब्दाचे कल्याण, मंगल, शुभ, ज्येष्ठ, साधु, मनोज्ञ, क्षेम, प्रसन्न व सानुकम्प इत्यादि अर्थ होतात. अर्थात् समंतभद्र हे इतक्या सर्व अर्थानें सार्थ नाम होते असें म्हणावें लागतें. भद्रपरिणामी, भद्रवाक्, भद्रव्यवहारी, भद्रदर्शन, भद्रार्य, भद्राश्लोकी अशा समंतभद्राकडे जे लोक येत ते भद्र परिणामी होवून जात. म्हणूनच कदाचित् दीक्षासमयीं त्यांना समंतभद्र असें नांव दिलें गेलें असावें, अथवा नंतरहि गुणांवरून हें सार्थ नांव मिळालें असावें. ते मोठे योगी, त्यागी, तपस्वी व तत्त्वज्ञानी होते यांत मुळीच शंका नाहीं. ते स्वतः ध्याना-ध्ययनमग्न राहून इतरांचें अज्ञान नाहीसें करीत. जैनधर्म व जैन सिद्धान्तांतील अध्यात्मवादाचे ते मर्मज्ञ असूनहि तर्क–व्याकरण, छंद–अलंकार, काव्यकोषादिक व्यावहारिक विभागांतहि पूर्णतया

निष्णात होते व संस्कृत, प्राकृत, कानडी व तामिळ इत्यादि भाषेमध्यें पारंगत होते. विशेषतः संस्कृत भाषेवरील प्रेम आणि प्रभुत्व तर असामान्य होते. त्या भाषेंतील त्यांची असाधारण योग्यताही आजच्या विद्वानांच्याहि लक्षांत आली आहे. एका " स्तुतिविद्या " ग्रंथावरूनहि त्यांच्या अद्वितीय शब्दाधिपतित्वाची कल्पना येते. त्यांचे आजपर्यंतचे सर्वच ग्रंथ संस्कृत भाषेंत आहेत. कानडी भाषेंतहि त्यांनीं ग्रंथरचना केली असावी. कारण तत्कालीन व त्यानंतरच्या त्या भाषेंतील विद्वानांनीं त्यांची प्रशंसा केली आहे. तामिळ प्रदेशांत त्यांची जन्मभूमि असल्यामुळें आणि तामिळ ही त्यांची मातृभाषा असल्यामुळें त्या भाषेंतहि त्यांची ग्रंथरचना होणें स्वाभाविकच आहे. तरी संस्कृत साहित्यावर त्यांचा अतुल प्रभाव होता. दक्षिण भारतांत उच्च कोटीच्या संस्कृत ज्ञानाला उत्तेजन देण्यांत व त्याचें प्रसारण करण्यांत त्यांनीं फारच मोठी कामगिरी केली. संस्कृत साहित्याच्या इतिहासाला त्यांच्या नांवाचा विसर कधींच पडणार नाहीं. एकप्रकारें समंतभद्रांचा काल हा संस्कृत साहित्याच्या इतिहासांत वैशिष्ट्यपूर्ण आणि विशेष वळण घेणारा ठरला यांत शंका नाही.

त्यावेळीं बौद्धांचा नैरात्म्यवाद, शून्यवाद, क्षणिकवाद यांचा अत्यंत जोर होता व त्याच्या प्रसारामुळें जनता आपल्या तत्त्वापासून चलित होण्याचा प्रसंग उत्पन्न झाला होता. त्यावेळीं दक्षिण भारतांत यांचा उदय झाला. आणि त्यांनीं आजन्म त्या वादाविरुद्ध झगडण्यांत अत्यंत परिश्रम केले. ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची व चिरस्मरणीय होती. यामुळेंच श्री. शुभचंद्राचार्यांनी आपल्या पांडव पुराणांत त्यांना " भारतभूषण " या उपाधीनें संबोधिलें आहे. समन्तभद्रांची योग्यता असीम होती. त्याजमधील कवित्व, गमकत्व, वादित्व आणि वाग्मित्व या चार गुणांनीं त्यांच्या असाधारण योग्यतेची थोडीशी कल्पना येण्यासारखी आहे. या चारहि गुणांमागील त्यांची अप्रतिम प्रतिभा व त्यांतून निर्माण झालेलें त्यांचें साहित्य यामुळें त्यांची कीर्ति दिगंत ठरली. भगवज्जिनसेनाचार्य महापुराणांत त्यांच्या गुणांबद्दल पुढीलप्रमाणें उल्लेख करतातः—

कवीनां गमकानां च वादिनां वाग्मिनामपि । यशः सामंतभद्रीयं मूर्ध्नि चूडामणीयते ॥ ४४ ॥

जिनसेनासारख्या कविश्रेष्ठांनीं समन्तभद्रांच्या कीर्तीला चूडामणि रत्नाची उपमा द्यावी यावरून त्यांच्यावर समंतभद्रांच्या वरील चारहि गुणांचा प्रभाव किती मोठा पडला होता हें दिसून येतें. समंतभद्रांच्याबद्दल असलेला आदर आणि भक्ति जिनसेनांच्या मुखांतून वरील अनुष्टुप् रूपानें जणुं साकार झाली आहे.

अकराव्या शतकांतील महाकवि वादिराजसूरि, ज्ञानार्णवकर्ते श्री शुभचंद्राचार्य, अलंकार–चिंतामणीचे कर्ते अजितसेनाचार्य, वरांगचरित्राचे कर्ते श्री वर्धमानमुनि, हनुमच्चरित्राचे कर्ते ब्रह्माजितसेन इत्यादि आचार्यांनीं त्यांच्या गुणांचा प्रकर्ष आपापल्या ग्रंथांत नमूद केला आहे. त्याचप्रमाणें श्री–वादीभसिंहसूरिकृत गद्यचिंतामणि ग्रंथांत आणि श्रवणबेळगोळच्या नंबर१०५ [ २५४ ] च्या१३ च्या शतकांतील शिलालेखांत त्यांच्या कार्याची आणि गुणांची स्तुति केली आहे. या सर्व गोष्टींवरून जैन साहित्यिकांच्या परंपरेंत त्यांचें स्थान किती असामान्य होतें याची सहज कल्पना येते.

स्वामी समंतभद्रांच्या वादपटुत्वाबद्दल त्यांचे विरोधी सुद्धां प्रशंसोद्गार काढीत. त्यांच्या अप्रतिहत वादशक्तीचा परिणाम प्रतिवादीवर इतका होत असे कीं त्यांना त्यावर निरुत्तर व्हावे लागे. त्यांचें वादक्षेत्र केवळ दक्षिणच नव्हतें. तर तें भारतव्यापी बनलें होतें. वाद घालणें या गुणाला त्यांच्या दृष्टीनें लौकिक महत्त्व नव्हतें. त्यांत विजिगीषु वृत्ति नव्हती. लोकांतील तत्त्वविषयक ऐकांतिक अज्ञानाचें निरसन करून त्यांची यथार्थ सत्यमार्गाकडें प्रवृत्ति करावी हा त्यांचा हेतु असे म्हणून त्यांनीं सारा भारतवर्ष आपलें लीलास्थल बनविलें होतें. तत्कालीन पद्धतीप्रमाणें अहंमन्य पंडितांनीं गजबजलेल्या शहरांना ते भेट देत. राजाश्रित विद्वानांना भेरीताडन करून आह्वान देत आणि वादासाठीं आलेल्या पंडितांना पराभूत करून परत पाठवीत अगर शिष्य बनवून घेत. स्याद्वाद पद्धतीच्या त्यांच्या तत्त्वसिद्धांत–प्रतिपादनावर लोक इतके मुग्ध होवून जात कीं, कोणीहि महान् पंडिताला त्या उलट एक शब्दहि उच्चारण्याची हिम्मत होत नसे. त्यांच्या भारतव्यापी वादविहारा संबंधीं आराधना–कथाकोषांत एक श्लोक आहे. तो असा—

> पूर्वं पाटलीपुत्रमध्यनगरे भेरी मया ताडिता । पश्चान्मालवसिन्धुठक्कविषये कांचीपुरे वैदिशे ॥
> प्राप्तोऽहं करहाटकं बहुभटं विद्योत्कटं संकटं । वादार्थी विचराम्यहं नरपते शार्दूलविक्रीडितम् ॥

यावरून पाटलीपुत्र ( पाटणा ), मालव, सिंधु, ठक्क ( पंजाब ), कांचीपुर ( कांजीवरम् ), वैदिश ( भिलसा ) हे मुख्य प्रदेश त्यांच्या वादाचे असून त्याठिकाणीं त्यांनीं वादाची दवंडी दिली होती आणि तेथें ते वादशार्दूल ठरले होते असें सिद्ध होतें.

श्री-समंतभद्रासंबंधीं ते पदर्धिकऋद्धिधारी होते असा उल्लेख सांपडतो. अर्थात् त्यांना ध्यान प्रभावानें इतर जीवमात्रांना बाधा न पोहोंचवितां गमन करण्याची शक्ति प्राप्त झाली असें खालील वाक्यांशावरून दिसतें.

> समंतभद्राख्यो मुनिर्जीयात्पदर्द्धिकः ( विक्रांत कौरव )
> समंतभद्रार्यो जीयात् प्राप्तपदर्द्धिकः । ( जिनेंद्रकल्याणाभ्युदय )
> समंतभद्रस्वामिगळु पुनर्दीक्षेगोण्डु तपस्सामर्थ्यदिं चतुरंगुलचारणत्वमं पडेदु । ( राजावलिकथे )

यांचा विशेष "स्याद्वादविवेचन–पद्धति" हा गुण सर्व विद्वानांना असामान्य वाटण्यासारखा आहे. या विवेचनपद्धतींत वस्तूचें सत् स्वरूप सिद्ध करतांना विवेचकाच्या ऐकांतिक पद्धतीमुळें जे दोष निर्माण होतात ते नाहींसें करण्याची अपूर्व शक्ति आहे. त्यामुळें अशा वादपद्धतीवर पक्षपातीपणाचा आरोप कधींच करता येत नसे. ते मूलतःच परीक्षाप्रधानी व तार्किक असल्यामुळें "बाबावाक्यं प्रमाणं" मानण्याचा उपदेश देत नसत. तसेंच कोणताहि सिद्धांत बलात्कारानें दुसऱ्यांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न करीत नसत. सर्व विद्वानांनीं निष्पक्ष दृष्टीनें स्वपर–सिद्धांताचा विचार करून समन्वयबुद्धीनें आपलें मत निश्चित करावें अशी त्यांची इच्छा असे. विशेषतः कोणत्याहि वस्तूचा एकाच दृष्टीनें विचार न करतां, त्या पदार्थाच्या अनेक अंगाकडें दृष्टी ठेवून विचार करण्यानेंच तिचें खरें स्वरूप समजतें. कारण, वस्तु अथवा पदार्थ अनेक धर्मात्मक– अनेक अंगात्मक

असल्यानें आंतील एकाच धर्माचें या अंगानें वर्णन एकांगी ठरतें म्हणून तें सदोष असतें. वस्तु अनेक धर्मात्मक आहे हें स्याद्वादाचें मुख्य तत्त्व आहे. तत्कालीन विद्वानांना ही स्याद्वादाची दृष्टि देण्याचें कार्य श्री समंतभद्रांनी केलें म्हणूनच त्यांच्या वादपद्धतीला स्याद्वाद विवेचन पद्धति असें नांव दिलें जातें. ही दृष्टि येण्यासाठीं आणि अन्य मतांतील दोष बारकाईनें शोधून काढण्यासाठीं त्यांनीं केवढा अभ्यास व बुद्धिप्रकर्ष केला होता याची कल्पना येण्यासारखी आहे. यांच्या काळांतच स्याद्वाद–विद्येचा विशेष विकास झालेला दिसतो. यांनींच स्याद्वादविद्येला विशद व व्यवस्थित रूप दिलें. यांच्या आधीचा कोणताहि ग्रंथ केवळ यात्र विषयाला वाहिलेला दिसत नाहीं. “ आप्तमीमांसा ” अथवा “ देवागमस्तोत्र ” हा नवा काल निर्माण करणारा ग्रंथ आहे. जैन साहित्यांत याच्या तोडीचा दुसरा कोणताहि ग्रंथ आज उपलब्ध नाहीं. म्हणून यांच्यानंतर होणाऱ्या अनेक आचार्यांनीं यांना स्याद्वाद–विद्याग्रगुरु, स्याद्वादविद्याधिपति, स्याद्वादशरीर व स्याद्वादमार्गाग्रणी अशीं विशेषणें देवून त्यांचें स्मरण केलें आहे.

समंतभद्रांची वक्तृत्वशक्तीहि अपूर्व होती. चन्नरायपट्टण तालुक्यांतील शक १०४७ मध्यें लिहिलेल्या नंबर १४९ व्या शिलालेखांत समंतभद्रांना “ श्रुतकेवलीची संतानपरंपरा उन्नत करणारे व सर्वविद्यांचे विधि ” असें म्हटलें आहे.

श्रुतकेवलिगळु पलवरुम् अतीतर् आद् इम्बलिके तत्सन्तानोन्नतियं समंतभद्र व्रतिपर् सकलेन्द्र समस्त विद्यानिधियप्पर्।

असाच उल्लेख बेलूरच्या रामानुजाचार्यांच्या मंदिराच्या छतावरील संवत् १०५९ मध्यें लिहिलेल्या शिलालेखांत आहे. या दोन उल्लेखांवरून स्वामी समंतभद्रांनीं या कलिकाळांत जैन मार्गाची अर्थात् स्याद्वादशासनाची असाधारण उन्नति केल्याचें दिसून येतें. नगर तालुक्याच्या ३५ व्या शिलालेखांत भद्रबाहु श्रुतकेवली नंतर कलिकाल–प्रवेश–प्रारंभीं यांना ‘ कलिकाल–गणधर ’ व ‘ शास्त्रकर्ता ’ म्हटलें आहे. यावरून त्यांच्या योग्यतेची कल्पना येईल. श्रीमद् अकलंकदेव, विद्यानंद, जिनसेन, वीरनंदी, नरेन्द्रसेन इत्यादि महान् आचार्यांनी श्री समंतभद्रांच्या अनेक अप्रतिम गुणांची स्तुति केली आहे. श्री–जिनसेनाचार्यांनी तर शके ७०५ मध्यें समाप्त केलेल्या आपल्या हरिवंश पुराणांत जीवसिद्धि प्रकरणासंबंधीं लिहितांना म्हटलें आहे—

जीवसिद्धिविधायीह कृतयुक्त्यनुशासनं । वचः समन्तभद्रस्य वीरस्येव विजृंभते ॥ ३०

युक्त्यनुशासनांतील त्यांच्या वचनाला वीर भगवंतांच्या वचनाची उपमा दिली आहे, यावरून समंतभद्रांची योग्यता ध्यानांत येण्यासारखी आहे.

वरील सर्व विवेचनांवरून श्री समंतभद्र आपल्या अलौकिक गुणांनीं अत्यंत महनीय व पूजनीय ठरले व या गुणांमुळेंच त्यांची देशदेशांतरांत अनन्य साधारण कीर्ति झाली. त्यामुळेंच त्यांना ‘स्वामि’ पदानें लोक संबोधूं लागले. इतर आचार्यांनाहि कोठें कोठें ‘स्वामि’ म्हणून उल्लेख असला, तरी तें विशेषण यांच्या तुलनेनें इतकें रूढ नाहीं. कारण इतर गुणविशेषणें सोडून पुष्कळ ठिकाणीं आचार्यांनीं या व्यक्तीचें केवळ ‘स्वामि’ या शब्दानेंच उल्लेख केले आहेत. या शब्दावरून

त्यांची प्रतिष्ठा व महत्ता प्रकट होते. खरोखरीच ते विद्वानांचे, तपस्व्यांचे, ऋषि-मुनींचे, सद्गुणी लोकांचे, सत्कृतींचे व लोकहितैषि-लोकांचे 'स्वामी' होते यांत संशय नाहीं.

## भावी तीर्थंकर

वरील गुणांशिवाय स्वामि समंतभद्रांमध्यें दुसरा अलौकिक गुण होता. त्यांना लोकहिताची चिंता एवढी जबरदस्त होती कीं रात्रंदिवस त्याशिवाय दुसरा विचार त्यांच्या मनांत येत नव्हता. त्यांच्या हृदयांत भूतहिताची भावना व विश्वप्रेमाची भावना नित्य जागृत होती. कुटुंबांतील कर्ता पुरुष जसा आपल्या कुटुंबाच्या उद्धारासाठीं नित्य झटत असतो तद्वत् जीवमात्रांच्या उद्धारासाठीं ते सदैव सावधान असत. वस्तुतत्त्वाची सम्यग्अनुभूति व सम्यग्योग-परिणति या द्वारा संचित झालेलें महान् सातिशय पुण्य यामुळेंच ते या भारत वर्षांत भावी कालांत धर्मतीर्थाचा प्रचार करण्यासाठीं तीर्थंकराचा अवतार घेणार आहेत, असा उल्लेख हस्तिमल्ल, ऐय्यपार्य, श्रुतसागर, नेमिदत्त इत्यादि आचार्यांनीं केला आहे.

## मुनिजीवन व आपत्काल

श्रीसमंतभद्र स्वामी मुनिव्रतांत राहून आपली संन्यस्त वृत्ति निर्दोष पालन करीत असतांना त्यांच्यावर एक नैसर्गिक आपत्ति येवून पडली. त्यावेळीं ते तिच्यांतून कसे पार पडले याची कथा हृदयद्रावक आहे, तिचा थोडक्यांत येथें उल्लेख करणें आवश्यक आहे. पंचमहापापांचा सर्वस्वी त्याग करून पंच समितींचें पालन, पंचेंद्रियांचें संयमन, चार कषायांचा निग्रह, षट्काय जीवांची रक्षा, निद्रा, स्नेह यांचा त्याग व उभे राहून एकवेळ जेवण याप्रमाणें मुनिव्रताचे २८ मूलगुण व उत्तर गुणांचें निर्दोष पालन करीत असतां असाता-कर्माच्या उदयानें 'मणुवकहळ्ळी' गांवांत असतांना त्यांना भस्मक नांवाचा रोग झाला. प्रथमतः त्यांनीं या रोगाकडे दुर्लक्ष केलें. पण तो वरचेवर वाढत चालल्यामुळें त्यांना शक्तिबाहेर वेदना होवूं लागल्या. उपवासादि क्रिया करणें अशक्य झालें. भस्मक रोग शांत होण्यासाठीं भरपूर स्निग्ध आहाराची सतत कांहीं दिवस आवश्यकता असते. पण त्यांना तर नियमित एक वेळ अयाचक वृत्तीनें जेवण घ्यावयाचा नियम असल्यामुळें रोगाची शांति होणें अशक्य झालें. त्यांनीं धैर्यानें सर्व कष्ट सहन केले. रोग शांत होत नाहीं व आवश्यक भोजन मिळत नाहीं, अशा स्थितींत शरीर दुर्बल होवून आवश्यक दैनंदिन क्रियामध्येंहि अडथळा येवूं लागला. त्यावेळीं त्यांनीं मनांत विचार केला कीं, 'मुनिव्रतांत राहून या रोगाचा प्रतिकार करणें हें तर अशक्य आहे. हा रोग असाध्य आहे, निष्प्रतीकारात्मक आहे. अशावेळीं सल्लेखनेशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं. आत्म्याच्या उद्धाराकरितां आपण हें महाव्रत घेतलें, त्याचा रोगाला भिऊन त्याग कसा करावा ? असा विचार मनांत चालला असतांना त्यांच्या दुसऱ्या प्रतिपक्षी विचारानें त्यांना निराळेंच मार्गदर्शन केलें. त्यांनीं विचार केला " आपण जैन-शासनाचा उद्धार करण्याचा संकल्प केला आहे. त्यामुळें लोकांचें अज्ञान व मिथ्यात्व दूर होणार आहे. लोकहिताचें हें महत्त्वाचें कार्य आपल्या हातून जर पार पडावयाचें असेल तर त्यासाठीं कांहीं काल रोगशमनार्थ मुनिपदाचा त्याग करून क्षुधा

निवारणार्थ उपाय केला पाहिजे. त्यानंतर पुनः मुनिव्रत धारण करून आत्महित साधतां येईल. यामुळें माझ्या ज्ञानदर्शनांत कांहींच फरक पडणार नाहीं व कोणतीच बाधा उत्पन्न होणार नाहीं. थोड्या कालापुरता हा आपद्धर्म स्वीकारून लोककल्याण साधावें " असा विचार झाला. दोन विचारांच्या झगड्यांत अखेर पहिल्या विचाराची सरशी झाली आणि मुनिव्रत न सोडतां आत्म-कल्याणार्थ सल्लेखना धारण करणें हेंच अंतिमदृष्ट्या हिताचें आहे, असा दृढ निश्चय करून ते आपल्या गुरुजवळ गेले व सल्लेखनेची याचना केली, असा राजावलि–कथेंत उल्लेख आहे. यावरून त्यावेळीं त्यांचे गुरु हयात होते असे दिसतें. आपल्या शिष्याची ती गोष्ट ऐकून गुरूची मुद्रा फार गंभीर झाली. क्षणभर त्यांनीं आपल्या मनाशीं विचार केला व आपल्या योगज्ञानानें आपला शिष्य अल्पा-युषी नाहीं, त्याच्या हातून जिनशासनाचा महान् उद्धार होणार आहे त्याअर्थीं अशा अकालीं हा सल्लेखनेस पात्र नाहीं असें जाणलें व त्यांनीं श्रीसमंतभद्रास सांगितलें " तुजकडून जिनशासनाच्या उद्धाराची मला फार मोठी अपेक्षा आहे. ती तूं पूर्ण करशील अशी माझी खात्री आहे. अशा वेळीं मी तुला सल्लेखनेची आज्ञा देवूं शकत नाहीं. उलट माझी तुला अशी आज्ञा आहे कीं, हा भस्मक रोग शांत होईपर्यंत तूं जेथें व ज्या वेषांत राहणें इष्ट वाटेल तेथें, त्या वेषांत राहून यथेच्छ आहार घ्यावा. थोड्या काळांत रोग शांत झाल्यानंतर पुन्हां मुनिव्रत धारण करावें. " याप्रमाणें गुरूंची आज्ञा झाली. ती प्रमाण मानून त्यांनीं सल्लेखनेचा विचार रहित केला व सर्वांगाला भस्म फांसून जटाधारी कुलिंगी साधूचा वेष घेतला. त्यावेळीं त्यांना अंतरंगांत फार दुःख झालें. आराधना कथा-कोषांत कथाकोषकारांनीं त्यावेळीं ते कसे शोभले याचें वर्णन एका श्लोकांत पुढीलप्रमाणें केलें आहे.

अंतःस्फुरितसम्यक्त्वो बहिर्व्याप्तकुलिंगकः । शोभितोऽसौ महाकान्तिः कर्दमाक्तो मणिर्यथा ॥

बाह्यांगीं भस्म व अंतरंगांत सम्यग्दर्शनादि दिव्य प्रकाश यामुळें चिखलानें माखलेल्या अत्यंत तेजःपुंज रत्नासारखे ते दिसत होते.

राजावलि कथेप्रमाणें ते मणुवकहळ्ळी गांवाहून निघून कांचीला शिवकोटी राजाच्या भीमलिंग नांवाच्या शिवमंदिरांत गेले. राजाला आशीर्वाद दिला. साधूंची ती भव्य व भद्राकृति मुद्रा पाहून राजा विस्मित झाला. त्यानें ' शिव ' समजून त्यांना नमस्कार केला. महाराजांनीं तेथील धर्मव्यवस्थे-बाबत विचारणा केल्यावरून राजानें शिवभक्ति, शिवाचार, मंदिर–निर्माण यांचा परिचय देऊन, या मंदिरांत दररोज बारा खंडुग [ सुमारे ४० शेर, ८० भाराचा शेरानें ] भात नैवेद्यासाठीं दिला जातो असें सांगितलें.त्यावरून महाराजांनीं,'तुमचा तो नैवेद्य मी शिवार्पण करितो म्हणजे प्रत्यक्ष ईश्वराकडून खाववून दाखवितो ' असें सांगून सर्वांना बाहेर जाण्यास सांगितलें व दार बंद करून घेतलें. सर्व लोक बाहेर गेल्यानंतर तें सर्व अन्न त्यांनीं खाऊन टाकलें व दरवाजा उघडून सर्वांना आंत बोलवून तुमचा सर्व नैवेद्य महादेवानें भक्षण केला असें सांगितलें. तें ऐकून व पाहून राजास आश्चर्य वाटलें. पहिल्या दिवसाचा आहार त्यांच्या जठराग्नीनें पचविला. त्यामुळें रोगाची अल्पांशानें तृप्ति झाली. त्यामुळें दुसऱ्या दिवसाच्या नैवेद्यांतून थोडासा आहार शेष राहिला. याप्रमाणें क्रमानें दररोज

अधिकाधिक आहार शिल्लक राहत असलेला पाहून राजास संशय उत्पन्न झाला. त्यानें पांचव्या दिवशीं देवळाला गराडा घालून दरवाजा उघडण्याची आज्ञा दिली. राजसेवकांची धडपड ऐकून यापुढें आपणावर उपसर्ग प्राप्त होणार असें समजून तो निवृत्त होईपर्यंत त्यांनीं अन्नपाण्याचा त्याग केला व एकाग्रचित्तानें चतुर्विंशति तीर्थंकरांची स्तुति करण्यास प्रारंभ केला.आदिभगवंतापासून यथाक्रम स्तुति चालू असतां अष्टम तीर्थंकर चंद्रप्रभ यांच्या स्तुतिसमयीं त्यांची दृष्टि भीमलिंग मूर्तीकडे गेली. तों त्याठिकाणीं त्यांना चंद्रप्रभ भगवंताची प्रकाशमान चंद्रलांछनयुक्त अशी स्फटिकमणि मूर्ति दिसून आली. हें पाहून त्यांनीं देवळाचा दरवाजा उघडला व आपण शेष तीर्थंकरांची स्तुति करण्यांत गढून गेले. दरवाजा उघडतांच शिवकोटि राजा आंत आला. तें दृश्य पाहून आश्चर्यचकित झाला. त्याचें हृदयपरिवर्तन झालें व त्यानें आपला धाकटा भाऊ शिवायन यासह योगिराज समंतभद्र यांना साष्टांग नमस्कार घातला. स्तुति पूर्ण झाल्यानंतर समंतभद्रांनीं त्या दोघांना आशीर्वाद दिला व धर्माचें सत्य–स्वरूप समजावून दिलें. शिवकोटि राजाला वैराग्य प्राप्त झालें. त्यानें आपल्या श्रीकंठ मुलाला राज्य देऊन आपल्या भावासह मुनिराजाजवळ दीक्षा धारण केली. त्यावेळीं अनेकांनीं अणुव्रतें धारण केलीं.

याप्रमाणें श्री. समंतभद्र थोड्याच अवधींत रोगमुक्त झाले व आपत्काल संपला.नंतर प्रायश्चित्त-पूर्वक त्यांनीं पुन्हां जैन–मुनिदीक्षा धारण केली. आठशे वर्षापूर्वी ( शक संवत् १०५० ) लिहिलेल्या श्रवणबेळगोळ येथील नंबर ६४ व ६७ च्या शिलालेखांत या कथेचा थोडक्यांत उल्लेख केला आहे.

वंद्यो भस्मकभस्मसात्कृतिपटुः पद्मावतीदेवता, दत्तो-दात्त-पद-स्वमंत्र-वचन-व्याहूतचंद्रप्रभः।
आचार्यस्स समंतभद्रगणभृद्येनेह काले कलौ, जैनं वर्त्म समंतभद्रमभवद्भद्रं समन्तान्मुहुः ॥

## ग्रंथसमृद्धि

श्री समंतभद्रांनीं रचिलेल्या सर्व ग्रंथांची सविस्तर माहिती देणें हें स्थलाभावीं अशक्य आहे. तरी त्यांनीं रचिलेल्या ग्रंथांचीं केवळ नांवें देऊन हा परिचय समाप्त करूं. १ आप्तमीमांसा, २ युक्त्यनुशासन, ३ स्वयंभूस्तोत्र, ४ जिनस्तुति–शतक, ५ रत्नकरण्ड उपासकाध्यन, ६ जीवसिद्धि, ७ तत्त्वानुशासन, ८ प्राकृत व्याकरण, ९ प्रमाणपदार्थ, १० कर्मप्राभृत टीका व ११ गंधहस्ति महाभाष्य इत्यादि महाग्रंथांची स्वामींनीं रचना केली आहे.

वरील आचार्यांचा परिचय पंडितवर जुगलकिशोर मुख्त्यार सरसावा यांनीं माणिकचंद ग्रंथ-मालेंत प्रसिद्ध झालेल्या रत्नकरंड श्रावकाचाराच्या भूमिकेवरून अनुवादित केलेला आहे.

ब्र. जीवराज गौतमचंद

# ग्रंथपरिचय

' रत्नकरण्ड–उपासकाध्ययन ' अथवा सर्वत्र ज्याला रत्नकरण्ड–श्रावकाचार या नांवानें ओळखतात असा हा ग्रंथ-श्रावकाचार कथन करणारा पहिला प्राचीन ग्रंथ होय. समंतभद्र स्वामींनीं तो रचिला आहे. याची हस्तलिखित प्रत नाहीं असा दिगंबर जैनांचा शास्त्रभांडार क्वचितच् आढळून येईल. यावरून पूर्व काळांत याची केवढी प्रसिद्धि व मानमान्यता होती याची कल्पना येण्यासारखी आहे.

हा ग्रंथ मूलस्वरूपांत म्हणजे संस्कृत भाषेंत तसेंच हिंदी व मराठी भाषेंत अनेकवेळां भाषांतरासह प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथांत श्रावकाचाराचें थोडक्यांत पण मुद्देसूद वर्णन असून सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्ररूपी रत्नत्रय धर्माचें स्वरूप सांगितलें आहे. हा धर्म समजून घेऊन त्याची यथाक्रम आराधना केल्यास श्रावकांना क्रमानें मुनिव्रत पाळण्याची योग्यता येते व मुनिव्रतानंतर सर्व कर्मांचा क्षय करून मुक्त होतां येतें. या उलट जर मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान आणि मिथ्याचारित्र हीं आचरलीं जातील तर संसारपरिभ्रमण चुकवितां येणार नाहीं. विद्यमान असलेल्या अनेक श्रावकाचार ग्रंथांपैकीं हा आद्य ग्रंथ होय. पंडित जुगलकिशोर मुख्तार यांच्या मतें संस्कृत भाषेंत हाच पहिला ग्रंथ होय.

मूळ ग्रंथांत सम्यग्दर्शनादि तीन अंगांचें वर्णन थोडक्यांत सात विभाग पाडून केलें आहे. पहिल्या विभागांत सम्यग्दर्शनाचें संपूर्ण वर्णन केलें आहे. सत्यार्थआप्त, आगम व गुरु यांजवर तीन मूढता व आठ गर्व यांनीं रहित व आठ अंगांनीं सहित अशी श्रद्धा ठेवणें याला सम्यग्दर्शन म्हटलें आहे. त्यानंतर आप्त, आगम व गुरु यांचीं लक्षणें, लोकमूढता, देवमूढता व पाखंडिमूढतांचें स्वरूप, ज्ञानादि आठ मदांचीं नांवें व निःशंकितादि आठ अंगांचें महत्वपूर्ण स्वरूप वर्णिलें आहे. याशिवाय वीतरागी जीवच हितोपदेशी कसा असतो, अठरा दोष नाहींसें करणाराच वीतरागी कसा ठरतो आणि अंगरहित सम्यग्दर्शन जन्म-संततीचा नाश कां करूं शकत नाहीं, धार्मिक पुरुषांचा अनादर म्हणजेच धर्माचा अनादर इत्यादि विषय आणि सम्यग्दर्शनाचा महिमा यांचें फारच सुंदर वर्णन केलें आहे.

दुसऱ्या विभागांत सम्यग्ज्ञानाचें लक्षण सांगून त्याला विषयभूत असलेल्या प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग व द्रव्यानुयोग या वेदांगज्ञानाचें सामान्य लक्षण सांगितलें आहे.

तिसऱ्या विभागांत सम्यक्चारित्र धारण करण्याची पात्रता व आवश्यकता यांचें प्ररूपण करतांना हिंसा, असत्य, चोरी, मैथुनसेवन व परिग्रहरूप पापप्रणालिकेपासून विरक्त राहण्याचा उपदेश दिला आहे. पापामुळें मनुष्य संसारांत अडकतो आणि पापें रागद्वेषामुळें होतात. म्हणून

रागद्वेषांपासून निवृत्ति याचेंच नांव सम्यक्चारित्र असें आचार्यांचें तर्कशुद्ध प्रतिपादन आहे. चारित्राचे सकल-चारित्र व विकल-चारित्र असे दोन भेद करून सकल-चारित्र हें सर्वसंगविरत महाव्रती मुनिकरितां असल्याचें सांगितलें आहे आणि विकल-चारित्र हें ससंग सागारासाठीं असल्याचें सांगितलें आहे. विकल-चारित्रांत पांच अणुव्रतें आणि सप्तशील यांचा अंतर्भाव केला आहे. या बाराहि व्रतांचीं लक्षणें आणि त्यांचे अतिचार यांचें वर्णन अत्यंत सुटसुटित आणि स्पष्ट दिलें आहे.

चौथ्या विभागांत दिग्व्रत, अनर्थदण्डव्रत व भोगोपभोग-परिमाण या गुणव्रतांचें वर्णन अतिचारासह दिलें आहे. अनर्थदण्डव्रत आणि त्याचे पापोपदेश, हिंसादान, अपध्यान, दुःश्रुति व प्रमादचर्या हे पांच भेद आणि भोगोपभोग–व्रतांतील विशिष्ट प्रकारच्या त्यागाचा विधि व यम नियमाचें स्वरूप यांचें वर्णन सूक्ष्मपणें केलें आहे.

पांचव्या विभागांत देशावकाशिक, सामायिक, प्रोषधोपवास व वैय्यावृत्त्य या चार शिक्षाव्रतांचें वर्णन त्यांच्या अतिचारासह केलें आहे. सामायिक व प्रोषधोपवास यांचा विधि अतिसूक्ष्मपणें सांगितला आहे. सामायिकाच्या वेळीं गृहस्थ हा यतिभावाला प्राप्त होतो आणि चेलोपसृष्ट म्हणजे उपसर्ग करून ज्याला वस्त्र नेसविलेलें आहे अशा मुनिप्रमाणें शोभतो असें भावपूर्ण वर्णन केलें आहे. त्यानंतर दान, पूजा यांचा विधि सांगितला आहे. दानाचे आहार, औषध, ज्ञान व अभय याप्रमाणें चार प्रकार करून त्यांत पूर्णपणें सामाजिक व धार्मिक दृष्टि ठेवली आहे.

सहाव्या विभागांत व्रतपंचक–परिपूर्ण अशा सल्लेखनेचें स्वरूप आणि आवश्यकता दाखवून संक्षेपांत समाधिमरणाचा विधि दाखविला आहे.सल्लेखनेचें फळ जो मोक्ष, त्यांतील निरतिशय सुखाचें वर्णन आचार्यांनीं अत्यंत काव्यमय केलें आहे.

सातव्या विभागांत श्रावकपदांचें (अकरा प्रतिमा यांचें) क्रमशः वर्णन केलें आहे. उत्तर प्रतिमेंत पूर्वप्रतिमेंतील संपूर्ण गुणांचा सद्भाव दाखविला असून, अकरा प्रतिमांच्या पालनानें परिणाम–विशुद्धि होऊन क्रमशः जीव सर्वसंग–परित्याग करण्यास पात्र होतो. या प्रतिमांत सहावी रात्रभोजन त्याग–प्रतिमा सांगितली असून, अहिंसेशीं तिचा निकट संबंध असल्यामुळें, तिचा व्रतरूपांत अवश्य स्वीकार व्हावा असा त्यांत हेतु आहे.

याप्रमाणें मूळ ग्रंथांत स्वामींनीं श्रावकधर्माचें जें वर्णन केलें आहे तें अत्यंत हृदयग्राही, समीचीन, सुखमूलक व प्रामाणिक आहे. हा ग्रंथ खरोखरीच धर्मरत्नांची लहानशी पेटी आहे. तदनुरूप त्याचें नांवहि ' रत्नकरण्डक ' ठेवण्यांत आलें आहे तें अत्यंत सार्थ व मार्मिक आहे.

## श्रीप्रभाचंद्राचार्यांची टीका

या ग्रंथावर श्री–प्रभाचंद्राचार्यांची संस्कृत टीका आहे. ती माणिकचंद ग्रंथमालेंत मूळ ग्रंथासह प्रसिद्ध झाली आहे. हे प्रभाचंद्र न्यायकुमुदचंद्र व प्रमेयकमलमार्तंड यांच्यावर टीका लिहिणारे प्रभाचंद्र नव्हेत. प्रभाचंद्र या नांवाचे जवळ जवळ पंधरा आचार्य वेगवेगळ्या कालांत झाले आहेत.

त्यांतून आध्यात्मिक व न्यायप्रचुर ग्रंथावर टीका लिहिणारे आचार्य प्रभाचंद्र या टीकेचे कर्ते असावेत असें या ग्रंथाच्या भाषा व साहित्यावरून दिसून येत नाहीं असें पं. जुगलकिशोरजींचें मत आहे.

## पंडित सदासुखजी व त्यांची हिंदी टीका

पंडित सदासुखजी [ विक्रम संवत् १८५२ ते १९२३ ] रा. जयपुर, यांनीं हिंदी भाषेंत या ग्रंथावर सविस्तर टीका लिहिली आहे. त्यांच्या टीकेचाच मराठी अनुवाद आज आपल्यापुढें ठेवीत आहोंत. पंडित सदासुखजी यांच्या ग्रंथाचा उत्तरेकडील जैनसमाजांत फार प्रसार झाला व सर्व-सामान्य लोकांनासुद्धां त्यापासून स्वाध्यायाचा लाभ झाला. श्रावकधर्माचें यथार्थ ज्ञान आगमपरंपरेला धरून कसें असावें हें लोकांना कळलें. पंडितजींचा सामान्य जैन समाजावर हा फार मोठा उपकार झाला. पंडितजींचें चरित्र स्वतंत्र यापुढें संक्षिप्त दिलें आहे, त्यावरून त्यांच्या कार्याची आणि महत्तेची कल्पना येईल.

## मराठी भाषेंत धर्मग्रंथांचा अभाव

महाराष्ट्रांत जी जैन लोकसंख्या आहे त्यांना नित्यस्वाध्यायाच्या उपयोगी अशा धर्मग्रंथांच्या भाषांतराचीं प्रकाशनें फार थोडीं झालीं आहेत. हिंदी भाषा पंडितांनीं उत्तर प्रदेशांत जैनागमांतील बहुतेक प्रसिद्ध अशा सर्व आध्यात्मिक, व्यावहारिक व पौराणिक ग्रंथांचीं स्वभाषेंत रूपांतरें केलीं आहेत. त्यामुळें तिकडील सर्वसामान्य लोकांच्या स्वाध्यायाची सोय झाली. इकडील लोकांपेक्षा तिक-डील लोकांत धार्मिक ज्ञानहि अधिक आहे तसा इकडे प्रकार झाला नाहीं. पन्नास–साठ वर्षांपूर्वी इकडच्या भागांत स्व. तीर्थस्वरूप हिराचंद नेमचंद यांनीं मराठी भाषेंत धार्मिक ग्रंथ प्रसिद्ध कर-ण्याचा प्रघात सुरू केला. त्यानंतर स्वर्गीय धर्मवीर श्री. रावजी सखाराम दोशी यांनीं प्रथमानुयोगां-तील पुष्कळ ग्रंथांचीं प्रकाशनें करून लोकांस ऋणी करून ठेविलें आहे. अद्यापि अशा अनुवाद ग्रंथांची या भागांत अत्यंत जरूरी आहे. शिक्षणप्रसारानें लोकांत वाचनाभिरुचि उत्पन्न झाली आहे. अशावेळीं सरळ व सोप्या भाषेंतील धर्मग्रंथांची आवश्यकता अधिकाधिक वाटूं लागली आहे.

## अनुवादाचें मराठी रूपांतर

४१ वर्षांपूर्वी आम्ही या ग्रंथाचा स्वाध्याय करीत असतांना त्याचा जो परिणाम आमच्या मनावर झाला त्यामुळें आमच्या पुढील आयुष्याचें शील बनलें. ज्या ग्रंथामुळें आमच्यावर हा महान् उपकार झाला त्या ग्रंथाचें समाजांतील आबाल–वृद्धासाठीं मराठींत भाषांतर झाल्यास सहज रीतीनें धर्माचीं तत्वें समजून त्याप्रमाणें सदाचार प्रवृत्ति उत्पन्न होईल असें वाटून, आमची अनुवाद कर-ण्याची योग्यता नसतांहि तो करण्याचे योजिलें. संकल्पानुसार प्रत्यहीं दोन तीन पानें लिहून तो ग्रंथ संवत् १९६९ चैत्र वद्य १० ला पूर्ण केला. पण आजपर्यंत तो प्रसिद्ध करण्याचा प्रसंग आला नाहीं. याचें कारण आमची योग्यता नव्हती व पूर्व वयांत एवढा मोठा खर्च करून पांचशें पानांचा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें सामर्थ्यहि नव्हतें. तसेंच त्यावेळीं स्वतःच्या अपूर्ण ज्ञानामुळें व परभाषेंतून स्वभाषेंत चांगली रचना करण्याच्या पात्रतेचा अभाव असल्यामुळें तो प्रकट होऊं शकला नाहीं.

## प्रकाशनाचा हेतु

श्री-समंतभद्र स्वामींनीं मूळ ग्रंथ सात विभागांत वर्णिला आहे हें वर सांगितलेंच आहे. परंतु पंडित सदासुखजींनीं या ग्रंथाचे चार विभाग करून विस्तृत विवेचन केलें आहे. तें अगदीं सोप्या भाषेंत असून साधारण लिहितां वाचतां येणाऱ्याला सुद्धां समजण्यासारखें आहे. द्विरुक्ति हा साहित्यांत दोष असला तरी सर्व साधारण लोकांच्यासाठीं तो दोषसुद्धां मोठीं माणसें पत्करतात. या दृष्टीनें पुनरुक्ति इष्टापत्तीच मानली पाहिजे. या ग्रंथाची रचना विद्वानपंडितांसाठीं नसून सामान्य लोकांसाठीं आहे व त्यांच्यासाठींच हा ग्रंथ प्रकाशिला जात आहे.

## टीकेची रूपरेषा

यांत सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या रत्नत्रय धर्माचें स्वरूप सांगून विशेषतः शेवटच्या भावनाधिकारांत चारित्राचें विस्तृत वर्णन केलें आहे. त्यामुळें या ग्रंथाचा स्वाध्याय केल्यानें श्रावकधर्माची स्पष्ट रूपरेखा व अहिंसा तत्त्वाची क्रमशः परिपूर्ति कशी करतां येईल याची कल्पना वाचकांच्या लक्षांत येते. तसेंच शेवटच्या भावनाधिकारांत दशधर्म, षोडशकारण भावना, व्रतांचे अतिचार, चतुर्विध दान, ध्यान, सल्लेखना-मृत्युमहोत्सव व शेवटीं अकरा प्रतिमांचें वर्णन आलें आहे. त्यावरून जैन श्रावकांना आपला आचार विचार व्यवहाराला व शक्तीला अनुसरून कसा ठेवावा व क्रमशः रागद्वेष कसे कमी करावेत याचें ज्ञान सहज होऊं शकतें. शक्यतों या मार्गानें आचरण करण्याचें योजिलें तर शेवटीं सर्वसंग परित्याग करून मुनिव्रत धारण करण्याची पात्रता येते व त्यामुळें जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून सुटून अंतिम निर्वाण प्राप्त करून आत्मकल्याण करून घेण्याचा मार्ग स्पष्ट होतो.

## पंडित सदासुखजींच्या मतांतील भिन्नता

पं. सदासुखजी हे तेरा पंथांचे अभिमानी होते, ही गोष्ट त्यांच्या चरित्रावरून स्पष्ट होते. मूळ संस्कृत ग्रंथांत तेरा पंथ किंवा वीस पंथ याचा उल्लेख नाहीं. हे पंथ दोन तीनशें वर्षांत उत्पन्न झाले आहेत. त्यांच्या अतिअभिनिवेशामुळें जिनशासन-रक्षक क्षेत्रपाल, पद्मावती वगैरे देवतांच्या पूजनासंबंधीं त्यांनीं अत्यंत कटु टीका केली आहे आणि त्यांची पूजा करणाऱ्यास मिथ्यात्वी म्हटलें आहे. त्यांच्या या मताची शास्त्रोक्त पद्धतीनें चिकित्सा होणें अवश्य आहे.

## पूजा शब्दाची ओढाताण

वस्तुतः पूजन शब्दाच्या अर्थाची ओढाताण केल्यामुळें हा गैरसमज उत्पन्न झाला आहे. आधुनिक पंडितांत अज्ञानी लोकांच्या पूजेचें विकृत स्वरूप पाहून त्याचा निषेध करण्याची प्रवृत्ति वाढली. याला कारण त्यांना असें वाटलें कीं, याचा निषेध केल्यामुळें पूजेसंबंधी धर्मज्ञान-पराङ्मुख बहुजन समाजाच्या ज्या विकृत समजुती आहेत त्या दूर होतील.

वास्तविक क्षेत्रपालादिक देव जिनभक्त असल्यामुळें सम्यग्दृष्टि म्हणविले जातात. सम्यग्दृष्टी पुरुषांचा आपण जसा सन्मान करतो तसेंच सम्यग्दृष्टी क्षेत्रपालादिक देवांचा सन्मान करणें यांत वावगें काय आहे ? व्यवहारांत परस्पराशीं सभ्यतेनें वागण्याचे संकेत अथवा नियम जसे रूढींनीं निर्माण होतात तसेच परमार्थांतहि वागणुकीचे कांहीं संकेत अथवा नियम ठरलेले असतात. प्राचीन आचार्यांनीं भगवंतांचे पंचकल्याणिक महोत्सव कसे करावेत, समवसरणामध्यें दशदिक्पालादिक देवांच्या योग्यतेप्रमाणें त्यांच्या वैभवाला व त्या सभेला शोभतील अशीं स्थानें कशीं निर्माण करावींत, प्रत्येकानें आपल्या योग्यतेप्रमाणें कोठें उभे रहावें व बसावें व कोणीं कोणतीं कामें करावींत याची व्यवस्था सौधर्म इंद्राला करावी लागते. स्वर्गांतील देवांतहि त्यांच्या वैभवाला अनुसरून स्थानें न ठरविलीं तर सभेची मांडणीच व्यवस्थित होणार नाहीं. यामुळें जी व्यवस्था करावी लागली ती निरर्थक होती असें म्हणतां येणार नाहीं. योग्यतेप्रमाणें सन्मान करणें यालाहि पूजाच म्हटलें गेलें तरी ती पूजा आणि जिनेंद्र भगवंतांची पूजा यांत कधींच साम्य मानलें गेलें नाहीं.

## दोघांची योग्यता सारखी मानलेली नाहीं

देवाधिदेव भगवंतांची पूजा, त्या पूजेचा विधि, त्याचे मंत्र यांचा संबंध क्षेत्रपालादि देवांशी लावून त्यांची पूजा, विधि व मंत्र यांचा निषेध केला व पूजा करणाऱ्यांना मिथ्यात्वी म्हटलें. पण जिनेंद्र भगवंतांच्या पूजेच्या मंत्रांत आणि शासनदेवतेच्या पूजेच्या मंत्रांत अंतर आहे. ते दोन्ही मंत्र असे आहेत —

> ॐ नमोऽर्हते परब्रह्मणे श्रीमदर्हत्परमेष्ठिने जन्मजरामृत्युनिवारणाय जलं निर्वपामीति स्वाहा।
> ॐ ह्रीं सर्वाह्णयक्षाय इदमर्घ्यं, पाद्यं, गंधं, अक्षतान् पुष्पं, चरुं, दीपं, धूपं, फलं, बलिं, स्वस्तिकं, यज्ञभागं च यजामहे प्रतिगृह्यताम् २ स्वाहा ॥

यावरून श्री अर्हंतपरमेष्ठींना 'निर्वपामि' व क्षेत्रपालांना 'प्रतिगृह्यताम्' असें वेगवेगळे शब्द योजिल्याचें स्पष्ट दिसतें. दोघांचाहि दर्जा आचार्यांनीं एक मानला नाहीं. हें उघड असतांना पूजा शब्दाचा रूढ अर्थ घेऊन दोन्हीहि पूजा एकच आहेत असा गैरसमज करून घेतला गेला. 'यशस्तिलक' ग्रंथांत आठव्या आश्वासांतील ३९७ पृष्ठांत श्रीसोमदेवाचार्यांनीं—

> देवं जगत्त्रयीनेत्रं व्यंतराद्याश्च देवताः । समं पूजाविधानेषु पश्यन्दूरं व्रजेदधः ॥

असें म्हटलें आहे. यावरून दोघांना समान समजूं नये. आचार्यांनी दोघांनाहि समान समजणारा दुर्गतीला जातो ( अधः व्रजेत् ) असें म्हटलें आहे. यानंतरच्या पुढील श्लोकांत अशा देव-देवतांची आराधना कां करावी याचें कारण त्यांनीं खालीलप्रमाणें दिलें आहे.

> ताः शासनाधिरक्षार्थं कल्पिताः परमागमे । अतो यज्ञांशदानेन माननीयाः सुदृष्टिभिः ॥
> तच्छासनैकभक्तानां सुदृशां सुव्रतात्मनाम् । स्वयमेव प्रसीदन्ति ताः पुंसां सपुरंदराः ॥

जिनशासनाचें रक्षण करण्यासाठीं परमागमांत, पूजाप्रतिष्ठादि–शास्त्रांत त्यांची योजना केली आहे. ज्याअर्थी त्यांची योजना त्या शास्त्रांत केली आहे त्याअर्थी ते माननीय आहेत. म्हणून सम्य-

ग्दृष्टी पुरुषानें अंशतः त्यांचा आदर करावा. जिनशासनभक्त सम्यग्दृष्टी व व्रतिक पुरुषांवर ते स्वतः इंद्रासह प्रसन्न होतात.

## शासनदेवता सम्यग्दृष्टी आहेत

वरील श्लोकाचा अर्थ नीट ध्यानांत घेतला म्हणजे आपणांस दिसून येईल कीं, आचार्यांनीं शासनदेवतांना सम्यग्दृष्टी म्हटलें आहे. असे देव मिथ्यादृष्टी नसल्यामुळें त्यांची पूजा करणें, आदर-सत्कार करणें हें मिथ्यात्व ठरत नाहीं. आचार्यांनीं त्यांना माननीय हा शब्द लावून त्यांची योग्यता ही भगवंताहून भिन्न आहे व त्यांची पूजाहि सुद्धां निराळ्याच हेतूनें केली जावी हें सुचविलें आहे. या देवता इष्टदेवता आहेत. त्यांचा आदरसत्कार त्यांना आवाहन करून करावा आणि मग भगवंतांच्या पूजेस प्रारंभ करावा. यामुळें पूजा निर्विघ्न पार पडेल.

## स्थापनेचें कारण

प्रतिष्ठापाठांत नेमिचंद्राचार्यांनीं समवसरणांत यक्षदेवाची स्थापना करण्याचें कारण सांगितलें आहे. तें असें—

> इन्द्रो जिनेन्द्रोत्तमशासनस्य त्राणे प्रवीणं प्रतिशासनार्हम् ।
> न्ययुङ्क्त सत्कृत्य यमादरात्तं न्यसामि यक्षं जिनसव्यभागे ॥१॥

जिनशासनाचें रक्षण करण्याचें कामीं प्रवीण व मिथ्यादृष्टी जनांना शासन करणाऱ्या यक्षाचा आदर [ सत्कार ] करून प्रेमानें त्याला जिनेश्वराच्या उजव्या बाजूला इंद्रानें स्थापन केलें, तसें मीहि प्रभूच्या उजव्या बाजूला त्याची स्थापना करतों.

## समान पूजन द्रव्यामुळें दर्जा समान नसतो

कोणाहि सभ्य पुरुषाचा व्यवहारांत अक्षत, कुंकुम, फल, पुष्पादिकांनीं सन्मान केला जातो, तसेंच देवदेवतांची पूजा करतांना अक्षत-चंदनादि अष्टद्रव्यांनींच पूजासन्मान केला जातो. सन्मानाचीं द्रव्यें प्रमित असल्यामुळें त्याच वस्तु दिल्या गेल्या तरी कमीअधिक दर्जाचा विचार मनांत आणूनच त्या दिल्या जातात. म्हणून समान द्रव्यें अर्पण केलीं गेल्यानें त्यांचा दर्जा समान मानला असें होत नाहीं. अज्ञानी लोकांना हा दर्जा समजत नसल्यामुळें ते जर अशा तऱ्हेनें वागत असतील तर पंडित व शहाण्या लोकांनीं त्यांना देवाधिदेव व व्यंतरदेव यांतील फरक समजावून सांगून त्यांचें अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे व आचार्य परंपरेंतील पारमार्थिक संकेत समजावून दिले पाहिजेत, म्हणजे सम्यग्दर्शन प्राप्त होवून त्यांचा उद्धार होईल.

## पूजा व वन्दना या शब्दांतील अंतर

पूजा [ सत्कार ] व वन्दना या शब्दांत मोठें अंतर आहे. तें ध्यानांत घेवून विचार केला असतां सामान्यतः नैष्ठिक गृहस्थ आपल्या सहधर्मियांचा आदर करील, पण वन्दना करणार नाहीं. श्री-समंतभद्र स्वामींनी श्रावकाचाराच्या शेवटीं ज्या अकरा प्रतिमा सांगितल्या आहेत त्यांत दर्शन

प्रतिमादि प्रतिमा धारण करणारा श्रावक नैष्ठिक म्हणविला जातो व त्यामुळेंच पं. आशाधरांनीं

**श्रावकेणापि पितरौ गुरू राजाप्यसंयताः । कुलिङ्गिनः कुदेवाश्च न वन्द्याः सोऽपि संयतैः ॥**

*श्रावकानें मातापितर, गुरु, राजा, कुलिंगी साधु व कुदेव हे असंयत असल्यानें त्यांची वंदना करूं नये असें म्हटलें आहे.* कारण तो आतां संयमी बनला आहे.

## शासनदेव कुदेव नव्हेत

यांत कुलिंगी व कुदेव या शब्दांत शासनदेवतांचा अंतर्भाव होत नाहीं. ते जिनभक्त व जिनशासन रक्षक असल्यानें सम्यग्दृष्टी अर्थात् पाक्षिक श्रावकासारखेच असंयमी आहेत. म्हणून इतर श्रावकांप्रमाणें त्यांचा पूजनप्रारंभीं आदर करणें यांत कांहीं वावगें नाहीं. पंडित लोकांनीं *'श्रावक' म्हणजे संयमी असा अर्थ घेऊन, त्यांनीं असंयमी अशा शासन देवतांची पूजा [ आदर ] करणें मिथ्यात्व आहे असें मानलें आहे.* पण प्रतिमा धारण केल्याशिवाय श्रावक संयमी अथवा नैष्ठिक म्हणविला जात नाहीं. अशा संयमी पुरुषांची प्रसंगोपात्त देवांनीं पूजा केलेलीं उदाहरणें शास्त्रांत आहेत. पण असंयमी श्रावकांची पूजा केल्याच्या कथा आढळून येत नाहींत. म्हणून सामान्यतः मनुष्यमात्र श्रावक म्हणजे संयमी असा अर्थ घेऊन देवांनीं त्यांची पूजा केली पाहिजे. श्रावकानें असंयमी देवाची पूजा करूं नये असा आक्षेप केला आहे. तो केवळ सांप्रदायिक अभिमानाचा द्योतक आहे.

## भरतानें चक्ररत्नाची पूजा केली

श्री-जिनसेन स्वामींनीं महापुराणांत साम्राज्यक्रियेचें वर्णन करतांना

**दिव्यास्त्रदेवताश्चामूराराध्याः स्युर्विधानतः । ताभिश्च सुप्रसन्नाभिरवश्यंभावुको जयः ॥**

*अर्थात् दिव्य अस्त्र व देवतांचें विधानपूर्वक आराधन करावें व त्या प्रसन्न झाल्यास सहज* रीतीनें युद्धांत अवश्य जय प्राप्त होतो असें म्हटलें आहे. यावरून अनेक क्षत्रियांनीं युद्धप्रसंगीं जय प्राप्त होण्याच्या इच्छेनें देवतांचें आराधन केल्याच्या पुराणांत कथा आहेत. फार कशाला खुद्द भरतचक्रवर्तीनें आयुधशाळेंत 'चक्ररत्न' प्राप्त झालें त्यावेळीं त्याची पूजा केल्याचाहि उल्लेख आहे—

**अथ चक्रधरः पूजां चक्रस्य विधिवद् व्यधात् । पर्व ४४ श्लो. १**

यावरून तद्भव मोक्षगामी पुरुष गृहस्थावस्थेंत चक्ररत्नाची अर्थात् चक्रधारण करणाऱ्या देवतांची विधिवत् पूजा करतो तो काय मिथ्यात्वी म्हणावा ? विशेषतः श्लोकांत 'विधिवत्' शब्दावरून भगवंतांच्या पूजेचा विधि व जिनभक्त देवतांच्या पूजेचा विधि यांत फरक असलाच पाहिजे. दोन्हीं ठिकाणीं पूजा हा सामान्य शब्द वापरला असला तरी त्यावरून दोघांच्या पूजेंत सारखाच भाव होता असें म्हणतां येणार नाहीं. परिणामाच्या विचित्रतेची कल्पना भावावरूनच केली जाते. केवळ शब्द-सामान्यावरून पूजकाचे भाव दोन्हीकडे सारखेच असले पाहिजेत असा सिद्धान्त काढतां येणार नाहीं.

## भरतानें शस्त्रांची पूजा केली

भरतचक्री लवण समुद्रांतील मागध वगैरे देवांना जिंकण्याकरितां निघाला असतांना काय म्हणतो तें पहा—

तस्मिन्पौरुषसाध्येऽपि कृत्ये दैवं प्रमाणयन् । लवणाब्धिजयोद्युक्तः सोऽन्वैच्छद्दैविकीं क्रियाम् ॥

स्वतः समर्थ असूनहि शुभप्राप्तीला दैव हेंच कारण आहे असें मानणारा लवणसमुद्राच्या विजयाकरितां जावयाच्या वेळीं कांहीं दैविक ( देवतासंबंधीं ) क्रिया करावी असें इच्छिता झाला म्हणून—

अधिवासितजैत्रास्त्रः स त्रिरात्रमुपोषिवान् । मन्त्रानुस्मृतिपूतात्मा शुचितल्पोपगः शुचिः॥ । ५४ २८ पर्व

अर्थ– मंत्रजपानें ज्याचा देह पवित्र झाला आहे असा व शुद्ध अशा शय्येवर शयन करणारा भरत राजा शत्रूंना जिंकण्यास समर्थ अशा शस्त्रांची पूजा करून तीन उपोषणें करता झाला.

## पाक्षिक निरिच्छ नसतो

वरील भरतचक्रीच्या उदाहरणावरून जोपर्यंत मनुष्य पाक्षिक अवस्थेंत असतो तोपर्यंत त्याला अनेक पदार्थांची प्राप्ति करून घेण्याची इच्छा असते अर्थात् विजिगीषु असतो. म्हणून ते सर्व इच्छित पदार्थ प्राप्त करून घेण्यासाठीं तो अनेक समर्थ पुरुषांची व साधनांची अपेक्षा करीत असतो. भरतचक्री हा स्वतः समर्थ असला तरी लवणसमुद्रांतील मागधादिक देवांना वश करण्यासाठीं त्याला शस्त्रास्त्रांची जरूरी होती. त्याच्या अभावीं शत्रूला अथवा बलवान् पराक्रमी पुरुषाला जिंकणें अथवा वश करणें शक्य नव्हतें. भरताजवळ जर चक्ररत्न नसतें तर त्याच्या पराक्रमाचें तेज पडलें नसतें, नव्हे तो चक्रवर्तीच न होता. यावरून समर्थ असूनहि इतरांच्या सहाय्याची अपेक्षा असते म्हणून त्यांना सन्मानानें बोलावून सहाय्य घ्यावे लागतें. अशा व्यवहाराला-सन्मानालाच 'पूजा' या नांवानें व्यवहारांत संबोधिलें जातें. अर्थात ज्याचें सहाय्य घ्यावयाचें तोहि साधारणतः पराक्रमी, बलवान् व पुण्यवान् पाहिजे तरच त्याचा उपयोग. म्हणून भरत राजानें शस्त्रास्त्रांची म्हणजे त्या देवतांची पूजा–सन्मान केला असा अर्थ केल्याशिवाय त्याच्या व्यवहारमार्गाचा समन्वयच करतां येणार नाहीं. पाक्षिक अवस्थेंत मनुष्य आपले सिद्धान्त निश्चित करीत असतो. ते करीत असतांना त्याची त्या सिद्धान्ताविषयीं खात्री पटली म्हणजे तो त्या सिद्धांतप्राप्तिसाठीं चारित्राकडे वळतो, अर्थात् नैष्ठिक–वृत्ति धारण करण्याकडे निवृत्ति मार्गाकडे प्रवृत्त होतो, म्हणजे विजिगीषुता सोडून मुमुक्षु मार्गाकडे वळतो. त्यावेळीं त्याची क्रमानें अकरा प्रतिमा धारण करीत असतां विरक्ति वाढत जाते. म्हणून पं. आशाधरांनीं आपल्या सागारधर्मामृतांत 'त्याला परमेष्ठिपदेषु अर्हदादि–पंचगुरूचरणेषु एका धीरन्तर्दृष्टिर्यस्य' अर्थात् परमेष्ठी जे अर्हतादि पांच, त्याजविषयीं ज्याची अत्यंत निष्ठा जमली आहे असा पुरुष—

— "आपदाकुलितोऽपि दर्शनिकस्तन्निवृत्त्यर्थं शासनदेवतादीन् कदाचिदपि न भजते"

आपदेनें आकुल झालेला दर्शनिक श्रावक अर्थात् पहिली प्रतिमा धारक नैष्ठिक श्रावक शासन-देवतांची, आपदा दूर होण्याकरितां पूजा करीत नाहीं असें म्हटलें आहे. त्याची निवृत्ति इतकी वाढते कीं, तो

श्रावकेणापि पितरौ गुरू राजाप्यसंयताः। कुलिंगिनः कुदेवाश्च न वन्द्याः सोऽपि संयतैः॥

आपले माता, पिता, गुरू, राजा वगैरे असंयत पुरुषांना व तसेंच कुलिंगी व कुदेवांना वंदना करीत नाहीं. कारण संयमी पुरुष असंयमीला वंदन करीत नाही. असा पं. आशाधरांचा सांगण्याचा उद्देश आहे. वरील श्लोकांतील माता, पितर, गुरु, राजा यांना टाळून फक्त कुलिंगी व कुदेव यांना तो [ पाक्षिक ] नमस्कार करीत नाहीं असें दाखवून, कुदेव म्हणजे शासनदेव असा कल्पित अर्थ घेऊन त्यांना नमस्कार करूं नये असा दाखविण्याचा पंडितजीनीं प्रयत्न केला आहे व त्यासाठीं पं. जुगलकिशोरजी माणिकचंद ग्रंथमालेच्या प्रस्तावनेंत म्हणतात—

" पं. आशाधरजीने अपनी सागर धर्मामृतकी टीका वि. सं. १२९६ में बनाकर समाप्त की है। परंतु वि. सं. १३०० में बनी हुई आपकी अनगारधर्मामृत टीकाके पिछले भागमें इसका उल्लेख जरूर पाया जाता है। इसपरसे यह कहा जा सकता है कि सं. १२९६ से पहले या तो यह टीका बनीही नहीं। या पं. आशाधरजीको देखने नहीं मिली। अन्यथा इसका उल्लेख अपने सागार-धर्मामृत टीकामें जरूर करते। कमसे कम इस टीकाकी शासनदेवताओंकी पूजा मुक्तिको तो अवश्य स्थान देते, जिसका उपर उल्लेख किया जा चुका है। परंतु उक्त पूजाके समर्थनमें उसे स्थान देना तो दूर रहा, उन्होंने उलटा पहिली प्रतिमावाले श्रावकके लिए भी शासनदेवताओंकी पूजाका निषेध किया है। और साफ लिख दिया है कि वह आपदासे आकुलित होनेपर भी कभी उनकी पूजा नहीं करता, किंतु पंचपरमेष्ठीके चरणोंमेंही एकमात्र दृष्टि रखता है।"

'वरोपलिप्सयाशावान्' या श्लोकांत श्रीप्रभाचंद्राचार्यांनीं जी टीका लिहिली आहे त्यांत श्रावकानें शासन देवतांचें पूजा-विधानादि केल्यानें त्यांच्या सम्यग्दर्शनांत दोष उत्पन्न होईल अशी शंका घेऊन त्याचें उत्तर देतांना, ती पूजा जर 'वर' मागावयाच्या हेतुनें केली असेल तर दोषास्पद मानली जाईल. पण जर ती शासनदेव समजून केली गेली तर सम्यग्दर्शनामध्यें दोष उत्पन्न करूं शकत नाहीं. शासनदेव धर्म पक्षपाती असल्यानें त्यांची पूजा करणाऱ्यांना मागितल्या शिवायहि 'वर' देऊं शकतात. असें म्हटलें आहे.

पं. आशाधरांनीं आपल्या सागारधर्मामृत ग्रंथांत वरील टीकाकारांच्या मताचा उल्लेख केला नाहीं. उलट वरील 'परमेष्ठिपदैकधीः' या अवतरणांत व अनगारधर्मामृतांत 'श्रावकेणापि' या श्लोकांत निषेधच केला आहे. एवढेंच नव्हें तर आशाधरांनी शासनदेवतांची कुदेवांत गणना केली आहे, असें पं. जुगलकिशोरजी रत्नकरण्डावरील माणिकचंद ग्रंथमालेच्या प्रस्तावनेंत म्हणतात.

तें असें---ऐसी हालतमें यही ख्याल होता है कि,पं. आशाधरजीने प्रभाचंद्रके उक्त युक्तिको बिलकुलहि निःसार तथा पोच और अपने मंतव्यके विरुद्ध समझा है और इसी लिये अपनी किसीभी टीकामें उसे उद्धृत नहीं किया। परंतु फिरभी सागारधर्मामृतकी टीकामें इस टीकाका कुछभी उल्लेख न होना–कमसे कम मतांतरको प्रदर्शित करनेके तौरपरही यह भी न दिखलाया जाना कि, प्रभाचंद्रने दूसरे आचार्योंके मतसे एकदम भिन्न इस टीकामे ११ प्रतिमाओंको सल्लेखनानुष्ठाता श्रावकके ११ भेद बतलाये है–कुछ संदेह जरूर पैदा करता है। और इसी लिये आश्चर्य नहीं जो यह टीका वि. सं. १२९६ से पहिले बनही न पाई हो। अथवा बन जानेपर और देखनेको मिल जाने पर यहभी हो सकता है कि धाराके इलाकेमें रहते हुये धाराके भट्टारकोंसे उपकृत और प्रभावित होनेके कारण उनकी इस तात्कालिक कृतिकी किसी गलत बातको लेकर उसका प्रत्यक्ष रूपसे विरोध करना आशाधरजीने अपने शिष्टाचार तथा नीतिके विरुद्ध समझा हो। परंतु कुछभी सही, १२९६ से पहलेही या पीछे दोनो हालतमें यह टीका पं. आशाधरजीके समयकी बनी हुई प्रतीत होती है।

वरील अवतरणांतील पं. आशाधरजीवर धारानगरीचे राहणारे व तेथील भट्टारकांच्या आश्रित असल्यानें त्या दडपणाखालीं त्यावेळीं झालेल्या प्रभाचंद्राच्या टीकेचा त्यांनीं आपल्या ग्रंथांत निषेध केला नाहीं असा गंभीर दोषारोप केला आहे. ऐतिहासिक पंडितांना समान नांवच्या आचार्यांच्या आधारावर त्यांचा काल ठरवून एखाद्यावर कोणताहि व कसलाही आरोप करण्याची कला साधलेली असते. तसें नसतें तर आचार्यकल्प पं. आशाधरावर असा मिंधेपणाचा आरोप करण्यास कोणाचें मन धजलें नसतें. पं. आशाधरजींच्या सूक्ष्मबुद्धीची व निस्पृह विवेचनाची साक्ष त्यांचे ग्रंथच साक्षात् देत असतांना केवळ अनुमानानें त्याजवर असा घृणास्पद आरोप करणें अन्याय्य आहे.

पं. आशाधरजींनीं प्रतिष्ठापाठ लिहिलेला आहे तो पं. जुगलकिशोरजी यांच्या पाहण्यांत आला नसावा असें वाटतें. त्यांत खुद्द आशाधरजींनीं यम व क्षेत्रपाल वगैरे देवतांना 'नमामि, नमामि' असें म्हटलें आहे. पण पहिल्या अवतरणांत 'आपदाकुलितोऽपि दर्शनिकस्तन्निवृत्त्यर्थं न भजते' अर्थात् दर्शनिक श्रावक म्हणज संयमी श्रावक, आपत्ति प्राप्त झाली तरी ती दूर होण्यासाठीं त्या देवतांची पूजा करीत नाही असें म्हटल आहे. यावरून आपत्काल सोडून इतर पूजा व्यवहार करतांना त्यांचा आदर शास्त्रोक्तविधिनें पाक्षिक अर्थात् अव्रती श्रावक करूं शकेल.

पं. आशाधरांनीं त्यांना कुदेवांच्या कोटींत घातलें आहे. विशेषतः पं. जुलगकिशोरजींनी पं. आशाधरजींचा अभिप्रायहि असाच असल्याचा हवाला दिला आहे. पण पं. आशाधरांचा तसा अभिप्राय नाहीं हें पुढील त्यांच्याच अनगारधर्मामृतांवरील 'विनय' या प्रकरणाच्या वर्णनावरून दिसून येईल.

पं. आशाधरांनी अनगारधर्मामृतांत 'विनया' चें वर्णन करितांना — १ लोकानुवर्ती विनय २ काम विनय ३ अर्थ विनय ४ भय विनय व ५ मोक्षविनय असे पांच भेद सांगितले आहेत. यांतून लोकानुवर्ती विनयांचें लक्षण दिलें आहे. 'लोकानुवृत्तिर्व्यवहारजनानुकूलाचरणं आभिमानिकरसानुविद्धा' म्हणजे आपला अभिमान न सोडतां, लोकानुवृत्ति—व्यवहारानुकूल आचरण करणें, असें केलें आहे. व 'उक्तंच' म्हणून त्याचा अधिक खुलासा पुढील श्लोकांत दिला आहे तो असा—

उत्थानमञ्जलिः पूजातिथेरासनढौकनम् । देवपूजा च लोकानुवृत्तिकृद्विनयो मतः ॥

अर्थात् उठून उभे राहणें, हात जोडणें, अतिथिपूजा करणें, आसन देणें, व देवपूजा हा लोकानुवृत्ति विनय होय. यावरून पाक्षिक अथवा अव्रती श्रावकाने सहधर्मी जे इंद्रादि शासनदेव त्यांचें विनयदृष्टीनें पूजन केलें तर त्यांत अशास्त्रोक्त कांहींच होत नाहीं हें स्पष्ट आहे.

या शिवाय इन्द्रादिक देव एकभव घेऊन मोक्षास जातात असें 'तत्त्वार्थसार' ग्रंथांत श्री अमृतचंद्राचार्य म्हणतात.

*दक्षिणेन्द्रास्तथा लोकपाला लौकान्तिकाः शची । शक्रश्च नियमाच्च्युत्वा सर्वे ते यान्ति निर्वृतिम् ॥*

यावरूनहि त्यांची कुदेवांत गणना केली नाहीं हें स्पष्ट आहे.

श्री समंतभद्राचार्य हे अध्यात्म, न्याय, तर्क, व्याकरण, मंत्र, तंत्र, औषधी वगैरे शास्त्रांत प्रवीण होते असें पं. जुगलकिशोरजी यांनीं म्हटलें आहे.

श्रवणबेळगोळच्या एका शके १०५० च्या नं. ५४ व्या व ६७ व्या शिलालेखांत ज्याला मल्लिषेण प्रशस्ति म्हणतात, खालील श्लोक आहे.

वंद्यो भस्मकभस्मसात्कृतिपटुः पद्मावतीदेवता—दत्तोदात्तपदः स्वमन्त्रमहिमाव्याहूतचन्द्रप्रभः।
आचार्यस्स समन्तभद्रगणभृद्येनेह काले कलौ । जैनं वर्त्म समन्तभद्रमभवद्भद्रं समन्तान्मुहुः ।

अर्थात्, आपला भस्मक रोग नाहींसा करण्यांत चतुर, पद्मावती देवीच्या द्वारा ज्यांना उदात्तपद प्राप्त झालें, ज्यांनीं आपल्या मंत्र वचनांनीं बिंबरूपांत चंद्रप्रभूला बोलाविलें व ज्यांनीं या कलिकालांत कल्याणकारी जैनमार्ग सर्वभद्र केला असे आचार्य समंतभद्र पुनः पुनः वंदनीय आहेत.

यावरून आचार्यश्रींना पद्मावती देवीच्या प्रभावानें उदात्तपद प्राप्त झालें व मंत्रप्रभावांनी त्यांनीं चंद्रप्रभमूर्ति प्रगटविली हें स्पष्ट आहे. पं. जुगलकिशोरजींनी वरील श्लोकांतील पद्मावती या शब्दाचा अर्थ ती देवता असा न घेतां पद्मावती नामक शक्ति असा घेतला आहे. अर्थात् स्वमताच्या सिद्ध्यर्थ श्लोकांतील शब्दार्थाची त्यांनीं ओढाताण केली आहे हें उघड दिसून येते.

## देवयोनि उपहासास्पद आहे काय !

पुण्यांशाच्या आधिक्यतेनें देवयोनींत जन्म होतो असा आपला सिद्धांत सांगतो. तेथें केवळ सुखोपभोगांची सामग्री उपलब्ध असते. चारित्र पाळण्यासारखी तेथील अवस्था नाहीं. म्हणून ते अव्रती म्हणविले जातात. त्यांची शक्ति व ज्ञान मनुष्यांपेक्षां जास्त असते, ही गोष्ट नाकारतां येत नाहीं.

अशा स्थितींत कर्मभूमीतील माणसावर त्यांचा पुण्योदय असेल व कांहीं पूर्व जन्मसंबंध असेल तर कदाचित् ते तेथील जीवांवर उपकार करूं शकतात. संसारी जीव लोभवश व दुःखवश अज्ञानामुळें खऱ्या देवाचें न समजतां देवयोनींतले देव म्हणजे 'खरा देव असें' समजून पूजेच्या रूपानें इच्छित फलांची त्याजकडून अपेक्षा करितात. पण ती त्यांना प्राप्त होतेच असा नियम नाहीं. कोणा एखाद्या पुण्यशाली जीवाला सम्यग्दृष्टी असून जिनभक्त असेल तर त्याच्या भक्त्यतिशयानें न मागतांहि त्याचें इच्छित पूर्ें करूं शकतात. इतरांना केवळ भक्ति करूनहि ते प्रसन्न होत नाहींत.अशी अवस्था असतांना येथील सामान्य माणसापेक्षाहि त्यांची योग्यता कमी मानून त्यांचा उपहास करणें तत्त्वज्ञ माणसांना कसें शोभतें हें समजत नाहीं. मनुष्ययोनि पापपुण्याच्या मिश्रणानें व देवयोनि पुण्यातिशयानें प्राप्त होत असते असें शास्त्रकार म्हणतात. पुण्यातिशयामुळेंच ऐंद्रियसुख त्यांना चिरकाल प्राप्त होत असतें. अव्रती पुरुष या ठिकाणीं राजा अथवा मोठे अधिकारी राजपुरुष यांचा आपल्या स्वार्थसाठीं अनुनय करतात कीं नाहीं? जर तसा अनुनय एखाद्या पुरुषानें आपणाहून अधिक सम्यग्दृष्टी पुण्यशाली देवांचा केला तर त्याला मिथ्यात्वी कसें म्हणतां येईल ? अर्थात् असा आदर करणाऱ्यानें देव, सुदेव, कुदेव व देवाधिदेव यांचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे. म्हणजे तो त्यांच्या योग्यते-प्रमाणें आदर [ पूजा ] करील. खरें वस्तु-स्वरूप असें असल्यामुळें केवळ एकांगानें सम्यक्त्वी शासन देवतेबद्दल लोकांत तिरस्कार उत्पन्न करून त्यांचा उपहास करणें योग्य नाहीं.

## शासनदेव 'कुदेव' नाहींत

श्रीसकलकीर्ति आचार्यांनीं आपल्या धर्म-प्रश्नोत्तर ग्रंथांतील तिसऱ्या अध्यायामध्यें देवांचे प्रकार सांगितले आहत ते असें—

> देवाः कतिप्रकाराः स्युर्देवदेवा जगन्नुताः। सुदेवाश्च कुदेवाश्च देवाश्चतुर्विधा इमे ॥४३॥
> देवदेवा महान्तः के ये तीर्थेशा जगद्धिताः । धर्मतीर्थकरा विश्वज्येष्ठा देवाधिपाश्च ते ॥४४॥
> के सुदेवा दृगाढ्य । ये चतुर्णिकायनिर्जराः । जिनभक्ताः सुदेवास्ते शक्राद्या देवजातिषु ॥४५॥
> कुदेवाः केऽत्र ये देवगतौ दर्शनवार्जिताः । चतुर्णिकायामध्ये ते कुदेवा भवर्द्धकाः ॥४६॥
> अदेवाः केऽत्र स्थापिताः परवंचकैः । वंचनायाज्ञलोकानां भवाब्धिगामिनोऽखिलाः ॥४७॥
> चण्डिकाहरहयाद्या ये धूर्तैः विनायकादयोयुताः । स्त्रीभूषणायुध्याद्यैस्ते स्युश्चादेवा सुखातिगाः ॥४८॥

१ सर्व जगाचे हितकरणारे तीर्थेश धर्मप्रवर्तक तीर्थंकर सर्व जगांत मोठे अर्थात् विश्वज्येष्ठ ते देवाधिदेव जाणावे.

२ चतुर्णिकाय देवांत जे सम्यग्दृष्टि असून जिनभक्त आहेत असे इंद्रादिक देव सुदेव समजावे.

३ जे देवगतींत जन्मून दर्शनवर्जित [ भाव मिथ्यात्वी ] असतील ते कुदेव समजावे.

४ धूर्त व परवंचक लोकांनीं भोळ्या लोकांना फसविण्यासाठीं स्थापन केलेल्या देवदेवतांना अदेव म्हणावेत.

वरील अवतरणावरून चतुर्णिकाय देवांतील जिनभक्त शासनदेव कुदेव नाहींत हें उघड आहे. तरी पण त्यांना कुदेव व मिथ्यात्वी म्हणून त्यांचा कित्येक पंडितांनीं उपहास केला आहे. तो शास्त्रसंमत नाहीं अशी वाचकांची खात्री होईल. जिनभक्त शासन देवतांना आचार्यग्रंथांत कोठें 'कुदेव' म्हटल्याचा उल्लेख असेल तर तो प्रसिद्ध करण्यांत यावा.

पण्डित सदासुखजी स्वतः तेरा पंथाचे कट्टर अनुयायी होते ही गोष्ट त्यांच्या चरित्रावरून स्पष्ट आहे. त्यांचे वडील जरी वीस पंथाचे आम्नायी होते तरी ते स्वतः त्यापासून स्वतंत्र विचार करून तेरा पंथी बनले. त्यावेळीं जयपुरादि भागांत या पंथाचा अत्यंत जोर होता. त्या आवेशांत अनेक पंडितांचा अभिमान पराकाष्ठेला पोंचला व त्यांनीं अज्ञान जीवांना खऱ्या देवांचें स्वरूप समजावून देण्याच्या ऐवजीं शासनदेवतांनाच 'कुदेव' ठरवून त्याबद्दल समाजांत तिरस्कार केवळ बोलूनच न दाखवितां लिहून व्यक्त केला व पूर्वाचार्यकृत प्रतिष्ठापाठादि ग्रंथ अप्रमाण मानून त्याऐवजीं स्वकृत 'वसुबिन्दु' प्रतिष्ठापाठ म्हणून नवीन ग्रंथ रचना करून त्यांतून शासनदेवतादिकांच्या आह्वानादिकाचें पाठ काढून टाकले.

## समवसरणाचें प्रतीक

जिनमंदिर हें समवसरणाचें प्रतीक आहे. त्यांत भगवंताच्या सभोंवती व्यंतरदेव, इंद्रादिक देव व आपापल्या यक्षिणीसह छत्रचामरें घेऊन भगवंतावर वारीत असतात. आज उत्खननांत हजारों वर्षांच्या जुन्या प्रतिमा निघत आहेत त्या सर्व अरिहंताच्या मूर्ति यक्षयक्षिणीसह बनविलेल्या आहेत. त्या सर्व अष्टप्रातिहार्यांनीं युक्त असलेल्या दिसून येतात व तेंच खरें समवसरणाचें प्रतीक आहे. तें टाकून आतां यक्षयक्षिणी विरहित प्रतिमा जयपुरांतून तयार केल्या जातात. हा तेथील सांप्रदायाचा प्रभाव आहे. पण अरिहंताची म्हणजे समवसरणांतील ती मूर्ति म्हणवूं शकत नाहीं. भगवंताला कशाचीच अवश्यकता नाहीं पण समवसरण विभूति इंद्रानें संसारी जीवाच्या मनाचें भगवद्गुणाकडे आकर्षण होऊन भक्ति उत्पन्न होण्यासाठीं व त्यांचें कल्याण होण्याच्या हेतूनें रचिलेली आहे व सर्व आचार्यांनीं ती प्रमाण मानून येथील मंदिरांत तशीच रचना व पूजाप्रभावनेची व्यवस्था करून ठेवली आहे. त्याचा विचार न करतां असे शास्त्रविरुद्ध मार्ग संसारांत प्रचलित होतात हा कालमहिमा होय.

## सारांश

शासनदेव रागद्वेष मलीमस आहेत म्हणून ते कुदेव आहेत असें म्हणतां येत नाहीं. राग—द्वेषांचा सद्भाव येथें सम्यक्त्वी, व्रती, संयमी पुरुषाला दहाव्या गुणस्थानापयत होत असतो. म्हणून तो जसा मिथ्यात्वी अथवा कुपुरुष म्हणविला जात नाहीं, त्याप्रमाणें शासनदेवहि रागद्वेषामुळें कुदेव म्हणवूं शकत नाहींत. लौकिक व्यवहाराप्रमाणें त्यांचें पूजन लोकानुवर्ति विनयांत पडतें हें सिद्ध आहे.

## समारोप

वरील टीकेचा भाग सोडला तर इतर सर्व विवेचन अत्यंत विस्तारानें आकर्षक भाषेत केलें आहे. तें लक्ष्यपूर्वक वाचल्यास सामान्य मनुष्याच्या मनावर त्याचा परिणाम झाल्यावांचून रहात नाहीं. याचा नियमित स्वाध्याय करीत गेल्यास धर्मतत्त्वांचें व तदनुसार श्रावकाचाराचें आचरण करण्याकडे पापपुण्याचा भेद समजून प्रवृत्ति होईल. अशा हेतूनें महाराष्ट्रभाषा जाणणाऱ्या लोकांसाठीं या ग्रंथाचें प्रकाशन केलें आहे.

पण्डितजीनीं चारित्राधिकारांत षोडशकारणभावना, दशलक्षणधर्म, अनुप्रेक्षा, मृत्युमहोत्सव वगैरे विषयांचे विस्तारानें वर्णन केलेलें आहे. पण शेवटीं श्रावकाच्या अकरा प्रतिमांचें तसें विस्तारानें वर्णन केलें नाहीं. याचें कारण हा विस्तृत ग्रंथ लिहितांना त्यांची प्रकृति बरी नसल्यामुळें त्यांना हा ग्रंथ पूर्ण होईल कीं नाहीं याचा भरंवसा वाटत नव्हता असें दिसतें. कारण ते ४२६ व्या पानावर लिहितात:–

'यापुढें अनेकांत भावना व समयसारादि भावनांचें स्वरूप सांगावयास पाहिजे परंतु नाशवंत शरीराचा भरंवसा वाटत नाहीं. म्हणून मूलसूत्रकारांनीं वर्णिलेला ग्रंथ पूरा करणें योग्य आहे. अशा विचारानें अधिक विवरण न करितां मूल ग्रंथाच्या विषयाकडे वळतो.' यावरून वरील प्रतिमांचे स्वरूप संक्षेपानें लिहिलें गेलें असावें.

सोलापुर<br>
वैशाख शु. ८ वीर सं. २०१०<br>
ता. १०-५-५४

ब्र. जीवराज गौतमचंद

# ब्रह्मचारी जीवराज गौतमचंद दोशी

## यांचे जीवन-दर्शन

ज्यांनीं स्वतःच्या धार्मिक जीवनांतून खरा धर्म कसा असतो हें सिद्ध करून दाखविलें आहे व ज्यांच्या सर्वस्वाच्या उदार आणि अपूर्व देणगींतून उदात्त अशा ध्येयानें प्रेरित असलेली 'जैन संस्कृति संरक्षक संघ' ही संस्था सोलापूरला स्थापन झाली आहे, त्या पू. ब्र. जीवराज गौतमचंद दोशी यांच्या जीवनाचें दर्शन संक्षिप्त स्वरूपांत देण्याचें योजिलें आहे.

ब्र. जीवराजभाईंचा जन्म सं. १९३६ फाल्गुन शुद्ध ११ शके १८०१, इ. स. १८८० मध्यें सोलापुर येथील भारतविख्यात दोशी घराण्यांत झाला. या घराण्यांतील अनेक कर्तबगार आणि धन-विद्यासंपन्न व्यक्तींनीं आपल्या आर्थिक, औद्योगिक, धार्मिक, सामाजिक आणि शैक्षणिक इत्यादि विविध क्षेत्रांतील अजरामर कृतींनीं अपरंपार कीर्ति मिळवून दिली आहे. अग्रगण्य राष्ट्रीय उद्योगपति स्व. वालचंद हिराचंद, धर्मवीर स्व. रावजी सखाराम, श्रेष्ठ समाजसेवक व अनेक संस्थांचे जनक स्व.हिराचंद नेमचंद, धर्मचंद्रिका प.पू. क्षु. कंकूबाई इत्यादि महान् व्यक्तींचा जन्म ज्या दोशी कुलांत झाला.त्याच दोशी कुलांत जीवराजभाईंचा जन्म झाला. या कुटुंबाचें प्राचीन निवासस्थान सातारा जिल्ह्यां तील निंबाळकरांचें फलटण होय.श्री. निहालचंद यांचे चिरंजीव श्रीनेमचंद हे व्यापारानिमित्त प्रथमतः फलटण सोडून सोलापूरांत येऊन स्थायिक झाले. त्यांना ज्योतिचंद, गौतमचंद, सखाराम व हिराचंद अशीं चार अपत्यें होतीं. ज्येष्ठ पुत्र ज्योतिचंद हे अत्यंत धार्मिक, व्यापार-कुशल आणि शांत-स्वभावी होते.त्यांना संतान नसल्यामुळें ते जीवराजभाईवर पुत्रवत् प्रेम करीत असत. सं. १९६१मध्यें मैंदरगी येथें त्यांचा अंत झाला.नेमिचंद यांचे द्वितीय पुत्र श्री गौतमचंद हेंच जीवराजभाई यांचे पिता होत. खालीं दिलेल्या वंशवृक्षावरून संपूर्ण दोशी घराण्याचा आणि कौटुंबिक संबंधाचा विस्तार लक्षांत येईल.

या वंशवृक्षावरून जीवराजभाई ज्या भाग्यशाली दोशी कुलांत जन्मले त्याची आणि त्यांतील थोर थोर अशा व्यक्तींची माहिती लक्षांत येईल.

## माता आणि पिता

जीवराजभाईंच्या वडिलांचें नांव गौतमचंदजी आणि आईचें नांव झुमाबाई असें होतें. गौतमचंदजींचा स्वभाव तापट होता. पण त्यावेळच्या अत्यंत बुद्धिमान् लोकांत त्यांची गणना होई. त्यांचे संस्कृत भाषेवर प्रभुत्व होतें आणि त्यांना कविताहि करण्याचा छंद होता. प्रकृति म्हणावी तितकी चांगली नव्हती. त्यांचा विवाह परंडा [निझाम स्टेट] येथील त्यावेळचे दानशूर शेठ गणेश गिरधर यांच्या घराण्यांतील रामचंद्र गणेश यांची कन्या झुमाबाईशीं झाला होता. या दोघांच्या पोटीं जवळ जवळ ९-१० अपत्यें झालीं. पण त्यापैकीं चतुरबाई आणि जीवराजभाई असे दोघेच बहिणभाऊ जिवंत राहिले. बाकीचे सर्वजण अल्पवयांतच कालवश झाले. ५० व्या वर्षीं संवत १९४६ सन १८९० मार्गशीर्ष महिन्यांत त्यांचा स्वर्गवास झाला. त्यावेळीं जीवराजभाई केवळ १० वर्षांचे होते. आईचा स्वभाव मात्र अत्यंत चांगला होता. कौटुंबिक वात्सल्याचा जो अनुभव जीवराजभाईंना मिळाला तो आईपासूनच. आईचें मूळचें परंडा येथील घराणें त्याकाळीं अत्यंत धनवान् आणि धार्मिक म्हणून प्रख्यात होतें. दानत आणि दातृत्व हे त्या घराण्याचे विशेष होते. अशा या थोर मात्या-पित्याच्या पोटीं जीवराजभाईंचा जन्म झाला.

## शिक्षण व बालपण

मातापित्यांना आपल्या अखेरच्या अपत्याबद्दल शेंडेफळ म्हणून फार प्रेम वाटत असतें. जीवराजभाई हे अखेरचें अपत्य त्यामुळें विशेषतः आईची माया त्यांच्यावर फार होती. वडिलांच्या वात्सल्याचा त्यांना फारसा सुखकर अनुभव मिळालाच नाहीं. वडिलांची प्रकृतिच मूलतः तापट असल्यामुळें आणि जीवराजभाईंना दहा वर्षे पूर्ण होण्याच्या आंतच इहलोक सोडून गेले. जीवराजभाईंना पितृप्रेमाची यथार्थ कल्पना येण्याच्या अगोदरच पित्याचा वियोग सहन करावा लागला. पितृपरंपरेनें जीवराजभाईंची प्रकृति बालपणीं फारच अशक्त होती. वयाचीं सात वर्षें उलटून गेलीं तरी त्यांना चालता येत नव्हतें. स्वभाव अत्यंत भित्रा, अंगांत शक्ति नाहीं आणि बुद्धि साधारण अशी त्यांची त्यावेळची अवस्था होती. त्यांचे चुलते ज्योतिचंद यांचें त्यांच्यावर फार प्रेम असल्यामुळें जीवराजभाईंच्या शिक्षणाविषयीं त्यांना फार काळजी वाटे. त्यावेळीं अजून आपल्याकडे शिक्षणाविषयीं फार गोडी निर्माण झाली नव्हती. तरी परंतु जीवराजभाईंना म्युनिसिपल प्रायमरी शाळेंत दाखल करण्यांत आलें. ५ वीं पर्यंत शिक्षण झालें. ५ वींत आपला पुतण्या पास झाला याचा ज्योतिचंदजींना इतका आनंद झाला कीं, त्यांनीं शाळेच्या मुख्याध्यापकाला घरीं बोलावून त्याला रुमाल वगैरे अर्पण करून त्याचा सत्कार केला. मराठी ५ वी नंतर त्यांनीं इंग्रजी शाळेंत पदार्पण केलें

आणि इंग्रजी ३ री पर्यंत त्यांचें शिक्षण निर्विघ्नपणें पार पडलें. यावेळीं दुर्दैवानें त्यांच्या मातोश्री दिवंगत झाल्या [ सं. १९५१ सन १८९५ ] आणि जीवराजभाईंचें शिक्षण बंद पडलें. यावेळीं त्यांचें वय १५ वर्षांचें होतें.

सोलापुर येथील पानाचंद हिराचंद यांच्या कन्येबरोबर जीवराजभाईंचा विवाह ठरविण्यांत आला होता. तो विवाह सं.१९४९ सन१८९३ माघ शुद्ध पंचमीस मातोश्रींच्या समक्ष मोठ्या थाटानें करण्यांत आला. याप्रमाणें वयाच्या तेराव्या वर्षी जीवराजभाईंचा गृहस्थाश्रमांत प्रवेश झाला. यानंतर त्यांच्या मातोश्रींचा स्वर्गवास झाला. वडिलांच्या मृत्युनंतर--जवळ जवळ दोन वर्षानंतर जीवराज-भाईंची वडील बहिण चतुरबाई यांचाहि वियोग झाला होता. याप्रमाणें वयाला पंधरा वर्षे पूर्ण होण्याच्या आंत कोवळ्या वयांत पित्याचें प्रेम, मातेची ममता आणि बहिणीची माया यांपासून वंचित होऊन जीवराजभाई संसारांत एकटेच उरले. संसाराची जबाबदारी अंगावर येऊन पडली. शिक्षण समाप्त झालें. तीन वर्षांच्या वैवाहिक जीवनानंतर सं. १९५२ सन १८९६ मध्यें जीवराजभाईंना एका कन्यारत्नाची प्राप्ति झाली.

इतक्या लहान वयांत एकावर एक आपत्ति येऊन जीवराजभाईंना पुढील शिक्षण घेण्याची तीव्र इच्छा असूनहि त्यास मुकावें लागलें. संसाराचें ओझें डोक्यावर येऊन पडलें. पण अशांतूनहि त्यांनीं घरीं संस्कृत आणि इंग्रजीचा अभ्यास चालूच ठेवला. सं. १९५३-५४ सन १८९७ मध्यें सोलापुरांत पहिला प्लेग सुरू झाला. त्यामुळें सहकुटुंब परंड्याला आपल्या मामाच्या घरीं गेले. पण तेथील तहशीलदारानें प्लेग असलेल्या गांवांतून आलेले म्हणून तेथें राहण्यास बंदी केली. त्यामुळें मार्नी त्यांना कुंथलगिरी येथें नेऊन ठेवलें. बरोबर ज्योतीचंद काका आणि त्यांचे कुटुंबहि होते. वैशाख महिन्यांत प्लेग संपून पूर्ववत् गांव भरलें. तेव्हां पुनः राहिलेल्यांच्या गांठीभेटी झाल्या.यावेळीं जीवराजभाई जवळ जवळ सहा महिने कुंथलगिरीवर राहिले. त्यामुळें कुंथलगिरी क्षेत्राची तेवढ्या अवधींत त्यांनीं सुव्यवस्था लावली. क्षेत्राच्या उत्पन्नखर्चाचा हिशोब करून कमी पडलेली रक्कम भरून काढण्यासाठीं वर्षासन चालू केलें. त्यावेळीं क्षेत्रावर सध्या इतकीं मंदिरेंहि नव्हतीं आणि दोन पुजारी व एक मुनीम याशिवाय वस्तीहि नव्हती.

सं. १९५४ सन १८९७ च्या चैत्र महिन्यांत मंडळी सोलापुरांत आली. पण येऊन २-३ महिने जातात न जातात तोंच पुनः श्रावण-भाद्रपदांत प्लेग होण्यास आरंभ झाला. यावेळीं पूर्वी-प्रमाणें गांव सोडून न जातां, ते जुन्या गिरणीजवळ त्याचवेळीं बांधलेल्या मजुरांच्या चाळींतील एका खोलींत जाऊन राहिलें. तेथेंच बाजूला श्री. सखारामभाई व हिराचंदभाईहि येऊन राहिले. दुर्दैवानें त्यांच्या घरावर यावेळीं फारच मोठा आघात झाला. त्यांची सून, [ त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव माणिकचंद यांची पत्नी ] दुसरा मुलगा जीवराज हिराचंद हे दोघेहि यावेळीं प्लेगला बळी पडले. विशेषतः जीवराज आजारी असतां त्याची शुश्रूषा ब्र. जीवराजभाईंनी अतोनात केली. संसर्गजन्य रोगाच्या

भीतिमुळें थोरले चुलते नको म्हणत असतांनाहि आजाऱ्याजवळ दररोज जाऊन बसून औषधपाणी देण्याचें काम ते स्वतः करीत. आपत्काळीं निरपेक्षबुद्धीनें आप्तमाणसांची सेवा करणें हें किती माणसांत आढळतें? दुर्दैवाची पाठ चुकविण्यासाठी सखारामभाई व हिराचंदभाई कुर्डुवाडीस जाऊन राहिले पण तेथेंहि प्लेगनें पाठलाग केलाच. तेथें हिराचंदजीचे थोरले चिरंजीव माणिकचंद आणि सखारामभाईंची पत्नी हे दोघेहि कालाधीन झाले. यावेळीं जागा बदलून जीवराजभाई गांवांत नगरशेठ हरीभाई देवकरण यांच्याकडे राहिले. या प्लेगांत त्यांच्या नातलगांतील माणसें मरण पावली. माती करण्यास माणसें मिळेनात अशी स्थिति आली. वेणीचंद (जयचंद यांचे घराण्यापैकी निहालचंदचे वंशज) यांचे घरही प्लेगाच्या सपाट्यांत सापडलें. ते स्वतः व त्यांची बहिणही बळी पडून शेवटीं पत्नीहि त्या रोगानें पछाडून बारली. तेव्हां जवळ बसण्यास व औषधपाणी देण्यासहि कोणी माणूस पैसे देऊनहि मिळाला नाहीं. बेशुद्धावस्थेंत पांच दिवसांनीं तिला मरण आलें. उत्तरक्रियेसाठीं माणसें येईनात त्यावेळीं तिला जीवराजभाईंनीं गाडींतून स्मशानांत नेऊन माती केली.

## सांपत्तिक स्थिति

संवत् १९४६ सन १८९० मध्यें जीवराजभाईंचे वडिल वारले त्यावेळीं ते वयानें इतके लहान होते कीं, त्यांना आपल्या सांपत्तिक स्थितीची कल्पनाहि नव्हती. वडिलांचा भागीदार म्हणून पन्नालाल लाहोटी नांवाचा एक मारवाडी पुढेंहि सुताचा धंदा करीत होता. त्या दुकानांत आपलें भांडवल किती आहे याची कल्पना जीवराजभाईंना नव्हती. अंदाजे दागदागिन्यांच्या किंमतीसकट सर्व इस्टेट पंचवीस हजाराची असावी. त्यांतहि सूत दुकानांत पंधरा वीस हजारांचें येणेंच होतें. लवकरच भागीदारहि मरण पावला आणि दुकानांत दिवसेंदिवस नुकसान येऊन तें दुकान शेवटीं बंद झालें. वडिलांच्या पश्चात् कोणी कर्तबगार माणूस जवळ नसल्यानें अडतीचा धंदाहि बंदच झाला होता. भागीदारींतील मारवाड्याबरोबरचें दुकान विनामध्यस्थ अत्यंत प्रेमानें नुकसानीचा भाग वाटून घेऊन बंद केलें. यावेळीं जीवराजभाईंचें वय वीस वर्षाचें होतें. पण आजपर्यंतची त्यांच्या वडिलांची व त्यानंतर जीवराजभाईंची सरळ व नीतियुक्त वागणूक पाहून भागीदार मारवाडी रामप्रताप यांनीं जीवराजभाईंनी तोंडी आंकडा सांगितला तो विनहरकत मान्य केला. आतापर्यंतच्या धंद्याची अशी विल्हेवाट लागल्यानंतर यापुढें धंदा कोणता करावा हा प्रश्न उपस्थित झाला. स्वतःच्या स्वभावाला अनुसरून ज्यांत स्थिरपणा असेल असा धंदा करणेंच उचित समजून त्यांनीं कापडाचा धंदा पसंत केला. वडिलोपार्जित धंदा बुडालेला. भागीदार नाहीसे झालेले. शिक्षण बेताचेंच. अननुभवी वय, पांच सात हजाराचें देणें शिरावर.

इ. सन १९०० सं. १९५६ च्या सुमारास सोलापुरास जुन्या गिरणीच्या सुताचा सट्टा चालत असे. त्याकडे प्रथमतः जीवराजभाईंचें लक्ष वेधलें. पण सट्टयाचे धंदे अनिश्चित, यांत शिखरावरून पडण्यास व चढण्यास वेळ लागत नाहीं असा विचार करून तो व्यवहार सोडून हातमागावरील सुती लुगड्यांचा [कापडाचा] व्यापार कायमचा धंदा म्हणून चालू केला. त्यावेळीं सोलापुर

जिल्ह्यांतील गांवांत नागपुर, कोईमतूर, धनवड वगैरेचा माल खूप जात असे. तो धंदा हातीं घेतला तर चांगलें म्हणून त्यांतील अनुभवी अशा गोविंदराव जवंजाळ नांवाच्या एका गृहस्थाला नोकरीवर घेतलें आणि स्वतःचे मामेभाऊ परंडेकर हिराचंद प्रेमचंद यांच्या भागींत सन १९०५ सं. १९६१ कार्तिक शु॥ १ ला सुरूं केला.

धंदा सर्वचजण करतात आणि त्यांत अपेक्षेपेक्षां अधिक फायदाहि अनेकांना मिळतो. पण तो करीत असतांनाहि कुल-शील सांभाळणें, माणुसकीला जपणें, सचोटीनें व प्रामाणिकपणें व्यवहार करणें हें किती जणांच्या बाबतींत शक्य आहे ? प्रथमपासून धर्माचे संस्कार व त्यामुळें कामाची चिकाटी हे जीवराजभाईंचे विशेष म्हणून सांगता येतील. धंद्यासाठीं खोटें बोलण्यांत पाप नाहीं अशा समजुतीमुळें व्यापारी आणि सत्यव्रत या गोष्टी हसूं आणण्यासारख्या विरोधी आजच्या काळांत झाल्या आहेत. जीवराजभाईंना धंद्यासाठीं असत्य व्यवहार करण्याची पाळी कधींच आली नाहीं. पैशाशिवाय सन्मान नाहीं, समाजांत प्रतिष्ठा नाहीं म्हणून प्रथमतः पैसे भरपूर मिळविण्यासाठीं असत्य व्यवहार केले तरी चालतात व एकदां श्रीमंत होऊन समाजांत प्रतिष्ठा प्राप्त झाल्यावर सत्यव्रती म्हणविण्यांत हरकत नाहीं अशी व्यवहारी धर्म-कल्पना जीवराजभाईंना जन्मांत कधीं शिवली नाहीं. आरंभी 'देण्या'मध्यें दिवस कंठीत असतांनाहि तीच सचोटी त्यांनीं पाळली. आल्या आयुष्यांत त्यांना एक प्रसंग आठवतो आणि त्याची आठवण झाली कीं, त्यांच्या निश्चल नेत्रांत अजूनहि निष्पाप आंसू उभे राहतात. कोईमतूरहून जरीच्या रुमालाची पेटी आली होती. पट्टीप्रमाणें माल मोजून घेत असतां एक रुमाल अधिक आला. रुमालाची किंमत ५-६ रुपये होती. ती रकम त्यांचे खातें जमा करून घेणें अथवा त्यांना कळविणें झालें नाहीं. ही अत्यंत वाईट गोष्ट घडली व त्याचा अद्यापि त्यांना पश्चात्ताप होत आहे. सं. १९६७ सन १९११ मध्यें आपणास सन्मानानें जगून उदरनिर्वाह करण्याइतकें धन मिळालें आहे अशी जेव्हां खात्री झाली तेव्हां त्यांनीं अधिक धनाची आशा सोडली धंदा करीत असतांनाहि आयुष्याचें ध्येयवाक्य म्हणून पुढील सुभाषित एका पुठ्ठ्यावर लिहून दुकानांत टांगून ठेवलें होतें.

" अकृत्वा परसंतापमगत्वा खलनम्रताम् । अनुत्सृज्य सतां वर्त्म यत्स्वल्पमपि तद् बहु ॥ "

म्हणून सं. १९७१ सन १९१५ च्या सुमारास दुकानांतील परंडेकरांची भागी तोडून देण्यांत आली.

## संतोष-भवन-निर्मिति

सं. १९७३ सन १९१७ सालीं त्यांच्या मनांत येऊं लागले कीं आपण एकटे, आपणांस मूलबाळ नाहीं; सद्धर्मानें वागून व न्यायानें उपार्जन करून आपणास आपल्या कल्पनेपेक्षांहि अधिक पैसा मिळाला. प्रामाणिकपणा, सचोटी, सत्व, शील, स्वाभिमान हे गुण संतोषवृत्ति असेल तरच टिकणार आहेत अशा समजुतीनें त्यांनीं आपला धंदा आवरता घेण्यास सुरवात केली. दहाबारा हजार रुपये खर्चून आपल्या घरापुढील जुनें दुकान पुनः बांधविलें व त्याला 'संतोषभवन' हें यथार्थ नांव ठेवलें.

## सामाजिकसेवा

जीवराजभाईंना सामाजिक सेवेची स्फूर्ती त्यांचे चुलते श्री. सखाराम नेमचंद व हिराचंद नेमचंद यांजकडूनच मिळाली. श्री. हिराचंद नेमचंद हेच या भागांतील जैनसमाजांत धार्मिक व सामाजिक चळवळीचे आद्य पुरुष होत. त्यांनींच प्रथमतः सोलापुर येथें जैनधर्माचे शिक्षणासाठीं संस्कृत पाठशाळा सुरू केली. त्यांत पहिले विद्यार्थी म्हणून श्री. पार्श्वनाथ गोपाळ फडकुले, श्री. कल्लाप्पा भरमप्पा निटवे कोल्हापुर व गजपति उपाध्याय मिरज हे तीन विद्यार्थी शिकवून तयार केले गेले. यापैकी श्री. पार्श्वनाथ फडकुले हे अखेरपर्यंत त्याच पाठशाळेंत शिक्षक म्हणून राहिले. दुसरे श्री. कल्लापा निटवे हे समाजांत विद्वान म्हणून प्रसिद्ध झाले, त्यांनीं महापुराणासारख्या सर्व-श्रेष्ठ काव्य पुराणाचें मराठींत सुंदर भाषान्तर करून साहित्यांत आपलें नांव अमर केलें व श्री. गजपति उपाध्याय यांनी मूडबिद्रि येथें राहून धवलग्रंथांची प्रतिलिपी नागरी लिपींत केली. तिघेही इकडील भागांत प्रसिद्ध विद्वान् मानले गेले.

श्रीयुत हिराचंदजीच्याच प्रेरणेनें जीवराजभाईंना सार्वजनिक काम करण्याची प्रेरणा मिळाली. श्री. हिराचंदजी हे सार्वजनिक संस्थेचे हिशेब दरवर्षी प्रगट करून त्याची सर्वांना माहिती द्यावी अशा नवीन समजुतीचे असल्यानें ते आपल्या संस्थेचे नियमानें दरवर्षी हिशेब प्रसिद्ध करीत असत. संस्कृत पाठशाळेची व नाथारंगजी वस्तिगृहाचे ते संचालक होते व त्यांनीं अखेरपर्यंत त्या संस्थेचे हिशेब नियमित प्रसिद्ध केले आहेत. त्याचाच परिणाम जीवराजभाईवर झालेला असल्यामुळें त्यांनींहि ज्या संस्थांचीं कामें आजपर्यंत केलीं, त्या संस्थांचे नियमित वार्षिक अहवाल प्रसिद्ध केले आहेत.

जुन्या पद्धतींत अशी समजूत कमी होती. नव्या सार्वजनिक जबाबदारीची जाणीव जसजशी लोकांत होऊन सार्वजनिक संस्थेच्या संपत्तीवर सगळ्याचा सारखा हक्क असल्यामुळें तिची व्यवस्था प्रत्येकास समजणें अवश्य वाटूं लागलें व प्रथमतः देवालयांच्या हिशेबाची मागणी सुरूं झाली. त्यास जुन्या समजुतीच्या लोकांकडून अडथळे येऊं लागले. त्यामुळें नव्या जबाबदारीची जाणीव होण्यासाठीं सरकारदरबार करण्याचे प्रसंग प्राप्त झाले. असाच प्रसंग येथील एका देवालयाच्या संबंधी उत्पन्न झाला व त्यांत जीवराजभाईंना कांहीं लोकांच्या साहाय्यानें मंदिराचा हिशेब मागण्याचा दावा करावा लागला. शेवटीं त्यांना त्यांत यश येऊन मंदिर आपल्या मालकीचें म्हणणाऱ्या पक्षाला आपलें म्हणणें सोडून तें सार्वजनिक असल्याचें कबूल करावे लागून हिशेब प्रसिद्ध करण्याचा कोर्टाचा हुकूम मान्य करावा लागला. या कामीं त्यांना समाजांतील लोकांपासून धमकी, भय वगैरे दाखवून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला गेल्यामुळें फार त्रास सोसावा लागला. तरी निश्चयी स्वभावामुळें त्यांनीं माघार न घेतां ती गोष्ट तडीस लावली.

असाच दुसरा एक प्रसंग त्याजवर आला. श्रीकुंथलगिरि–क्षेत्रावर त्यांच्या आजोळीच्या आजोबांनीं म्हणजे परंडकर गणेश गिरधर यांनीं सर्वांत आधी मंदिर बांधून प्रतिष्ठा केली. तदनंतर त्या क्षेत्रावरील श्रीकुलभूषण देशभूषण मंदिराचा मंडप श्री. वेणीचंद फलटणकर यांनीं बांधवून

त्याची प्रतिष्ठा सं. १९३२ सालीं येथील प्रसिद्ध दानशूर हरिभाई देवकरण व सदरी फलटणकर या उभयतांनीं केली. त्यावेळीं क्षेत्राच्या रक्षणासाठीं भण्डारपट्टी म्हणून सुमारे ३३०० रकम जमली होती, ती परंडेकर यांनीं सांभाळून शेवटीं जीवराजभाईंचे मातुल माणिकचंद यांचे पश्चात् सं. १९६३ सालीं जीवराजभाईकडे सोंपविली. ती रकम व्याजीं लावून जतन करीत असतां संवत १९७४ सालापर्यंत एकोणीस हजारापर्यंत व्याजानें वाढविली गेली व आज साठ हजारापर्यंत झाली असून त्याचें ट्रस्ट केलें आहे. श्री. माणिकचंद परंडेकर यांचे पश्चात् त्यांच्या मुलांच्या विभागणीच्या वेळीं त्या रकमेचा प्रश्न उद्भवून ती रकम आजपर्यंत जीवराजभाईंनीं सांभाळली तशीच त्यांनीं सांभाळावी असें ठरलें. पण भाऊबंदकीमुळें पुढें त्या रकमेची मागणी जीवराजभाईंकडे होऊं लागली. तेव्हां त्यांनीं स्पष्ट असा जबाब दिला कीं, ' माझ्या आजोळी आजपर्यंत धर्मादायाचा पैसा जमा नाहीं. तो आतां मी तसा ठेऊं देणार नाहीं. धर्मादाय रकमेचा उपयोग स्वतःच्या धंद्याचे कामीं लावणें इष्ट नाहीं. कदाचित् ती रकम मागतांच परत देतां न येण्यासारखी स्थिति प्राप्त झाली तर दानशूर घराण्यावर बट्टा लागण्याचा संभव आहे म्हणून ती तुम्हांस मिळणार नाहीं. ' असें सांगितलें गेल्यामुळें त्या घराण्यांतील लोकांचा रोष पत्करावा लागला. पण त्यामुळें देवद्रव्यापहाराच्या दोषापासून तें घराणें बचलें गेलें.

## कोमल अंतःकरण

जीवराजभाईमध्यें आपत्प्रसंगीं इतरांच्या विशेषतः रोग्यांच्या उपयोगीं पडण्याचा विशेष गुण उपजत असलेला दिसून येतो. त्यांनीं आजपर्यंत आपल्या आप्तवर्गांपैकीं अनेकांची अशा रुग्णावस्थेंत सेवा केलेली आहे. सन १९१८ मध्यें भारतवर्षांत इन्फ्लुएंझाची मोठी सांथ पसरली होती. त्यावेळीं ते कारंजा येथें श्रीवीरसेन भट्टारकाचें प्रवचन ऐकण्यासाठीं गेले होते. त्यांची धर्मपत्नी या सांथींत आजारी पडल्याचें पत्र येतांच ते तेथून तत्काल निघून आले तों गांवात हजारों माणसें या रोगांनीं पछाडलेलीं दिसून आलीं. घरांतलीं सर्व माणसें लागलेलीं. कोणी औषधपाणी देण्यासही उमें नव्हतें. अशा स्थितींत नुकतेंच स्थापन झालेल्या श्री. सखाराम नेमचंद जैन औषधालयातर्फे श्री. श्रीपाल वैद्यांसह शहराच्या कांहीं भागांत स्वतः फिरून गोरगरीबांना औषधें पुरविण्याची व्यवस्था केली. याच वेळीं सोलापुर येथील प्रसिद्ध नगरशेठ श्रीमान् हरीभाई देवकरण घराण्यांतील मुख्य पुरुष श्रीमान् वालचंद रामचंद हे या सांथींत सांपडले. दुसऱ्या प्लेगमध्यें यांनींच जीवराजभाईंना आपल्या बंगल्यांत प्रेमानें बोलावून राहण्यास जागा दिली होती. तेव्हांपासून त्यांचें याजवर फार प्रेम होतें. ही साथ स्पर्शजन्य असल्यामुळें रोग्याजवळ जाण्यास भीति वाटत असे. तरी श्री. जीवराजभाईंनीं त्या भीतीस न जुमानतां रात्रंदिवस-आठ दहा दिवस-त्यांची शुश्रूषा केली. शेवटीं त्यांचा प्राण यांच्या मांडीवर गेला. त्यांचे मागोमाग त्यांची धर्मपत्नी व धाकटे बंधूही या सांथींत बळी पडले.

सन १९७१ सालीं श्रीगोमटेश यात्रेस जातांना अर्सिकेरी स्टेशनावर त्यांचेबरोबर अस-

णाऱ्या गड्याला प्लेग झाला. स्टेशनावर उतरतांना तो माणूस तापानें बेसावध होता. त्याला बाहेरील धर्मशाळेंत नेण्यास मागेल तें देऊन ही कोणी तयार होईना. अखेर त्या माणसाला आपल्या पाठी-वरून धर्मशाळेंत नेलें. त्यास औषधोपचारासाठीं शेंदीडशें रुपये खर्च करून खटपट केली पण शेवटीं तो त्यांतच दिवंगत झाला.

श्रीविजयमूर्ति म्हणून उत्तरीय पंडित फिरत फिरत कुंथलगिरीहून याजकडे उतरला. दुर्दैवानें त्याला विषमज्वर झाला. त्याला तीन आठवडे ठेवून औषधोपचारानें बरें करून पाठविलें.

याप्रमाणें अनेकांची शुश्रूषा त्यांनीं केली आहे. इतकें त्यांचें मन रुग्णजीवासंबंधानें तळमळ-णारें आहे. त्यामुळें स्वतःच्या प्रकृतीची परवा न करता ते त्यासाठीं आपला योग देऊं शकतात. त्यांचें मन या बाबतींत इतकें कोवळें असलें तरी तत्त्वदृष्टींत त्यांचें मन अत्यंत कठोर आहे. सत्य प्रतिपादनाचा आग्रह ते कधीं सोडत नाहींत. त्यासाठीं ते कोणाची मुर्वत ठेवीत नाहींत. आजन्म त्यांनीं कधींही आपल्या कामासाठीं कोणास भीड घातली नाहीं. ते म्हणत ' मी माझ्या अन्याय्य कामासाठीं कोणास भीड घालून काम करून घेतलें तर इतरांच्या कार्यासाठीं मला त्यांची भीड पडून त्यापायीं त्याच्या इच्छेप्रमाणें मला आपली प्रवृत्ति करावी लागेल व कदाचित् आपल्या हातून अन्याय्य गोष्टी घडतील. यासाठीं आपण कोणास भीड घालूं नये व कोणाची भीड ऐकूंही नये'. अशी त्यांची निस्पृहवृत्ति आहे.

सन १९१७ सालीं श्री. सखाराम नेमचंद यांनीं औषधालय स्थापन केलें. त्या कामाची धुरा त्यांनीं जीवराजभाईवर सोंपविली होती. त्या संस्थेचें पंचवीस वर्षें काम करून त्या औषधालयाचा उत्कर्ष केला व त्या संस्थेतर्फे हजारो लोकांना औषधदानानें उपकृत करून ठेवलें. त्या औषधालयातर्फे कांहीं वर्षें फिरत्या औषधालयाची शाखा स्वतःच्या खर्चानें चालवून खेड्यांपाड्यांतील लोकांना मोफत औषध देण्याचा उपक्रम केला होता. ती शाखा कांहीं वर्षें चालवून योग्य वैद्याच्या अभावीं बंद करावी लागली. त्यासाठीं त्यांनीं स्वतःचे चार हजार रुपये खर्च केले.

याचप्रमाणें त्या औषधालयांतून डोळ्याच्या रोगांची एक शाखा त्यांनीं डॉ. आपटे यांच्या सल्ल्यावरून चालूं केली व त्या शाखेसाठीं मुंबईचे सुप्रसिद्ध नेत्रचिकित्सक डॉ. सरदेसाई यांचे साहाय्य घेऊन त्याचें काम चालूं ठेवलें. त्यामुळें शहरांतील अनेक डोळ्याचे रोगी–मोतीबिंदु, काच-बिंदु, वडस, खुपऱ्या वगैरे अनेक रोग्यांची–मोफत सोय झाल्यानें गरीबांस त्याचा फार फायदा झाला. लहान मुलांचे डोळे आले म्हणजे लोक देवीचा कोप म्हणून तुळजापुरास नवस करून जात असत. पण भोळ्या समजुतीप्रमाणें वेळेवर योग्य उपचार न मिळाल्यानें शेंकडों मुलें आंधळी होत. तो प्रकार आतां अगदीं कमी झाला असून अज्ञान लोक देखील आतां तुळजापुरचा नवस सोडून नेत्रचिकित्सालयांत येऊन बरे होत आहेत. आतां तर त्यासाठीं स्वतंत्र मोठा दवाखानाच बांधला गेला आहे. अशी स्वतंत्र डोळ्यासाठीं व्यवस्था अद्यापि मुंबई प्रांतांत सरकाराकडून केली गेली नाहीं. त्याकामीं त्यांनीं स्वतः साडेदहा हजार रुपये खर्चिले.

## धर्मसेवा

लोकमान्य टिळकांनीं गणपति उत्सव सुरू केला. त्यांचा हेतु लोकांमध्यें राष्ट्रकार्य प्रवृत्ति उत्पन्न करण्याचा होता. त्याचें अनुकरण म्हणून जैनांचीं मुलें गणपति उत्सवामध्यें सामील होणें धर्मदृष्ट्या बरें नाहीं म्हणून त्याचवेळीं आपल्या पजुसणोत्सवप्रसंगीं भगवत् गुणगान रूपानें लोकांत धर्मप्रीति उत्पन्न व्हावी म्हणून लहान मुलांकडून भक्तिप्रधान पद्यें म्हणवून घेण्याचा [मेळा] क्रम सुरू केला गेला, त्याचें आधिपत्य चरित्रनायकाकडेच होतें. बरीच वर्षें तें कार्य त्यांनीं करून जैन समाजांतील मुलांना भजनाची गोडी लावली. त्याबरोबरच श्री. पार्श्वनाथ शास्त्री फडकुले यांजकडून जैन कीर्तनेंहि करविलीं. तीं करविण्यांत व त्याची तयारी करविण्यांत मुख्य भाग जिवराजभाईंचाच होता. त्यांना स्वतः गातां येत नसे पण बाजाची पेटी वाजवून ते कीर्तनांत साथ करीत असत. यासाठीं व मेळ्यासाठीं दोन दोन महिने त्यांना तयारी करावी लागत असे व इतका वेळ धंदा सांभाळून ते या कार्यासाठीं देत असत.

सन १८९७–९८ सालीं पहिल्या प्लेगांत कुंथलगिरी येथें कांहीं दिवस त्यांना राहण्याचा प्रसंग आला. त्यावेळीं तेथील क्षेत्राची आर्थिक परिस्थिति बरी नसल्यामुळें त्या क्षेत्राचा खर्च चालविणेंसाठीं त्यांनीं वर्षासन पद्धति सुरू केली. त्या क्षेत्राची व्यवस्था त्यावेळी भूम येथील रावजी सखाराम पहात होते. त्यांच्या कारकीर्दींत क्षेत्राची अवस्था अत्यंत खालावली गेली. पूज्य गुरुवर्य श्री संमतभद्र महाराज हे तेथें कांहीं दिवस असतांना त्यांना ती क्षेत्राची दुर्दशा पाहवली नाहीं. त्यांच्या प्रेरणेनें सं. १९८५ सालीं सोलापूर येथें दिगंबर समाजाची सभा भरवून त्या क्षेत्राचा कबजा घेऊन त्याची व्यवस्था करण्याचें ठरलें. त्यापुढील व्यवस्थेसाठी एक कमेटी नेमण्यांत आली त्याचें कार्यकारित्व जीवराजभाईकडे सोंपविलें गेलें. त्यांनीं श्री. हिराचंद अमीचंद उस्मानाबादकर यांच्या साहाय्यानें मोठ्या कुशलतेनें क्षेत्राचा कबजा घेऊन त्याची व्यवस्था आपल्या ताब्यांत घेतली. तेव्हांपासून आज पंचवीस वर्षांत त्या क्षेत्राची अनेक प्रकारांनीं उन्नति झाली आहे. श्रीकुलभूषण देशभूषण मंदिरापुढील नव्या मंडपाच्या जीर्णोद्धाराचें काम सं. १९९१ सालांत जीवराजभाईंनीं सुरू केलें होतें. तो मंडप बांधण्यास चाळीस हजार रुपये खर्च झाला. त्यापैकीं पंधरा हजार रुपये माणिकबाईनें वडिलाचें स्मरणार्थ दिले व जीवराजभाईनीं सुमारे चौदा हजार रुपये दिले. त्यासाठीं क्षत्रावर पांच सात वर्षें राहून तें काम पूर्ण केलें. त्या मंडपाचा प्रतिष्ठामहोत्सव सं.२००६ सालीं केला गेला. त्यावेळीं लाख रुपये उत्पन्न झालें. त्याचा व पूर्वीच्या रकमेचें ट्रस्ट करून त्या क्षेत्राची कायमची सुव्यवस्था लावून दिली.

याचप्रमाणें श्री गजपंथ क्षेत्रावरहि श्री परमपूज्य आचार्य श्री शांतिसागर महाराजांच्या आज्ञेनें पहाडावर मंदिर बांधवून त्याची संवत १९९० सालीं प्रतिष्ठा केली. त्याकामीं त्यांनीं अठरा हजार रुपये खर्च केला. श्री. जीवराजभाईच्या वंशांत त्यांचे आजे नेमचंद यांनीं गिरनार येथें, त्यांचे पिता गौतमचंद यांनीं पावागढ येथें व ब्र. जींनीं गजपंथ व श्री कुंथलगिरी येथें याप्रमाणें तीन

पिढ्यांनीं पंचकल्याणकोत्सव करून धर्मपताका फडकविली. परंपरेनें धर्मश्रद्धा टिकून ती तशी तेवत ठेवण्याचें कार्य क्वचित् दिसून येतें. असें भाग्य ब्र. जींना लाभलें हा मोठा पुण्योदयच समजावयाचा.

## शिक्षणप्रसार

या कामींही जीवराजभाईंनीं पुष्कळ मदत केली आहे. ती त्यांच्या दानपत्रिकेवरून दिसून येईल. मुख्यत्वेंकरून त्यांनीं ऐ. पन्नालाल दि. जैन पाठशाळेचें हायस्कूलाचें जैनगुरुकुलांत रूपांतर करून स्वधर्मीय शेंकडों मुलांची सोय केली. धार्मिक शिक्षणासह व्यावहारिक शिक्षणाचें हायस्कूल बनवून जैन समाजांतील गरीब विद्यार्थ्यांवर अगणित उपकार केले आहेत. याशिवाय त्यांनीं आपल्या आप्तवर्गापैकीं मातुलगृहाच्या दोन मुलांना इलेक्ट्रिक इंजिनियर व डॉक्टर M. B. B. S. करण्या-साठीं फार मोठी मदत केली आहे. तशीच जैन बोर्डिंगांतील अनाथालयास तेरा वर्षे वार्षिक मदत दरसाल रु. ३०० प्रमाणें ४००० रु., गुरुकुलाला दरसाल रु. ३०० प्रमाणें ३७०० दिली असून अद्यापि वार्षिक मदत देत आहेत. यावरून त्यांच्या शिक्षणकार्याच्या तळमळीचें अनुमान करता येईल. याशिवाय शेडबाळ, बनारस विद्यालय, श्राविकाश्रम, पाठशाळा, महावीर ब्रह्मचर्याश्रम वगैरे शिक्षण संस्थांना हजारोंनीं मदत केली आहे.

## औषधीय दान

श्री. सखाराम नेमचंद औषधालयाची कार्यधुरा त्यांचेकडे असतांना त्यांनीं त्या संस्थेचा आर्थिक दृष्टीनें व आयुर्वेदिकदृष्टीनें सर्वतोपरि उत्कर्ष केलाच पण त्याबरोबर त्या संस्थेसाठीं आपल्या धर्मपत्नीच्या नांवानें त्या संस्थेची इमारत साडे बारा हजार रुपये खर्चून सं. १९७९ सन १९२३ सालीं बांधवून दिली. याशिवाय फिरते औषधालयासाठी चार हजार व नेत्रचिकित्सा-लयाची स्थापना करून त्यासाठीं १०४७५ रु. खर्च केले आहेत.

श्री. सखाराम नेमचंद औषधालयाचे काम पाहत असतां त्या संस्थेच्या इमारतीचें बांधकाम करतांना शेजारच्या गृहस्थानें निष्कारण अडथळे आणून फार त्रास दिला. त्याचें म्हणणें, माझ्या शेजारीं दवाखान्यांत रोगी ठेवल्यास माझे आरोग्यास बाध येईल. पण आरोग्यदृष्टीनें ज्या गोष्टी वर्ज्य आहेत, त्या न करूं देण्याची सत्ता नगरपालिकेची असून ती अशा गोष्टीस प्रतिबंध करूं शकते. आरोग्याचे निर्बंध सांभाळून रोग्यांची शुश्रूषा करण्यास कोठेंही प्रतिबंध करतां येत नाहीं. असें असूनही त्यासाठी दिवाणी फौजदारी होऊन संस्थेच्या द्रव्याचा निष्कारण अपव्यय करावा लागून शेवटीं ती इमारत बांधून झाली व रोगीही ठेवले गेले. पण त्यासाठीं पांच दहा वर्षें झगडावें लागलें.

## दानवीर

न्यायोपात्त धनांतून लक्ष्मीचें चांचल्य जाणून त्यांनीं अनेक ठिकाणीं दान दिलें आहे दान व पूजन या दोनच श्रावकांच्या कर्तव्याची जाणीव त्यांच्या मनांत बिंबली असल्यानें धर्मवर्धक,

ज्ञानवर्धक, रोगप्रतिबंधक संस्थेस मदत त्यांच्या आयुष्याच्या प्रारंभकालापासून ते कशी देत आले आहेत याचा क्रम त्यांच्या सोबत परिशिष्टांत जोडलेल्या दानपत्रिकेच्या तपशीलावरून वाचकास पाहता येईल व त्यावरून त्यांच्या मनोरचनेची कल्पना होईल. आजपर्यंत त्यांनीं–

| | | | रुपये |
|---|---|---|---|
| ज्ञानदानासाठीं | .... | .... | ३४५४७ |
| मंदिर निर्माण व पंचकल्याणकोत्सवासाठीं | .... | .... | ३५३६६ |
| औषधदानासाठीं | .... | .... | २६६४९ |
| साहित्य प्रकाशन संस्था स्थापन करून त्यासाठीं .... | | .... | २०१००० |
| | | एकूण रुपये | २९७५६२ |

एवढ्या मोठ्या रकमेचे दान केलें आहे. दक्षिण महाराष्ट्रांत तरी असें दान देणारा गृहस्थ अजून तरी दिसून आला नाहीं.

## दत्तकाची कल्पना

एवढयानेंच त्यांचें कार्य संपलें नाहीं. धर्मपत्नीच्या स्वर्गवासानंतर व ती जिवंत असतांनाहि आपल्या एवढया मोठ्या इस्टेटीसाठीं कोणी तरी मुलगा दत्तक घ्यावा असा विचार त्यांचे पत्नीचे मनांत होता. ब्र. जीनींही कांहीं दिवस त्याचा विचार मनांत बाळगून त्याचा साधक बाधक प्रमाणांनीं विचार केला होता. पत्नीनें मरणसमयीं ती इच्छा प्रकट केली असतां त्यांनीं तिला जो जबाब दिला तो प्रत्येकानें विचार करण्यासारखा आहे. ते म्हणाले, ' आपण दोघांनीं असें ठरविलें होतें कीं, जो मागें राहील त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें वागावें. आतां तूं पुढें जात आहेस. मागें मी राहणार. मी माझ्या इच्छेप्रमाणें करीन. तूं आतां या प्रापंचिक विषयांत मन न ठेवतां शांतपणानें प्रभुनामस्मरण करून देह ठेव. मी माझ्या मनाप्रमाणें व्यवस्था करीन. ' या उत्तरानें त्या माउलीचें समाधान झालें व तिनें शांतपणानें पुनः याचा उच्चार ही केला नाहीं.

यानंतर ब्रह्मचारीजींनीं सन १९४१ सालांत जैन संस्कृति संघाची स्थापना केली. दत्तकाचा मोळा विचार बाजूला सारला व शेवटीं सन १९४४ सालीं लघवीच्या गाठीवर शस्त्रक्रिया करतांना आपलें मृत्युपत्र करून सर्व इस्टेट सुमारे दोन लाखाची संघास अर्पण केली.

## पत्रकार व वाङ्मयसेवक

स्वतःचें शालेय शिक्षण मराठी ५ इयत्ता व इंग्रजी तीन इयत्ता इतकेंच होऊं शकलें होतें. संस्कृत व इंग्रजीचा व्यासंग थोडा होता. ' जैन–बोधक ' संपादण्याचें कार्य जीवराजभाईकडे सोंपविण्यांत आलें. इ. स. १९१६ ते १९२० पर्यंत हें काम त्यांनीं फारच कौशल्यानें पार पाडलें. त्यांच्या कारकीर्दीत जैन–बोधकाला चांगली प्रतिष्ठा प्राप्त झाली. जैनागमाच्या विरुद्ध व तर्कविसंगत अशा अनेक प्रश्नांवर त्यांनीं त्यावेळीं चांगलाच हल्ला चढविला. बोधकाचीं मूळचीं पानें कमी पडत

म्हणून जीवराजभाईंच्या कारकीर्दींत ८ पानें वाढविण्यांत आली. यावरून त्यावेळीं पत्राची लोकप्रियता सिद्ध होते. त्यांनी हिंदीचाहि अभ्यास चांगला केला आहे. अनेक हिंदी पुस्तकांचें भाषांतर मराठींत करून एक तऱ्हेनें मराठी वाचकांची सोय केली.

तत्त्वार्थसूत्र, आत्मानुशासन, जैनसिद्धांतप्रवेशिका, हरिवंशपुराण, रत्नकरण्ड श्रावकाचार, सार्वधर्म इत्यादि ग्रंथांचीं सरस व सरल भाषांतरें त्यांनीं केलीं आहेत. त्यांच्या मनावर ज्या ज्या ग्रंथांचा चांगला परिणाम झाला, ज्या ग्रंथांनीं त्यांना आयुष्यांत मार्गदर्शन केलें अशा ग्रंथांत 'रत्नकरण्ड श्रावकाचाराला' ते फार महत्त्व देतात. श्रावकांचें जीवन घडविणारा असा दुसरा ग्रंथ नाहीं असें त्यांचें मत आहे. म्हणूनच त्यांनीं तो ग्रंथ मराठींत स्वतः अनुवादित केला व आतां तो ग्रंथ छापून प्रसिद्ध होत आहे.

## प्रतिमाधारी जीवराजजी

वरील सर्व धर्मग्रंथांचा अभ्यास व डोळस दृष्टि यामुळें जीवनाची सार्थकता कशांत आहे हें ठरविण्यास त्यांना वेळ लागला नाहीं. संपत्तीच्या त्यागापेक्षाहि पंचपापांचा त्याग व कषायांचा त्याग या गोष्टी आत्मोन्नतीच्या दृष्टीनें श्रेष्ठ आहेत, हें जाणून त्यांनीं प्रथमपासूनच एकेक पायरी चढण्यास सुरवात केली होती. प. पू. ऐ. पन्नालालजींच्या समोर परस्त्री-त्याग, अष्टमूलगुण इत्यादि पाक्षिक व्रतें त्यांनीं आधींच धारण केलीं होतीं. सन १९०८ सं. १९६४ सालीं परिग्रह-परिमाणव्रत घेऊन दोन लाख रुपयांची मर्यादा ठरविली होती. दोन लाखापेक्षां आपली संपत्ति अधिक होईल अशी त्यांना कल्पनाहि नव्हती ! याशिवाय तीर्थयात्रा करणें, रथोत्सव घडविणें, प्रतिष्ठा करविणें ह्या नैमित्तिक धर्मक्रिया चालूंच होत्या. घरींच श्री. पार्श्वनाथ गोपाल फडकुले शास्त्री यांच्याकडून कांहीं धर्मग्रंथ व संस्कृत भाषा शिकून घेतली होती. मुनिसुव्रतकाव्य, रत्नकरण्ड श्रावकाचार, द्रव्यसंग्रह, तत्त्वार्थसूत्र, सर्वार्थसिद्धि इत्यादि ग्रंथांचें पठण केल्यामुळें भाषा व धर्मज्ञान यांचें मर्म समजण्याची पात्रता येत चालली होती.

सं. १९६४ मार्गशीर्षांत कुंथलगिरी येथें परंडकरातर्फे रथोत्सव झाला. त्याची जबाबदारीहि त्याजवरच होती. शिखरजीचीहि यात्रा सन १९०६ सं. १९६२ व सन १९१२ सं. १९६७, सं. १९७७ सन १९२१, सं. १९८७ सन १९३१, सं. १९९७, सन १९४१ या प्रमाणें पांच-वेळां केली. त्या निमित्तानें काश्मीरपयतचा भारताचा मुलुख त्यांनीं दृष्टिखालीं घातला. सं. १९७१ स. १९१३ सालीं–श्रीगोमटेशाची यात्रा केली. त्यावेळीं श्रवणबेळगोळ, म्हैसूर, कारकल–मूडबिद्री, मद्रास, रामेश्वर, धनुष्कोटी, इत्यादि दक्षिण भारतीय प्रसिद्ध स्थळें त्यांनीं पाहिलीं. यानंतर तीन महामस्तकाभिषेकोत्सवाचे वेळीं गेले. या देशपर्यटनांतून त्यांना अनेक फायदे झाले.

## जीवनाचा आदर्श

जीवन आपोआप बनत नसतें, त्याला घडवावें लागतें. जीवराजभाईंनीं आपल्या अठराव्यावर्षीं शांति

हें आपलें ध्येय ठरविलें होतें त्याप्रमाणें आपलें जीवन बनविण्याचा आटोकाट प्रयत्न केला.स.१९४४ मध्यें त्यांची प्रकृति बिघडली आणि ऑपरेशनसाठीं त्यांना मुंबईला जावें लागलें. पण त्या अगोदर त्यांनीं मृत्युपत्र तयार करून आपल्या संपत्तीची व्यवस्था लावली. ऑपरेशन झालें असतांना व्रतांत किंचित्हि बिघाड उत्पन्न होऊं दिला नाहीं. जें शक्य होतें तें सारें केलें आहे, अशा कृतकृत्याच्या समाधानींत त्यांना मृत्यु उत्सवाप्रमाणें वाटला असावा यांत शंका नाहीं.

## सज्जनसंगति

गुणिजनांच्या सहवासांत राहणें, त्यांचा आदरसत्कार करणें, गुणवानासाठीं आपलें तनमनधन खर्च करणें हीं जीवराजभाईंची मोठी विशेषता आहे. चांगली गोष्ट होणार आहे, गुणी जनांचा सन्मान करण्याचा प्रसंग येत आहे तर आपलीं सर्व कामें बाजूला टाकून व वैयक्तिक विचार-विकार बाजूला सारून ते त्या ठिकाणीं हजर राहतात. नित्य स्वाध्याय, जिनपूजा, सामायिक इत्यादि पवित्र षट्कर्मांत त्यांचे दिवस जातात. जैन संस्कृति संरक्षण संघाची स्थापना करून त्यांनीं जैनांतील व अजैनांतील जैन सिद्धांतासंबंधीच्या श्रेष्ठ विद्वानांना एकत्र आणलें व त्यांच्याकडून महान् कार्य घडवून आणलें. प्राचीन दिगंबर जैनग्रंथ प्रकाशन, इतिहास संशोधन, ग्रंथसूची-निर्माण याच महान् कार्यासाठीं या संस्थेचा उदय झाला आहे. डॉ. ए. एन्. उपाध्ये, डॉ. हिरालाल जैन इत्यादि विद्वानांच्या सहवासांत वर्षांतून कांहीं ना कांहीं दिवस त्यांचे जातातच. सन १९४१ मध्यें उन्हाळ्याच्या सुट्टींत गजपंथ ( नासिक ) येथें भरलेल्या विद्वत्संमेलनांत त्यांनीं जैनसंस्कृति संघाची स्थापना करण्याची घोषणा केली. त्या संघाच्या अंतर्गतच जीवराज ग्रंथमाला चालविण्याचें ठरलें. त्यांतून आज अनेक उत्तमोत्तम ग्रंथ प्रकाशित होत आहेत.

## अंतिम इच्छा

त्यांची आयुष्याची अंतिम इच्छा काय आहे हें त्यांनींच लिहिलेल्या डॉ.उपाध्ये यांचे पत्रांतून प्रकट झालें आहे. तें असें-"या ठिकाणीं माझ्या मनांत येत आहे कीं, मी माझा उर्वरित जीवनकाल निःसंग, निष्परिग्रह होऊन व्यतीत करावा. त्या अवस्थेचा रसास्वाद घ्यावा. परंतु माझी शारीरिक दुर्बलता आणि वृद्धावस्था मला त्या अवस्थेप्रत जाण्यास बाधक ठरवित आहे. तरी जिनधर्मप्रणीत मार्गाला अनुसरून निर्वाहापुरतें राखून, मी माझें सर्वस्व संघाला अर्पण करीत आहे. परिग्रहाच्या रक्षणाच्या चिंतेतून मुक्त झाल्याबद्दल मला अत्यंत समाधान वाटतें.संतोषवृत्ति दिवसेंदिवस वाढत आहे."

## स्थितप्रज्ञवृत्ति

ब्रह्मचारी जीवराजभाईंनी ज्यांना बालपणापासून मदत केली आणि त्यांच्या आयुष्याला उत्तम वळण देण्याचा पित्याप्रमाणें अहर्निश प्रयत्न केला, अशा किती तरी व्यक्ति त्यांच्या आप्तेष्टांत आणि समाजांत आहेत. श्री. माणिकचंद वीरचंद आणि त्यांचे बंधु स्व. वालचंद मोतीचंद यांच्यावर त्यांचें अपत्यवत् प्रेम होतें. श्री. वालचंदभाईंच्या वियोगानें अशा त्यागी अवस्थेंतहि त्यांचें पितृहृदय पिळ-

वटून निघालें. श्री. धन्यकुमार कस्तुरचंद शहा आणि त्यांचे बंधु डॉ. अभयकुमार हे दोघेहि त्यांच्या मातुलपक्षाकडील होत. त्या दोघांचें जीवन ऐहिक आणि धार्मिक दृष्ट्या अत्यंत उत्कृष्ट बनावें यासाठीं त्यांनीं आटोकाट प्रयत्न केला. विशेषत: श्री. धन्यकुमारावर त्यांचें अपार प्रेम होतें. त्यांचें शिक्षण आणि त्यांचें जीवन त्यांनींच बनविलें. खरें शिक्षण म्हणजे काय ! जीवन उन्नत कशानें बनतें ? इत्यादि गोष्टीसंबंधी त्यांनीं त्यांना तळमळीनें मार्गदर्शन केलें आहे.

श्री.धन्यकुमार इंजिनीअर झाले आणि अभयकुमार डॉक्टर झाले.पण ब्र.जीवराजभाईंनीं त्यांच्या या लौकिक यशाला जी आध्यात्मिक आणि नैतिक बैठक घालून दिली आहे ती अमोल आहे.

इतकें करूनहि 'केवळ कर्तव्य म्हणून मी हें केलें. यांत मला त्यांच्यापासून वैयक्तिक फलाशा कोणतीच नव्हती ' असें खऱ्या कर्मयोग्याप्रमाणें ते उद्‌गार काढतात.

श्री. धन्यकुमार यांना विद्यार्थी अवस्थेत त्यांनीं जीं पत्रें पाठविलीं आहेत त्यांतील कांहीं उताऱ्यावरून त्यांच्या सरळ, प्रेमळ, निर्भिड आणि तटस्थ स्वभावाची व निरपेक्ष संतोषवृत्तीची चांगलीच कल्पना येते, ती अशी-

" धार्मिक विषयाची श्रद्धा मनांत बिंबविणें हाच खरा आत्मोद्धार आहे. तें मुख्य होऊन बाकी सर्व गौण ठरविणें हेंच माझें उद्दिष्ट आहे. याच दृष्टीनें जो कोणी माझ्या दृष्टीला पडेल त्यालाच मी मदत केली तर करीन. एरवीं प्रापंचिक उद्धार करून घेणाऱ्यासाठीं जग मोकळें आहे. धर्माचें संशोधन व्हावें व त्याकरितां आजन्म प्रयत्न करणारीं बुद्धिवान माणसें उपलब्ध व्हावीं असें मला वाटतें " [ १४-८-३८ ]

" आज तुमच्या गरजेमुळें तुम्हाला बळजबरीनें धर्मशिक्षण घ्यावें लागत आहे असा अंतरंग विचार ठेऊं नका. मला तुमच्या बुद्धीवर धर्माचीं तत्त्वें सकारण ठसविणें आहे. अभ्यासानंतर तुम्हांस तीं तत्त्वें पटलीं नाहींत तर तसें स्वच्छ सांगा. त्याबद्दल मला मुळींच वाईट वाटणार नाहीं. मी माझ्या समजुतीप्रमाणें प्रयत्न केला,त्याचें फल आलें नाहीं हा दोष माझा नव्हें,' असें म्हणून मला समाधानांत राहता येईल. " [ तारीख नाहीं ]

"रा. माणिकचंद यांनी मदत देण्याचें कबूल केल्यास स्कॉलरशिप्‌ची मागणी एकदम बंद करावी. त्यांनीं मदत देण्याचें स्पष्टपणें नाकारलेंच तर वरील अटी कबूल असल्यास मी ती देईन. भीक मागून शिकण्याची कल्पनाच मला इष्ट वाटत नाहीं. यापेक्षां सध्याचें शिक्षण सोडून पोट भरण्याकडे लागणें बरें. निदान मी असेपर्यंत तरी माझ्या आजोळच्या मुलांनीं इतरांकडे जावें हें बरें वाटत नाहीं. "

" मला तुम्ही संतुष्ट ठेवण्याच्या प्रयत्नांत न पडतां तुमच्या उद्देशाप्रमाणें वागून सुखी व्हा. माझें कर्तव्य मीं केलें यांतच मला समाधान आहे........तुमच्या बाबतींत पूर्वविचार व विकार मी माझ्या मनापुढें कधींहि न येऊं देण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला आहे व मला वाटतें मीं त्यांत यशस्वी झालों आहे. माझें कर्तव्य संपलें."

"माझ्या आयुष्यांत जरी मी कोणाची मनधरणी केली नाहीं, तरी फटकूनही वागलों नाहीं. सत्य धरून जेवढी गोडी वागणुकींत राखतां आली तेवढी ठेवली. त्यामुळें अथवा अकस्मात् दैव योगामुळें म्हणा [ माझ्या कर्तृत्वामुळें नव्हें ] शेवट चांगला झाला. आतां तुझ्या बाबतींत कसें होईल याची काळजी न करतां प्राप्त परिस्थितींत स्वाभिमान राखून आलेलें काम करणें एवढाच मंत्र मनापुढें ठेऊन वागलास, इतरांचे स्वभाव, आवडी नावडी, यांकडे पाहावयाचें नाहीं, जगांत अशी भिन्नता राहणारच, असें मानून पांच वर्षें काढलीस तर सर्व कांहीं चांगलें होईल.' '१३-८-४२

त्यांच्या पत्रांतून एकाहून एक सरस असे उतारे काढून दाखवितां येतील. पण एवढ्यावरून त्यांचा स्वभाव कळणें अशक्य नाहीं. ज्याच्या शिक्षणासाठीं संपूर्ण खर्च सोसला, त्याच्या नोकरी, लग्न, इत्यादि बाबतींत त्याच्यावर आपल्यातर्फे यत्किंचित्हि अन्याय होऊं नये अशी एखाद्या स्थितप्रज्ञ माणसाप्रमाणें वागणुक ठेवलेली पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाहीं.

याप्रमाणें हें ब्र. जीवराजभाईचें 'जीवन-चरित्र' संक्षेपांत लिहिलें आहे. त्यावरून ज्यांना ऐहिक कल्याण व पारमार्थिक कल्याण करून घ्यावयाचें असेल त्याला मार्गदर्शन म्हणून याचा उपयोग होईल अशी आम्ही इच्छा प्रगट करून हें लेखन समाप्त करतों.

सोलापुर गुरुकुल
ता. १-५-५४

सुभाषचंद्र अकोळे, एम्. ए.
गुरुकुल स्नातक.

### जयपुर राज्याचे प्राचीन साहित्यसेवी, हिंदी रत्नकरंड–श्रावकाचार वचनिका कर्ते

# पं. सदासुखजी काशलीवाल ‘ डेडाका ’

## यांचें चरित्र

**लेखक – पं. श्रीप्रकाश शास्त्री.**

पं. सदासुखजी काशलीवाल यांचा जन्म विक्रम सं. १८५२ मध्यें जयपुर येथें झाला. यांच्या पित्याचें नांव श्री दुलीचंद हें होतें. डेडराजजीच्या प्रसिद्ध वंशांत जन्म झाल्यामुळें पंडितजींना व पंडितजींच्या पूर्वापरवंशजांना लोक ‘ डेडाका ’ असें म्हणत असत.

डेडराजापासून दुलीचंदजी पर्यंतच्या वंशावलीची प्राप्ति झाली नाहीं म्हणून दुलीचंदजी पासूनची वंशावली याप्रमाणें आहे—

पंडितजींचें घर व चैत्यालय, जयपुर शहर चोकडी मोदीखाना मणिहारांच्या रस्त्याजवळ आहे. तें आतां ही डेडाकांचें घर व चैत्यालय या नांवानें प्रसिद्ध आहे. यावरून यांचे पूर्वज संपन्न व माननीय आणि धर्मरुचि धारण करणार होते असें म्हणावयास हरकत नाहीं.

यांच्या विषयीं पंडितजींनीं याप्रमाणें उल्लेख केला आहे.

> डेडराज थे बंसमाहि इक किंचित ज्ञाता । दुलीचंदका पुत्र काशलीवाल विख्याता ॥
> नाम सदासुख कहे, आत्मसुखका बहु इच्छुक । सो सुख वानिप्रसाद विषयतैं भये निरिच्छुक ॥
>
> ( अर्थप्रकाशिका. हिंदी टीका )

पंडितजींच्या बाल्यकालाच्या विशेष घटनांची आम्हाला माहिती नाहीं. पण पंडितजी बालपणापासूनच जिनवाणीच्या अभ्यासांत लीन झालेले होते. रत्नकरंड–श्रावकाचार वचनिका १९२० यांत पंडितजी असें लिहितात:—

' हे जिनवाणी भगवती भुक्ति मुक्ति दातार। तेरे सेवनतैं रहै सुखमय नित अविकार॥
अडसठ बरसहु आयुके बीते सुख आधार। शेष आयु तव शरण तैं, जाहु यही मम सार॥ '

बालपणापासूनच पंडितजी पठन–पाठनांत तत्पर न राहते तर जिनवाणीचा प्रभाव त्यांच्या वर पडला नसता व आपलें सर्व आयुष्य त्यांनीं जिनवाणीच्या सेवेंत खर्च केलें नसतें.त्यांनीं भगवती आराधनेंत 'जिनवाणीच्या आराधनेंत माझें सर्व आयुष्य व्यतीत व्हावें' अशी इच्छा प्रदर्शित केली आहे, ती याप्रमाणें–

खंडेलज श्रावक कुल प्रास, तिनमैं एक सदासुख नाम।
गोत्र कासलीवालहु कहै, नित जिनवाणी सेवन चहै॥

पंडितजींनीं जिनवाणीचा अभ्यास कोठें केला याविषयीं रत्नकरंडकाच्या वचनिकेंत ते असा उल्लेख करतात–

' सैली तेरा पंथमें करै जु ज्ञान अभ्यास '

पंडितजींचा अभ्यास स्व. पं. मन्नालालजी सांगांच्या जवळ झाला. पं. मन्नालालजींचा व मन्नालालजींचे गुरु पं. जयचंदजी छावडा या उभयतांच्या विचारांचा प्रभाव पंडितजीवर विशेष रूपानें पडला होता. पंडितजींचे आजे व वडील वीस पंथ आम्नायाचे [पाटोदीचे मंदिराचे पंचायत] होते. परंतु पंडितजी तेरापंथाचे कट्टर अनुयायी बनले. रत्नकरंड श्रावकाचाराच्या वचनिकेंत त्यांनीं अनेक ठिकाणीं आपल्या विचारांचें स्पष्टीकरण केलें आहे.

जिनवाणीचा अभ्यास करून तिचें यथार्थ मर्म पंडितजींना समजल्यावर त्यांना विशेष आनंद व तृप्ति प्राप्त झाली. जिनवाणीच्या स्तुतिमध्यें त्यांनीं हा अभिप्राय प्रगट केला आहे––

' तेरे सेवनतैं रहै सुखमय नित अविकार '

हे शब्द त्यांच्या आन्तरिक गंभीर अनुभवाला प्रगट करीत आहेत. घरांत राहूनही त्यांची वृत्ति गृहत्यागयासारखी होती. त्यांच्या ठिकाणीं संतोष इतका होता कीं, त्यांनीं जयपुर राज्यांत महाराज साहेबांच्या प्रायव्हेट खर्चाच्या विभागांत दहा रुपयांची मासिक वृत्ति स्वीकारली होती. तें काम पंडितजी दोन तीन घंटे करीत असत व त्यांत होणाऱ्या प्राप्तीनें ते आपलें गृहकार्य उत्तम रीतीनें चालवित असत. त्यांना लौकिक विषयांची बिलकुल इच्छा नव्हती. एवढेंच नव्हे तर त्यांनीं तद्विषयक संस्कारही आपल्या हृदयापासून दूर केला होता. आत्मिक गुणांची प्राप्ति करून घेण हेंच त्यांचें एक ध्येय होतें.

पंडितजी दररोज प्रातःकाळीं तेरापंथीच्या मोठ्या मंदिरांत आणि मारुजीच्या (सवाई रामजी मारु ओसवाल दि. जैन) मंदिरांत शास्त्रप्रवचन करीत असत व सायंकाळीं छोटे दिवाणजी [स्व. दीवान अमरचन्दजी] च्या मंदिरांत शास्त्र वाचीत असत. पंडितजी शास्त्राचें मर्म इतकें स्पष्ट व आकर्षक रीतीनें सांगत असत कीं ते ऐकून श्रोते आनन्दित होत असत. त्यांच्या प्रवचनानें श्रोत्यांना कांहीं शंका राहात नसे व एखादी शंका कोणाला उत्पन्न झाली तर तिचें निराकरण ते विस्तृत रीतीनें व समाधानकारक करीत असत व त्यामुळें पुनः त्या विषयावर प्रश्न करण्याची आवश्यकता राहात नसे.

आपल्या सदुपदेशानें पंडितजींनीं अनेक लोकांचें मिथ्यात्व नष्ट केलें होतें. कित्येकांच्या भ्रान्त कल्पना नाहींशा केल्या व समीचीन मार्गाची श्रद्धा दृढ केली. पंडितजीपासून ज्ञानामृताचें प्राशन करून ज्यांनीं आपली मिथ्यातृष्णा नाहींशीं केली अशांची संख्या फार मोठी होती.

श्री. रतनचन्द्रजी वैद दूणीवाले हे आपला पुत्र श्री. संघी पन्नालालजी यास संस्कृत, प्राकृत आदि भाषांचा अद्वितीय विद्वान करण्याची इच्छा करीत होते व त्यासाठीं त्यांनीं त्याला संस्कृत भाषेचा अभ्यास करविण्याचा प्रारंभ केला होता. परंतु श्री. रतनचन्द्रजींचा अकालीं मृत्यु झाल्यानें व श्री. पन्नालालजींचा विवाहसंबंध मथुरेचे प्रसिद्ध धनिक श्री. मणीरामजींच्या भावाच्या कन्येबरोबर झाल्यानें, पन्नालालजींचें मन धर्माध्ययनापासून हटलें व तें श्रृंगारिक साहित्याकडे विशेष वळूं लागलें. याचा परिणाम असा झाला कीं, ते धर्माच्या अनभिज्ञतेमुळें व अनिष्ट संगतीनें जैनधर्म सोडून गणेश-मूर्तीचे उपासक बनले. परंतु सुदैवानें कांहीं दिवसांनीं त्यांना पं. सदासुखजींना भेटण्याचा सुयोग मिळाला.

पं. सदासुखजींनीं त्यांना विचारसिक व चतुर समजून असा उत्तम उपदेश दिला कीं तो ऐकून त्यांची मनोवृत्ति एकदम बदलली. त्यांच्या मनांत जैनग्रंथाचें अध्ययन करण्याची उत्कण्ठा उत्पन्न झाली. जरी त्यांना दुणी येथील पुष्कळ कार्यामुळें दिवसां अवकाश मिळत नसला तरी त्यांनीं त्याचवेळीं दररोज रात्रीं दहा वाजतां येऊन पंडितजीजवळ धर्माचें अध्ययन करण्याची प्रतिज्ञा आपण होऊन केली. ती प्रतिज्ञा केलेली पाहून पंडितजींनीं त्यांना म्हटलें, 'आपण घरचे श्रीमान् व सुखी आहांत. आपण ही प्रतिज्ञा कशी शेवटपर्यंत पाळूं शकाल?' पन्नालालजींनीं त्यावेळीं कांहीं उत्तर दिलें नाहीं. परंतु जोपर्यंत पं. सदासुखजी जयपुर येथें राहिले तोपर्यंत त्यांच्याजवळ ते निश्चित समयीं नियमानें येत असत. त्यांच्याजवळ ग्रंथांचें अध्ययन करून त्यांनीं आपलें मिथ्यात्व नाहींसें केलें.

स्व. पं. नाथुलालजी दोशींनींहि पंडितजीजवळच शास्त्राभ्यास केला होता. हे यांचे शिष्य होते व नेहमीं यांच्या बरोबर राहत असत. हे प्रातःकालीं छोटे दीवाणजींच्या मंदिरांत शास्त्रस्वाध्याय करीत असत. आपला सर्व वेळ हे धर्माध्ययन व धर्मचर्चा आदि कार्यांत व्यतीत करीत असत. अवकाश मिळाला म्हणजे पं. सदासुखजी यांना आपल्या येथें बोलावीत किंवा स्वतः त्यांच्या घरीं जाऊन धर्मचर्चा करीत असत.

पं. पारसदास निगोत्याही यांचे शिष्य होते. ते पंडितजींच्या गुणावर अतिशय लुब्ध होते. त्यांनीं स्वकृत ज्ञानसूर्योदय नाटकाच्या वचनिकेंत यासंबंधी असें लिहिलें आहे—

लौकिक प्रवीना, तेरापंथ मायलीना, मिथ्याबुद्धि करि छीना, जिन आतम गुण चीना है।
पढै औ पढावै मिथ्या अलट कू कढावै ज्ञान-दान देय, जिनमारग बढावै है।
दीसै घरवासी, रहै घरहू तैं उदासी, जिनमारग प्रकाशी, जाकी कीरति जगभासी है।
कहां लौं कहीजे गुणसागर सदासुखजीके। ज्ञानामृत पीय बहु मिथ्या विस नासी है।
जिनवर प्रणीत जिन आगममें सूक्ष्म दृष्टि, जाको जस गावत अघावत नहिं सिष्टि है।
संशयतम भान संतोषसरमग्न रहै। सांचो निजपरस्वरूप भाषत अभीष्ट है।

ज्ञानदान बटत अमोघ छ पहर जाके । आस की वासना मिटाई गुण इष्ट है ।
दुखिया सदीव रहे ऐसे गुण दुर्लभ मिलै । पारस अनमाई सदासुख जु परिदिष्ट है ॥

पं. सदासुखजी सारखे धर्मप्रेमी विद्वान् त्याकालींही कमी होते. संवत् १९०६ मध्यें पं. सदासुखजी शिवकोटि आचार्यांच्या प्राकृत भगवती आराधनेचें शास्त्रसभेंत प्रवचन करीत होते. श्रोत्यांनीं ह्या ग्रंथाचा अनुवाद झाला तर प्राकृत न जाणणाऱ्यांना स्वाध्यायाचा मार्ग खुला होईल अशी पंडितजींना प्रार्थना केली. श्रोत्यांच्या त्या आग्रहाची प्रशंसा करून पंडितजी म्हणाले, 'या ग्रंथाची भाषा वचनिका करण्याची इच्छा आज मला उत्पन्न झालेली होती व आपणही आग्रह केला,हा योगायोगच म्हणावयाचा.' पंडितजींच्या मनांत अनुवाद करण्याची इच्छा उत्पन्न होण्याचा व लोकांच्या आग्रहाचा एकच काल प्राप्त झाला म्हणून, त्यांनीं त्या ग्रंथाचा अनुवाद करण्यास माघ कृष्ण दशमी वि. सं. १९०६ रोजीं आरंभ केला व भाद्रपद शुक्ल द्वितीया संवत् १९०८ मध्यें तो सविस्तर टीकेसह पूर्ण केला.

पंडितजींची कीर्ति केवळ जयपुरमध्येंच होती असें नाहीं. बाहेरही फार दूरपर्यंत ती पसरली होती. पंडितजी जैनागमाचे सूक्ष्म जाणते होते. त्यामुळें सर्व जैन विद्वानांशीं त्यांचा परिचय झाला होता. स्वयं पंडितजींनीं जिनवाणीविषयीं असे प्रशंसोद्गार काढले आहेत—

दुखदारिद जान्यो नहीं, चाह न रही लगार । उज्जल यश मम विस्तर्यो यों तेरो उपगार ॥

आरा येथील श्रीकीर्तिचंद्र अग्रवाल यांचे सुपुत्र परमेष्ठीसहाय हे जैनधर्माचे चांगले जाणते होते. त्यांनीं तत्त्वार्थसूत्रावर अर्थप्रकाशिकानामक पांच हजार श्लोकप्रमाण टीका रचिली व ती त्यांनीं आपले मित्र जगमोहनजींच्या आग्रहानें पंडितजीकडे अवलोकनासाठीं पाठविली. पंडितजींनीं संशोधन आदि करून ती अकरा हजार श्लोकप्रमाण करून पुन: श्री परमेष्ठिसहायाकडे पाठविली. यावरून पंडितजीच्या मनांत धार्मिकाबद्दल आदर व विद्वत्ता आदिकांचा परिचय चांगला दिसून आला. पंडितजी एक निःस्पृह साहित्य निर्माते होते असें आढळून आलें. पंडितजीमध्यें धर्मप्रचार करण्याची तीव्र उत्कण्ठा आहे असें आढळून आलें. प्रत्येक दिवशीं आठ प्रहरापैकीं सहाप्रहर त्यांचे ज्ञानदानांत जात होते. ज्ञानाचा प्रचार व प्रसार होईल असेंच त्यांचें प्रत्येक कार्य होतें.

अनेक विद्याप्रेमीजन त्यांजकडे विद्याध्ययनासाठीं येत असत. पूर्वोल्लेखित शिष्यांशिवाय पं. भोलीलालजी सेठी, विजयलालजी व आनन्दीलालजी [पिता पुत्र] हेही पंडितजीचे शिष्य होते.

पंडितजी उत्तम लेखकही होते. पंडितजींचें अक्षर मोत्यासारखे सुंदर होतें. रिकाम्या वेळीं ग्रंथ लेखनाच्या द्वारें पंडितजी सम्यग्ज्ञानाच्या प्रसाराचें कार्य करीत असत. जयपुरशिवाय इतर गांवाहून ग्रंथाची मागणी येई तरी त्याप्रमाणें ग्रंथ लिहून ते त्यांना पाठवीत असत. या कार्यांत आवश्यकतानुसार स्वत: द्रव्यव्ययही करीत असत.

पंडितजींच्या दोन ग्रंथ रचनांचा वर उल्लेख केलेला आहे. याशिवाय आणखी त्यांच्या रचना याप्रमाणें उपलब्ध आहेत–तत्त्वार्थ सूत्रवचनिका [लघु] वि. सं १९१०

नाटक समयसार  वि. सं. १९१४

अकलंकाष्टक वचनिका  वि. सं. १९१५

रत्नकरण्डक श्रावकाचार [ विस्तृत व्याख्यान ] १९२०

मृत्युमहोत्सव  वि. सं. १९२०

नित्यनियम पूजा  वि. सं. १९२१

सं. १९२१ पर्यंत पं. सदासुखजींचें जीवन सुखशान्तीचें गेलें. त्यांत अपूर्व धर्मचेतना होती परंतु यानंतर एक अनिष्ट घटना घडली. पंडितजींना 'गणेशलालजी' नामक एकच पुत्र होता. त्याला पंडितजींनीं संस्कृत, धर्म, सिद्धान्त आदिकाचें शिक्षण देऊन योग्य बनविलें होतें. तो वीस वर्षाच्या वयांत स्वर्गवासी झाला. पंडितजीवर हें मोठें संकट आल्यामुळें त्यांचें मन अतिशय खिन्न झालें. तें कोणत्याही कार्यांत रमेना. त्यावेळीं त्यांचें सान्त्वन करण्यासाठीं अजमेरनिवासी श्रीमान् मूलचंद सोनी आले. तेही त्यांच्या शिष्यवर्गापैकी होते. आपल्या गुरूची अन्तिम समयीं अशी दुर्दशा पाहून त्यांना फार वाईट वाटलें. त्यांना धैर्य देऊन म्हणाले, "आपल्या सुपुत्राचें [गणेशलालांचें] देहावसान झालें म्हणून आपण इतकें चिन्तित कां होता ? त्याच्या स्थानीं मी आहे असें समजा व मला आपण आपली सेवा करण्याचा अवसर द्यावा. मी कांहीं भिन्न नाहीं." याप्रमाणें शेटजींनीं बोलून त्यांचें सान्त्वन केलें व पंडितजींना ते सं. १९२२ सालीं अजमेरास घेऊन गेले. तेथें जाण्यानें त्यांचें दुःख कमी झालें व शांति मिळाली व धर्माकडे पुनः पूर्ववत् रुचि उत्पन्न झाली.

जेव्हां पंडितजींना अन्तसमय निकट आला असें वाटलें, तेव्हां सेठजींनीं पंडितजींचे शिष्य संघी पन्नालालजी आणि मोतीलालजी सेठी यांना अजमेर येथें बोलावून घेतलें. त्यांच्याजवळ धर्म-प्रचारासंबंधी जेव्हां चर्चा झाली तेव्हां पं. सदासुखजींनीं आपली इच्छा पं. पन्नालालजी पुढें व्यक्त केली कीं, " आतां ही माझी अवस्था समाप्त होणार आहे. मी आणि माझ्या पूर्ववर्ती विद्वान् अशा पं. टोडरमलजी, दौलतरामजी, जयचंदजी आदिकांनीं अतिशय परिश्रमानें जें साहित्य निर्माण केलें त्याचा अद्यापि देशान्तरीं यथेष्ट प्रचार झाला नाहीं. तो सर्वत्र पोहोंचून सर्वांना त्याचा चांगला लाभ होण्यासाठीं व त्याच्या पठनपाठनासाठीं प्रयत्न करा. ते सर्वांना सुलभ होईल अशी व्यवस्था करा. तुम्हीं हें कार्य पुढें वाढविलें पाहिजे. तसेंच संस्कृत प्राकृताचें पठनपाठन अविच्छिन्न चालावें म्हणून जयपुर येथें एक पाठशाळेची स्थापना करावी. तींत व्याकरण, काव्य, सिद्धान्त आणि न्याय शास्त्रज्ञ जैन विद्वान उत्पन्न करावेत. जैनांच्या मुलांना वरील विषयांचें शिक्षण मिळण्याची व्यवस्था करावी. म्हणजे समाजांत मिथ्यात्वाचा प्रसार होणार नाहीं. माझें आपणांस एवढेंच सांगणें आहे. पं. मोतीलालांनाही या कार्यांत मदत करावी असें सांगितलें. " सर्वांनीं पंडितजींचा आदेश मस्तक नम्र करून मान्य केला व आपली सर्व शक्ति उपयोगांत आणून कार्य करण्याचें ठरविलें.

शेटजी व इतर दोन शिष्यांनीं अन्तसमयीं पंडितजींचें समाधि मरण साधलें. पंडितजींनीं अतिशय सावधानतेनें समाधिमरणपूर्वक सं. १९२३ अथवा सं. १९२४ मध्यें आपला देह ठेविला असावा.

पंडितजींच्या मृत्युनंतर त्यांच्या शिष्यांनीं त्यांच्या अंतिम आज्ञेचें पालन चांगल्या रीतीनें केलें. जयपुरास आल्यावर संघीजींनीं एक सरस्वती कार्यालय स्थापिलें व त्याच्याद्वारें जैनग्रंथ शुद्धतापूर्वक लिहवून बाहेरगांवीं ते पाठवूं लागले. संघीजींनीं तेव्हांपासून आपलें सर्व आयुष्य या कार्यांत खर्च केलें.आपल्या जीवनाच्या अन्तिम घटिकेपर्यंत सुमारें सोळा वर्षेपर्यंत याच कार्यांत त्यांनीं आपला वेळ घालविला. संघीजी नंतर त्यांचें कार्य त्यांच्या नातूनें- आनंदीलालजीनें सांभाळलें. पाठशाला स्थापनेचें कार्य स्वर्गीय धन्नालालजी फौजदारांनीं आपल्या हातीं घेतलें. संघीजींचें देहावसान सं. १९४० मध्ये झालें. यानंतर आषाढ शुक्ल ५ सं. १९४२ मध्यें श्री धन्नालालजी फौजदारांनीं भोलीलालजी सेठी, चिरंजीलालजी कासलीवाल, बक्षी जवाहरमलजी व दारोगा वालचंदजी यांच्या साह्याय्यानें श्री दिगंबर जैन महापाठशाळेची जयपुर येथें स्थापना केली. ती पाठशाला आतां दि. जैन संस्कृत कॉलेजच्या रूपान दिसत आहे.

याचप्रमाणें जयपुरच्या जैनामध्यें आतांपर्यंत संस्कृत पठनपाठनाचें कार्य चालू आहे. जैन ग्रंथ शुद्धतापूर्वक लिहून परगांवीं पाठविण्याची योजना कांहीं वर्षापयत चालत होती. या कार्याला मूल प्रेरणा देण्याचें यश पं. सदासुखजींना मिळालें आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

वीरवाणी वर्ष २ रें अंक १ ला यांत पं. श्री प्रकाशशास्त्रीजींनीं पंडित सदासुखजींचें चरित्र व त्यांचें ग्रंथकर्तृत्व या विषयी लिहिलेल्या लेखाचा हा अनुवाद असून तो प्रसिद्ध करण्याबद्दल वीरवाणीचे संपादक पं. चैनसुखदासजी यांनीं परवानगी दिली याबद्दल त्यांचे आभारी आहोंत.

—जिनदास पार्श्वनाथ फडकुले

## परिशिष्ट १

# जैन संस्कृति संरक्षक संघाचा

## आढावा सन १९५३ – ५४ मार्च अखेर.

### जमा

| रक्कम | तपशील |
|---|---|
| २००५०० | श्री जैन संस्कृति संरक्षक संघ खातें |
| २६८०० | श्री अनामत खातें |
| ४०४६ | श्री रतनबाई जीवराज धर्मादाय फंड खातें |
| ७२०४।-॥ | श्री ग्रंथविक्री खातें |
| | १८५२।=। यशस्तिलक व आर्य संस्कृति |
| | ३७२३॥।≡॥। तिलोयपण्णत्ति प्रथम भाग |
| | १५९१॥।-॥ तिलोयपण्णत्ति द्वितीय भाग |
| | ३६८= आर्या दशभक्ति |
| | ७२०४।-॥ |
| ८६९६॥।≡॥ | श्री वाढ खातें |
| ७२ | मोतीचंद हिराचंद गांधी |
| २१५०७॥।≡॥ | प्रकाशन खातें मंजूर केलेल्या ग्रंथाबद्दलचे |
| १५०० | श्री गुरुकुल सेवा मंडळ कारंजा |
| २७०३२७८≡॥ | |

### नांवे

| रक्कम | तपशील |
|---|---|
| ३६३१५॥।=॥ | श्री घर जागा खरेदी खातें |
| ३२३३४८- | श्री गहाण खातें चाळ |
| १६८१०२॥ | श्री डिबेंचर्स व शेअर्स खरेदी खातें |
| ८८४५८॥।=॥ | श्री प्रकाशन खातें प्रेस वाल्यांस छपाई व कागद वगैरेसाठीं |
| ३२८॥-। | प्रो. ए. एन्. उपाध्ये |
| १००१८≡ | प्रो. हिरालाल जैन प्रकाशन पोटीं |
| ११५५२।- | धी बँक ऑफ महाराष्ट्र खातें |
| ११८४९।=। | जीवराज गौतमचंद खातें |
| ४९६॥।=॥ | श्री पुस्तक खरेदी खातें |
| ५०० | श्री फार्निचर खातें |
| ।≡॥ | आढावा चूक |
| २७०३२७८≡॥ | |

## परिशिष्ट २

## ब्र. जीवराज गौतमचंद यांनीं संवत १९६८ पासून संवत २०१० पर्यंत धर्मादायासाठीं रकमा दिल्या त्याची यादी.

### ज्ञानदानः—

६३६ जैन पाठशाळा सोलापुर सं. १९६८ स्थापनेच्यावेळीं देऊं केलेली रक्कम
१७०० जैन पाठशाळेकरितां वडिलांच्या नांवें तालिम बांधून दिली सं. १९७०
१००० श्रीमती चतुरबाई श्राविकाश्रमास मातुश्री झुमाबाईच्या नांवानें सं. १९७६
३५० श्री. पन्नालालसरस्वतीभवन मुंबई सं. १९७६
१०० श्री माणिकचंद ग्रंथमाला १९७६
३०० सोलापुर जैन पाठशाळा १९७७
३०० शेडबाळ पाठशाळा १९८२
१०० कुंथलगिरि आश्रम १९८२
३०० मोरेना पाठशाळा १९८३।८४
३०० शेडबाळ पाठशाळा १९८३
४१०० रामचंद्र नाथा अनाथालय यास मदत सं. १९८४ पासून सं. १९९६ पर्यंत तेरा वर्षे
२५० शांतिनाथ कटकेकृत मराठी पूजेची पुस्तकें छापणेंसाठीं १९८५
१००० कारंजा महावीराश्रम १९८७
१०० जिनदास कीर्तनकार १९८८
१११ सांगली आश्रमांत मेरूसाठीं १९८८
१०० कंकूबाई आश्रम कारंजा १९९०
१०० टिळक स्मारक सोलापुर १९९१
१५० राष्ट्रीय विद्यालय सोलापुर १९९२
१०० श्राविकाश्रम मुंबई १९९३
१०१ श्राविकाश्रम सोलापुर १९९३
२०० श्राविकाश्रम कारंजा १९९३
१३४ श्राविकाश्रम आरा १९९४
२००० श्री. रतनबाईच्या अंतकालीं धर्मादाय १९९२
१०१ पन्नालाल पाठशाळा सोलापुर १९९४
६७१५ धन्यकुमार यास शिक्षणासाठीं १९९५
४१०० अभयकुमार यास शिक्षणासाठीं १९९५
१०० अंबाला संघ मथुरा १९९६
३८०० गुरुकुल सोलापुर संस्थेस मदत सं. १९९७ ते सं. २०१० तेरा वर्षे
५०० स्याद्वाद पाठशाळा बनारस १९९८
१०१ मोरेना पाठशाला १९९९
१००० रावजी सखाराम स्मारक फंड २००१
१०० कारंजा येथील मंदिरास २००२
४००० डॉ. अभयकुमार यास अमेरिकेस जातांना शिक्षणासाठीं २००४
७०० किरकोळ

३४६४९ एकूण

### औषधदानः—

१५०० सखाराम नेमचंद जैन औषधालयास वडिलांचें स्मरणार्थ दिलें सं. १९७५
१०१ वळसंग औषधालय १९७६
१०१ धाराशिव औषधालय १९७७

१०१ बारामती औषधालय
३७५ अहमदनगर औषधालय १९९५
१२५०० रतनबाई जीवराज रुग्णपरिचर्या मंदिर—सखाराम नेमचंद जैन औषधालयाची इमारत सं. १९७९ सालीं बांधवून दिली त्याबद्दल
१०४७५ सखाराम नेमचंद नेत्रचिकित्सालय डॉ. सरदेसाई याजकडून सुरू करविलें त्यासाठीं सात वर्षें मदत
१४४५ स. ने. फिरतें औषधालय चालविलें त्यासाठीं झालेला खर्च
५१ काडादी औषधालयास मदत १९९३

२६६४९

**मंदिरप्रतिष्ठाः—**

१८००० श्रीगजपंथावर मंदिर बांधवून प्रतिष्ठा करविली. १९९०
१३७५० श्री कुंथलगिरि क्षेत्रावरील मंडप बांधविला. मातोश्रीच्या स्मरणार्थ त्यासाठीं विमा पॉलिसी बेचन करून दिली.
५०० गजपंथ येथील प्रतिष्ठा श्री शांतिसागर महाराज चातुर्मासाचे वेळीं झाली. त्यासाठीं १९९४
५५० गुजराथ यात्रा खर्च १९८१
१८१ सोलापुर श्राविकाश्रमांत मेरू करवून दिला.
५०५ सोलापुर चिंतामणि पार्श्वनाथ मंदिरांत मेरू करवून दिला १९९२
४९२ कुंथलगिरि मंडप-प्रतिष्ठेचेवेळी मूर्ति विराजमान करितांना सं. २००६
१०१ श्री गोमटेश्वर महाभिषेकाचा कळस सं. २००९
१२८७ किरकोळ, धर्मादाय पट्टींत मांडलेले

३५३६६

१९७१८० जैन संस्कृति संरक्षक संघ
२००००सन १९४१ स्थापनेच्या वेळीं
५०००० सन १९४३ सालीं
१२७१८० सन १९४४ सालीं

१९७१८०

३४६४९ ज्ञानदान
२६६४९ औषधदान
३५३६६ मंदिर, कुंथलगिरि मंडप बंधाई प्रतिष्ठा, वगैरे

२९३८४४ संवत् २०१० चैत्र शुद्ध १ पर्यंत

## चुकीची दुरुस्तीः—

मागील ४० व्या पानावर ब्र. जीवराजभाईंच्या जीवनचरित्रांत त्यांनीं केलेल्या धर्मादायाच्या आकड्यांत ज्ञानदानासाठीं रुपये ३४५७७ च्या ऐवजीं रुपये ३४६४९ व साहित्यप्रकाशनसंस्थेसाठीं रुपये २०१००० च्या ऐवजीं रुपये १९७१८० एकूण रुपये २९७५६२ ऐवजीं रुपये २९३८४४ समजावेत.

रत्नकरण्ड-श्रावकाचाराची

# विषयानुक्रमणिका

## प्रारंभिक-विषयानुक्रमणिका



## १ दर्शनाधिकार १-८१ पृष्ठें

## २ ज्ञानाधिकार ८२–८४ पृष्ठें



## ३ चारित्राधिकार ८४–२०५ पृष्ठें

## वैयावृत्यभावना २४५-२४७ पृष्ठें



## अर्हद्भक्ति २४७-२५१ पृष्ठें



## आचार्यभक्ति २५१-२५७ पृष्ठें



## बहुश्रुतभक्ति २५७-२६२ पृष्ठें



## प्रवचनभक्ति २६२-२६६ पृष्ठें



## आवश्यकापरिहाणि २६६-२७१ पृष्ठें



## मार्गप्रभावना २७१-२७४ पृष्ठें



## प्रवचनवत्सलत्व २७४-२७६ पृष्ठें



## दशलाक्षणिक धर्म २७७-३११ पृष्ठें

### क्षमा २७७-२८५ पृष्ठें

## सल्लेखना　४२७-४६५ पृष्ठें



## अकरा प्रतिमांचें स्वरूप　४६५–४७० पृष्ठें



## समारोप व ग्रंथकर्त्याची प्रार्थना ४७०–४७१, शुद्धिपत्र ४७२.

---

रत्नकरण्ड श्रावकाचाराच्या श्लोकांचा

# अकाराद्यनुक्रम

श्रीवीतरागाय नमः ।

आचार्य समन्तभद्रविरचित रत्नकरण्ड श्रावकाचाराच्या पंडित सदासुखजीकृत हिंदी भाषाटीकेचा मराठी भाषानुवाद.

# रत्नकरंड-श्रावकाचार.

मं ग ला च र ण

जें प्राप्त करुनि घेणें योग्य असे सर्व भव्यजीवांस ।
जें सिद्धीचें कारण आचरितां देइ मुक्तिपदिं वास ॥ १ ॥
ऐशा प्रशस्तदृष्टिज्ञानाचरणास वर्णिलें ज्यांनीं ।
त्या श्रीवीरजिनांना नमितों मीं चित्तकायवचनांनीं ॥ २ ॥
जी लोकत्रयमंगल नृसुरासुर वंदिती जियेस सदा ।
वाणी वीरजिनाची होवो मजला समस्तशिवसुखदा ॥ ३ ॥
भव्यां अक्षय-सुखकर रत्नकरण्डक दिला असे ज्यांनीं ।
त्यागी तेच खरोखर योगीन्द्र समन्तभद्र सुखखाणी ॥ ४ ॥
श्रीजिनवाणीसेवा-सुखी असे विबुधवर सदासुखजी ।
वन्दुनि समन्तभद्रा त्यांच्या मळवून शीर्ष पादरजीं ॥ ५ ॥
त्यांनीं सुपदविवेचन केलें भव्या सदैव सुखवाया ।
हिंदी भाषेमाजीं कोण शहाणा म्हणेल त्या वाया ॥ ६ ॥
अनुवाद मी तयाचा करिन महाराष्ट्रभाषणीं नीट ।
पाठक-जनास जेणें दिसेल सुखदा सुमुक्तिची वाट ॥ ७ ॥

ग्रन्थप्रारंभीं स्याद्वादविद्याधिपति परमनिर्ग्रन्थ वीतराग अशा श्रीसमन्तभद्राचार्यांनीं जगांतील भव्यजीवांवर उपकार करण्याच्या हेतूनें, रत्नत्रयरक्षणाचा साक्षात् उपायस्वरूप असा हा रत्नकरण्ड नामक श्रावकाचार ग्रंथ रचिला, त्याची निर्विघ्नतया समाप्ति व्हावी म्हणून इष्ट देवतेप्रत नमस्कारार्थ पुढील सूत्र सांगतात—

मंगलाचरण.

**नमः श्रीवर्धमानाय निर्धूतकलिलात्मने ।**
**सालोकानां त्रिलोकानां यद्विद्या दर्पणायते ॥१॥**

**अर्थ**– श्रीवर्धमान तीर्थकरांना माझा नमस्कार असो. हे श्रीवर्धमान कोण ? तर श्री म्हणजे अन्तरंग अनन्तज्ञान, अनन्तदर्शन, अनन्तवीर्य आणि अनन्तसुख अशी अनन्तचतुष्टयस्वरूप जी अविनाशी लक्ष्मी, आणि बहिरंग म्हणजे इन्द्रादिकांकडून वन्दनीय अशी समवसरणादिक लक्ष्मी, या उभय लक्ष्मींच्या योगें वृद्धीला प्राप्त होणारे जे त्यांना श्रीवर्धमान म्हणतात– अथवा अव– समन्तात् म्हणजे सम्पूर्ण प्रकारें ऋद्ध म्हणजे परमातिशयास प्राप्त झालें आहे केवलज्ञान ज्यांचें ते श्रीवर्धमान होत. या विग्रहांत 'अवाप्योरल्लोपः' या सूत्रानें अकाराचा लोप झाला आहे. आतां ते वर्धमान कसे आहेत तें पाहू. ते निर्धूतकलिलात्मन् आहेत. निर्धूत म्हणजे नष्ट केले आहेत आत्म्यापासून कलिल– ज्ञानावरणादिक पापमल–ज्यांनीं असे आहेत. तसेंच ज्यांची केवलज्ञानलक्षणा विद्या अलोकाकाशा- सहित समस्त तिन्ही लोकांना दर्पणाप्रमाणें प्रकाशित करणारी आहे.

**विशेषार्थ**– ज्यांच्या केवलज्ञान-विद्यारूपी दर्पणामध्यें अलोकाकाशासहित षड्द्रव्यांच्या समु- दायस्वरूपानें असणारा हा लोक आपल्या भूतभविष्यद्वर्तमानकालांच्या समस्त अनन्तानन्त पर्याया- सह प्रतिबिम्बित होऊन राहिला आहे, व ज्यांचा आत्मा सर्वप्रकारच्या कर्ममलापासून अलिप्त झाला आहे, अशा श्रीवर्द्धमान देवाधिदेव अन्तिम तीर्थकराला, आपणाला आवरण कषायादिमलरहित सम्यग्दर्शन प्राप्त व्हावें म्हणून आचार्य समन्तभद्रांनीं नमस्कार केला आहे.

यापुढें धर्माचें स्वरूप सांगण्याकरितां प्रतिज्ञारूप सूत्र सांगतात—

धर्माचें स्वरूप

**देशयामि समीचीनं धर्मं कर्मनिबर्हणम् ।**
**संसारदुःखतः सत्त्वान्यो धरत्युत्तमे सुखे ॥२॥**

**अर्थ**– मी ( समन्तभद्राचार्य ) या ग्रन्थामध्यें पंचपरिवर्तनरूप संसारांतील दुःखापासून प्राण्यांना सोडवून स्वर्गमोक्षरूपी उत्तम प्रकारच्या सुखाला प्राप्त करून देईल अशा धर्माचा उपदेश देतों. तो धर्म समीचीन म्हणजे वादिप्रतिवादीकडून ज्यांत प्रत्यक्ष व अनुमानादिकांच्या योगें मुळींच बाधा येणारी नाहीं म्हणून उत्तम व कर्मबन्धनाचा नाश करणारा आहे.

धर्म विकत किंवा कोणाची सेवा करून मिळत नाहीं

**विशेषार्थ**– जगामध्यें धर्म असें नांव सर्व लोकांच्या तोंडून ऐकूं येतें. परन्तु धर्म शब्दाचा अर्थ असा आहे कीं, नरकतिर्यंचादिगतिमध्यें परिभ्रमण करणाऱ्या आत्म्याला त्या गतींतील प्राप्त होणाऱ्या अनिवार्य दुःखापासून सोडवून अविनाशी अतीन्द्रिय अनुपम आत्मिक मोक्षसुख ज्या योगानें प्राप्त करून घेतां येतें, त्यास धर्म म्हणावें. अशा प्रकारचा धर्म बाजारांत कोठें विकत मिळत

नसतो. धर्मविक्रीचें कोठें एखादें दुकान असतें तर सद्यःस्थितींतील लोकांनीं तो आपल्या शक्तिबाह्य द्रव्य खर्चूनहि अतिप्रयत्नानें व सन्मानानें विकत घेतला असता. तसेंच कोणाची सेवा चाकरी करून जर हा धर्म मिळण्यासारखा असतां तरीही सेवेनें त्याचें चित्त प्रसन्न करून घेऊन मिळविला असता. परंतु अशा प्रकारचा धर्म कोणासही देतां येण्यासारखा नाहीं, देऊळ, पर्वत, जल, अग्नि, देवमूर्ति, आणि तीर्थादिकांच्या ठिकाणींही हा ठेविलेला नाहीं कीं तेथून जाऊन आणतां येईल. भयंकर व्रत उपोषणादि तपश्चरणांनीं शरीर कृश केलें तरीही तो मिळत नाहीं. अथवा मंदिरांत मोठमोठ्या किंमतीचीं उपकरणें ठेविलीं अथवा मंडल मांडून पूजनविधानादि करविलें, आणि गृहत्याग करून श्मशानांत जाऊन राहिले अथवा परमेश्वराचें जप–जाप्य करविले, किंवा रात्रंदिवस भगवंताच्या नामस्मरणानें जग दुमदुमून सोडिलें तरीही धर्माची प्राप्ति होत नसते. धर्म हा आत्म्याचा स्वभाव आहे. परवस्तूवरील आत्मबुद्धि टाकून आपल्या ज्ञानदर्शनस्वभावाचें श्रद्धान करणें अथवा अनुभव घेणें, आणि आत्म्याच्या ज्ञायक स्वभावामध्येंच तन्मय होणें यास धर्म म्हणतात. ज्यावेळीं आत्म्यामध्यें उत्तम क्षमा, मार्दवादिक निजस्वभाव प्रगट होतात, रत्नत्रय प्राप्त होतें, व सर्व जीवावर दया करावी असा विचार उत्पन्न होतो, त्यावेळीं आत्मा स्वतःच धर्मरूप होतो. परद्रव्यक्षेत्रकालादिक हे निमित्तमात्र आहेत.

ज्यावेळीं आत्मा आपली रागद्वेषरूप परिणति सोडून वीतराग होतो त्यावेळीं मंदिर, प्रतिमा, तीर्थ, दान, जप, तप वगैरे सर्व वस्तु त्यास धर्मरूप होतात. परन्तु जोपर्यंन्त त्याची वीतराग

**वीतरागतेनेंच धर्म होतो**

अवस्था झाली नाहीं अथवा त्यापासून रागद्वेष नाहींसे झाले नाहींत तोपर्यन्त त्यास कोठेंही धर्म प्राप्त होत नाहीं. ज्यावेळीं आत्म्यामध्यें शुभराग असतो त्यावेळीं पुण्यबंध होतो. ज्यावेळीं अशुभ राग, द्वेष, मोह असतात त्यावेळीं पापबंध होतो. जेथें यथार्थ ज्ञान, श्रद्धान व आचरण आहे तेथें धर्म आहे व मग त्यास बंध अवस्थाच मुळीं नाहीं. बंधाचा अभाव होणें हेंच उत्तम सुख आहे. अशा उत्तम सुखाचें कारण जो आत्म्याचा स्वभावरूप धर्म तो सांगण्याकरितां सूत्र सांगतात.

#### खऱ्या धर्माचें लक्षण

**सद्दृष्टिज्ञानवृत्तानि धर्मं धर्मेश्वरा विदुः ।**
**यदीयप्रत्यनीकानि भवन्ति भवपद्धतिः ॥३॥**

**अर्थ–** धर्माचे ईश्वर जे तीर्थंकर परमदेव त्यांनीं सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या तिहीला धर्म असें म्हटलें आहे. यांच्याविरुद्ध मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान व मिथ्याचारित्र हीं तीन आहेत. त्यापासून संसार परिभ्रमण घडतें.

**विशेषार्थ–** स्वपरद्रव्याचें यथार्थ ज्ञान झाल्यानें संसारपरिभ्रमण नाहींसें होऊन उत्तम सुख प्राप्त करून देणारा धर्म घडतो. याविरुद्ध स्वपरद्रव्याचें असत्यार्थ ज्ञान, श्रद्धान, व चारित्र संसारा-

तील भयंकर दुःखामध्यें बुडविणारें आहे असें भगवान् वीतराग सांगतात. आम्ही आमच्या पदरचें मुळींच सांगत नाहीं.

प्रथमतः सम्यग्दर्शनाचें लक्षण सांगण्याकरितां सूत्र सांगतात—

सम्यग्दर्शनाचें स्वरूप.

**श्रद्धानं परमार्थानामाप्तागमतपोभृताम् ।**
**त्रिमूढापोढमष्टाङ्गं सम्यग्दर्शनमस्मयम् ॥४॥**

**अर्थ—** सत्यार्थ अशा देव, गुरु, शास्त्र यांवर श्रद्धान ठेवणें यास सम्यग्दर्शन म्हणतात. आप्त म्हणजे देव. तो सर्व पदार्थांना जाणून त्यांचें सत्य स्वरूप प्रगट करणारा आहे. आगम म्हणजे शास्त्र. हें आप्तोपदेशित पदार्थांची शब्दद्वारा रचना होय. आप्तांनीं प्ररूपणा केलेल्या आगमानुसार आचरण करणारा तो गुरु होय. यावरून सत्य देव, गुरु व शास्त्राचें श्रद्धान करणें हें सम्यग्दर्शन होय. असत्य देव, गुरु, शास्त्रांचें श्रद्धान हें सम्यग्दर्शन नव्हे. सम्यग्दर्शन अष्टांगयुक्त आणि तीन मूढता व आठ मद यांनीं रहित असतें, याचें वर्णन पुढें क्रमानें येईल.

**विशेषार्थ—** सत्यार्थ देव, गुरु, शास्त्र यांवर तीन मूढता व अष्टमदांनीं रहित आणि अष्टांगयुक्त श्रद्धा ठेवणें यास सम्यग्दर्शन म्हणतात. शास्त्रांत कित्येक ठिकाणीं सप्ततत्त्व व नवपदार्थांच्या श्रद्धानाला सम्यग्दर्शन म्हटलें असून आपण येथें वरील वेगळें लक्षण कां केलें अशी कोणी शंका करील तर त्याचें समाधान असें कीं, निर्दोष व निर्बाध शास्त्राच्या उपदेशाशिवाय सप्ततत्त्वाचें श्रद्धान कसें करावयाचें व निर्दोष आप्ताशिवाय सत्यार्थ आगम प्रगट तरी कसा होणार? म्हणून तत्त्वश्रद्धानाचें मूल कारण सत्यार्थ आप्त होय. त्याचें लक्षण सांगण्याकरिता सूत्र सांगतात—

आप्ताचें लक्षण

**आप्तेनोच्छिन्नदोषेण सर्वज्ञेनागमेशिना ।**
**भवितव्यं नियोगेन नान्यथा ह्याप्तता भवेत् ॥५॥**

**अर्थ—** ज्याचें दोष दूर झाले आहेत, जो सर्व पदार्थांना जाणणारा असून आगमांचा स्वामी आहे, त्यालाच आप्तपणा असणें योग्य आहे. निर्दोषपणा, सर्वज्ञपणा आणि आगमेशित्व हे तीन गुण असल्याशिवाय आप्तपणा येत नाहीं.

**विशेषार्थ—** धर्माचे मूलकर्ते भगवान् आप्त आहेत. त्यांचें ठिकाणीं तीन गुण अवश्य आहेत. त्यांतून पहिला गुण निर्दोषपणा. हा क्षुधातृषादिक अठरा दोषांचा नाश केल्यापासून उत्पन्न होतो.

निर्दोषता

त्रिकालवर्ती सम्पूर्ण गुण व पर्याय, जीव, पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश, काल या सहा द्रव्यांच्या अनंत परिणतींना एकाचवेळीं प्रत्यक्ष जाणण्यानें दुसरा सर्वज्ञपणा गुण प्राप्त होतो. परमहितोपदेशक शास्त्रांचा मूलकर्ता म्हणून आगमांचा स्वामी असा तिसरा गुण ही आहेच. या तीन असाधारण गुणांना धारण करणाऱ्यांनाच

देव म्हणतात. याशिवाय इतर अनेक गुणांनीं देवत्व प्राप्त होत नाहीं. कारण जो स्वतः अनेक दोषांनीं भरलेला असेल तो दुसऱ्यांस निर्दोष कसा करूं शकेल ?

ज्याला क्षुधेची, तृषेची, कामक्रोधादिकांची बाधा होत असेल तो दुःखी असलाच पाहिजे, त्याचे ठिकाणीं ईश्वरपणा कसा असूं शकेल ? जो सदैव भित्रा असल्यामुळें आपणाजवळ स्वरक्षणार्थ शस्त्रास्त्रें तयार ठेवितो त्यास वैरी आहेत व त्यामुळें त्याचे मनांत सदैव आकुलता ठेविलेली. तो निराकुल कसा असूं शकेल ! ज्याला रात्रंदिवस ईर्ष्या, द्वेष, चिन्ता हीं लागलेलीं असतात तो सुखी कसा होईल ? जो कामासक्त असेल तो नेहमीं परवश असावयाचाच. त्याला स्वतन्त्रता नाहीं. मग पराधीन असलेला पुरुष यथार्थवक्ता होऊ शकेल काय ? कधींही नाहीं. तसेंच जो गर्वाच्या वश झाला असेल अथवा निद्रेच्या अधीन झाला असेल तोही सत्यवक्ता होणार नाहीं. त्याच्या मागें जन्म-मरणाचा फेरा लागलेला आहे. तो संसारी आहे. त्याला आप्तपणा शोभत नाहीं. जो सर्वथैव निर्दोष असेल त्यालाच सत्यार्थ आप्त ही संज्ञा देतां येईल. रागी द्वेषी हे सदैव आपले व इतरांचे रागद्वेष ज्या योगानें पुष्ट होत जातील असेंच नेहमीं सांगणार. म्हणून जगांत जर कोणी यथार्थ वक्ता संभवत असेल तर तो वीतराग परमेष्ठीच होय. तो वीतराग सर्वज्ञ असलाच पाहिजे. जर त्याचे ठिकाणीं

**सर्वज्ञता**

सर्वज्ञत्व नाहीं मानिलें तर केवळ इंद्रिय–जनित ज्ञानाच्या योगानें (इंद्रियांच्या साहाय्यानें ज्ञान प्राप्त करून घेणारा) पूर्वी होऊन गेलेल्या रामरावणांना कसा जाणील ? दूर असणाऱ्या मेरु कुलाचल पर्वताला कसा जाणील ? इन्द्रियजनित ज्ञान, आपणासमोर असलेल्या स्थूल पदार्थाला ही स्पष्ट जाणू शकत नाहीं. मग संसारांत तर जीव, पुद्गल, काल वगैरे अनंत पदार्थ आहेत व ते एकाच वेळीं आपआपल्या भिन्न भिन्न स्वरूपानें परिणमन करीत असतात. एका समयांत अनंत पदार्थांची वेगवेगळीं अनंतपरिणति होत असते. तेव्हां अशा पदार्थांना तें एकाच वेळीं कसें जाणूं शकेल ! इन्द्रियजनित ज्ञान क्रमवर्ति स्थूल पुद्गलांच्या अनेक समयांत होणाऱ्या एका पर्यायाला जाणतें. अनेक पदार्थांचे अनेक पर्याय आहेत. जर हें एका पर्यायालाही पूर्णपणें जाणण्यास समर्थ नसेल तर मागें अनंत काल गेला व पुढें अनंत काल जाईल त्याकाळीं होणाऱ्या अनंतानंत परिणतीला तें कसें जाणूं शकेल ? यावरून त्रिकालवर्ती समस्त द्रव्यांच्या परिणतीला युगपत् जाणण्यास समर्थ एक सर्वज्ञच होऊं शकेल व त्याच्याच ठिकाणीं फक्त आप्तपणा संभवेल.

याशिवाय जो परमहितोपदेशक असेल तोच आप्त संभवेल. सारांश– वरील तीन गुण ज्याचे ठायीं एकत्र असतील तोच देव होय. यद्यपि अरिहंत देव मनुष्य आहे. तथापि ज्ञानावरणादि चार

**परमहितोपदेशी**

घाति–कर्मांचा नाश केल्यापासून प्रगट झालेला जो अनन्तज्ञान, अनन्तदर्शन, अनन्तवीर्य आणि अनन्तसुखरूप निज स्वभाव त्यामध्यें तो रममाण होतो. कर्माला जिंकिल्यामुळें त्याच्या शरीरावर अनुपम तेज प्राप्त होतें. तो अनन्तसुखामध्यें रममाण असतो. इन्द्रादिक सर्व देव त्याची नेहमी स्तुति करितात. अनंतज्ञानदर्शन

स्वभावामुळें तो सर्व लोकालोकांत व्यापून राहतो. इतर देवमनुष्यापेक्षा असाधारण आत्मस्वरूप प्राप्त झाल्यानें तो फार दैदीप्यमान दिसतो. म्हणून मनुष्यपर्यायांतच आपल्या अनन्तज्ञान-सुख-वीर्यादि गुणांमुळें त्याला देवाधिदेव असें म्हटलें आहे. या ठिकाणीं कोणी प्रश्न करील कीं, आप्त तीन गुणांनींच युक्त असावा असें कां? त्या ठिकाणीं एक निर्दोषपणा असला म्हणजे इतर सर्व गुण आले नसते काय? याचें उत्तर असें कीं, आपल्या म्हणण्याप्रमाणें. एक निर्दोषपणा हेंच लक्षण मानलें तर आकाश, धर्म, अधर्म, पुद्गल, कालादिकांच्या ठिकाणीं ही निर्दोषत्व आहे. कारण हे पदार्थ अचेतन असल्यानें त्यांना रागद्वेष नाहींत. मग या अचेतन पदार्थांनाही देव मानावें लागेल. म्हणून निर्दोष असून सर्वज्ञ असेल तोच आप्त मानला पाहिजे. निर्दोषत्व व सर्वज्ञत्व हे दोनच गुण आप्ताचे मानिले तर सिद्धपरमात्म्याचे ठिकाणीं आप्तपणा प्राप्त होतो त्यामुळें सत्यार्थ उपदेशाचा अभाव होतो, कारण सिद्ध भगवान् उपदेश करीत नाहींत. म्हणून निर्दोषपणा, सर्वज्ञपणा व परमहितोपदेशकपणा या तीन गुणांनीं युक्त देवाधिदेव परम औदारिक शरीर धारण करणारे भगवान् सर्वज्ञ वीतराग अरिहंत देव हेच देव आहेत असें मानणें प्राप्त होतें. पुढें अरिहंतदेवांनीं ज्या दोषांचा नाश करून देवपणा मिळविला त्या दोषांचीं नांवें सांगण्याकरितां सूत्र सांगतात—

अठरा दोष

**क्षुत्पिपासाजरातङ्कजन्मान्तकभयस्मयाः ।**
**न रागद्वेषमोहाश्च यस्याप्तः स प्रकीर्त्यते ॥६॥**

**अर्थ**— १ क्षुत्-क्षुधा-भूक, २ पिपासा-तहान, ३ जरा-वृद्धपणा, ४ आतंक-रोग, ५ जन्म-कर्मोदयानें चतुर्गतींत उत्पत्ति, ६ अन्तक-मृत्यु, ७ भय-भीति, ही सात प्रकारची आहे. इहलोक-भीति, परलोक-भीति, मृत्यु-भीति, वेदना-भीति, अरक्षा-भीति, अगुप्ति-भीति व अकस्मात्-भीति. ८ स्मय-म्हणजे मद, हे आठ आहेत. ९ राग, १० द्वेष, ११ मोह व च शब्दावरून १२ चिन्ता, १३ रति, १४ निद्रा, १५ विस्मय, १६ विषाद, १७ स्वेद म्हणजे घाम, आणि १८ खेद म्हणजे व्याकुलता यांचें ग्रहण करावयाचें. एकूण हे अठरा दोष ज्याला नाहींत त्यास आप्त म्हणावें.

**विशेषार्थ**— या ठिकाणीं कोणी श्वेताम्बर आम्नायी पुरुष प्रश्न करितो कीं, तुम्ही दिगम्बर *मतानुयायी लोक केवली भगवंताच्या ठिकाणीं क्षुधा व तृषा यांचा अभाव मानतां यावरून केवलींना आहार घेतां येणार नाहीं मग त्यांचें शरीर कसें टिकेल?* तुम्ही तर त्यांचें

श्वेतांबर मतदिग्दर्शन

शरीर राहतें असें मानतां, यावरून ते आहार घेत असले पाहिजेत हें सिद्ध होतें. ज्याप्रमाणें आपलें शरीर आहाराशिवाय राहू शकत नाहीं त्याप्रमाणेंच केवलींचेंहि आहारावांचून शरीर राहू शकणार नाहीं. ज्या अर्थीं तुम्ही शरीराची स्थिति मानता त्या अर्थीं आहार हाही मानणें भाग आहे.

**उत्तर**– याचें समाधान असें आहे. केवलीच्या ठिकाणीं तुम्हास फक्त आहारच साधावयाचा आहे अथवा कवलाहार सिद्ध करावयाचा आहे ? फक्त आहाराचीच केवलीचे ठिकाणीं सिद्धि करावयाची असेल तर 'सयोग केवलीपर्यन्त सर्व जीव आहारक आहेत' असें आगमवाक्य आहे. कारण एकेन्द्रियाप्रासून सयोगि-केवलीपर्यन्त प्रत्येक जीव प्रत्येक समयामध्यें सिद्धराशीच्या अनन्ताव्या भागाइतक्या अभव्यराशीहून अनन्तपट कर्मपरमाणूंचें ग्रहण करीत असतो. या दृष्टीनें केवली आहार घेतात असें आम्ही मानतो. तुम्ही असें म्हणत असाल कीं, केवली कवलाहार करितात म्हणजे तुम्ही आम्ही ज्याप्रमाणें एक एक अन्नाचा घास आपल्या मुखामध्यें ठेऊन भक्षण करितो त्याप्रमाणें तेही करितात असें मानतों. कारण कवलाहाराशिवाय देहाची स्थिति राहणें शक्य नाहीं. यावर आमचें उत्तर असें आहे– देवांचें शरीर कवलाहाराशिवाय हजारो वर्षें कसें राहूं शकतें हें तुम्ही सांगूं शकाल काय ? देव कवलाहारी नाहींत व त्यांचा देह राहू शकतो यावरून तुमचा हेतु व्यभिचारी ( चुकीचा ) ठरला. देवांना मानसिक आहार आहे. त्यांना आहारांची इच्छा होतांच कंठांत अमृत झरूं लागतें, त्यामुळें त्यांची तृप्ति होत असते. ज्याप्रमाणें चतुर्णिकाय देवाचें शरीर कवलाहाराशिवाय फक्त मानसिक आहारानें टिकू शकतें त्याचप्रमाणें कर्मनोकर्मवर्गणांच्या आहारानें केवली भगवंताचेंही शरीर राहू शकतें. यावर पुनः तुम्ही म्हणाल कीं केवली हे आपणाप्रमाणेंच मनुष्य–देहांत राहतात म्हणून आपल्याप्रमाणेंच त्यांचेंही कवलाहारानें शरीर राहिलें पाहिजे. असें मानिलें म्हणजे आपल्या शरीराप्रमाणेंच केवलीच्या देहाला घाम, खेद, उपसर्ग, परीषह वगैरे मानणें प्राप्त झालें. हें केवलीच्या अतिशयाच्या प्रभावानें होत नाहींत असें तुम्ही म्हणाल तर भोजनाचा अभावरूप अतिशयही कां मानूं नये ? आपल्याच शरीरावरून जर केवलीच्या देहाची परीक्षा करावयाची असेल तर आपणाला जसें इन्द्रियजनित ज्ञान आहे तसें त्यासही मानावें लागेल. पाहणें, श्रवण करणें, स्वाद घेणें, चिन्तन करणें वगैरे जर इन्द्रियापासून होतात तर केवलज्ञान हें अतीन्द्रिय आहे असें म्हणणें अर्थात् खोटें ठरतें. मग सर्वज्ञपणाचा अभाव आलाच. आतां तुम्ही म्हणाल ज्ञान समान असलें म्हणून काय झालें ? केवलींना तर अतीन्द्रियज्ञान आहेच. मग देह त्यांचा व आमचा समान असला म्हणून काय बिघडलें ? त्यांचें शरीर कवलाहारावांचून राहतें असें मानण्यास तरी काय हरकत आहे ? यावर तुम्ही म्हणाल, त्यांना वेदनीय कर्माचा सद्भाव असल्यानें भोजनाची इच्छा उत्पन्न होते व त्यामुळें ते कवलाहार घेण्यास प्रवृत्त होतात. परंतु वेदनीय कर्म हें मोहनीय कर्माच्या साहाय्यानें क्षुधा उत्पन्न करण्यास समर्थ होतें. तें एकटें हें कार्य करण्यास समर्थ नाहीं. कारण क्षुधा म्हणजे भोजनाची इच्छा. इच्छा हें मोहनीय कर्माचें कार्य आहे. ज्याचें मोहकर्म नष्ट झालें आहे अशा केवलीभगवंताला इच्छा कशापासून उत्पन्न होणार ? जर मोहनीय–कर्मापासून इच्छा उत्पन्न होतें असें मानिलें तर सुंदर स्त्रीला पाहून तिचा उपभोग घेण्याचीही त्यांना इच्छा उत्पन्न होईल असें मानावें लागेल. अथवा सुरेख वस्त्राभरण, शय्या वगैरे पदार्थांचा भोगोपभोग

कवलाहाराचें खंडन

घेण्याची इच्छा उत्पन्न होण्याचा प्रसंग आल्यानें वीतरागपणा मुळींच राहणार नाहीं. ज्या ठिकाणीं इच्छा उत्पन्न झाली तेथें वीतरागता राहत नाहीं म्हणून वरील आपलें म्हणणें योग्य नाहीं.

पुन: श्वेताम्बरमताम्नायास आमचा असा प्रश्न आहे कीं, केवली आहार घेतात असें तुम्ही म्हणता पण त्याचा क्रम कसा आहे? दिवसांतून एकदा कीं अनेकदा? किंवा महिन्यांतून एकदा, दोनदा, चारदा? जो कांहीं तुम्ही आपल्या समजुतीनें क्रम ठरविला असेल तो सांगा. ज्या मानानें क्रम दाखवाल त्याच मानानें केवलीस शक्ति राहिली तर पुढें शक्ति कमी झाल्यानंतर पुन: भोजन करणें प्राप्त झालें. भोजनाच्या आश्रयानें बल राहिलें. मग केवलींना अनंत बल आहे असें म्हणणें खोटें ठरलें.

केवली क्षुधेचा उपशम करण्याकरितां भोजनाचा स्वाद घेतात असें एक तुमचें म्हणणें आहे. त्यावर आम्ही विचारितों कीं, तो स्वाद रसनेन्द्रियानें घेतात कीं केवलज्ञानानें घेतात? जर केवलज्ञानानें स्वाद घेत असतील तर दूर क्षेत्रांत असलेल्या भोजनाचाही त्यांना स्वाद घेतां येईल मग कवलाहाराचें तरी काय प्रयोजन? जर रसनेन्द्रियानें स्वाद घेतात असें मानावें तर मतिज्ञानाचा प्रसंग प्राप्त होतो. कारण इन्द्रियानें पाहणें, ऐकणें, स्वाद घेणें, स्पर्श करणें, विचार करणें यास मतिज्ञान म्हणतात. हेंही असूं द्या. तुम्ही म्हणता सर्वज्ञपणा व कवलाहार यांत विरोध नाहीं. कारण ज्याप्रमाणें आहार करीत असलेल्या माणसांना ज्ञान कमी आहे असें म्हणतां येत नाहीं त्याचप्रमाणें कवलाहार करणाऱ्या भगवंताला सर्वज्ञपणा नाहीं अथवा केवलज्ञान नाहीं असें म्हणतां येत नाहीं. यावर उलट आम्ही तुम्हांस असें विचारितों कीं, द्रव्य, आभरण, वाहन, काम व विषयोपभोग यामध्येंहि सर्वज्ञपणाला विरोध येत नाहीं. म्हणजे सर्वज्ञपणा असतांना वरच्या तुमच्या म्हणण्याप्रमाणें हेही असण्यास कांहीं हरकत नाहीं. यावर तुम्ही म्हणाल कीं, सर्वज्ञाला मोहाच्या उदयाचा अभाव आहे. म्हणून द्रव्य, वस्त्राभरणाची त्यांना इच्छा होत नाहीं. पण असातावेदनीय कर्माचा उदय विद्यमान असल्यानें भोजनाची मात्र तशी इच्छा होते. कर्माची शक्ति वेगवेगळी आहे हें तुम्ही जाणतच आहा. सर्व कर्मांची शक्ति एकसारखी असती तर त्यांत भेद होते ना. यावर आमचें उत्तर आहे कीं, आपण मोहाचा अभाव मानतां त्या अर्थी घास उचलून मुखांत देणें, तो चावणें, गिळणें ही इच्छा कशापासून झाली? जर अन्तराय कर्माचा अभाव झाल्यानें इच्छेशिवाय मुखांत घास येऊन पडतो असें म्हणाल तर अन्तराय कर्माचा अभाव भोगोपभोग, कामसेवनादिकांचें ग्रहण कां करविणार नाहीं? यांचें ग्रहण करण्यानें व्रतभंग होतो, दीक्षेचा भंग होतो, साधुपणा नष्ट होतो, परन्तु आहार घेण्यानें व्रत-दीक्षेचा भंग होत नाहीं. उलट साधूच्या धर्माला कारण अशी देहाची स्थिति राहू शकते असें म्हणाल तर तुमच्या मतामध्यें व्रत धारण करण्यापासून अथवा दीक्षा ग्रहण केल्यापासून केवलज्ञान होतें असा नियमच नाहीं. मल्लिकुमारिकेला गृहस्थावस्थेंतच केवलज्ञान झालें असें तुम्ही म्हणता. भरतचक्रवर्तीना सहा खंडाच्या राज्याचा उपभोग घेत असतां आरसेमहालांत केवलज्ञान झालें. मरुदेवी हत्तीवर चढली व पुत्राचा शोक करीत असतांनाच तिला

गृहस्थालाही मोक्षप्राप्ति होते यांचें खंडन

केवलज्ञान झालें. वेळूवर चढलेल्या नटाला केवलज्ञान झालें. उपासऱ्यामध्यें दासीला केवलज्ञान झालें. गृहस्थाला, स्त्रीला, अन्यधर्मी कोणाही भेषधाऱ्याला, संन्याशाला, त्रिदंड्याला, फकीराला, जटाधाऱ्याला, मुंडन करविणाराला, हरिणाचें व वाघाचें कातडें पांघरणाऱ्याला, फार काय वाटेल त्याला मोक्षप्राप्ति तुमच्या धर्मांत ठेविली आहे. सम्पूर्ण प्राणिमात्राला मग तो न्हावी असो, खाटीक असो, परीट असो, चांडाल असो, कोणीही असो त्यास मोक्ष होतो असें तुमचें मत आहे. हृषीकेश चांडालाला केवलज्ञान होऊन मोक्षप्राप्ति झाली असें तुम्ही लिहून ठेविलें. तुम्हाला व्रत, दीक्षा, आचरण वगैरे गोष्टींचें मुळींच प्रयोजन नाहीं. तुमच्यांत गृहस्थाला प्रथम केवलज्ञान होतें व मागाहून दीक्षा घ्यावी लागते, मग यतिपणा प्राप्त होतो असें वर्णन आहे. सर्वज्ञपणा प्राप्त झाल्यानंतर मागाहून दीक्षा देण्यांत तुम्ही कोणतें प्रयोजन साधिलें कोण जाणें? गृहस्थाला वा अन्य कुलिंगी भेषधाऱ्याला मोक्ष झाल्यानंतर मग तुमचें तें दीक्षाग्रहण व मुखपट्टबन्धन, दण्डग्रहण, बोधिपात्र ग्रहण हें सर्व निरर्थक होईल याची वाट काय? याप्रमाणें एक नाहीं पण हजारों दोष तुमच्या मतांत दिसून येतात. याशिवाय तुम्ही म्हणतां कीं, असातावेदनीय कर्माच्या उदयानें केवलीला क्षुधा, तृषा, मलमूत्रादिक दोष उत्पन्न होतात. परन्तु असें मुळींच शक्य नाहीं. क्षुधा ही असातावेदनीय कर्माच्या उदीरणेपासून उत्पन्न होत असते व या उदीरणेची व्युच्छित्ति (नाश) साहव्या गुणस्थानांत होते. यामुळें सातव्या गुणस्थानापासून पुढें क्षुधा वगैरे वेदनांचा अभाव असतो.

असातावेदनीय क्षुधा उत्पन्न करीत नाहीं

ज्या वेळीं मुनीश्वर सातिशय अप्रमत्तगुणस्थानामध्यें अधःकरण करीत असतात तेव्हां प्रारंभीं चार आवश्यकें करीत असतात. प्रथमतः त्यांचे प्रत्येक समयाला अनंतपटीनें परिणाम शुद्ध होत जातात. नंतर स्थितिबंधाचें अपसरण होतें म्हणजे स्थितिबंध कमी कमी होत जातो व सातावेदनीयादि पुण्यप्रकृतिमध्यें अनंतपटीनें रसाची वृद्धि होते व शेवटीं असातादि अशुभ प्रकृतींचा रस अनन्तपटीनें कमी होत जातो. पापकर्मांची विष व हालाहलरूप जी तीव्रतर व तीव्रतम शक्ति असते ती नष्ट होऊन त्यांचे निंब व कांजीरासारखें परिणमन होतें अर्थात् ती शक्ति मंद व मंदतर होते. यानंतर अपूर्वकरणामध्यें १ गुणश्रेणिनिर्जरा, २ गुणसंक्रमण, ३ स्थितिखंडन व ४ अनुभागखण्डन ही चार आवश्यकें होतात. या अधःकरण व अपूर्वकरणांतील परिणामांच्या प्रभावानें असातादि अप्रशस्त प्रकृतींच्या रसाला असंख्यातवेळां अनंताचा भाग दिल्यानें त्या रसाची शक्ति इतकी क्षीण होऊन जातें कीं, तो असाताचा रस घातिकर्माचें साहाय्य न राहिल्यानें क्षुधापरीषह उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहीं. याविषयीं गोम्मटसारांत असें लिहिलें आहे—

**समयट्ठिदिगो बंधो सादस्सुदयप्पगो जदो तस्स।**
**तेणासादस्सुदओ सादसरूवेण परिणमदि ॥ १ ॥**
**एदेण कारणेण दु सादस्सेव दु णिरंतरो उदओ।**
**तेणासादणिमित्ता परीसहा जिणवरे णत्थि ॥ २ ॥**

**णट्ठा य रायदोसा इंदियणाणं च केवलिम्हि जदो ।**
**तेण दु सादासादज-सुहदुक्खं णत्थि इंदियजं ॥ ३ ॥**

**अर्थ–** पूर्वी बांधिलेल्या असाता वेदनीय कर्माला असंख्यात वेळां अनंतावा भाग दिल्यानें त्या कर्मांतील फल देण्याची शक्ति अगदीं मंद झाली, त्यामुळें नवीन असाताचा बंध होत नाहीं. कारण सातव्या गुणस्थानापासून सातावेदनीयाचा नवीन बंध होतो, असाताचा होत नाहीं. केवलीला साता-कर्माचा बंध होतो तो एक समयमात्राचा होतो. तथापि त्याचा निरंतर उदय राहत असल्यामुळें असाताचा उदय सातास्वरूपी बनतो.

**भावार्थ –** भगवंताला साता-कर्माचा उदय नेहमीं असतो व तें साताकर्म शक्य तितकी सुखवृद्धि करण्याचें कार्य करीत असतें व इकडे असाता वेदनीय कर्म जास्त जास्त निःसत्त्व होऊन जातें. त्यामुळें समुद्रामध्यें विषाचा एक थेंब पडला असतां तो जसा सर्व समुद्रास बिघडवून टाकण्यास समर्थ होत नाहीं तद्वत् अनंतपटीनें सुखोत्पादनाचें कार्य करीत असलेल्या साताकर्माच्या उदयावस्थेंत असातेचा किंचित्सा पण निःसत्त्व उदय प्रभूंना क्षुधेची वेदना उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहीं. म्हणून असातेच्या उदयानें उत्पन्न होणारा परीषह जिनेन्द्राला नाहीं. भगवंताचे राग द्वेष नष्ट झाले व इन्द्रियजनित ज्ञानाचा अभाव झाला, त्याअर्थी साता असाता यापासून उत्पन्न होणारें इन्द्रियजन्य सुखदुःख हेंही त्यास होत नाहीं. अतिमंद असलेले असाता वेदनीय आपलें कार्य करण्यास समर्थ नाहीं. कारण ज्याप्रमाणें मंद उदयरूप संज्वलन कषाय अप्रमत्तादि-गुणस्थानांत प्रमाद उत्पन्न करूं शकत नाहीं; अथवा जशी अतितीव्रवेदाच्या उदयानें उत्पन्न झालेली मैथुनसंज्ञा ही नवव्या गुणस्थानांत वेदाचा मंद उदय असल्यामुळें त्या ठिकाणीं उत्पन्न होत नाहीं; अथवा निद्राप्रचलेचा उदय बाराव्या गुणस्थानांत शेवटच्या दोन समयापर्यन्त असूनही उदीरणेवांचून तो निद्रा आणण्यास समर्थ होत नाहीं; परंतु जागृत अवस्था असल्यां वाचून आत्मानुभवरूप ध्यानही होऊं देत नाहीं. त्याप्रमाणें असाता कर्म उदीरणेशिवाय क्षुधातृषादिक उत्पन्न करू शकत नाहीं. एवढ्यानें आपलें समाधान होत नसेल तर आणखी असें पहा कीं, अप्रमत्त अशा साधूंनीं आहाराची नुसती इच्छा केली तरी त्यांना प्रमत्तपणा प्राप्त होतो पण भोजन करणाऱ्या तुमच्या केवलीला प्रमत्तपणा प्राप्त होत नाहीं हें मोठें आश्चर्य आहे. केवली भगवान् त्रैलोक्यांतील सर्व चराचर वस्तूंना युगपत् पाहणारे असून त्यांना ताडन, मारण, छेदन, भेदन, ज्वालन, मद्य, मांस वगैरे अशुचि पदार्थ दिसत असतात. असें असूनही ते भोजन कसें करितात? अल्पशक्तिधारक असा गृहस्थ देखील वरील निंद्य पदार्थ पाहून अंतराय मानतो व तात्काल भोजनाचा त्याग करितो. मग केवली अंतराय न पाळतील तर सामान्य गृहस्थाहून देखील त्यांची भोजनावरील आसक्ति दृढ असली पाहिजे व शक्तिही कमी असली पाहिजे असें मानावें लागेल व असें मानिलें तर त्यांची अनंत शक्ति कोठें राहिली? ज्यास क्षुधेची वेदना राहिली त्यास अनंतसुख तरी कोठचें? क्षुधेसारखी प्रबल वेदना जगांत दुसरी नाहीं. जर ती सर्वज्ञाला मानली

तर अनंतवीर्य व अनन्तसुख हें त्याठिकाणीं राहत नाहींत. विचार करा, मुनीश्वराला तपश्चरणाच्या प्रभावानें अशा प्रबल ऋद्धि प्राप्त होतात कीं त्यामुळें मनुष्यांना अतर्क्य अशीं कार्यें त्यांना करिता येतात. इतकें सामर्थ्य ऋद्धिधारी मुनीश्वरांना असतांना अनन्तवीर्यधारक असें विशेषण सर्वज्ञाला देऊन त्यांचे ठायीं यःकश्चित् आहाराशिवाय देहाची स्थिति ठेवतां येण्याचें सामर्थ्य नाहीं असें आपण प्रतिपादन करितां हें अगदीं अयोग्य आहे. जर मनुष्याप्रमाणें सर्वज्ञालाही आहार, निद्रा, खेद, स्वेद, रोग, मल, मूत्र आहेत असें मानावें तर सामान्य आत्मा व परमात्मा यांत भेद कोणता राहिला? दुसरें, जगणें हें कांहीं आहारावरच अवलंबून आहे असें नाहीं. तें आयुकर्माच्या उदयावर आहे. जसें—

**णोकम्म कम्माहारो कवलाहारो य लेप्पमाहारो।**
**उज्जमणे वि य कमसो आहारो छव्विहो भणिओ ॥**
**णोकम्मं तित्थयरे कम्मं णारे य माणसो अमरे।**
**कवलाहारो णरपसु उज्जो पक्खी य इगि लेवो ॥**

**अर्थ**—आहार सहा प्रकारचा आहे. कर्म आहार, नोकर्म आहार, कवलाहार, लेपाहार, उज्जाहार आणि मानसिक आहार. भगवान् अरिहन्ताला अन्यजीवांना न संभवणाऱ्या शुभ आणि सूक्ष्म नोकर्म-वर्गणांचें ग्रहण हाच आहार आहे. नारकी जीवांना कर्मांचें भोगणें हाच आहार असतो. चार प्रकारच्या देवांना मानसिक आहार असतो म्हणजे मनांत इच्छा होतांच कण्ठांत अमृत झरूं लागतें व त्यापासून त्यांची तृप्ति होते. मनुष्य व पशु यांना कवलाहार आहे. पक्ष्यांना अंड्यांत असतांना मातेच्या उदराचा उबारा असतो तोच ओजाहार होय. एकेन्द्रियादि पृथ्वी वगैरेंना लेप हाच आहार असतो. म्हणजे पृथ्वी पाणी वगैरेंचा जो स्पर्श होतो तोच त्यांचा आहार असतो.

भोगभूमींतील औदारिक देह धारण करणाऱ्या मनुष्यांचें शरीर तीन कोस प्रमाणाचें असून ते फक्त आवळ्या एवढा आहार तीन दिवसाआड घेतात, यावरून कवलाहारानेंच शरीर राहतें असा नियम दिसून येत नाहीं. केवळ आहारक या शब्दावरूनच जर कवलाहारी ठरवावयाचें तर सयोगी या शब्दानें मनाचें अस्तित्व, प्राण या शब्दानें पंचेन्द्रियांचें अस्तित्व, शुक्ललेश्या या शब्दानें कषायांचें अस्तित्व मान्य करावें लागेल. जिनेश्वराला अकरा परीषह आहेत ते औपचारिक आहेत, म्हणजे वेदनीय कर्म विद्यमान आहे म्हणून ते आहेत एवढाच त्याचा अर्थ घ्यावयाचा. मंत्रानें अथवा औषधीच्या प्रभावानें विषाची शक्ति नाहींशी केली असतां तें जसें प्राणहरण करण्यास समर्थ होत नाहीं, तद्वत् शक्तिविरहित असाता वेदनीय कर्म भगवंताला क्षुधा उत्पन्न करूं शकत नाहीं. कारण मणि, मंत्र, औषधि, विद्या व ऋद्धि वगैरे पदार्थांत अतर्क्य शक्ति आहे.

श्वेतांबरमतवाद्यांनीं कल्पितसूत्रें रचून अनेक प्रकारची असंभाव्य रचना केली आहे त्यापैकीं कांहीं उदाहरणें पहा.

कल्पित सूत्रांतील असंभाव्य रचना

गोशाळ म्हणून कोणी एक गारोडी होता. त्यानें महावीरस्वामी पाशीं दीक्षा घेतली. पुढें त्यास विद्येचा अतिगर्व चढला. त्यानें महावीर स्वामीशीं वादविवाद केला. त्यांत त्याचा पराभव झाला. म्हणून त्यास फार क्रोध उत्पन्न झाला. व त्या आवेशांत त्यानें भगवंतावर समवसरणांत एक तेजोलेश्या ( अग्नि ) सोडली. त्या समवसरणांत दोन मुनि सिंहासनाखालीं दग्ध झाले. एवढेंच नव्हें तर तैजसऋद्धिपासून उत्पन्न झालेली अग्निज्वाला भगवंतापर्यंत जाऊन पोहोंचली. त्या ज्वालेनें भगवंताला अतिशय उपसर्ग झाला. अग्नीच्या उष्णतेनें भगवंताला आमातिसाराचा व्याधि उत्पन्न झाला. तो सहा महिनेपर्यन्त राहिला. पुढें त्यांनीं केवलज्ञानानें जाणून आपल्या शिष्याला सांगितलें कीं, "अमुक एका शेटजींच्या घरीं जाऊन एका पक्ष्याचें पक्व मांस घेऊन ये. तें भक्षण केल्यानें माझा रोग नाहींसा होईल. असें सांगून तें मांस आणवून भक्षण केलें व आपण रोगमुक्त झाले. त्यावेळीं भगवान् ह्मणाले, अरे मी न समजतां अशा कुपात्राला दीक्षा दिली." याप्रमाणें केवलीवर अवर्णवाद ( खोटा दोषरोप ) केला आहे. तसेंच उत्पन्न होतांच ज्या श्रीरजिनेन्द्राला तीन ज्ञानें होतीं, तो जिनेन्द्र चटशालेंत [ पाठशालेंत ] शिकला; तीर्थंकर दीक्षा घेतांना नग्न असतात परंतु मागाहून इन्द्र त्यांच्या खांद्यावर वस्त्र टाकतो त्यावेळीं ते ग्रहण करितात; जिनेश्वराची वाणी निष्फळ झाली, कारण गणधराशिवाय ती कोणीच मानिली नाहीं. आदिनाथ जुळे आहेत; कोणी एक युगल मरण पावला तेव्हां त्याची स्त्री सुनंदा विधवा झाली. तिच्याशीं ऋषभदेवांनीं पुनर्विवाह केला.

महावीर जिनांनीं प्रथमतः देवानंदा नामक ब्राह्मणीच्या गर्भांत अवतार घेतला त्या ठिकाणीं ते ऐंशी दिवस राहिले. त्यानंतर इन्द्रानें विचार केला कीं, अशा नीचें कुलांत भगवंताचा जन्म होणें योग्य नाहीं ह्मणून त्यानें हिरण्यगवेषी देवाला आज्ञा केली कीं तुह्मीं भगवंताला देवानंदेच्या गर्भांतून काढून सिद्धार्थराजाच्या त्रिशलाराणीच्या गर्भांत आणून ठेवा. आज्ञेप्रमाणें देवानें तसें केलें वगैरे वगैरे. या ठिकाणीं विचार करा कीं, जीव आपआपल्या कर्माप्रमाणें उच्चनीच कुलांत जन्म घेत असतांना तो देवादिकांना कसा फेरता येईल? परंतु ज्याला मिथ्यादर्शनाचा उदय झाला आहे तो काय वर्णन करील याचा नेम नाहीं.

ते आणखी कसल्या विरोधी गोष्टी लिहितात पहा– तीर्थंकर केवलीला सामान्य केवली नमस्कार करितात. बाहुबलीनीं ऋषभदेवाला नमस्कार केला हें म्हणणें चुकीचें आहे. कारण सातव्या गुणस्थानापासून वंद्यवंदक भाव नाहीं. ज्या ठिकाणीं आत्मस्वभावाचा अनुभव असावयाचा तेथें तसा भाव कोठून असणार? जो कृतकृत्य, भगवान् सर्वज्ञ देव झाला त्यास इतरास नमस्कार करण्याचें

---

(टीप) १ श्वेतांबरांनीं ब्राह्मण हे नीच कुली आहेत असें म्हटलें आहे.
हेमचंद्र कृत त्रिषष्टिशलाका-पुरुषचरित्र. पर्व १०

प्रयोजन काय ? 'वंदन करण्यायोग्य परमेष्ठी व वन्दन करणारा मी' असा भाव सहाव्या गुणस्थानांपर्यंतच असतो. याशिवाय ते असें म्हणतात कीं, कोणी एक स्कंधक नांवाचा त्रिदण्डी संन्यासी आपणाकडे येत आहे असें पाहून वीरजिनेश्वरांनीं गौतमगणधरांस सांगितलें कीं, 'हा समोर स्कंधक संन्यासी येत आहे तो मोठा जबर आहे. तुमचा याचा मेळ बसेल. तुम्ही समोर जाऊन त्यास घेऊन या' यावरून गौतमगणधर मोठ्या भक्तीनें सामोरे जाऊन त्यास घेऊन आले व त्याचा आदरसत्कार केला. अव्रतसम्यग्दृष्टि देखिल कुलिंगी साधूचा सन्मान करीत नाहीं, मग महाव्रती गणधर कसा करतील ?

स्त्रीला पांचव्या गुणस्थानाशिवाय पुढचीं गुणस्थानें होत नाहींत. पहिलीं तीन संहननें नाहींत, अहमिन्द्र–लोक–प्राप्ति नाहीं व ती सातव्या नरकांत जात नाहीं. मग अशा स्त्रीला मुक्ति होते असें कसें म्हणतां येईल ? मल्लिनाथ जिनेश्वराला त्यांनीं स्त्री मानिलें आहे. इतकेंच नव्हे तर तिची प्रतिमा पुरुषस्वरूपाची बनवून ते पूजन करितात. हें कसें ?

कोणा एका हरिक्षेत्रांत राहणाऱ्या भोगभूमिज मनुष्याला, ज्याचें शरीर दोन कोस उंचीचें होतें, त्यास त्याच्या पूर्वजन्मीच्या एका शत्रूनें हरण करून आणिलें; त्याचें दोन कोस शरीर लहान करून त्यास भरतक्षेत्रांतील मथुरेचें राज्य दिलें व त्यास मांस भक्षण करावयास लावून नरकास पोचविलें. त्यापासून हरिवंशाची उत्पत्ति झाली असें त्यांनीं मानिलें आहे. अशा कल्पनेला कांहीं मर्यादा राहत नाहीं. दोन कोसाचा देह लहान कसा केला ? त्यास वरून छेदिलें कीं खालून छेदिलें ? याचें उत्तर त्यांना देतां येणार नाहीं. हें असो. भोगभूमींतील सर्व जीव देवगतींत उत्पन्न होतात. तेथील स्त्रीपुरुषांच्या उत्पत्तीचें प्रमाण ठरलेलें आहे. मातापित्याचा अन्त होण्यापूर्वी त्यांची उत्पत्ति होत असते असें त्यांनीं मानिलें आहे. पण याप्रमाणें अनंतकाल गेल्यानंतर एक एक जीव कमी होतो असें ते म्हणतात. यामुळें भोगभूमि ओस पडेल त्याची वाट काय? असें होणें अशक्य. परन्तु मिथ्यादृष्टि पुरुषांच्या बुद्धीला अन्त नाहीं. ते वाटेल तसें बोलतील व लिहून ठेवितील.

सहा द्रव्यांचें वर्णन करावयाचें परंतु त्यांतून काल हें द्रव्य नसून सतत बदलणाऱ्या समय, घटिका यांना त्यांनीं काल म्हटलें आहे.

साधूंची निन्दा करणारा जो असेल त्यास मारण्यांत पाप नाहीं. देव, गुरु, धर्माचा द्रोह करणारा चक्रवर्ती जरी असला तरी त्याच्या सैन्याचा विध्वंस साधूंनीं करावा, त्यांत त्यास पाप, नाहीं. आपणांत ऋद्धि वगैरेचें सामर्थ्य असतांना तो जर त्यास मारणार नाहीं तर तो साधु अनन्तसंसारी म्हणावा, असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. अशा पापी साधूला साम्य–भाव कसला व वीतरागता तरी कोठली ?

असें असंबद्ध लिहून यांनीं मोठमोठ्या शीलवान् पुरुषांना दोष लावूनही ते निर्दोषी आहेत असेंच प्रतिपादन केलें आहे. भरतचक्रवर्तीनें आपल्या ब्राह्मी नामक बहिणीशीं लग्न लाविलें. द्रौपदीला पांच पति होते व पांच पति असूनही ती साध्वी होती. पांच पति असूनही द्रौपदी

साध्वी कशी होऊं शकते? असें कोणी विचारल्यास ते उत्तर देतात, एखाद्या राजानें शंभर स्त्रियांशीं लग्न लाविलें म्हणून तो शीलवान् नव्हे काय? जसें पुरुषानें कांहीं नियमित स्त्रिया करण्याचा नियम केला असल्यास त्याचें शील नाहींसें होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें स्त्रीनेंही कांहीं नियमित पुरुषांचा नियम केल्यास तिचें शीलव्रत नाहींसें होत नाहीं.

देव व मनुष्यामध्यें कामसेवन होऊं शकतें असेंही हे म्हणतात. पण वैक्रियिकदेह धारण करणारे देव व सप्तधातुमयी मलिन देहधारी मनुष्यामध्यें संयोग होत नाहीं, याचा विचार करितो कोण? उपोषण असेल व दुसऱ्या साधूचें भोजन होऊन त्यापैकीं कांहीं अन्न शिल्लक राहिलें असेल तें जर गुरूच्या आज्ञेनें त्या उपोषणधारी साधूनें ग्रहण केलें तर त्यांत व्रतभंगाचा दोष येत नाहीं. उपवासांत औषध भक्षण करण्यानें उपवास-भंग होत नाहीं. समवसरणांत जिनेश्वर नग्नमुद्रेनेंच बसलेले असतात, परंतु ते वस्त्र पांघरल्याप्रमाणें दिसतात. साधु यतींनीं काठी, पात्र, वस्त्र वगैरे चौदा उपकरणें ठेवणें हा धर्म आहे. चाण्डालाला मुक्ति होते. महावीरस्वामीच्या समवसरणांत सूर्यचन्द्र आपल्या विमानासह आले होते. (शाश्वतगतीच्या मर्यादेचा हा भंग आहे). साधूचें मन कामवेदनेनें चंचल झाल्यास आपली स्त्री देऊन त्याची वेदना शांत करावी. गंगादेवीशीं पंचावन हजार वर्षेपर्यंत भरतचक्रवर्तीनें कामसेवन केलें. भोगभूमीचे युगल मलमूत्रधारी आहेत. त्यांचा अन्त होतो तेव्हां त्यांच्या तीन कोसप्रमाण शरीराला देवता उचलून नेतात व भैरुंड नामक पक्ष्याकडून तो खाववितात. यादवादिक सर्व क्षत्रिय मांसभक्षी होते. गौतमगणधर आनंदनामक श्रावकाच्या घरीं कुशलवृत्त विचारण्याकरितां गेले असतां खोटें बोलले. महावीर जिनांनीं जन्मकालीं मेरुपर्वत कम्पायमान केला. कातड्यांत ठेवलेलें तूप व पाणी पवित्र असतें. याप्रमाणें हजारो विपरीत व अनर्थकारक विषयांचें प्रतिपादन करून त्यांनीं कल्पितसूत्रांची रचना केली आहे त्यांचें येथें कोठपर्यन्त वर्णन करावें? त्यांच्या धर्माची सामान्यतः कल्पना येण्याकरितां वरील कांहीं उतारे दिले आहेत.

या श्वेताम्बरी मतामध्यें ढूंढया म्हणून एक पंथ आहे. तो प्रतिमेला नमस्कार वगैरे करूं नये असें म्हणतो. कारण प्रतिमा ही पाषाणाची असून पाषाण हा एकेन्द्रिय आहे. त्यापुढें आपण पंचेन्द्रिय असून नमस्कार करणें, पूजन करणें, भक्तीनें नाचणें वगैरे क्रियेपासून शुभगति कशी प्राप्त होईल? आपलें कल्याण करून घेणें असेल तर आमच्या साधूचें दर्शन घ्यावें म्हणजे झालें असें त्यांचें म्हणणें आहे. त्यावर त्यांना असा प्रश्न आहे कीं, मलमूत्रादिकांनीं भरलेल्या परन्तु चर्मानें आच्छादिलेल्या तुमच्या देहाचें दर्शन घेतल्यानें काय प्राप्त होणार? तुम्हास आत्मज्ञान नाहीं. जगांतील सर्व अभक्ष्य वस्तु भक्षण करणाऱ्या तुमचें दर्शन पापबंधाचें कारण आहे. तुमच्या कल्पितसूत्राचें श्रवण सम्यक्त्वाचा नाश करणारें आहे. तें पापबंधाचें कारण आहे. याच्या उलट आमच्या जिनेन्द्राच्या धातु-पाषाणाच्या प्रतिबिंबाचें दर्शन केलें तर परमवीतराग सर्वज्ञाचें ध्यान प्रगट होतें व परमशांत शुभोपयोग प्रगट होतो. तुमच्या पापमयी देहाच्या दर्शनानें पापाचा बंध होतो. तुम्ही रागद्वेष

ढूंढया-मतदिग्दर्शन

कषायादि पापमलानें भरलेले, अभक्ष्य व आहाराचे लंपटी, हिंसादि-पापकार्यांत सदैव रत, इतर जीवांना मिथ्यामार्गास लावणारे आहांत. त्या तुमच्या दर्शनानें काय प्राप्त होणार ! उलट तुमच्या म्हणण्याप्रमाणें वागणाऱ्याला सत्तर कोडाकोडी सागरापर्यन्तचा मोहनीयकर्माचा बंध होईल.

कलिकालांत जैनधर्माच्या सत्यस्वरूपाला श्वेतांबर लोकांनीं किती बिघडून टाकिलें आहे यांचें थोडक्यांत ज्ञान व्हावें म्हणून प्रसंगोपात्त या ठिकाणीं थोडेसें दिग्दर्शन केलें आहे, त्यावरून त्यांच्याठायीं सत्यार्थ आप्तपणा कसा संभवेल याचा वाचकांनीं विचार करावा.

याचप्रमाणें ज्यांचे देव प्रत्यक्ष भयभीत झाल्यासारखे दिसत आहेत. त्यांनीं भीतिमुळें आपल्या हातीं चक्र, दंड, त्रिशूल, खड्ग धारण केलें आहे. ते कामवेदनेनें स्त्रीच्या स्वाधीन होऊन राहिले आहेत. त्यांच्या ठिकाणीं क्षुधा, तृषा, काम, राग, द्वेष, निद्रा, वैर, विरोध वगैरे प्रत्यक्ष दिसून येत आहेत. अशा स्थितींत ते निर्दोष आहेत हें कसें मानावें ? तसेंच ज्यांना इंद्रियज्ञानाहून पलिकडचें ज्ञान अझून झालें नाहीं त्यांना सर्वज्ञपणा अथवा आप्तपणा तरी कसा प्राप्त होईल ? सारांश, सर्वज्ञ वीतराग परमहितोपदेशकाशिवाय दुसरा कोणीहि खरा देव असूं शकत नाहीं.

आतां पूर्वापरविरोधादि दोष ज्यांत नाहींत व जो सत्यार्थ पदार्थांचा उपदेश देणारा शास्ता आहे त्याचीं खरीं नांवें किती तें सांगतात.

**शास्त्याचीं नांवें**

**परमेष्ठी परञ्ज्योतिर्विरागो विमलः कृती ।**
**सर्वज्ञोऽनादिमध्यान्तः सार्वः शास्तोपलाल्यते ॥ ७ ॥**

**अर्थ**-परमेष्ठी, परंज्योति, विराग, विमल, कृती, सर्वज्ञ, अनादिमध्यान्त आणि सार्व हीं सार्थक आठ नांवें ज्याला आहेत तो शास्ता होय अथवा त्यालाच आप्त म्हणावें. इन्द्रादिकांनीं वन्द्य अशा परमात्मस्वरूपांत जो राहतो त्यास परमेष्ठी ह्मणतात. परमेष्ठीला अन्तरंग घातिकर्मांच्या नाशामुळें अनन्तज्ञानदर्शनसुखवीर्यस्वरूपी निर्विकार अविनाशी परमात्मस्वरूप प्राप्त होतें, व त्या स्वरूपांत तो विराजमान होतो. बाह्यतः इन्द्रादिक असंख्यात देव ज्याला नमस्कार करितात, जो समवसरणांत सभेच्या मध्यभागीं तीन पीठावर असणाऱ्या तेजःपुंज सिंहासनावर चार अंगुलें अधर विराजमान असतो, ज्यावर तीन छत्रें असतात व चौसष्ट चामरें ढाळिलीं जातात व समवसरणाच्या दिव्य संपदेनें ज्याची अपरिमित शोभा दिसते; जो इन्द्रादिक देवांना व मुमुक्षुजीवांना धर्मोपदेशरूपी अमृताचें पान करवून त्यांना जन्ममरणापासून सोडवितो तो आप्त व त्यास परमेष्ठी म्हणावें. कर्मांच्या अधीन झाल्यामुळें इंद्रिय-कामभोगादि विषयामध्यें आणि विनाशिक राज्यसंपदेमध्यें जे मग्न होऊन गेले, जे स्त्रियांच्या अधीन झाले व जे विषयांनीं सन्त्रस्त झाले आहेत, त्यांचे ठायीं परमेष्ठीपणा संभवत नाहीं. परंज्योति-परं म्हणजे आवरणरहित, ज्योतिः म्हणजे ज्ञान. ज्यांच्या अतीन्द्रिय अशा अनन्तज्ञानांत लोकालोकवर्ति सम्पूर्ण पदार्थ आपल्या त्रिकालवर्ति अनन्तगुणपर्यायासह युगपत् (एकाच वेळीं)

प्रतिबिंबित होतात ते भगवान् परंज्योतिःस्वरूप आप्त होत. त्यावांचून अन्य, ज्यांना इन्द्रियजनित ज्ञान आहे व अल्पक्षेत्रांतील कांहीं थोड्याशा पदार्थांना जे अनुक्रमानें जाणूं शकतात त्यांना परंज्योति म्हणतां येत नाहीं. ज्यांनीं मोहनीय कर्माचा नाश केल्यामुळें सर्व परवस्तुवरील रागद्वेषाचा अभाव केला, ज्यांना इच्छा नाहींशी झाल्यामुळें वीतरागता प्राप्त झाली व त्यामुळें ज्यांनीं पदार्थाच्या यथार्थ स्वरूपाला जाणिलें, अशा त्यांनीं कोणत्या वस्तूवर रागद्वेष करावा ? वस्तूचा जसा स्वभाव आहे तसाच रागद्वेषरहित होऊन ज्यानें जाणिला, त्यालाच वितराग अथवा अर्हन्त व आप्त म्हणावयाचें. जो कामी, विषयासक्त, गाणें बजावणें नृत्य इत्यादिकामध्यें मग्न, जगांतील सर्व स्त्रियांना खुष ठेवण्याकरितां व सर्व शत्रूंना नष्ट करून आपला शूरपणा प्रगट व्हावा अशी इच्छा करणारा असेल त्याला वीतराग म्हणतां येणार नाहीं.

विमल--ज्याचे काम, क्रोध, मान, मायादिक भावमल नाहींसे झाले आणि ज्ञानावरणादि कर्ममल नष्ट झाले व निगोदरहित परमौदारिक, छायाविरहित, कान्तिमान्, क्षुधा, तृषा, रोग, निद्रा, इत्यादिकांनीं रहित अशा शरीरामध्यें जो राहतो तो अरहंत भगवान् विमल म्हणावा. इतर काम क्रोधादि दोषांनीं-भरलेले ते विमल नव्हेत.

कृती-- ज्यांना करावयाचें शिल्लक राहिलें नाहीं ते. ज्यांनीं शुद्ध अनंतज्ञानस्वरूपी आत्मा जाणला ते कृत्यकृत्य होत. अर्थात् ही अवस्था भगवान् आप्तांनाच प्राप्त होते. ज्यांनीं चक्र, त्रिशूल, गदा वगैरे शस्त्रें आपणाजवळ ठेविलीं, जे कनककामिनीमध्यें आसक्त झाले व जे जन्म, जरा, मरणापासून सुटले नाहींत त्यांना कृती म्हणतां येणार नाहीं.

सर्वज्ञ-- कोणाच्याही सहाय्याशिवाय एकाच कालीं संपूर्ण द्रव्यगुणपर्यायांना प्रत्यक्ष जाणणारा असा भगवान् आप्त हाच सर्वज्ञ होऊं शकतो. इतरांना इन्द्रियाधीन ज्ञान आहे म्हणून ते सर्वज्ञ नाहींत.

अनादिमध्यान्त-- ज्यांना जीवद्रव्याच्या अपेक्षेनें व ज्ञानदर्शन-सुखवीर्यांच्या अपेक्षेनें आदि, मध्य व अन्त नाहीं तो अनादिमध्यान्त म्हणावा. अथवा भगवान् आप्त अनादिकालापासून आहेत व त्यांचा कधींही अन्त होणार नाहीं म्हणून तेच अनादिमध्यान्त आहेत. 'जीवाला जन्ममरणाचे फेरे कधींही चुकणारे नाहींत अथवा कांहीं काल जीव मुक्त झाला तरी तो पुनः संसारांत येणारच त्याशिवाय गति नाहीं. जीव हा निराळा व ज्ञानादिगुण निराळे. ते गुण जीवाला मागून प्राप्त होतात.' हे व असे अनेक सिद्धान्त ज्यांनीं मानले आहेत त्यांना अनादिमध्यान्तता तरी कशी प्राप्त होणार ?

सार्व-- ज्यांच्या वचनाची अथवा शरीराची प्रवृत्ति सर्व जीवांच्या हिताकरितांच झाली त्या अरिहंत भगवन्तालाच सार्व म्हणतात. इतर जे काम, क्रोध, संग्राम वगैरे हिंसाप्रधान पापकर्म करून आपल्या व परक्याचे अहिताकरितां प्रवृत्ति करितात अथवा करवितात त्यांना सार्व असें नांव देतां येत नाहीं.

याप्रमाणें आठ सार्थक विशेषणांनीं युक्त शास्ता जो आप्त त्याचें असाधारण लक्षण सांगितलें. शास्ता शब्दाची निरुक्ति अशी आहे. 'शास्तीति शास्ता' म्हणजे शिष्य, जे निकट भव्य अर्थात् मुमुक्षु त्यांना हितरूप शिक्षा ( उपदेश ) देणारा तो शास्ता म्हणावा.

यापुढें शास्ता म्हणजे आप्त हा सत्पुरुषांना स्वर्गमुक्ति प्राप्त करून देणारा उपदेश करीत असतां त्यापासून आपली प्रसिद्धि, सन्मान वगैरे कशाचीही इच्छा करीत नाहीं असें दाखवितात—

शास्त्याचा हितोपदेश

**अनात्मार्थं विना रागैः शास्ता शास्ति सतो हितम् ।**
**ध्वनन् शिल्पिकरस्पर्शान्मुरजः किमपेक्षते ॥ ८ ॥**

**अर्थ**– शास्ता म्हणजे धर्मोपदेश करणारे अरिहंत भगवान् आपली ख्याति, लाभ, पूजा वगैरेचें प्रयोजन न ठेवितां, तसेंच शिष्यांवर प्रेम ( रागभाव ) ही न करितां सत्पुरुषांना कल्याणप्रद असा उपदेश करीत असतात. शिल्पीच्या म्हणजे मृदंग वाजविणाऱ्या पुरुषाच्या हस्तस्पर्शानें नानाप्रकारचे शब्द करणारा मृदंग कोणाचीही अपेक्षा करीत नाहीं ?

**विशेषार्थ**– संसारांत लोकांकडून जितकीं कार्यें होतात तीं सर्व आपला अभिमान वाढावा, आपली प्रशंसा व्हावी, आपल्याला अपूर्व लाभ व्हावा या हेतूनेंच होत असतात. परंतु भगवान् अरिहंत मात्र आपल्या कोणत्याही प्रयोजनावांचून फक्त जगांतील जीवांचें कल्याण व्हावें म्हणून उपदेश करित असतात. जसें मेघ हे आपलें कोणतेंही प्रयोजन लोकापासून साध्य करावयाची इच्छा न बाळगितां यथेच्छ जलवर्षाव करितात, त्याचप्रमाणें भगवान् आप्तही लोकांच्या पुण्याच्या निमित्तानें पुण्यप्रदेशांत विहार करून तेथें धर्मरूप अमृताचा उपदेशरूपानें वर्षाव करितात हें योग्यच आहे. कारण सत्पुरुषाचें आचरण हें परोपकारार्थ घडावयाचेंच असा नियम आहे. अथवा ज्याप्रमाणें कल्पवृक्ष, धान्य व आम्रवृक्ष हे परजीवांवर उपकार करण्याकरितांच फलित होतात; पर्वत हे अनेक प्रकारच्या मौल्यवान् रत्नांना, वृक्षांना व पाणी वगैरे पदार्थांना आपली इच्छा नसतांही जगावर उपकार करण्याकरितां धारण करितात; समुद्र रत्नांना व गाई दुधाला त्याच हेतूनें आपल्या पोटांत ठेवितात व दाता परोपकाराकरितांच धनसंचय करितो; त्याचप्रमाणें सत्पुरुष परोपकाराकरितांच आपली वाणी खर्चितात. सारांश जेवढे उपकार करणारे पदार्थ जगांत आहेत तितके सर्व इच्छा केल्याशिवाय लोकांना आपापल्या पुण्यप्रभावानें प्रगट होतात. तसेंच भगवान् आप्त हेही इच्छेवांचून लोकांवर परमोपकार करण्याच्या निमित्तानें धर्मरूप हितोपदेश करितात. यापुढें आगमाचें स्वरूप सांगतात:—

आगमाचें लक्षण

**आप्तोपज्ञमनुल्लंघ्यमदृष्टेष्टविरोधकम् ।**
**तत्त्वोपदेशकृत् सार्वं शास्त्रं कापथघट्टनम् ॥ ९ ॥**

**अर्थ**– जें सर्वज्ञ वीतरागानें सांगितलें असेल, कोणत्याही वादीप्रतिवादींला ज्याचें उल्लंघन करतां येत नसेल, प्रत्यक्ष व अनुमानानें ज्यांत दोष उत्पन्न होत नसेल, तत्त्व म्हणजे वस्तूचें जसें स्वरूप आहे तसेंच ज्यांत वर्णिलें असेल, सर्व जीवांचें जें ऐकिल्यापासून हित होत असेल, आणि मिथ्यामार्गाचें ज्यांत निराकरण केलें असेल तेंच शास्त्र होय.

**विशेषार्थ**– शास्त्राचें लक्षण वर सांगितलें आहे त्याप्रमाणें ज्यांत वर्णन असेल त्यालाच शास्त्र म्हणावें. हल्लीं कालदोषामुळें मिथ्यामार्गाचा उपदेश करणारे पुष्कळ जीव उत्पन्न झाले आहेत. व प्रत्येकानें आपापलें मत स्थापन करण्याकरितां व आपले विषय-कषाय पुष्ट करण्याकरितां अनेक प्रकारचीं खोटीं शास्त्रें रचून सत्यधर्मापासून लोकांना पराङ्मुख केलें आहे. सर्वांनीं आपापला धर्म शास्त्र-परंपरेला अनुसरून आहे म्हणून प्राचीन आहे असें वर्णिलें आहे. शास्त्रावांचून हल्लीं कोणताही धर्म प्रचलित नाहीं. ब्राह्मणांनीं तर आपल्या वेद, स्मृति, पुराणामध्यें हिंसेला प्रधान गणून अश्वमेध, नरमेधादिक यज्ञ करण्यामध्यें आणि जलचर, स्थलचर जीवांची हिंसा करण्यांत धर्म आहे असें प्रतिपादन केलें आहे. भवानी, भैरव, मरिआई वगैरे देव, बकरीं वगैरे जीवांचा वध केल्यानें तृप्त होतात. देवतेला आणि व्यंतरादिक पितरांना मांसपिंड समर्पण केल्यानें धर्म होतो. देवता मांसाहारी आहेत, राजांनीं शिकार करणें हा त्यांचा धर्म आहे वगैरे गोष्टी आपल्या शास्त्रांत लिहून ठेविल्या आहेत व त्याप्रमाणें लोकांची प्रवृत्तिही आहे. हरि, हर, ब्रह्मा हे परमेश्वर आहेत असें वर्णन करावयाचें व हरि गोपस्त्रियांचे ठिकाणीं आसक्त आहे; तो बांसुरी वाजवून नृत्यक्रीडा करतो, गोवर्द्धनाचा नाश करून त्याच्या स्त्रीचें हरण करितो वगैरे अनीतीच्या कथा ग्रंथामध्यें लिहून ठेवावयाच्या व त्या सर्व लोकांनीं मानावयाच्या, हें आश्चर्य आहे.

शास्त्रचिकित्सा

मिथ्याशास्त्र

हर म्हणजे महादेव, त्याचें अर्धें अंग स्त्रीचें व अर्धें अंग पुरुषाचें आहे. तो आपल्या सर्व अंगाला भस्माची उटी लावतो. अनेक प्रकारच्या हत्या करितो व शाप देतो. त्रिशूलादि आयुधें धारण करून लोकांचा संहार करतो वगैरे. या सर्व गोष्टी शास्त्रांत लिहून ठेविल्या आहेत व त्यामुळेंच या खऱ्या आहेत असे लोक मानतात. याहीपेक्षां आश्चर्य मानण्या सारखी गोष्ट ही कीं, महादेवाचें लिंग पार्वतीच्या योनींत आहे अशी कल्पना करून त्यावर सतत जलसिंचन करावयाचें, त्यापुढें बेलपत्र व धत्तूऱ्याचीं फुलें वहावयाचीं अशी जगामध्यें प्रवृत्ति करविण्यासाठीं या गोष्टी-शास्त्रांत लिहून ठेविल्या व धर्मभोळ्या लोकांनींही विचार न करितां तो धर्म आहे असें मानिलें या शिवाय दुसरें कोणतें असावें ?

ब्रह्मदेव सर्व सृष्टीला उत्पन्न करणारा म्हणून सर्वांचा पिता आहे. तो कामवश झाला व आपल्या मुलींशी कामसेवन करून भ्रष्ट झाला; उर्वशी नांवाची एक अप्सरा ( देवस्त्री ) होती, तिच्या स्वरूपावर मोहित होऊन तो आपल्या चार हजार वर्षेपर्यंत केलेल्या तपश्चरणाच्या बळावर

चार मुखें धारण करून उर्वशीचें स्वरूप पाहता झाला व त्यामुळें त्याचें तपश्चरण नाहींसें झालें. उर्वशीनें त्यास शाप दिला. असें चमत्कारिक व नीतीला प्रत्यक्ष विरुद्ध वर्णन त्यांचे ग्रंथांत आहे.

जगाची रचना करणारा व त्याचें पालन करणाऱ्या भगवान् नारायणानें कच्छपमत्स्यादिक अनेक अवतार धारण करून दानवांचा संहार केला. मारुतीला माकड व गणपतीला हत्ती बनवून त्या गणपतीनें उंदरावर स्वारी करून मोदकांवर ताव मारिला. याप्रमाणें त्यांनीं आपल्या पुराणांत वर्णिलें आहे. जीवांचा वध करण्यांत, अथवा जीवांचा वध करून देवतेला तृप्त करण्यांत, तलाव विहिरी वगैरे खोदविण्यांत मोठा धर्म आहे वगैरे अनेक प्रकारच्या असंबद्ध गोष्टी ब्राह्मणांनीं शास्त्रांत लिहिलेल्या आहेत. श्वेतांबरांनीं तर अनेक कल्पित सूत्रांची रचना करून सर्व शास्त्रें भ्रष्ट करून टाकिलीं आहेत. हें असो. परंतु आमच्यांतीलच कांहीं भेषधारी साधूंनीं कुलदेवीची पूजा, [1]क्षेत्रपाल व्यंतरादिक देवांची आराधना, पद्मावती, चक्रेश्वरी वगैरे देवतांची पूजा वगैरे अनेक मिथ्याप्ररूपण करून शास्त्रें भरून टाकिलीं आहेत. याशिवाय अन्य म्लेंच्छादिकांनींही रचिलेलीं आहेतच. शास्त्राशिवाय मिथ्याकल्पनेचा प्रसार तरी कसा होणार! अशा शास्त्रांच्या जोरावर अनेक प्रकारच्या मिथ्याधर्माचा प्रसार अवलंबून असतो. म्हणून प्रत्येक मनुष्यानें अशा कालांत परीक्षा-प्रधानी बनून नंतर शास्त्राला प्रमाण मानावें.

उत्तम व खरें शास्त्र, वर जीं सहा विशेषणें दाखविलीं तीं ज्यांस लागूं होतील तेंच समजावें.

**सच्छास्त्र**

प्रथमतः शास्त्र हें सर्वज्ञ वीतरागाकडून सांगितलेलें असलें पाहिजे. कारण सर्वज्ञाशिवाय इतर कोणीही इंद्रियजनित ज्ञानानें जीव अजीवादि अतीन्द्रिय अमूर्तिक पदार्थांचें यथार्थ प्ररूपण करूं शकणार नाहीं, पाप-पुण्य वगैरे अदृष्ट पदार्थ व परमाणु वगैरे सूक्ष्म पदार्थही जाणूं शकणार नाहीं व दूर असणाऱ्या मेरुकुलाचलादि पर्वतांचें यथार्थ वर्णनही करण्यास समर्थ होणार नाहीं. तसेंच जीवादि द्रव्यांचे अनंत पर्याय होऊन गेले व अनंत होतील व अनंत वस्तूंचे अनंत गुण व अनंत पर्याय आहेत. त्या सर्वांना एकसमयावच्छेदें करून सर्वज्ञाशिवाय क्रमवर्ति इंद्रियजन्य ज्ञानधारी कसा जाणूं शकेल? म्हणून सर्वज्ञाशिवाय इतरांना यथार्थ शास्त्रनिरूपण करतां येणें संभवनीय नाहीं. सत्यार्थ निरूपण फक्त सर्वज्ञाचें ठिकाणींच संभवतें. ज्याला रागद्वेष आहेत, ज्याला आपला अभिमान वाढावा अशी इच्छा आहे, ज्याला विषयांचा लोभ आहे, व जो आपली जगांत प्रसिद्धि व्हावी असें इच्छित असेल तो सत्य कधींही सांगूं शकणार नाहीं. यावरून सर्वज्ञ वीतरागांनीं निरूपण केलेल्या शास्त्रालाच फक्त प्रमाणता येतें. ज्या शास्त्रांत वादी प्रतिवादींना अनेक दोष दाखविता येतात असें शास्त्र प्रमाण मानूं नये. तर ज्याला वादीप्रतिवादी उल्लंघन करूं शकणार नाहींत व ज्या शास्त्रांत प्रत्यक्ष

---

टीप १:– क्षेत्रपालादि देव व पद्मावती वगैरे देवता शासनभक्त सम्यक्त्वी आहेत म्हणून त्यांचा योग्य आदर करणें यांत मिथ्यात्व नाहीं.

अथवा अनुमान प्रमाणानें बाधा येत नसेल तेंच खरें शास्त्र जाणावें. ज्यांत तसे दोष येत असतील तें खरें नव्हे.

ज्या शास्त्रांत भावांचा निर्णय नसेल, हेयोपादेय, कृत्याकृत्य, देव कुदेव, धर्म अधर्म, हित अहित, ग्राह्य अग्राह्य, भक्ष्य अभक्ष्य वगैरे विषयांचा निर्णय करून वस्तूचें खरें स्वरूप दाखविलें नसेल, उलट पोकळ शब्दाडंबर माजवून फक्त लोकरंजन करण्याचाच ज्याचा हेतु असेल, ज्यामध्यें असत्य गोष्टी, देशकथा, राजकथा, चौरकथा, स्त्रीकथा, कामकथा वगैरे संसारांत बुडविणाऱ्या विकथांचेंच कथन असेल, ज्यामध्यें आत्मा संसारापासून पराङ्मुख होऊन आपलें स्वरूप जाणून संसारांतून कोणत्या रीतीनें त्यास उद्धरून जातां येईल यासंबंधीं वर्णन नसेल तें मिथ्याशास्त्र जाणावें. ज्यामध्यें जीवादिक तत्त्वांचें वर्णन असून सर्वांचें हित करणारा उपदेश असेल तें तत्वोपदेश करणारें शास्त्र समजावें. ज्यामध्यें प्राणिमात्रांची हिंसा करावी असें सांगितलें असेल, मांस भक्षण, जल-स्थल-आकाशगामी जीवांच्या संहाराचा विधि, जारण, मारण, उच्चाटण, परधनहरण, संग्राम, वशीकरण, ग्रामविध्वंसनाचे उपाय वर्णिले असतील तें शास्त्र सार्व नव्हे म्हणजे सर्वांचें हित करणारें नव्हे. ज्यामध्यें कुमार्गाचें निवारण कसें करावें, स्वर्ग-मोक्षाचा उपाय कोणता वगैरे सांगितलें असेल तें 'कापथघट्टन' विशेषणयुक्त शास्त्र म्हणावें. ज्यामध्यें शृंगार-वीररसादिकांचें वर्णन करून कुमार्गाकडे प्रवृत्ति करविली असेल, जूवा, मद्यमांसादिक व्यसनाकडे जें वाचल्यापासून प्रवृत्ति होत असेल, अनंतसंसारांत बुडविणाऱ्या रागी, द्वेषी, विषयी व कषायी देवांची सेवा करावयाचा ज्यांत उपदेश असेल, पाखंडी भेषधारी साधूंची उपासना करावी असें ज्यांत वर्णन केलें असेल तीं सर्व शास्त्रें खोटीं समजावीं. ज्यांना विशेष समजत नसेल त्यांनीं निदान एवढें तरी लक्षांत ठेवावें कीं, जें वीतरागदेवांनीं प्ररूपण केलेलें शास्त्र असेल त्यांत रागद्वेषादिक विषय कषायांचा अभाव व सर्व जीवावर दया हे दोन तरी मुख्य असणारच. हे दोनही ज्यांत नसतील तें खरें शास्त्र नव्हे. याप्रमाणें एका श्लोकांत आगमाचें लक्षण सांगितलें.

आतां तपस्वी म्हणजे सत्यार्थ गुरूचें स्वरूप सांगतात---

गुरूचें लक्षण.

**विषयाशावशातीतो निरारंभोऽपरिग्रहः ।**
**ज्ञानध्यानतपोरक्तस्तपस्वी स प्रशस्यते ॥ १० ॥**

**अर्थ**- पचेंद्रियांच्या विषयांच्या इच्छेचा ज्यानें नाश केला असेल, षट्काय जीवांचा घात करणाऱ्या आरंभाचा ज्यानें त्याग केला असेल, अंतरंगबहिरंग संपूर्ण परिग्रह ज्यानें नाहींसे केले असतील व ज्ञान ध्यान तपश्चरणांत जो मग्न असेल तोच प्रशंसायोग्य गुरु म्हणावा.

**विशेषार्थ**- जो रसनेन्द्रियाच्या स्वाधीन होऊन अनेक प्रकारचे रसास्वाद घेण्यांत आसक्त झाला असेल, कर्णेंद्रियाच्या वश होऊन आपली स्तुति ऐकण्याची ज्यास इच्छा असेल, मनोइंद्रियाच्या अधिन झाल्यानें ज्ञानाचा अभिमान ज्यास उत्पन्न झाला असेल, नेत्रांनीं मनोहर स्वरूप, राजवाडे,

बागबगीचे, वस्त्रालंकार पाहावें असें ज्यास वाटत असेल, कोमल शय्येवर शयन करावें, उच्च आसनावर विराजमान व्हावें, सुगंधी द्रव्यांचीं उटणीं अंगास लावावीं, वस्त्राभरणांनीं देह सुशोभित करावा, विषयांचा उपभोग यथेच्छ घ्यावा वगैरे प्रकारची ज्यास इच्छा होत असेल, तो इतरांना विषयापासून पराङ्मुख करून वीतराग धर्माकडे प्रवृत्त करविणार नाहीं. तो आपणासारखीच सराग मार्गाकडे प्रवृत्ति करवून संसारसमुद्रांत बुडवून टाकील. म्हणून ज्याला विषयाची इच्छा नाहीं तोच गुरु वंदन करण्यायोग्य आहे. विषयावर प्रीति करणारा असेल त्यांस आत्मज्ञान नसतें म्हणून त्यास शास्त्रांत बहिरात्मा म्हटलें आहे. तो गुरु कसा होऊं शकेल? त्रसस्थावर जीवांचा घात करण्याचें कार्य ज्यानें सोडिलें नसेल त्यास पापाची भीति नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. मग अशा पापिष्ठाला गुरुपणा कसा देता येईल? चौदा प्रकारचे अंतरंग परिग्रह व दहा प्रकारचे बाह्य परिग्रह धारण करणाऱ्या पुरुषाला गुरु म्हणतां येणार नाहीं

परिग्रह धारण करणारा मनुष्य स्वतःच संसारांत फसून गेलेला तो अन्य जीवांचा उद्धार कसा करूं शकेल? मिथ्यात्व १, स्त्री-पुरुष–नपुंसक वेद २, राग ३, द्वेष ४, हास्य ५, रति ६, अरति ७, शोक ८, भय ९, जुगुप्सा १०, क्रोध ११, मान १२, माया १३, लोभ १४ या चौदा अंतरंग परिग्रहांचें स्वरूप संक्षेपांत असें आहे. [ इतर ग्रंथांत रागद्वेष वेगळे मानले नसून ते क्रोध लोभांत अंतर्भूत आहेत ]

चौदा अंतरंग परिग्रह

१ **मिथ्यात्व**–यद्यपि मनुष्य शरीर, शरीराचें नांव, शरीराचें रूप, पर्यायान्तर्गत शरीराच्या आधारानें असणारे जाति, कुल, राज्य, धन, कुटुंब, यश, अपयश, उच्चनीचपणा, दारिद्र्य, मान्यता, हीनपणा, ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यशूद्रादिक वर्ण, स्वामी, सेवक, यतिपणा, गृहस्थपणा इत्यादि अनेक प्रकार कर्मापासून उत्पन्न होणारे आहेत असें आपण प्रत्यक्ष जाणिलें आहे, पाहिलें आहे, ऐकलें आहे. तसेंच हे सर्व आपलें स्वरूप नव्हेत असा अनुभव ही आहे; तरी पण अनादिकालापासून मिथ्यात्वकर्माच्या उदयानें आपले मनावर त्याचा इतका दृढ संस्कार झालेला असतो कीं, या परद्रव्याचा नाश झाल्यानें आपला नाश होतो अशी आपली झालेली समजूत बदलूं शकत नाहीं. परद्रव्याच्या हीनाधिकतेमुळें आपलीही तशीच अवस्था होते. आपणाला उच्चनीचपणा प्राप्त होतो असें मानून आपला देह हाच आपला आत्मा आहे असें आपणांस वाटतें.जरी आपल्या मुखानें या सर्व वस्तु आत्मस्वरूपाच्या नाहींत परस्वरूपी विनाशिक आहेत असें आपण म्हणत असतों तथापि अंतरंगांत त्यांच्या संयोगवियोगापासून आपले परिणाम सुखदुःखात्मक होतात. यालाच मिथ्यात्व नामक परिग्रह म्हणतात.

२ **वेद**– स्त्रीपुरुषनपुंसकांशीं कामक्रीडा करावी असा अंतरंगांत विकार उत्पन्न होणें हा वेद परिग्रह होय.

३ **राग**– देह, धन, स्त्री, पुत्रादि परद्रव्यावर प्रीति उत्पन्न होणें यास रागपरिग्रह म्हणतात.

४ **द्वेष**– लोकांचें ऐश्वर्य, यौवन, धन, कीर्ति, राज्य, वैभव वगैरे पाहून ते आपणांस नाहींत म्हणून त्याबद्दल आपल्या मनांत वाईट वाटूं देणें यास द्वेष परिग्रह म्हणतात.

५ **हास्य**– हसण्याचें परिणाम होणें हा हास्य परिग्रह होय.

६ **भय**–आपणांस मरण प्राप्त होईल, अथवा कोणाचा तरी वियोग होईल, अथवा वेदना प्राप्त होतील म्हणून भिणें यास भयपरिग्रह म्हणतात.

७ **रति**– आपणाला आवडणाऱ्या पदार्थावर प्रेम करणें यास रतिपरिग्रह म्हणतात.

८ **अरति**– आपणाला न आवडणाऱ्या पदार्थावर प्रेम न करणें यास अरतिपरिग्रह म्हणतात.

९ **शोक**– इष्टवियोग झाल्यानें परिणामामध्यें क्लेश उत्पन्न होणें यांस शोकपरिग्रह म्हणतात.

१० **जुगुप्सा**–किळस येण्यासारख्या पदार्थाचें चिंतन केल्यानें अथवा त्याचा स्पर्श वगैरे केल्यामुळें परिणामामध्यें ग्लानि उत्पन्न होणें यास जुगुप्सा म्हणतात. अथवा दुसऱ्याचा उत्कर्ष झालेला न पाहवणें यासही जुगुप्सापरिग्रह म्हणतात.

११ **क्रोध**–आपले परिणामांत क्षोभ उत्पन्न होणें यास क्रोधपरिग्रह म्हणतात.

१२ **मान**–उच्च जाति, कुल, तप, रूप, विज्ञान, ऐश्वर्य, बल वगैरेच्या गर्वानें स्वतःस उच्च मानणें व दुसऱ्याला नीच समजून आपले परिणाम कठोर करणें हा मानपरिग्रह जाणावा.

१३ **माया**– मनांत सदैव कपट ठेवणें म्हणजे आपले मनांत असेल त्याविरुद्ध भासविणें यास मायापरिग्रह म्हणतात.

१४ **लोभ**– परद्रव्याची इच्छा करण्याचें परिणाम होणें यास लोभपरिग्रह म्हणतात.

याप्रमाणें संसाराचें मूळ, आत्म्याचा घात करणारें आणि तीव्र बंधाचें कारण असे हे अंतरंग चौदा परिग्रह आहेत.

**बाह्यपरिग्रह**

याचप्रमाणें क्षेत्र, वास्तु, हिरण्य, सुवर्ण, धन, धान्य, दासी, दास, कुप्य आणि भांड असे दहा प्रकारचे बाह्य परिग्रह आहेत. अंतर्बाह्य चोवीस परिग्रहांचा त्याग करणाऱ्या निर्ग्रंथ मुनीच्या ठिकाणींच फक्त गुरुपणा संभवतो. संयम धारण केला असूनही अंतर्बाह्य परिग्रहांनीं ज्याचें मन मलिन असेल त्याला गुरु म्हणतां येणार नाहीं. जे रात्रंदिवस बसतां, उठतां, निजतां, भोजन करीत असतांनाही ज्ञानाभ्यासांत, धर्मध्यानांत, इच्छानिरोध स्वरूपीं तपश्चरणांत लीन असतात तेच गुरु प्रशंसनीय आहेत, मान्य आहेत, पूज्य आहेत, वंद्य आहेत. या गुणांशिवाय इतरांना सम्यग्दृष्टि पुरुष वंदन करीत नाहीं. कोठें कोठें "ज्ञानध्यानतपोरत्नः" असाही पाठ आहे. त्याचा अर्थ ज्ञान, ध्यान व तप हींच रत्नें ज्यापाशीं आहेत असा गुरु असावा. याप्रमाणें देव-गुरुशास्त्रांचें श्रद्धान करणें हें सम्यग्दर्शनाचें लक्षण समजावें.

आतां सम्यग्दर्शनाच्या निःशंकित गुणाचें लक्षण सांगतात.

निःशंकित अंग

**इदमेवेदृशमेव तत्त्वं नान्यन्न चान्यथा।**
**इत्यकम्पायसाम्भोवत्सन्मार्गेऽसंशया रुचिः॥ ११॥**

**अर्थ**– इदं म्हणजे हें जें आप्त आगम गुरूचें लक्षण वर सांगितलें तेंच तत्त्व आहे, व तें सत्य आहे. ईदृशं म्हणजे याच प्रकारचें आहे दुसऱ्या प्रकारचें नाहीं. अशी निष्कंप तरवारीच्या धारेच्या पाण्यासारखी सन्मार्गामध्यें संशयरहित रुचि म्हणजे श्रद्धान असणें यास निःशंकित गुण म्हणतात.

**विशेषार्थ**– जगांत गदा, चक्र, त्रिशूलादिक अनेक शस्त्रें धारण करून स्त्रियांमध्यें आसक्त झाले आहेत त्यांना व क्रोध, मान, माया, लोभानें अनेक प्रकारचें कर्तव्य करून दाखविण्याची ज्यास इच्छा आहे अशांना देव म्हणतात. हिंसा करण्यांत धर्म आहे, कामक्रोधादि उत्पन्न झाले म्हणून धर्माची हानि होत नाहीं वगैरे निरूपण करणाऱ्या आगमाला शास्त्र म्हणतात. अनेक भेष धारण करणाऱ्या पाखंडी, कामी, क्रोधी, लोभी, अभिमानी पुरुषाला गुरु म्हणतात. परंतु वास्तविक हे गुरु नव्हेत. हीं शास्त्रें नव्हेत व हे देवही नव्हेत, अशी ज्याची पक्की श्रद्धा आहे, त्याचें मन लबाड माणसांनीं योजिलेल्या अनेक प्रकारच्या खोट्या युक्ति प्रयुक्तींनीं, मंत्रतंत्रादिकांनीं मुळींच चलायमान होत नाहीं. जसें तरवारीच्या धारेचें पाणी हें हवेनें चंचल होत नाहीं. तसें मिथ्यादृष्टी लोकांच्या वचनरूप हवेनें सम्यग्दृष्टि पुरुषाचे परिणाम सत्यार्थ देव शास्त्र गुरू व धर्माच्या स्वरूपाविषयीं संशयित होत नाहींत. त्या पुरुषाला निःशंकित गुण आहे असें समजावें.

आत्मतत्त्वाचें निर्दोष स्वरूप शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ज्यानें स्वानुभवानें जाणून आत्मा हा वेगळा व शरीर हें वेगळें असें जाणिलें त्या सम्यग्दृष्टि पुरुषाला सात प्रकारचें भय रहात नाहीं व त्यास निःशंकित गुण प्राप्त होतो. वरील सात भयाचीं नांवें:— इहलोक-भय, परलोक-भय, मरण-भय, वेदना-भय, अरक्षक-भय, अगुप्ति-भय आणि अकस्मात् भय.

सप्तभयें

१ आपल्या मुलाबाळांचा नाश होईल, आपली आजीविका नाहींशी होईल. वगैरे विचार मनांत येणें यास इहलोक–भय म्हणतात. हें सर्व संसारी जीवांना असतें.

२ परलोकीं आपणांस कोणती गति प्राप्त होईल, कोणत्या योनींत आपला जन्म होईल, त्याठिकाणीं सुख दुःख कसें कसें प्राप्त होईल असा विचार मनांत येऊन भीति वाटणें यास परलोक-भय म्हणतात.

३ मरणसमयीं मला किती दुःख प्राप्त होईल माझें मरण कोणत्या ठिकाणीं होईल कोण जाणें वगैरे प्रकारानें मनांत भीति उत्पन्न होणें यास मरणभय म्हणतात.

४ रोग प्राप्त झाला असतां अनंतवेदना उत्पन्न होतील असा विचार होणें यास वेदनाभय म्हणतात.

५ संकट प्राप्त झालें असतांना आपलें रक्षण करणारा कोणी नाहीं आतां काय करावें ? असा विचार उत्पन्न होणें यास अरक्षकभय म्हणतात.

६ आपली वस्तु कोणी चोरून नेईल काय ? असा विचार मनांत उद्भवणें यास अगुप्तिभय म्हणतात.

७ अचानक एखादा रोग उत्पन्न होईल काय ? असा विचार येऊन भीति धरणें यास अकस्मात् भय म्हणतात.

स्वपरवस्तूंतील यथार्थ भेद जाणणाऱ्या सम्यग्दृष्टी पुरुषाला हीं सात भयें उत्पन्न होत नाहींत. कारण तो असा विचार करितो कीं, या देहांत नखशिखान्त सर्वत्र ज्ञान भरलें आहे. हेंच आमचें धन. या ज्ञानभावाशिवाय दुसरा कोणताही परमाणु आमचा नाहीं. देह अथवा देहासंबंधी स्त्री, पुत्र, मित्र, धन, राज्यैश्वर्य, वगैरे सर्व मजपासून भिन्न आहेत. संयोगापासून याची उत्पत्ति झालेली आहे. यांचा आमचा काय संबंध ? संसारांत असे संबंध अनन्तानन्त होऊन त्यांचा वियोग झाला आहे. ज्यांचा संयोग झाला आहे त्यांचा निश्चयानें वियोग होणार. जो उत्पन्न झाला तो मरणारच. मी ज्ञानस्वरूपी आत्मा उत्पन्न झालों नाहीं, माझा नाश होणार नाहीं. याप्रमाणें ज्याचा दृढ निश्चय झाला असेल त्याला शरीर नाहींसें होण्यानें दुःख व दहा प्रकारच्या परिग्रहाचें वियोगभय मुळींच राहत नाहीं. म्हणून इहलोकाचें भय नसणारा सम्यग्दृष्टि निःशंक आहे. अरक्षकभयही सम्यग्दृष्टि पुरुषाला नसतें. कारण जगांत सत्तावस्थेंत जे पदार्थ आहेत त्यांचा त्रिकालीं कधींही नाश होत नाहीं. ज्ञानस्वरूप आत्मा हा स्वयंसिद्ध असहाय आहे. त्याचें रक्षण करणारा व नाश करणारा कोणीच नाहीं असा त्याचा दृढ निश्चय झालेला असतो. ज्याचा कोणी नाश करणारा असेल त्याचा कोणी तरी रक्षण करणाराहि पाहिजे. सम्यग्दृष्टि पुरुष अविनाशी स्वरूपाचें अनुभवन करीत असल्यानें अरक्षाभयरहित निःशंक असतो. सम्यग्दृष्टि पुरुषास अगुप्तिभय नसतें कारण तिजोरीशिवाय आपलें धन सुरक्षित राहणार नाहीं, तें कोणीं चोरून नेईल अशी शंका आपणास उत्पन्न होऊन त्यामुळें चोराचें भय उत्पन्न होतें. पण त्यांचें धन लुटण्यासारखें नसल्यामुळें त्यांना चोराचें भय नसतें. कारण वस्तुचें स्वरूप जें निजस्वरूपीं धन तें आपल्या स्वरूपांत आहे. आपल्या बाहेर अन्यत्र नाहीं. म्हणजे चैतन्यस्वरूप जो मी आत्मा त्याचें चैतन्यस्वरूप माझ्याच ठिकाणीं आहे. त्यांत दुसऱ्याचा प्रवेश नाहीं. हें अनन्तज्ञानदर्शन माझें स्वरूप, हेंच माझें अप्रमाण अविनाशी धन आहे. यांत चोरांचा प्रवेश होऊ शकत नाहीं. चोर याचें हरण करूं शकत नाहीं अशी त्याची पक्की समजूत असते. म्हणून सम्यग्दृष्टि पुरुषाला अगुप्तिभय नाहीं म्हणून तो निःशंक आहे.

त्यास अकस्मात् भयही नाहीं. कारण त्यास आत्मा हा सदैव शुद्ध, द्रष्टा, अचल, अनादि, अनंत, स्वभावसिद्ध, अलक्ष्य, चैतन्य प्रकाशरूप सुखाचें स्थान आहे. अशी खात्री असल्यानें यांत अचानक कांहीं घडून येणार नाहीं असा दृढभाव असतो. म्हणून तो निःशंक आहे. ज्याला सम्यग्दर्शन असतें त्याच्या परिणामांत सात भयें उत्पन्न होत नाहींत. पदार्थांचें सत्यस्वरूप जाणल्या-

शिवाय आत्मा सप्तभय-रहित होत नाहीं. सम्यग्दृष्टि पुरुष अहिंसा हाच धर्म आहे असें समजतो. जीवांचा घात करणाऱ्या यज्ञयागादि कार्यापासून कधींकाळीं धर्म होईल अशी कल्पना देखिल त्यास उत्पन्न होत नाहीं म्हणून तो निःशंकित गुण धारण करणारा असतो. याप्रमाणें निःशंकित अंगाचें लक्षण आहे. पुढें एका श्लोकांत निःकांक्षित गुणाचें लक्षण सांगतात.

निःकांक्षित अंग

**कर्मपरवशे सान्ते दुःखैरन्तरितोदये ।**
**पापबीजे सुखेऽनास्था श्रद्धानाकाङ्क्षणा स्मृता ॥ १२ ॥**

**अर्थ**- कर्माच्या स्वाधीन असणाऱ्या, शेवटीं नाश पावणाऱ्या, उदयकालीं दुःखमिश्रित असणाऱ्या, आणि पापाचें बीजरूप अशा सुखामध्यें अनित्यपणाची श्रद्धा ठेवणें यास निःकांक्षित गुण म्हणतात.

**विशेषार्थ**-इन्द्रियापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाला तें खरें सुख नव्हे अशी पक्की समजूत असणें यांस अनाकांक्षा नांवाचा सम्यक्त्वाचा दुसरा गुण भगवन्तांनीं म्हटलें आहे. इन्द्रियजनित

अनाकांक्षा

सुख परवश आहे. स्वाधीन नाहीं. तें पुण्यकर्माच्या अधीन आहे. पुण्यकर्माचा उदय असल्याशिवाय कोट्यवधि उपाय केले, मोठा पुरुषार्थ गाजविला तरीही तें प्राप्त होत नाहीं. पुण्यकर्माच्या सहायावांचून इष्ट वस्तूचा लाभही होऊ शकत नाहीं. कदाचित् पुण्याच्या उदयानें सुखप्राप्ति झाली तरी तें सुख मर्यादित आहे, म्हणजे कांहीं नियमित कालपर्यंत राहून शेवटीं नाहींसें होणारें आहे. मग असें पराधीन असलेलें सुख किती वेळ भोगतां येईल ? इन्द्रियजनितसुख हें इष्ट विषयांच्या स्वाधीन आहे. इष्टसमागम नाशवंत आहे. तो इन्द्रधनुष्याप्रमाणें क्षणभंगुर व पराधीन आहे. इन्द्रियजनित सुख हें शरीराच्या नीरोगतेवर, धनावर, स्त्रीपुत्रांवर, आयुष्यावर, आजीविकेवर, क्षेत्रावर, कालावर, इन्द्रियावर, इन्द्रियांच्या विषयावर इत्यादि अनेक हजारो परपदार्थावर अवलंबून आहे. तें निश्चयानें नाहींसें होणारें आहे. मग असलें पराधीन सुख किती कालपर्यन्त भोगतां येईल याचा विचार करावा. इन्द्रियजनित सुख अवश्य विनाशिक असून त्यामध्यें तरी निर्विघ्नता आहे काय ? नाहीं; त्यांतही अनेक विघ्नें उत्पन्न होतात. कधीं रोग उत्पन्न होतो तर कधीं स्त्रीपुत्राचा वियोग होतो. कधीं भयंकर अपमान होतो तर कधीं धनाचा नाश होतो. कधीं अनिष्ट संयोग येऊन मिळतो. याप्रमाणें इन्द्रियजन्य सुखामध्यें अशीं अनेक प्रकारचीं दुःखें येऊन उभी राहतात. विषयसुख हें पापाचें बीज आहे. यामध्यें गढून गेल्यानें प्रथमतः आपल्या स्वरूपाचा तर विसर पडतोच. पण महान् घोर आरंभ करण्याची प्रवृत्ति होते ती निराळीच. अन्यायानें विषयसेवन करण्याची बुद्धिही ठेविलेलीच. यामुळें पापबंध होतोच होतो, म्हणून हें इन्द्रियजन्य सुख नरकतिर्यंचादि गतिमध्यें परिभ्रमण करविणारें पापबंधाचें बीज आहे असें वरचेंवर आचार्यांनीं बजावून सांगितलें आहे. अशा प्रकारचें पराधीन,

अन्तसहित व दुःखानें व्याप्त असें इन्द्रियापासून उत्पन्न होणारें सुख आहे. तें सम्यग्दृष्टि पुरुषाच्या दृष्टीनें खरें सुख नाहीं, म्हणून त्या सुखाची त्यांना आस्था उत्पन्न होत नाहीं ! जर आस्था नसेल तर इच्छा तरी कशी होणार ? सारांश जो सम्यग्दृष्टि असेल त्यास आत्मानुभव असतो. त्यामुळें आत्म्याचा स्वभाव जे अतीन्द्रिय अनन्तज्ञान व निराकुलतात्मक अविनाशी सुख त्याचा अनुभव त्यास असतो. संसारांतील इन्द्रियाधीन असणारें खरें सुख नसून सुखाभास आहे, खरें सुख नव्हें. उलट वेदना उत्पन्न होण्याचें कारण आहे. ज्यास भूक लागेल तो भोजन करून तृप्त होईल. तहान लागली असेल तो थंड पाणी पिण्याची इच्छा करील. थंडी वाजत असेल त्यास लोकरीची अथवा रुई भरलेली ऊबदार वस्त्रें ग्रहण करावी अशी इच्छा होईल. उष्णता होत असेल तोच थंडगार वायूंच्या लहरींची अपेक्षा करील. सारांश ज्यास वेदना होत असतील तेच त्याच्या निवारणाचा उपाय करतील. त्याशिवाय त्या उपायांची इतरांना काय आवश्यकता भासणार ? नेत्ररोग असल्या-शिवाय डोळ्यांत औषधी कोण घालून घेईल ? कर्णरोग असल्यावांचून कानांत बकऱ्याचें मूत्र अथवा तेल वगैरे कोण घालून घेईल ? हिंवताप असणाऱ्याखेरीज विस्तवाची उष्णता अथवा सूर्य-ताप आदरानें कोण सहन करील ? पक्षवाताचा रोग झाल्यावाचून दुर्गन्धी तेलाचें मर्दन आपल्या शरीराला कोण लावून घेईल ?

**भावार्थ**--संसारांतील पांची इन्द्रियांना तीव्र इच्छा ज्यावेळीं उत्पन्न होतें त्याचवेळीं विषयाचा उपभोग घेण्याची इच्छा उत्पन्न होते. विषयोपभोग हा उत्पन्न झालेल्या वेदनेला कांहीं काळ शांत करून पुनः अधिक पीडा उत्पन्न करितो म्हणून विषयांच्या उपभोगापासून उत्पन्न झालेलें सुख हें सुख नसून दुःखच आहे.

बाह्य शरीरइंदियादिकांनाच आत्मा जाणणाऱ्यांना बहिरात्मा अशी शास्त्रांत संज्ञा दिलेली आहे. असे जीवमात्र विषयांच्या वेदना कमी करणाऱ्या उपायांना सुख मानतात. परंतु असें मानणें

आशा दुःखाचें कारण

हा त्यांचा मोहकर्मजनित भ्रम आहे. ज्या पासून मुळींच वेदना (पीडा) उत्पन्न होणार नाहीं अशी निराकुलता ज्या ठिकाणीं असेल त्यास सुख म्हणावें. तें विषयांच्या स्वाधीन आहे असें मानणें हा भ्रम आहे. सम्यग्दृष्टि पुरुषाला अहमिन्द्रलोकाचें सुख देखील पराधीन व आकुलतेनें भरलेलें अतएव विनाशिक आहे असें वाटतें. म्हणून त्यास इन्द्रियजनित सुखाची कधींही इच्छा उत्पन्न होत नाहीं. या जन्मीं आपणांस धनसंपत्ति ऐश्वर्य वगैरे प्राप्त व्हावें अशी तो मुळींच इच्छा करीत नाहीं. एवढेंच नव्हे परंतु परलोकीं देखील आपणाला इंद्रपदवी, चक्रवर्तीपणा वगैरे प्राप्त व्हावेत असा विचार देखील मनांत आणीत नाहीं. इन्द्रियाचे विषय अल्पकाल टिकणारे आहेत. भविष्यत्कालीं विषयोपभोगापासून असंख्यात कालपर्यंत नरकाचें दुःख, अनंतकालपर्यंत पशु-योनींतील दुःख, व महादरिद्री नीच कुलामध्यें जन्म वगैरे मनुष्ययोनींतील दुःख प्राप्त होतें. संसा-रांत आशा आणि शंका हे दोन विकार मोहकर्माच्या उदयानें जीवाला सतत उत्पन्न होत असतात.

यांतून आशा करीत राहिल्यानें कांहींच प्राप्त होत नाहीं. कारण सर्व जीव निरंतर आपणाला धन प्राप्त व्हावें, शरीराला आरोग्यप्राप्त व्हावें, कुटुंबाची वृद्धि व्हावी, इंद्रियांची शक्ति वाढावी, जगांत श्रेष्ठता प्राप्त व्हावी वगैरे आशा करीत असतात. पण केवळ आशा केल्यानें हें सर्व प्राप्त होत नाहीं. आशेच्या मार्गे लागल्यानेंच त्यांना निरंतर पापाचा व अंतरायकर्माचा तीव्र बंध होत असतो.

कित्येक जीव भोगाभिलाषानें व्रत, दान, शील, तप, संयम वगैरे करीत असतात. पण इच्छा मनांत धारण करून केलेलें पुण्य पदरीं पडत नाहीं. कोणतीही इच्छा न बाळगतां जो सत्कर्म करीत असतो त्यास व आपल्या शुभाशुभ कर्मानें प्राप्त झालेल्या स्थितींत संतोष मानून निराकुल होत्साता विषयांची इच्छा करीत नाहीं त्यास पुण्यबंध होतो. सर्व जीवांना रात्रंदिवस आपणाला मरण, वियोग, पराधीनता, अपमान, धननाश, रोग वगैरे होऊं नयेत असें वाटतें. कदाचित् ते प्राप्त होतील या शंकेनें ते नेहमीं भयभीत असतात. परंतु मरण, वियोग, धनहानि, अपमान, बलहानि, रोगवेदना वगैरे पूर्वजन्मकृत पापबंधामुळें प्राप्त होतात. त्या नाहींशा करण्याचें सामर्थ्य इंद्र, मंत्र, तंत्र, औषधादि अथवा खुद्द जिनेंद्रामध्ये देखील नाहीं. कारण मरण हें आयुकर्माचा नाश झाल्यानें प्राप्त होतें. अंतरायकर्माच्या उदयानें अलाभ म्हणजे इच्छेनुरूप द्रव्यप्राप्ति होत नाहीं. असाताकर्माच्या उदयानें रोग प्राप्त होतात. अशी स्थिति कर्मानें प्राप्त होते. कर्माची स्थिति नाहींशी करण्यास, व ती नवीन उत्पन्न करण्यास, अथवा बदलण्यास कोणी देव, दानव, इंद्र, जिनेंद्रादिक समर्थ नाहींत. आपल्या परिणामापासून बांधलेल्या कर्माचा क्षय आपल्यालाच क्षमा, दया, संतोष, तपश्चरणादि परिणामापासून होणार आहे. अन्य तऱ्हेनें होणें शक्य नाहीं. असा दृढ निश्चय निर्वांछक सम्यग्दृष्टि पुरुषाला होत असतो.

संतोष हेंच सुख

शंका:– सर्व परिग्रहांचा त्याग केलेल्या साधूंना अथवा त्यागी गृहस्थांना या प्रकारचा निःशंकपणा व निर्वांछकपणा असणें संभवनीय आहे. पण आम्हांसारख्या अव्रती सामान्य गृहस्थांना तशी अवस्था कशी शक्य असूं शकेल? अव्रतसम्यग्दृष्टि गृहस्थाला भोगांची इच्छा असल्यानें व्यापार उदीम अथवा नौकरीचाकरी करीत असतांना लाभ व्हावा अशी इच्छा असणारच. आपलें कुटुंबाची व धनाची वृद्धि व्हावी अशी इच्छा होणार. त्याचप्रमाणें रोग उत्पन्न होईल किं काय? कुटुंबांतील कोणा पुरुषाचा वियोग होईल काय? आपली उपजीविका कदाचित् नाहींशी होईल किं काय? आपलें द्रव्य नाहींसें होईल कीं काय? अशा अनेक शंकाही त्यास सदैव उत्पन्न होत असतात. अशा स्थितींत त्याचा निःशंकभाव व निःकांक्षितभाव कसा टिकूं शकेल? आपण या दोन गुणाशिवाय सम्यक्त्व होऊं शकत नाहीं असें म्हणतां? मग अव्रतसम्यग्दृष्टीला सम्यक्त्व होतें असें म्हणणें कसें संभवतें?

**समाधान**– सम्यक्त्व हें मिथ्यात्व आणि अनंतानुबंधी कषायांचा अभाव झाल्यानें उत्पन्न होत असतें. अव्रतसम्यग्दृष्टी पुरुषाला या दोहोंचा अभाव झाल्यानें सत्यार्थ आत्मतत्त्वांचें व परतत्त्वांचें

श्रद्धान प्रगट होतें. अनंतानुबंधी कषायांचा अभाव झाला म्हणजे रागभावांचा अभाव होतो. त्यामुळें ज्ञान व श्रद्धान यामधील विपरीतता नाहींशी होते. व ही नाहींशी झाल्यानें इहलोक परलोकादिक सात भयें त्याला होऊं शकत नाहींत. भयांचा अभाव झाल्यानें तो आपल्या आत्म्याचें अखंड अविनाशी टंकोत्कीर्ण ज्ञानदर्शन स्वभावाचें श्रद्धान करतो; परवस्तूवरील इच्छेचा अभाव झाल्यानें सर्व इंद्रियांच्या विषयावरील त्याची इच्छाही नाहींशी होते. स्वर्गलोकामध्यें उत्पन्न झालेल्या इंद्रअहमिंद्राच्याही विषयभोगांना विषाप्रमाणें दाह उत्पन्न करणारे जाणून ते प्राप्त व्हावेत अशी तो इच्छा करीत नाहीं. आपल्या आत्म्याच्या अधीन असणारें निराकुलतालक्षणरूपीं अविनाशी ज्ञानानंदालाच सुख मानण्याकडे त्याची प्रवृत्ति होते. आपला देह, धन, संपत्ति, ऐश्वर्य वगैरे सर्व कर्मापासून उत्पन्न होणारे असून, पराधीन, नाशवंत व दुःख उत्पन्न करणारे आहेत असें जाणून 'हे सर्व माझे आहेत' असा खोटा संकल्प तो मनांत आणीत नाहीं. म्हणून अनंतानुबंधी कषायाच्या उदयापासून उत्पन्न होणारें विपरीत असें खोटें भय, शंका, परवस्तूची वांछा वगैरे अव्रतसम्यग्दृष्टी पुरुषाला होत नाहींत. परंतु अप्रत्याख्यानावरण कषाय, प्रत्याख्यानावरण कषाय, संज्वलन कषाय हे बारा व हास्य, रति, अरति, भय, शोक, जुगुप्सा, स्त्रीवेद, पुरुषवेद व नपुंसकवेद हे नऊ, एकूण एकवीस कषायांचा त्याला तीव्र उदय असतो. त्यामुळें त्याला विषयांचा त्याग करण्याची इच्छा असूनही इंद्रियें स्वाधीन न राहिल्यामुळें त्याग करवत नाहीं. यद्यपि तो विषयांना दुःखरूप जाणतो तरी त्यास वर्तमानकालीं होणाऱ्या विषयांच्या वेदना सहन करण्याचें सामर्थ्य नसतें. रोग्याला कडू औषध पिणें मनापासून आवडत नसलें तरी ज्वराच्या वेदनेनें तो इतका व्याकुल होतो कीं, तें कडू औषधही मोठ्या आदरानें प्राशन करितो परंतु अंतर्यामी तें कडू औषध पिणें त्रासदायक आहे असें जाणीत असतो व असलें कडू औषध पुनरपि पिण्याचा प्रसंग प्राप्त होणार नाहीं असा दिवस कधीं प्राप्त होईल याची मार्गप्रतीक्षा करीत असतो. तरी पण अव्रतसम्यग्दृष्टीही विषयोपभोगांना चांगले समजत नाहीं. परंतु ते भोगल्यावांचून परिणाम स्थिर राहत नाहींत. कषायांच्या जबरदस्त प्रभावानें इंद्रियांचा ताप सहन होत नाहीं. यामुळें वेदनेच्या आधीन होऊन तो विषयांची इच्छा करतो. संहनन कच्चें, कोणी सहाय करणारें नाहीं, कषायांच्या उदयानें सोसण्याची शक्ती नाहींशी झालेली, अशा स्थितींत बंदिगृहांत पडलेल्या पुरुषाची इच्छा नसूनही पराधीनतेमुळें त्यास जागेची दुरुस्ती व झाडून पुसून स्वच्छता ठेवणें भाग पडते. त्याचप्रमाणें सम्यग्दृष्टि पुरुष बंदिगृहासारखें शरीराला समजून क्षुधा तृषादिक वेदना सहन करण्यास असमर्थ झाल्यानें आपल्या देहाचें पोषण करित असतो. असें करीत असतांना देह आपला आहे असें तो मानीत नाहीं. वर्तमानकालच्या वेदनेचें त्याला भय वाटतें म्हणून ती नाहींशी होण्यापुरतीच अव्रतसम्यग्दृष्टीला विषयांची इच्छा होत असते. कर्मोदयाच्या जाळ्यांत सांपडल्यामुळें त्यांतून सुटण्याची त्यास इच्छा असते. तथापि अप्रत्याख्यानादि कषायांच्या उदयामुळें व्रतें वगैरे धारण करण्याची इच्छा असूनही तें त्याला धारण करवत नाहींत. उदयाची अवस्था जबरदस्त आहे. संसारी जीव अनादिकालापासून या जाळ्यांतून निघूं शकत नाहींत. शरी-

राचा संबंध जडून गेल्यामुळें निर्वाहाकरितां भोजन, वस्त्र, प्रावरणाची इच्छा उत्पन्न होते. याचप्रमाणें अप्रत्याख्यान कषायाच्या उदयानें जगांत आपली मान्यता व्हावी, आपल्या उपजीविका धन ऐश्वर्यादिकांना धक्का पोंचू नये, इंद्रियांचा संताप सहन करण्याचें सामर्थ्य नसल्यानें विषयसेवनाची इच्छा होते ती होऊं नये, राग भाव कमी व्हावा, कषाय कमी झाले नाहींत तर पुढें पुष्कळ दुःख प्राप्त होईल, तें नाहींसें व्हावें असें त्यास वाटत असतें. राज्यभोग, संपदा वगैरे खरें सुख देणारे आहेत असें समजून त्यांची तो इच्छा करीत नाहीं, म्हणून त्यास निःकांक्षित अंगाचें पालन होतें.

निर्विचिकित्सा अंग.

**स्वभावतोऽशुचौ काये रत्नत्रयपवित्रिते।**
**निर्जुगुप्सा गुणप्रीतिर्मता निर्विचिकित्सता॥ १३ ॥**

**अर्थ**– शरीर हें स्वभावतः अशुद्ध पण रत्नत्रयानें पवित्र असलेलें व मुक्तीची प्राप्ति करून देणारें आहे म्हणून त्याचा तिरस्कार न करितां वरील विशिष्ट गुणामुळें त्यावर प्रीति करणें यास निर्विचिकित्सा अंग म्हणतात.

**विशेषार्थ**–शरीर हें सप्तधातूंनीं बनलेलें व मलमूत्रांनीं भरलेलें आहे. म्हणून स्वभावतः अशुद्ध आहे. तरी मनुष्यपर्यायांत ज्यास रत्नत्रयाची प्राप्ति होतें त्यामुळें त्याचें शरीर पवित्र होतें. म्हणून रत्नत्रयधारी मनुष्याच्या शरीरांत कदाचित् रोग उत्पन्न झाला व त्यामुळें त्यांस दुर्गंध येऊं लागला, अथवा वृद्धपणामुळें तें शरीर सुरकुत्या पडून कुरूप दिसूं लागलें, अथवा तपश्चरणानें क्षीण होऊन कृश झालें तरी त्याविषयीं मनांत ग्लानि उत्पन्न होऊं न देतां त्याच्या रत्नत्रयगुणावर प्रीति करणें यास निर्विचिकित्सा अंग म्हटलें आहे.

सम्यग्दृष्टि पुरुष वस्तूचें यथार्थ स्वरूप जाणणारा असतो म्हणून तो पुद्गलाचे अनेक स्वभाव– मल, मूत्र, रुधिर, मांस वगैरेनीं व्याप्त झालेलें मनुष्य तिर्यंचाचें मलिन शरीर पाहून अथवा त्याचें वर्णन ऐकून त्याविषयीं मनांत तिरस्कार करीत नाहीं. क्षुधा, तृषा, रोग, दारिद्र्यादिकांनीं दुःखित होणें, पराधीन होऊन बंदिगृहांत पडणें, नीच कुलांत उत्पन्न होणें, कदन्न खाण्यास मिळणें, चांगल्या वस्त्रप्रावरणांचा उपभोग न मिळणें, अवयवामध्यें सारखेपणा नसल्यानें विद्रूपता प्राप्त होणें वगैरे सर्व कर्माच्या उदयानें घडून येतें. सम्यग्दृष्टि पुरुष त्या सर्वांना कर्मोदित जाणून त्या विषयीं मनांत ग्लानि आणून दुःखी होत नाहीं. इतर जीव कषायांच्या स्वाधीन झाल्यानें अनेकप्रकारचीं निंद्य कर्में करीत असतांना पाहून जो आपले परिणाम बिघडूं देत नाहीं. यामुळें निर्विचिकित्सक अंग घडतें. मलिन क्षेत्र, मलिन ग्राम, मलिन गृह वगैरे पाहून, तसेंच अंधकार, पाऊस, शीत, उष्ण कालाची वेदना वगैरे प्राप्त झाली म्हणूनही तो मनांत दुःख मानीत नाहीं. तसेंच रोग उत्पन्न झाला, दारिद्र्य प्राप्त झालें, वियोग प्राप्त झाला, व अशुभ कर्माचा उदय प्राप्त होऊन दुःख प्राप्त झालें म्हणून जो आपले परिणामांत बिघाड होऊं देत नाहीं, पूर्वकृत कर्मबंध-फल मलाच

भोगणें प्राप्त आहे, अशुभकर्माचें फल असेंच प्राप्त होत असतें असें जाणून परिणामांत जो फरक पडूं देत नाहीं—त्याच पुरुषाला निर्विचिकित्सक अंग प्राप्त होतें व त्याला दया, वैयावृत्य, वात्सल्य, स्थितिकरणादि गुण प्रगट होतात.

अमूढदृष्टि अंग.

**कापथे पथि दुःखानां कापथस्थेऽप्यसंमतिः ।**
**असंपृक्तिरनुत्कीर्तिरमूढा दृष्टिरुच्यते ।। १४ ।।**

**अर्थ**– दुःखदायक अशा खोट्या मार्गाविषयीं, आणि खोट्या मार्गांत असणाऱ्या लोकांविषयीं मनानें प्रमाणता न करणें, कायेनें प्रशंसा न करणें आणि वचनानें स्तुति न करणें यास अमूढदृष्टि अंग म्हणतात.

**विशेषार्थ**– संसारांत जीव मिथ्यात्वाच्या प्रभावानें रागी-द्वेषी देवादिकांचें पूजन व प्रभावना पाहून प्रशंसा करूं लागतात; देवीला जीवांचे बळी दिलेले पाहून ते देणारांची प्रशंसा करितात; दहा प्रकारच्या कुदानाला चांगलें समजतात; यज्ञ, होम, मंत्र, तंत्र, जारण, मारण, उच्चाटणादि कर्माची प्रशंसा करितात; विहिर, तलाव वगैरे खोदविणाराची प्रशंसा करितात; कंद, मूल, शाक, पत्रपुष्प भक्षण करून तपश्चरण करणाऱ्याला उच्च जाणून त्याची प्रशंसा करितात; पंचाग्नीनें शरीर क्षीण करणाऱ्या तपस्व्याला अथवा व्याघ्रांबर धारण करून भस्म-चर्चन करणाऱ्या व वर बाहु करून तप करणाऱ्या साधूस मोठे मानून त्यांची स्तुति करितात; कावेनें रंगविलेलीं भगवीं वस्त्रें धारण करणाऱ्या अथवा श्वेतवस्त्र धारण करणाऱ्या कुलिंगी साधूची व त्यांच्या मार्गाची प्रशंसा करितात; कुदेव, कुतीर्थ यांना व रागी द्वेषी मोही वक्रपरिणामी शस्त्रधारी देवाला पूज्य मानतात. यक्षिणी, पद्मावती, क्षेत्रपाल वगैरे धन देणारे आहेत, रोग नाहींसें करण्याचें यांना सामर्थ्य आहे असें मानतात; क्षेत्रपाल, पद्मावती, चक्रेश्वरी वगैरे जिनशासनाचें रक्षण

नवस करणें हें मिथ्यात्व आहे

१ :— जिनशासन देवदेवता सम्यग्दृष्टी असतात. भगवंताच्या समवसरणांत ते प्रभूचें सर्वश्रेष्ठ ऐहिक महत्व प्रदर्शित करण्यासाठीं नियतजागीं उभें राहून भगवंताविषयीं पूज्य भाव व नम्रता प्रगट करीत असतात. पूर्वाचार्यांनीं समवसरणाच्या प्रभावनेच्या दृष्टीनें इंद्रासारखे महान् ऐश्वर्य धारण करणारे देव देखील भगवंतापुढें आपलें ऐश्वर्य तुच्छ समजून जिनशासनाची प्रभावना प्रगट करितात. त्यांना त्यांचे योग्यतेप्रमाणें देव मानण्यांत मिथ्यात्वाचा दोष येत नाहीं. असें म्हटलें आहे. हें खरें देव नसून देवांचेही देव, जिनेंद्र आहेत म्हणून जिनेंद्राला देवाधिदेव अशी संज्ञा आहे. स्वर्गांतील देवांना पूर्वपुण्यानें अनेक ऋद्धि प्राप्त झालेल्या असतात म्हणून क्वचित् एखाद्या पुण्यवान् पुरुषाच्या पुण्योदयामुळें त्याचें दुःख निवारणही करूं शकतात, अशा कथा प्रथमानुयोग ग्रंथांत आहेत. ते ग्रंथ ऋषिप्रणीत आहेत म्हणून अप्रमाण मानता येत नाहींत. त्याजकडे त्यांच्या योग्यतेप्रमाणें पाहून धर्मप्रभावनेच्या प्रसंगीं त्यांचा सन्मान केला जातो, याचा अर्थ त्यांची देवाधिदेवाप्रमाणें पूजा केली जाते असें मानूं नये. मूढ लोक अज्ञानानें तसें मानीत असतील तर त्यांना खऱ्या देवाचें स्वरूप व पूजा म्हणजे सन्मान याचा नीट अर्थ समजाऊन द्यावा.

करणारे आहेत म्हणून त्यांची पूजा करितात; देव कवलाहारी आहेत असें मानून त्यांना तेल, लापशी, लाडू, अत्तर, पुष्पमाला वगैरे देऊन संतुष्ट करितात; देवापुढें उभें राहून प्रार्थना करितात कीं, " जर माझें अमुक कार्य सिद्ध होईल तर, देवा, तुला सोन्याचें छत्र वाहीन; अथवा तुजकरितां मंदिर बांधवीन, अथवा तुझ्यापुढें अमुक रुपयांचा ढीग करीन, अथवा अमुक जीवांचा बळि देईन, सव्वामण लाडू करून ते तुझपुढें चढवीन, माझें मूल जीवंत राहिलें तर त्यास झुलपे ठेवीन, अथवा अमुक ठिकाणीं नेऊन केश काढीन" इत्यादि अनेक प्रकारचे नवस करणें हा तीव्र मिथ्यात्वाच्या उदयाचा प्रभाव आहे. ज्या ठिकाणीं जीवाची हिंसा होईल तेथें भयंकर पापबंध होतो. मग ती हिंसा देवानिमित्त असो अथवा गुरुनिमित्त असो. त्यापासून संसारसमुद्रांत बुडावें लागेल हें निश्चित आहे. कोणीही देवादिकांच्या भयानें, लोभानें, लज्जेनें हिंसा होईल अशा कार्यामध्यें कधींही प्रवृत्त होऊं नये. दयावान् पुरुषाची देव रक्षा करितील. कारण तो कोणाचा अपराध करीत नाहीं, कोणाशीं वैर करीत नाहीं; त्याला देव देखील त्रास देण्यास समर्थ होत नाहीं. रागी, द्वेषी, शस्त्रधारी जे देव आहेत ते स्वतः दुःखी आहेत, भित्रे आहेत, दुर्बल आहेत. ते जर समर्थ असते अथवा त्यांना जर कोणाचेंच भय नसतें तर त्यांनीं आपल्या हातीं शस्त्र कां धारण केलें असतें ? ज्यास क्षुधा असेल तोच भोजनाची इच्छा करील. सारांश मिथ्यादृष्टींनीं सांगितलेले व्रत, उपवास, भक्ति, दान वगैरे धारण करणाराची मनवचनकायेनें प्रशंसा न करणें अथवा देव–कुदेव, धर्म–अधर्म, गुरु-कुगुरु, पाप–पुण्य, भक्ष्य–अभक्ष्य, त्याज्यात्याज्य, आराध्य–अनाराध्य, कार्य–अकार्य, युक्ति–कुयुक्ति, ग्रहण करण्यायोग्य–न ग्रहण करण्यायोग्य, सांगण्यायोग्य–न सांगण्यायोग्य वगैरे सर्व विषयांचा अनेक प्रकारानें सर्वज्ञ वीतरागांनीं वर्णिलेल्या शास्त्रद्वारें चांगल्या रीतीनें निर्णय करून, पक्षपात सोडून, मूढता टाकून, व्यवहार व परमार्थामध्यें विरोध येणार नाहीं अशा रीतीनें जें श्रद्धान करणें तें अमूढदृष्टित्व होय.

उपगूहन अंग

**स्वयं शुद्धस्य मार्गस्य बालाशक्तजनाश्रयां ।**
**वाच्यतां यत्प्रमार्जंति तद्वदंत्युपगूहनं ॥ १५ ॥**

**अर्थ**– स्वतः शुद्ध अशा मोक्षमार्गामध्यें अज्ञानी व अशक्त लोक असल्यामुळें त्या मार्गाची निंदा होत असेल तर ती दूर करणें याला उपगूहन म्हणतात.

**विशेषार्थ**–जिनेंद्र भगवंतांनीं उपदेशिलेला दश लक्षणात्मक धर्म अनादिनिधन आहे; जगांतील सर्व जीवांवर उपकार करणारा आहे; सर्व प्रकारें निर्दोष आहे; कोणाचेंही यापासून अहित होत नाहीं; यांत कोणीही बाधा आणण्यास समर्थ नाहीं. अशा धर्मांत एखाद्या जीवाच्या अज्ञानामुळें अथवा एखाद्या शक्तिहीन पुरुषाच्या निमित्तानें घडलेल्या दोषामुळें धर्माची निंदा होत असेल तर ती दूर करणें अथवा त्या जीवाच्या चुकीवर आच्छादन घालणें हें उपगूहन अंगाचें लक्षण आहे. अज्ञानामुळें घडून आलेला दोष अन्य लोकांनीं ऐकिला असतां ते या धर्माची निंदा करितील व एका

अज्ञानी मनुष्यानें केलेली चूक पाहून सर्व धर्मवान् पुरुषावर, जैनधर्मांत जितके तपस्वी, साधू, व्रती वगैरे आहेत ते सर्व पाखंडी व ढोंगी आहेत, ते अयोग्य मार्गानें वागणारे आहेत असा दोषारोप करितील. याप्रमाणें एकाचा दोष पाहून सर्व धर्मवान् पुरुष दूषित होतात. म्हणून धर्मरक्षक पुरुषांनीं आपल्या धर्मावर दोष येईल असें वाटल्यास तो धर्मप्रीतीनें उघड न करितां त्यावर आच्छादन घालावें. ज्याप्रमाणें आईचें प्रेम आपल्या मुलांवर असतें त्यामुळें मुलानें जरी एखादी निंद्य गोष्ट केली तरी ती प्रगट न करितां झांकून ठेवते, त्याप्रमाणें धर्मात्मा पुरुषांचें प्रेम धर्मावर असलें पाहिजे. आपल्या सहधर्मीय बांधवाकडून अज्ञानानें अथवा कर्माच्या प्रबल उदयानें व्रत, शील, तपश्चरणादिकामध्यें दोष उत्पन्न झाला तरी तो झांकून टाकावा. दुसरें, सम्यग्दृष्टी पुरुषांचा स्वभावच असा असतो कीं, त्यानें कोणाही जीवाचे दोष प्रगट करूं नयेत व कोणावरही अपवाद आणूं नये. स्वतः केलेलें चांगलें काम प्रगट करूं नये. स्वप्रशंसा व दुसऱ्याची निंदा करूं नये. उलट परजीवांचे दोष पाहून त्यानें मनांत पुढील विचार आणावाः—

**स्वधर्मीयांचे दोष उघड करूं नये**

"संसारांत जीव अनादिकालापासून कर्माच्या स्वाधीन होऊन राहिलेला आहे. त्यामुळें जेथें मोहनीय कर्माचा उदय व ज्ञानावरण–दर्शनावरणाचा उदय येईल तेथें तो दोषयुक्त आचरण करील अथवा त्याकडून चूक होईल यांत आश्चर्य वाटण्यासारखें काय आहे? जीवाला काम, क्रोध, लोभ वगैरे निरंतर भुलवितात, भ्रष्ट करितात, त्रास देतात. आम्हीही संसारांत रागद्वेषाच्या आधीन होऊन कोणते अनर्थ केले नाहींत? सर्व कांहीं केलें आहे. नुकतेंच जिनेंद्राच्या परमागमाला शरण गेल्यानें गुणदोषांतील भेद जाणूं लागलों आहोंत. तरीही अनादिकालाच्या कषायांच्या संस्कारानें अनेक प्रकारच्या दोषांचा सद्भाव आमचे ठिकाणीं आहेच. त्याअर्थी इतर जीवांचें ठिकाणीं कर्माच्या उदयानें व पराधीनतेमुळें उत्पन्न होणारे दोष पाहून त्याविषयीं करुणाच केली पाहिजे. संसारी जीव विषय–कषायांच्या वश असल्यानें पराधीन आहेत. हे विषय–कषाय ज्ञानाला बिघडवून अनेक प्रकारानें नाचवितात व आत्मप्रत्ययाची भूल पाडतात म्हणून अज्ञानी लोकांकडून होणारे दोष आपण उघडकीस आणूं नयेत."

**परदोष पाहून काय विचार करावा.**

स्थितीकरण अंग.

**दर्शनाच्चरणाद्वापि चलतां धर्मवत्सलैः।**
**प्रत्यवस्थापनं प्राज्ञैः स्थितीकरणमुच्यते ॥ १६ ॥**

**अर्थ**– सम्यग्दर्शनापासून किंवा सम्यक्चारित्रापासून चलायमान होत असलेल्या प्राण्यास, धर्मावर प्रीति ठेवणाऱ्या जाणत्या लोकांनीं उपदेश वगैरे द्वारां पुनः सत्यार्थ श्रद्धान व चारित्र यामध्यें स्थिर करावें. यांस स्थितीकरण अंग म्हणतात.

**विशेषार्थ**- एकाद्या अव्रतसम्यग्दृष्टि अथवा व्रती पुरुषाचे परिणाम रोगाच्या वेदनेमुळें, अतिदारिद्र्यामुळें, कोणाचा वियोग झाल्यामुळें धर्मश्रद्धेपासून शिथिल होऊं लागले तर धर्मावर प्रीति करणाऱ्या ज्ञानी माणसांनीं त्याला उपदेश करून धर्मांत स्थिर करण्याचा व त्यास धर्मापासून चलायमान न होऊं देण्याचा प्रयत्न करणें यास स्थितीकरण म्हणतात. त्यास असा उपदेश करावा, " हे धर्मेच्छु पुरुषा ! तुला हा मनुष्यजन्म, त्यांत धर्मानुराग व उत्तम कुल, इंद्रियांची शक्ति, धर्माचा लाभ हीं सर्व दुर्लभ सामग्री दैवयोगानें प्राप्त झाली आहे. देह नाहींसा झाल्यावर अशी सामग्री पुनः अनंत जन्मामध्यें मिळणें कठिण आहे. यावेळीं कर्मोदयानें प्राप्त झालेल्या रोग, वेदना, वियोग, दारिद्र्य वगैरे दुःखांनीं घाबरें होऊन आपले परिणाम बिघडविणें योग्य नाहीं. दुःख केल्यानें कर्माचा बंध अधिक पडेल. घाबरें होऊन प्राप्त झालेलें दुःख भोगिलें तरी कर्म सोडीत नाहीं व धैर्य धरून जरी भोगलें तरीही कर्म सोडीत नाहीं. त्याअर्थी दुर्गतीचें कारण असा भित्रेपणा सोडून धैर्य धारण कर. मनुष्य जन्मामध्यें येऊन धैर्यानें व संतोषवृत्तीनें धर्मसेवन करून आत्म्याचा उद्धार करणें हाच पुरुषार्थ आहे. अरे, मनुष्यांचा देह हें केवळ रोगांचें घर आहे. यांत रोग उत्पन्न झाला यांत आश्चर्य कोणतें ? यावेळीं तर धर्मालाच शरण जाणें योग्य आहे, रोग हा उत्पन्न होणारच. संयोग हा वियोगानें युक्त आहेच. कोणा पुरुषाला या संसारांत दुःख आलें नाहीं ? कोणताही प्राणी संसारांत सुखी नसावयाचा असा नियम असल्यानें यावेळीं तूं आपलें धैर्य न सोडतां फक्त धर्माला धरून रहा. जी वस्तु उत्पन्न होते ती निश्चयानें नाहीशी होणारच. आपल्या शरीराचाही कांहीं कालानें वियोग होणार हें ठरलेलें आहे, तर इतर पदार्थ आपापल्या कर्माच्या स्वाधीन असल्यानें उत्पन्न झाले व नाहींसे झाले यांत हर्षविषाद करणें हें व्यर्थ बंधाचें कारण आहे. या पांचव्या दुःषमाकालांत मनुष्यांना अल्पायुष्य व अल्पबुद्धि असते. ते कषायांचे दास होऊन राहतात. त्यांना विषयांची तीव्र लालसा होते. बुद्धिमांद्य, रोगोत्पत्ति, विशेष ईर्ष्या वगैरे घेऊनच ते या कालीं जन्मास येतात. अशा स्थितींत सम्यग्ज्ञान प्राप्त करून घेऊन कर्माला जिंकण्याचा उपाय करणें योग्य आहे."

धर्मशिथिल पुरुषास उपदेश

कोणी रोगी असेल त्यास औषध द्यावें, त्याची खाण्यापिण्याची, पथ्यपाण्याची व्यवस्था करून द्यावी. नेहमीं त्याला द्वादश भावनांचें स्मरण करवीत असावें. त्याची सेवा शुश्रूषा करावी. मल-मूत्र काढून टाकावें. याप्रमाणें हरेक उपायांनीं त्याचे परिणाम धर्माविषयीं दृढ रहातील असा प्रयत्न करणें हेंच *स्थितीकरण अंग होय.*

एखाद्याला रोगाची वेदना फार वाढल्यानें त्याचें धैर्य खचूं लागलें, तो व्रतभंग करण्याच्या बेतांत आला, अकालीं भोजन मागूं लागला, त्याग केलेल्या वस्तू ग्रहण करण्याची त्याला इच्छा उत्पन्न झाली तर त्याला दयार्द्र होऊन असा मधुर उपदेश करावा कीं त्यायोगें त्यांस आपली चूक समजून येऊन पुनः त्या वस्तु मागण्याची इच्छा होऊं नये.

व्रतभंग करूं देऊं नये

याचप्रमाणें कोणी दरिद्री असेल त्यास आपल्या शक्तिप्रमाणें आहार, वस्त्रप्रावरण, रहाण्यास जागा, भांडीं, पात्र वगैरे देऊन ज्या योगें तो दुःखी न होतां स्वधर्मांत स्थिर होईल असें दान सन्मानादि उपाय करणें यासही स्थितीकरण म्हणतां येईल.

दरिद्री असेल त्यास मदत करावी

कधीं कालीं आपण स्वतः नीति-मार्गापासून भ्रष्ट होण्याचा संभव दिसूं लागेल, अथवा काम, मद, लोभ वगैरेच्या आधीन होऊन विषयग्रहण अथवा अन्यायानें परक्यांचें धनग्रहण करीत असूं, अथवा संतोषवृत्ति नाहींशी झाल्यानें अनेक प्रकारचे परिग्रह ठेवण्याची आपणांस तीव्र इच्छा उत्पन्न होईल, अथवा आपण आर्तध्यानी बनून वियोग प्राप्त झाला असतां शोकामध्यें बुडून जाऊं, अथवा दारिद्र्या-मुळें आपणाला दीन अवस्था प्राप्त झाली, उत्साह नाहींसा होऊन सर्व तऱ्हेनें दुःखच दुःख चोहोंकडे दिसूं लागून आकुलता वाढली, अशा वेळीं अध्यात्मशास्त्राचा स्वाध्याय करून द्वादश भावनांचें चिंतन करावें. आपल्या आत्म्याचा स्वभाव अजरामर, अविनाशी, एकाकी, परद्रव्य--स्वभावरहित आहे असें मनांत आणून धर्मपराङ्मुख होऊं नये आणि असातादिकर्म, अंतरायकर्म व इतर कर्मांचा उदय वगैरे सर्व आपणाहून भिन्न जाणून त्या कर्मांच्या उदयामुळें आपला मूळ स्वभाव डगमगूं देऊं नये, यांसही स्थितीकरण अंग म्हणतात.

स्वतःवर प्रसंग प्राप्त झाल्यास विचार करावा

वात्सल्य नामक सम्यक्त्वाच्या सातव्या अंगाचें स्वरूप सांगण्याकरितां सूत्र सांगतात—

वात्सल्य अंग

**स्वयूथ्यान्प्रति सद्भावसनाथापेतकैतवा।**
**प्रतिपत्तिर्यथायोग्यं वात्सल्यमभिलप्यते ॥ १७ ॥**

**अर्थ**– सम्यग्दर्शन ज्ञानचारित्ररूपीं धर्म धारण करणारांचा समूह यालाच धर्मात्मा पुरुष आपला समूह समजतात. त्या समूहामध्यें असणाऱ्या मुनि, आर्यिका, श्रावक-श्राविका आणि अव्रतस-म्यग्दृष्टि यांचा कपट सोडून खऱ्या भावानें यथायोग्य आदर सत्कार करणें, त्यांना पाहून उभे राहणें, समोर जाऊन घेऊन येणें, वंदन करणें, त्यांच्या गुणांची स्तुति करणें, हात जोडणें, आज्ञा शिरसावंद्य मानणें, पूजन करणें, प्रशंसा करणें, त्यांना उच्चस्थानीं बसवून आपण खालीं बसणें, दरिद्री पुरुषाला अतिद्रव्य प्राप्त झाल्यानें प्राप्त होणाऱ्या आनंदाप्रमाणें त्यांना पाहून हर्षित होणें, त्यांवर अतिप्रीति करणें, यथाकालीं त्यांना भोजनपान, वस्तिका, उपकरण देऊन त्यांचें वैयावृत्य करून आनंद मानणें, या सर्वांस वात्सल्य अंग म्हणतात.

**विशेषार्थ**– ज्या पुरुषाचें अहिंसा-धर्मावर प्रेम असेल तो हिंसादि कार्यांचा तिरस्कार करील व हिंसारहित कार्य मोठ्या प्रीतीनें करील. तो सत्यवचन बोलेल व सत्य बोलणारावर, तसेंच सत्य धर्मप्ररूपण करणारावर प्रीति करील व परद्रव्य, परस्त्रीचा त्याग करील, त्यालाच वात्सल्य अंगाची प्राप्ति होऊं शकेल. दशलक्षण धर्मामध्यें व तो धारण करणारांवर जो प्रीति करील त्यासही वात्सल्य अंग होऊं शकेल. धर्मावर प्रीति असल्यानें त्यागी संयमी पुरुषांना पाहतांच मोठ्या आदरानें त्यांशीं

प्रियवचन बोलून त्यांचा आदर करण्याची ज्याची प्रवृत्ति असेल त्यास वात्सल्य अंग प्राप्त होईल.

यद्यपि सम्यग्दृष्टी पुरुष अंतरंगांत आपल्या शुद्ध ज्ञानदर्शनावर व बाह्य उत्तमक्षमामार्दवादि धर्म धारण करणारांवर व धर्मायतनांवर अनुराग करीत असला तरी तो अन्य मिथ्याधर्माशीं व मिथ्याधर्म धारण करणारांशीं द्वेष करीत नाहीं. कारण प्रवचनसार सिद्धांता मध्यें असें सांगितलें आहे कीं, राग, द्वेष, मोह हें बंधाचे कारण आहेत. त्यांत मोह म्हणजे मिथ्यात्व व द्वेष हे दोन तर अशुभभाव आहेत. संसार परिभ्रमाचें कारण मुख्यत्वेंकरून पापकर्माचा बंधच आहे.म्हणून तो टाळावा रागभाव दोन प्रकारचा आहे. एक शुभ-राग, दुसरा अशुभ-राग. त्यांत अरिहंतादि पंचपरमेष्ठीमध्यें, दशलक्षणधर्मामध्यें, स्याद्वादरूप जिनशास्त्रामध्यें, वीतरागाच्या प्रतिबिंबा-मध्यें व तें प्रतिबिंब असणाऱ्या आयतनामध्यें अनुराग असणें हा शुभराग म्हणावा. यापासून स्वर्गा-दिक प्राप्त करून देणारा पुण्यबंध होतो व तो परंपरेनें मोक्षाला कारण आहे. विषयांमध्यें अनुराग, कषायावर अनुराग, मिथ्याधर्मावर, मिथ्यादृष्टी पुरुषावर, परिग्रहादि पंच पापक्रियांवर अनुराग, मोह, आणि द्वेष हे नरकनिगोदादिकामध्यें अनंतकाल परिभ्रमण करविण्यास कारण आहेत, म्हणून सम्यग्दृष्टी पुरुष इतर अज्ञानी, मिथ्यादृष्टी, पातकी वगैरे जीवांविषयीं द्वेषभाव करीत नाहींत.

मिथ्याधर्म अथवा तो धारण करणारे या विषयीं द्वेष करूं नये

संसारी जीव मिथ्यात्व कर्माच्या वश झाल्यामुळें व ज्ञानावरणादि कर्मांच्या उदयामुळें आत्म-तत्त्वाला विसरून गेले आहेत, अर्थात् त्यांना अज्ञान अवस्था प्राप्त झाली आहे. त्यांशीं वैर करून काय उपयोग ? विपरीत बुद्धीमुळेंच त्यांचें अत्यंत नुकसान होत आहे. म्हणून सम्यग्दृष्टी त्यावर दयाभावच करितात व रागद्वेषरहित असा माध्यस्थ्य-भाव ( तटस्थवृत्ति ) त्याविषयीं धारण करितात. सम्यग्दृष्टि पुरुष वस्तूच्या स्वभावाला यथार्थ जाणून सर्व जीवांवर करुणाभाव करीत अस-तात. सर्व जीवांवरील वैरभाव सोडून, कोणाही जीवाची विराधना, अपमान, हानि वगैरे मुळींच करीत नाहींत. मिथ्यादृष्टींनीं बांधलेलीं मंदिरें, मठ वगैरे द्वेषभावानें मोडून टाकावीं अशी कधींही इच्छा करीत नाहींत. सरागदेवांची मूर्ति, देवांची क्रूर मूर्ति, अन्यमती देवदेवता वगैरेची स्थापना जेथें केली असेल त्या स्थानाशींही कधीं वैर करीत नाहींत. कारण हीं स्थानें व या मूर्ति अनेक जीवांनीं आपापल्या अभिप्रायाप्रमाणें पूजन करण्याकरितां बांधलेली असतात. त्यांचे अभिप्राय दुसऱ्या कोणाला फिरवितां येणार ? सर्व प्राणिमात्र आपापल्या धर्माप्रमाणें मूर्तीची स्थापना करीत असतात. ज्यांना जसा बरा अथवा वाईट उपदेश मिळाला असेल त्याप्रमाणें ते वागत असतील, *म्हणून त्यांत आपलें काय बिघडलें ? सम्यग्दृष्टि पुरुष वस्तूच्या यथार्थ स्वरूपाला* जाणतो म्हणून सर्वांशीं साम्यभाव ठेवून तो वागतो. कोणाशीही अरे तुरे वगैरे अपमानास्पद वाक्यें बोलत नाहीं. तो अन्यधर्मी लोकांनीं स्थापिलेल्या मूर्तिशीं अथवा मंदिराबद्दल अवज्ञेचें वचन अथवा शिवीगाळ मुखानें कधींही उच्चारीत नाहीं. सर्व जीवांशीं मैत्री ठेवणारा सम्यग्दृष्टि अचेतन अशा स्थान-पाषाण-

सम्यग्दृष्टि-पुरुषांचीं तटस्थ वृत्ति

गृहादि इतरांचीं विश्रामस्थानें याविषयीं स्वप्नामध्यें देखील वैर करीत नाहीं. इतकेंच नव्हे परंतु अन्य बलवान् अशा दुष्ट पुरुषांनीं आपलें धन, जागा, आजीविका वगैरेंचा नाश केला, अथवा आपल्या कुटुंबांतील माणसांचा घात केला, फार काय पण स्वतःचा प्राण घेतला तरी देखील त्यांशीं वैर करीत नाहीं. त्यावेळीं तो[1] असा विचार करितो, " माझ्या पूर्वीच्या कांहीं तरी प्रबल कर्माचा उदय प्राप्त झाल्यानें पूर्व जन्मीचें वैर आठवून हा बलाढ्य शत्रु उत्पन्न झाला आहे. यांशीं आतां आपल्यांत सामर्थ्य आहे तितकें खर्च करून साम म्हणजे प्रियवचन, दाम म्हणजे धन देणें, दंड म्हणजे आपल्या शक्तिप्रमाणें शासन वगैरे उपाय योजून यापासून आपलें रक्षण करूं." इतकेंही करून जर तो ऐकणार नाहीं तर स्वतः असा विचार करितो कीं, " माझ्या कर्माच्या उदयानें याला मजपेक्षां बलवान् केलें व मला दुर्बल बनवून दंड करविला. आतां मी कोणाशी वैर करूं ? आतां माझा कर्मवैरी ज्यायोगें नाहींसा होईल असा साम्यभाव धारण करून कर्मावर विजय मिळवीन. इतरांशीं वैर करून व्यर्थ कर्मबंध करून घेणार नाहीं" सम्यग्दृष्टी पुरुषाची सर्व जीवांवर प्रीति असते. त्याचें कोणाशींही वैर नसतें. कोणी दुष्ट जीव धर्माशीं वैर करून मंदिर प्रतिमेला विघ्न करण्याची इच्छा करील त्यास शक्त्यनुसार प्रतिबंध करूनही तो न ऐकेल तर तो असा विचार करितो कीं, " कालनिमित्तानें धर्माचा घात करणारा प्रगट होऊन आपलें वैर साधीत आहे. तो बलवान् आहे त्याअर्थीं थांबणार नाहीं. आपल्या उत्तम क्षमादि व सम्यग्ज्ञान, श्रद्धानादि परिणामांचा घात करण्यास कोणीही समर्थ नाहीं. अनेक दुष्ट लोक नेहमी मंदिर वगैरेचा नाश करीतच असतात. धर्मवान् जीव पुनः पुनः तीं करवीत असतातच. कालनिमित्तानें अनेक दुष्ट जीव उत्पन्न होतात त्याना कोण प्रतिबंध करूं शकणार ? भवितव्य बलवान् आहे. चांगलें व्हावयाचें असेल तर मिथ्यादृष्टि दुष्ट बलवान् उत्पन्न होत नाहींत. आम्हांस तर परम वीतरागता हीच शरण आहे " याप्रमाणें वात्सल्य अंगाचें वर्णन केलें.

सम्यग्दृष्टि पुरुषाची भावना

मुनिव्रतधारी सम्यग्दृष्टी पुरुषाची वात्सल्यभावना.

*प्रभावना नांवाच्या आठव्या अंगाचें लक्षण सांगण्याकरितां सूत्र सांगतात—*

**प्रभावना अंग.**

**अज्ञानतिमिरव्याप्तिमपाकृत्य यथायथं ।**
**जिनशासनमाहात्म्यप्रकाशः स्यात्प्रभावना ॥ १८ ॥**

**अर्थ**– संसारी जीवाच्या हृदयामध्यें अन्यमताच्या दानपूजनादि विधींविषयीं असलेला अज्ञानरूपीं अंधकार व्यापून राहिला आहे, तो आपल्या शक्तीप्रमाणें स्नपन–दान–पूजनादि विधींनीं व

१:– हा उपदेश सर्वसंग–परित्यागी मुनिव्रत धारण करणाऱ्यासाठीं आहे. एकदेश व्रतधारी पुरुषाला पांचव्या गुणस्थानापर्यंत अन्यायाचा प्रतीकार लढाई करूनही करिता येतो. आरंभी व विरोधी हिंसेचा त्याला त्याग नसतो.

मंत्रतंत्रादिक विधींनीं सत्य धर्माचा प्रकाश करून नाहींसा करणें व जैनशास्त्रांचें महत्त्व प्रगट करणें यास प्रभावना म्हणतात.

**विशेषार्थ**— अनादिकालापासून संसारी जीव सर्वज्ञ वीतरागांनीं प्ररूपण केलेल्या धर्माला जाणीत नाहीं. मी कोण, माझें स्वरूप काय, मी येथें जन्म घेण्याच्या पूर्वी कोठें होतो, कोण होतो, मला येथें कोणी आणलें, रात्रंदिवस आयुष्य कमी होत चाललें आहे आतां म्यां काय करावें, माझें हित कशांत आहे, आराधन करण्यायोग्य कोण आहे, जीवाला अनेक प्रकारचें सुखदुःख कशानें प्राप्त होतें, देव-गुरु-धर्माचें स्वरूप काय, जीवनमरण म्हणजे काय, भक्ष्य अभक्ष्याचें स्वरूप काय, या पर्यायांत मला काय करतां येण्यासारखें आहे, माझें कोण आहे, व मी कोण आहे वगैरे विचार करीत नाहीं. हा जीव मोहकर्माच्या उदयानें प्राप्त झालेल्या अज्ञानांधकारांत बुडून गेला आहे. अशा जीवांच्या अज्ञानरूपीं अंधकाराला स्याद्वादरूप परमागमाच्या उपदेशरूपीं प्रकाशानें नाहींसें करून स्वपरस्वरूपाचें ज्ञान करून देणें यास प्रभावना अंग म्हणतात.

*सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्राच्या योगानें आत्म्याचा प्रभाव प्रगट करणें* **हीही** प्रभावना आहे. दानाच्या योगें, तपश्चरणाचें योगें, शील, संयम, निर्लोभता, विनय, प्रियवचन, जिनेंद्रपूजन, गुणप्रकाशन वगैरेच्या द्वारें जिनधर्माचा प्रभाव प्रगट करणें यासही प्रभावना म्हणावें.

जे आपल्या निर्मलपरिणामानें उत्तम दान करितात, भयंकर तपश्चरण करितात व अयाचक वृत्ति धारण करितात, ती पाहून मिथ्यादृष्टी जीवही ज्यांची अशी प्रशंसा करितात कीं; "अहो,

प्रभावना अंगासाठीं जैनांची वागणुक कशी असावी

जैनलोक वात्सल्यपूर्वक दान करण्यांत मोठें शूर आहेत, असलें निर्वांछक कठिण तपश्चरण जैनाशिवाय इतरांस होणें अशक्य आहे. त्यांचा प्राण गेला तरी ते व्रतभंग करीत नाहींत. त्यांचें अहिंसा-व्रतही जबर आहे, कारण प्राण गेला तरी मनांत संकल्प करून ते जीवहिंसा करीत नाहींत. त्यांच्यामध्यें खोटें बोलणें, चोरी करणें, परस्त्रीचें सेवन करणें, प्रमाणाहून अधिक परिग्रह ठेवणें वगैरे पंचमहापातकांचा त्याग केलेला आढळून येतो. हे लोक अनीतीपासून पराङ्मुख आहेत. अभक्ष्य भक्षण करीत नाहींत. दिवस असतांनाच पदार्थ पाहून व शोधून भोजन करितात. यांचे ठायीं विनय व प्रियवचन वगैरे गुण भरलेले आहेत. या गुणांनीं ते सर्वाला आनंद उत्पन्न करितात. त्यांच्यासारखी क्षमा इतरत्र कोठें दिसून येत नाहीं. ते आपल्या इष्ट देवांवर निर्व्याज प्रेम करणारे आहेत. ते आपल्या शास्त्राची आज्ञा शिरसावंद्य मानणारे आहेत. या लोकांत विद्वान् व उज्ज्वल आचरण करणारे पुष्कळ लोक आहेत. हे कोणाशींही वैर न ठेवतां सर्वांशीं मैत्री ठेवतात. असा आश्चर्य उत्पन्न करणारा धर्म हेच करूं शकणार." याप्रमाणें अन्यधर्मी लोकांकडून ज्यांच्या निमित्तानें आपल्या धर्माची प्रशंसा होईल त्याच लोकांकडून धर्म-प्रभावना होते.

सम्यग्दृष्टि अन्यायानें धन प्राप्त करून घ्यावें असें कधींही इच्छित नाहींत व अन्यायानें

विषयोपभोगाचें सेवन करण्याचा विचार स्वप्नांत देखील मनांत आणीत नाहींत. आपल्या निमित्तानें जर जिनधर्माची निंदा होईल तर आपलें जिणें इहपरलोकांचा नाश करणारें झालें असें समजून सम्यग्दृष्टी आपल्या कुलाला, धर्माला, सहधर्मीयांला, आणि दानशीलव्रताला अपवाद येणार नाहीं असेंच वर्तन करितात. त्यांना आपल्या निमित्तानें धर्मावर दूषण येण्याचें फार भय वाटतें. ज्यायोगें धर्माची प्रशंसा व उज्ज्वलता प्रगट होईल असेंच नेहमीं त्यांचें वर्तन असतें. अशा पुरुषालाच हें प्रभावना नांवचें आठवें अंग प्राप्त होतें.

सम्यग्दृष्टी पुरुष अन्यायानें धन संपादन करीत नाहीं.

याप्रमाणें सम्यग्दर्शनाच्या आठ अंगांचें संक्षेपांत वर्णन केलें. या आठ अंगांचा समुदाय तेंच सम्यग्दर्शन होय. *अंगाहून अंगीं भिन्न असत नाहीं. अंगाच्या एकतेचा समूह ज्याच्याठिकाणीं असतो तोच अंगीं म्हणावा.* या अंगाचे प्रतिपक्षी ( दोष ) जे शंका, कांक्षा, ग्लानि, मूढता, अनुपगूहन, अस्थितीकरण, अवात्सल्य, अप्रभावना हे आहेत. ते आपल्या अंगीं आणून धर्माला दूषित करूं नये.

निःशंकितादि अंग पाळण्यामुळें जे प्रसिद्ध झाले त्यांचीं नांवें दोन श्लोकांत सांगतात—

**तावदञ्जनचौरोऽङ्गे ततोऽनन्तमतिः स्मृता ।**
**उद्दायनस्तृतीयेऽपि तुरीये रेवती मता ॥ १९ ॥**
**ततो जिनेंद्रभक्तोऽन्यो वारिषेणस्ततः परः ।**
**विष्णुश्च वज्रनामा च शेषयोर्लक्ष्यतां गतौ ॥ २० ॥**

**अर्थ**– पहिल्या निःशंकित अंगांत अंजन चोर, दुसऱ्या निःकांक्षित अंगांत अनंतमति, तिसऱ्या निर्विचिकित्सा अंगांत उद्दायन राजा, चौथ्या अमूढदृष्टि अंगांत रेवती राणी, पांचव्या उपगूहन अंगांत जिनेंद्रभक्त शेठ, सहाव्या स्थितिकरण अंगांत वारिषेण, सातव्या वात्सल्य अंगांत विष्णुकुमार आणि आठव्या प्रभावना अंगांत वज्रकुमार असे पुरुष प्रख्यात आहेत. यांच्या कथा प्रथमानुयोग ग्रंथांत वर्णिल्या आहेत त्या ते ग्रंथ वाचून पाहून घ्याव्यात.

अंगहीन सम्यग्दर्शन संसारपरिपाटीचा नाश करण्यास असमर्थ आहे असें पुढील सूत्रांत सांगतात—

**नाङ्गहीनमलं छेत्तुं दर्शनं जन्मसन्ततिं ।**
**न हि मन्त्रोऽक्षरन्यूनो निहंति विषवेदनां ॥ २१ ॥**

**अर्थ**– ज्याप्रमाणें अपुरत्या अक्षरांच्या मंत्रानें विषवेदना नाहींशा होत नाहींत त्याप्रमाणें अंगहीन सम्यग्दर्शन हें जन्ममरणरूपी संसाराचा नाश करूं शकत नाहीं.

**विशेषार्थ**– अपुऱ्या अक्षरांचा मंत्र ज्याप्रमाणें विषहरण करण्यास असमर्थ असतो त्याप्रमाणें ज्याला सम्यग्दर्शनाचें एक ही अंग नाहीं त्याच्या संसाराचा अभाव होत नाहीं.

## मूढतेचें स्वरूप

या पुढें तीन मूढता सम्यक्त्वाचा घात करणाऱ्या आहेत त्याचें स्वरूप समजून घेऊन सम्यग्दर्शन शुद्ध करणें योग्य आहे म्हणून त्यापैकीं लोकमूढतेचें स्वरूप सांगतात—

लोकमूढता

**आपगासागरस्नानमुच्चयः सिकताश्मनां ।**
**गिरिपातोऽग्निपातश्च लोकमूढं निगद्यते ॥ २२ ॥**

**अर्थ**— अन्य मिथ्यामार्गी लोकांच्या क्रिया पाहून जे लोक गंगा–भागीरथी–यमुना वगैरे नदींत स्नान करण्यापासून, समुद्रांत स्नान केल्यापासून, वाळूचे ढीग केल्यापासून, दगडांचे ढीग केल्यापासून, पर्वतावरून पडण्यापासून आणि अग्निमध्यें प्रवेश केल्यापासून धर्म घडतो असें मानतात त्यांना लोकमूढ म्हणावें. ही मूढता नसेल तर सम्यग्दर्शन प्राप्त होईल.

**विशेषार्थ**— मिथ्यात्वाच्या उदयानें व देशकालाच्या भेदानें, अज्ञानी अर्थात् परमार्थ विचाररहित लोकांची अनेक प्रकारच्या अशा मूढ प्रवृत्तीनें धर्म प्राप्त होतो, पवित्रपणा प्राप्त होतो, लाभ होतो, कोणाच्याही वियोगांचें दुःख प्राप्त होत नाहीं, आयुष्य वाढतें अशी समजूत आहे. हिलाच लोकमूढता म्हटलें आहे. ही अज्ञानामुळें उत्पन्न होत असते म्हणून त्याग करून आपल्या विचाराची शुद्धता करावी.

शरीराची अशुद्धता

कित्येक एकांतवादी लोकांनीं, नदींत स्नान करण्यापासून पवित्रता प्राप्त होतें असें मानिलें आहे. त्यावर ज्ञानी पुरुषांनीं यथार्थ ज्ञानानें असा विचार करावा, " आत्मा हा अमूर्तिक आहे, त्याला स्नान पोंहोंचत नाहीं. शरीर हें महा अपवित्र आहे, त्याच्या संयोगानें चंदन, गंगाजल, पुष्प वगैरे पदार्थ स्पर्श करण्यास अयोग्य होतात. शरीर हें हाडें, मांस, पू, रक्त, कातडें इत्यादि अशुद्ध सामग्रीनें बनलेलें आहे व अनेक प्रकारच्या दुर्गंधयुक्त विष्ठा-मल-मूत्रादिक अशुद्ध द्रव्यांनीं भरलेलें आहे. अशा शरीराच्या मुखाकडे पाहिलें तर त्यांतून किळस येईल अशा प्रकारची लाळ वगैरे वाहत असते, त्यांतून दंतमल व जिह्वामल वगैरे नेहमीं वाहत असतो, डोळ्यांतून चिकट असा दुर्गंधी पू गळत असतो, कानांतून अनेक प्रकारचा मल वाहत असतो, नाकांतून पाहतांच घृणा उत्पन्न होईल असा शेंबूड नेहमीं वाहत असतो, अधोद्वारानें मलमूत्र, आंव, कृमि वगैरे निरंतर वहात असतात, सर्व शरीरावरील केसांतून घाण असा घाम नेहमीं वाहत असतो; याप्रमाणें नऊ द्वारांनींही ज्या शरीरांतून रात्रंदिवस मल वाहतो असें शरीर स्नानानें शुद्ध होतें व पवित्र होतें असें म्हणतां येत नाहीं. जसें मातीनें बनविलेलें, मलानें भरलेलें व चोहोंबाजूनीं मलांनीं माखलेलें मडकें वरून पाणी घालून किती जरी धुतलें तरी स्वच्छ होत नाहीं त्याप्रमाणें हें शरीर ही वरच्या फक्त स्नानानें पवित्र होत नाहीं. व्यवहारांत ज्या वस्तु अथवा ज्या जागा अशुद्ध अथवा अपवित्र मानल्या आहेत त्या सर्व या शरीराच्या संबंधानेंच अपवित्र झाल्या आहेत. कांहीं ठिकाणीं कातडें पडल्यामुळें, कांहीं

ठिकाणीं केश पडण्यानें, कांहीं ठिकाणीं उच्छिष्ट पडण्यानें, कित्येक वस्तु रक्त, मांस, पू, हाडें, चरबी, मलमूत्र, थुंकी, लाळ, कफ, शेंबूड वगैरेच्या स्पर्शानें, व कांहीं पदार्थ आंघोळीच्या पाण्याचे शिंतोडे उडाल्यानें अपवित्र होतात असें पाहतों व ऐकतों. यावरून शरीराच्या संबंधाशिवाय दुसरी कोणतीही वस्तु अशुद्ध होत नाहीं असें दिसून येतें. इतका अमंगळ देह स्नानानें कसा शुद्ध होईल? पाण्यानें फक्त शरीरावर कांहीं मल सांचला असेल अथवा वस्त्रावर कांहीं डाग पडला असेल तर तो नाहींसा करितां येईल, पण शरीराला निर्मळ करितां येणार नाहीं. कोळशाला वरचेवर जसें जसें धुवावें तसें तसें तो वरचेवर काळाच निघणार, त्याप्रमाणें शरीराला जसजसें धूत जावें तों तों तें अधिक मलिनता प्रगट करतें. म्हणून शरीर स्नानानें पवित्र होतें असें मानणें हें मिथ्यात्व होय.

पाण्याची अशुद्धता

दुसरें असें कीं, जगांत पाण्यासारखी दुसरी अपवित्र वस्तु नाहीं.कारण त्यांत बेडूक, कांसव, सर्प, उंदरें, माशा, मासे वगैरे अनेक जीव नेहमीं मरतात. त्यांचीं हाडें, पू, रक्त वगैरे सर्व त्यांतच पडतें. अनेक त्रस जीवांचा नेहमीं पाण्यांत घात होत असतो. असें जे निंद्य अपवित्र पाणी त्याचा स्पर्श झाल्यानें हें शरीर पवित्र कसें होणार? गंगादि नद्यामध्यें तर हजारों माणसांचीं प्रेतें व मलमूत्र, रक्त, मांस वगैरे पडलेलीं आढळून येतात. अशा गंगेचें पाणी इतरांस पवित्र कसें करणार? त्यांत पडलेल्या पदार्थांना तें पवित्र करूं शकत नाहीं. त्यानें फक्त वर लागलेला मल नाहींसा होतो त्यामुळें मनाची ग्लानि नाहींशी होते. त्यापासून पवित्रपणा प्राप्त होणें अथवा स्नानामध्यें धर्म मानणें वगैरे सर्व कल्पना मिथ्या आहेत. जर गंगास्नानानेंच पवित्रता येत असेल, अथवा स्नानांतच धर्म आहे व त्यापासूनच मुक्ति होते असें मानलें तर रात्रंदिवस पाण्यांत राहणारे परीट, कोळी वगैरे सर्व जीव पवित्र ठरून त्यांना मुक्ति मिळाली पाहिजे व मग इतर दान-पूजा-प्रभावनादि सर्व क्रिया निष्फल ठरतील. मिथ्यात्वाच्या प्रभावानें लोकांची मूर्खपणाची समजूत होते.

शास्त्रकारांनीं आठ प्रकारची लौकिक शुद्धि सांगितली आहे त्यापासून व्यवहार, आचार, कुलाचार वगैरे शुद्ध होत असतात. पण त्यामुळें देह पवित्र होत नाहीं. आपल्या मनांतली ग्लानि स्नानामुळें नाहींशी व्हावी येवढाच त्याचा हेतु आहे. असाच आशय श्रीराजवार्तिकामध्यें अशुचि भावनेंत सांगितला आहे.

व्यावहारिक शुद्धतेचे प्रकार

शुद्धता दोन प्रकारची आहे. एक लौकिक व दुसरी लोकोत्तर अथवा अलौकिक. ज्याचा कर्ममल नाहींसा झाला आहे असा आत्मा आपल्या स्वभावांत स्थिर होणें यास लोकोत्तरशुद्धि म्हणतात. ही सम्यग्दर्शनानें साध्य होते. दुसरी लौकिकशुद्धि आठ प्रकारची आहे. १ कालशौच, २ अग्निशौच, ३ भस्मशौच, ४ मृत्तिकाशौच, ५ गोमयशौच, ६ जलशौच, ७ पवनशौच आणि ८ ज्ञानशौच. या आठ शुद्धि व्यवहारदृष्टीनें शरीराला शुद्ध करूं शकतात. म्हणून त्या अवश्य केल्या पाहिजेत. हा लौकिक व्यव-

हार सोडल्यानें अनर्थ ओढवेल. मांसभक्षण करणारे अथवा मांसविक्रय करणाऱ्या लोकांच्या निकट सहवासानें त्यांच्या त्या कृत्याबद्दल आपल्या मनांतील अभक्ष्य भक्षणाचा तिरस्कार कमी होऊ लागल्यानें अहिंसेबद्दल असलेले गाढ संस्कार ढिले पडून परमार्थ साधण्यासाठीं लागणाऱ्या अहिंसेची निष्ठा नाहींशी होते म्हणून बाह्य शुद्धिविषयीं अनादर उत्पन्न होऊं देऊं नये. कांहीं वस्तु कांहीं काल गेल्यानंतर शुद्ध होतात असें मानलें आहे. जसें रजस्वला स्त्री तीन रात्रि गेल्यानंतर शुद्ध होते. पण शरीर हें कितीही काल गेला तरी शुद्ध होत नाहीं. उष्टीं भांडीं राखेनें घासलीं असतां शुद्ध होतात असें मानलें जातें. पण शरीर भस्म लाविल्यानें शुद्ध होत नाहीं. कित्येक धातूंचीं भांडीं शूद्राचा स्पर्श झाल्यानें अपवित्र झालेलीं अग्निसंस्कार केल्यानें शुद्ध होतात असें मानतात. पण शरीर अग्निसंसर्गानें शुद्ध होत नाहीं. मलमूत्रादिकांचा स्पर्श माती लाविल्यानें नाहींसा होतो, पण शरीर माती लाविल्यानें शुद्ध होत नाहीं. गोमयानें भूमिची शुद्धता होते असें मानतात पण तेंच शरीराला लाविल्यानें शरीर शुद्ध होतें असें कोठें ऐकिवांत नाहीं. चिखल अंगास लागला, अस्पृश्याचा स्पर्श झाला तर स्नान करण्यानें शुद्ध होतां येतें असें मानतात. पण शरीर स्नानानें शुद्ध होत नाहीं. स्नान केल्यानंतरहि चंदनपुष्पादिक पवित्र वस्तु देखील शरीराचा स्पर्श होतांच मलिन होतात. कित्येकांनीं भूमि, पाषाण, कपाट, काष्ठ वगैरे वस्तु वाऱ्यानें शुद्ध होतात असें मानिलें आहे. पण शरीर हें वाऱ्यानें शुद्ध होत नाहीं. कित्येक वस्तु आपल्या ज्ञानांत ज्यांचा अशुद्ध संकल्प झाला नाहीं, म्हणून शुद्ध होतात असें मानतात. पण शरीराविषयीं तर शुद्धपणाचा संकल्प देखील उत्पन्न होत नाहीं. म्हणून आठ प्रकारच्या फक्त लौकिक शुद्धीनेंच शरीर शुद्ध होत नाहीं. लौकिक शुद्धि फक्त मनाची ग्लानि घालविणारी आहे. व्यवहारांत निर्मलपणानें आचारादिकांची उच्चता दिसून येते पण त्यामुळें शरीर शुद्ध होत नाहीं. देह हा सर्व तऱ्हेनें अशुद्धच आहे. असें असूनही जो जीव परधन, परस्त्रीची इच्छा करणार नाहीं, कोणाही जीवाची विराधना करणार नाहीं त्याचा हा हाडामांसांनीं भरलेला मलिन देह देखील देवांकडून पूज्य होऊन महापवित्र मानला जातो. या देहाला पवित्र करण्यास या शिवाय दुसरें साधनच नाहीं. श्रीपद्मनंदी नामक दिगंबर मुनींनीं सांगितलें आहे कीं, 'ज्याच्या सान्निध्यानें सुगंधी पुष्पमाला व चंदनादि पवित्र वस्तु अस्पर्श्य होऊन जातात, जें मलमूत्र, विष्ठा, रक्त, मांस, पू, हाड, चर्म वगैरेंनी बनलेलें, महान् दुर्गंधी अशा मलिन सर्व अशुद्ध वस्तू राहण्याचें संकेतगृहच आहे, असें मनुष्याचें शरीर जलस्नानानें शुद्ध होत नाहीं. आत्मा हा स्वभावतःच अत्यंत पवित्र आहे. अमूर्तिक आहे. त्याला पाणी पोहोंचतच नाहीं. अशा पवित्र असणाऱ्या आत्म्याला स्नानाची अवश्यकता नाहीं. शरीर स्वभावतःच अशुद्ध आहे तें स्नानानें कधींही शुद्ध होणें शक्य नाहीं. म्हणून दोन्ही प्रकारांचीं स्नानें निष्फल आहेत असें ठरतें. इतकें ही करून ज्यांचा स्नान करण्याचा आग्रहच असेल त्याला पृथ्वीकाय, जलकायादि त्रस जीवांचा घात होण्यानें पाप बंध होतो. व त्या मनुष्याचा रागभाव वृद्धिंगत होतो. गृहस्थाला स्नान केल्यावांचून चालत नाहीं हें खरें आहे. परंतु अज्ञानी गृहस्थ स्नानांत धर्म मानतो, त्यानें पवित्रपणा प्राप्त होतो

*असें मानतो ही मिथ्याबुद्धि त्यानें सोडावी. एवढें जरी हा जाणील तर स्नान करण्यांत धर्म नाहीं, त्यानें देह पवित्र होत नाहीं हें त्यास समजेल. यद्यपि गृहस्थाचे स्नानाशिवाय सर्व व्यवहार दूषिणीय ठरतात, त्यामुळें त्यांस परमार्थाची शुद्धता करतां येत नाहीं, तरी स्नानामुळें शरीरावरील प्रीति वाढते व त्यापासून हिंसा होते वगैरे जाणीव झाल्यानें तो प्रयोजनाशिवाय व्यर्थ पाण्याचा दुरुपयोग तरी करणार नाहीं.*

पूर्वकालीं कोटिभवामध्यें संचय केलेल्या पापरूपी मलाच्या संबंधानें मनामध्यें उत्पन्न झालेला जो मिथ्यात्वादि मल त्याचा नाश करणारा जो स्वपरभेदरूप विवेक हेंच सत्पुरुषांचें खरें स्नान होय. याशिवाय इतर जलादिकांचें स्नान अनेक जीवांचा घात करणारे अतएव पाप उत्पन्न करणारें आहे म्हणून त्यापासून धर्म घडत नाहीं. व याच कारणामुळें स्वभावतः अशुद्ध असें शरीर कधींही पवित्र होत नाहीं. त्याअर्थीं भव्य पुरुषांनीं स्वतःची शुद्धि होण्याकरितां परमात्मतीर्थांत सदैव स्नान करावें. दुःखानें व्याकुल होऊन गंगा-यमुनादि तीर्थाकडे धांव घेऊं नये. या परमात्मतीर्थांत सम्यग्ज्ञान हें निर्मल जल आहे, दैदीप्यमान सम्यग्दर्शन याच कोणी लाटा आहेत. व यांतील जल अविनाशी अशा अनंत सुखानें शीतल झालेलें आहे. यासाठीं सर्व पापांचा नाश करणाऱ्या अशा परमात्मस्वरूप तीर्थामध्यें बुडी मारावी. जगांतील पापी लोकांनीं निर्मलतत्त्व-निश्चयरूपी द्रह [तलाव] ज्ञानरूपरत्नांनीं भरलेला समुद्र व समता नांवाची नदी ही कधीं पाहिली नाहीं म्हणून ते लोक पापनाशक खऱ्या तीर्थाला सोडून लौकिक तीर्थ ज्या गंगादिक नद्या वगैरेमध्यें स्नान करून आनंद मानतात. लौकिक तीर्थांत स्नान केल्यानें संसारांतून पार होतां येत नाहीं. तात्पर्य-ज्या मूर्खांनीं तत्त्वनिश्चयरूप तलाव, ज्ञानरूप समुद्र व समतारूप नदी पाहिली नाहीं ते गंगा-यमुनादि तीर्थासारख्या ग्राटणाऱ्या ठिकाणीं जाण्याकरितां धडपड करतील. ते जर वरील तत्त्व-निश्चय, ज्ञान व समता यांना पाहतील तर त्यांत गढून जाऊन मिथ्यात्व कषायरूपी मल नाहींसा करून स्वतः निर्मल होतील. त्रैलोक्यांत असें कोणतेंही तीर्थ नाहीं, जल नाहीं अथवा कोणतेंही द्रव्य नाहीं कीं ज्या योगानें सर्वतः अशुद्ध असें मनुष्याचें शरीर साक्षात् शुद्ध होईल. हें शरीर, आधिव्याधि जरामरणांनीं व्यापलेलें व नेहमीं संताप उत्पन्न करणारें आहे. सत्पुरुषाला याचा संसर्ग सहन होत नाहीं. सर्व तीर्थाच्या जलांनीं यास दररोज स्नान घातलें व चंदन-कर्पूरादि द्रव्यांचें उटणें जरी रोज लाविलें तरी हा देह शुद्ध होत नाहीं. याला सुगंध येत नाहीं. हें सांभाळतां सांभाळतां नाहीसें होतें. जर नदींत स्नान करण्यानें हें शुद्ध होतें असें म्हणावें तर नेहमीं पाण्यांत राहणारे कोट्यावधि मासे, कांसव, वगैरे प्राणी व धीवर वगैरे शुद्ध झालेले दिसून येत नाहींत. म्हणून ही लोकमूढता सोडणें हेंच योग्य आहे.

स्वपरभेदरूप विवेक हेंच खरें स्नान

---

१ :— वरील वर्णन गृहत्यागी महाव्रतीमुनीच्या अपेक्षेनें शरीरावरील आसक्ति कमी होण्याच्या दृष्टीनें केलेलें आहे.

वर जरी स्नान करण्यापासून पवित्रपणा प्राप्त होत नाहीं व स्नान करण्यांत धर्म घडत नाहीं असें सांगितलें आहे तरी गृहस्थाश्रमांत मुनीप्रमाणें स्नान–त्याग करणें योग्य नाहीं. कारण पापिष्ठ जीवांशीं स्पर्श करून जर आपण स्नान केलें नाहीं तर आपल्या मनांतील ग्लानि नाहींशी होत नाहीं. त्या लोकांशी जर भोजनपानादि व्यवहार यथेच्छ चालू केला तर व्यवहार-धर्माचा लोप होतो. जैनांचे आचार व्यवहाराला सोडून असत नाहींत. सदैव हिंसादि पापकृत्यें करून त्यावर उपजीविका करणारे चांडाल, कसाई, महार, मांग, भिल्ल, धीवर, म्लेच्छ यांची छाया पडली तरी आपण मलिनता मानतो, मग यांचा स्पर्श झाला असतां स्नान कां न करावें ? अवश्य स्नान करून परमात्म्याचें स्मरण देखील करावें. त्यांच्या सहवासानें आपली बुद्धि मलिन होते. जे लोक वेश्येच्या तोंडाचें चुंबनांत सुख मानतात त्यांची बुद्धि सत्कर्मापासून परावृत्त झाली आहे असें समजावें. जीवांचा घात करणारे प्राणी कुत्रा, मांजर, कावळा वगैरे भोजन करण्याच्या जागीं जाऊन अन्नाला स्पर्श करितील तर त्या भोजनाचा त्याग करणें योग्य आहे. अशा प्राण्यांचा आपणाला स्पर्श झाला असतां स्नान केल्याशिवाय भोजन स्वाध्यायादि कार्यें करण्यानें हीनाचारपणा प्राप्त होतो. पापाची ग्लानि नाहींशी होते. कुलाचरणांचा भेद रहात नाहीं. स्त्रीशीं संभोग केला असतां अनेक जीवांची हिंसा होते. अशुद्ध अशा अवयवांच्या संघट्टनापासून व रक्तवीर्यादिकांच्या बाह्य स्पर्शापासून व तीव्र रागभाव उत्पन्न होण्यापासून आत्म्याचे परिणाम मलिन होतात. यांचा सर्वथा त्याग करितां आला तर उत्तम– पण तसें न झाल्यास या पापाविषयीं ग्लानि करावी, आपण अशुद्ध झालों आहोंत असें समजून व स्वतः निंद्य कर्म केलें आहे म्हणून स्नान तरी केलें पाहिजे. बाह्य शुद्धिकरितां स्नान अवश्य आहे व तें केल्याशिवाय पुस्तकादिकांना व मंदिरांतील उपकरणादि उत्तम वस्तुला स्पर्श करूं नये.

गृहस्थाधर्मांत शुद्धि अवश्य

यद्यपि शरीरांत रक्त–मांस–हाड-चर्म-केश-मल-मूत्र वगैरे भरलेले आहेत तरी यांचा बाह्यतः प्रत्यक्ष स्पर्श झाला असतां ते धुवून नाहींसे करणें योग्य आहे. केश शरीरापासून दूर झाले असतां ते स्पर्श करण्यास योग्य रहात नाहींत. त्यांचा आपल्या हस्ताचा स्पर्श झाला तरी तात्काल हात धुऊन टाकावे. या अशुद्ध वस्तूची ग्लानि मानिली नाहीं तर नीच असे चांडाल, कसाई वगैरे व आपण यांत भेद तरी कोणता उरेल ? त्यांच्या व आपल्या आचरणांत भेद न राहिल्यानें सर्व जातीय–व्यवहाराचा लोप होऊन उत्तम कुल व नीच कुल या दोहोंचे आचार सारखे समजले जातील. व्यावहारिक आचरण बिघडल्यानें धर्ममार्ग भ्रष्ट होऊन जाईल. निंद्यकर्म करण्याची लाज नाहींशीं झाल्यानें कुलपरंपरा बिघडून जाईल व पापाचा बंध पडेल. परमार्थशौच हें व्यवहार शौचाची शुद्धता असेल तरच घडतें. ज्याच्या भोजनपानस्पर्श व संगति इत्यादि प्रवृत्तीमध्यें मलिनपणा असेल त्याचा धर्महीं मलिन होतो. जैन चांडाल, भिल्ल, म्लेच्छादिकांच्या शरीराच्या छायेलाही अपवित्र मानतात व परीट, कलाल, लोहार, भडभुंजे इत्यादि लोक हिंसा करणारे आहेत

म्हणून यांचा स्पर्श करून घेत नाहींत. मुनीश्वरांना नीच जातीचा स्पर्श झाला असतां ते दंड-स्नान करितात व त्यादिवशीं उपोषण करितात. न समजतां मुनीश्वरांनीं नीच कुलाच्या मनुष्याच्या घरीं प्रवेश केला तर त्या दिवशीं आपणास भोजनाचा अंतराय झाला असें समजतात. याचप्रमाणें मद्य, मांस अथवा शरीरांतून चार बोटें ओघळ जाण्याइतकें रक्त वाहत असलें, अथवा मृतशरीर भोजन करितानां पाहिलें तर मुनि अंतराय झाला असें समजून भोजन सोडतात. जैन श्रावकांनीं हाड चर्म, केश, लोंकर, कवडी यांचा स्पर्श झाला असतां भोजन सोडावें ? त्यांनीं जेवणापूर्वी हात पाय धुवून शुद्ध भूमीवर शुद्ध भोजन करणें हेंच योग्य आहे. सारांश नीचांनीं स्पर्श केलेलें भोजन करूं नये.

**देवपूजनादिकासाठीं स्नान अवश्य.**

जिनपूजन करावयाच्या वेळीं स्नान करणें योग्य आहे. कारण स्नान करून देवाला स्पर्श करणें व पूजन करावें असा नियम आहे. जरी स्नानापासून शुद्धता होत नाहीं तरी स्नान करून देवाच्या उपकरणांना स्पर्श करणें, व धौत द्रव्य चढविणें याला देवविनय म्हटलें आहे. विनय ही आराधना आहे. जर जिनमंदिरांतील उपकरणांचा आपण विनय करितों तर जिनवाणीची पूजा ज्यायोगें करावयाची त्या द्रव्याला स्नान करून स्पर्श करणें व धुऊन हात लावणें, हात पाय धुवून मंदिरांत प्रवेश करणें हाही विनय आहे. पापमलाची शुद्धता व्हावी म्हणून भगवंतांनीं शास्त्रांत आठ प्रकारची लौकिक शुद्धि वर्णिली आहे. ती जर न केली तर मनुष्य प्राणी परमार्थधर्मापासून भ्रष्ट होतो. मुनीश्वरांचा देह रत्नत्रयाच्या प्रभावानें पवित्र आहे तरी बाह्य शुद्धि करितां त्यांना कमंडलु ठेवावा लागतो. हात-पाय धुवून ते स्वाध्याय करितात. अति थोडें पाणी सांडवून पाद प्रक्षालन करवून मग भोजन करितात. व्यावहारिक आचरणाचा त्याग करीत नाहींत. भगवंतानीं उपदेशिलेला हा जैन धर्म अनेकांत स्वरूपाचा असून यांत निश्चय आणि व्यवहार या दोहोंनाही बाधा येत नाहीं. जिनधर्म हा सर्वथैव एकांत स्वरूपाचा नाहीं. लौकिक-शुद्धता जर पाळिली नाहीं तर त्यापासून धर्माची निंदा होते. कुलाची निंदा होते. यामुळें आपल्या आत्म्यांत विकारांचा मलिनपणा उत्पन्न होतो. ज्यानें मैथुन सेवन केलें असेल, मृत माणसाला दहन करून जो आला, क्षौर ज्यानें करविलें, चांडालम्लेंच्छाचा ज्याला स्पर्श झाला, मेलेल्या पंचेंद्रिय-प्राण्यांचा स्पर्श झाला, रजस्वला स्त्रीचा स्पर्श झाला, वगैरे अनेक अशुद्ध सामग्रीचा स्पर्श झाला असतां त्यानें अवश्य स्नान केलें पाहिजे. हाड, मांस, रक्ताचा ज्या अवयवाला स्पर्श झाला असेल तो अवयव धुवून स्वच्छ केला पाहिजे. आठ प्रकारची लौकिक शुद्धि अनादिकालापासून चालत आली आहे. म्हणून शास्त्राची आज्ञा मानून त्याप्रमाणें वागणें यांत आपलें हित आहे.

जगांत कानांतील मलापेक्षां डोळ्यांतील मळाला, डोळ्यापेक्षां नाकांतील मळाला, नाकापेक्षा मुखांतील कफ, लाळ वगैरेला, याहून मूत्राला, याहून विष्ठेला अधिकाधिक अशुद्ध मानिलें आहे. हे सर्व मळ, मल या दृष्टीनें समान मानू नयेत. यद्यपि द्रव्यार्थिक नयानें सर्व पुद्गलांची एक जाति

असली तरी त्यांत पुष्कळ भेद आहेत. हाड, मांस, रुधिर, मलमूत्रादिक सर्वांचा अखेर परिणाम पृथ्वीरूप अथवा जलरूप होत असला व पृथ्वी–जलादिक रक्तमांसमय बनत असले तरी यांच्या पर्यायांत फार मोठा भेद आहे. द्रव्याला व पर्यायाला सर्वथा एक मानण्यानें व्यवहार व परमार्थ या दोहोंचाही लोप होतो म्हणून द्रव्याच्या पर्यायाला कथंचित् एकपणा कथंचित् अनेकपणा मानणें हेंच योग्य आहे.

वाळूचे पिंड करण्यांत, पर्वतावरून पडण्यांत, सती जाण्यांत, पंचाग्नि तपश्चरण करण्यांत धर्म मानणें ही सर्व लोकमूढता आहे. याचप्रमाणें ग्रहणाचें सूतक मानणें, त्यावेळीं स्नान करून चांडालांना दान देणें, संक्रमणाचे वेळीं दान देणें, विहीरीची पूजा करणें, पिंपळाची पूजा करणें, रुपये–मोहरा यांना पूजणें, लक्ष्मीची पूजा करणें, मेलेल्या पितरांची पूजा करणें, शिक्याची पूजा करणें, मृत आत्म्याला तृप्त करण्याकरितां तर्पण करणें, श्राद्ध करणें, गोंधळ घालणें, गंगाजलाला शुद्ध मानणें, पशूच्या स्वरूपाला देव मानणें, विहिर, तलाव वगैरे खोदविण्यांत धर्म मानणें, बाग–बगीचें लावण्यांत धर्म मानणें, मृत्युंजय वगैरेचे जाप करविण्यापासून आपला मृत्यु चुकेल असें मानणें, ग्रहांचे दान दिल्यानें आपलें दुःख नाहींसे होनें असें मानणें वगैरे सर्व क्रियांची लोकमूढतेंत गणना आहे. सारांश, योग्य–अयोग्य, सत्य–असत्य, हित–अहित, आराध्य–अनाराध्य यांचा विचार न करितां निवळ लौकिक प्रवृत्ति पाहून अनादिकालापासून जसें अज्ञानी जीव करीत आले त्याप्रमाणें आपणहि करण्यास उद्युक्त होणें हेंच लोकमूढतेचें लक्षण आहे. कित्येक जैन म्हणवून घेऊन परमागमाची आज्ञा जाणीत नाहींत, त्यामुळें अनेक भेषधारी लोकांनीं केलेल्या क्रियाकांडावरून तीर्थंकरादिकांचें तर्पण करणें, आपल्या वडिलांचें, पितामहांचें तर्पण करणें व यक्षादिकांकरितां होम करणें यांत आपलें कल्याण मानतात. पण ही लोकमूढता आहे. कित्येक स्नान करून सैपाक करण्यांत, स्नान करून जेवण्यांत व ओलें वस्त्र नेसून जेवण्यांत आपणांस पवित्रता व शुद्धता मानून परमधर्म होतो असें समजतात. पण त्यांना भक्ष्याभक्ष्य व हिंसेचा मुळींच विचार नसतो. ही सर्व मिथ्यात्वाच्या उदयानें लोकमूढता म्हणविली जाते.

देवतामूढतेचें लक्षण सांगतात—

देवमूढता

**वरोपलिप्सयाशावान् रागद्वेषमलीमसाः ।**
**देवता यदुपासीत देवतामूढमुच्यते ॥ २३ ॥**

**अर्थ**– जो आशालु मनुष्य वरप्राप्तीच्या लोभानें रागद्वेष-संयुक्त अशा देवतांची उपासना करितो तो देवतामूढ म्हणावा.

**विशेषार्थ**– संसारी जीवाला या जगांत राज्य, संपत्ति, ऐश्वर्य, स्त्री, पुत्र, वस्त्राभरण, वाहन वगैरे पदार्थांची नेहमीं इच्छा उत्पन्न होत असते. हे पदार्थ प्राप्त व्हावेत या हेतूनें तो रागी, द्वेषी, मोही देवांची सेवा करितो. अर्थात् असें करणें यास देवमूढता असें म्हटलें आहे. वास्तविक पाहूं

जातां, राज्य-सुख-संपदादि हे सातावेदनीय कर्माचा उदय असला तर प्राप्त होतात. सातावेदनीय कर्म कोणी देऊं शकत नाहीं. लाभांतराय कर्माच्या क्षयोपशमापासून लाभ होतो. भोगोपभोगांची सामग्री ही भोगोपभोग नामक अंतराय कर्माच्या क्षयोपशमापासून उत्पन्न होते. अशी स्थिति असतांना आपण आपल्या परिणामांनीं जीं कर्मे बांधून घेतलीं त्याचें फल देणें अथवा न देणें हें कोणाही देवदेवतेच्या स्वाधीन नाहीं. कुलाची वृद्धि व्हावी म्हणून सदैव कुलदेवीची पूजा करीत असतांना कित्येकांचीं कुलें नाहींशीं झालीं आहेत. द्रव्य-प्राप्तीकरितां लक्ष्मीची अथवा रुपये-मोहरा यांची पूजा करीत असूनही पुष्कळ दरिद्री होत आहेत. शीतलादेवीचें पूजन व स्तवन करीत असूनही पुत्र व कन्येचें मरण होत असलेलें दिसून येतें. पितरांचा आदर करून देखिल रोगादिक वाढतात.

व्यंतरक्षेत्रपालादिकांना लोक संकटांत सहाय करणारे मानतात हा त्यांच्या मिथ्यात्वाचा प्रभाव आहे.कित्येक म्हणतात कीं,चक्रेश्वरी, पद्मावती या देवता शस्त्रधारण करून जिनशासनाचें रक्षण करितात व सेवकांचें रक्षण करणारी एक एक तीर्थंकराची एक एक देवता आहे व एक एक यक्ष आहे. यांची आराधना व पूजन करण्यापासून धर्माचें रक्षण होतें. हे देव धर्मात्म्यांचें रक्षण करितात म्हणून या देवींची आणि यक्षांची स्तुति व पूजा करणें योग्य आहे.

या देवता तीर्थंकरांची भक्ति करतात व सर्व कार्ये सिद्ध करून देतात. यांच्या अभावीं धर्माची रक्षा कोण करील ? म्हणून मंदिरामध्यें जिला चार भुजा अथवा बत्तीस भुजा आहेत, जिनें आपल्या हातांत नानाविध शस्त्रें घेतलीं आहेत, जिचें मस्तकावर पार्श्वनाथ स्वामीचें प्रतिबिंब व अनेक फणांचा सर्प आहे तिला लोक अतिशय भक्तीनें पूजितात. पण याविषयीं परमागमाच्या आधारें निर्णय करून घ्या. मूढ लोकांनीं सांगितलेलें मानूं नका. याविषयीं विचार केला तर असें आढळून येतें कीं, भवनवासी, व्यंतर व ज्योतिषी या देवामध्यें मिथ्यादृष्टीच जन्मतात. सम्यग्दृष्टी जीवांची भवनत्रिकांत उत्पत्ति होत नाहीं व त्यांना स्त्रीपर्याय प्राप्त होतच नाहीं. पद्मावती, चक्रेश्वरी या देवता भवनवासिनी असून स्त्रीपर्यायी आहेत व क्षेत्रपाल यक्ष हे व्यंतरवासी आहेत. या ठिकाणीं सम्यग्दृष्टि जीव उत्पन्न होत नाहींत. याठिकाणीं नियमानें मिथ्यादृष्टि जीवच उत्पन्न होतात असें परमागमांत म्हटलें आहे. यांना जिनधर्माची प्रीति आहे असें म्हणावें तर, जे इतर जिनधर्म धारण करणारे आहेत त्याकडून आपली स्तुति पूजा व्हावी अशी त्यांना इच्छा नसावी. जैन असणारा आपणांस अव्रती समजून तो सम्यग्दृष्टि जीवापासून आपलें पूजन कसा करवील ? समानधर्मी जीव कोणाच्याही सांगण्याची अपेक्षा न करितां परस्परावर उपकार करीत असतात. हेंही असो. भगवंताचें प्रतिबिंब आपल्या मस्तकावर धारण करून भगवंताच्या भक्ताकडून आपली पूजा तरी धर्मात्मा जीव कसा करवील ? इतका अविनय धर्मवान् पुरुषाकडून कधीं होत नसतो. दुसरे, अनेक प्रकारचीं आयुधें [ शस्त्रें ] धारण करून या देवदेवींनीं आमच्या उज्ज्वल अशा वीतराग धर्म-प्रवृत्तीची विटंबना

**व्यंतर देवदेवी पूजनीय नाहींत**

केली आहे. शस्त्रें धारण करणारामध्यें सामर्थ्य कमी असतें. जिनशासनांचें रक्षण करणारी एकेक देवीच आहे असें वर म्हटलें आहे. पण भगवंताच्या शासनाचे सेवक सौधर्म इंद्रापासून तों असंख्यात देव देवी आहेत. ज्यांच्या हृदयांत सम्य धर्म धारण करण्यामुळें पूर्वी बांधिलेल्या अशुभ कर्माची निर्जरा झाली असेल त्याला सर्व पुद्गलसमूह अचेतन असूनही तोच देवतास्वरूपाचा होऊन उपकार करण्यास समर्थ होतो. पण त्या धर्मवान् पुरुषावर इतर देव मनुष्य उपकार करतील यांत आश्चर्य कसलें ? शास्त्रांतही अशा कित्येक कथा आहेत कीं, शीलवान् ध्यानी व तपस्वी पुरुषांवर आलेलीं संकटें, धर्मप्रसादानें देवांचीं आसनें कंपायमान होऊन त्यांनीं प्रत्यक्ष येऊन नाहींशीं केलीं. व अनेक प्रकारच्या रत्नांनीं देवांनीं त्यांची पूजा केली. पण अशी कथा मात्र शास्त्रांत कोठेंही आढळून येत नाहीं कीं धर्मवान् पुरुषांनीं देवतांचें पूजन केलें. पद्मावती, चक्रेश्वरी वगैरे देवतांच्याही कित्येक कथा आहेत. त्यांत त्यांनीं शीलवती व व्रत धारण करणाऱ्या स्त्रियांचीं संकटें नाहींशीं करून पूजा केली आहे असें आढळून येतें. पण अशा थोर स्त्रियांनीं त्यांची पूजा केल्याचें आढळून येत नाहीं. श्रीकार्तिकेयस्वामींनीं म्हटलें आहे:—

**ण य को वि देदि लच्छी ण को वि जीवस्स कुणइ उवयारं।**
**उवयारं अवयारं कम्मं पि सुहासुहं कुणदि ॥ ३१९ ॥**
**भत्तीए पुज्जमाणो विंतरदेवो वि देदि जदि लच्छी।**
**तो किं धम्मं कीरदि एवं चिंतेदि सद्दिट्ठी ॥ ३२० ॥**

पापा–पुण्याशिवाय कोणीही सुखदुःखें देऊं शकत नाहीं.

**अर्थ**– जीवाला कोणी लक्ष्मी देत नाहीं व त्यावर कोणी उपकार अपकारही करीत नाहीं. जगांत उपकार अपकार दिसून येतो तो आपल्या शुभाशुभ क्रियेचें फल आहे. व्यंतरदेवाची भक्तिपुरःसर पूजा केल्यानें जर लक्ष्मी प्राप्त होते असें म्हणावें तर इतर दान, पूजा, शील, संयम, तप, ध्यान, अध्ययनादि क्रियांना धर्म कां म्हणावें ? जर भक्तिनें पूजन केल्यानें कुदेव संसारांतील सर्व कार्य सिद्ध करून देत असतील तर कधी ही कोणी वस्तुच राहणार नाहीं. सर्व सुख व्यंतरदेवादिकांपासून उत्पन्न होण्याचें ठरलें तर धर्माचें आचरण करण्याची जरूरी तरी काय ?

**भावार्थ**– जगांत जीवांवर देव, दानव, देवी, मनुष्य, स्वामी, माता, पिता, बांधव, मित्र, स्त्री, पुत्र, तिर्यंचादिकापासून व अनेक औषधादिकापासून जो उपकार अथवा अपकार दिसून येतो तो सर्व आपापल्या पुण्यपाप कर्मांच्या उदयाच्या आधीन आहे. हे सर्व पदार्थ बाह्य निमित्तमात्र आहेत. कारण, असें नेहमीं दिसून येतें कीं कोणाचें चांगलें करावें, अथवा कोणावर उपकार करावा अशी इच्छा धरून कांहीं कार्य करीत असतां त्यापासून त्यास अपकार घडतो. अपकार करीत असतांना उपकार घडतो.यावरून प्रधान कारण पुण्यपापरूप कर्म आहे.शास्त्रांत अशा कथा आहेत कीं,चांडालानें

अहिंसा व्रत धारण केलें होतें. त्या व्रताच्या प्रभावानें देवांनीं त्यास सिंहासनावर बसवून पूजिलें, नीलीला शीलव्रताच्या प्रभावानें देवता सहाय झाल्या, सीतेला शीलप्रभावानें अग्निकुंड जलमय झाला, सुदर्शन शेटजींचा उपसर्ग देवांनीं नाहींसा केला, कित्येकांना देवांनीं सहाय केलें उपसर्ग नाहींसा केला व आसन कंपमान झाल्यानें देव त्या स्थळीं प्राप्त होऊन संकट हरण करिते झाले. अशा पुष्कळशा कथा प्रसिद्ध आहेत.

भगवान् आदितीर्थकराला सहा महिने भोजनाचा अंतराय घडला त्यावेळीं कोणी देवांनीं येऊन कोणालाही आहाराचा विधि कां दाखविला नाहीं ? भगवान् गर्भांत येण्याचे अगोदर सहा महिने इंद्रादिक सर्व देव सेवेंत तत्पर होते. जन्म झाल्यानंतर भगवंताकरिता वस्त्राभरणें स्वर्गाहून आणून इंद्रानें त्यांचा देह सुशोभित केला. मग त्या देवांना, भगवंतांनीं दीक्षा घेतल्यानंतर सहा महिने आहार मिळाला नाहीं म्हणून त्यांची व्यवस्था करण्याचें कसें सुचलें नाहीं ? भगवंतांनीं आपल्या भरत वगैरे शंभर पुत्रांना व ब्राह्मी सुंदरी मुलींना मुनिश्रावकांचा धर्म शिकविला होता. त्यांनाही भगवान् आहाराकरितां फिरत असून त्यांना अंतरायामुळें आहार मिळत नाहीं तरी आपण जाऊन निरंतराय भोजन करवूं हें सुचलें नाहीं. सारांश अंतराय कर्माचा उदय मंद असल्याशिवाय कोणीही सहायक होत नाहीं हेंच खरें.

*(समासटीप: आदिभगवंताना सहा महिने आहार मिळाला नाहीं.)*

दुसरें उदाहरण पहा. युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव हे वीतरागता धारण करून वनांत तपश्चरण ध्यान करीत असतांना त्यांच्या दुष्ट–वैऱ्यांनीं येऊन त्यांच्या गळ्यांत तापवून लाल केलेले लोखंडाचे दागिने घातले त्यामुळें त्यांचें शरीर जळून भस्म झालें. त्यावेळीं त्यांना कोणीही देव सहाय झाला नाहीं. सुकुमार मुनीश्वराला ( शालिनीनें ) एका कोल्हिणीनें आपल्या पिलासह तीन दिवसपर्यंत भक्षण केलें त्यावेळींहीं कोणी देव सहायास आले नाहींत. सुकुमाराच्या आईचें त्यावर इतकें प्रेम होतें कीं त्यांनीं दीक्षा घेतल्यापासून ती एकसारखी शोकसंतापांत बुडून गेली होती पण तिनें आपल्या पुत्राची काय अवस्था झाली असेल याची पुन: खबर देखील आणविली नाहीं. पांचशें मुनींना घाण्यांत घालून पिळून काढलें त्यावेळीं देव कोठें होते ?

*(समासटीप: युधिष्ठिरादिकांचा उपसर्ग कोणीही दूर केला नाहीं.)*

पद्मनामक बलिभद्र व कृष्ण नारायण, यांची हजारों देव सेवा करीत होते. पण जेव्हां यांचें पुण्य संपलें, त्यांच्या हीन कर्माचा उदय प्राप्त झाला त्यावेळीं त्यांना पाणी पाजण्यास देखील कोणी मनुष्य जवळ राहिला नाहीं. जो सुदर्शनचक्रानें देखील मरण पावला नाहीं तो भिल्लाच्या एका बाणानें गतप्राण झाला. याप्रमाणें अनेक ध्यानी-तपस्वी-व्रती-संयमीनीं भयंकर उपसर्ग सहन केले. त्यांना तर कोणीही देव सहाय झाले नाहींत व बाकीच्या कित्येकांना मात्र सहाय झाले. यावरून असा सिद्धांत निघतो कीं, अशुभ कर्माचा उदय मंद होऊन शुभ कर्माचा उदय प्राप्त झाल्याशिवाय कोणी देव वगैरे सहाय

*(समासटीप: इतर उदाहरणें)*

होत नाहींत. पापाचा उदय असेल तर इतर पदार्थ असोत पण आपला देहच आपला वैरी होतो. खरदूषणाचा पुत्र शंबुकुमार यानें बारा वर्षेंपर्यंत महत्प्रयासानें वेळूच्या वनांत तपश्चरण करून सूर्यहासखड्ग मिळविलें होतें तें लक्ष्मणानें सहजगत्या त्याजपासून घेतलें व त्याच खड्गानें त्याचें मस्तक छेदिलें. आपल्या हिताकरितां साधन केलेल्या विद्येनें आपलाच घात केला. यावरून पूर्वकर्माच्या उदयानें अनेक उपकार अपकार होत असतात. कोणा देवतेचें आराधन करण्यानें धन, आजीविका स्त्री–पुत्र वगैरे प्राप्त होत नाहीं.

पुण्य हेंच संकट नष्ट करणार आहे.

सांप्रत येथील राजे, देव–देवी, पीर–पैगंबर, स्वामी–फकीर वगैरे सर्व धर्माच्या लोकांना तसेंच वेद–पुराणांचें पठन करणाऱ्यांना व नित्य यज्ञयागादि कर्में करणाऱ्या ब्राह्मणांना जहागीर देऊन त्यांची उपजीविका चालवीत आहेत. त्यांचा मोठा आदर-सत्कार करून लक्षावधि रुपये दान करीत आहेत. याप्रमाणें मोठमोठ्या पूजा व बलिदान सर्व देवांना पोंचत असूनही कित्येकांना अनेक आधिभौतिक संकटें प्राप्त होत असतात. तीं नाहींशी करण्याचें कोणाही देवतेला सामर्थ्य नाहीं. अशी स्थिति प्रत्यक्ष पहात असूनही ज्यांना अजून या विषयाचें खरें ज्ञान होत नाहीं व जे मिथ्या देव–देवतेचें आराधन करितात ते सर्व देवमूढ आहेत. मंत्रसाधन, विद्याराधन, देवाराधन हे सर्व आपल्या पुण्यपापानुकूल असून त्याप्रमाणें फलद्रूप होत असतात. म्हणून ज्यांना सुख प्राप्त करून घेण्याची इच्छा असेल त्यांनीं क्षमा, दया, संतोष, निर्वांछकता, मंदकषाय, वीतरागभाव धारण करून एका सत्य धर्माचीच आराधना करावी. अन्यप्रकारें इच्छा करून व्यर्थ पापबंध करूं नये. जर देवांचा समागम असावाच अशी कोणाची इच्छा असेल तर त्यानें सम्यग्दृष्टि सौधर्मेंद्र व शची–इंद्राणी व लौकांतिक देवांचा समागम प्राप्त व्हावा म्हणून तरी इच्छा करावी. अन्य अधम देवांची आराधना करून काय साध्य व्हावयाचें आहे ?

× अज्ञानी जीव जिनेश्वराची पूजा करितांना प्रथमतः क्षेत्रपालाचें पूजन करितात. त्यांना कोणी विचारिलें कीं, अहो अगोदर त्रैलोक्यपूज्य भगवंताची पूजा सोडून क्षेत्रपालाची पूजा करण्याचें

---

× टीपः— क्षेत्रपालादिकांची पूजा करणें याचा अर्थ ते अरिहंत देवाप्रमाणें समजून पूजा करणें असा ग्रंथकर्त्यानें आशय समजून त्यावर टीका केली आहे. पण समवसरणांत जशी रचना आहे तशीच येथील जिनमंदिरांत असावी. जिनमंदिर हें समवसरणाचें प्रतिबिंब आहे म्हणून तेथील रचना जिनमंदिरांत सर्वसामान्य लोकांवर धर्माचें प्रेम व ऐश्वर्य याचा प्रभाव पडून ते धर्मोन्मुख व्हावें या हेतूनें केलेली आहे. यांत पूजा याचा अर्थ सन्मान असाच घ्यावा. अनेक आचार्यांनीं प्रतिष्ठादि कार्यांत त्यांचें आव्हान करून त्यांचा सन्मानदर्शक चिन्ह म्हणून अर्घ्य दिलेला असतो. त्यांच्या व भगवंताच्या अर्घ्यमंत्रांतही फरक आहे. ' इदं जलं चंदनं अक्षतं चरुं पुष्पं फलं अर्घ्यं गृहाण ' असें म्हटलें जातें व भगवंताच्या अर्घ्यांत ' इदं अर्घ्यं निर्वपामि स्वाहा ' असें म्हटलें जातें. यावरून दोघांची योग्यता बरोबर मानलेली नाहीं हें उघड आहे. कांहीं मूढ लोक तसें मानीत असले तर तें त्यांचें अज्ञान समजून त्याना यथार्थ मार्ग दाखविणें हें पंडितांचें काम आहे.

काय प्रयोजन ? यावर ते असें उत्तर देनात कीं, ज्याप्रमाणें राजदर्शनाकरितां जात असतांना अगोदर द्वारपालाची परवानगी घ्यावी तेव्हां कोठें राजदर्शन होतें, त्याप्रमाणें भगवंताचें पूजन करितांना अगोदर क्षेत्रपालाचें पूजन करावें लागतें. क्षेत्रपालाशिवाय भगवंताकडे पूजा कोण पोंचवील ? त्या मूढांना असा विचार उत्पन्न होत नाहीं कीं, भगवान् मोक्षामध्यें राहतात. त्या भगवंताच्या परमात्म-स्वरूपाला हा मिथ्यादृष्टि अज्ञानी क्षेत्रपाल कसा जाणूं शकेल ? त्यांची भेट तरी कशी करवील ? व तो संकटाचा नाश कसा करूं शकेल ? ज्याला आपलें विघ्न नाहींसें करितां येत नाहीं तो दुसऱ्याचें संकट कसें नष्ट करूं शकेल ? अविचारी लोकांनीं क्षेत्रपालाचें विपरीत स्वरूप कथन करून वीतराग भगवंताच्या मंदिरांत त्यांना स्थापन केलें आहे. क्षेत्रपालाचें स्वरूप पाहतां त्याचे हातांत मनुष्याचें कापलेलें मस्तक आहे, दुसऱ्या हातीं खड्ग, गदा वगैरे शस्त्रें असून त्याचें वाहन कुत्रा ठरविलें आहे.गूळ व तेल भक्षण करण्यानें ते संतुष्ट होतात असें सांगून लोकांच्या बुद्धींत भ्रम उत्पन्न केला आहे. त्यामुळें मूर्ख लोक त्याचें स्तवन-पूजन करितात. हा सर्व मिथ्यादर्शन व कुज्ञानाचा प्रभाव आहे. श्रीपार्श्वनाथाची प्रतिमा नागाच्या फणीशिवाय बनवीतच नाहींत. समवसरणांत भगवंताच्या मस्तकावर धरणेंद्र आपली फणा धरून उभा राहील हें संभवत नाहीं. धरणेंद्रानें श्रीपार्श्वतीर्थंकर तपश्चरण करीत असतांना फणामंडप केला होता, त्यानंतर त्यानें कोठेंही भगवंताकरितां कार्य केल्याचें वर्णन नाहीं. पार्श्वजिनेंद्र अरिहंत झाले. इंद्राच्या आज्ञेनें कुबेरानें समवसरण रचिलें, त्याठिकाणीं मस्तकावर फणा धारण करून भगवान् विराजमान झाले असेंही कोठें शास्त्रांत सांगितलेलें नाहीं. चार निकाय देव, मनुष्य, तिर्यंच त्याठिकाणीं येऊन धर्मश्रवण, स्तवन, वंदन करीत असत. त्याठिकाणीं अरिहंतबिंबाची स्थापना फणासह करणें हें कसें संभवतें ? वीतराग मुद्रा अशी असूं शकत नाहीं. पण कालप्रभावानें धरणेंद्राची पूजा प्रभावना प्रगट करण्याकरितां कांहीं लोकांनीं विपरीत कल्पना रचली, ती दूर कोणी करावी ? ज्याप्रमाणें पाषाणाच्या सर्वांगसुंदर अशा प्रतिमेचे कान-मस्तकाला आधार रहावा म्हणून खांद्यापयत जोडलेले असतात त्याप्रमाणें सर्व धातूच्या प्रतिबिंबाचेही कान लांब करून खांद्यापर्यंत जोडून टाकलेले पाहण्यांत येतात. हें सर्व देखादेखी अविचाराचें कृत्य आहे. याचप्रमाणें अरिहंताच्या प्रतिबिंबावर फणाचा आकार कित्येकांनीं केलेला पाहून फणा करण्याची चाल पडली असावी. फणामंडप केला एवढ्यानेंच धरणेंद्राला पूज्य मानणें हा मुर्खपणा आहे. याप्रमाणें अनेक प्रकारची देवमूढता आहे. गणपति, हनुमान्, योनि-लिंग, चतुर्मुख, षणमुख वगैरे ज्यांत मुळींच देवपणा नाहीं त्यांना व तिर्यंचाच्या स्वरूपाला व वडपिंपळादि वृक्षांना, पाण्याला, अग्नीला, वायूला अन्नाला वगैरे देव मानणें या सर्वांचा देवमूढतेंत अंतर्भाव होतो.

क्षेत्रपाल पूजनीय नाहींत.

**पाखंडी मूढ**

**सग्रन्थारम्भहिंसानां संसारावर्तवर्तिनाम् ।**
**पाखण्डिनां पुरस्कारो ज्ञेयं पाखण्डिमोहनम् ॥ २४ ॥**

*अर्थ*– परिग्रह ठेऊन आरंभ व हिंसा करणाऱ्या आणि संसारपरिभ्रमण करणाऱ्या अशा

मिथ्यादृष्टि साधूंचा सत्कार करणें याला पाखंडिमूढ म्हणतात.

**विशेषार्थ**– जिनधर्माचें ज्ञान व श्रद्धान मुळींच नसतांना अनेक प्रकारचे वेष धारण करून व स्वतःला उच्च समजून जगांत लोकांकडून आपली पूजा-सत्कार इच्छिणारा असा जो कोणी पुरुष परिग्रह ठेऊन शेती उद्योग वगैरे तसेंच यज्ञयागादिकांत पशु वगैरेची हिंसा करणें व इंद्रियांच्या विषयावर प्रीति करणाऱ्या संसारी, असंयमी, अज्ञानी लोकांशीं गोष्टी करण्यांत मोठा अभिमान बाळगून स्वतःस आचार्य अथवा पूज्य साधु म्हणवून, युद्धशास्त्र, शृंगारशास्त्र, हिंसेला कारणीभूत असे आरंभशास्त्र व रागद्वेष वाढविणारें शास्त्र यांचा, स्वतः महंत होऊन उपदेश देणारा पाखंडी म्हणावा. अशा लोकांस अनेक प्रकारच्या मधुर भोजनाची लोलुपता असल्यानें कामविकाराच्या कथा सांगण्यांत आनंद वाटतो व त्यामुळें परिग्रह वाढविण्याकरितां ते सदैव अशाच प्रकारचें दुर्ध्यान करित असतात. लोकांनीं पूज्य मानून नमस्कार करावा अशी ज्यांना इच्छा असते व जे विकथा करण्यांत, विषयसेवन करण्यांत, मंत्र, तंत्र, जप, होम, मारण, उच्चाटण, वशीकरणादि निंद्य आचरण करण्यांत तत्पर असतात ते सर्व पाखंडी आहेत. अशा लोकांच्या वचनांवर भरवंसा ठेवणें, त्यांचा सत्कार करणें व त्यांनीं सांगितलेलें धर्मकार्य श्रेष्ठ आहे असें मानणें ही पाखंडिमूढता जाणावी.

**आठमद**

**ज्ञानं पूजां कुलं जातिं बलमृद्धिं तपो वपुः ।**
**अष्टावाश्रित्य मानित्वं स्मयमाहुर्गतस्मयाः ॥ २५ ॥**

**अर्थ**–ज्ञान, पूजा, कुल, जाति, बल, ऐश्वर्य, तप आणि शरीर या आठ पदार्थांच्या अवलंबनानें गर्व करणें, याला आठ मद असें गणधरांनीं म्हटलें आहे.

**विशेषार्थ**–ज्ञानाचा गर्व, पूजेचा गर्व, कुलाचा गर्व, जातीचा गर्व, बळाचा गर्व, ऐश्वर्याचा गर्व, तपाचा गर्व आणि शरीराचा गर्व असे आठ गर्व सम्यग्दृष्टि पुरुष करीत नाहींत. ज्यांना यांतून एकही मद असेल त्याला सम्यक्त्व असूं शकणार नाहीं. सम्यग्दृष्टि पुरुष ज्ञानमदाविषयीं आपल्या मनांत पुढें लिहिल्याप्रमाणें विचार करितो,

ज्ञानमद

" हे आत्मन, तुला इंद्रियापासून उत्पन्न झालेलें ज्ञान प्राप्त झालें आहे याचा गर्व काय म्हणून करितोस ? अरे, हें ज्ञान ज्ञानावरणाच्या क्षयोपशमाच्या स्वाधीन असून विनाशिक आहे. हें इंद्रियांच्या व वातपित्तकफादिकांच्या अधीन आहे. याचा केव्हां नाश होईल हें सांगतां येत नाहीं. याचा गर्व कां ? इंद्रियें नष्ट होतांच हें तुझें ज्ञानही नष्ट होणारें आहे. वातपित्तकफाची हीनाधिकता होतांच हें ज्ञान विपरीत होऊन जातें. हें इंद्रियजनितज्ञान पर्यायाच्या मागोमाग नाहींसें होणारें आहे. अरे, तूं कित्येकवेळां एकेंद्रिय झालास त्यावेळीं तुला चार इंद्रियें नव्हतीं. एकेंद्रियांत जडरूप, पाषाण व धूळ अशा पृथ्वीस्वरूपांत राहून असंख्यात काल अज्ञानी होऊन राहिलास. कित्येक वेळां विकलत्रयांत उत्पन्न झालास पण त्यावेळीं हिताहिताचें ज्ञान उत्पन्न झालें नाहीं. कित्येक वेळां कुत्रा, वाघ सर्पादि योनीमध्यें जन्म घेऊन भ्रमण केलें. निगोदांत तर अक्षराच्या अनंताव्या भाग-

इतकें ज्ञान राहिलें होतें. मिथ्यात्वाच्या प्रभावानें आत्मज्ञान झालें नाहीं म्हणून तेथून पुनः एकेन्द्रिय योनींत जन्मून अनंत काल परिभ्रमण करावें लागलें. मनुष्ययोनींत उत्पन्न होऊनही फार थोड्यांना यथार्थज्ञान प्राप्त होतें. त्यावेळीं कित्येक नीच कर्म करण्यांत निमग्न होतात. तर कित्येक अनेक जलचर जीव, स्थलचर जीव, आकाशसंचारी जीव यांना धरण्याकरितां, त्यांना बांधण्याकरितां, नानाप्रकारचीं यंत्रें अथवा पिंजरे, जाळीं, फांसे तयार करण्यांत आपलें बुद्धिचातुर्य योजितात. कित्येक अनेक प्रकारच्या तरवारी, बंदूका, तोफा, बाण वगैरे परपीडा करणारीं शस्त्रास्त्रें तयार करण्यांत प्राविण्य संपादन करतात व आपल्या बुद्धिविकासाच्या बळावर उन्मत्त होऊन हजारों गांव व देश विध्वंस करून टाकण्यांत धन्यता मानतात. दुसरे कित्येक सिंह, वाघ, वराह वगैरेची शिकार करण्यांत वाकबगार होतात. कित्येक ज्ञान संपादन करून लोकांचें धन हरण करण्यांत व पद्धतशीर दरवडे घालण्याचें साहस करितात, कित्येक आपणांस जास्त ज्ञान प्राप्त झाल्यानें भोळ्या लोकांचा तिरस्कार करण्यांत व खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करून देण्यांत व धन आणि प्राण हरण करण्यांत आपलें चातुर्य प्रगट करितात. कित्येक रत्न–पाषाण–धातु वगैरे पदार्थांच्या अनेक वस्तु बनविण्यांत व कित्येक चित्रें, वस्त्र, प्रावरण, राजवाडे वगैरे बनविण्यांत प्रावीण्य संपादन करितात. दुसरे कित्येक जीव आपल्या ज्ञानाच्या विशेषत्वानें अनेक प्रकारचीं शृंगार, युद्ध, वैद्यक शास्त्राची रचना करून राजेलोकांना संतुष्ट करितात व अनेक छंद, अलंकार, व्याकरण विद्या, ऐकांतिक न्यायविद्या, पुराण, क्रियाकांडादि शास्त्रांचें प्ररूपण करून आत्मज्ञानरहित मिथ्याज्ञानाचा प्रचार करितात. कित्येक वीतराग धर्म धारण करूनही मिथ्यात्वाचा तीव्र उदय प्राप्त झाल्यानें सत्यार्थ ज्ञान श्रद्धान प्राप्त करून घेण्यास असमर्थ असूनही आपला अभिमान शेवटास नेण्याकरितां सूत्रविरुद्ध मार्गाची प्रवृत्ति करून आपणास कृतार्थ मानतात.याप्रमाणें विशेष ज्ञान प्राप्त होऊनही मिथ्यात्वाच्या प्रभावानें अधिकाधिक बंध करून तूं आजवर आपलें अहित करून घेतलें. आतां सद्गुरूंचा उपदेश प्राप्त झाला त्याअर्थी ज्ञानाचा गर्व करूं नको. तुझा स्वभाव संपूर्ण लोकालोकाला जाणण्याचा आहे. कर्माच्या क्षयोपशमानें प्राप्त झालेल्या व इंद्रियाच्या स्वाधीन असलेल्या यत्किंचित् ज्ञानाचा काय म्हणून गर्व करावा ? ज्याप्रमाणें एखाद्या प्रबल शत्रूनें एखाद्या चक्रवर्ती राजाला बांधून बंदिखान्यांत ठेवावें व अनेक प्रकारचें निकस भोजन देऊन त्याचा छळ करावा. पुढें एकादे वेळीं गोड भोजन द्यावें म्हणून हुकूम करावा. यामुळें मंडलेश्वर राजानें आपणांस मिष्टान्न भोजन प्राप्त झालें म्हणून आनंद मानावा काय ?

याचप्रमाणें आत्मन् तुझ्या अनंत ज्ञानस्वरूप केवलज्ञानाला या कर्मांनें बांधून देहरूपी कैदखान्यांत पराधीन करून ठेविलें आहे. आतां इंद्रियद्वारें किंचित् ज्ञान प्राप्त झालें त्यामुळें गर्व करण्यासारखें काय प्राप्त झालें ? हें इंद्रियजन्य ज्ञान विनाशिक व पराधीन आहे. पर्यायाबरोबर अवश्य नाहींसें होणारें आहे. या पर्यायांतही रोगामुळें, वृद्धपणामुळें, इंद्रियाच्या अशक्तपणामुळें, दुष्टांच्या संगतिमुळें, विषयकषायांच्या अधिकतेमुळें, तें क्षणार्धांत केव्हां नाहींसें होईल याचा भरवंसा

ज्ञानाचा उपयोग सद्ग्रंथ रचना करण्याकडे करावा

नाहीं. म्हणून असें नश्वर इंद्रियजनित ज्ञान प्राप्त झाल्यानें तूं गर्व करूं नये. यामुळें तर तुझे सर्व गुण नाहींसे होऊन एकेंद्रियामध्यें जाऊन पुनः उत्पन्न व्हावें लागेल. यावेळीं तुला कांहीं ज्ञान प्राप्त झाल्यामुळें धर्मचर्चा करण्याची शक्ति असेल, कांहीं श्लोक, काव्य, छंद वगैरे नवीन रचण्याची बुद्धि असेल, सिद्धांताचें वर्म समजण्या इतकें ज्ञान प्राप्त झालें असेल तर त्यामुळें गर्व करणें योग्य नाहीं. पूर्वकालीं मोठमोठ्या ज्ञानी वीतरागी आचार्यांनीं रचलेल्या ग्रंथाकडे पहा. श्रीअकलंक देवांनीं लघीयस्त्रयी, बृहत्त्रयी व चूलिका वगैरे सात ग्रंथ रचिले. त्यांत प्रवेश होण्याकरितां माणिक्यनंदि नामक मुनीश्वरांनीं परीक्षामुख ग्रंथाची रचना केली. त्यावर प्रमेय–कमल–मार्तंड नामक बारा हजार श्लोकांची टीका श्रीप्रभाचंद्राचार्यांनीं रचिली. लघीयस्त्रयीवर न्यायकुमुद–चंद्र नांवाची सोळा हजार श्लोकांची टीका श्रीप्रभाचंद्रांनीच लिहिली आहे. तत्त्वार्थसूत्रावर गंधहस्तिमहाभाष्य नामक चौऱ्यांशीं हजार श्लोकांत रचलेला ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहीं. तरी त्याचें मंगलाचरण देवागमस्तोत्र नांवानें प्रसिद्ध आहे. त्यावर विद्यानंद स्वामींनीं आठ हजार श्लोकांत आप्तमीमांसा नामक-अष्टसहस्री नामक ग्रंथाची रचना केली आहे. अकलंक देवांनीं राजवार्तिक लिहिलें आहे. त्यावर विद्यानंद स्वामींनीं अठरा हजार श्लोकांत श्लोकवार्तिक रचिलें आहे. आप्तपरीक्षेंतील निर्बाध प्रतिपादनशक्ति पाहून मोठमोठ्या विद्वानांचा गर्व नाहींसा होतो. याचप्रमाणें नाटकत्रय, सारत्रय वगैरे अनेक स्याद्वाद प्रतिपादक ग्रंथ पाहूनही तुला आपल्या ज्ञानाबद्दल गर्व वाटत असेल तर आश्चर्य आहे. यावेळीं श्रुतज्ञानावरणाच्या क्षयोपशमानें कदाचित् किंचित् ज्ञान प्राप्त झालें असेल तर मोठा अलभ्य लाभ समजून आत्म्याला विषयापासून व अभिमानादि कषायापासून पराङ्मुख करून परम साम्यभाव धारण करून संसारपरिभ्रमणाचा अभाव होईल असा यत्न कर. ज्ञानाचा गर्व करून आत्म्याला अनंत संसारांत बुडवूं नकोस."

आतां दुसऱ्या पूज्यपणाचा गर्व सम्यग्दृष्टि करीत नाहीं. कारण राज्य, ऐश्वर्य वगैरे आत्म्याचा स्वभाव नव्हेत. ते कर्मापासून उत्पन्न होऊन विनाश अवस्थेला प्राप्त होणारे आहेत. पराधीन असून दुर्गतीला कारण आहेत. आपलें ऐश्वर्य अनंतचतुष्टयस्वरूपीं, अक्षय-अविनाशी, अखंड सुखस्वरूपी, अनंतज्ञानदर्शनस्वरूपी व अनंतशक्ति स्वरूपी आहे. कर्मापासून उत्पन्न होऊन आत्म्याला दुःख देऊन दुर्गतीला पोंचविणारें व स्वस्वरूपाला भुलविणारें हें ऐहिक ऐश्वर्य आत्म्याचें स्वरूप नव्हे. हें कलहाचें मूल, वैराचें कारण, क्षणभंगुर, परमात्मस्वरूपाला भुलविणारें, अतिक्षोभ उत्पन्न करणारें व दुःखरूप आहे, हें अनेक जीवांचा घात करणारें आहे. महान् आरंभपरिग्रहांत गुंतवून नरकाला पोंचविणारें आहे. असें ऐश्वर्य प्राप्त होण्यानें मोठेपणा आपला किती दिवस राहील? जगांत द्रव्यलोभी व अज्ञानी लोक आपणांस मोठें मानून सत्कार करितात. पण राज्य संपदादिकांवर किती दिवस आपली मालकी राहणार आहे? मृत्यु जवळ येत चालला. आपणासारखें अनंतानंत जीव संपत्तीच्या प्रीतीनें आजवर आत्मविचार न करितां संसारांतून नाहींसे झाले. ऐश्वर्य हें कर्मकृत असून परवस्तूच्या संयोगानें प्राप्त होत असतें

पूजामद

म्हणून दान, सन्मान, शील, संयम, व परजीवांवर उपकार करून त्या ऐश्वर्यांचा उपयोग करणें हें प्रशंसनीय आहे. ऐश्वर्य प्राप्त झालें असतां त्याचा गर्व न करितां शांत व समबुद्धि ठेवून नेहमीं नम्रतेनें वागणें हें शुभगतिला कारण आहे. या उलट मिथ्यादर्शन जनित मिथ्याभाव जीवाला स्वत्वाचा विसर पाडून व ऐश्वर्यांनें उन्मत्त बनवून नरकाला पोंचवितो असें निश्चित समजणारा सम्यग्दृष्टि जीव पूज्यपणाचा व ऐश्वर्याचा गर्व करीत नाहीं, व इतर जीवाला अशुभकर्माच्या उदयानें दारिद्र्य प्राप्त झालें म्हणून तिरस्कार किंवा अवज्ञाही करीत नाहीं, उलट त्यावर करुणाच करितो.

सम्यग्दृष्टी जीव कुलाचा गर्व करीत नाहीं. याविषयीं तो असा विचार करितो कीं, पित्याच्या वंशाला कुल म्हणतात. आत्मा हा कोणी उत्पन्न केलेला नाहीं. तो ज्ञानस्वरूप आहे. मग ज्ञानस्वरूपी मला कुल कसचें? जाणणें व पाहणें हेंच माझें कुल आहे.

कुलमद

अनादिकालापासून कर्माच्या स्वाधीन झाल्यामुळें या अवस्थेंत मला उत्तम कुल प्राप्त झालें असलें म्हणून त्याचा गर्व करण्यांत काय अर्थ आहे? पूर्वजन्मीं मी अनेकवेळां नरकांत जन्मलों, अनंतवेळां सिंह, वाघ, सर्पाच्या कुलांत जन्मलों. अनंतवेळां गाढव, घोडा, उंट, डुकर, मेंढा वगैरेंच्या कुलांत जन्मलों. अनंतवेळां म्लेच्छ, भिल्ल, चाण्डाल, चांभार, धीवर, कसाई, न्हावी, परीट, तेली, लोहार, भडभुंज्या, चारण, भाट वगैरे कुलांत जन्मलों, अनंतवेळां दरिद्र्याच्या कुलांत जन्मलों. यावेळीं कांहीं शुभ कर्माच्या उदयानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य कुलांत सुदैवानें जन्म झाला आहे म्हणून कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या कुलाचा गर्व करणें हें अज्ञान आहे. या कुलांत मी किती दिवस राहणार आहे? अनादिकालापासून माझा या कुलांत किंवा जातींत वास नव्हता. आता नवीन उत्पन्न झालों आहे व लौकरच येथून नष्ट होऊन पुनरपि आपल्या पुण्यपापाप्रमाणें दुसरीकडे जन्म घ्यावा लागणार आहे. सांप्रत उत्तम कुलांत उत्पन्न झालों त्या अर्थीं मोक्षमार्ग प्राप्त करून देणाऱ्या रत्नत्रयाला संपादन करून नीच आचरणाचा त्याग केला तरच त्याची सफलता होणार आहे" सत्पुरुषांनीं नेहमीं असा विचार मनांत आणावा कीं ज्याअर्थीं पुण्योदयानें आपला उत्तम कुलांत जन्म झाला आहे त्याअर्थीं नीच कुलांतील माणसाप्रमाणें आपण अभक्ष्यभक्षण करणें योग्य नाहीं. भांडण, दुराग्रह, मारण, ताडण, शिवीगाळ, अभद्र उच्चार, वगैरे आपण मुखावाटें काढू नये. तसेंच थट्टा, खोटें भाषण, छलकपट वगैरे करणें हेंही आपणास योग्य नाहीं. जुवा खेळणें, वेश्यासेवन करणें, परधन हरण करणें व निन्द्यकर्म करून आपली उपजीविका करणें योग्य नाहीं. उत्तम कुलांत उत्पन्न होऊनही जर हीं निंद्य कृत्यें आपण करूं तर आपला जगांत सर्वलोक तिरस्कार करतील. या सर्व कारणाकरितां सम्यग्दृष्टि पुरुष कुलाचा गर्व करीत नाहींत.

याचप्रमाणें सत्पुरुष जातीचाही गर्व करीत नाहींत. आईच्या वंशाला जाति म्हणतात. ते असा विचार करितात, "अनेकवेळां आपण नीच जातींत उत्पन्न झालों आहोंत. आतां यावेळीं एकदा उच्च जातींत

उत्पन्न झालों पण अनेकवेळां नीचजाती व अनंतवेळां उंचजाति आपणांस प्राप्त झाली आहे. आतां उच्च जाति प्राप्त झाली म्हणून त्यांत गर्व करण्यासारखें काय आहे ? अनेकवेळां निगोदांत उत्पन्न झालों. कुतरी, मांजरी, चांडाळीण, भिल्लीण, चांभारीण, वेश्या वगैरेंच्या गर्भांत अनन्त जन्म धारण केले आहेत. म्हणून नीच जातींत उत्पन्न झालेल्यांचा तिरस्कार करणें हें योग्य नव्हे. उच्च जातीच्या आईच्या पोटीं जन्म झाला म्हणून उन्मत्त कां व्हावें ? जाति पुण्य-पापकर्माचें फल आहे. हें कर्म आपला रस देऊन नाहींसें होईल. जाति कुलामध्यें किती दिवस स्थिर राहतां येईल याचा विचार करून तें नाशवंत व कर्माधीन जाणून उत्तम शील धारण करण्यांत, क्षमा ग्रहण करण्यांत, स्वाध्याय करण्यांत, परोपकार करण्यांत, दान देण्यांत, आदर-सत्कार व विनय करण्यांत आपल्या जातीचा उच्चपणा सफल करावा."

जातिमद

शक्तिचा गर्वही सम्यग्दृष्टि जीवांना होत नाहीं. ते विचार करितात "माझा आत्मा अनंतशक्ति धारण करणारा आहे. पण कर्मरूपी बलवान् शत्रूनें त्याची शक्ति नाहींशी करून एकेन्द्रियादि व विकलत्रयादि अवस्थेंत पाडून त्याची इतकी नीच अवस्था करून टाकिली आहे कीं, जगांतील सर्व लोक त्याला आपल्या पायांनीं तुडवून टाकीत आहेत. आतां वीर्यांतराय नामक कर्माच्या किंचित् क्षयोपशमामुळें मनुष्यशरीरांत आहारामुळें थोडीशी शक्ति प्राप्त झाली आहे. या शरीराच्या आधारानें असणारें पराधीन बल, मी तपश्चरण करून कर्माचा नाश करण्यासाठीं उपयोगांत आणिलें तर तें प्राप्त होण्याची सफलता झाली असें समजावयाचें. शक्ति प्राप्त झाली आहे त्याअर्थीं व्रत, उपोषण, शील, संयम, ध्यान, कायोत्सर्ग करून आत्मलाभ करून घेऊं या. कर्माच्या प्रबल उदयानें प्राप्त झालेल्या उपसर्गापासून चलायमान होणार नाहीं असा निश्चय करूं या. रोग, दारिद्र्य वगैरे कर्माच्या प्रहारापासून भयभीत होणार नाहीं असा यत्न करूं या. आपल्या अंगीं बल असल्यानें अयाचकवृत्ति व स्वाभिमान वगैरे क्रिया जर आपणाकडून घडतील तर बल प्राप्त होण्याची सार्थकता आहे. याचप्रमाणें दीनदरिद्री असमर्थ अशा लोकांनीं उच्चारलेलीं दुर्वचनें श्रवण करून ही मी क्षमा धारण करीन, तर माझ्या आत्म्यामध्यें विशुद्धतेच्या प्रभावानें दुर्जय कर्माला मारून क्रमानें अनन्त वीर्य प्रगट होईल व त्यामुळें मला अविनाशी पद प्राप्त करून घेतां येईल. असें न करितां जर शक्ति प्राप्त झाली म्हणून दुर्बलाचा घात करीन, दुबळ्या जीवांचें धन, स्त्री, घर वगैरे हरण करीन, त्यांचा अपमान व तिरस्कार करीन तर सिंह, वाघ, सर्पादि दुष्ट तिर्यंच जीवाप्रमाणें परजीवांचा घात करण्याकरितांच मला शक्ति प्राप्त झाली असें होईल. यापासून दीर्घकालपर्यन्त नरकतिर्यंच योनींत अनंत दुःख भोगावें लागून निगोदांत अनंतानंतकाल परिभ्रमण करावें लागेल. म्हणून बलाचा गर्व करण्यापासून आत्म्याचा घात होतो तसा इतर पदार्थापासून होत नाहीं असें जाणून शक्तिचा गर्व करूं नये"

बलगर्व

ऋद्धि म्हणजे धन सम्पत्ति. ती प्राप्त झाली असतां ज्ञानी पुरुष त्याबद्दल गर्व करीत नाहींत. सम्यग्दृष्टि पुरुषाला तर धनादिक परिग्रहांचा मोठा बोजा आपले शिरावर आहे असें वाटतें. संपूर्ण परिग्रहांचा त्याग करून आत्मधन सांभाळण्याची वेळ सुदैवानें कधीं प्राप्त होईल अशी चिन्ता त्याला लागलेली असते. संपत्तीचें अथवा परिग्रहाचें ओझें हें आत्म्याला जबरदस्त बंधन आहे. यापासून रागद्वेष, सन्ताप, क्लेश, शोक वगैरे हानि उत्पन्न होतें. गर्व उत्पन्न होतो. अनेक प्रकारच्या पापक्रियांचा आरंभ करावासा वाटतो. हा परिग्रह दुःखरूप दुर्गतीचें बीज आहे. नासिकामलांत ( शेंबडांत ) पडलेल्या माशीला जसें स्वतः सुटून जाता येत नाहीं, अथवा चिखलांत फसलेल्या म्हाताऱ्या अशक्त बैलाला जसें वर निघतां येत नाहीं, अथवा चिखलाच्या डोहांत फसलेल्या हत्तीला जसें वर निघतां येत नाहीं तसें तो या धनकुटुम्बादि फंदामध्यें फसून गेला आहे. यांतून निघावें अशी इच्छा असतें पण अशक्तपणामुळें, रागादिकांच्या प्रबळ उदयामुळें व पुढल्या स्थितींत निर्वाह होणें फार कठिण आहे असें वाटून तो फार भयभीत होतो यामुळें त्याला या संसारांतून मोकळें होतां येत नाहीं.

ऋद्धिमद

याप्रमाणें संपत्तीचा तिरस्कार करणारा अथवा संपत्तीपासून भयभीत झालेला सम्यग्दृष्टि जीव पराधीन, विनश्वर व दुःखस्वरूप संपदेचा गर्व करीत नाहीं. त्याला संपत्तीचा आपल्याशीं संयोग झालेला पाहून लाज वाटते. अविनाशी अखंड मोक्षलक्ष्मी स्वाधीन करून घेतां येईल असें असूनही तो ऐहिक नाशवंत लक्ष्मीचा त्याग करूं इच्छित नाहीं. याबद्दल मनांत तो अत्यंत दुःखी असतो.

तपाचा गर्वही सम्यग्दृष्टीला नसतो. गर्व हा तपाचा नाश करणारा आहे. ज्यांनीं तपाच्या प्रभावानें अष्टकर्मरूपी वैऱ्याचा नाश करून परमात्मपद प्राप्त करून घेतलें ते धन्य होत. मी संसारांत आसक्त होऊन आपलीं इन्द्रियें विषयापासून क्षणमात्र परावृत्त करण्यास समर्थ नाहीं. मी कामविकाराला जिंकिलें नाहीं. निद्रा, प्रमाद, आळस ही कमी केली नाहीं. इच्छेचा प्रतिबंध कधीं केला नाहीं. माझी पर्यायावरील लालसा कमी झाली नाहीं. माझी जगण्याची इच्छा मिटली नाहीं. मरण्याचें भय दूर झालें नाहीं. निंदा, स्तुति, लाभ, अलाभाविषयीं समभाव कधीं झाला नाहीं. अशा स्थितींत कसलें तप? ज्यायोगें कर्मवैऱ्याला जिंकता येऊन शुद्ध आत्मदर्शनांत लीन होतां येतें त्याला तप म्हणतात. अर्थात् असें तप व वीतरागता ज्यांना प्राप्त झाली असेल ते धन्य होत. असा विचार करणाऱ्या सम्यग्दृष्टि पुरुषाला तपाचा गर्व कधींही होत नाहीं.

तपमद

शरीरसौन्दर्याचा ज्ञानी पुरुषास गर्व नसतो कारण सम्यग्दृष्टि पुरुष आपलें रूप ज्ञानमय आहे असें पाहतो. ज्या ज्ञानमयी रूपांत सर्व वस्तु यथार्थ पाहता येतात तेंच माझें यथार्थ रूप. चामड्यानें मढविलेल्या ह्या शरीराचें सौन्दर्य हें रूप नव्हें. शरीरसौन्दर्य क्षणमात्रांत नाहींसें होणारें आहे. एक दिवस आहार घेतला नाहीं तर हें विद्रूप दिसू लागतें. शरीराचें रूप विनाशिक आहे. वृद्धपणा प्राप्त झाला

रूपमद

म्हणजे हेंच रूप भयंकर दिसूं लागतें. रोग अथवा दारिद्य प्राप्त झालें असतां याच्या सौंदर्याकडे कोणी ढुंकूनही पाहत नाहीं व स्पर्शही करीत नाहीं अशा सौन्दर्याचा गर्व कोणता ज्ञानी पुरुष करील ? आपलें रूप क्षणांत आंधळें झाल्यानें, कुबडें झाल्यानें, काणें, लंगडें, पांगळें, वक्रमुखी, लंबोदर वगैरे अवस्था होण्यानें विद्रूप होणारें आहे.

या रूपाचा गर्व करणें अनर्थावह आहे. सुंदर रूप प्राप्त झालें असेल तर शील मलिन होऊं देऊं नये. दरिद्री, दुःखी, रोगी, अंगहीन, कुरूप, मलिन, पुरुषांना पाहून तिरस्कार करूं नये. त्यांची ग्लानि करूं नये. संसारांत परिभ्रमण करीत असतांना आपणाला मनुष्य-तियच-योनींत सौंदर्य व कुरूपता अनेक वेळां प्राप्त झाली आहे म्हणून रूपाचा गर्व करणें योग्य नाहीं. याप्रमाणें सम्यग्द-र्शनाचा नाश करणाऱ्या आठ मदांचा आपणास संसर्ग होणार नाहीं असें करणें योग्य आहे.

यापुढें मदानें उन्मत्त होऊन जे धर्मात्मा पुरुषांचा तिरस्कार करितात त्यांना दोष लागतो असें सांगतात :—

**स्मयेन योऽन्यानत्येति धर्मस्थान्गर्विताशयः।**
**सोऽत्येति धर्ममात्मीयं न धर्मो धार्मिकैर्विना ॥ २६ ॥**

**अर्थ**—जो गार्विष्ठ पुरुष इतर धर्मवान् पुरुषांचा तिरस्कार करितो तो आपल्या धर्माचा तिरस्कार करितो असें जाणावें. कारण धर्मात्मा पुरुषांशिवाय धर्म असूं शकत नाहीं.

**विशेषार्थ**— जगांत धन, ऐश्वर्य, सत्ता हीं ज्यांना सुदैवानें प्राप्त होत असतात अशा पुरुषांना त्याबद्दल गर्व वाटूं लागतो. त्यावेळीं देव-गुरु-धर्माचा विनय करण्याचें देखील त्यांना भान राहत नाहीं. गर्विष्ठ पुरुषाचें मनांत असे विचार येतात कीं, देवालय म्हणजे कोण वस्तु आहे ! असलीं देवालयें मी शेकडों नवीन निर्माण करीन. हें देवालयही मीच बांधविलें आहे. जे तपस्वी व त्यागी गृहस्थ आहेत तेही माझ्या अधीन असल्यासारखेच आहेत. कारण त्यांना वस्त्रप्रावरण व भोजन वगैरे मीच पुर-

गर्विष्ठ पुरुषांची विचारपरंपरा

विनों म्हणून हे जगतात. आज धर्माचें अस्तित्व द्रव्य खर्चण्यावरच अवलंबून आहे. देवांची पूजा प्रभावना वगैरे पुष्कळ द्रव्य-खर्च केला म्हणजे होत असते. अशा विचारानें तो देवधर्म गुरूंची अवज्ञा करूं लागतो. याचप्रमाणें अभिमानाच्या त्वेषांत अनेक प्रकारचें पापाचरण करीत राहूनही क्वचित् पूजा प्रभावनेमध्यें थोडें द्रव्य खर्चण्यानें आपणांस मोठेपण प्राप्त झालें असें मानूं लागतो. ऐश्वर्यानें धुंद झाल्यानें त्यांस असें वाटतें कीं, जगांत द्रव्य हेंच श्रेष्ठ आहे. कारण धनवान् पुरुषांच्या घरीं मोठमोठे ज्ञानी, शास्त्रपंडित, काव्यकर्ते नेहमीं येऊन द्रव्यप्राप्तीच्या आशेनें शास्त्रश्रवण करवीत असतात. याचप्रमाणें अनेक कलावान् चतुर पुरुषही येतात. पूजन करणारे, प्रभावना करणारे, भजन करणारे हे धनवंताच्या आश्रयाला राहून त्यांचे मागोमाग फिरून आपली गाणीं श्रवण करवीत अस-तात. एक उपवास, दोन उपवास, तीन उपवास वगैरे व्रत करणारे तपस्वी त्यागीही श्रीमंतांच्याच घरीं

भोजन करण्याकरितां येत असतात. मंत्रजप, जाप्यादिकही श्रीमंतांना सुख व्हावें म्हणून केले जातात. यावरून सर्व धर्म व सर्व गुण द्रव्याच्या स्वाधीन आहेत. याप्रमाणें ऐश्वर्यानें आपण श्रेष्ठ आहोंत, आपण कृत-कृत्य आहोंत, आपणांस आतां कशाचीही जरूरी नाहीं असें समजून श्रीमंत लोक धर्म-वान् पुरुषांची अवज्ञा करितात. असे पुरुष आत्मज्ञानी, परमार्थी, परमसंतोष धारण करणाऱ्या पुरुषांकडे मुळींच पाहत नाहींत. ज्या सत्पुरुषांना चक्रवर्तीचीच काय पण इंद्रलोकाची संपत्ति देखील तुच्छ अर्थात् दुःखरूप दिसते, ते सत्पुरुष श्रीमंताचा सहवास स्वप्नांत देखील इच्छित नाहींत. जगांतील अल्प पुण्यवान् निर्धन लोक गृहकुटुंबाचें पालन होईल या आशेनें आपला अभिमान सोडून श्रीमंताच्या घरीं, ते मोठे दयाळु उपकारी असतील असें जाणून व धर्मवान् पुरुषांवर प्रीति करून त्यापासून आपणा स्वतःस पुण्यप्राप्ति करून घेणारे असतील असें समजून त्यांचें द्वाराशीं येतात. पण श्रीमंताला आपल्या द्रव्याचा एवढा मद चढलेला असतो कीं त्याला आपल्या पुढें कोण आला आहे हें दिसत नाहीं. मग दान देण्याची गोष्ट तर दूरच राहिली व उपकार तरी करतो कोण ? उलट ते कठिणहृदयी बनतात. जगांत आपला मानभंग होऊं नये व त्यांत कमीपणा कशानेंही येऊं नये या चिंतेनें प्रसंगीं मरण पत्करतात. या अतिशय ममत्व व कृपणपणाच्या प्रभावानें नरक-तिर्यंचादि गतीमध्यें त्यांना अनंतकाळ परिभ्रमण करावें लागतें.

ज्यांना ऐश्वर्य प्राप्त होऊनही गर्व होत नाहीं ते असा विचार करितात कीं, " हें धन, हें ऐश्वर्य, ही संपत्ति आमची नव्हे व हें आमचें स्वरूपही नव्हें. पूर्वजन्मीं केलेलें एखादें पुण्यकर्म उदयास आलें आहे. ही संपत्ति नाशवंत आहे त्याअर्थी यापासून कोणा-

**निगर्वी पुरुषाची विचारपरंपरा.**

वर तरी उपकार होईल असें कार्य करूं. दरिद्री लोकांना होत असलेलें दुःख नाहींसें करूं. करुणाभावानें दुःखित जीवावर उपकार करण्याचें कामीं याचा खर्च करूं. जिनधर्मावर श्रद्धान ठेवणारे कोणी ज्ञानी पुरुष दरिद्री असतील त्यांना हें धन देऊन त्यांची आकुलता नाहींशी करूं. सर्व जीव द्रव्याची आशा करीत असतात. मी दरिद्रि असतों तर मजपासून उपकार व्हावा असें कोणी इच्छिलें असतें ? आतां जर माझें शुभकर्म उदयाला येऊन फल देत आहे तर माझ्या आश्रयानें राहणाऱ्यांचें उदर-पोषण मी करीन. बालक, वृद्ध, रोगी, अनाथ, विधवा व अशक्त यांवर उपकार करण्यानेंच मला धन प्राप्त झाल्याचें सार्थक आहे. याशिवाय दुसरींही अनेक कार्यें आहेत त्यांपैकीं अशा कार्यांत माझें द्रव्य खर्च व्हावें कीं, त्यापासून जिनधर्माची परंपरा पुष्कळ काल सतत चालू रहावी, ज्ञानाभ्या-साची परंपरा टिकावी. नित्य पूजन, ध्यान, अध्ययन, तप व शील वगैरेनीं संसारांतून उद्धार करणाऱ्या कार्याची प्रवृत्ति व्हावी. असें झालें तरच धन प्राप्त झाल्याचें फल झालें व लाभ झाला. जर परोप-कारांत या द्रव्याचा उपयोग केला नाहीं तर हें नाशवंत असल्यानें कसें तरी नाहींसें होणार आहे. कोणाच्याही बरोबर ही संपत्ति परलोकीं आजपर्यंत गेली नाहीं. संपत्तीचा उपयोग दान देण्यांत केला नाहीं तर केवळ पाप व दुर्ध्यान उत्पन्न होऊन संसारसमुद्रांत बुडावें लागेल. संपत्ति प्राप्त

झाली असेल तर दान करणें हेंच तिचें फल आहे. कोट्यवधि माणसांनीं पूर्वजन्मीं दान केलें नाहीं म्हणून त्यांना घरोघर भिक्षा मागून पोटभर अन्न मिळत नाहीं, शरीराच्छादनाला कापड मिळत नाहीं. ते दीन होऊन लोकांच्या उच्छिष्टाची आशा करीत आहेत. हें सर्व दान न करण्याचें अर्थात् कृपणतेचें फल आहे. फार काय पण त्यांना मनुष्यांची व पशूंची सेवा करूनही पोटभर अन्न मिळत नाहीं. दान केल्याशिवाय पुढें संपत्ति प्राप्त होणार नाहीं. संपत्तीला दान-धर्मामध्यें लावलें तरच तिचें प्राप्त होणें सफल होईल. मरणानंतरही संपत्ति परलोकीं आपल्या बरोबर येणार नाहीं. जिथें ठेविली असेल तिथेंच राहील. त्याअर्थीं कोणा एखाद्या जीवावर उपकार करण्यांत खर्च होईल तीच आपली म्हणावी व त्यापासूनच पुढें कांहीं उपयोग झाला तर होईल" याप्रमाणें सम्यग्दृष्टि पुरुष विचार करून आपली संपत्ति परोपकार करण्यांत खर्च करण्याविषयीं नेहमीं तयार असतात.

यद्यपि धर्मवान् पुरुषांना संपत्ति ग्रहण करण्यायोग्य नाहीं. कारण तिच्यापासून मोह उत्पन्न होऊन आत्म्याला भुरळ पडते, म्हणून ज्ञानी पुरुष तिला आपलेपाशीं ठेवीत नाहींत. तरी ज्या जीवांचा चारित्रमोहाच्या उदयानें रागभाव कमी होत नाहीं त्यांनीं आपली संपत्ति परजीवावर उपकार करण्यांत अवश्य खर्च करावी. अतिशय कष्ट करून मिळविलेल्या संपत्तीला उत्तम कार्याकडे लावण्याचें सोडून ती इथेंच ठेऊन जाण्यांत आपलें काय बरें व्हावयाचें! याप्रमाणें विचार करून जे पापभीरू लोक निर्धन, रोगी, दुःखितांना पाहून त्यांची अवज्ञा न करितां, आपल्या शक्तिप्रमाणें द्रव्य खर्चून त्यांचें दुःख नाहींसें करितात, जे आपलें धन शुभकार्याकडे खर्चणाऱ्या इतर लोकांकडे पाहून स्वतः आनंद मानतात व जे धर्मसाधन करण्यांत सामील होऊन आपलें धन त्यांत मिळवून त्यांचा योग्य खर्च करण्यांत संतुष्ट असतात, त्यांचेच संपत्ति प्राप्त होण्याचें सार्थक्य झालें असें समजावें.

संपत्तीचा सदुपयोग करावा

पुढें, परलोकीं देवांचें ऐश्वर्य व चक्रवर्तींची संपत्ति ही दानी पुरुषानांच प्राप्त होते. व ज्यांना संपत्तिविषयीं प्रेम वाटतें त्यांना तिचें स्वरूप सांगण्याकरितां सूत्र सांगतात —

**यदि पापनिरोधोऽन्यसम्पदा किं प्रयोजनं ।**
**अथ पापास्रवोऽस्त्यन्यसम्पदा किं प्रयोजनं ॥ २७ ॥**

**अर्थ**- जर ज्ञानावरणादि अशुभ पाप प्रकृतींचे आस्रव येण्याचें बंद झालें असेल तर इतर संपत्तीशी माझें काय प्रयोजन आहे? व जर मला पापाचे आस्रव होत असतील तर धनसंपत्ति असून तरी काय करावयाचें?

**विशेषार्थ**- जीवानें संयम धारण करून पाप उत्पन्न होण्याचीं कारणें जर नाहींशीं केलीं असतील तर इंद्रियांना विषयभूत असणारी इतर ऐहिक राज्य-वैभवादि संपत्ति प्राप्त झाली नाहीं म्हणून दुःख मानण्याचें कारण नाहीं. कारण आस्रवाचा निरोध केल्यानें

पापनिरोध होत असेल तर संपत्तीचा काय उपयोग ?

क्रमानें स्वर्गांतील अहमिंद्राचें ऐश्वर्य व निर्वाणसंपदा प्राप्त होणार आहे. त्यापुढें या क्षणभंगुर व दुःखमय ऐहिक संपत्तीचा काय पाड ? जीवानें पापाचे आस्रव होऊं न दिल्यास त्याला अत्यंत मोठी निर्वाणसंपदा प्राप्त होते. पण त्यास अन्याय, अनीति, कपट, चोरी वगैरे कृत्यें करून पापास्रव निरंतर होत असतील, पुष्कळसा धनसंचयही होत असेल तर त्याचा तरी काय उपयोग होणार ? कारण त्यास लौकरच इहलोक सोडून जावें लागणार ? त्यावेळीं दुष्कृत्यामुळें तत्काल नरकांत उत्पन्न व्हावें लागेल. यामुळें सम्यग्दृष्टि जीव पापकर्माच्या आस्रवाला फार भीत असतो. तो पापाचें आस्रव येण्याचें बंद झालें म्हणजे आपणास मोठ्या ऐश्वर्याचा लाभ झाला असें समजतो. संसारांतील संपदेला पराधीन व दुःखदायक जाणून ती प्राप्त व्हावी अशी तो इच्छा करीत नाहीं. कदाचित् लाभांतराय व भोगांतराय कर्माच्या क्षयोपशमामुळें त्याला ती प्राप्त झाली तरी तिला विनाशिक व बंधकारक जाणून तिजमध्यें आसक्त होत नाहीं. वर्तमान कालच्या किंचित् दुःखाला नाहींशी करणारी आहे असें जाणून तिजविषयीं उदासीन असतो व कडू औषधाप्रमाणें तिचा उपभोग घेतो. संपत्ति हीच आपलें कल्याण करणारी आहे असें समजून ती प्राप्त व्हावी म्हणून मुळींच इच्छा करीत नाहीं.

### सहा अनायतनाचें स्वरूप.

कुदेव, कुगुरु, कुशास्त्र व कुदेवाचें श्रद्धान करणारा, कुगुरूची सेवा करणारा आणि कुशास्त्र शिकणारा असें मिथ्यात्वाचे सहा प्रकार आहेत. हे धर्माचें आयतन म्हणजे स्थान नव्हत. यापासून आपलें कधींही हित होणार नाहीं म्हणून यांना " अनायतन " असें म्हटलें आहे. यांचें संक्षेपानें स्वरूप असें आहे.

कुदेव

ज्यामध्यें सर्वज्ञपणा नाहीं, वीतरागपणा नाहीं, जो कामी, क्रोधी, चोर, जारांचा शिरोमणि आहे, ज्याला भोजनाची व मांस भक्षण करण्याची इच्छा आहे, जो क्रोधी व लोभी असून सर्वांनीं आपली पूजा करावी असें इच्छितो, जीवांचा घात करणारा असून आपल्याच भक्तांवर उपकार करून अभक्तांचा नाश करणारा आहे, ज्याला पुष्कळ मूढ लोक देवबुद्धीनें पूजितात, तो देवपणाचें आयतन नव्हे, म्हणजे तो खरा देव नव्हे. त्याला खरा देव म्हणणें अथवा त्याठिकाणीं देवबुद्धि ठेवणें हें मिथ्यात्व आहे.

कुगुरू

ज्यांना व्रत संयम वगैरे मुळींच नाहीं, पण अनेक प्रकारचे खोटे वेष धारण करून जगाला भुलविण्यांत जे तत्पर, अशा लोकांच्या ठिकाणीं व्रत, त्याग, विद्या, ध्यान परिग्रहत्याग वगैरे क्रिया पाहून, मंत्र, तंत्र, ज्योतिष, शकुन व इंद्राजालादि विद्या पाहून, अनेक मूर्ख लोक त्यांची पूजा करितात म्हणून जिनाज्ञेला उल्लंघन करून वागणाऱ्या पाखंडी भेषधारी माणसांमध्यें गुरुपणा मानणें हें मिथ्यात्व आहे.

खोटें व हिंसेचें पोषण करणारें शास्त्र श्रवण करण्यापासून आत्महित होत नाहीं म्हणून तें सम्यग्ज्ञानाचें आयतन नव्हे. याचप्रमाणें कुदेव, कुगुरु, कुशास्त्र व यांचें सेवन करणारे तीन, एकूण सहा स्थानापासून आपलें कल्याण होणार नाहीं म्हणून सम्यग्दृष्टी पुरुष त्यांची प्रशंसा करीत नाहींत.

कुशास्त्र

याप्रमाणें सम्यग्दर्शनाचा घात करणारे तीन मूढता, आठ मद, आठ शंकादि दोष व सहा अनायतन अशा पंचवीस दोषांचा त्याग करून व्यवहार सम्यग्दर्शन धारण करण्यानें निश्चय सम्यग्दर्शन प्राप्त करून घेतां येतें. ज्याला पंचवीस दोष टाकून आत्म्याचें श्रद्धान होतें त्यालाच निश्चय सम्यग्दर्शन होण्याचा नियम आहे. ज्याचे बाह्य दोष नाहींसे होत नाहींत त्याचें अंतरंग सम्यग्दर्शनही शुद्ध होऊं शकत नाहीं.

सम्यग्दर्शनाचे पंचवीस दोष

#### सम्यक्त्वाचे भेद आणि उत्पत्ति कशी होते हें पाहूं.

सम्यक्त्व तीन प्रकारचें आहे. उपशम सम्यक्त्व, क्षयोपशम सम्यक्त्व आणि क्षायिक सम्यक्त्व. संसारी जीव अनादिकालापासून आठ कर्मांनीं बांधला गेला आहे. त्यांत मोहनीय कर्माचा जो दर्शनमोहनीय नामक भेद आहे त्याचे मिथ्यात्व, सम्यङ्मिथ्यात्व व सम्यक्प्रकृतिमिथ्यात्व असे तीन भेद आहेत व चारित्रमोहनीयाचा भेद जो अनंतानुबंधी क्रोध, मान, माया, लोभ त्याचे चार भेद, एकूण सात प्रकृति सम्यक्त्वाचा घात करणाऱ्या आहेत. या सात प्रकृतींच्या उपशमापासून उपशम सम्यक्त्व, क्षयापासून क्षायिक व क्षयोपशमापासून क्षायोपशमिक सम्यक्त्व होतें. या क्षायोपशमिक सम्यक्त्वाला वेदकसम्यक्त्वही म्हणतात. अनादि मिथ्यादृष्टि जीवाला प्रथमतः उपशम सम्यक्त्वच होतें. मिथ्यादृष्टि जीवाला मिथ्यात्व नाहींसे होऊन जें सम्यक्त्व होतें त्यास प्रथमोपशम सम्यक्त्व म्हटलें आहे उपशमश्रेणीच्या प्रारंभीं क्षयोपशम सम्यक्त्वापासून जें उपशमसम्यक्त्व होतें तें द्वितीयोपशम सम्यक्त्व होय. मिथ्यादृष्टि जीवाला मिथ्यात्वगुणस्थानापासून उपशमसम्यक्त्व कसें उत्पन्न होतें याचा श्रीलब्धिसार ग्रंथाच्या आधारानें थोडा विचार करूं.

सम्यक्त्वाचे भेद

सम्यग्दर्शन हें चारी गतिमध्यें अनादि मिथ्यादृष्टी व सादि मिथ्यादृष्टीला उत्पन्न होत असतें. पण तें संज्ञी ( मन असणाऱ्या ) जीवालाच उत्पन्न होतें. असंज्ञी जीवाला उत्पन्न होत नाहीं. पर्याप्त जीवालाच प्राप्त होतें, अपर्याप्ताला होत नाहीं. मंद कषायी असेल त्यालाच उत्पन्न होतें. तीव्र कषाय असतील त्याला होत नाहीं. भव्य असेल त्याला उत्पन्न होतें, अभव्याला होत नाहीं. गुणदोषांचा विचार असणाऱ्या साकारोपयोग ( ज्ञानोपयोग ) युक्त जीवालाच उत्पन्न होतें, दर्शनोपयोगी जीवाला होत नाहीं. जागृत अवस्थेंत उत्पन्न होतें, निद्रावस्थेंत होत नाहीं. सम्मूर्छन जीवांना

सम्यक्त्व कोणास उत्पन्न होतें ?

उत्पन्न होत नाहीं. पांचव्या करणलब्धींतील उत्कृष्ट अशा अनिवृत्तिकरणाच्या अंतसमयामध्यें प्रथमोपशमसम्यक्त्व प्रगट होतें. तसेंच क्षायोपशमलब्धि, विशुद्धिलब्धि, देशनालब्धि, प्रायोग्यलब्धि आणि करणलब्धि अशा पांच लब्धि असल्या-शिवाय सम्यक्त्व होत नाहीं. यांतून चार लब्धि संसारांत भव्य किंवा कदाचित् अभव्य जीवालाही होतात. पण करणलब्धि मात्र ज्याला सम्यक्त्व व चारित्र प्राप्त व्हावयाचें असेल त्यालाच होत असते.

लब्धीचे भेद

क्षयोपशम लब्धीचें स्वरूप असें आहे– ज्या कालीं असा संयोग येऊन प्राप्त होतो कीं, आठ कर्मांतील ज्ञानावरणादिक समस्त अप्रशस्त प्रकृतींची शक्ति ( अनुभाग ) प्रत्येक समयाला अनंतपटीनें कमी कमी अशा अनुक्रमानें उदयाला येते, त्याकालीं जीवाला क्षयोपशम लब्धि प्राप्त होते. सर्वघातिस्पर्द्धकांच्या उदयाभावी क्षय ( कर्म उदयाला येऊन फल न देणें ) देशघातिस्पर्द्धकांचा उदय आणि भविष्य-त्कालीन सर्वघातिस्पर्द्धकांचें सत्त्व ( अस्तित्व ) असणें हा उपशम. अशा संयोगाला क्षयोपशमलब्धि ह्मणतात.

क्षयोपशम लब्धि

प्रथमतः झालेल्या क्षयोपशम लब्धीच्या प्रभावानें जीवाला उत्पन्न झालेल्या सातावेदनीयादि शुभ प्रकृतिच्या बंधाला कारण असे जे धर्मानुरागरूप शुभ परिणाम त्यांची प्राप्ति होणें याला विशुद्धिलब्धि म्हणतात. अशुभ कर्म आपला रस देऊन नाहींसे झाल्यानंतर जीवाला संक्लेशपरिणामाचा अभाव झाल्यानें विशुद्धपरिणामांची प्राप्ति होत असते.

विशुद्धि लब्धि

षड्द्रव्य, नवपदार्थांचा उपदेश करणाऱ्या आचार्याचा लाभ होणें, त्यांचा उपदेश प्राप्त होणें, व त्यांनीं उपदेशिलेल्या धर्मतत्त्वाला धारण करण्याची शक्ति प्राप्त होणें यास देशनालब्धि म्हणतात.

देशनालब्धि

नरकांत जेथें कोणी उपदेश करणारा नाहीं तेथें पूर्वजन्मीं धारण केलेल्या तत्त्वार्थाच्या संस्कार-बलानें सम्यग्दर्शन होतें.

वर सांगितलेल्या तीन लब्धींच्या द्वारें त्या जीवाची प्रत्येक समयांत विशुद्ध परिणामांची वृद्धि होत होत आयुकर्माशिवाय सात कर्मांची अंतःकोडाकोडीसागर–मात्र स्थिति शिल्लक राहते तेव्हां पूर्वीं असलेल्या कर्मस्थितीचा [ एक कोटाकोटीहून अधिक सागराला ]

---

१:— फलदायक शक्तीच्या अविभागी अंशाला अविभागप्रतिच्छेद म्हणतात. अशा समान शक्ती धारण करणाऱ्या प्रत्येक कर्मपरमाणूला वर्ग, वर्गाच्या समूहाला वर्गणा, व वर्ग-णेच्या समूहाला स्पर्धक अशी संज्ञा आहे.

प्रायोग्य लब्धि

एक कांडेकानें भागून येणाऱ्या कांडकद्रव्याला, अवशेष असलेल्या स्थितींत मिळवितात. घातिकर्मांचा रस, दारु व लतारूपानें अवशेष राहतो. शैल-स्थितिरूप रहात नाहीं. अघातिचा रस निंब-कांजीररूपानें असतो, विष-हालाहल स्वरूपानें रहात नाहीं. पूर्वी जो अनुभाग ( रस ) होता त्याला अनंताचा भाग देऊन जो बहुभाग मात्र अनुभाग राहील त्याचाही नाश करून शेष राहिलेल्या एक भागमात्र अनुभागाचा तो जीव अनुभव घेत राहतो. या प्रकारानें कर्म क्रमाक्रमानें कमी करण्याच्या विधीला प्रायोग्यलब्धि म्हणतात. ही भव्य अथवा अभव्य या दोहोंनाही सारखीच होते. संक्लेशपरिणामी, संज्ञी, पंचेंद्रिय, पर्याप्त जीवाला संभवणारा उत्कृष्ट स्थितिबंध व उत्कृष्ट अनुभाग प्रदेशाचें सत्व—अस्तित्व असतांना प्रथमोपशम सम्यक्त्व प्राप्त होत नाहीं. तसेंच विशुद्ध क्षपकश्रेणीमध्यें संभवणारा जघन्य स्थितिबंध व जघन्य स्थितिअनुभाग—प्रदेशाचें सत्त्व—अस्तित्व असतांनाही प्रथमोपशमसम्यक्त्वाची प्राप्ति होत नाहीं. प्रथमोपशमसम्यक्त्वाच्या सन्मुख

बंधापसरण

झालेला मिथ्यादृष्टि जीव, आपली विशुद्धता वाढवीत आयुकर्माशिवाय सात कर्मांचा स्थितिबंध प्रायोग्यलब्धीच्या प्रथम समयापासून पूर्वस्थितीच्या संख्यातावा भाग अंतःकोडाकोडीसागरप्रमाण करितो. त्या अंतःकोडाकोडी सागर स्थितिबंधाचा पल्याच्या संख्यातावा भागाइतका कमी होणारा स्थितिबंध अंतर्मुहूर्तपर्यंत समान स्वरूपानें होतो. नंतर त्याहूनही पल्याचा असंख्यात भाग मात्र घटत जाणारा स्थितिबंध अंतर्मुहूर्त पर्यन्त समानरूपानें होतो. या क्रमानें संख्यात स्थितिबंधापसरणाच्या योगें पृथक्त्व शंभर सागर कमी झाल्यानें दुसरें प्रकृतिबंधापसरण होतें. याप्रमाणें स्थितिबंध घटत असतां एक स्थान होतें. अशीं प्रकृतिबंधापसरणाची स्थानें चौतीस आहेत. या ठिकाणीं पृथक्त्व म्हणजे सात किंवा आठ संख्या समजावी. त्यावरून शब्दाचा अर्थ वर पृथक्त्व शंभर सागर सांगितल्यानें सातशें अथवा आठशें सागर जाणावें. या ठिकाणीं कोणकोणत्या प्रकृतींचा, प्रथमोपशम सम्यक्त्वापर्यंत कसकसा बंध होत नाहीं याचा विचार करणें यास बंधापसरण म्हणतात. या चौतीस बंधापसरणाचें

---

१:— कर्माच्या स्थितीला किंवा अनुभागाला कमी करण्यासाठीं जी क्रिया करावी लागते. तिला कांडक म्हणतात. स्थिति कमी करणें तें स्थितिकांडक व अनुभागाला कमी करणें तें अनुभागकांडक होय. यालाच स्थितिखंड आणि अनुभागखंडही म्हणतात. अभिप्राय असा— जेव्हां एखाद्या कर्माची स्थिति मोठी असते तेव्हां त्याचे उदयाला येण्यास योग्य निषेक देखील पुष्कळ असतात. त्या पुष्कळ निषेकांपैकीं कांहीं निषेकांना नष्ट करण्याकरितां त्यांच्या सर्वपरमाणूंना अवशिष्ट स्थितीच्या व आवलिप्रमाणाच्या उपरितन-वरच्या निषेकांना सोडून बाकीच्या निषेकांत मिळवावें लागतें. याप्रमाणें वरच्या जेवढ्या निषेकांना नष्ट केलें जातें तितकी स्थिति कमी होते. यालाच स्थितिकांडक म्हणतात. अनुभागाच्या काण्डकांतही असेंच समजावें. अर्थात् याच्याही बहुत अनुभागयुक्त वरील स्पर्द्धकांच्या परमाणूंना, कमी अनुभागवाल्या खालच्या स्पर्द्धकांत मिळवावें लागतें. तेव्हां एक अनुभागकाण्डक होतें.

येथें वर्णन करण्यानें ग्रंथविस्तार फार होईल. विशेष जाणण्याची इच्छा असेल त्यानीं श्रीलब्धिसार ग्रंथ पाहावा.

करणलब्धि

पांचवी करणलब्धि भव्य जीवालाच होते. अभव्याला होत नाहीं. या लब्धींत अधःकरण, अपूर्वकरण व अनिवृत्तिकरण असे तीन प्रकारचे करण ( परिणाम ) होत असतात. या ठिकाणीं करण याचा अर्थ 'कषायांची मंदता झाल्यानें होणारे शुद्ध आत्मपरिणाम' असा आहे. अनिवृत्तिकरणाचा काल अल्पअंतर्मुहूर्त आहे. त्याहून संख्यातपट अधिक अपूर्व करणाचा काल आहे. व त्याहून संख्यातपट अधःप्रवृत्ति करणाचा काल आहे व हाही अंतर्मुहूर्त प्रमाणच आहे. कारण अंतर्मुहूर्ताचेही असंख्यात भेद आहेत.

अधःप्रवृत्तिकरण

या अधःप्रवृत्तिकरणाच्या कालांत अतीत अनागत वर्तमान अशा त्रिकालवर्ति अनेक जीवांचे विशुद्ध परिणाम असंख्यात लोकप्रमाण होत असतात व ते परिणाम अधःप्रवृत्तिकरणाचे जितके समय आहेत तेवढ्यांत समान वृद्धिच्या अपेक्षेनें समय समयामध्यें वाढत असतात. या करणांतील खालच्या समयांतील परिणामांची संख्या व विशुद्धता वरील समयांतील जीवांच्या परिणामांशीं मिळते, म्हणून याचें अधःप्रवृत्तिकरण असें नांव आहे. याच्या परिणामांची संख्या, विशुद्धतेचे लौकिकदृष्टांत व अलौकिक संदृष्टि गोम्मटसार व लब्धिसार ग्रंथांत वर्णिली आहे तेथें पहावें. अधःप्रवृत्तिकरणाच्या परिणामाच्या प्रभावानें चार आवश्यकें होतात. पहिलें प्रत्येक समयांत अनंतपट विशुद्धतेची वृद्धि होणें, दुसरें स्थितिबंधापसरण म्हणजे पूर्वीं जेवढ्या प्रमाणांत कर्माचा स्थितिबंध होत होता त्याहून कमी कमी स्थितिबंध होत जाणें, तिसरें सातावेदनीयादि प्रशस्त कर्माच्या ज्या प्रकृति आहेत त्यांचा प्रत्येक समयाला वाढता, गूळ, खांड, शर्करा, अमृताप्रमाणें चतुःस्थानीय अनुभागबंध होणें व चौथा असातावेदनीयादि अप्रशस्त कर्मप्रकृतींचा अनंतपटीनें घटता, निंब-कांजीराप्रमाणें द्विस्थानीय अनुभाग बंध होणें, विष-हलाहलरूप न होणें, अशीं चार अवश्यकें होतात.

अपूर्वकरण

अधःप्रवृत्तिकरणाचा अंतर्मुहूर्तकाल गेला म्हणजे दुसरें अपूर्वकरण होतें. अधःकरणाच्या परिणामाहून अपूर्वकरणाचें परिणाम असंख्यातलोकपटीनें अधिक आहेत, ते अनेक जीवांच्या अपेक्षेनें आहेत. एक जीवाच्या अपेक्षेनें एका समयांत एकच परिणाम होतो. एका जीवाच्या अपेक्षेनें जेवढे अपूर्वकरणाचे अंतर्मुहूर्तकालांतील समय आहेत तेवढे परिणाम आहेत. याचप्रमाणें अधःकरणाचाही एका जीवाचा एका समयांत एकच परिणाम असतो. अनेक जीवांच्या अपेक्षेनें एक समयाला योग्य असंख्यात परिणाम आहेत. ते अपूर्वकरणाचे परिणामही प्रत्येक समयांत सदृश ( समान वृद्धीनें ) वाढतात. या अपूर्वकरणाचे परिणाम खालच्या समयसंबंधीं परिणामाशीं समान नाहींत. प्रथम समयाच्या उत्कृष्ट विशुद्धतेहून द्वितीय समयाची जघन्य विशुद्धताही अनंतपटीनें जास्त असते. अशा परिणामांना अपूर्व असतो ह्मणून या दुसऱ्या करणाला अपूर्वकरण म्हटलें आहे. अपूर्वकरणाचे प्रथम समयापासून ह्मणजे त्या

त्या समयाच्या शेवटच्या समयापर्यंत, जघन्यापासून उत्कृष्ट व पूर्वसमयाच्या उत्कृष्टापासून उत्तर समयाच्या जघन्य, अशा क्रमानें होणारे परिणाम अनंतपट शुद्ध होत गेल्यानें ते सर्पाच्या गतिप्रमाणें कमी अधिक होत रहातात. येथें अनुकृष्टि [ पूर्व परिणामाची उत्तर परिणामाशीं समानता ] नाहीं. अपूर्वकरणाच्या पहिल्या समयापासून यावत् सम्यक्त्वमोहनी, मिश्रमोहनीच्या पूर्ण कालांत गुणसंक्रमणाच्या योगें मिथ्यात्वाला सम्यक्त्व मोहनी, मिश्रमोहनीरूप परिणमवीपर्यंतच्या अंतसमयापर्यंत गुणश्रेणी, गुणसंक्रमण, स्थितिखंडन, अनुभागखंडन हीं चार अवश्यकें होतात. स्थितिबंधापसरण अधःकरणाच्या प्रथम समयापासून गुणसंक्रमणाचा काल पूर्ण होईपर्यंत होत असतें. यद्यपि प्रायोग्यलब्धीनें स्थिति बंधापसरण होत असतें तथापि प्रायोग्यलब्धींत सम्यक्त्व होण्याचा निश्चय नसल्यानें त्याचें ग्रहण केलें नाहीं. स्थितिबंधापसरणाचा काल व स्थितिकांडकोत्करणाचा काल दोन्ही समान अंतर्मुहूर्ताचे असतात. त्या ठिकाणीं पूर्वी बांधिलेलें व सत्तेंत असलेलें कर्मपरमाणुरूप द्रव्य त्यांतून काढून जर गुणश्रेणींत दिलें व त्याची गुणश्रेणी कालांतील प्रत्येक समयांत असंख्यातपटीच्या क्रमानें पंक्तिबंध निर्जरा होत गेली म्हणजे तिला गुणश्रेणीनिर्जरा म्हणतात. प्रत्येक समयांत गुणाकाराच्या क्रमानें, अनुक्रमानें विवक्षित प्रकृतीचे परमाणु पलटून दुसऱ्या प्रकृतिस्वरूपाचें होणें यास गुणसंक्रमण म्हणतात. पूर्वी बांधिलेल्या व सत्तेंत असलेल्या कर्मप्रकृतींची स्थिति कमी करणें यांस स्थितिखंडन म्हणतात. पूर्वी बांधिलेल्या व सत्तेंत असलेल्या अशुभ प्रकृतींचा अनुभाग कमी करणें यांस अनुभागखंडन म्हणतात. अशीं चार कार्यें अपूर्व करणांत अवश्य होत असतात. अपूर्वकरणाच्या प्रथम समयामध्यें प्रशस्त व अप्रशस्त प्रकृतीचें जें अनुभागसत्त्व असतें, त्याच्या अनंताव्या पटीनें अपूर्वकरणाच्या अंतसमयामध्यें प्रशस्त प्रकृतींचें सत्त्व वाढतें व अप्रशस्तप्रकृतींचें घटतें. अपूर्वकरणाच्या प्रथमसमयसंबंधी प्रशस्त व अप्रशस्त प्रकृतींचें जें अनुभागसत्व आहे, त्यांतून अंतसमयामध्यें प्रशस्त प्रकृतीचें सत्त्व अनंतपट वाढतें व अप्रशस्त प्रकृतीचें अनंतपट घटतें. या ठिकाणीं प्रत्येक समयांत अनंतगुणी विशुद्धता होत असल्यानें प्रशस्त प्रकृतीच्या अनंतपट अनुभाग कांडकाच्या माहात्म्यानें अप्रशस्त प्रकृतीच्या अनंताव्या भागा इतका अनुभाग अंतसमयामध्यें संभवतो. या स्थितीखंडादिविधानाचें वर्णन अतिशय विस्तारानें लब्धिसार ग्रंथांत आहे तेथें पहावें. येथें प्रकरणवश संक्षेप सांगितला आहे. याप्रमाणें अपूर्वकरणामध्यें सांगितलेले स्थितिखंडादि कार्यविशेष अनिवृत्तकरणांतही होतात. यांत फरक हाच कीं, समानसमयवर्ति नाना जीवांचे सारखे परिणाम असतात. कारण अनिवृत्तिकरणाच्या अंतर्मुहूर्ताचे जितके समय आहेत तितकेच अनिवृत्तिकरणाचे परिणाम आहेत म्हणून प्रत्येक समयांत एकेक परिणाम आहे असें म्हटलें आहे. या ठिकाणीं स्थितिखंड व अनुभागखंडाचा प्रारंभ दुसऱ्याच तऱ्हेनें होत असतो. कारण अपूर्वकरण स्थितिखंडादिक परिणामांत जे होतात, त्यांची अंतसमयांतच समाप्ति होत असते. येथें अंतरकरणादि विधि कोणती वगैरे वर्णन विस्तारभयास्तव करतां येत नाहीं म्हणून तीं लब्धिसार ग्रंथावरून पहावें.

अनिवृत्तिकरणाच्या अंतरसमयामध्यें दर्शनमोहनीय व अनंतानुबंधी चतुष्काच्या प्रकृतिस्थिति-

प्रदेश-अनुभागांचा संपूर्ण उदय होण्याची अयोग्यता असल्यानें त्या कर्मांचा उपशम होतो व त्यापासून तत्त्वार्थश्रद्धानरूप सम्यग्दर्शन प्राप्त होतें, त्यामुळें त्यास उपशमसम्यग्दृष्टि म्हणतात हें सांगण्याचें या ठिकाणीं मुख्य प्रयोजन आहे. म्हणून तो जीव प्रथम समयामध्यें, द्वितीय स्थितीमध्यें असणाऱ्या मिथ्यात्व द्रव्याला, स्थितिकांडक व अनुभागकांडक यांचा घात न करितां गुणसंक्रमणाचा भाग देऊन, मिथ्यात्व, सम्यङ्मिथ्यात्व आणि सम्यक्त्व अशा तीन प्रकारांत रूपांतर करितो.

तात्पर्य– अनादिकालचें दर्शनमोहनीय कर्म एकच प्रकारचें असतें. तें द्रव्य करणाच्या ( परिणामाच्या ) प्रभावानें तीन प्रकारची शक्ति धारण करून वेगवेगळे बनतें. याप्रमाणें मिथ्यादृष्टीला सम्यक्त्व होण्याला कारण अशा पांच लब्धींचें स्वरूप संक्षेपांत सांगितलें.

उपशमसम्यक्त्वाचा जघन्य व उत्कृष्टकाल अंतर्मुहूर्त आहे. हा काल पूर्ण झाल्यानंतर नियमानें दर्शनमोहनीय कर्माच्या तीन प्रकृतींतून एकेकाचा उदय होतो. त्यावेळीं जर सम्यक्त्वमोहनीचा

वेदकसम्यक्त्व

उदय असेल तर उपशमसम्यक्त्व सुटून जीवाला वेदक सम्यक्त्व होतें. व सम्यक्त्वमोहनीच्या उदयानें वेदक-सम्यग्दृष्टि चल मल इत्यादि दोषयुक्त तत्त्वांचें श्रद्धान करितो. सम्यक्त्व मोहनीच्या उदयानें त्या श्रद्धानांत चंचलपणा अथवा इतर अतिचार ( दोष ) उत्पन्न होतात, अथवा श्रद्धानांत शिथिलपणाही प्राप्त होतो. या वेदक सम्यक्त्वालाच क्षयोपशमसम्यक्त्व असें नांव आहे. कारण दर्शनमोहनीच्या सर्वघाती स्पर्द्धकांच्या उदयाचा अभाव हाच क्षय, व देशघाति स्पर्द्धकांचा उदय व त्या सम्यक्त्वमोहनीच्याच वर्तमान समयाशिवाय वरच्या इतर निषेकांचा उदय न होतां त्याचें सत्तेंत अस्तित्त्व, अशा कर्माच्या स्थितिला क्षयोपशमसम्यक्त्व ह्मणावें.यालाच सम्यक्त्व प्रकृतीच्या उदयाचें वेदन म्हणजे अनुभवन होतें म्हणून वेदकसम्यक्त्व असेंही म्हणतात. या उपशमसम्यक्त्वाचा अंतर्मुहूर्तकाल उलटल्यानंतर जर सम्यङ्मिथ्यात्वाचा उदय होईल तर तो जीव तिसऱ्या मिश्रगुणस्थानवर्ती बनतो. त्यायोगें त्यांस तत्त्व अतत्त्व या दोहोंचें मिश्र श्रद्धान होतें व मिथ्यात्वाचा उदय झाला तर मिथ्यादृष्टि ( विपरीत श्रद्धानी ) बनतो. ज्वरयुक्त पुरुषाला ज्याप्रमाणें भोजनाची रुचि नसते तद्वत् या मिथ्यादृष्टि जीवाला अनेकांतरूप वस्तूच्या सत्यार्थ तत्त्वाची रुचि नसते. याचप्रमाणें रत्नत्रयरूप मोक्षमार्ग व दशलक्षणरूप दयाधर्म यांची रुचि उत्पन्न होत नाहीं. उपशमसम्यक्त्वाच्या अंतर्मुहूर्त कालामध्यें जर जघन्य एक समय व उत्कृष्ट सहा आवली शेष राहिल्या व अनंतानुबंधी क्रोध, मान, माया, लोभांतून एखाद्याचा उदय प्राप्त झाला तर तो जीव सम्यक्त्वापासून सुटून सासादन नामक दुसऱ्या गुणस्थानांत येतो. व त्याठिकाणीं जघन्य एक समय व उत्कृष्ट सहा आवलीपर्यंत राहून नियमानें मिथ्यादृष्टि होतो. उपशमसम्यक्त्वाचा अंतर्मुहूर्त काल पूर्ण झाल्यानंतर त्याचें चार मार्गांत रूपांतर होतें. सम्यक्त्वमोहनीचा उदय प्राप्त होईल तर तो क्षयोपशम सम्यक्त्वी होईल. मिश्रप्रकृतीचा उदय येईल तर मिश्रगुणस्थानी होईल. मिथ्यात्वाचा उदय प्राप्त होईल तर नियमानें मिथ्यादृष्टि होईल व अनंतानुबंधी

कषायांतून कोणा एखाद्याचा उदय येईल तर सासादन गुणस्थान-वर्ति होऊन नंतर मिथ्यादृष्टि होईल.

आतां क्षायिकसम्यक्त्व कसें उत्पन्न होतें हें थोडक्यांत सांगतों. दर्शनमोहाच्या क्षयानें क्षायिक सम्यक्त्व होतें व दर्शनमोह क्षपविण्याचा ( नाहींसे करण्याचा ) आरंभ कर्मभूमींतील माणसांकडूनच होतो. भोगभूमीच्या मनुष्याला व समस्त देव नारकी तिर्यंचांना क्षायिकसम्यक्त्व प्राप्त करून घेतां येत नाहीं. कर्मभूमीमध्यें देखील तीर्थंकर किंवा अन्यकेवली किंवा श्रुतकेवलीच्या चरणापाशीं राहणारा असाच कोणी जीव दर्शनमोहनीय कर्म नाहींसें करण्याचा (क्षपणाचा ) आरंभ करतो. श्रुतकेवलीच्या जवळ सतत राहिल्याशिवाय तशी परिणामविशुद्धता होत नाहीं. या ठिकाणीं अधःकरणाच्या प्रथम समयापासून तों मिथ्यात्वाच्या आणि मिश्रमोहनीयाचें कर्म सम्यक्त्वप्रकृतिरूप होऊन संक्रमण करीपावेतों अंतर्मुहूर्त कालपर्यंतच्या कालाला दर्शनमोहनीच्या क्षपणाचा आरंभ काल म्हणतात. या आरंभकालाच्या पुढच्याच समयापासून क्षायिकसम्यक्त्व ग्रहण करण्याच्या पहिल्या समयापूर्वी ( साधक ) निष्ठापक सम्यग्दर्शन पूर्ण करतो. ज्या ठिकाणीं क्षपणाचा प्रारंभ केला असेल असा कर्मभूमीचा मनुष्य निष्ठापक होतो. अथवा सौधर्मादि स्वर्ग व कल्पातीत अहमिंद्र व भोगभूमींतील मनुष्य तिर्यंच व धम्मा नामक नरक-पृथ्वी या ठिकाणींही निष्ठापक असूं शकतो. कारण ज्यानें पूर्वी आयुकर्म बांधिलें आहे असा कृतकृत्य वेदक-सम्यग्दृष्टि मरून चारी गतीमध्यें उत्पन्न होत असतो, व त्या ठिकाणीं तो आपली क्षपणा पूरी करितो. आतां अनंतानुबंधी क्रोधमानमायालोभ, मिथ्यात्व, सम्यग्मिथ्यात्व, व सम्यक्त्व एकूण सात प्रकृतींची क्षपणेचा क्रम असा आहे. कोणी वेदक सम्यग्दृष्टि जीव असंयत, देशसंयत, प्रमत्त अथवा अप्रमत्त अशा चोहोंपैकीं एखाद्या गुणस्थानांत असून, पूर्वी तीन करणांची विधि ज्यानें केली असेल व त्यायोगें अनंतानुबंधी क्रोध, मान, माया, लोभाच्या उदयावलींत असणाऱ्या निषेकांना नाहींसे केलें असेल व उदयावलीच्या बाह्य असणाऱ्या सर्व निषेकांचें विसंयोजन करून, अनिवृत्तिकरणाच्या अंतसमयामध्यें सर्व अनंतानुबंधी द्रव्याला द्वादश कषाय आणि नवनोकषाय रूप परिणमविलें असेल ( हें अनंतानुबंधीचें विसंयोजन आहे, यांतही गुणश्रेणी, स्थितिकांडकादि पुष्कळ विधि आहेत ) याप्रमाणें विसंयोजन केल्यानंतर अंतर्मुहूर्त कालपर्यंत विश्रांति घेऊन म्हणजे ( दुसरी क्रिया न करितां, ) तीन अधःकरणादि करणांच्या योगें अनिवृत्तिकरणाच्या कालांत मिथ्यात्व, सम्यङ्मिथ्यात्व व सम्यक्त्व यांचा क्रमानें नाश केला असेल, त्याच्या त्या करणांच्या ( परिणामशुद्धीच्या ) सामर्थ्यानें ज्या ज्या कर्माच्या स्थितिअनुभागांचा नाश होतो, त्याचें वर्णन लब्धिसार ग्रंथांतून पहावें. सारांश वरील सात प्रकृतींचा नाश केल्यानें क्षायिक सम्यक्त्वी होता येतें. याप्रमाणें सम्यक्त्वाच्या तीन प्रकारांचें येथपर्यंत संक्षेपांत वर्णन केलें.

क्षायिक सम्यक्त्व

सम्यग्दृष्टी पुरुषांमध्यें दुसरे आठ गुण प्रगट होत असतात त्यावरून त्याला स्वतःस सम्यक्त्व उत्पन्न झालें आहे व इतरांसही त्यास तें प्राप्त झालें आहे असा बोध होतो. ते आठ गुण म्हणजे. संवेग, निर्वेद, आत्मनिंदा, गर्हा, उपशम, भक्ति,

सम्यक्त्वाचें आठ गुण

वात्सल्य, आणि अनुकंपा. हे ज्याठिकाणीं दिसून येतील तेथें सम्यक्त्व आहे असें समजावें.

१ संवेग-- म्हणजे धर्मावर प्रीति. संसारांत भ्रमण करणाऱ्या मिथ्यादृष्टि जीवाची शरीरावर नेहमीं अत्यंत प्रीति असते. त्याची इच्छा आपलें शरीर निर्मळ रहावें, बलवान् असावें, पुष्ट असावें व असें राहण्याकरितां अभक्ष्य भक्षण करण्यांत त्याला आनंद वाटतो. अन्यायाचरणानें संपादन केलेल्या द्रव्यानें बनविलेल्या अलंकारांनीं आपलें शरीर भूषित करावें असें त्यांस वाटतें. पापकृत्यांशीं संबंध ठेवण्यांत त्याला हर्ष वाटतो. विकथा करण्याविषयीं आनंद वाटतो. स्त्री, पुत्र, धन, ऐश्वर्य, नगर, देश, राज्य वगैरे पदार्थावर तो अत्यंत प्रीति करतो. याच्या उलट प्रवृत्ति सम्यग्दृष्टि पुरुषाची असते. तो शरीरादिकांवर ममत्व करीत नाहीं. दशलक्षण धर्मावर अनुराग करितो. त्याची प्रवृत्ति सदैव धर्मकथा श्रवण कराव्या, धर्मात्मा पुरुषांशीं चर्चा करावी, धर्मायतनें स्थापन करावीं अशी असते. अशा प्रवृत्तीलाच संवेग गुण म्हणतात. हा गुण सम्यग्दृष्टि पुरुषाला असतो.

२ निर्वेद-- म्हणजे पंचपरिवर्तनरूप संसारापासून, कृतघ्न अशा देहापासून व दुर्गतीला पोंचविणाऱ्या या इंद्रियादिकांच्या भोगांपासून विरक्ति होणें हा दुसरा निर्वेद गुण.

३ आत्मनिंदा--आपल्या प्रमादामुळें, असंयम भावामुळें, आणि सांसारिक पापक्रियेंत रममाण होणें या प्रवृत्तिबद्दल निरंतर आपली निंदा करीत रहाणें. तसेंच दुर्लभ अशा मनुष्यजन्मामध्यें उत्पन्न होऊनही आपला एक क्षणही धर्माशिवाय इतर चिंतनांत वाया जाणें हें ही त्यास अनर्थावह वाटतें. याप्रमाणें आपल्याकडून घडणाऱ्या दोषांचा विचार करून आपल्या मनांतच त्याबद्दल आपली निंदा करून घेणें हा आत्मनिंदा गुण आहे.

४ गर्हा-- आपल्या गुरूपाशीं अथवा सहधर्मी श्रावकापाशीं नम्रपणानें आपण केलेले दोष प्रगट करणें हा गर्हा नामक गुण आहे.

५ उपशम-- क्रोध, मान, माया, लोभाची सम्यग्दृष्टि पुरुषाला मंदता असतेच. राग, द्वेष, काम, उन्माद, वैर वगैरे आपला नाश करणारे आहेत असें समजून त्यांचा त्याग करण्याविषयीं तत्पर असलेल्या सम्यग्दृष्टि पुरुषाला उपशम नामक गुण प्राप्त होतो.

६ भक्ति-- पांच परमेष्ठी. जिनवाणी, जिनेंद्राचें प्रतिबिंब या ठिकाणीं व दशलक्षण धर्माला धारण करणाऱ्या धर्मवान् पुरुषाचे ठिकाणीं व तपस्वीच्या ठिकाणीं वसत असलेल्या अनेक गुणांवर प्रीति करणें हा भक्ति नामक गुण आहे.

७ वात्सल्य-- धर्मवान् जीवावर प्रीति करणें. दरिद्री पुरुषाला द्रव्य पाहून जसा आनंद होतो तसा आनंद धर्मवान् व सम्यग्दृष्टि पुरुषाला पाहून व सम्यग्ज्ञानी पुरुषानें केलेल्या धर्मप्रवचनाला ऐकून उत्पन्न होणें हा सम्यग्दृष्टी पुरुषाचा सातवा वात्सल्य गुण आहे.

अनुकंपा-- दया. सम्यग्दृष्टी पुरुषाच्या मनांत षट्काय जीवांची दया असतेच. परजीवांचें दुःख पाहून जणूं काय तें दुःख आपणालाच होत आहे व तें दुःख नाहींसें करण्याचे परिणाम होणें यास अनुकंपा म्हणतात.

याप्रमाणें असंख्य सत्परिणाम सम्यग्दृष्टि पुरुषाला स्वयमेव प्रगट होतात. ज्याला सत्यार्थ ज्ञान प्रगट झालें त्याच्या सर्व बाह्य अभ्यंतर क्रियांचें सद्गुणांत रूपांतर होतें.

सम्यग्दर्शनानें युक्त असणारा जीव सर्वांत मोठा आहे असें दर्शविण्याकरितां सूत्र सांगतात—

**सम्यग्दर्शनसंपन्नमपि मातङ्गदेहजम् ।**
**देवा देवं विदुर्भस्मगूढाङ्गारान्तरौजसम् ॥ २८ ॥**

**अर्थ**– चांडाळाच्या पोटीं उत्पन्न झालेला असूनही सम्यग्दर्शन संयुक्त असेल तर तो देव आहे असें गणधरादिक समजतात. यास दृष्टांत, विस्तव राखेनें झांकलेला असला तरी तो तेजस्वी असतोच.

**विशेषार्थ**– ज्याला सम्यग्दर्शन प्राप्त झालें आहे असा चांडाळ असला तरी त्याला भगवान् गणधरांनीं देव म्हटलें आहे. हा हाडा-मांसाचा देह चांडाळापासून उत्पन्न झाला म्हणून तो देह चांडाळ असेल, पण सम्यग्दर्शन ज्याला प्राप्त झालें आहे असा आत्मा दिव्यगुणांनीं प्रकाशमान झाला आहे म्हणून त्याच्या शरीराला उत्तम गुणाच्या प्रभावानें देव म्हटलें आहे. ज्याप्रमाणें विस्तव राखेनें झांकलेला असला तरी आंत लखलखणाऱ्या तेजानें चमकत असतो त्याप्रमाणें सम्यग्दृष्टीचा आत्माही मलिन देहामध्यें गुणांच्या योगें दैदीप्यमान असतो. श्रीसमंतभद्राचार्य म्हणतात कीं, सम्यग्दृष्टी पुरुषाची महिमा आम्हांस आवडते म्हणून आम्ही करितो असें नाहीं तर भगवंताच्या द्वादशांगरूपी जिनवाणींत गणधर देव खुद्द सम्यग्दृष्टी चांडाळाला देव म्हणतात. हें शरीर मल-मूत्रानें भरलेलें आहे व हाडमांस-चर्मानें आच्छादिलेलें आहे. यांतून नवद्वारानें निरंतर दुर्गंध मल वाहत आहे. असा जरी अत्यंत मलिन देह साधूंचा आहे तरी तो रत्नत्रयाच्या प्रभावानें इंद्रादिक देवांना दर्शन करण्या योग्य, स्तवन करण्या योग्य, नमस्कार करण्या योग्य होतो. गुणाशिवाय चर्माच्छादित कफ-मलानें भरलेल्या घाण देहाची कोणी वंदना केली असती, कोणी त्याला पूजिलें असतें व कोणी त्याला पाहिलें असतें ? सारांश सम्यग्दर्शनादि गुणामुळेंच हें शरीर वन्दनीय व पूजनीय आहे.

सम्यग्दर्शन गुणामुळें शरीर वंद्य होतें

धर्म-अधर्मांचें फल

**श्वापि देवोऽपि देवः श्वा जायते धर्मकिल्बिषात् ।**
**कापि नाम भवेदन्या संपद्धर्माच्छरीरिणाम् ॥ २९ ॥**

**अर्थ**– धर्माच्या प्रभावानें कुत्रा स्वर्गांत देव होऊन जन्मतो. व पापाच्या प्रभावानें स्वर्गांतील महान् ऋद्धिधारी देव पृथ्वीवर कुत्रा होऊन जन्मतो. धर्माच्या प्रभावानें प्राणिमात्राला अवर्णनीय अशी अहमिंद्राची संपदा व अविनाशी मुक्तिसंपदा प्राप्त होते.

**विशेषार्थ**– मिथ्यात्वाच्या प्रभावानें दुसऱ्या स्वर्गापर्यंतचे देव एकेंद्रियामध्यें येऊन जन्मतात.

व अनंतानंत कालपावेतों त्रस-स्थावर जीवामध्यें परिभ्रमण करीत फिरतात. बाराव्या स्वर्गापर्यंतचे देव मिथ्यात्वाच्या प्रभावानें पंचेंद्रिय-तिर्यंचामध्यें येऊन जन्मतात. म्हणून हा मिथ्यात्वभाव फार अनर्थ करणारा आहे असें जाणून सम्यक्त्व प्राप्त करून घेण्याचा यत्न करणें योग्य आहे.

कुदेवांना वंदन करणें योग्य नाहीं

**भयाशास्नेहलोभाच्च कुदेवागमलिङ्गिनाम् ।**
**प्रणामं विनयं चैव न कुर्युः शुद्धदृष्टयः ॥ ३० ॥**

**अर्थ**- सम्यग्दृष्टी पुरुषांनीं भीतीमुळें, किंवा आशेनें, अथवा स्नेहामुळें, किंवा लोभास्तव, कुदेव, कुगुरु, आणि कुशास्त्र याला नमस्कार करूं नये व त्यांचा सत्कार करूं नये.

**विशेषार्थ**- ज्यांना काम, क्रोध, भय, इच्छा, क्षुधा, तृषा, राग, द्वेष, मद, मोह, निद्रा, हर्ष, विषाद, जन्म, मरणादि दोष आहेत ते कुदेव होत. यांचा प्रभाव पंचमकालांत फार वाढलेला आहे.

कुदेव व कुशास्त्र यांना नमस्कार करूं नये

एका सर्वज्ञ वीतराग देवाशिवाय इतर सर्व कुदेव आहेत. हिंसेला पुष्ट करणारीं, रागीद्वेषी अशा मूढ जीवांनीं प्रगट केलेलीं, पूर्वापरविरोधानीं भरलेलीं, विषयकषायादि आरंभांना पोषविणारीं, प्रत्यक्ष व अनुमान प्रमाणांनीं दूषित अशा शास्त्रांना कुआगम म्हणावें. हिंसादि पांच पापांचा त्याग करणारे, आरंभ-परिग्रहरहित, देहाविषयीं निर्ममत्व प्राप्त झालें आहे असे, उत्तम क्षमादिक दशधर्माला धारण करणारे, दोष टाळून अयाचकवृत्ति सांभाळणारे, दीनता ज्यांनीं टाकिली आहे असे, निर्जन स्थानामध्यें राहणारे, ध्यानाध्ययनामध्यें जे निरंतर प्रवर्तन करणारे, पांच इंद्रियांच्या विषयांना सोडणारे, षट्काय जीवांच्या विराधनेचा त्याग करणारे, मौन धारण करून परक्याकडून मिळालेलें, सरस-नीरस व आपणांकरितांच मुद्दाम न बनविलेलें अन्न रत्नत्रयाला सहायभूत म्हणून शरीराचें रक्षण करण्याच्या हेतूनेंच एकवेळ ग्रहण करणारे अशा नग्न मुनीश्वराच्या लिंगा ( चिन्हा ) शिवाय, एक वस्त्र अथवा कौपीनधारक क्षुल्लकाच्या लिंगाशिवाय आणि एक वस्त्रधारी अर्जिकेच्या लिंगाशिवाय, जे इतर भेष आहेत ते सर्व कुलिंगी आहेत. त्यांना सम्यग्दृष्टी पुरुष नमस्कार करीत नाहींत.

**कोणत्याही भयानें नमस्कार करूं नये.**

याचप्रमाणें सम्यग्दृष्टी पुरुष भयानें कुदेवाला नमस्कार करीत नाहीं. तें भय असें:— या देवाला हजारों माणसें व राजे देखील नमस्कार करितात. याला जर मी नमस्कार केला नाहीं तर या देवाला राग येऊन तो माझा नाश करील. माझी संपत्ति नाहींशी करील. माझ्या स्त्री-पुत्रादिकांचा घात करील. अथवा याचा द्वेष करीत असल्यानें तर माझ्या शरीरांत हा रोग उत्पन्न झाला नाहीं ना ! अथवा असें दुःख त्या द्वेषामुळेंच प्राप्त झालें नसेल ना ! द्वेषामुळें तो देव माझा नाश करील. या देशांत राहणारे सर्व लोक याची पूजा करितात व माझ्या कुलांतही माझे आजे-पणजे, आई-मामा, भाउबंद वगैरे सर्वांनीं याची पूजा केली आहे. आतां मी जर ती परंपरा सोडून पूजा करण्याचें सोडीन तर माझें हें घर पुत्र-पौत्रादि व लक्ष्मीनें भरलेलें आहे त्यांत कदाचित् कोणी मरण

पावेल अथवा धनहानि प्राप्त होईल अथवा रोग उत्पन्न होईल तर सर्व लोक मला दूषण देतील. मला मोठें दुःख होईल. सर्व लोक असें म्हणतात कीं या देवाला ज्यांनीं ज्यांनीं मानिलें नाहीं त्यांना यानें आंधळें करून टाकलें आहे. या देवाची पूजा केल्यानें, नवस केल्यानें, याचा सत्कार केल्यानें आजपावेतों अनेक जणांचे रोग नाहींसे झाले आहेत. हे जगन्नाथस्वामी आहेत. यांच्या पुरीमध्यें ( शहरामध्यें ) न्हावी, परीट, खाटीक, चांभार वगैरे सर्व एकत्र मिळून उच्छिष्ट भक्षण करितात. असें न केलें तर तो कोड उत्पन्न करण्याचें भय दाखवितो. याच्या पूजनापासून आंधळ्याला डोळे व दरिद्र्याला संपत्ति प्राप्त झाली आहे. याची निंदा करणाऱ्यांची संपत्ति नाहींशी झाली होती. पूर्वीं शनीश्वर देवानें क्रोधामुळें विक्रमादित्यराजाला संकटांत टाकलें होतें. याप्रमाणें अनेक देवी, भैरव, हनुमान, गणपति, दुर्गा, चंडीसूर्यादिक ग्रहांचें भय मानून सम्यग्दृष्टी पुरुष त्यांना नमस्कार करीत नाहीं. अथवा त्यांचा विनयसत्कारादि करीत नाहीं. तसेंच आपणाला पुत्र प्राप्त व्हावा, अथवा संपत्ति प्राप्त व्हावी, राज्य प्राप्त व्हावें या आशेनेंही ते वंदना करीत नाहींत. अथवा आमच्यावर या देवतेचा स्नेह आहे. आम्हाला दुःख प्राप्त होतें त्यावेळीं आमचें रक्षण हीच देवता करीत असते. असें समजूनही सम्यग्दृष्टी नमस्कार करीत नाहीं. लोभामुळेंही कुदेवांचा सत्कार व नमस्कार सम्यक्त्वी करीत नाहीं. ज्या वेळेपासून मी ह्या देवतेची पूजा आरंभिली त्या दिवसापासून मला सारखा लाभ होत चालला आहे. मला मोठेपणा प्राप्त होत चालला आहे. अशाप्रकारच्या लाभाला या देवताच कारण आहेत असा संकल्प करून सम्यग्दृष्टी कुदेवाची आराधना करीत नाहीं. राजाच्या भयानें, आईबापांच्या भीतीनें, कुटुंबाच्या भयानें व लोकलज्जेनेंही तो कुदेवांना वंदना करीत नाहीं. याचप्रमाणें जें शास्त्र रागद्वेष–हिंसेला पुष्ट करणारें असेल, ज्यांत शृंगाराचें, युद्धाचें, स्त्रीचें वगैरे विकथांचें वर्णन व एकांतरूपानें वस्तूचें स्वरूप सांगितलें असेल, ज्यांत मंत्र, तंत्र, यंत्र, वशीकरण, मारण, उच्चाटनादि साधनांचें वर्णन असेल, कुदेव कुधर्माची आराधना करावी असें ज्यांत वर्णिलें असेल, जें संसारामध्यें भ्रमण करविणारें असेल, त्या शास्त्राला सम्यग्दृष्टी पुरुष वंदन करीत नाहींत व त्याचा सत्कारही करीत नाहींत व त्याची रचना फार उत्कृष्ट आहे म्हणून प्रशंसाही करीत नाहींत. उलट त्याच्या वाचनापासून जीव संसारांत पुनः भटकतील म्हणून तसें वाचू नये असा उपदेश करितात. भय, आशा, स्नेह व लोभ याला वश होऊन खोट्या आगमाचें ते प्रकाशन करीत नाहींत. आपल्या बापदादांनीं अशा शास्त्रापासून पुष्कळ द्रव्य संपादन केलें आहे व आपणही तसेंच द्रव्य संपादन करून आपली जगांत प्रतिष्ठा वाढवूं व विद्वत्तेच्या जोरावर राजादिकांनाही आपले सेवक बनवूं अशा लोभानें कुशास्त्राचें सेवन सम्यग्दृष्टी करीत नाहींत. जर ही प्रथा आपण चालू ठेवली नाहीं तर आपली आजीविका नाहींशी होईल व सर्व लोकांत असलेली मान्यता कमी होईल या भीतीनेंही सम्यग्दृष्टी कुशास्त्राचें सेवन करीत नाहींत. हें शास्त्र वाचण्यांत मन मोठें रंजायमान होतें, यांत मोठा खुबीदार रस भरलेला आहे, यांतील कथा मोठी गोड आहे, यापासून लोकांना फार करमणूक होईल अशा समजुतीनेंही कुशास्त्राचें आराधन

सम्यग्दृष्टी करीत नाहींत. कोणत्याही आशेनें सम्यग्दृष्टी कुशास्त्राचें सेवन करीत नाहींत. अशा शास्त्राध्ययनापासून एखादी देवता आपणास सिद्ध होईल, एखादी विद्या प्राप्त होईल, अशा लौकिक आशेला पडूनही ते कुशास्त्राची प्रशंसा व वंदना करीत नाहींत. सम्यग्दृष्टी पुरुष कुलिंगी साधु वगैरेला भय, आशा, स्नेह, लोभानें प्रणाम करीत नाहींत व त्यांची प्रशंसा करीत नाहींत. हा मोठा तपस्वी आहे, याला अनेक विद्या साध्य आहेत, याची राजावर देखील मोठी छाप आहे, सर्व लोक याला फार पूज्य मानतात, याला जारण, मारण, उच्चाटणादि अनेक मंत्र शक्ति अवगत आहेत यामुळें कदाचित् हा आपलें नुकसान करील असें समजून भीतीनें सम्यक्त्वी पुरुष ढोंगी साधूंना कधीं नमस्कार करीत नाहींत. यापासून आपणाला कांहीं विद्या साध्य करून घ्यावयाची आहे, हा मोठा करामती आहे, याचें राजाजवळ फार वजन आहे, यापासून आपलें कांहीं काम करून घ्यावयाचें आहे, या लोभानेंही सम्यग्दृष्टी त्याला नमस्कार करीत नाहीं. यानें मला एक रसायन देऊं केलें आहे अथवा याच्यापासून एका औषधाची माहिती करून घ्यावयाची आहे. न्याय व ज्योतिर्विद्या शिकून घ्यावयाची आहे म्हणून आपण त्यांची सेवा करूं. अशा प्रकारच्या आशा-लोभानेंही विषयारंभी परिग्रहधारी खोट्या साधूला सम्यग्दृष्टी नमस्कार करीत नाहींत, त्याची प्रशंसा करीत नाहींत, त्याला सत्यवादी म्हणत नाहींत व ते धर्मवान् आहेत असें समजत नाहींत.

यावर कोणी शंका करील कीं, आपली इच्छा नसतांना जर कोणी बलिष्ठानें जबरीनें आपणांस नमस्कार करावयास लाविलें तर काय करावें ? त्याचें समाधान असें कीं, दुसऱ्यानें जबरीनें नमस्कार करावयास लावल्यानें आपल्या श्रद्धानांत बिघाड होत नाहीं. ज्यावेळीं आपण स्वतः देवतेला भयानें, आशेनें, स्नेहानें, लोभानें नमस्कार करूं तेव्हांच श्रद्धान बिघडतें. जबरीनें कोणा दुष्ट म्लेंछानें एखाद्या व्रती पुरुषाच्या मुखांत अभक्ष्य घातल्यानें त्याचें व्रत बिघडत नाहीं. अन्यमतांच्या शास्त्राचें अवलोकन करीत असतां त्यांच्या देवांची स्तुति स्तोत्रें वाचली गेलीं, तरी तीं फक्त वाचल्यानें स्तुति झाली असें नव्हे. तर सम्यग्दर्शन हा आत्म्याचा परिणाम आहे. त्या परिणामानें जर कुदेव हे सेवन करण्यायोग्य आहेत असें वाटून त्यांचें स्तवन केलें व त्यापासून आपलें कल्याण आहे असें मानलें तरच त्याला सम्यक्त्वाचा अभाव झाला असें म्हणता येईल. केवळ इतर धर्मग्रंथांतील स्तुति वगैरे वाचल्यानें सम्यक्त्व नाहींसें होत नाहीं.

एखाद्या गृहस्थास राज्याधिकाऱ्यास जाऊन भेटावयाचें झालें, अगर त्यांनीं कांहीं विचारिलें व आपणांस त्यांना कांहीं सांगण्याची इच्छा झाली तर त्यापुढें हात जोडून उभे राहावें लागलें तरी यांत सम्यक्त्व नाहींसें होत नाहीं. चारित्र धारण करणारे गृहस्थ व साधू असतील ते मात्र हात जोडीत नाहींत व त्यांच्या शरीराचें शतशः तुकडे केले तरी ते धर्मकार्याशिवाय दुसरें वचन मुखावाटें उच्चारित नाहींत. साधु लोकांनीं आपणास नमस्कार करावा अशी इच्छा दुष्ट मनुष्य, म्लेंछ राजे व इतर महापापी लोकांनाही होत नाहीं. संयमी पुरुष राजाला, चक्रवर्तीला, आईला, बापाला, विद्यागुरूला नमस्कार करीत नाहीं. संयमी द्विजन्मा आहे. अव्रत सम्यग्दृष्टि ही वर सांगितलेल्या भयानें, लोभानें,

आशेनें, स्नेहानें कुदेव, कुगुरु, कुधर्माला नमस्कार करीत नाहीं. व्यवहारासंबंधी कार्यप्रयोजनांत यथायोग्य त्यांचा आदर सत्कार करितो. कोणी जबरदस्ती केली तर देशत्याग करावा, आजीविका सोडावी, धनत्याग करावा पण कुधर्माचें सेवन व कुदेवाची आराधना करूं नये.

**सम्यग्दर्शनाची श्रेष्ठता**

**दर्शनं ज्ञानचारित्रात् साधिमानमुपाश्नुते।**
**दर्शनं कर्णधारं तन्मोक्षमार्गे प्रचक्ष्यते ॥ ३१ ॥**

**अर्थ**– ज्ञान व चारित्र यापेक्षां सम्यग्दर्शन हें श्रेष्ठ आहे ह्मणून मोक्षमार्गांत याला कर्णधार [ नावाडी ] असें ह्मटलें आहे. समुद्रांत खलाशी लोक जहाज चालवितात त्याप्रमाणें अपार संसार-समुद्रांत रत्नत्रयरूपी जहाज चालविण्यास सम्यग्दर्शन हें खलाशाप्रमाणें आहे. म्हणून याला कर्ण-धार ह्मणतात. सारांश– रत्नत्रयांत सम्यग्दर्शन हें अति उत्कृष्ट आहे.

**त्याचा हेतु**

**विद्यावृत्तस्य संभूतिस्थितिवृद्धिफलोदयाः।**
**न सन्त्यसति सम्यक्त्वे बीजाभावे तरोरिव ॥ ३२ ॥**

**अर्थ**– बीजाचे अभावीं जसा वृक्ष उत्पन्न होत नाहीं त्याप्रमाणें विद्या ह्मणजे ज्ञान व वृत्त ह्मणजे चारित्र यांची उत्पत्ति, स्थिति, वृद्धि आणि फलोदय हीं सम्यक्त्व नसलें तर होत नाहीं.

**विशेषार्थ**– बीं नसेल तर वृक्ष कसा उत्पन्न होणार ? वृक्ष उत्पन्न न झाला तर कशाची वृद्धि, कोणाची स्थिति व कुठलें फल ? तसेंच सम्यग्दर्शन नसेल तर ज्ञान व चारित्र तरी कोठून असणार ? सम्यक्त्वाशिवाय ज्ञान कुज्ञान व चारित्र कुचारित्र होय. सम्यक्त्वावांचून ज्ञान व चारित्र यांची उत्पत्तिच होणें शक्य नाहीं तर त्यांची स्थिति व वृद्धि कोठली ? तसेंच ज्ञान व चारित्राचें फल जें सर्वज्ञत्व अथवा परमात्मरूप होणें हें तरी कोठलें ? सारांश सम्यक्त्वाशिवाय सत्यश्रद्धान, ज्ञान व चारित्र हीं कधींही होत नाहींत. पूज्यवर गुणभद्राचार्यांनीं आत्मानुशासन ग्रंथांत ह्मटलें आहे:–

**शमबोधवृत्ततपसां पाषाणस्येव गौरवं पुंसः।**
**पूज्यं महामणेरिव तदेव सम्यक्त्वसंयुक्तम् ॥**

**अर्थ**–शम म्हणजे कषायांची मंदता, बोध म्हणजे अनेक शास्त्रांचें उत्कृष्ट ज्ञान, व्रत म्हणजे तेरा प्रकारचें दुर्धर चारित्र व तप म्हणजे बारा प्रकारचें घोर तपश्चरण. या चार गोष्टी घडून येणें अत्यंत कठिण आहे. या कोणी करूं शकला तरी त्याला त्या दगडासारख्या जडच वाटणार. पण ह्याच क्रिया ( शमभाव, ज्ञान, चारित्र, तप ) जर सम्यक्त्व संयुक्त असतील तर त्याची चिंतामणि रत्नासारखी जगांत पूज्यता वाढेल. तात्पर्य-जगांत मौल्यवान् रत्नें हे एक प्रकारचे पाषाण आहेत. परंतु पाषाण व रत्नें या दोहोंच्या कांतींत मोठा फरक असतो. सर्व पाषाण समान नाहींत.

(शांति, ज्ञान, चारित्र व तप यांचें महत्व)

एखाद्या काळ्या दगडाला कोणी कवडी देखील देणार नाहीं. पण तोच पद्मराग मणि अथवा हिरा एक रतिभर जरी असला तरी त्याचे लक्षावधि रुपये येतील. त्यापासून आपल्या पुत्रपौत्राचें दारिद्य नाहींसे होईल. याच प्रमाणें सम्यक्त्वयुक्त थोडीशी शांति, थोडें ज्ञान, थोडें चारित्र व थोडेसें तप असलें तरी या जीवाला कल्पवासी इंद्रादिक देवामध्यें जाण्याची पात्रता प्राप्त होऊन क्रमानें त्यास जन्ममरणाचा नाश करून मोक्ष प्राप्त करून घेतां येतो. पण मुळींच सम्यक्त्व नसून पुष्कळ शमभाव असला, अकरा अंगांचें ज्ञान असलें, अतिनिर्मळ चारित्र व घोर तपश्चरण केलें तर त्यामुळें कषायांची मंदता होण्यानें भवनवासी, व्यंतर, ज्योतिषवासी देवांमध्यें अथवा अल्पऋद्धिधारी कल्पवासी देवामध्यें उत्पन्न होतां येतें पण पुनः चतुर्गतिमध्यें भ्रमण करावें लागतें. म्हणून सम्यक्त्वसहित शम, बोध, चारित्र व तप धारण करण्यांतच जीवांचें खरें कल्याण आहे.

यावर कोणी अशी शंका करील कीं, सम्यक्त्व नसून केवळ चारित्र व तपश्चरण करणारा मुनि असेल तर तो आरंभादिकांत लीन असलेल्या गृहस्थापेक्षां बरा नव्हे कां ? याचें समाधानासाठीं पुढील श्लोक सांगतात.

**गृहस्थो मोक्षमार्गस्थो निर्मोहो नव मोहवान् ।**
**अनगारो गृही श्रेयान् निर्मोहो मोहिनो मुनेः ॥ ३३ ॥**

**अर्थ**– मोह सोडलेला गृहस्थ मोक्षमार्गामध्यें राहण्यास योग्य आहे. पण मोहवान् मुनि मोक्षमार्गांत राहण्यास योग्य नाहीं. यावरून मोहवान मुनिपेक्षां निर्मोही गृहस्थ श्रेष्ठ आहे.

मिथ्यात्वामुळें अनंत संसारपरिभ्रमण

**विशेषार्थ**– ज्याला मोह म्हणजे मिथ्यात्व नाहीं असा अव्रतसम्यग्दृष्टी श्रावक देखील मोक्षमार्गी म्हणविला जातो. म्हणजे त्याला सात आठ भव देव व मनुष्याचे प्राप्त होऊन तो नियमपूर्वक मोक्षाला जाईल. पण ज्याला मिथ्यात्व आहे त्यानें व्रतधारण करून मुनिपणा अंगीकारिला तरी तो मरून भवनत्रयामध्यें उत्पन्न होऊन संसारामध्येंच भ्रमण करील.

श्री कुंदकुंदस्वामींनी दर्शनपाहुडामध्यें म्हटलें आहे:—

**दंसणभट्ठा भट्ठा दंसणभट्ठाण णत्थि णिव्वाणं ।**
**सिज्झंति चरियभट्ठा दंसणभट्ठा ण सिज्झंति ॥ १ ॥**
**सम्मत्तरयणभट्ठा जाणंता बहुविहाइं सत्थाइं ।**
**आराहणाविरहिया भमंति तत्थेव तत्थेव ॥ २ ॥**
**सम्मत्तविरहिया णं सुट्ठु वि उग्गं तवं चरंता णं ।**
**ण लहंति बोहिलाहं अवि वाससहस्सकोडीहिं ॥ ३ ॥**
**जो दंसणेसु भट्ठा णाणे भट्ठा चरित्तभट्ठा य ।**
**एदे भट्ठविभट्ठा सेसे वि जणं विणासंति ॥ ४ ॥**

जह मूलम्मि विणट्ठे दुमस्स परिवार णत्थि परिवड्ढी ।
तह जिणदंसणभट्ठा मूलविणट्ठा ण सिज्झंति ॥ ५ ॥
जे दंसणेसु भट्ठा पाए पाडंति दंसणधराणं ।
ते हुंति लल्लमूया बोही पुण दुल्लहा होदि ॥ ६ ॥
जे वि पडंति च तेसिं जाणंता लज्जगारवभयेण ।
तेसिं पि णत्थि बोही पावं अणुमोदमाणाणं ॥ ७ ॥
जिणवयणमोसहमिणं विसयसुहविरेयणं अमियभूदं ।
जरमरणवाहिवेयणखययरणं सव्वदुक्खाणं ॥ ८ ॥
एक्कं जिणस्स रूवं बीयं उक्कस्ससावयाणं च ।
अवरट्ठियाण तिदयं चउत्थ पुण लिंग दंसणे णत्थि ॥ ९ ॥
जं सक्कइ तं कीरइ जं च ण सक्केइ तं च सद्दहइ ।
केवलजिणेहिं भणियं सद्दहमाणस्स सम्मत्तं ॥ १० ॥
ण वि देहो वंदिज्जइ ण वि य कुलो ण वि य जाइसंपण्णो ।
को वंदमि गुणहीणो ण हु सवणो ण सावओ होइ ॥ ११ ॥

**अर्थ**– ज्यांचें सम्यग्दर्शन भ्रष्ट झालें असेल, ते सर्वथैव भ्रष्ट आहेत. कारण सम्यग्दर्शनापासून जे भ्रष्ट झाले त्याना अनंतकाल गेला तरी निर्वाण प्राप्त होत नाहीं. ज्यांचें सम्यग्दर्शन न सुटतां फक्त चारित्रापासून जे भ्रष्ट झाले आहेत ते तिसऱ्या भवांत निर्वाण प्राप्त करून घेतात. पण जर सम्यक्त्व नाहींसें झालें तर अनंतभवामध्यें ही संसारपरिभ्रमणापासून ते मुक्त होत नाहींत॥१॥ ज्यांचें सम्यक्त्वरूपी रत्न नाहींसें झालें आहे ते पुष्कळ प्रकारचीं शास्त्रें जाणणारे असले तरी त्यांना चार आराधना[1] नसल्यानें संसारांतच भ्रमण करावें लागतें ॥२॥

जे सम्यक्त्वरत्नापासून पराङ्मुख आहेत, त्यांनीं हजारों नव्हे कोट्यवधि वर्षपर्यंत उग्र तपश्चरण केलें तरी त्यांना रत्नत्रयाचा लाभ होत नाहीं ॥ ३ ॥ ज्यांचें सम्यग्दर्शन नाहींसें झालें आहे त्यांचें ज्ञानही विपरीत झाल्यानें ते भ्रष्टच आहेत. पण ज्यांचें आचरणही भ्रष्ट झालें असेल ते तर भ्रष्टाहून भ्रष्ट समजावें. त्यांची संगति जे करतील त्यांचा धर्म नाहींसा होऊन ते नाशाप्रत पावतील ॥ ४ ॥ ज्या वृक्षाचें मूळ नाहींसें झालें त्या वृक्षाला डहाळी, पानें, फुलें, फळें वगैरे परिवाराची वृद्धि कोठून होणार ? याप्रमाणें सम्यग्दर्शनापासून जे भ्रष्ट आहेत ते मूळ भ्रष्ट झाल्या प्रमाणें आहेत. मग त्यांना ज्ञानचारित्रादिकांची सिद्धि कोठून होणार ? ॥ ५ ॥ सम्यग्दर्शनापासून भ्रष्ट आहेत पण सम्यग्दर्शन धारण करणाऱ्यांनीं आपणास नमस्कार करावा असें इच्छितात ते परलोकीं लंगडे, मुके व बहिरे होतात. सारांश– आपण स्वतः सम्यग्दर्शनापासून भ्रष्ट असतांना

१—ज्ञान, दर्शन, चारित्र आणि तप.

सम्यक्त्वी पुरुषाकडून आपण वंदिले जावें अशी इच्छा करणारे पुष्कळ कालपर्यंत एकेंद्रिय जीवांत भ्रमण करितात ॥ ६ ॥ जे पुरुष लज्जेनें, भयानें, डौलानें, मोठेपणा वाढावा म्हणून मिथ्यादृष्टीला नमस्कार करितात, त्यांना मिथ्यात्वाला अनुमोदन दिल्यामुळें रत्नत्रयाची प्राप्ति होणें दुर्लभ आहे ॥ ७ ॥ सम्यग्दृष्टी पुरुषाला जिनेश्वराचें वचन हीच कोणी एक अमृतासारखी औषधि आहे ती विषयसुखरूप आमांशाचें विरेचन [नाश] करणारी आहे. याच औषधापासून जन्मजरा-मरणाच्या व्याधीचा व संसारांतील सर्व दुःखांचा नाश होणारा आहे. भावार्थ-सम्यग्दृष्टी पुरुषाच्या मनाचा असा दृढनिश्चय असतो कीं, जन्मजरामरणादिक सर्व दुःखरूप रोगांचा नाश करणारें अमृत फक्त जिनेश्वरांची वाणीच आहे. या वचनाशिवाय अनादि कालापासून लागलेली विषयांची आशा हीच कोणी एक आमांशरूपी संग्रहणी तिचा नाश करून ज्ञानसुखादिक अवयवांना अमृताप्रमाणें पुष्ट करणारा दुसरा उपायच नाहीं. ॥ ८ ॥ ज्यांनीं सर्व वस्त्रांचा त्याग करून नग्नरूप धारण केलें आहे असें जिनेश्वराचें एक लिंग, ज्यानें एक कार्पान [ लंगोटी ] व अपुरें वस्त्र धारण केलें असेल असें उत्कृष्ट श्रावकाचें दुसरें लिंग, आणि अर्जिका हें तिसरें लिंग. याशिवाय चौथें लिंग जिनमतांत मानलेलें नाहीं. जर दुसरें कोणतें लिंग असेल तर तें जिनधर्मबाह्य म्हणून वंदन करण्यास योग्य नाहीं ॥ ९ ॥ जिनेश्वराच्या आज्ञेचें पालन करण्याचें सामर्थ्य असेल त्यांनीं व्रततपादिक शक्य असेल तर करावें. ज्याला तें करण्याचें सामर्थ्य नसेल त्यांनीं त्याचें श्रद्धान करावें. श्रद्धान करणाऱ्या जीवाला केवलिजिनांनीं सम्यक्त्वी म्हटलें आहे ॥ १० ॥ सम्यग्दृष्टी पुरुष रत्नत्रयरहित देह, जाति, कुल व सम्यग्दर्शन रहित श्रावक अथवा मुनि यापैकीं कोणालाही वंदनीय समजत नाहीं. रत्नत्रयाच्या प्रभावानें देह, कुल व जाति हीं सर्व वंदनीय होतात.

यापुढें जीवावर सर्वोत्कृष्ट उपकार कोण करितो व अपकार कोण करितो हें सांगतात—

**न सम्यक्त्वसमं किंचित्त्रैकाल्ये त्रिजगत्यपि ।**
**श्रेयोऽश्रेयश्च मिथ्यात्वसमं नान्यत्तनूभृताम् ॥ ३४ ॥**

**अर्थ**– प्राणिमात्राचें कल्याण करणारा सम्यक्त्वासारखा तिन्ही कालांत व तिन्ही जगांत दुसरा पदार्थ नाहीं तसेंच मिथ्यात्वासारखा अकल्याण करणाराही दुसरा पदार्थ नाहीं.

**विशेषार्थ**– अनंत काल होऊन गेला, वर्तमान कालांतील एक समय व अनंत काल पुढें येणार आहे अशा तिन्ही कालांत, आणि अधोलोक, असंख्यात द्वीप समुद्रापर्यंतचा मध्यलोक, व स्वर्गादि ऊर्ध्वलोक या तिन्ही लोकांमध्यें सम्यक्त्वासारखा जीवावर सर्वोत्कृष्ट उपकार करणारा कोणी नाहीं व होणारही नाहीं. जीवावर जो उपकार सम्यक्त्व करितें तसा उपकार तीन लोकांत असणारे, झालेले व होणारे, इंद्र, अहमिंद्र, भुवनेंद्र, चक्रवर्ति, नारायण, बलभद्र व साक्षात् तीर्थंकर यांना, व अचेतन अशा मणि-मंत्र–औषधादि द्रव्यांना करिता येणार नाहीं. याचप्रमाणें या जीवावर मिथ्यात्वाला जसा अपकार

सम्यक्त्वाचा महिमा

करितां येतो तसा अपकार करणाराही त्रिभुवनांत व त्रिकालीं कोणताही चेतन वा अचेतन पदार्थ नाहीं, झाला नाहीं व होणार नाहीं. याकरितां मिथ्यात्वाचा त्याग होईल असाच नेहमीं प्रयत्न करावा. संसारांतील सर्व दुःख नाहींसें करून आत्मकल्याणाच्या परमकोटीला पोंचविणारें एक सम्यक्त्वच आहे व तें प्राप्त करून घेण्याचा उद्योग केला पाहिजे.

सम्यग्दर्शनाचा प्रभाव.

**सम्यग्दर्शनशुद्धा नारकतिर्यङ्नपुंसकस्त्रीत्वानि ।**
**दुष्कुलविकृताल्पायुर्दरिद्रतां च व्रजंति नाप्यव्रतिकाः ॥३५॥**

**अर्थ**– ज्यांचें सम्यग्दर्शन शुद्ध आहे ते व्रतरहित असले तरी त्यांना नरकगति, तिर्यंचगति, नपुंसकत्व, स्त्रीपणा, दुष्कुल, विकृतरूप, अल्पायुष्य व दारिद्र्य हे प्राप्त होत नाहींत.

**विशेषार्थ**– अव्रत सम्यग्दृष्टीला एकेचाळीस कर्म प्रकृतींचा बंध होत नाहीं असा नियम आहे. त्या प्रकृति अशा– मिथ्यात्व १, हुंडकसंस्थान २, नपुंसकवेद ३, असंप्राप्तासृपाटिका संहनन ४, एकेंद्रिय ५, स्थावर ६, आताप ७, सूक्ष्मपणा ८, अपर्याप्त ९, द्वींद्रिय १०, त्रींद्रिय ११, चतुरिंद्रिय १२, साधारण १३, नरकगति १४, नरकगत्यानुपूर्वी १५, नरकायु १६ या सोळा प्रकृतींचा बंध मिथ्यात्व परिणामापासूनच होतो. अनंतानुबंधीच्या प्रभावानें बंधाला प्राप्त होतील अशा पंचवीस प्रकृति आहेत त्या अशा अनंतानुबंधी क्रोध १, मान, २, माया ३, लोभ ४, स्त्यानगृद्धि ५, निद्रानिद्रा ६, प्रचलाप्रचला ७, दुर्भग ८, दुःस्वर ९, अनादेय १०, न्यग्रोधपरिमंडल संस्थान ११, स्वातिसंस्थान १२, कुब्जकसंस्थान १३, वामन संस्थान १४, वज्रनाराच संहनन १५, नाराच संहनन १६, अर्द्धनाराच संहनन १७, किलक संहनन १८, अप्रशस्त विहायोगति १९, स्त्रीपर्याय २०, नीचगोत्र, २१, तिर्यग्गति २२, तिर्यग्गत्यानुपूर्वी २३, तिर्यंचायु २४, उद्योत २५. या पंचवीस व वरील सोळा मिळून एकेचाळीस प्रकृतींचा बंध मिथ्यादृष्टीलाच होतो. अव्रत सम्यग्दृष्टी पुरुषाला मिथ्यात्व आणि अनंतानुबंधी यांचा अभाव झाल्यानें या एकेचाळीस प्रकृतींचा नवीन बंध होत नाहीं. सम्यक्त्वाच्या प्रभावानें मिथ्यात्व अवस्थेंत बांधले गेलेल्या प्रकृतींचा नाश होतो. पण आयुर्बंध नाहींसा होत नाहीं. तरी सम्यक्त्वाचा एवढा प्रभाव आहे कीं, आधीं सातव्या नरकाचें आयुष्य बांधलें गेलें असेल व मागाहून सम्यक्त्व झालें तर तो प्रथम नरकालाच जाईल. दुसऱ्या तिसऱ्या वगैरे नरकाला जाणार नाहीं. तिर्यंच योनींत निगोदी एकेंद्रिय जीवाचें आयुष्य बांधलें गेलें असेल तर सम्यक्त्वाच्या प्रभावानें उत्तम भोगभूमींत पंचेंद्रिय तियच होईल. कर्मभूमींतील एकेंद्रियादि जीव होणार नाहीं. जर पूर्वी लब्ध्यपर्याप्तक मनुष्याचें आयुष्य बांधलें गेलें असेल तर सम्यक्त्वाच्या प्रभावानें उत्तम भोगभूमींत मनुष्य होऊन जन्मेल. पूर्वी व्यंतरादिक देवाचें आयुष्य बांधिलें गेलें असेल तर याच्या प्रभावानें महर्द्धिकदेव होऊन जन्मेल. इतर भवनत्रिकदेवामध्यें अथवा चार देवांच्या स्त्रियामध्यें, सर्व मनुष्य-

सम्यक्त्वाचा प्रभाव

स्त्रियामध्यें व पशुस्त्रियामध्यें तो उत्पन्न होणार नाहीं, तसेंच तो नीच कुलांत, दरिद्री व अल्पायुषी होऊन जन्मत नाहीं. असा सम्यक्त्वाचा प्रभाव आहे

सम्यग्दर्शनाच्या प्रभावानें कशाप्रकारचा मनुष्य होतो हें सांगतात—

**ओजस्तेजोविद्यावीर्ययशोवृद्धिविजयविभवसनाथाः ।**
**महाकुला महार्था मानवतिलका भवंति दर्शनपूताः ॥ ३६ ॥**

**अर्थ**— सम्यग्दर्शनानें पवित्र झालेले जीव, पराक्रमी, तेजस्वी, विद्वान्, शक्तिमान्, कीर्तिमान्, चढत्या वैभवाचें, विजयी, मोठ्या कुलांत जन्म घेणारे, चार पुरुषार्थ संपादन करून घेणारे व सर्व मनुष्यजातींत तेजस्वी हिऱ्याप्रमाणें शिरोभागीं शोभा पावणारे असे होतात.

सम्यक्त्वाच्या प्रभावानें देवांचें वैभव प्राप्त होतें असें सांगतात—

**अष्टगुणपुष्टितुष्टा दृष्टिविशिष्टाः प्रकृष्टशोभाजुष्टाः ।**
**अमराप्सरसां परिषदि चिरं रमन्ते जिनेन्द्रभक्ताः स्वर्गे ॥ ३७ ॥**

**अर्थ**— सम्यक्त्वानें युक्त असलेले जिनेंद्रभक्त स्वर्गांत उत्पन्न होऊन देवदेवांगनांच्या सभेंत चिरकाल क्रीडा करीत असतात. ते आठ ऋद्धि व निरोगी व पुष्ट शरीर प्राप्त झाल्यानें सदैव आनंदांत असतात; त्यांना अणिमा, महिमा, प्राप्ति, प्राकाम्य, गरिमा, लघिमा, ईशत्व आणि वशित्व या आठ ऋद्धि प्राप्त होतात व त्यांचें शरीर व अवयव अत्यंत सुंदर असून सदैव पुष्ट असतात.

**विशेषार्थ**— अव्रतसम्यग्दृष्टी स्वर्गलोकामध्यें देव होतो तो इतर मिथ्यात्वी देवासारखा पुण्यहीन नसतो, तो इंद्राप्रमाणें वैभव, कांति, ज्ञान व सुख भोगणारा महर्द्धिक, सामानिक, त्रायस्त्रिंश देव होतो किंवा लोकपाल देवामध्यें उत्पन्न होतो. असंख्यात देवांना अणिमामहिमादि ऋद्धि व शरीराची कांति, आभरण, विमान, विक्रिया प्राप्त होणार नाहीं अशी उत्कृष्ट विभूति सम्यक्त्वी देवाला त्याठिकाणीं प्राप्त होते व तो असंख्यात कालपर्यंत कोट्यवधि अप्सरांच्या सभेमध्यें क्रीडा करीत आपला काल आनंदांत घालवितो.

स्वर्गामध्यें सागरों वर्षें इंद्रियजनित सुख भोगल्यानंतर मनुष्यलोकीं येऊन त्याची काय अवस्था होते हें सांगतातः—

**नवनिधिसप्तद्वयरत्नाधीशाः सर्वभूमिपतयश्चक्रम् ।**
**वर्तयितुं प्रभवंति स्पष्टदृशः क्षत्रमौलिशेखरचरणाः ॥ ३८ ॥**

**अर्थ**— ज्यांना निर्मल सम्यग्दर्शन प्राप्त झालें आहे ते स्वर्गांत आपलें आयुष्य पूर्ण झाल्यानंतर मनुष्यलोकीं येऊन नवनिधि–चौदा रत्नांचे स्वामी होतात. संपूर्ण भरतक्षेत्रांतील बत्तीस हजार देशांचे अधिपति होतात व मुकुटबद्ध राजांच्या मस्तकावरील किरीटांवर त्यांचे चरण शोभत असतात.

**भावार्थ**— सम्यक्त्वाच्या प्रभावानें स्वर्गांतून मनुष्यभवांत येऊन सम्यग्दृष्टी जीव नवनिधि, चौदा रत्नांचा स्वामी व सर्व राजावर आपला हुकुम चालविणारा षट्खंडाधिपति म्हणजे चक्रवर्ति होतो.

सम्यक्त्वाच्या प्रभावानें जीव तीर्थंकर होतो

**अमरासुरनरपतिभिर्यमधरपतिभिश्च नूतपादाम्भोजाः ।**
**दृष्ट्या सुनिश्चितार्था वृषचक्रधरा भवन्ति लोकशरण्याः ॥ ३९ ॥**

**अर्थ**– देवेंद्र, असुरेंद्र, चक्रवर्ती व गणधर हे ज्यांच्या चरणकमलांची स्तुति करितात. तसेंच जीवादि द्रव्यांचा ज्यांनीं यथार्थ निर्णय केला आहे व जे संसारी जीवांचें कर्मजनित दुःखापासून रक्षण करितात असे ते तीर्थंकर सम्यग्दर्शनाच्या महात्म्यानें धर्मचक्रधारी होतात.

**भावार्थ**– सम्यग्दृष्टी तीर्थंकर होऊन अनेक जीवांचें संसार–दुःख नाहींसें करितात. धर्मचक्राचें प्रवर्तन करितात. त्यांना इंद्र, असुरेंद्र, गणधरादिक हे सर्व नेहमीं वंदन करितात. तेच जीवांचे परम रक्षक आहेत.

सम्यग्दृष्टी पुरुषालाच मोक्ष प्राप्त होतो

**शिवमजरमरुजमक्षयमव्याबाधं विशोकभयशङ्कम् ।**
**काष्ठागतसुखविद्याविभवं विमलं भजन्ति दर्शनशरणाः ॥ ४० ॥**

**अर्थ**– कर्ममलानें रहित अतएव विमल, अजर व अरुज अर्थात् जरा व रोग नसलेला, अक्षय अर्थात् ज्ञानदर्शनसुखवीर्य या अनंतचतुष्टयांनीं युक्त, निर्बाध, सुख आणि विद्या–वैभवाची परिसीमा असलेला मोक्ष सम्यग्दर्शनानें रक्षित जीवांना प्राप्त होतो.

याप्रमाणें सम्यक्त्वाच्या प्रभावाचें वर्णन करून दर्शनाधिकार संपवितांना दर्शनाचा महिमा सांगून उपसंहार करितात—

उपसंहार

**देवेन्द्रचक्रमहिमानममेयमानं ।**
**राजेन्द्रचक्रमवनीन्द्रशिरोऽर्चनीयम् ॥**
**धर्मेन्द्रचक्रमधरीकृतसर्वलोकं ।**
**लब्ध्वा शिवं च जिनभक्तिरुपैति भव्यः ॥ ४१ ॥**

**अर्थ**– जिनभक्तीमध्यें तत्पर असा भव्य जीव इंद्रपदाचें अगणित वैभव पावून, पृथ्वीपतीला वंद्य अशा राजविभूतीला भोगून, सर्व लोकांत श्रेष्ठ अशा तीर्थंकरपदवीला प्राप्त करून घेऊन मोक्षाला जातो.

**भावार्थ**– जिन म्हणजे परमात्म्याच्या स्वरूपांत ज्याला भक्ति म्हणजे अनुराग आहे असा सम्यग्दृष्टी जीव भव्य म्हणावा. तो या मनुष्यजन्मांतून मरणोत्तर स्वर्गलोकीं अगणित ऋद्धि, शक्ति, सुख व वैभवाला धारण करणाऱ्या देवेंद्राच्या समूहाची महिमा प्राप्त करून घेतो. तेथून मनुष्यजन्मांत आल्यानंतर बत्तीस हजार मुकुटबद्ध राजांच्या मस्तकांनीं वंदनीय असें चक्रवर्तिपद त्याला प्राप्त होतें. व पुनः स्वर्गांत अहमिंद्राची संपत्ति प्राप्त होते. शेवटीं सर्व त्रैलोक्याला पूज्य असें तीर्थंकरपद प्राप्त होऊन तो मोक्षाला जातो.

याप्रमाणें दर्शनमोहनीय कर्माच्या अभावानें सत्यार्थ श्रद्धान, ज्ञान व अनंतानुबंधीच्या अभावानें स्वरूपाचरण चारित्र सम्यग्दृष्टीला प्रगट होतें. जरी अप्रत्याख्यानावरण कर्माच्या उदयानें त्याला देशचारित्र धारण करिता आलें नाहीं, व प्रत्याख्यानाच्या उदयानें सकल-चारित्राचा अंगीकार करितां आला नाहीं, तरी त्याला देहादिक परद्रव्य व रागद्वेषादि-कर्मजनित परभाव यांतील भेदांचें पूर्ण ज्ञान झालेलें असतें. तो आपल्या ज्ञानदर्शनरूप स्वभावांतच आत्मबुद्धि धारण करितो. पर्यायावरील ममत्वाचा विचार मनांत आणीत नाहीं. त्या साठीं असें चिंतन करितो कीं, "हे आत्मन्, तूं भगवंतांनीं प्रतिपादिलेल्या परमागमाला शरण जाऊन ज्ञानदृष्टीनें पहा म्हणजे हे आठ प्रकारचे स्पर्श, पांच प्रकारचे रस, दोन प्रकारचे गंध, पांच प्रकारचे वर्ण तुझें स्वरूप नसून पुद्गलाचें स्वरूप आहे हें तुला समजेल. क्रोध, मान, माया, लोभ हे पण तुझें स्वरूप नसून कर्माच्या उदयापासून उत्पन्न होणारे विकार आहेत. याचप्रमाणें हर्ष, विषाद, मद, मोह, शोक, भय. ग्लानि वगैरे कर्मजनित विकार आहेत. ते तुझ्या स्वरूपाहून भिन्न आहेत. नरक, तिर्यंच, मनुष्य, देव या अवस्थाही कर्मोदयापासून उत्पन्न होणाऱ्या आहेत, अतएव विनाशिक आहेत. मी गोरा नाहीं, मी काळा नाहीं, मी राजा नाहीं, मी रंक नाहीं, मी बलवान् नाहीं, मी निर्बल नाहीं, मी स्वामी नाहीं, मी सेवक नाहीं, मी रूपवान् नाहीं, मी कुरूप नाहीं, मी पुण्यवान् नाहीं, मी पापी नाहीं, मी धनवान् नाहीं, मी निर्धन नाहीं, मी ब्राह्मण नाहीं, मी क्षत्रिय नाहीं, मी वैश्य नाहीं, मी शूद्र नाहीं, मी स्त्री नाहीं, मी पुरुष नाहीं, मी नपुंसक नाहीं, मी स्थूल नाहीं, मी कृश नाहीं, मी नीच नाहीं, मी उच्च नाहीं, मी कुलवान् नाहीं, मी अकुली नाहीं, मी पंडित नाहीं, मी मूर्ख नाहीं, मी दाता नाहीं, मी याचक नाहीं, मी गुरु नाहीं, मी शिष्य नाहीं, मी देह नाहीं, मी इंद्रिय नाहीं, मी मन नाहीं; हे सर्व कर्मोदयानें पुद्गलाला होणारे विकार आहेत. मी फक्त ज्ञाता व द्रष्टा आहे. ही सर्व रूपें आत्म्याचीं नव्हेत, पुद्गलाचे वेष आहेत. हें जग माझें नव्हे. हा देश, हें शहर वगैरे सर्व परद्रव्य आहे. कर्मानें मला येथें आणून सोडलें आहे. आतां मी कोणत्या देशांना व क्षेत्रांना माझें म्हणूं! मिथ्यादृष्टी परकृत-पर्यायाला आपले मानतो. त्याला देहामध्यें, कुलामध्यें, धनामध्यें, राज्यामध्यें, ऐश्वर्यामध्यें, घरादारामध्यें, शहरामध्यें, कुटुंबामध्यें वगैरे सर्वत्र आपलेपणा भासतो. या वस्तूच्या हानिवृद्धीबरोबर आपलीही हानिवृद्धि झाली म्हणजे मी मोठा झालों, मी मरण पावलों, मी जगलों, माझा अपमान झाला, माझें सर्वस्व गेलें वगैरे परवस्तूमध्यें आपला संकल्प करीत राहिल्यानें आर्तध्यान व रौद्रध्यान प्राप्त होतें. त्यामुळें दुर्गति प्राप्त होऊन संसारांत परिभ्रमण करावें लागतें. मिथ्यादृष्टी जीवाला जिनधर्माचें यत्किंचित् ज्ञान प्राप्त झाल्याबरोबर तो आपल्या स्वकपोलकल्पनांनीं लोकांना भ्रम उत्पन्न करणाऱ्या अनेक प्रकारच्या युक्त्या योजून मूढ लोकांपुढें आपल्या विद्वत्तेची बढाई मिरवितो व शास्त्रविरूद्ध अनेक प्रकारचा उपदेश देतो. स्वधर्माशीं कृतघ्न बनून जिन-शास्त्रांची निंदा करितो. आपणाहून अधिक ज्ञान असणाऱ्या विद्वानांची निंदा करितो. दुरभिमानी

समारोप

चार लोकांनीं त्याच्या म्हणण्याला मान्यता दिली, म्हणजे त्याला आपल्या शहाणपणाचा अभिमान चढून, स्याद्वादस्वरूपी जिनवाणी विरूद्ध एकांतरूप तत्त्वाचें प्रतिपादन करूं लागतो. त्यामुळें अनेक प्रकारचे विसंवाद व कलह उत्पन्न होतात. याशिवाय दुसरे कित्येक मिथ्यादृष्टी आहेत ते बाह्यतः थोडासा त्याग करण्यानें व स्नानादिक बाह्य क्रियेंतच धर्म मानण्यानें व अन्य देवांना वंदन करण्याचें सोडण्यानें आपण मोठे धर्मवान् आहों असें समजून इतर जीवांची निंदा व आपली प्रशंसा करूं लागतात. ते अन्यायानें उपजीविका करण्यामध्यें, व हिंसादिक आरंभादि क्रिया करण्यांत पटाईत असतात. ते सदैव अन्यधर्मीयांचीं छिद्रें पाहात फिरतात व निर्दोष पुरुषावर खोटे दोष लावित रहातात. मदानें उन्मत्त होऊन स्वतःला उच्च मानून इतरांना नीच, अज्ञानी व भ्रष्ट मानण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते. असे हे पापी स्वतःच्या प्रशंसेनें फुगलेले स्वेच्छाचारी बनतात. आपल्या स्वरूपाच्या शुद्धतेकडे त्यांचें मुळींच लक्ष्य नसतें. हे स्वेच्छेनें अनेक प्रकारें भोळ्या जीवांना खोटा उपदेश देऊन त्यांचा बुद्धिभ्रंश करितात. याशिवाय आपण कुदेव-कुगुरूला नमस्कार करण्याचा त्याग करून अन्य देवांची निंदा करितात. भरसभेंत इतर धर्मीय साधूंची निंदा करून आपण सम्यग्दृष्टी आहोंत असें भासवितात. व लोकांनीं सदैव आपणास मोठे मानावें असा प्रयत्न करितात. कुगुरुकुदेवांना पशु, नारकी व भोगभूमीचें जीवही नमस्कार करीत नाहींत व पूजनही करीत नाहींत. केवळ नमस्कार व पूजन न करण्यानेंच जर कोणी सम्यग्दृष्टी होत असेल तर सर्व नारकी--तिर्यंच--मनुष्यादिक सम्यग्दृष्टी बनतील. परंतु वास्तविक तशी स्थिति नाहीं. जगांतील सर्व मिथ्यादृष्टी जीवांची व देवांची निंदा करण्यानें सम्यक्त्व उत्पन्न होत नाहीं. जगाची निंदा करणारा व पापी जीवांशीं वैर करणारा खात्रीनें दुर्गतीला प्राप्त होतो. अनादिकालापासून जीवाची मिथ्या-प्रवृत्ति होत आली आहे. सम्यग्दृष्टी पुरुष अशा जीवाकडे करुणादृष्टीनें पाहून त्याविषयीं साम्य-भाव धारण करितो. यावरून सम्यग्दर्शन हें आत्मपराच्या सत्य श्रद्धानावर अवलंबून आहे व तें सत्यश्रद्धान ज्ञानविनयानें युक्त स्याद्वादपरमागमाचें ज्ञान प्राप्त करून घेण्यानेंच होणारें आहे."

याप्रमाणें श्रीसमंतभद्रस्वामींनीं रचिलेल्या रत्नकरंड--श्रावकाचाराच्या मूलसूत्राच्या ग्रंथांतील पंडित सदासुखजीच्या हिंदी टीकेवरून महाराष्ट्रभाषेंतील या वचनिकेंत सम्यग्दर्शनाचें स्वरूप-वर्णन नांवचा पहिला अधिकार समाप्त.

---

# ज्ञानाधिकार

सम्यग्ज्ञानाचें स्वरूप

**अन्यूनमनतिरिक्तं याथातथ्यं विना च विपरीतात् ।**
**निःसन्देहं वेद यदाहुस्तज्ज्ञानमागमिनः ॥ ४२ ॥**

**अर्थ**– जें वस्तूच्या स्वरूपाला पूर्णपणें जाणतें, वस्तूचें जसें स्वरूप आहे त्याहून अधिक जें जाणत नाहीं, वस्तूचें जें सत्यस्वरूप आहे तसेंच जें जाणतें, विपरीत जाणत नाहीं व संशयरहित जाणतें त्याला आगम जाणणाऱ्या गणधर देवांनीं ज्ञान असें म्हटलें आहे.

**विशेषार्थ**– जें ज्ञान वस्तूच्या स्वरूपाला अपूर्ण जाणतें त्या ज्ञानास मिथ्याज्ञान म्हणतात. जसें आत्म्याचा स्वभाव अनंतज्ञान–स्वरूपात्मक असतांना त्याला इन्द्रियजनित मतिज्ञान मात्र आहे असें जाणणें. हें जाणणें न्यून असल्यानें मिथ्याज्ञान झालें. वस्तूचें स्वरूप आहे त्यापेक्षां अधिक जाणण्यानेंही मिथ्याज्ञान होतें. जसें आत्म्याचा स्वभाव-ज्ञानदर्शनसुखसत्तात्मक व अमूर्तिक आहे म्हणून त्याला ज्ञानदर्शन–सुख-सत्तारूप जाणूनही पुद्गलांचे गुण रूप, रस, गंध, वर्ण वगैरे व मूर्तिकपणा हेही त्याचे स्वभाव आहेत असें जाणणें, हें अधिक जाणणें मिथ्याज्ञान होय. शिंपेला पांढरी व चकाकतांना पाहून तिचें ठायीं रुप्याचें ज्ञान होणें हें विपरीत ज्ञानही मिथ्याज्ञान होय. ही शिंप आहे किंवा रूपें असा दोन्हीं पदार्थांच्या ज्ञानांतून एकाचही निश्चितज्ञान न होणें यास संशयज्ञान म्हणतात. हें मिथ्याज्ञान आहे. याप्रमाणें वस्तुच्या स्वरूपाला कमी, अधिक, उलट व संशयरूपानें जाणणें हें मिथ्याज्ञान आहे.

विपरीत ज्ञान

वस्तूचें जसें स्वरूप आहे तसेंच जाणणें याला सम्यग्ज्ञान म्हटलें आहे. जसें सोळाच्या संख्येला पांचांनीं गुणिलें असतां ऐंशी होतात. त्याला अष्ट्याहत्तर म्हणणें हें न्यून ज्ञान व ब्यायेंशीं म्हणणें हें अधिक ज्ञान व ऐंशीला सोळा अथवा पांच म्हणणें हें विपरीत ज्ञान व सोळाला पांचांनीं गुणलें असतां ऐंशी झाले किंवा नाहीं कोणास ठाऊक हें संशयज्ञान. याप्रमाणें कमी जाणणें, अधिक जाणण, विपरीत जाणणें, व संशययुक्त जाणणें असें चार प्रकारचें मिथ्याज्ञान आहे. जें ज्ञान वस्तूच्या स्वरूपाला न्यून जाणीत नाहीं, अधिक जाणीत नाहीं, विपरीत जाणीत नाहीं व संशयात्मक जाणत नाहीं. तर जसें स्वरूप आहे तसेंच संशयरहित जाणतें त्यालाच सम्यग्ज्ञान म्हणतात.

सम्यग्ज्ञान

सम्यग्ज्ञान हें प्रथमानुयोगाला जाणतें

**प्रथमानुयोगमर्थाख्यानं चरितं पुराणमपि पुण्यम् ।**
**बोधिसमाधिनिधानं बोधति बोधः समीचीनः ॥ ४३ ॥**

**अर्थ**– सम्यग्ज्ञानानें प्रथमानुयोगाला जाणिलें आहे. त्यांत धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या

चार पुरुषार्थांचें वर्णन आहे. त्यांत एकेकाचीं चरित्रें व त्रेसष्ट शलका पुरुषांच्या कथा वर्णिल्या आहेत म्हणून त्यास पुराण अशी संज्ञा आहे, जो बोधि समाधीचें निधान आहे म्हणजे सम्यग्दर्शनादिकांची प्राप्ति झालेली नाहीं त्यांना ती होणें ही बोधि व प्राप्त झालेल्या सम्यग्दर्शनादिकांची परिपूर्णता होणें ही समाधि अर्थात् रत्नत्रयाच्या पूर्णतेचें व उत्पत्तीचें जें स्थान आहे, व पुण्य उत्पन्न होण्याला जें कारण आहे म्हणून ज्याला पुण्यसंज्ञा आहे, अशा प्रकारच्या प्रथमानुयोगाला सम्यग्ज्ञान जाणतें.

**भावार्थ**– ज्यामध्यें धर्म म्हणजे काय याचें, धर्माचें फल जी धनसम्पदा वगैरे अर्थ व पंचेन्द्रियांचे विषय हे काम व संसारापासून सुटणें हे मोक्ष याचें वर्णन आहे. एका पुरुषाच्या कथेला चरित व त्रेसष्ट शलाका पुरुषांच्या कथांना पुराण म्हटलें आहे. वक्ता व श्रोत्यांना श्रवण करण्यापासून पुण्य उत्पन्न होतें म्हणून जें पुण्यरूप आहे. चार आराधनांची प्राप्ति होण्याचें व त्या परिपूर्ण होण्याचें जें साधन आहे अशा प्रकारच्या प्रथमानुयोगाला सम्यग्ज्ञानच जाणतें.

करणानुयोग

**लोकालोकविभक्तेर्युगपरिवृत्तेश्चतुर्गतीनां च ।**
**आदर्शमिव तथामतिरवैति करणानुयोगं च ।। ४४ ।।**

**अर्थ**– याचप्रमाणें मति म्हणजे सम्यग्ज्ञान हें करणानुयोगालाही जाणतें. करणानुयोग हा लोक आणि अलोक यांच्या विभागाला, उत्सर्पिणी व अवसर्पिणी यांच्या सहा सहा कालांत होणाऱ्या परिवर्तनाला, चारी गतीमध्यें होणाऱ्या परिभ्रमणाला दर्पणाप्रमाणें दाखविणारा आहे.

**विशेषार्थ**– ज्यामध्यें षड्द्रव्यांच्या समुदायस्वरूपानें असणारा लोक व केवल आकाशद्रव्य हा अलोक, हे आपापल्या गुणपर्यायासह प्रतिबिंबित होतात, सहा कालाच्या निमित्तानें जसजशीं जीवपुद्गलांचीं स्थित्यंतरें होत असतात तसतशीं ज्यांत प्रतिबिंबित होऊन झळकतात व ज्यांत चारी-गतींचें स्वरूप प्रगट दिसतें अशा दर्पणासारखा करणानुयोग आहे. त्याला यथार्थ सम्यग्ज्ञानच जाणूं शकतें.

चरणानुयोग

**गृहमेध्यनगाराणां चारित्रोत्पत्तिवृद्धिरक्षाङ्गम् ।**
**चरणानुयोगसमयं सम्यग्ज्ञानं विजानाति ।। ४५ ।।**

**अर्थ**– गृहकार्यामध्यें आसक्त आहे बुद्धि ज्यांची असे गृहस्थ व घरापासून विरक्त होऊन त्याचा त्याग करणारे जे अनगार म्हणजे यति, यांचें चारित्र म्हणजे उत्तम आचरण, त्यांची उत्पत्ति, वृद्धि व रक्षण यांचें कारण असा जो चरणानुयोग त्यालाही सम्यग्ज्ञान जाणतें.

**विशेषार्थ**– मुनीचें व गृहस्थांचें निर्दोष आचरण, त्याची उत्पत्ति, प्रतिदिवशीं होणारी वृद्धि, व धारण केलेल्याचें रक्षण यांना कारण चरणानुयोगरूप ज्ञानच आहे.

द्रव्यानुयोग

**जीवाजीवसुतत्त्वे पुण्यापुण्ये च बन्धमोक्षौ च ।**
**द्रव्यानुयोगदीपः श्रुतविद्यालोकमातनुते ॥ ४६ ॥**

**अर्थ**– द्रव्यानुयोगरूपी दिवा, जीव आणि अजीव या उत्तम तत्त्वांमध्यें, तसेंच पुण्य आणि पाप, बंध आणि मोक्ष या मध्यें ज्ञानाचा प्रकाश वाढवितो.

**विशेषार्थ**– द्रव्यानुयोगरूपी दिवा जीव अजीवांच्या निर्बाध स्वरूपाला, कर्मबंधाला, कर्म नाहींसें होण्याला, आत्म्यामध्यें उद्योत होईल अशा प्रकारच्या ज्ञानाला विस्तारानें प्रकट करितो.

याप्रमाणें चार अनुयोगरूप श्रुतज्ञानाचें वर्णन केलें. यांत ज्ञानाचे वीस भेद व अंगपूर्व वगैरेचें स्वरूप वर्णिल्यास ग्रंथ वाढेल म्हणून इतर ग्रंथांतून त्याचें वर्णन पाहून घ्यावें.

याप्रमाणें श्रीसमंतभद्राचार्यांनीं रचिलेल्या रत्नकरंड-श्रावकाचाराच्या मूळ सूत्राच्या पंडित सदासुखजीच्या हिंदी टीकेवरून महाराष्ट्र भाषेतील या वचनिकेंत सम्यग्ज्ञानाचें स्वरूपवर्णन नांवाचा दुसरा अधिकार समाप्त.

# चारित्राधिकार

यानंतर आचार्य सम्यक्चारित्र नांवाच्या तिसऱ्या अधिकाराचें वर्णन करितात. त्यांत चारित्राचें लक्षण सांगण्याकरितां सूत्र सांगतात

चारित्राचें लक्षण

**मोहतिमिरापहरणे दर्शनलाभादवाप्तसंज्ञानः ।**
**रागद्वेषनिवृत्त्यै चरणं प्रतिपद्यते साधुः ॥ ४७ ॥**

**अर्थ**– दर्शनमोहरूपी अंधकार नाहींसा होऊन सम्यग्दर्शनाचा लाभ झाल्यानें ज्याचें ज्ञानही सम्यक्पणाला प्राप्त झालें आहे असा साधु रागद्वेष नाहींसे होण्याकरितां चारित्राचा अंगीकार करितो.

**विशेषार्थ**— अनादिकालापासून दर्शनमोहनीय कर्माच्या उदयरूपी अंधकारानें संसारी जीवाच्या ज्ञानरूपी नेत्रावर झापड पडलेली आहे. त्या मोहरूपी अंधकारानें आपण व इतर यांतील भेद नाहींसा केल्यानें हा जीव चारी गतींत प्राप्त होणाऱ्या अवस्थेला आपलें स्वरूप समजून अनंत कालापासून त्यांत भ्रमण करीत आहे. त्यांतून एखाद्या जीवाला करणलब्धि वगैरे सामग्री प्राप्त झाली असतां दर्शनमोहाचा उपशम, क्षय अथवा क्षयोपशम होऊन सम्यग्दर्शन प्राप्त होतें. त्यावेळीं त्याच्या मिथ्यात्वाचा अभाव होतो व त्यामुळें त्याचें ज्ञानही तेव्हांपासून सम्यक्पणाला प्राप्त होतें. अशी स्थिति प्राप्त झाली म्हणजे सम्यग्ज्ञानी सज्जन पुरुष रागद्वेषाचा अभाव व्हावा म्हणून चारित्राचा अंगीकार करितो.

रागद्वेषाचा अभाव झाला असतां हिंसादिकांचाही अभाव होतो अशा नियमाचें सूत्र सांगतात.

**रागद्वेषनिवृत्तेर्हिंसादिनिवर्तना कृता भवति ।**
**अनपेक्षितार्थवृत्तिः कः पुरुषः सेवते नृपतीन् ॥ ४८ ॥**

**अर्थ**— रागद्वेषाचा अभाव झाला असतां हिंसादिक पांच पापांचा अभाव होतो. पंचपापांचा अभाव होणें यालाच चारित्र म्हणतात. ज्याला कशाचीही अपेक्षा उरली नाहीं असा कोणता पुरुष राजाची सेवा करण्याची इच्छा करील ?

**विशेषार्थ**— ज्याला द्रव्य प्राप्त करून घेण्याची मुळींच इच्छा नाहीं तो राजाची सेवा कां करील ? कधींही करणार नाहीं. अतिकष्टदायक अशी राजाची सेवा, ज्याला अनेक प्रकारचे भोगोपभोग प्राप्त करून घ्यावे व द्रव्यसंपादन करून मोठेपणा मिळवावा अशी इच्छा असेल तोच करील. ज्याला कशाचीच अपेक्षा नाहीं तो ती करणार नाहीं. त्याप्रमाणें रागद्वेषाचा ज्याचे ठिकाणीं अभाव झाला तो पुरुष हिंसादि पंचपापें करण्यास प्रवृत्त होणार नाहीं.

याचेंच पुन्हां विशेष विवेचन करितात--

**हिंसानृतचौर्येभ्यो मैथुनसेवापरिग्रहाभ्यां च ।**
**पापप्रणालिकाभ्यो विरतिः संज्ञस्य चारित्रम् ॥ ४९ ॥**

**अर्थ**— हिंसा, असत्य, चोरी, मैथुनसेवन, आणि परिग्रह हीं पाप येण्याचीं द्वारें आहेत. यापासून विरक्त होणें हें सम्यग्ज्ञानी पुरुषाचें चारित्र आहे.

**विशेषार्थ**—संपूर्ण बाह्य प्रवृत्तीपासून पराङ्मुख झाल्यानें परम वीतरागता प्राप्त होते व तिच्या प्रभावानें उत्कृष्ट साम्यभाव प्राप्त होऊन आपल्या ज्ञायकस्वरूपांत स्थिर राहता येतें. यालाच स्वरूपाचरण नामक सम्यक् चारित्र अथवा निश्चय-चारित्र म्हणतात. हें पंचपापापासून विरक्त झाल्यामुळें अंतरंग-बहिरंग प्रवृत्तीची निर्मलता ज्यामध्यें उत्पन्न होते अशा व्यवहार-चारित्राशिवाय प्राप्त होत नाहीं. म्हणून हिंसादि पंचपापांचा त्याग करणें अवश्य आहे.

चारित्राचे भेद

**सकलं विकलं चरणं तत्सकलं सर्वसंगविरतानाम् ।**
**अनगाराणां विकलं सागाराणां ससंगानाम् ॥ ५० ॥**

**अर्थ**- तें चारित्र, सकलचारित्र व विकलचारित्र अशा स्वरूपानें दोन प्रकारचें आहे. सर्व संगविरत म्हणजे अंतरंग बाह्य सर्व परिग्रहापासून विरक्त आणि अनगार म्हणजे गृह-मठ वगैरे राहण्याचें नियमित स्थान ज्यास नाहीं अशा परम दयाळू व वनामध्यें परिभ्रमण करणाऱ्या निरालंबी ज्ञानी मुनीश्वरांना असणारें सकलचारित्र होय. स्त्री-पुत्र-धन-धान्यादि परिग्रहसहित घरामध्यें राहणाऱ्या, जिनवचनांवर श्रद्धान ठेवणाऱ्या, न्यायमार्गाचें उल्लंघन न करितां आजीविका करणाऱ्या, ज्ञानी गृहस्थाला असणारें तें विकलचारित्र होय.

**विशेषार्थ**- गृहकुटुंबाचा त्याग करून शरीरावर ममता न ठेवणाऱ्या साधूला सकलचारित्र व गृहकुटुंब-धनादिकांनीं युक्त गृहस्थाला विकलचारित्र असतें.

**विकलचारित्राचे भेद**

**गृहिणां त्रेधा तिष्ठत्यणुगुणशिक्षाव्रतात्मकं चरणम् ।**
**पंचत्रिचतुर्भेदं त्रयं यथासंख्यमाख्यातम् ॥ ५१ ॥**

**अर्थ**- गृहस्थाचें चारित्र, अणुव्रत, गुणव्रत, शिक्षाव्रत असें तीन प्रकारचें आहे. याचे क्रमानें पांच, तीन आणि चार भेद आहेत.

**भावार्थ**- गृहवास सोडण्यास जो समर्थ नाहीं अशा सम्यग्दृष्टीला घरांत राहूनच पांच प्रकारचें अणुव्रत, तीन प्रकारचें गुणव्रत, व चार प्रकारचें शिक्षाव्रत धारण करून चारित्राचें पालन करितां येतें.

**पांच अणुव्रतें**

**प्राणातिपातवितथव्याहारस्तेयकाममूर्छाभ्यः ।**
**स्थूलेभ्यः पापेभ्यो व्युपरमणमणुव्रतं भवति ॥ ५२ ॥**

**अर्थ**- प्राणांचा अतिपात म्हणजे वियोग करणें अर्थात् प्राणातिपात म्हणजे हिंसा; वितथ म्हणजे असत्य असा व्याहार म्हणजे वचन बोलणें हा वितथव्याहार म्हणजे असत्यवचन; स्तेय म्हणजे चोरी; काम म्हणजे मैथुन आणि मूर्छा म्हणजे परिग्रह अशीं पांच पापें आहेत. यापासून स्थूलपणानें विरक्त होणें हें अणुव्रत होय.

**विशेषार्थ**- संकल्पपूर्वक (मनांत योजून) त्रस जीवांची हिंसा न करणें हा स्थूलहिंसात्याग होय. ज्या भाषणापासून अन्य जीवांचा घात होईल, धर्माचा नाश होईल, इतराकडून अपवाद, भांडण, दुःख, भय वगैरे उत्पन्न होतील अशा प्रकारचें वचन, क्रोध, अभिमान व लोभ यांच्या वश होऊन बोलणार नाहीं असा नियम करणें यास स्थूल असत्यत्याग म्हणावें. कोणीही दिल्यावांचून अथवा कपटानें कोणाचेही धनादिपदार्थ ग्रहण न करणें यास स्थूलचौर्यत्याग म्हणतात. आपल्या विवाहित स्त्रीशिवाय दुसऱ्या कोणत्याही स्त्रीविषयीं कामेच्छा उत्पन्न न होऊं देणें हें स्थूलकामत्याग व्रत होय. दहा प्रकारच्या परिग्रहांचें प्रमाण करून अधिक परिग्रहांचा त्याग करणें हा स्थूलपरिग्रह-त्याग होय. याप्रमाणें हीं पाप येण्याचीं पांच द्वारें आहेत यांचा त्याग करणें हें अणुव्रत होय.

**अहिंसा अणुव्रताचें स्वरूप**

**संकल्पात्कृतकारितमननाद्योगत्रयस्य चरसत्वान् ।**
**न हिनस्ति यत्तदाहुः स्थूलवधाद्विरमणं निपुणाः ॥ ५३ ॥**

**अर्थ**- जे गृहस्थ मनवचनकाय यांच्या कृत-कारितअनुमोदनारूपी संकल्पानें चरप्राणी म्हणजे द्वींद्रियादि त्रस जीवांचा घात करीत नाहींत त्यांना निपुण अशा गणधर देवांनीं स्थूलहिंसा-विरक्त म्हटलें आहे.

**विशेषार्थ**– ज्या जीवांना सम्यग्दर्शन प्राप्त झालें आहे, ज्यांचे परिणाम दयेनें कोमल झाले आहेत, ज्यांना हिंसा करण्यापासून भय उत्पन्न झालें आहे व जे त्याचा त्याग करण्याच्या सन्मुख झाले आहेत अशा जीवांना एकेंद्रियादि पृथ्वीकायादिक जीवांच्या हिंसेचा त्याग होऊं शकत नाहीं. घरादारांचा त्याग करणाऱ्या योगीश्वरांना त्रस व स्थावर अशा दोन्ही हिंसांचा त्याग होऊं शकतो. गृहस्थाला गृहकुटुंबावरील ममता प्रत्याख्यानावरण कर्माचा उदय सत्तेत असल्यानें कमी होत नाहीं. म्हणून अशा जीवांकरितां त्रस जीवांच्या संकल्पी हिंसेचा त्याग करण्यानें त्यांना अहिंसा अणुव्रत घडतें असें भगवंतांनीं सांगितलें आहे.

**संकल्पी हिंसा**

संकल्पी हिंसेचा त्याग म्हणजे काय ? दयाळु गृहस्थ हेतुपुरस्सर त्रस जीवांचा घात करीत नाहीं, घात करणाऱ्याची मनवचनकायेनें प्रशंसा करीत नाहीं. कोणी दुष्ट प्राणी ईर्ष्येनें किंवा द्वेषानें त्याचा घात करूं इच्छित असला, अथवा त्याची आजीविका बिघडवूं पहात असला तरी त्याचें कांहीं तरी नुकसान करण्याची इच्छा तो करीत नाहीं. कोणी त्याला पुष्कळ द्रव्याची लालुच दाखवून अमुक जीवाचा घात कर म्हणून सांगितलें तरी तो अत्यंत लहान अशा किडा-मुंगीचा देखील हेतुपूर्वक घात करूं इच्छित नाहीं. एखादा जीव मारण्यानें आपली आपत्ति अथवा रोग नाहींसा होत असला तरी देखील तो आपला जीव बचेल या आशेनें त्रसजीवांचा घात करीत नाहीं. हिंसा होण्याची त्याला अत्यंत भीति असते. गृहस्थाला आरंभादि क्रियेमध्यें त्रस जीवांचा घात होत असतो हें खरें असलें तरी तो कोणत्याही जीवाचा आहार, औषध, देवतार्चन यासाठीं म्हणून घात करीत नाहीं. अशा हिंसेचा त्याग तो करूं शकतो. त्यास आरंभी हिंसेचा त्याग होऊं शकत नाहीं. म्हणून दयामयी धर्माला विरोध न येईल अशा रीतीनें त्यानें आरंभादि कार्ये करावी. तीं करीत असतांना सावधानता बाळगण्यांत त्यानें कसूर करूं नये.

**गृहस्थावस्थेंत हिंसा घडतें**

गृहस्थावस्थेंत चूल पेटविणें, दळणें, कुटणें, सारविणें, पाणी सांडणें व द्रव्योपार्जन करणें, हीं सहा कर्मे तर दररोज करावीं लागतात. याशिवाय नित्य व अवश्यक अशाही कांहीं क्रिया कराव्या लागतात. उदाहरणार्थ– आपल्या मुलामुलींचीं लग्नें करणें, घरें बांधविणें, तीं झाडणें, सारविणें, स्वच्छ ठेवणें वगैरे. रात्रीं कोठें जाणें येणें, धातुपाषाण लांकूड वगैरे कापविणें, आंथरूण पांघरूण ठेवणें उचलणें, भांडीं ठेवणें आपटणें, जातीला जेवण देणें, दिवा जाळणें वगैरे सर्व कार्यांमध्यें हिंसा घडून येतेच. गाडीवर किंवा रथावर बसून जाणें, हत्ती घोड्यावर बसणें, गाय, म्हैस वगैरे बाळगणें, यांमध्यें त्रस जीवांचा घात होतोच. देऊळ बांधविणें, दान देणें, पूजन करणें यांतही आरंभ आहेच. अशा अवस्थेंत गृहस्थाला त्रसहिंसेचा सर्वस्वीं त्याग करतां येणें शक्य आहे काय ?

गृहस्थाचे परिणाम वरील क्रिया करण्यांत मुख्यत्वेंकरून जीवांचा घात करण्याचे नसतात. तो

जीवांचा घात व्हावा म्हणून तीं कार्यें करीत नसतो. हीं कार्यें करीत असतांना जीवांचा घात झाला तर बरें असेंही तो मानीत नाहीं. त्याला जीवांचा घात होण्याची मनांतून

**ती हेतुपूर्वक हिंसा नव्हे.**

भीति वाटत असते. ती मनांत बाळगूनच तो आरंभादि क्रिया करण्यास प्रवृत्त होतो. जीव मारण्याकरितांच तो आरंभ करीत नाहीं. जीव मारण्याचा त्याचा उद्देशही नाहीं. अशा अवस्थेंत त्याला पापबंध होत नाहीं. कारण जीव आपल्या आयुष्यानुसार उत्पन्न होतात व मरतात. त्यांचें जगणें मरणें आपल्या हातीं नाहीं. आपण जितका आरंभ करतो तितका सर्व दयेनें प्रेरित होऊन यत्नाचारपूर्वक करीत असतो. अशी क्रिया करणाराला भगवंतांनीं परमागमांत हिंसा होत नाहीं व त्यास बंधही घडत नाहीं असें सांगितलें

**हिंसा परिणामावर अवलंबून आहे**

आहे. हा संपूर्ण लोक जीवांनीं भरलेला आहे. त्यांच्या जगण्या--मरण्याशीं, आपला संकल्प असल्याशिवाय हिंसा अहिंसेचा संबंध येत नाहीं. हिंसा अहिंसा हीं आपल्या परिणामावर अवलंबून आहे. मुनि चार हात जमीन पाहून सावधानतेनें गमन करीत असतांना, पुढें पाय उचलून ठेवणार इतक्यांत जर एखादा जीव बाहेरून उडून त्यांच्या पायाखालीं येऊन पडून मरण पावेल तर त्याबद्दल ते जबाबदार नाहींत. कारण मुनि ईर्यासमिति पाळून गमन करीत असल्यानें त्यांना हिंसेचा बंध होत नाहीं. शुद्ध असलेला आहार निरखून घेत असतांना जर अचानक त्यांत जीव येऊन पडला तर त्यांत त्यांचा काय दोष ? ते जर प्रमादामुळें आहार शोधून घेण्यांत आळस करतील तर त्यांना दोष लागेल. याप्रमाणें श्रावक जर प्रमाद न करतां मोठ्या प्रयत्नानें वागत असेल तर त्याला हिंसेचा दोष लागणार नाहीं. दिवसा चूल पाहून, स्वच्छ करून, लांकडामध्यें कांहीं जीवजंतु आहेत कीं काय हें पाहून विस्तव पेटविणें, तसेंच जातें पाहून झाडून स्वच्छ करून, धान्यां-

**नित्यकर्म सावधानतेनें करावें**

तील किडामुंगी सर्व नाहाशी करून, मग तें दळून पीठ करणें वगैरे क्रिया जर तो यथायोग्य करीत असेल, तर त्यांत कदाचित् हिंसा घडली तरी त्याचा दोष त्याजकडे येत नाहीं ! श्रावक विटलेलें अन्न भक्षण करीत नाहीं. तसेंच जागा स्वच्छ करावयाची असल्यास दिवसा कोमल अशा कुंच्यानें अथवा इतर प्राण्यांना त्रास होणार नाहीं अशा रीतीनें हळु हळु केरसुणीनें झाडून काढतो. पाणी दुहेरी वस्त्रानें यत्नपूर्वक गाळून घेतो. द्रव्योपार्जन देखील आपल्या कुलाचाराप्रमाणें व आपल्या सामर्थ्या-

**अन्यायानें धनोपार्जन करूं नये**

प्रमाणें न्यायमार्गानें करीत असतो. द्रव्य-संपादन करीत असतांना अन्याय करण्यानें जगांत आपली अपकीर्ति होईल अथवा तें संपादन करीत असतां आपला धर्म सदोष बनेल, अशा रीतीनें तो द्रव्य संपादन करीत नाहीं. तो असिमषि-कृषि-विद्या-वाणिज्य आणि शिल्प हीं सहा कर्में देखील वरील धोरणानेंच करीत असतो. श्रावकाचें व्रत हें चारी वर्णाला धारण करतां येतें. आपली उपजीविका जर निर्मल व ज्यांत मुळींच हिंसा होत नाहीं अशा रीतीनें होत असेल तर निंद्य कर्म करून, लोभाच्या वश होऊन पापरूपीं अनेक

कार्ये करून आजीविका करूं नये. दुसऱ्या कशानेंही आपली उपजीविका होण्यासारखी नसेल तरी पापाचें भय बाळगून न्यायानें उपजीविका करण्याचा निश्चय ढळू देऊं नये.

आपण क्षत्रिय कुळांत उत्पन्न झालों तर क्षत्रियाचें जें न्यायकर्म सांगितलें आहे त्याचें उल्लंघन करून दीन-दुर्बलाचा घात करूं नये. क्षत्रियांचें कर्म दीन-अनाथ असतील त्यांचें रक्षण करण्याचें आहे. शस्त्ररहित पुरुषाला क्षत्रियानें मारूं नये. पडलेल्यावर घाव करूं नये. पाठ दाखवून पळून जात असेल अथवा दीन झाला असेल त्यावर घाव करूं नये. धन लुटण्याकरितां आपल्या शक्तिनें हजारों जीवांचा घात करूं नये. अभिमानानें वैरानें कोणाचा घात करूं नये. आपला घात करण्यास येईल अथवा दुर्बल लोकांना कोणी मारू लागेल तर त्याचा शस्त्रानें विरोध करावा. जो फक्त शस्त्र धारण करून आपली उपजीविका करीत असेल त्यानें स्वामिधर्मामुळें शस्त्र धारण करावें अथवा जो अनाथांचा स्वामी असेल त्यानें शस्त्र धारण करावें. ज्यांना शस्त्र धारण करून सेवा करावयाची नाहीं अथवा ज्याकडे प्रजेचें पालन करण्याचेंही काम नाहीं त्यानें स्वरक्षणाशिवाय इतर कार्यासाठीं शस्त्र धारण करूं नये.

क्षत्रियानें दुर्बलाचें रक्षण करावें.

लिहिण्याचा धंदा करून आपली उपजीविका करीत असेल त्यानें कपटवृत्ति सोडून आपल्या धन्याचें इमानानें काम करावें. माळी, जाट इत्यादि कुलामध्यें उत्पन्न झाल्यानें दुसऱ्या कोणत्या धंद्यावर उपजीविका करतां येत नसेल तर त्यांनीं शेतीवाडी करून आपली उपजीविका करावी. पण तसें करीत असतांना दयाधर्माचा त्याग करूं नये. जो उपजीविकेसाठीं पूर्वींपासून शेतकी करीत आला असेल त्यानें त्यांतही मर्यादा करून त्याहून अधिक शेती करणार नाहीं असा निश्चय करावा व करीत असलेल्या शेतीविषयीं विशेष तृष्णा वाढूं न देतां त्यांतही कमी करण्याची इच्छा ठेवावी. हें कार्य आपणांस नाइलाजानें करावें लागत आहे, यांत हिंसा फार होत असून पापबंध फार घडतो, दुसरी उपजीविका करितां आली असती तर मी यावर कधींही पोट भरलें नसतें, असा विचार मनांत आणून आपली निंदा करीत शेतीवर उदरनिर्वाह करावा. शेतांत नेहमीं पुष्कळ अगालित पाणी वापरावें लागत असलें, तरी स्वतः अगालित पाण्याचा थेंब देखील आपल्या उपयोगाकरितां त्यानें वापरूं नये. कोणी म्हणेल कीं "तुम्हीं आपले शेतांत नेहमीं पुष्कळ झाडें वगैरे तोडित असतां त्याअर्थीं अमुक जागेंतील झाडें तोडून दिल्यास त्याची किंमत तुह्मांस देऊं" तर लोभाच्या आशेनें तसें करण्यास त्यानें प्रवृत्त होऊं नये. शेती करण्यांत जरी पुष्कळ जीव मरत असले तरी त्याचा अभिप्राय जीवांना मारण्याचा नसतो. आपली आजीविका व्हावी एवढाच त्याचा अभिप्राय असतो. असें असलें तरी कोणी शेंकडों रुपये देऊं केले म्हणून लोभानें तसलें पापकृत्य करण्यास प्रवृत्त होऊं नये. कारण यःकश्चित् मुंगीलाही दुःख पोंचू नये इतकी ज्याच्या मनांत दया उत्पन्न झालेली असते तो जीव शेती मुळीं करीतच नाहीं.

शेतकऱ्यानें हिंसा कमी घडेल याकडे लक्ष्य ठेवावें.

विद्येवर आजीविका करणाऱ्या ब्राह्मणांनीं मिथ्यात्व वाढविणाऱ्या व हिंसेची पुष्टि करून राग-द्वेष वाढविणाऱ्या विद्या न शिकवितां निर्दोष विद्या शिकवाव्या हाच त्यांचा खरा धर्म आहे.

श्रावकानें ज्यांत पुष्कळ हिंसा होत असेल व पुष्कळ खोटेंपणा करावा लागत असेल असा व्यापार न करितां, न्यायानें व प्रामाणिकपणानें व्यवहार करावा. त्यांत संतोषवृत्ति ठेवावी. तीव्र लोभ कमी करून, दयाधर्माचें उल्लंघन न करितां न्याय्य वागणूकीची भावना मनांत कायम ठेऊन व्यवहार करावा.

शिल्पकर्म करणाऱ्या शूद्राला देखील श्रावकांचीं व्रतें ग्रहण करितां येतात. त्यानें अति निंद्य कर्में असतील त्यांचा त्याग करावा. त्यांतून जीं टाळतां येण्यासारखीं नसतील त्यापैकीं ज्यांत पुष्कळ हिंसा होत असेल तीं तरी निदान टाळावीं. मनांत सदैव दया जागृत ठेवावी. हेतुपुरःसर जीवांचा घात होतो आहे असें समजलें असतां तो करूं नये. देऊळ बांधवितांना, पूजन करितांना, दान देतांना, नेहमीं सावधानी ठेवून फक्त धर्मसाधनासाठींच हीं कर्में करीत आहोंत असें मनांत वागवीत जावें.

**हिंसोत्पत्तीचें कारण**

**यत्खलु कषाययोगात्प्राणानां द्रव्यभावरूपाणाम् ।**
**व्यपरोपणस्य करणं सुनिश्चिता भवति सा हिंसा ।। ४३ ।।**

**अर्थ**– कषायाच्या संयोगानें ( रागद्वेषामुळें ) इंद्रिय, शरीरादि द्रव्यप्राण व ज्ञानदर्शनादि भावप्राणांचा वियोग करणें हीच निश्चयें करून हिंसा जाणावी.

**भावार्थ**– रागद्वेषादि कषायांच्या वश होऊन द्रव्यप्राण व भावप्राणांचा वियोग करणें हीच खरी हिंसा. ज्यांना कषाय नाहींत त्याजकडून प्राण्यांचें मरण झालें तरी त्यांना हिंसेचें पातक घडत नाहीं. अमृतचंद्राचार्य म्हणतातः—

**अप्रादुर्भावः खलु रागादीनां भवत्यहिंसेति ।**
**तेषामेवोत्पत्तिर्हिंसेति जिनागमस्य संक्षेपः ।। ४४ ।।**

**अर्थ**– रागद्वेषादि विकार आत्म्याचे ठायीं उत्पन्न न होणें ही अहिंसा व विकार उत्पन्न होणें ही हिंसा, असा जैनशास्त्राचा सारांश आहे. बाह्य प्राण्यांची हिंसा घडो वा न घडो, आपल्या मनांत रागद्वेषादि विकार उत्पन्न झाल्याबरोबर भावप्राणांचा ( शुद्ध विचाराचा ) घात होतो व तो झाल्यानें आत्महिंसा घडते. आत्महिंसा ज्यास घडली त्यास परहिंसाही निश्चयानें होते.

**युक्ताचरणस्य सतो रागाद्यावेशमन्तरेणापि ।**
**न हि भवति जातु हिंसा प्राणव्यपरोपणादेव ।। ४५ ।।**

**अर्थ**– योग्य आचरण करणाऱ्या सत्पुरुषाला रागद्वेषादि कषायाशिवाय प्राणांचा घात झाल्यानें हिंसा घडत नाहीं.

**भावार्थ**— यत्नाचारपूर्वक दयाभाव मनांत ठेऊन वागणाऱ्या पुरुषाकडून कदाचित् जीवांचा घात झाला तरी त्याला हिंसेचा बंध होत नाहीं.

**व्युत्थानावस्थायां रागादीनां वशप्रवृत्तायाम् ।**
**म्रियतां जीवो मा वा धावत्यग्रे ध्रुवं हिंसा ॥ ४६ ॥**

**अर्थ**— रागद्वेषांच्या स्वाधीन होऊन बेपर्वाईनें जाणें, येणें, उठणें, बसणें, ठेवणें वगैरे क्रिया केल्या जातात. त्या करीत असतांना जीवांचा घात होवो किंवा न होवो, हिंसा निश्चयेंकरून पुढें धावत असते असें समजावें.

**भावार्थ**— सावधानपूर्वक क्रिया न करितां जो क्रियेविषयीं बेफिकिर असतो त्याला, जीवांचें मरण त्यांच्या आयुष्याप्रमाणें होवो अथवा न होवो, स्वतःचे परिणाम निर्दय होण्यानें हिंसेचा बंध होतोच.

**यस्मात्सकषायः सन्हन्त्यात्मा प्रथममात्मनात्मानम् ।**
**पश्चाज्जायेत न वा हिंसा प्राण्यन्तराणां तु ॥ ४७ ॥**

**अर्थ**— आत्म्यामध्यें कषायांची उत्पत्ति झाल्याबरोबर प्रथमतः तो स्वतःच्या सत् परिणामांचा घात करून घेतो. नंतर इतर प्राण्याची त्याजकडून हिंसा होवो अथवा न होवो.

**भावार्थ**— ज्यावेळीं आत्मा कषायसंयुक्त होतो त्याचवेळीं त्याच्या ज्ञानानंदवीतरागस्वरूपाचा घात होऊन चुकतो. त्यानंतर बाह्य जीवांची हिंसा झाली काय किंवा न झाली काय सारखेंच.

**हिंसायामविरमणं हिंसापरिणमनमपि भवति हिंसा ।**
**तस्मात्प्रमत्तयोगे प्राणव्यपरोपणं नित्यम् ॥ ४८ ॥**

**अर्थ**— ज्याअर्थीं हिंसेविषयीं विरक्त न होणें व हिंसेमध्यें प्रवृत्त होणें या दोहोंसही हिंसाच म्हटलें आहे त्या अर्थीं प्रमत्तयोगापासूनच नेहमीं हिंसा होते असेंच ठरतें.

**भावार्थ**— आपला अथवा दुसऱ्यांचा घात होईल याबद्दल सावधानी ( खबरदारी ) न ठेवतां मनवचनकायेची प्रवृत्ति करणें यास प्रमत्तयोग म्हणतात. जेथें प्रमत्तयोग आहे तेथें नेहमी हिंसा ठरलेली. जो कोणी हिंसा करीत नाहीं परंतु हिंसेपासून विरक्त होऊन तिचा त्याग करीत नाहीं, तो निजलेल्या मांजराप्रमाणें सदाकाल हिंसक आहे. जो नेहमीं हिंसा करितो तो तर हिंसक आहेच. या दोघांचे म्हणजे हिंसा करणारांचे व हिंसा करीत नसून त्याग न करणारांचे परिणाम सारखेच आहेत. त्यांना हिंसेचें बाह्य निमित्त मिळो वा न मिळो.

**सूक्ष्मापि न खलु हिंसा परवस्तुनिबन्धना भवति पुंसः ।**
**हिंसायतननिवृत्तिः परिणामविशुद्धये तदपि कार्या ॥ ४९ ॥**

**अर्थ**— सूक्ष्म हिंसेलाही अन्य वस्तु कारण नाहीं. कारण मनुष्यमात्राला घडणारी हिंसा त्यांचे परिणाम हिंसा करण्याचे होण्यानेंच घडते. बाह्य वस्तूच्या निमित्तानें जर सूक्ष्महिंसाही होत

असेल तर या बाह्य वस्तूंचा त्याग–व्रत–संयम वगैरे कां करावें ? अशी कोणी शंका करील त्याचें समाधान असें कीं, ज्यावेळीं मनांत विचार येईल त्याचवेळीं त्याला हिंसा घडेल हें खरें आहे, तरी तो जीव जर हिंसा होण्याच्या जागीं जाऊन राहील तर त्याचे परिणाम हिंसेचे झाल्यावांचून कसे राहतील ! परिणामाची शुद्धि रहावी म्हणून ज्या ठिकाणीं हिंसा घडत असेल अशा सर्व स्थानांचा अर्थात् भोजन, पान, ग्रहण, आसन, वचन, चिंतनादिकांचा त्याग करणें योग्य आहे.

**निश्चयमबुध्यमानो यो निश्चयतस्तमेव संश्रयते ।**
**नाशयति करणचरणं स बहिः करणालसो बालः ॥ ५० ॥**

**अर्थ**– निश्चयनयाचें स्वरूप न जाणतां म्हणजे शुद्ध आत्मा विषयकषायापासून अलिप्त असतो हें समजून न घेतां जो " आपले परिणाम कषायरहित आहेत, आपल्या सर्व प्रवृत्तींत हिंसा मुळींच होत नाहीं " अशा विचारानें निरर्गल होऊन यथेच्छ वागतो, त्याचे मनांत बाह्य आचरणाविषयीं निरादर उत्पन्न होतो व त्यामुळें करणचरणरूपी चारित्राचा तो नाश करणारा होतो.

**भावार्थ**– ज्याचे परिणाम रागद्वेषरहित झाले असतील तो अयोग्य अशा भोजनपानधनपरिग्रहादि आरंभामध्यें प्रवृत्त होत नाहीं. जो हिंसेपासून विरक्त झाला असेल तो हिंसा उत्पन्न करण्याच्या कारणांचा त्याग करितो. पुरुषार्थ-सिद्ध्युपायांत असें सांगितलें आहे कीं, कोणी हिंसा मुळींच न करितां हिंसेचा भागीदार होतो. जसें शस्त्रें तयार करणारे लोहार, शिकलकार वगैरे लोक प्रत्यक्ष हिंसा मुळींच करीत नाहींत पण तंदुलमच्छाप्रमाणें त्यांना हिंसेचें फल प्राप्त होतेंच. कोणी प्रत्यक्ष हिंसा करीत असूनही त्याचें फल त्याला मिळत नाहीं. जसें मंदिर बांधविणाऱ्या दयाळू श्रावकाला व यत्नाचारपूर्वक क्रिया करणाऱ्या श्रावकाला प्रत्यक्ष त्रस जीवांची हिंसा होत असूनही हिंसेचें फल प्राप्त होत नाहीं. कोणा पुरुषाकडून हिंसा अल्प होते पण ती होत असतांना त्याचे परिणाम फार तीव्र असले तर उदयकालीं त्या अल्प हिंसेचें फलही तीव्र भोगावें लागतें. पुष्कळ माणसांनीं मिळून एखादी हिंसा केली असें समजा. तरी त्या हिंसेचें फल सर्वांना समान मिळत नसतें. ज्याचे परिणाम ती हिंसा करीत असतां तीव्र झाले असतील त्यास तीव्र फल, ज्याचे मंद असतील त्यास मंद फल व ज्याचे मध्यम असतील त्यास मध्यम फल प्राप्त होतें. कित्येकांना हिंसा अझून पुढें करावयाची आहे त्या अगोदरच हिंसेचे परिणाम झाल्यानें त्याचें फल उदयास येऊन रस देतें. कित्येकांना हिंसा करीत असतांनाच त्याचें फल प्राप्त होतें. जसें एका पुरुषानें दुसऱ्याचा प्राण घेतला त्याच वेळीं प्राण जाणाऱ्याच्या प्रहारानें याचाही प्राण जातो. कित्येकांना पूर्वी केलेल्या हिंसेचें फल मागाहून प्राप्त होतें. कोणी हिंसेचा आरंभ केला पण कांहीं कारणांनीं त्याजकडून हिंसा झाली नाहीं तरी हिंसेचें फल त्यास प्राप्त होतेंच. जसें एखाद्यानें एकाचा प्राण घेण्याचा उपाय योजिला परंतु कांहीं कारणानें तो उपाय फसला. ज्याचा घात व्हावयाचा होता त्याला मागाहून त्याचा हेतु

प्रत्यक्ष हिंसा न करिताही हिंसेचा बंध होतो.

समजल्यानंतर त्यानें त्याचा प्राण घेतला. हिंसा करणारा एक व त्याचें फल भोगणारे अनेक अशी अवस्था होत असते. जसें चोराला फाशी देणारा चांडाल एक व ती फाशी पाहणारे तमासगीर अनेक. यांत एका चांडालाला व अनेक तमासगीरांना पापबंध होतो. युद्धांत हिंसा करणारे अनेक योद्धे असतात पण त्याचें फल एका राजाला भोगावें लागतें. कोणाला हिंसा केली असतांना हिंसेचें फल भोगावें लागतें तर दुसऱ्याला त्याच हिंसेपासून अहिंसेचें फल मिळतें. जसें कोणी पुरुष एखाद्या जीवाचें रक्षण करण्याचा प्रयत्न करीत असतां तो जीव मरण पावला तर त्या पुरुषाला त्या जीवाचें रक्षण करण्याचे परिणाम असल्यानें अहिंसेचें फल मिळेल. दुसऱ्या कोणा पुरुषाचे परिणाम एखाद्या जीवाचा घात करावा असे होतात अथवा त्याला संकटांत घालावें अशी त्यास इच्छा होती पण त्याच्या पुण्योदयानें त्याला कांहीं संकट आलें नाहीं व मरणही प्राप्त झालें नाहीं. उलट पुष्कळ लाभ झाला. यांत त्या घात करण्याची इच्छा करणाऱ्याला तर पापाचा बंध पडतोच. दुसऱ्याचे परिणाम कोणालाही दुःख देण्याचे नव्हते, सुख देण्याचे व त्याचें रक्षण करण्याचे होते. यामुळें दुःख झालें अथवा तो मरण पावला तरी सुख देण्याचे परिणाम असल्यानें त्याला पुण्यबंधच झाला.

याप्रमाणें अनेक दृष्टीनें विचार करणारा असा हा जिनमार्ग आहे. हा एकांती मिथ्यादृष्टीला समजणें कठिण आहे. त्यासाठीं अनेकान्त नयसमूहाला जाणणाऱ्या गुरूलाच शरण गेलें पाहिजे. हें भगवंताचें नयचक्र फार तीक्ष्ण असून दुराग्रही मिथ्यादृष्टींच्या युक्तिवादाचें शतशः तुकडे करून टाकणारें आहे. म्हणून ज्ञानीपुरुषहो! वीतराग भगवंताच्या आज्ञेनें प्रथमतः हिंसा होण्या योग्य जीं जीवांचीं स्थानें इंद्रियकायादिक आहेत त्यांचें ज्ञान करून घ्या. हिंसा करविणारे परिणाम कशानें होतात हें समजून घ्या, हिंसेचें स्वरूप जाणा, हिंसेचें काय फल प्राप्त होणार याचा विचार करा. याप्रमाणें हिंस्य, हिंसक, हिंसा, हिंसाफल या चतुष्टयाला मोठ्या परिश्रमानें आधीं चांगल्या-रीतीनें समजून घ्या. मग देशकालानुसार आपले परिणामांचा विचार करून आपला निर्वाह होईल किंवा नाहीं हें पहा व आपली शक्ति न छपवितां गृहस्थाश्रमामध्यें आपल्या योग्यतेनुसार हिंसेचा त्याग करा. सर्व क्रिया करीत असतांना दया मनांत बाळगून मोठ्या सावधानतेनें वागा. पंचस्थावर जीवांची हिंसा शक्य तितकी कमी करून दयाळु बना. याप्रमाणें अहिंसा अणुव्रताचें लक्षण सांगितलें.

अहिंसाव्रताचे पांच अतिचार.

**छेदनबन्धनपीडनमतिभारारोपणं व्यतीचाराः ।**
**आहारवारणापि च स्थूलवधाद्व्युपरतेः पंच ॥ ५४ ॥**

**अर्थ**— छेदन म्हणजे मनुष्याचे अथवा तिर्यंचाचे कान, नाक वगैरे अवयव तोडणें हा पहिला छेदनातिचार· मनुष्यांना दोरखंड वगैरे साधनांनीं जखडून टाकणें, कैदेंत ठेवणें व तिर्यंचांना दृढ बंधनांनीं बांधणें, पक्ष्यांना पिंजऱ्यामध्यें कोंडून ठेवणें हा दुसरा बंधनातिचार. मनुष्य तिर्यंचांना लाथ, बुक्की, चापट, काठी, चाबूक इत्यादिकांच्या योगानें मारणें हा तिसरा पीडनातिचार. माणसांवर पशूंवर अथवा बैल जोडलेल्या गाडीवर त्यांच्या शक्तीहून अधिक ओझें लादणें हा चौथा अतिभारा-

रोपणातिचार. मनुष्य तिर्यंचाना खाणें-पिण्याचा प्रतिबंध करणें हा पांचवा आहारवारण अथवा अन्नपाननिरोधनातिचार म्हणावा. याप्रमाणें हे स्थूलहिंसा त्यागाचे पांच अतिचार ( दोष ) आहेत ते गृहस्थाला सोडणें योग्य आहे.

सत्याणुव्रताचें लक्षण

**स्थूलमलीकं न वदति न परान् वादयति सत्यमपि विपदे ।**
**यत्तद्वदन्ति सन्तः स्थूलवधाद्विरमणं निपुणाः ॥ ५५ ॥**

**अर्थ**– जो स्थूल असत्य बोलत नाहीं, दुसऱ्याकडून बोलवीत नाहीं, आणि ज्या बोलण्यापासून आपणाला व इतरांनाही संकट येत असेल असें सत्य देखील जो बोलत नाहीं तो सत्पुरुषांनीं स्थूल असत्याचा त्यागी आहे असें म्हटलें आहे.

**विशेषार्थ**– स्थूल असत्याचा त्याग असणाऱ्या म्हणजे सत्याणुव्रत धारण करणाऱ्या पुरुषानें क्रोध, मान, माया, लोभाच्या वश होऊन एखाद्या जीवाचा घात होईल, एखाद्यावर संकट येईल, अथवा कलंक चढेल असें बोलणें निंद्य आहे. याचप्रमाणें ज्या भाषणापासून ऐकणारांस मिथ्याश्रद्धान उत्पन्न होईल, तो धर्मपराङ्मुख होण्यास उद्युक्त होईल, व्रतसंयमाचा त्याग करून शिथिल बनेल, त्याचें श्रद्धान बिघडून जाईल, अशा प्रकारचें भाषण कधींही करूं नये. ज्या बोलण्यापासून कलह व विसंवाद उत्पन्न होईल, विषयानुराग वाढेल, मोठा आरंभ करण्याकडे प्रवृत्ति होईल, दुसऱ्याला आर्तध्यान उत्पन्न होईल, इतरांना कामवेदना उत्पन्न होतील, दुसऱ्याच्या लाभांत विघ्न येईल, दुसऱ्याची उपजीविका नाहींशी होईल, आपली व दुसऱ्याचीही अपकीर्ति होईल, अशा प्रकारचें वचन मुखावाटें उच्चारूं नये. ज्यापासून आपला व दुसऱ्याचा बिघाड होईल, कोणावर आपत्ति ओढवेल, अनर्थ उत्पन्न होईल, दुःख प्राप्त होईल, मर्म छेदिलें जाईल, राजदंड सोसावा लागेल व द्रव्यहानि होण्याचा संभव असेल अशा प्रकारचें सत्यवचन असेल तरी तें असत्य समजून कदापि बोलूं नये. याचप्रमाणें आपल्या तोंडावाटें शिवीगाळ, बीभत्स शब्द, हलक्या कुलांतील लोकांनीं बोलावयाचे शब्द, मर्मच्छेदक वचन, दुसऱ्याचा अपमान होईल असे शब्द, तिरस्काराचे शब्द, अहंकाराचे शब्द मुखावाटें कधींही काढूं नयेत. बोलावयाचें झालेंच तर जिनसूत्राला अनुसरून आपलें व इतरांचें हित ज्यायोगें होईल, ज्यांत फार पाल्हाळ नसेल असें प्रामाणिक व संतोष उत्पन्न करणारें, धर्माचा उद्योत करणारें वचन बोलावें. याप्रमाणें न्यायानें आपली उपजीविका करणाऱ्या व अनिंद्य वचन बोलणाऱ्या गृहस्थाला असत्यत्याग नांवाचें दुसरें अणुव्रत घडतें.

सत्याणुव्रताचे पांच अतिचार

**परिवादरहोऽभ्याख्या पैशुन्यं कूटलेखकरणं च ।**
**न्यासापहारतापि च व्यतिक्रमाः पंच सत्यस्य ॥ ५६ ॥**

**अर्थ**– परिवाद, रहोभ्याख्या, पैशुन्य, कूटलेखकरण आणि न्यासापहार असे पांच सत्याणुव्रताचे अतिचार आहेत.

**विशेषार्थ**– परिवाद म्हणजे मिथ्या उपदेश. स्वर्गमोक्षाचें कारण अशा खोट्या चारित्राचा उपदेश करणें हा परिवाद नामक अतिचार. रहोऽभ्याख्या म्हणजे गुप्त गोष्ट प्रसिद्ध करणें. कोणी आपली गुप्त गोष्ट आपणांस सांगितली असतां ती दुसऱ्यास सांगणें, अथवा तिची प्रसिद्धि करणें, व स्त्री–पुरुषाची एकांतांतील क्रिया पाहून व ऐकून ती प्रगट करणें यास रहोऽभ्याख्यातिचार म्हणतात. पैशुन्य म्हणजे चहाडी करणें. दुसऱ्याचें छिद्र समजून घेऊन त्याचें नुकसान करण्याच्या उद्देशानें दुसऱ्यास सांगणें हा पैशून्यातिचार. कूटलेखकरण म्हणजे खोटे दस्तैवज व खोटे जमाखर्च करणें अथवा करविणें व एखाद्या चांगल्या गृहस्थावर आळ घेऊन त्याचा लोकांत लिहून अथवा बोलून खोटा प्रचार करणें. न्यासापहार म्हणजे ठेव गडप करणें. कोणी आपल्या जवळ विश्वासानें द्रव्य, डागडागिने अथवा मौल्यवान वस्त्रें ठेवून परत मागतांना विसरून कमी मागितल्या असतां तेवढ्याच वस्तु देऊन बाकीच्या न देणें हा न्यासापहारातिचार होय. याप्रमाणें स्थूल असत्यत्याग अणुव्रताचे हे पांच अतिचार [दोष] आहेत ते टाळण्यानें व्रत शुद्ध होतें.

यासंबंधीं व्रती पुरुषानें आपल्या मनांत सदैव पुढील विचार आणित असावें. " या जीवानें अनादि अनंतकालापासून निगोदामध्यें वास्तव्य केलें आहे. कर्मधर्मसंयोगानें तेथून सुटका झाल्यानंतर पंचस्थावर जीवनांत असंख्यात काल परिभ्रमण करून पुनरपि निगोदांत अनंतानंत काल परिभ्रमण केलें आहे. अनंत वेळा एकेंद्रिय जीवांत जन्म घेतला. त्या ठिकाणीं याला जिह्वेन्द्रिय प्राप्त झालें नाहीं. पुढें द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिन्द्रिय, असैनी, सैनी पंचेन्द्रियांत उत्पन्न होऊन जिह्वेन्द्रिय प्राप्त झालें तरी

**दु:प्राप्य मनुष्य जन्माची महती**

अक्षरात्मक शब्द उच्चारण्याचें व ऐकण्याचें यास सामर्थ्य नव्हतें, अनंतानंत काल गेल्यानंतर कदाचित् मनुष्य-जन्म प्राप्त झाला व बोलण्याची शक्ति प्राप्त झाली तरी नीच कुलांत जन्मल्यामुळें अयोग्य हिंसावचन, असत्य वचन, दुसऱ्याला व आपणाला संताप उत्पन्न होईल असें वचन बोलून यानें, महान् पाप बांधून घेतलें त्यामुळें दुर्गतीला जावें लागलें. याप्रमाणें आपल्याच वचनानें आपला घात करून घेतला. असो ! झालें तें गेलें !! आतां कांहीं पूर्व पुण्यसंचितामुळें मनुष्य–जन्म प्राप्त झाला आहे त्या अर्थीं चांगलें व गोड बोलण्याचा प्रयत्न करावा. खाणेंपिणें, कामसेवन करणें, डोळ्यांनीं पाहणें, कानांनीं ऐकणें या गोष्टी कुत्रीं, मांजरी वगैरे प्राणीही करीत असतात. कारण डोळे, नाक, तोंड, कान वगैरे इंद्रियें सर्व पशूंनाही असतातच. या गोष्टी आपण केल्या म्हणजे कांहीं विशेष केलें असें नाहीं. मनुष्यजन्मांत जर कांहीं श्रेष्ठ असेल तर फक्त वचन हेंच एक श्रेष्ठ आहे. ज्यानें आपलें वचन सांभाळिलें नाहीं त्यानें आपल्या सर्व जन्माचा बिघाड करून घेतला आहे असें खास समजावें,

**वचनाचा श्रेष्ठपणा**

पशुयोनींत वचन उच्चारण्याची शक्ति नसल्यानें आत्म्यांतील अनेक गुणदोषांचा स्फोट होऊं शकत नाहीं. पंडित, मूर्ख, धर्मात्मा, पापी, राव, रंक, कुलीन, अकुलीन, हीनाचारी, सदाचारी, संतुष्ट, तीव्र लोभी, धर्मवासनायुक्त, धर्मवासनारहित, मिथ्यादृष्टि, सम्यग्दृष्टि, संस्कृत, असंस्कृत, उत्तम संगत

धरून राजसभेंत राहिलेला, ग्राम्य (मूर्ख) लोकांची संगत धरून खेड्यांत राहिलेला, व्यवहारचतुर, व्यवहार-मूढ, हस्तकलेनें युक्त, हस्तकलाज्ञानहीन, उद्योगी, आळशी, शूर, भित्रा, दातार, कृपण, दयाळू, निर्दय, दीन, महंत, क्रोधी, क्षमावान्, मदोन्मत्त, विनयशील, कपटी, सरळ, वक्र परिणामी वगैरे व्यवहार पशुयोनींत होत नाहींत म्हणून मनुष्य-जन्माची सफलता करून घेण्याची इच्छा असेल तर दुर्लभ अशा सत्यवचन बोलण्याचा निश्चय करा."

सत्याचा महिमा

वचनद्वारें सत्यार्थ उपदेश देऊनच भगवान् अरिहंत त्रैलोक्याला वंदनीय झाले आहेत. त्यांनीं सर्व जगाला मोक्षमार्ग दाखविला आहे. वचनाच्या प्रभावानेंच अनेक जीवांचा मिथ्यात्वादि मल नाहींसा करून अजर,अमर-पदाची प्राप्ति भगवंतांनीं करून दिली आहे. पांच परमेष्टींत देखील वचनकृत उपकारामुळें भगवान् अरिहंताला प्रथमतः नमस्कार केला गेला आहे. ज्ञानी वीतरागाच्या वचनानें स्वर्गनरकादिक तीन लोकांचें प्रत्यक्षसारखें ज्ञान होतें. वचनांतील सत्यपणाच्या प्रभावामुळें पंचमकाळांत धर्मप्रवृत्ति अद्यून दिसून येते.

मधुर भाषणाला किंमत द्यावी लागत नाहीं

उज्ज्वल, विनययुक्त, प्रिय अशा वचनरूप पुद्गल परमाणूंनीं त्रैलोक्य भरलेलें आहे. असलें वचन बोलण्यास कांहीं मोल द्यावें लागत नाहीं.कोणी आपणांस कांहीं विचारलें असतां त्यास गोडीनें उत्तर देण्यास आपल्या शरीराला कांहीं वेदना होते असें दिसून येत नाहीं. आपली जीभ, कंठ, तालु, हीं घासून गेल्याचें ऐकिवांत नाहीं. त्याअर्थी सर्व प्राण्यांना सुख उत्पन्न होईल असें गोड वचन कां बोलूं नये? याचें उत्तर नेहमीं अभद्र बोलून आपली वाणी भ्रष्ट करणाऱ्यास देतां येईल काय?

असत्याच्या प्रचारानेंच मिथ्यात्व वाढतें

असत्य वचनाच्या प्रभावानेंच मिथ्यादेवांची आराधना व वेदादिक ग्रंथांत यज्ञयागादिक व मांसभक्षणादि कुकर्में करण्याची प्रवृत्ति झाली आहे. खोट्या शास्त्राची रचना, अनेक प्रकारचीं खोटीं मतें, नरकतिर्यंचादि योनींमध्यें परिभ्रमण करविणारा सर्व दुष्ट आचार हा असत्यवचनप्रचारामुळेंच चालू आहे. फार काय पण याच असत्यवचनामुळें आपल्याच घरामध्यें अनेक प्रकारचें कलह, विसंवाद, परस्पर वैर, ताडन, मारण, प्राणापहार, क्रोध, भय, संताप, अपमानादि प्रकार झालेले प्रत्यहीं दिसून येतात. सारांश अप्रतीति अथवा अविश्वास आणि दुःख याचें मूल कारण असत्य वचन आहे. असत्य वचनाच्या प्रभावानेंच नीचकुलांत उत्पत्ति होऊन वरचेवर असत्य वचन मुखावाटें बोलणें भाग पडतें व त्यामुळें अनेक जन्मांत दारिद्य, मुकेपणा, बहिरेपणा, दैन्य वगैरे प्राप्त होतें. असत्यवचन सर्व दुःखाचें मूळ जाणून तत्काल सोडावें.

सत्यवचनाच्या प्रभावानें जगांत मान्यता वाढते, इतकेंच नव्हे पण क्रमानें सर्व देवमनुष्यांवर आज्ञा करणारें इंद्रचक्रवर्तिपद प्राप्त होऊन पुढें संपूर्ण श्रुतज्ञानाचे पारगामी असें गणधरपदही

सत्याच्या प्रभावानेंच प्राप्त होते म्हणून असत्याचा त्याग करणें यांतच जीवाचें परमकल्याण आहे. पुरुषार्थसिद्ध्युपाय ग्रंथांत श्रीअमृतचंद्र स्वामी म्हणतातः—

**हेतौ प्रमत्तयोगे निर्दिष्टे सकलवितथवचनानाम् ।**
**हेयानुष्ठानादेरनुवदनं भवति नासत्यम् ॥ १०० ॥**
**भोगोपभोगसाधनमात्रं सावद्यमक्षमा मोक्तुम् ।**
**ये तेऽपि शेषमनृतं समस्तमपि नित्यमेव मुञ्चन्तु ॥ १०१ ॥**

**अर्थ**– भगवंतांनीं सर्व असत्यवचनाचें कारण प्रमत्तयोग आहे असें म्हटलें आहे. कषायांच्या स्वाधीन होऊन वचन उच्चारणें याला प्रमत्तयोग म्हणतात. त्याज्य पदार्थांना त्याज्य व व्रतादि ग्राह्य पदार्थांना ग्राह्य म्हणणें हें असत्यवचन नव्हे. जे गृहस्थ आपल्या भोगोपभोगाला साधन असणाऱ्या सदोष वचनांचा त्याग करूं शकत नाहींत, त्यांनीं अन्य निरर्थक पापबंध करणाऱ्या समस्त असत्य वचनांचा तरी अवश्य त्याग करावा.

**भावार्थ**– गृहस्थाला जरी व्यवहार करीत असतांना भोगोपभोगांचे साधनासाठीं सदोष भाषणाचा पूर्णतः त्याग करितां आला नाहीं तरी, त्यामुळें पापबंध होतो ही जाणीव मनांत बाळगून शक्य तों त्याचा त्याग करण्याविषयीं नेहमीं तत्पर असावें. तसेंच इतर बहु आरंभ व बहुपरिग्रहाचें व दुर्ध्यानाचें आणि स्वतःला अथवा इतरांना संताप उपजविण्यास कारण, अशा प्रकारच्या सदोष व निंद्य भाषणाचा तरी त्यानें अवश्य त्याग केला पाहिजे. याप्रमाणें स्थूल असत्यत्याग नांवचें दुसरें अणुव्रताचें स्वरूप आहे.

स्थूलचौर्यत्याग

**निहितं वा पतितं वा सुविस्मृतं वा परस्वमविसृष्टम् ।**
**न हरति यन्न च दत्ते तदकृशचौर्यादुपारमणम् ॥ ५७ ॥**

**अर्थ**– कोणी आपलें द्रव्य जमीनींत पुरलें असेल, अथवा एखाद्या देवळांत, घरांत अथवा कोठें तरी कोणी ठेविलें असेल, अथवा आपणाजवळ अनामत ठेविलें असेल, आपल्या घरीं अथवा दुसऱ्याच्या घरीं आपणांस न समजतां कोणी ठेवून गेला असेल, गावांत, रस्त्यांत, वनांत, बागेंत वगैरे ठिकाणीं कोणी टाकून गेला असेल, आपणाजवळ देऊन कोणी विसरला असेल, हिशेबांत नजरचूक होऊन कोणी कमी मागत असेल, आपल्या घरीं विसरून कोणी टाकून गेला असेल, देतां घेतां मोजण्यांत विस्मरण होऊन राहिलें असेल अशा प्रकारचें रुपये, मोहरा, आभरण, वस्त्र इत्यादि द्रव्य पुष्कळ अथवा थोडें असलें तरी तें कोणी दिल्यावांचून ग्रहण करूं नये व दुसऱ्या कोणास देऊंही नये. याला स्थूल चौर्यत्याग अणुव्रत म्हणतात.

श्रीकार्तिकेय स्वामींनीं म्हटलें आहे–

**जो बहुमुल्लं वत्थुं अप्पमुल्लेण णेव गिण्हेदि ।**
**वीसरियं पि ण गिण्हदि लाहे थूवेहि तूसेदि ॥ ३३५ ॥**

**अर्थ**– ज्याला स्थूल चोरीचा त्याग असेल त्यानें पुष्कळ मोलाची वस्तु अल्प किंमतीत घेऊं नये. जसें कोणी आपली वस्तु बाजारांत नेऊन चौकशी करून विकली असतां त्याची किंमत त्यास सव्वा रुपया आली असतां तीच वस्तु त्यानें आपणाकडे आणिली असतां लोभाच्या वश होऊन एक रुपयांत घेणें हें बहुमोलाची वस्तु अल्प मोलांत विकत घेणें होय. दुसऱ्याची विसरलेली वस्तू ही त्यानें घेऊं नये. निर्धन अज्ञानी पुरुषाची वस्तु थोड्या किंमतीत मिळाली तर बरें असा विचार पण त्यानें कधीं मनांत आणूं नये. त्यानें स्वल्प लाभांत संतोष धारण करावा.

**भावार्थ**– व्यापारांत थोडा लाभ झाला तरी संतोषवृत्ति ठेवावी. अधिक इच्छा ठेऊं नये. अशा रीतीनें वागणारांस स्थूल चौर्यत्याग अणुव्रत घडतें.

स्थूल चौर्यत्याग अणुव्रताचे पांच अतिचार

**चौरप्रयोगचौरार्थादानविलोपसदृशसन्मिश्राः ।**
**हीनाधिकविनिमानं पंचास्तेये व्यतीचाराः ॥ ५८ ॥**

**अर्थ** - अचौर्य अणुव्रताचे चौरप्रयोग, चौरार्थादान, विलोप, सदृशसन्मिश्र आणि हीनाधिक विनिमान असे पांच अतीचार आहेत.

चौरप्रयोग– जो स्वतः चोरी करीत नाहीं परंतु दुसऱ्यास चोरी करण्याची प्रेरणा करितो, अथवा चोरी करण्याचा मार्ग दाखवितो त्याला चौरप्रयोग अतीचार घडतो.

चौरार्थादान– चोरांनीं आणलेलें द्रव्य ग्रहण करणें हा चौरार्थादान अतीचार आहे.

विलोप– योग्य व न्याय मार्ग सोडून अन्य रीतीनें द्रव्य ग्रहण करणें अथवा राजाज्ञेनें ज्या वस्तूवर नियंत्रण घातलेलें असेल त्या वस्तु आणविणें अथवा राजाच्या कायद्याचें उल्लंघन करणें हा विलोपातिचार होय.

सदृशसन्मिश्र– भारी किंमतीच्या वस्तूमध्यें हलक्या किंमतीची वस्तु मिळवून ती विकणें. तुपांत तेल मिळविणें, अथवा सुवर्णांत तांबें घालून तें विकणें हा सदृशसन्मिश्रातिचार जाणावा.

हीनाधिकविनिमान– वजन करण्याची तराजू, वजनें वगैरे खोटीं ठेवणें, ज्यामुळें इतरांचे पदार्थ विकत घेतलें असतां ते जास्त यावेत आपले विकले असतां कमी जावेत असा व्यवहार करणें हा हीनाधिक-विनिमानातिचार होय.

याप्रमाणें या व्रताचे पांच अतीचार ( दोष ) आहेत. हें सोडल्यानें अचौर्यव्रत निर्मल होतें. जगांत चोरी करण्यासारखा दुसरा मोठा अपराध नाहीं. यापासून कुळाचा व धर्माचा नाश होऊन अपकीर्ति होते. चोरी करून मिळविलेलें धनही परस्त्री वगैरे व्यसनामध्येंच खर्च होतें. अथवा ज्याच्याजवळ ठेवलें असेल तोच तें खाऊन जातो. चोरीच्या धनापासून संतोष होत नाहीं. परिणामामध्यें नेहमीं आकुलता रहाते. कधीं काळीं चोरी घडकीस आली तर त्याला कैदेची शिक्षा भोगावी लागते व लोकही हाणमार करून अनेक प्रकारचें दुःख देतात. तेव्हां इहलोकीं कैद, मारपीट, सर्वस्वहरण,

चोरीचें परिणाम

हस्तनासिकाछेदन वगैरे दंड प्राप्त होतोच. पण परलोकींहि नरकादिकादिगतिमध्यें अनंतकाल परिभ्रमण करावें लागतें.

स्थूलब्रह्मचर्य अणुव्रताचें लक्षण

**न च परदारान् गच्छति न परान् गमयति च पापभीतेर्यत् ।**
**सा परदारनिवृत्तिः स्वदारसंतोषनामापि ॥ ५९ ॥**

**अर्थ**- जो पापाच्या भीतीनें परस्त्रीकडे स्वतः जात नाहीं व दुसऱ्यास जाण्यास प्रेरणा करीत नाहीं त्याला स्वस्त्रीसंतोष व परस्त्रीत्याग नांवचें चौथें अणुव्रत घडतें.

**विशेषार्थ**-जो पुरुष, आपल्या जातीची, कुलाची स्त्री, जिच्याशीं देवगुरु पंचासमक्ष आपला विवाह झाला आहे तिजविषयीं संतोष धारण करून, अन्य सर्व स्त्रीमात्रांविषयीं भोगोपभोगाची इच्छा करीत नाहीं, त्याला परस्त्रीत्याग व्रत आहे असें समजावें. तो परस्त्री, वेश्या, दासी, कुलटा, कन्या वगैरे स्त्रियांशीं संबंध ठेवीत नाहीं व कोणत्याही स्त्रीशीं कामसेवनाच्या इच्छेनें बोलणें, पाहणें, स्पर्श करणें वगैरे क्रियेपासून दूर राहतो. अशा पुरुषालाच स्वदारसंतोषी व परस्त्रीत्यागी म्हणावें.

स्वदारसंतोष अणुव्रताचे पांच अतिचार

**अन्यविवाहाकरणानङ्गक्रीडाविटत्वविपुलतृषः ।**
**इत्वरिकागमनं चास्मरस्य पंच व्यतीचाराः ॥ ६० ॥**

**अर्थ**- अन्यविवाहाकरण, अनंगक्रीडा, विटत्व, विपुलतृषा आणि इत्वरिकागमन असे पांच स्थूल ब्रह्मचर्यव्रताचे अतिचार आहेत.

१ आपल्या मुलांमुलीशिवाय दुसऱ्यांच्या मुलामुलींचे विवाह करणें हा अन्यविवाहाकरण अतिचार होय.

२ कामसेवन करण्याच्या अवयवांखेरीज इतर अवयवांनीं कामक्रीडा करणें हा अनंगक्रीडातिचार.

३ हिजड्या पुरुषाला स्त्रीचें सोंग देऊन त्याकडून होणाऱ्या क्रिया पाहून संतोष मानणें अथवा तशा क्रिया करविण्याविषयीं मनवचनकायेची प्रवृत्ति ठेवणें हा विटत्व अतिचार.

४ कामोपभोगाची तीव्र इच्छा करणें हा विपुलतृषातिचार.

५ इत्वरिका म्हणजे व्यभिचारिणी स्त्री, तिच्या घरीं जाणें येणें अथवा तिला आपल्या घरीं बोलाविणें, तिच्याशीं देण्याघेण्याचा व्यवहार ठेवणें, तिच्याशीं संभाषण करण्याची संधि वरचेवर आणणें व तिच्या स्वरूपाकडे अवलोकन करणें हा इत्वरिकागमनातिचार.

याप्रमाणें पांच अतिचार टाकले पाहिजेत. ज्याला देवादिकांकडून पूज्य अशा ब्रह्मचर्यव्रताचें रक्षण करावयाचें असेल त्यानें आपल्या विवाहित स्त्रीशिवाय इतर माता-बहिण-कन्या-सून वगैरे स्त्रियांपाशीं देखील एकांतस्थानीं बसूं नये. अन्य स्त्रियांच्या मुखाकडे टक लावून पाहूं नये.

परिग्रहप्रमाणव्रताचें लक्षण

**धनधान्यादिग्रन्थं परिमाय ततोऽधिकेषु निस्पृहता ।**
**परिमितपरिग्रहः स्यादिच्छापरिमाणनामापि ॥ ६१ ॥**

**अर्थ**– आपल्या संतोषाप्रमाणें धन, धान्य, गुरें, ढोरें, चाकर, माणसें, घरें, शेतें, वस्त्र–प्रावरणें वगैरे परिग्रहांचें प्रमाण करून त्याहून अधिक पदार्थविषयीं इच्छा न ठेवणें यास परिमितपरिग्रह अथवा इच्छापरिमाणव्रत म्हणतात.

**विशेषार्थ**– कोणाजवळ वर्तमानकालीं थोडा परिग्रह आहे त्यानें जरी अधिक परिग्रहाची इच्छा ठेवून धनाचें प्रमाण बांधिलें, तरी ती धर्मबुद्धि असून त्याला व्रती म्हणतां येते. पण त्यानें अन्यायानें धन मिळवावयाचें नाहीं याबद्दल मनानें पक्का निश्चय केला असला पाहिजे. जसें एखाद्या-जवळ शंभर रुपयाचा परिग्रह आहे असें समजा, त्यानें हजार रुपयापेक्षां जास्त परिग्रह ठेवणार नाहीं म्हणून प्रमाण केलें, तर तें व्रत झालें. परंतु हजार रुपये अन्यायानें ग्रहण करणार नाहीं असा त्याचा दृढ संकल्प असला पाहिजे. परिग्रहाचें प्रमाण नसल्यानें मनुष्यमात्राचे परिणाम निरंतर अनेक वस्तु प्राप्त करून घेण्याचें चिंतन करीत असतात त्यामुळें त्याला समाधान नसतें. सर्व पापांचें मूल परिग्रह आहे. सर्वप्रकारचें दुर्ध्यान परिग्रहापासूनच होतें. भगवंतांनीं मूर्च्छेला (ममतेला) परिग्रह म्हटलें आहे. पांघरावयाला वस्त्र व राहण्यास झोंपडी एवढाही परिग्रह नसणाऱ्या पुरुषाला अंतरंगांत परवस्तूची तीव्र इच्छा असल्यानें परिग्रही म्हटलें आहे. परमा-

परिग्रहाचे भेद

गमांत अंतरंग परिग्रह– १ मिथ्यात्व, ३ वेद, ५ क्रोध, ६ मान, ७ माया, ८ लोभ, ९ हास्य, १० रति ११ अरति, १२ शोक, १३ भय, १४ जुगुप्सा असा चौदा प्रकारचा सांगितला आहे.

अनादिकालापासून देहादिक परद्रव्यांवरील ममता कमी होत नाहीं हा मिथ्यात्व परिग्रह. हा देह म्हणजे मी, ही जाति म्हणजे मी, हें कुल म्हणजे मी इत्यादि परद्रव्याविषयीं आत्मबुद्धि अनादिकालापासून चिकटून असणें हा मिथ्यात्वाचा प्रभाव. रागद्वेषक्रोधादि मोहकर्मापासून उत्पन्न होणाऱ्या विकाराविषयीं आत्मपणाचा संकल्प हेंही मिथ्यात्वच. कामविकारामुळें चित्त सदैव संतप्त राहणें, राग, द्वेष, क्रोध, मान, माया, लोभ व हास्यादि नोकषाय वगैरे

परिग्रहाचा प्रभाव

आत्म्याचे आहेत मानणें हा अंतरंग परिग्रह होय. ज्याला अंतरंग परिग्रह नसतात त्याला बाह्य परिग्रहाविषयीं ममता उत्पन्न होत नाहीं. सर्व प्रकारची अनीति परिग्रहावरील ममतेपासून उत्पन्न होते. परिग्रहाच्या इच्छेनें हिंसा करावी लागते, खोटें बोलावें लागतें, चोरी करावी लागते व व्यभिचार करावा लागतो. परिग्रह वाढविण्यासाठीं प्रसंगीं स्वतः प्राण देतो व दुसऱ्याचा जीव घेण्यास तयार होतो. परिग्रहाकरितांच मोठा क्रोध उत्पन्न होतो. परिग्रहाच्या प्रभावानें त्याला मोठा अभिमान उत्पन्न होतो. परिग्रहाकरितां अनेक कपटप्रयोग करावे

लागतात, परिग्रहावरील ममतेनें महालोभ व पुष्कळ आरंभ करण्याची इच्छा उत्पन्न होते. सारांश सर्व कषायांचें मूळ हा परिग्रह आहे. म्हणून सर्व तऱ्हेच्या पापापासून मुक्त होण्याची इच्छा असेल तर परिग्रहापासून विरक्त व्हा. श्रीकार्तिकेयस्वामींनीं म्हटलें आहे—

**को ण वसो इत्थिजणे कस्स ण मयणेण खंडियं माणं ।**
**को इंदिएहिं ण जिओ को ण कसाएहिं संतत्तो ॥ २८१ ॥**
**सो ण वसो इत्थिजणे सो ण जिओ इंदियेहिं मोहेण ।**
**जो ण य गिण्हदि गंथं अब्भंतरबाहिरं सव्वं ॥ २८२ ॥**
**जो लोहं णिहणित्ता संतोसरसायणेण संतुट्ठो ।**
**णिहणदि तिण्णा दुट्ठा मण्णंतो विणस्सरं सव्वं ॥ ३३९ ॥**
**जो परिमाणं कुव्वदि धणधण्णसुवण्णखित्तमाईणं ।**
**उवओगं जाणित्ता अणुव्वयं पंचमं तस्स ॥ ३४० ॥**

**अर्थ**— जगांत स्त्रीच्या वश कोण झालेलें नाहीं, कामविकारानें कोणाचा मान खंडित केला नाहीं, इंद्रियांनीं कोणाला जिंकिलें नाहीं व कषायानें कोण संतापून गेला नाहीं ? सर्व संसारी जीव स्त्रीच्या वश होऊन राहिले आहेत. कामविकारानें सर्वांचा अभिमान नाहींसा केला आहे. इंद्रियांच्या सर्व वश झालेले आहेत व चार प्रकारच्या कषायांनीं सर्व जीव जळून चरफडत आहेत. ज्या पुरुषानें बाह्य अभ्यंतर परिग्रह सोडून दिले आहेत, तो मात्र स्त्रीच्या वश झाला नाहीं, इंद्रियांनीं त्यावर पगडा बसविला नाहीं, मदनाला त्याला वश करितां आलें नाहीं व कषायानेंही तो जळून भस्म झाला नाहीं. जो पुरुष लोभ नाहींसा करून, संतोषरूपीं रसायनानें आनंदित होऊन, सर्व प्रकारच्या धनसंपत्तीला विनाशीक जाणतो व दुष्ट तृष्णेला वाढूं न देतां, धन–धान्य–सुवर्ण–क्षेत्रादिकांची आपल्या शक्तिप्रमाणें मर्यादा करून राहतो व त्याहून अधिक परिग्रहाची ठेवीत नाहीं त्याला परिग्रहप्रमाणव्रत घडतें.

परिग्रहामुळें परवशता

शास्त्रांत मूर्च्छेला परिग्रह म्हटलें आहे म्हणून वर सांगितलें. ती मूर्च्छा परपदार्थामध्यें ममत्वबुद्धि ठेवल्यानें होते. परवस्तुच्या ठायीं आपलेपणा मानून उत्पन्न होणारा राग आत्म्याच्या जीवन-मरण, हित-अहित, योग्य-अयोग्य वगैरे विचाराला नष्ट करून, मोहानें सर्व द्रव्याविषयीं " हें माझें हें माझें " असे परिणाम उत्पन्न करितो. असे परिणाम उत्पन्न होणें हीच मूर्च्छा व हिलाच भगवंतांनीं परिग्रह म्हटलें आहे. बाह्य परिग्रह थोडा असला किंवा मुळींच नसला तरी तो परिग्रहीच म्हणविला जातो. श्रीकार्तिकेयस्वामींनीं म्हटलें आहे :—

मूर्च्छा म्हणजे ममत्व

**बाहिरगंथविहीणा दलिद्दमणुआ सहावदो हुंति ।**
**अब्भंतरगंथं पुण ण सक्कदे को वि छंडेदुं ॥ ३८७ ॥**

**अर्थ**– दरिद्री मनुष्याला बाह्य परिग्रह स्वभावतः नसतोच. हजारों लाखों माणसें आपण नेहमीं अशीं पाहतों कीं ज्यांना जन्मांतही पितळेचें, तांब्याचें, कांशाचें भांडें मिळालें नाहीं. ज्यांना जन्मभर तुपाचा वास मिळाला नाहीं मग त्याचें भक्षण कोठलें? ज्यांना आंगरखे, पागोटें, टोपी ही कधीं घालतां आली नाहीं, ज्यांना जन्मभर खाण्यास पोटभर अन्न मिळालें नाहीं, ज्यांचा विवाह झाला नाहीं, ज्यांना दोन चार दिवस खाण्यापुरता धान्याचा संग्रह करिता आला नाहीं, ज्यांना पै पैसा मिळावयाची मारामार त्यांना सोन्याचांदीचें दर्शन कधीं झालें असेल ही शंका कशाला? सारांश, ज्यांना पर्णकुटी देखील राहावयास नसते अशा मनुष्यांना देखील अंतरंग ममता नाहींशी झालेली नसते. त्यामुळें ते सर्व मूर्च्छावान् म्हणजे परिग्रही आहेत.

शंकाः– मूर्च्छेला परिग्रह म्हटलें तर बाह्य धन-धान्य-वस्त्र-प्रावरणादिकांना परिग्रह म्हणतां येणार नाहीं.

समाधान– बाह्य परिग्रह, अंतरंग परिग्रह उत्पन्न करण्यास कारण आहेत. धन, धान्य, वस्त्रालंकारादि बाह्य परिग्रह पाहतांच ते प्राप्त व्हावे अशी मनांत इच्छा उत्पन्न होते. ती आवरणें मनुष्य मात्रास अशक्य झाल्यानें त्यामुळें त्याच्या प्राप्तिसाठीं सारखी धडपड सुरू होते म्हणून त्यांना मूर्च्छेचें कारण मानलें आहे. त्याअर्थीं त्या कारणांचा त्याग करणेंच प्राप्त आहे.

भगवंतांनीं आंतरबाह्य दोन्ही परिग्रहांना हिंसा म्हटलें आहे व दोन्ही परिग्रहांचा त्याग करण्यांत अहिंसा घडते असें सांगितलें आहे. मिथ्यात्व, कषाय, अंतरंग परिग्रह हीं हिंसेची दुसरीं पर्याय नांवें आहेत. बाह्य परिग्रहामध्यें ममत्व ही हिंसाच होय. कृष्ण, नील, कापोत वगैरे लेश्येचे अशुभ परिणाम, परिग्रहावर प्रीति असल्यानें होतात. मोठमोठे आरंभ हे परिग्रहावरील तीव्र प्रीतीचे परिणाम आहेत. परिणामामध्यें शुद्धता कषाय मंद होण्यानें होत असते. कषायाची मंदता परिग्रहाच्या अभावानें होते. म्हणून परिग्रहावरील सर्वस्वी प्रीति कमी होत असेल तर उत्तम. पण तसें होत नसेल तर परिग्रहाची कांहीं तरी मर्यादा केली पाहिजे. परिग्रह थोडा पण इच्छा पुष्कळ असली तरी केवळ इच्छा असल्यानेंच कांहीं प्राप्त होत नसतें. अंतराय कर्माचा क्षयोपशम असेल तितकाच लाभ होईल. अधिक इच्छा ठेवल्यानें पापाचा बंधच होणार म्हणून पापाला कारण अशी परिग्रहाची ममता सोडून प्राप्त होईल तेवढ्यांत संतोष धारण करून राहणें योग्य आहे.

परिग्रह म्हणजे हिंसा

समस्त परिग्रहांचा त्याग करणें हा जरी उत्तम पक्ष असला तरी गृहस्थावस्थेंत राहून धर्मसेवन करणाऱ्याला आपल्या योग्यतेप्रमाणें परिग्रह ठेवल्यावांचून भागत नाहीं. गृहस्थानें मुळींच परिग्रह ठेवावयाचा नाहीं म्हटलें तर, कालीं, अकालीं, दुष्काळांत, रोग प्राप्त झाला असतां, वियोगावस्थेंत, मुलामुलींच्या लग्नकार्यादि समारंभ वगैरे कार्याची त्याजवर जबाबदारी असल्यानें ती पुरी पाडतां न आल्यास त्याच्या मनाला स्थिरता प्राप्त होणार नाहीं. स्थिरतेच्या अभावीं त्याला यथास्थित

गृहस्थानें परिमित परिग्रह ठेवावा

गृहस्थधर्म साधणार नाहीं. गृहस्थधर्माचें रक्षण करण्याकरितां परिग्रहाची अवश्यकता आहे. त्यासाठीं त्यानें आपला उदरनिर्वाह न्यायमार्गानें करीत असावें.

साधु पुरुषानें थोडाही परिग्रह ठेवला तर तो इहपरलोकापासून भ्रष्ट होईल व गृहस्थानें परिग्रह ठेवला नाहीं तर तो भ्रष्ट होईल. जोंपर्यंत त्याला गृहस्थाश्रमांत रहावयाचें आहे तोंपर्यंत त्याला थोडाबहुत परिग्रह ठेवल्यावांचून आपल्या परिणामांत शांति ठेवतां येणार नाहीं. आजीविकेच्या अभावीं निराधार पुरुषाचे परिणाम धर्मसेवन करण्यांत स्थिर राहूं शकत नाहींत व त्यामुळें परिणामांतील वेदनेचें दुःख नाहींसें होत नाहीं. पोटापुरतें अन्न मिळण्याइतका धंदा–रोजगार केला नाहीं तर त्याला स्वाध्याय पूजनादि शुभकार्यें करण्याचा उत्साह राहत नाहीं. पोटाच्या विवंचनेमुळें व्याकुळता वाढत जाऊन संतोषाचा अभाव होतो.

रोग प्राप्त झाला, म्हातारपण आलें, मुलाबाळांचा वियोग झाला वगैरे अनेक संकटें द्रव्याभावीं प्राप्त झालीं असतां अन्नवस्त्राच्या आधाराशिवाय कोणत्याही कालीं व कोणत्याही देशांत मनुष्यमात्राचे परिणाम स्थिर राहणें शक्य नाहीं. देह सुरक्षित असल्याशिवाय अणुव्रत, शील व संयम वगैरे कांहींच धर्मसाधन होऊं शकत नाहीं. देहरक्षण उपजीविकेच्या साधनाशिवाय होत नाहीं. यासाठीं देशकालानुसार आपलें सामर्थ्य पाहून त्याप्रमाणें उद्योग व त्यासाठीं लागणारें इतरांचें साहाय्य मिळविण्याचा व न्यायमार्गानें धन संपादन करण्याचा प्रयत्न करीत रहावें. व आपल्या पुण्यानुकूलतेनें जेवढें प्राप्त होईल त्यांत संतोष मानून धर्मसेवन करीत जावें.

अहिंसा व सत्य या पायावर निष्ठा ठेवून अन्यायानें परद्रव्य हरण करण्याची इच्छा न धरितां आपण परिश्रमपूर्वक उद्योग करूं तर खात्रीनें आपल्याबद्दल लोकांत विश्वास उत्पन्न होईल. यासाठीं विद्या व कला संपादन करून आपणांत पात्रता आणणें अवश्य आहे. यानंतर आपल्या लाभांतराय कर्माच्या क्षयोपशमाप्रमाणें जेवढा लाभालाभ अथवा अल्प लाभ होईल त्यांत संतुष्ट असावें.

कुटुंबांतील माणसांचें पोषण तुम्हास लाभ होईल त्याप्रमाणांतच करा. कुटुंबपोषण करीत असतांना ऋण होऊं देऊं नका. ऋण होण्याचें मोठें भय बाळगा. एकदां ऋण झालें म्हणजे सर्व आटोपलें. ऋणी मनुष्याचें धैर्य, शहाणपण वगैरे सर्व नाहींसें होतें. तो दीन होतो. एक वेळां पत नाहींशी झाली म्हणजे त्याची उपजिविका देखील होणें कठिण जातें म्हणून आपलें उत्पन्न पाहून खर्च करा. जगांत इतर पुण्यवान् अशा श्रीमान् जीवाकडे पाहून जर तुम्ही खर्च करूं लागाल तर दरिद्री होऊन तुमचे दोन्ही लोक नष्ट होतील.

ऋण करूं नये

वडिलार्जित मोठ्या अब्रूच्या भरीस पडूं नका. आमच्या पूर्वजांनीं मोठमोठीं कार्यें केलीं आहेत त्यांत आतां न्यूनता कशीं करावी? जर तीं कार्यें आतां आम्ही करणार नाहीं तर जगांत आमचा दुर्लौकिक होईल. अशा प्रकारचा विचार कधींही मनांत आणूं नका.

मोठेपणाचा पोकळ अभिमान सोडा

ज्याची पुण्याई संपली असेल त्याचा मोठेपणा नाहींसा होतो. यापुढें संतोषवृत्ति धारण करून, शील धारण करण्यांत, व्रत धारण करण्यांत, प्राप्त झालेलें दैन्य नाहींसें करण्यांत व विषयांची इच्छा कमी करण्यांत आतां मोठेपणा आहे. यापासून इहपरलोकांत सुख प्राप्त होणारें आहे. पुण्योदय प्राप्त होईल त्यावेळीं हा जीव स्वर्गामध्यें महाऋद्धिधारी देवपदीं विराजमान होतो. तोच पापाचा उदय प्राप्त झाला असतां नरकामध्यें अथवा एकेंद्रियांत जाऊन जन्मतो. पापाच्या उदयानें मनुष्य, रोगी व दरिद्री होतो. तोच उदय तीव्र असेल तर तिर्यंच योनींत उत्पन्न व्हावें लागतें. फार दूर कशाला याच जन्मांत राजा क्षणांत रंक झालेला आपण पाहतो. अशा स्थितींत तुमचा मोठेपणा कोठें राहणार? तुमच्याजवळ धन उरलें नाहीं, याचा विचार न करितां उधळेपणानें धन खर्च कराल तर दरिद्री व कर्जबाजारी होऊन तुमची किंमत जगांत उतरून जाईल. सर्व लोक तुमची निंदा करूं लागतील व त्यामुळें तुम्हांस अतिशय दुःख होईल. रात्रंदिवस आर्तरौद्रध्यान करून तुम्ही दुर्गतीला पात्र व्हाल.

आयाहून अधिक खर्च करूं नये.

म्हणून बाबांनो, आपल्या उत्पन्नापेक्षां खर्च अधिक करूं नका. थोडा खर्च करणें यांतच चातुर्य आहे, पंडितपणा आहे हें ध्यानांत असूं द्या. उत्पन्नापेक्षां खर्च कमी करणें यांतच शहाणपणा आहे. हाच उत्तम धर्म आहे. उत्पन्नापेक्षां खर्च जास्त ठेवाल तर लौकरच दरिद्री व्हाल व तुम्ही दुनियेंत मूर्ख ठराल. ऋणी झाल्यानंतर उत्तम कुलांतील योग्य आचार, आदरसत्कार वगैरे सर्व नाहींसे होतील. लोक नांवें ठेऊं लागतील व तुमचें लक्ष ध्यान, पूजन, स्वाध्याय, शुभचिंतनामध्यें क्षणभर देखील रहाणार नाहीं. सारांश उत्पन्नापेक्षां कमी खर्च करणें हाच गृहस्थांचा खरा धर्म आहे. अभिमानाला पेटून अधिक खर्च करणाराला, इतरांनीं आपणास न दिलेल्या द्रव्याकडे चौर्यदृष्टीनें पाहण्याची इच्छा उत्पन्न होते. तसेंच अनेक प्रकारचीं खोटीं कर्में, खोट्या कल्पना लढवून येन केन प्रकारेण कोणास तरी फसवून, पापप्रवृत्तीनें अधिक द्रव्य संपादन केलें पाहिजे असें वाटूं लागतें. त्यामुळें संतोषवृत्ति नाहींशी होते.

शंका :— कोणी यावर असें म्हणेल कीं आजीविका अथवा लाभ हा पूर्व कर्माच्या स्वाधीन आहे. पण धर्मसेवन करणें हें तर आपल्या हातचें आहे ना? आम्हांस लाभ झाला नाहीं तरी आम्ही धर्म पराङ्मुख होणार नाहीं.

समाधान :–त्याचें असें उत्तर आहे कीं, लाभ अथवा आजीविका जरी पुण्यकर्माच्या अधीन असली तरी धर्मग्रहण होणें यासही पुण्यकर्माचें सहाय लागतेंच. त्या शिवाय तें होऊं शकत नाहीं. धर्म म्हणजे अहिंसा ही उत्तम कुलांत जन्म झाल्यानें पाळता येईल. चांडाळ, भील वगैरे नीच कुलांत जन्म झाला तर ती पालनकरितां येणार नाहीं. चांगल्या देशांत जन्म होणें, इंद्रियांची पूर्णता असणें, रोगरहित शरीर प्राप्त होणें, चांगली संतति प्राप्त होणें, उपजीविकेची काळजी नसणें, धर्माचा उपदेश मिळणें वगैरे सामग्री पुण्योदयाशिवाय सहजा-सहजीं प्राप्त होत नाहीं. ज्याला पूर्व पुण्याच्या

उदयानें उदर-निर्वाहाची काळजी नसेल, त्याला धर्माचरण स्थिर चित्तानें करितां येईल. ज्याला सर्व इंद्रियें पूर्ण असून शरीर निरोगी असेल, न्याय-अन्यायाचा विवेक करण्याइतकी बुद्धि असेल, धर्म-अधर्म, योग्य-अयोग्य यांचा विवेक असेल, अप्रियवचन, अविनय, परद्रव्य, परस्त्रीपासून पराङ्मुखता, व सतत कार्यप्रवणता, धैर्य, समयानुसार भाषण करण्याची शैली वगैरे गुण असतील त्यास द्रव्यलाभ व धर्मलाभ दोन्ही होऊं शकतात. गुणवान्, निर्लोभी, उद्योगी व विनयशाली पुरुषाला उपजीविका दुर्लभ नाहीं. ज्याला आपल्या अंगांतील गुणांची व पुरुषार्थाची खात्री असते त्याला आपल्या उप-जीविकेची मुळींच काळजी वाटत नाहीं. लाभांतराय कर्माच्या क्षयोपशमाप्रमाणें त्याला थोडी बहुत पण आजीविका खात्रीनें प्राप्त होतेच. म्हणून प्राप्त होईल तेवढ्यांत संतोष मानून, अधिक इच्छा न करितां परिग्रहप्रमाण व्रत धारण करणें योग्य आहे.

अनीतीनें वागूं नका

पुण्योदयानें उपजीविकेचें साधन प्राप्त झालें असतांना अनीतीनें वागून ती नाहींशी करूं नये. ती नष्ट झाली कीं त्याबरोबर धर्मही नष्ट होईल. तुम्ही आपल्या मनानें जर नीति सोडणार नाहीं, व न्यायमार्गानें वागण्याचा निश्चय कायम ठेवाल, तर कदाचित् असाताकर्माच्या उदयामुळें अग्निप्रलयानें, जलप्रलयानें, चोरी होण्यानें, राजाच्या उपद्रवानें, आघात होऊन उपजीविका नाहींशी होण्याचा प्रसंग प्राप्त झाला तरी धर्म बिघडणार नाहीं, तुमची अपकीर्ति होणार नाहीं व तुमच्या वरील असलेला लोकांचा विश्वास नाहींसा होणार नाहीं. म्हणून स्वप्नांत देखील अन्यायानें द्रव्योपार्जन करण्याचा विचार मनांत आणूं नका. न्यायानें वागत असतांनाही प्रबल लाभांतरायाचे उदयानें, जर लाभ होत नसेल तरी मनाची समता ठेवा, त्यांत चलबिचल होऊं देऊं नका.

कर्माच्या शक्तीचा विचार करा

आयुकर्म शेष असेल तर तें भोजनसामग्री आपोआप आणून देईल. कर्म बलवान् आहे. रानांत, वनांत, पहाडांत, पाण्यांत शहरांत कोठेंही असा, अंतरायकर्माच्या क्षयोपशमाप्रमाणें सर्वाला लाभ होईलच. कित्येक लोक पुण्य-कर्माच्या उदयानें अनेकांना अन्न देऊन नंतर आपण भोजन करितात, तर कित्येकांना अंतराय कर्माच्या उदयानें स्वतःचें पोट भरण्याइतकें देखील अन्न प्राप्त होत नाहीं. कित्येकांना अर्धें पोट भरण्या-इतकें तर कित्येकांना एका दिवसापुरतें, कित्येकांना दोन दिवसाआड, तर कित्येकांना तीन दिवसांनीं एकवेळ व तेंही कसलें तरी नीरस अन्न मिळतें ! अशा स्थितींतही धर्मात्मा

संकटकालीं मनाची समता ठेवावी

पुरुषानें आपल्या मनाची समता सोडूं नये. त्या वेळीं विचार करावा कीं, "पूर्वीं आपण कधीं तरी पशुयोनींत जन्मलों होतो. त्यावेळीं कधीं पोट भरून जेवण मिळालें ? त्या स्थितींत क्षुधातृषेच्या वेदनेनें अनेक वेळां मरण पावलों. आतां धैर्यधारण करून ज्या योगें आपला धर्म सुटणार नाहीं व आपण नीतीच्या शिखरापासून केंसभर ढळणार नाहीं असा प्रयत्न करावा." याप्रमाणें विपन्न स्थितींत ज्याचे परिणाम दृढ राहतात त्याला स्वर्गलोकीं महर्द्धिक देवाची पदवी प्राप्त होते.

**शंका**— कोणी यावर असें म्हणेल कीं, स्वतःचे परिणाम कदाचित् इतके दृढ ठेवतां येतील, पण कुटुंबांतील सर्व माणसांना असें वाटणें कसें शक्य आहे ?

**समाधान**— त्यावेळीं कुटुंबांतील माणसांना असा उपदेश करावा, " हे कुटुंबिजनहो, आपण पूर्व जन्मीं कोणास दान दिलें नाहीं, व्रत उपोषणें वगैरे केलीं नाहींत, मनास वाटेल तें अभक्ष्य भक्षण केलें, अन्यायानें दुसऱ्याचें धन ग्रहण केलें, त्या पापाच्या उदयानें आतां इतकें दरिद्री झालों कीं, पोटास पुरतें अन्न व वस्त्रही मिळण्याची पंचाईत पडूं लागली. हें आपण केलेल्या पापाचें फल आहे. आतां जर इतर पुण्यवान् जीवांच्या वस्त्राभरण-ऐश्वर्याकडे पाहून दुःखी व्हाल तर पुढें याहूनही अधिक अशा पशुगतीच्या दुःखाचें कारण असा व कोटिभवापर्यंत दारिद्र्य उत्पन्न होण्यासारखा पाप-बंध होईल. दुसऱ्याची संपत्ति आपल्याला प्राप्त होणार नाहीं. शोक, दुर्ध्यान, तृष्णा वगैरे केल्यानें दुःख नाहींसें होणार नाहीं. उलट दुःख वाढेल. म्हणून संतोष धारण करून निर्वांछक बनाल तर दुःख भासणार नाहीं व सर्व पापकर्मांची अशी निर्जरा होईल कीं, तशी घोर तपश्चरण करूनही होणार नाहीं. बाबांनो, यावेळीं अल्पभोजन मिळालें, व मनाजोगीं शरीर आच्छादन करण्यापुरतीं वस्त्रें जरी न मिळालीं, तरी परिणामामध्यें व्याकुलता उत्पन्न न होऊं देतां मोठ्या शांतपणानें रहाल तर अशा स्थितींतही हें मोठें तपश्चरणच होईल. कर्मानें मला तुमच्यामध्यें उत्पन्न केलें आहे. मी दैव आणि पुरुषार्थ या दोहोंच्याही अनुकूलतेनें द्रव्य उपार्जन करण्याचा प्रयत्न करीत आहे. यांत लाभांतरायाचा क्षयोपशम असेल तितकेंच न्यायमार्गानें मिळेल तें तुमच्या जवळ आणून देतो. त्यांतून माझे वाट्याचें असेल तें मला देऊन बाकीचें तुम्ही विभागून घ्या. मी आतां भगवंतानीं उपदेशिलेल्या धर्माचा अंगीकार केला आहे त्याअर्थी तुमच्याकरितां अन्याय, कपट वगैरे पाप करून द्रव्य मिळविणार नाहीं. न्यायनीतीनें व ज्या योगें धर्माला बाधा पोहोंचणार नाहीं अशा तऱ्हेनें उद्योग करून धनसंपादन करीन. तुम्हीही माझा धर्म बिघडणार नाहीं असें वागा. आपल्या पुण्यपापाचें फल भोगा. व्याकुलता सोडून मिळेल तेवढ्यात संतोष मानून सुखानें रहा. " याप्रमाणें ज्याचा नीतीवर व धर्मावर दृढ विश्वास असेल त्यालाच स्थूल परिग्रहप्रमाण नांवचें व्रत घडतें. जे कुटुंब-पोषणा करितां पापक्रिया करण्याविषयीं प्रवृत्त होतात व असत्य, हिंसा, चोरी इत्यादि पाप उपार्जन करितात त्यांना तीव्र पापाचा बंध होतो व त्यामुळें ते दुर्गतीला जातात. याकरितां आतां जें तुमचें थोडेसें आयुष्य उरलें आहे त्यामध्यें व्रत, शील, संयम वगैरे जीं धारण केलीं असतील तीं दृढ ठेवण्याचा प्रयत्न करा.

कित्येक लोक म्हणतात कीं, द्रव्य पापापासून प्राप्त होतें. पाप केल्याशिवाय तें प्राप्त होत नाहीं. मग आम्ही जर त्यागी अथवा व्रती बनलों तर द्रव्य कोठून प्राप्त होणार ? " पापाशिवाय धन मिळत नाहीं असें म्हणणें " हा निवळ भ्रम आहे. जर पापापासूनच द्रव्य प्राप्त होतें असें म्हणावें तर जगांत भिल्ल, चांडाल, चोर, चुगलखोर, मनुष्यांचा वध करणारे, गांवें जाळणारे, रस्ता लुटणारे लाखो जीव आहेत. याचप्रमाणें सर्व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र जातींत पापकर्म

पापाशिवाय धन मिळत नाहीं हें म्हणणें खोटें आहे

करणारे जीव मरलेले आहेत. ते सर्व पुरुष–स्त्री–बालकादि हिंसा करण्यास, असत्य भाषण करण्यास, चोरी करण्यास तयार आहेत. त्या सर्वांजवळ धन कां नाहीं ? पण यांतूनही कित्येकांजवळ धन आहे असें दिसून येतें याचें कारण त्यांनीं पूर्वजन्मीं कुपात्रदान दिलें आहे, अथवा कुतपश्चरण करून जें खोटें पुण्य बांधिलें आहे, त्यामुळें त्यांना या जन्मीं धन प्राप्त होत आहे. पुण्यहीन जो असेल त्याला कांहींच प्राप्त होणार नाहीं. पूर्व पुण्याईशिवाय केवळ पापापासून कधींही धनप्राप्ति होत नसते. ज्यांनीं पूर्वी पुण्य केलें असेल त्यांना या जन्मीं चोरी–चुगली केल्याशिवाय देखील संपत्ति प्राप्त होते. ते राजकुलांत जन्म घेतात अथवा कोट्यधिपति सावकाराच्या घरीं जन्मतात. हें सर्व पूर्व पुण्याईचें फल आहे. या खोट्या पुण्यापासून प्राप्त झालेल्या लक्ष्मीचा उपभोग घेणारे शेवटीं नरकतिर्यंच योनींत अनंतकाल भ्रमण करितील.

#### परिग्रहप्रमाण व्रताचे पांच अतिचार

**अतिवाहनातिसंग्रहविस्मयलोभातिभारवहनानि ।**
**परिमितपरिग्रहस्य च विक्षेपाः पञ्च लक्ष्यन्ते ॥ ६२ ॥**

**अर्थ**– अतिवाहन, अतिसंग्रह, विस्मय, लोभ आणि अतिभारवहन हे पांचव्या परिग्रहप्रमाण व्रताचे पांच अतिचार आहेत.

१ उंट, घोडा, बैल इत्यादि तिर्यंचांना व आपल्या दासी–दास सेवकादिकांना अतिलोभाच्या वश होऊन अमर्याद मजल करविणें हा अतिवाहनातिचार म्हणतात.

२ ज्यांची जरूरी पडणार नाहीं अशा वस्तूंचा आपल्या घरांत संग्रह करणें. जसें भोजन-पात्रें, वस्त्रें वगैरे थोडीं असलीं तरी चालेल, अथवा धान्य, औषधि, काष्ठ, पाषाणादि धातू वगैरे थोड्या असल्या तरी चालतील, अशी स्थिति असतांनाही त्या त्या वस्तूंचा विनाकारण फाजील संग्रह करणें हा अतिसंग्रहातिचार म्हणावा.

३ दुसऱ्याची अतुल संपत्ति, पुष्कळ परिग्रह व अनेक देशाच्या वस्तु ज्या कधींही पाहिल्या नाहींत, अशा गोष्टी पाहून अथवा अशा गोष्टींचें वर्णन ऐकून आश्चर्य करणें हा विस्मयातिचार होय.

४ कोणत्याही व्यापारांत, कोणाचीही सेवा करण्यांत, कोणत्याहि कलेंत आपल्या अंतराय कर्माच्या क्षयोपशमाप्रमाणें लाभ झाला असतांही तृप्त न होणें, अथवा तेवढ्यांत संतोष न मानणें हा अतिलोभातिचार म्हणावा.

५ बैल, घोडे वगैरे पशूवर त्यांच्या शक्तीपेक्षां अधिक ओझें लादणें हा अतिभारवाहनातिचार होय.

ज्यांना परिग्रहप्रमाण व्रत धारण करावयाचें असेल त्यांनीं ह्या पांच दोषांचा त्याग करावा. याप्रमाणें गृहस्थांनीं धारण करण्यास योग्य अशीं पांच अणुव्रतें सांगितलीं.

#### अणुव्रतांचें फल

**पंचाणुव्रतनिधयो निरतिक्रमणाः फलन्ति सुरलोकम् ।**
**यत्रावधिरष्टगुणा दिव्यशरीरं च लभ्यन्ते ॥ ६३ ॥**

**अर्थ**– अतिचाररहित पांच अणुव्रतरूपी निधीपासून स्वर्गलोकरूपी फलाची प्राप्ति होते. तेथें अवधिज्ञान आणि अणिमा, महिमा, लघिमा, गरिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्व, वशित्व या आठ ऋद्धि व धातु–उपधातुरहित तेजःपुंज शरीर प्राप्त होतें.

**भावार्थ**– अणुव्रतें धारण करणारा मरणानंतर स्वर्गलोकीं महान् ऋद्धि धारक देव होऊनच जन्मतो. अन्य पर्याय त्याला प्राप्त होत नाहीं असा नियम आहे. त्याठिकाणीं त्याला दिव्य शरीर प्राप्त होऊन असंख्यात वर्षें सुखसंपदेचा यथेच्छ भोग घेतां येतो.

पांच अणुव्रतें धारण करून या लोकीं कोण प्रसिद्ध झाले त्यांचीं नांवें—

अणुव्रतें धारण करणारांचीं नांवें

**मातङ्गो धनदेवश्च वारिषेणस्ततः परः ।**
**नीली जयश्च संप्राप्ताः पूजातिशयमुत्तमम् ॥ ६४ ॥**

**अर्थ**– अहिंसा अणुव्रतांत मातंग नामक चांडाल, सत्य अणुव्रतांत धनदेव नांवचा व्यापारी, अचौर्याणुव्रतांत वारिषेण नामक राजपुत्र, ब्रह्मचर्य व्रतांत नीली नांवाची एका सावकाराची मुलगी आणि परिग्रहप्रमाणव्रतांत जयकुमार, हे जीव व्रताच्या महात्म्यानें जगांत पूजनीय ठरले. व त्याच जन्मांत देवांनींही त्यांचा सन्मान केला. व्रतांच्या प्रभावानें अनेक भव्य जीव या जगांत कीर्तिमान् होऊन देवलोकीं गेले तथापि शास्त्रांत यांचीच कथा प्रसिद्ध आहे.

पंचपापें करून दुःख प्राप्त करून घेणारे

**धनश्रीसत्यघोषौ च तापसारक्षकावपि ।**
**उपाख्येयास्तथा श्मश्रुनवनीतो यथाक्रमम् ॥ ६५ ॥**

**अर्थ**-हिंसेच्या योगानें धनश्री, असत्यानें सत्यघोष, चोरी करण्यानें तापसी चोर, व्यभिचारानें कोतवाल आणि परिग्रहामुळें श्मश्रुनवनीत यांना इहलोकीं तीव्र राजदंड भोगावा लागला व शेवटीं दुर्गतीला जावें लागलें.

अष्टमूलगुण

**मद्यमांसमधुत्यागैः सहाणुव्रतपञ्चकम् ।**
**अष्टौ मूलगुणानाहुर्गृहिणां श्रमणोत्तमाः ॥ ६६ ॥**

**अर्थ**– श्रमणोत्तम म्हणजे गणधर व श्रुतकेवली यांनीं, मद्य, मांस, मधु या तिहींचा त्याग करून पांच अणुव्रतांचें ग्रहण करणें यास गृहस्थांचें आठ मूळगुण म्हटलें आहे.

**विशेषार्थ**– श्रावकानें मूळगुण अवश्य धारण केले पाहिजेत ते असेः–

१ कोणाही त्रस जीवांचा संकल्पपूर्वक घात न करणें, हा अहिंसा नामक पहिला मूळगुण.

२ दुसऱ्याला व स्वतांला दुःख उत्पन्न करणारें, व सत्य–श्रद्धान, ज्ञान व सदाचरणाचे घात करणारें वचन बोलण्याचा त्याग करणें, हा सत्य नांवचा दुसरा मूळगुण.

३ कोणीही दिल्याशिवाय पडलेल्या, टाकलेल्या, विसरलेल्या परधनाचें ग्रहण करण्याचा त्याग, हा अचौर्य नांवचा तिसरा मूळगुण.

४ आपल्या कुलाला योग्य अशा विवाहित स्त्रीशिवाय इतर स्त्रीच्या ठिकाणीं कामभाव उत्पन्न होऊं न देणें, हा ब्रह्मचर्य नांवचा चौथा मूळगुण.

५ न्यायानें उपार्जन केलेल्या द्रव्यादिक परिग्रहांची मर्यादा करून त्याहून अधिक परिग्रह ठेवण्याचा त्याग करणें, हा परिग्रहप्रमाण नांवचा पांचवा मूळगुण.

६ ज्यापासून आपल्या परिणामांत मोह उत्पन्न होऊन हिताहित विचार नाहींसा होतो अशा प्रकारच्या मद्याचा त्याग करणें, हा सहावा मूळगुण.

७ द्वींद्रियादिक जीवांच्या शरीरापासून उत्पन्न होणाऱ्या मांसाचा त्याग करणें, हा सातवा मूळगुण.

८ मधमाशांनीं साठविलेल्या पोळींतून उत्पन्न होणाऱ्या मधाचा त्याग हा आठवा मूळगुण होय. ज्या गृहस्थाचा, पांच प्रकारच्या पापांचा व मद्य, मांस, मधु या तीन्हींचा त्याग करण्याचा पक्का निश्चय असतो, त्यानें गुणरूप महालाचा पाया घातला असें समजावें. अनादि कालापासून संसारपरिभ्रमणाचें कारण मिथ्यात्व, अन्याय व अभक्ष्य यांचा अभाव झाल्यामुळें, अनेक गुणग्रहण करण्याची पात्रता जीवाला प्राप्त होते. म्हणून वरील आठ गुणांचा अंगीकार करणें अवश्य आहे.

व्रताचा पाया

दुसऱ्या कित्येक ग्रंथांत पांच उदुंबर फळें व तीन मकारांचा त्याग करणें यालाही मूळगुण म्हटलें आहे. पांच उदुंबर म्हणजे, उंबर, वड, पिंपळ, पाकर आणि कठुंबर ( अंजीर ). या फळामध्यें पुष्कळसे त्रस जीव प्रत्यक्ष दिसून येतात. म्हणून या फळांचें भक्षण करणें मांसभक्षणासारखें आहे. याशिवाय दुसरींही कित्येक फळें आहेत ज्यांमध्यें बरेच त्रस जीव मेलेले आढळून येतात. अशा प्रकारचीं फळें भक्षण करण्याची इच्छा अहिंसा व्रताची उपेक्षा अथवा जिव्हेंद्रियाची लालसा होय. त्यांतूनही आज्ञानानें तीं वाळवून खाणें लालसेची पराकाष्ठा म्हटली जाते-

पंचोदुंबर फळाचा त्याग

दारु ही मनाला मोह उत्पन्न करणारी व अचेतन करणारी आहे. मनाला मोह पडला म्हणजे धर्माचें विस्मरण होतें. धर्म विसरणारा पुरुष निःशंकपणें हिंसा करण्यास तयार होतो. मनाला उन्मत्त करून स्वस्वरूपाची सावधानता विसरविणारा व विषयामध्यें आसक्ति उत्पन्न करून रसनेंद्रिय व इतर उपस्थ इंद्रियांच्या विषयाच्या ठिकाणीं तीव्र वासना उत्पन्न करणारा जो पदार्थ त्याला मद्य म्हणावें. याप्रमाणें भांग पिणें, अफू खाणें अथवा निशा येईल अशी कोणतीही वस्तु भक्षण करणें, अथवा निशा येणाऱ्या पदार्थांच्या संयोगानें उत्पन्न होणाऱ्या माजूम वगैरे वस्तूंचें भक्षण करणें, यापासून धर्मबुद्धि रहात नाहीं. सदैव अभक्ष्य भक्षणामध्यें अनुरक्त होण्यानें बुद्धीची निर्मलता व परमार्थाचा विचार नाहींसा

मद्यत्याग

होतो. म्हणून जिनेश्वराची आज्ञा पालन करूं इच्छिणारानीं अम्मल ( धुंदी ) उत्पन्न करणाऱ्या सर्व पदार्थांचा अवश्य त्याग करावा. भांगेमध्यें त्रस जीवांची उत्पत्ति फार होते व दारूमध्यें ती अप्रमाण होते. जेवतांना उत्तम कुलांतील पुरुषांच्या दृष्टीस दारूचा थेंब पडतांच ते भोजनाचा त्याग करितात. कदाचित् दारूचा स्पर्श झाला तर स्नान करितात. दारू पिऊन उन्मत्त झालेला पुरुष आईला बायको, बायकोला आई समजून त्याप्रमाणें आचरण करण्यास तयार होतो. भय, ग्लानि, क्रोध, काम, लोभ, हास्य, रति, अरति, शोक हे सर्व दोष हिंसेपासून उत्पन्न होणारे आहेत. पण हे सर्व मद्यपी मनुष्यांतही असतात. त्याअर्थी धर्म ग्रहण व्हावें म्हणून मद्यपानाचा त्याग करणें अवश्य आहे.

मांसत्याग

मांस हे द्वींद्रियादि प्राण्यांचा घात करण्यापासून उत्पन्न होतें. तें प्रत्यक्ष पाहिलें असतां अतिशय घृणा ( चिळस ) उत्पन्न होते. मांसाचा स्पर्श व दुर्गंधी यांच्या नामोच्चारणानेंही परिणामामध्यें भयंकर चिळस उत्पन्न होते. जे धर्माचरणाचा तिरस्कार करण्यामुळें नरकाला जाणारे आहेत व ज्यांचे मनांत दया नसते तेच मांस भक्षण करितात. स्वयं मरण पावलेले बैल, रेडा, हरिण वगैरे पशूंच्या मांसामध्यें अनंत बादर ( स्थूल ) निगोदी जीव व असंख्यात त्रस जीव असतात. त्या सर्वांचा भक्षणामुळें घात होतो. कच्च्या मांसांत व शिजविलेल्या मांसामध्यें देखील अनंत जीव निरंतर उत्पन्न होत असतात. याचप्रमाणें प्रत्येक समयाला त्रस-जातीचे जीव उत्पन्न होत असतात. याकरितां कच्चें, पक्कें अथवा पक्व होत असलेलें किंवा वाळलेलें मांस जो खातो किंवा मांसाच्या पेशींना (तुकड्यांना) स्पर्श करितो, तो मनुष्य निरंतर संचय होत असलेल्या हजारों जीवांचा घात करितो असें समजावें. मांस भक्षण करणाऱ्याला दया नसते, आचार नसतो, त्याचे जाति, कुल, धर्म, दया, क्षमा इत्यादि सर्व गुण नाहींसे होतात, त्यामुळें त्याला दुर्गति ठरलेली. मांस भक्षण करण्यांत धर्म होतो, मांसानें देवता व पितर संतुष्ट होतात, देव मांसभक्षण करणारे आहेत, श्राद्धामध्यें ब्राह्मणांना मांसपिंड भक्षण करविल्यानें देव व पितर तृप्त होतात वगैरे सर्व शास्त्रांत लिहून ठेवणारे महान् पापी व निर्दयी आहेत. मिथ्यादर्शनाच्या प्रभावानें त्यांना अशी बुद्धि होत असते.

मध-त्याग

मध भक्षण करणें हेंही महान् पाप आहे. मधाची उत्पत्ति कशी होते व तो कोण घेऊन येतो ? मध हें मधमाशांचें वमन आहे. तो भिल्ल, चांडाल वगैरे लोक विकण्यासाठीं आणतात. पोळींतून तो काढतांना त्याचा स्वाद ते घेतात. त्यावेळीं त्यांचे उच्छिष्ट त्यांत पडतें यामुळें तो खाण्यास योग्य नव्हे. मधांत नेहमीं अनंत जीव उत्पन्न होत असतात. मधमाशांची पोळी पिळून मध काढलें जातें. अशाप्रकारच्या मधाला पवित्र मानून त्याला पंचामृत म्हणणें व तें शुद्ध आहे असें म्हणणें यापेक्षां शब्दविपर्यास सांपडणें कठिण ! मधाचा एक बिंदु जर कोणी औषधाकरितां ग्रहण करील, अथवा रोग दूर होण्याकरितां भक्षण करील, तर त्याला नरकांतील भयंकर दुःख भोगावें लागून असंख्यात नव्हे पण

अनंत जन्म रोगप्राप्ति होते. मद्य, मांस, मध व लोणी ह्या चार महान् विकृति आहेत असें परमागमांत म्हटलें आहे. म्हणून जिनधर्म ग्रहण करूं इच्छिणारांनीं या चोहोंचा त्याग केला पाहिजे. त्याशिवाय धर्माचरण करण्याची पात्रता येत नाहीं.

धर्म हा अहिंसारूप आहे अशी जिनेश्वराची आज्ञा वरचेवर श्रवण करीत असूनही, ज्यांना स्थावर हिंसेचा त्याग करवत नाहीं, त्यांनीं त्रस हिंसेचा तरी निदान त्याग करावयास पाहिजे.

**त्रसहिंसा-त्याग**

हिंसेचा त्याग नऊ प्रकारांनीं करितां येतो. मनानें जे हिंसा करीत नाहींत, करवीत नाहींत, करणाऱ्यास अनुमोदन देत नाहींत; वचनानें हिंसा करा म्हणून कोणास सांगत नाहींत, सांगवीत नाहींत, व सांगणाऱ्यास अनुमोदन देत नाहींत, व शरीरानें हिंसा करीत नाहींत, करवीत नाहींत, अथवा करणाऱ्यास प्रोत्साहन देत नाहींत. याप्रमाणें मनवचनकायेच्या व कृतकारित अनुमोदनाच्या योगानें हिंसेचा त्याग करावा. अशा प्रकारानें ज्याला त्याग करिता येतो त्याचा तो औत्सर्गिक म्हणजे उत्कृष्ट त्याग आहे. या नऊ प्रकाराशिवाय जो त्याग आहे त्याला आपवादिक त्याग म्हणतात. त्याचे अनेक प्रकार आहेत. अहिंसा धर्म मोक्षाला कारण व संपूर्ण संसार परिभ्रमणाचें दुःखरूपी रोग मिटविण्यास अमृतासारखा आहे. तो प्राप्त झाला असूनही अज्ञानी अशा मिथ्यादृष्टि लोकांचें अयोग्य आचरण पाहून आपण सद्सद्विचार सोडूं नये. संसारांत कर्माच्या प्रेरणेमुळें वेगवेगळे विचार धारण करणारे जीव दिसून येतात. कित्येक हिंसा करणारे, कित्येक अभक्ष्य भक्षण करणारे, कित्येक क्रोधी, मानी, मायावी, लोभी, महाआरंभी, महापरिग्रही, अन्यायमार्गी आहेत. त्या सर्वांची वेगवेगळीं कृत्यें पाहून आपण आपलें चित्त बिघडूं देऊं नये. मिथ्यात्व कर्माच्या उदयानें त्यांना आपण कोण याचा विसर पडला आहे. म्हणून आपण त्यांजविषयीं मनांत तटस्थवृत्ति ठेवावी. जिनप्रतिपादित धर्म सूक्ष्म आहे त्याचें रहस्य न समजून घेतां धर्माकरितां हिंसा घडल्यास त्यांत दोष नाहीं, असें कोणी म्हटलें म्हणून आपण हिंसा करण्यास उद्युक्त होऊं नये.

**देव–देवतेकरितां हिंसा करूं नये**

देव–गुरु किंवा इतर कोणाही करितां केलेल्या हिंसेपासून पुण्य उत्पन्न होणार नसून पापच उत्पन्न होणार. धर्म म्हणजे सर्व प्राणिमात्रांवर दया. जर देवगुरूच्या कार्यानिमित्त हिंसेंत धर्म होतो असें मानलें तर 'हिंसा हा धर्म नव्हे' हें जिनवाक्य असत्य ठरेल. हिंसेपासून धर्म होतो अशा विपरीत समजुतीनें प्राण्यांची हिंसा करणें योग्य नाहीं. कात्यायनी, चंडिका, भवानी, दुर्गा, पार्वती वगैरे नावांनीं प्रसिद्ध असलेल्या देवींना बकरा, रेडा वगैरे बळी दिल्यानें त्या प्रसन्न होतात म्हणून हिंसा घडल्यास त्यांत दोष नाहीं. अशा मिथ्यादृष्टीच्या भाषणाला भुलून आपण आपल्या "अहिंसा परमो धर्मः" या तत्त्वापासून पराङ्मुख होऊं नये. जर देवीला मांस भक्षण करावें असें वाटत असेल तर ती स्वतः आपल्या हातांत शस्त्र घेऊन भयंकर रूप धारण करून उभी राहिलेली आहे. तिला स्वतःला वाटेल त्या जीवाचा वध करून मांस भक्षण करितां येत नाहीं काय ? जर येत असेल तर ती याप्रमाणें करून मांस भक्षण कां करीत

नाहीं ? आपल्याच भक्तांकडून दीन-अनाथ व भयभीत जीवांना कां मारविते ? आपण स्वतःच सिंह-वाघ वगैरे भयंकर प्राण्यांना मारून कां खात नाहीं ? हें असो. आपण स्वतः देवता म्हणजे मोठी शक्ति धारण करणारी व्यक्ति समजून कावळा, कुतरा, भिल्ल, चांडालाप्रमाणें क्षुधाव्याकुल बनून मांस भक्षणाची इच्छा करिते त्याअर्थी ती देवता कशी म्हणावी ? जी स्वतःच दुःखी व मांस भक्षणांत आसक्त झालेली ती आपल्या भक्तांना तरी कशी सुखी करणार ? अतिशय दुर्गंधीनें भरलेल्या तिर्यंचाच्या मांसाची इच्छा करणाऱ्या महापापी जीवाला देवपणा कसा असूं शकेल याचा थोडा तरी विचार आपल्या मनाशीं करावा. पापी लोकांनीं खोटीं शास्त्रें रचून, आपण स्वतः मांस भक्षण करावें व मूढ लोकांनींही देवाचा प्रसाद म्हणून मांस खाण्यास प्रवृत्त व्हावें म्हणून हा सगळा व्यूह रचिलेला आहे. याप्रमाणें भोळ्या लोकांना या धूर्त व स्वतःचीं इंद्रियें पुष्ट करूं इच्छिणाऱ्या लोकांनीं विनाकारण नरकांच्या मार्गाकडे नेलें आहे. भगवान्

**भवनवासी देव कवलाहारी नाहींत**

जिनेश्वराच्या परमागमांत भवनवासी, व्यन्तर ज्योतिष आणि कल्पवासी चार प्रकारचे देव मुळीं कवलाहार ( आपणासारखा आहार ) घेत नाहींत. ते मानसिक आहार घेत असतात, असें सांगितलें आहे. त्यांना क्षुधेची इच्छा झाली तर त्यांच्या कंठांत अमृत झरूं लागतें व त्यामुळें त्यांना लवमात्रही क्षुधेची वेदना रहात नाहीं. देवांचें शरीर वैक्रियिक असून ते सप्तधातु-रहित असतें. अशा देवांना मांसभक्षक म्हणणें हें विपरीत बुद्धिचें लक्षण आहे. जर देव मांसभक्षक आहेत असें मानलें तर कुतरा, गिधाड वगैरे पशूपेक्षांही त्यांची पायरी हलकी ठरेल. म्हणून देव-देवतेकरिता हिंसा करणें योग्य नाहीं.

**मांस-भक्षक गुरू नव्हे**

आतां कोणी मांसभक्षी गुरु असला तरी त्याला मांसाचें दान करूं नये. जो पापी मांसादिक अभक्ष्य भक्षण करितो, दारू पितो तो गुरू कसचा ? तो मांसभक्षण करवून नरकाला पोंचविणारा गुरू झाला. अशा गुरूला स्पर्श केल्यानें अथवा पाहण्यानें देखील भयंकर पापाचा बंध होईल.

**शंका**— कोणी म्हणेल कीं, आपण अन्न भक्षण करितों यांत हजारों जीवाचा घात होतो त्यापेक्षां एका जीवाला मारून खाणें बरें नव्हे कां ?

**समाधान**-एकेंद्रिय प्रत्येक वनस्पति, पृथ्वी, जल अग्नि, पवन हे सर्व त्रैलोक्यांत भरलेले आहेत. ते सर्व व विकलत्रय, देव, मनुष्य, तिर्यंच यांना एकत्र करून गणना केली असतां ते असंख्यात-प्रमाण भरतील. पण मनुष्य तिर्यंचांच्या मांसाच्या एका कणांत इतके बादर निगोदी जीव भरलेले आहेत कीं, त्रैलोक्यांतील वरील सर्व प्राणी, एकेंद्रियापासून पंचेंद्रिय, मनुष्य, देव, नारकी हे जरी एकत्र केले तरी त्याहून अनंतपटीनें जास्त भरतील असें सर्वज्ञांनीं प्रत्यक्ष ज्ञानानें अवलोकन करून परमागमांत म्हटलें आहे. अन्न-पाणी हें असंख्यात वर्षपर्यंत भक्षण करीत असतां त्यांत जी एकेंद्रियाची हिंसा होते त्याहून अनंतपटीनें अधिक हिंसा सूईच्या अग्राइतकें मांसभक्षण केल्यानें होतें. एकेंद्रियांची हिंसा आणि त्रसजीवांची हिंसा हीं दोन्ही सारखी नाहींत. यांच्या दुःखांत व

ज्ञानांत फार मोठें अंतर आहे. एकेंद्रियाचें शरीर रस, रक्त, हाडमांस, चर्मादिक धातूंनीं बनलेलें नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, मांसभक्षण करण्यामध्यें जितके परिणाम कठोर अथवा निर्दय होतात तितके अन्नभक्षण करण्यांत होत नाहींत. आपल्या स्त्रीला स्पर्श करण्यांत व आई-बहिणीला स्पर्श करण्यांत परिणामामध्यें जसें मोठें अंतर असतें तद्वत् मांसभक्षण करण्यांत व अन्नभक्षण करण्यांत आहे. सारांश, त्रस जीवांचा घात करण्यांत घोर पातकाचा बंध होतो.

**शंका**– सिंह, वाघ, सर्प वगैरे जे दुष्ट व घात करणारे प्राणी आहेत त्यांचा घात केल्यानें अनेक जीवांचें रक्षण होणार आहे, म्हणून त्यांना मारण्यांत काय दोष आहे ?

**समाधान** - वरील समजुतीप्रमाणें कोणत्याही प्राण्याची हिंसा करणें पाप आहे, म्हणून हिंसा करण्यास प्रवृत्त होऊं नये. विचार करा. तुम्ही कोणकोणत्या हिंसक प्राण्यांचा घात कराल हें सांगा पाहूं. चिमणी, कावळा, पोपट, मैना, तितर हे सर्व पक्षी हिंसक आहेत. सर्प, विंचू, मुंगी, अळी, उंदीर, कुत्रीं, मांजर, कोल्हा वगैरे सर्व तिर्यंच व मनुष्य देखील आपापल्या पापकर्माच्या उदयामुळें हिंसकच आहेत. या पैकीं तुम्ही किती जणाला मारूं शकाल ? दुसरें असें कीं तुम्ही हिंसक जीवांना मारण्याचा विचार मनांत आणला त्याअर्थी तुम्ही सर्व हिंसक प्राण्यांचा घात करणारे म्हणून महा हिंसक बनला नाहीं काय ? मग तुमच्या इतका पापी कोण राहिला ? या करितां हिंसक जीवांची हिंसा करावी असा विचार तुम्ही मनांत आणूं नका. यापेक्षां थोडा अधिक विचार केला असतां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, जीवांना हिंसक कोणी बनविलें ? याचें उत्तर असें येतें कीं, सर्व जीव पूर्वीं उपार्जन केलेल्या कर्मांच्या स्वाधीन आहेत. पापाची परंपरा अनंत कालापासून चालत आली आहे ती कोण दूर करूं शकणार ? पापी जीव कोणी केले व पुण्यवान् तरी कोणी केले ? ही सर्व कर्माची विचित्रता आहे. कालाच्या प्रभावानें पापी जीवांना पापाचें फल देण्याकरितां अनेक पापी जीव उत्पन्न होतात. त्यांना नाहींसे करण्याचें कोणांतही सामर्थ्य नाहीं. या सर्व गोष्टींचा विचार करून दया धारण करण्याचा प्रयत्न करावा. मनांत असा विचार येऊं देऊं नये कीं, हा पापी जीव फार दिवस जगेल तर पापाचा बंध करील, त्यापेक्षां याला या पर्यायांतून मुक्त केलें तर निदान त्याला पुष्कळ पापाचा बंध तरी होणार नाहीं, अशी करुणा करून पापी जीवाला मारण्यास उद्युक्त होऊं नका. तुम्ही सर्वांवर दयाच ठेवा.

हा जीव दुःखानें फार व्याकुळ झाला आहे, आतां मरेल तर या दुःखापासून तरी सुटेल, असा मिथ्याविचारही तुम्ही मनांत आणूं नका. जरी तो मरण पावला तरी त्याचा येथील वर्तमान पर्याय सुटला एवढेंच झालें. त्याचें असाता कर्म तर नाहींसें झालें नाहीं ना ? येथून सुटून अन्य तिर्यंच मनुष्यादिकांचा पर्याय त्याला प्राप्त होतो. त्या ठिकाणीं यापेक्षां अनंतपट रोग, दारिद्र्य प्राप्त होऊन पुष्कळ काल दुःख भोगावें लागणार आहे. फार काय सांगावें, जरी कदाचित् सूर्य पश्चिमेस उगवला, अग्नि शीतल झाला, चंद्राचे किरण उष्ण झाले, ही पृथ्वी पालथी

वेदनापीडित जीव मारण्यानें दुःखमुक्त होत नाहीं

उलथी झाली, पाषाण पाण्यांत तरंगु लागले, अग्निमध्यें कमलाची उत्पत्ति झाली, सूर्याचा अस्त होण्याच्या समयीं जरी दिवस उगवूं लागला, सर्पाच्या मुखांतून अमृत वाहूं लागलें, कलहापासून कीर्ति होऊं लागली, अजीर्णापासून रोग नाहींसे होऊं लागले, कालकूट विष भक्षण करण्यापासून आयुष्य वाढूं लागलें, विवादापासून प्रीति वाढली, या व अशाच कल्पांतींही न घडून येणाऱ्या गोष्टी जरी घडून आल्या तरी हिंसेपासून धर्म हा कधींही, कोणत्याहि देशांत उत्पन्न झाला नाहीं व होणार नाहीं, हें पक्कें लक्ष्यांत ठेवावें.

अकल्पित गोष्टी कदाचित् घडून येतील पण हिंसा हा धर्म होऊं शकणार नाहीं.

**शंका**– यावर कोणी शंका करितो कीं, जे गृहस्थ जिनमंदिर बांधवितात, जिनपूजा करितात त्यांनाही त्या क्रिया करण्यांत आरंभ होतो असें आपणांस कबूल करावें लागेल. व जेथें आरंभ आला तेथें हिंसा ही सुरूं झालीच. मग तुम्ही जिनमंदिरादिक कार्यें करविण्यांत धर्म घडतो असें कसें प्रतिपादन करितां ?

**समाधान**– याचें उत्तर असें कीं ज्या गृहस्थाला आरंभादिकांचा त्याग असेल व ज्याचे परिणामांत वैराग्य उत्पन्न झाल्यानें धनोपार्जनादिक कार्यापासून जो विरक्त झाला असेल त्यानें मंदिरादिकांचा आरंभ करणें योग्य नाहीं हें आम्हांस ही कबूल आहे. पण अद्यापि ज्याचें प्रेम धन, परिग्रह आरंभादिकांवरून कमी झालें नाहीं. ज्याचा अभिमान अद्भून नाहींसा झाला नाहीं, आपल्या जातिकुलादिकामध्यें उच्चता प्राप्त होण्याकरितां, कीर्तिसाठीं व उपभोग घेतां यावा म्हणून अनेक प्रकारच्या हवेल्या, महाल, चित्रशाला वगैरे बांधविण्यांत व बागबगीचे बनविण्यांत व आपणांस विहार करण्याची रम्य स्थानें करविण्यांत व आपल्या मुलामुलींचीं विवाहादि कार्यें करण्यांत तो अतोनात द्रव्य खर्च करीत आहे. याचप्रमाणें जो नेहमी आपल्या जातीला, कुलांतील लोकांना व नगरवासी लोकांना मेजवान्या देण्यांत पुष्कळ खर्च करितो, त्याला कोणी धर्मात्मा पुरुषानें पुढील उपदेश केला, “अहो तुमची प्रीति आरंभादिकावरून कमी होत नाहीं व ज्याअर्थीं ह्या पासून केवळ पापबंध होतो, अभिमान वाढतो त्याअर्थीं याचा त्याग करून तुम्ही एखादें जिनमंदिर बांधविण्याचा आरंभ करा. त्याच्या प्रभावानें तुमचा अशुभ राग कमी होऊन तुमचे परिणाम वीतरागतेच्या सन्मुख होतील व अहिंसा धर्माकडे मनाची प्रवृत्ति वरचेवर वाढत जाईल. जिनमंदिरांत, अनेक जीव स्वाध्याय करून, शास्त्र श्रवण करून, वीतराग प्रभूचें दर्शन घेऊन, षोडशकारण भावनांच्या चिंतनानें पापाचार सोडतील व शील, संयम, ध्यान वगैरे कार्यें करून धर्माची वृद्धि करितील. जिनमंदिर हें अहिंसा धर्माचें आयतन ( स्थान ) आहे. जिनमंदिराच्या निमित्तानें अनेक जीव पापक्रिया सोडून त्या ठिकाणीं येतात, शास्त्रश्रवण करितात व त्यामुळें त्यांना आपण कोण, पर कोण याचें ज्ञान प्राप्त होतें. यामुळें मिथ्यादेव, मिथ्यागुरु, मिथ्याधर्माची उपासना सोडून सर्वज्ञ वीतरागाच्या धर्माकडे त्यांची प्रवृत्ति होते. हिंसादि पंचपापापासून, सप्त व्यसनापासून, अन्याया

जिनमंदिर बांधविण्यांत पुण्यसंचय होतो

पासून, अभक्ष्य भक्षणापासून विरक्तता प्राप्त होऊन, वीतराग भगवंताच्या ध्यानामध्यें, पूजेमध्यें, कायोत्सर्गांत, सामायिक, संयम, उपवास, शील, दान, व्रतप्रभावनादिक कार्यांत तल्लीनता प्राप्त होऊन मोक्षमार्गाकडे प्रवृत्ति होते. जिनमंदिराचें निमित्त असल्याशिवाय मोक्षमार्गाची प्रवृत्ति होऊं शकणार नाहीं. ज्या पुरुषानें जिनमंदिर बनविलें त्यानें पुष्कळ जीवांवर उपकार केला, एवढेंच नव्हें पण आपणा स्वतःवरही पुष्कळ उपकार करून घेतला आहे. कारण देऊळ बांधविणारा असा विचार करीत असतो कीं, "मी आतां जिनमंदिर बांधविलें आहे, आतां जर अन्याय्य मार्गानें वागेन तर जगांत लोक माझी निंदा करितील. आतां मी खोटें कसें बोलूं? अभक्ष्य भक्षण कसें करूं? व्यसनप्रवृत्ति कशी ठेऊं?" कलह करणें, शिवीगाळ करणें व लोकनिंद्य कर्म करणें योग्य नाहीं. या गोष्टी लोकलज्जेनें नाहींशा होतातच. पण त्याला असा विचार उत्पन्न होतो कीं, "या मंदिरांत मी स्वतःच नित्यशः येणार नाहीं तर इतर कोण येईल?" म्हणून तो मंदिरांत येऊं लागतो व नित्य अभिषेक, पूजन, शास्त्रश्रवण, जपजाप्य, व्रत आचरण, भजनादिक क्रिया करूं लागतो. त्यामुळें त्याची धर्मावरील श्रद्धा दृढ होत जाऊन, शास्त्र वांचणाऱ्या, श्रवण करणाऱ्या, धर्मावर प्रीति करणाऱ्या इतर सहधर्मी लोकांवर व सिद्धांताची चर्चा करणाऱ्या विद्वानांवर त्याचें प्रेम वाढत जातें. कोणी शास्त्र वाचतांना पाहून त्याला आनंद उत्पन्न होतो. आज देवळांत कोणाची पूजा आहे, आज दर्शनाकरितां कोण कोण आले होते, आज धर्मव्याख्यान ऐकण्यास कोण कोण बसले होते, आज कोणाकोणाला उपोषणें आहेत, या वर्षी बेलें तेलें (दोन, तीन उपवास) कोणी कोणी केलें, प्रोषधोपवास करणारे किती आहेत, जागरण करण्यास किती लोक मंदिरांत आले होते वगैरे गोष्टी सर्व दिवस त्याच्या मनांत घोळत असतात. आज देवळांत भजन, गायन फार गोड झालें त्यामुळें फार आनंद झाला. या व अशाच प्रकारच्या धर्माच्या अनेक प्रवृत्ति पाहून त्याचा आनंद दिवसेंदिवस वाढतो. सर्व सहधर्मी लोकांवर त्याचें वात्सल्य (प्रेम) प्रतिदिवशीं वाढत जातें. हजारों लोकांमध्यें त्याचा प्रभाव जसजसा प्रगट होत जातो, त्या त्या मानानें त्याचा धर्मानुरागही वाढत जातो. तसेंच गृहस्थाश्रमांतील विवाहकार्यामध्यें, अनेक प्रकारचीं मौल्यवान् वस्त्राभरणें करविण्यामध्यें, आपल्या राहण्याच्या जागेमध्यें, घरेदारें बनविण्यामध्यें, अनेक प्रकारचीं चित्रें काढून आपलें घर चित्रविचित्र रंगानें सुशोभित करण्यामध्यें वगैरे पापकार्यामध्यें त्याची प्रवृत्ति कमी होत जाते. तो मग विचार करूं लागतो कीं, "या घरादारादिकांना घेऊन काय करावयाचें आहे? हीं कोणाला दाखवावयाचीं आहेत? हीं सर्व पापाचीं कारणें असून निंद्य आहेत, अशी विरक्तता त्याला उत्पन्न होते." आपण केलेल्या अनेक पापकर्माबद्दल त्याचें मनांत पश्चात्ताप उत्पन्न होतो. एवढें धन जर मी मंदिरांत लावीन तर पुष्कळ जीवांचा धर्मावर अनुराग वाढेल. अशा विचारानें तो आपलें द्रव्य मंदिरांत सिंहासन, छत्र, चामर, भामंडल, घंटा, स्थापना, कलश, पितळ्या, तबक, झारी, धूपावली, समवसरण इत्यादि चांदी सोन्याचीं अथवा पितळेचीं उपकरणें तयार करविण्याकडे खर्चूं लागतो. यामुळें त्याचा व धर्माचा

मंदिर निर्माण करणाऱ्याची भावना

जीवांचा धर्मावर अनुराग वाढतो. चांदवे, पडदे, वगैरे सामानामुळें धर्मसेवन करणाऱ्या गृहस्थाला उपयोग होतो. जिनमंदिरांत द्रव्य खर्च केल्यानें जशी कीर्ति होते तशी लग्नाकार्यांत खर्च केल्यानें होत नाहीं. सारांश मंदिर बांधविलें म्हणजे सर्व लोक पूजाप्रभावना, दर्शन, धर्मश्रवण करून महान् पुण्यसंपादन करितात. याप्रमाणें केवळ व्यवहारोन्मुखी जीवानें जर मंदिर बांधविलें तर वर वर्णि-ल्याप्रमाणें चिंतन झाल्यानें त्याचे परिणाम सुधरतात व त्याचें कल्याण होतें.

**शंका**– देऊळ बांधवून त्यांत उपकरणें ठेवल्यानें अन्य जीवांवर उपकार होतो हें खरें. पण तें देऊळ बांधवितांना षट्काय जीवांची धर्माचा घात करणारी हिंसा घडते त्याची काय वाट ?

**समाधान**– हिंसा ही आपले मनांत इतरांचा घात करण्याचे विचार आले तरच होते. देऊळ बांधविण्यांत आपण कोणाची हिंसा करावी असे परिणाम करीत नाहीं. उलट अहिंसा धर्मा-कडे आपलें व लोकांचें लक्ष्य लागावें अशीच आपली इच्छा असते. जशी यत्नाचारपूर्वक मुनीश्वरांना आहार देणाऱ्या गृहस्थाला हिंसा घडत नाहीं; अथवा साधूंचें दर्शन घेण्याकरितां किंवा धर्मश्रवण करण्याकरितां जात असणाऱ्या गृहस्थाला हिंसा घडत नाहीं; अथवा आपल्या पुढील साडेतीन हात प्रमाण जमिनीकडे पाहून मोठ्या सावधगिरीनें गमन करणाऱ्या मुनीश्वरांना हिंसा घडत नाहीं; अथवा नित्य धर्मोपदेश करणाऱ्या व धर्मकार्याकरितां गमन, शयन, आहार, नीहार, वंदना, कायोत्सर्ग वगैरे क्रिया करित असणाऱ्या, तीर्थवंदना अथवा गुरुवंदनेकरितां जाणाऱ्या मुनींना या सर्व कार्यामध्यें जीवांची विराधना होत असूनही हिंसा घडत नाहीं, त्याप्रमाणेंच देऊळ बांधविणा-ऱ्याचे परिणाम धर्ममय असल्यानें त्यांत हिंसेचा दोष येत नाहीं. संपूर्ण आकाश व जमीन हीं सूक्ष्म जीवांनीं भरलेली आहे. या ठिकाणीं जो रागद्वेषाच्या अधीन होऊन दयाभाव मनांत न ठेवतां वागेल त्यास, जीव प्रत्यक्ष त्याकडून मरो वा न मरो, हिंसा घडतेच. हिंसाभाव व अहिंसाभाव हे जीवाचे परिणाम आहेत, ते बाह्य जीवांच्या घात आघाताच्या स्वाधीन नाहींत. बाह्य जीवांच्या हिंसेनेंच हिंसा घडते असें नाहीं. ती आपापल्या परिणामाप्रमाणें घडत असते म्हणून आपले परिणाम नेहमीं दयार्द्र व निर्मळ ठेवले पाहिजेत. याविषयीं पूर्वी अहिंसा अणुव्रताचें वर्णन करितांना पुष्कळ लिहिलें आहे. या ठिकाणीं आपणांस देऊळ बांधविणाऱ्याच्या परिणामाविषयीं विचार करणें आहे. ज्याला घर दार, बंगले, बाग-बगीचे, विहिरी वगैरे करविण्यांत आपल्याकडून अतिशय हिंसा घडतें असें वाटतें व ज्याचा लोभ कमी झाल्यानें धनावरील प्रेम नाहींसें झालें आहे व ज्याला पापाचें भय वाटूं लागलें आहे तोच मनुष्य देऊळ बांधविण्यास तयार होतो. प्रथमतः गृहस्थाश्रमांत व्यापारादिक कार्यामध्यें तल्लीन असल्यानें त्याला त्यावेळीं धर्माची आठवण होत नव्हती. आतां त्याचे परिणाम धर्मकार्याकडे वळले आहेत. तो जरी देवळाचें काम चालवीत असला तरी वरचेवर कामावरील माणसांना सांगत असतो कीं, " बाबानो, हें धर्माचें काम आहे. मोठ्या सावधानतेनें करा. तुम्हांस लागणारे पाणी दुहेरी वस्त्रानें गाळून घ्या. कळीचा चुना वगैरे दोन दिवसापेक्षां जास्त दिवस ठेवण्या इतका तयार करूं नका. तुम्हास ज्या वस्तु इकडून तिकडे उचलून ठेवावयाच्या असतील त्या दिवसाच ठेवीत

जा व प्रत्येक वेळीं प्रत्येक कार्य करण्यांत तुमच्या हातून कोणाही जीवाची विराधना होणार नाहीं याची काळजी घ्या." या प्रमाणें तो गृहस्थ वरचेवर सांगत असल्यानें त्याचे परिणाम तें कार्य करविण्यांत हिंसा करण्याचें नसतात हें उघड होतें. त्याचे परिणाम, हें कार्य करविण्यानें धर्माचें स्थान तें बनेल व याच्या निमित्तानें अखंड अहिंसा धर्माची प्रवृत्ति वाढेल असेच असतात. मंदिर हें धर्माचें महान् आयतन आहे. या ठिकाणीं गृहसंबंधीं अनेक हिंसेचीं पापकार्यें नाहींशी होण्यानें परिणामाची अवस्था बदलून जाते. देवळांत पाय ठेवतांच ईर्यापथ-समिति पाळून चाला. हें मंदिर आहे, यांत कोणाचीहि विराधना न होवो असा विचार मनांत आणा. देवळांत प्रवेश केल्यानंतर जैन असेल त्यानें भोजनाचा त्याग, पाणी पिण्याचा त्याग, विकथेचा ( स्त्रीकथा, राजकथा, चौरकथा, भोजनकथेचा) त्याग, शिवीगाळींचा त्याग, शयनाचा त्याग, वारा घेण्याचा त्याग व व्यापाराचा त्याग करावा. या शिवाय पापबंधाचीं जीं कारणें असतील त्या सर्वांचा त्याग केला पाहिजे. कारण जिन-मंदिर हें सर्व प्रकारें अहिंसा धर्माचें प्रवर्तक आहे. त्या ठिकाणीं आरंभ विषयकषायांचा उद्रेक होईल अशा क्रिया करूं नये.

याप्रमाणें मद्यमांसमधुत्यागरूप मूळगुणाचें वर्णन करून पुढें गुणव्रताचें स्वरूप सांगतात.

गुणव्रताचें लक्षण

**दिग्व्रतमनर्थदण्डव्रतं च भोगोपभोगपरिमाणम् ।**
**अनुबृंहणाद्गुणानामाख्यान्ति गुणव्रतान्यार्याः ॥ ६७**

**अर्थ**— भगवान् गणधर देवांनीं दिग्व्रत, अनर्थदंडव्रत, आणि भोगोपभोग-परिमाण या तीन व्रतांना गुणव्रत म्हटलें आहे. हीं तीन व्रतें अणुव्रताला गुणाकार-रूपानें वाढविणारीं आहेत म्हणून यांना गुणव्रत अशी संज्ञा आहे.

१ दहा दिशांना जाण्याची मर्यादा ठरविणें याला दिग्व्रत म्हणतात.

२ ज्यापासून कोणतीहि कार्यसिद्धि होत नाहीं पण पापाचा मात्र बंध होत राहतो, त्यामुळें विनाकारण दुःख भोगावें लागतें, अशा कार्याला अनर्थदंड म्हणतात.

३ एक वेळां ज्याचा उपभोग घेतां येतो त्यास भोग, व वरचेवर ज्याचा उपभोग घेतां येतो त्यास उपभोग म्हणतात. या भोगोपभोगांची मर्यादा करणें यास भोगोपभोगपरिमाण व्रत म्हणतात.

दिग्व्रताचें लक्षण

**दिग्वलयं परिगणितं कृत्वातोऽहं बहिर्न यास्यामि ।**
**इति संकल्पो दिग्व्रतमामृत्यणुपापविनिवृत्त्यै ॥ ६८ ॥**

**अर्थ**— दाही दिशांचें प्रमाण करून त्या बाहेर आपण जाणार नाहीं. मर्यादित क्षेत्राबाहेरील थोडें देखील पाप लागूं नये म्हणून मरणापर्यंत दिशांचा संकल्प करणें याला दिग्व्रत म्हणतात.

**विशेषार्थ**- गृहस्थानें अगोदर अमुक दिशेला आपणाला अमुक मर्यादेपेक्षां अधिक क्षेत्रांत जाऊन व्यापार धंदा करण्याचें कारण पडणार नाहीं व अमुक दिशेला अमुक क्षेत्राशिवाय इतर ठिकाणीं व्यवहार करावयाचा कीं नाहीं याचा आपल्या मनाशीं विचार करावा. नंतर लोभ नाहींसा व्हावा व अहिंसाधर्माची वृद्धि व्हावी म्हणून आपल्या मरण अवस्थेपर्यंत दहा दिशांची मर्यादा करून त्या बाहेर जाण्याचा अथवा त्या क्षेत्रांतून कोणास बोलविण्याचा, वस्तु पाठविण्याचा अथवा मागविण्याचा त्याग करावा. अशा तऱ्हेनें लोभ जिंकणें यास दिग्व्रत म्हटलें आहे.

दाही दिशांला असणाऱ्या कोणकोणत्या देशाशीं आपण व्यवहार करूं शकूं याचा गृहस्थानें विचार करून त्यांतून ज्या दिशेंतील क्षेत्राशीं आपला विशेषसंबंध येईल अथवा जितक्या देशाशीं संबंध ठेवावयाचा असेल त्याचा विचार करून मर्यादा बांधावी व तदितर देश अथवा क्षेत्राच्या बाहेरील प्रदेशांत व क्षेत्रांत व्यवहार करणार नाहीं असा नियम करावा. म्हणजे नियमित क्षेत्राबाहेरील क्षेत्रांतून निष्कारण होणारा पापबंध टळतो. हा नियम अपरिमित लोभाला आळा घालण्यासाठीं करणें योग्य आहे.

दिशांची मर्यादा

**मकराकरसरिदटवीगिरिजनपदयोजनानि मर्यादाः ।**
**प्राहुर्दिशां दशानां प्रतिसंहारे प्रसिद्धानि ॥ ६९ ॥**

**अर्थ**-दहा दिशांचें प्रमाण करितांना, समुद्र, नदी, वन, पर्वत, देश आणि योजन या ज्या लोकप्रसिद्ध मर्यादा आहेत त्याबाहेर न जाण्याचा नियम करावा.

दिशांच्या मर्यादेपासून फायदे

**अवधेर्बहिरणुपापं प्रतिविरतेर्दिग्व्रतानि धारयताम् ।**
**पंचमहाव्रतपरिणतिमणुव्रतानि प्रपद्यन्ते ॥ ७० ॥**

**अर्थ**- दिग्व्रत धारण करणाऱ्यांना मर्यादा केलेल्या प्रदेशाबाहेरचें थोडेंही पाप घडत नाहीं, म्हणून त्यांचीं अणुव्रतें महाव्रतांसारखीं होतात.

**भावार्थ**-ज्या गृहस्थानें दाही दिशांची मर्यादा केली आहे त्याला त्या प्रदेशांत अणुव्रत असतेंच. पण मर्यादेच्या बाहेरील प्रदेशांत घडणाऱ्या त्रसस्थावर हिंसादि पंच पापांचा त्याग झाल्यानें त्याचीं तीं अणुव्रतें महाव्रतांसारखीं होतात.

मर्यादेच्या बाहेरचीं अणुव्रतें महाव्रतांसारखीं असतात असें कां म्हणतात ? मर्यादेच्या बाहेर त्याला मुळींच हिंसा घडत नसल्यानें तो साक्षात् महाव्रती आहे असें कां म्हणूं नये ? याचें समाधान करण्याकरितां सूत्र सांगतात.

**प्रत्याख्यानतनुत्वान्मन्दतराश्चरणमोहपरिणामाः ।**
**सत्त्वेन दुरवधारा महाव्रताय प्रकल्प्यन्ते ॥ ७१ ॥**

**अर्थ**— अणुव्रती गृहस्थाला सकलसंयम होऊं देण्यास विरोध करणाऱ्या प्रत्याख्यानावरण कर्माचा उदय मंद असतो, त्यामुळें चारित्रमोहाचे परिणाम मंदतर म्हणजे अधिक मंद असतात, व ते " सत्त्वेन दुरवधार " आहेत, म्हणजे अतिमंदत्वामुळें त्यांच्या अस्तित्वाची जाणीव होत नाहीं, म्हणून अशा गृहस्थाविषयीं महाव्रतांची कल्पना केली जाते.

**भावार्थ**— चरित्रमोहनीय कर्माच्या उदयाचे परिणाम जेव्हां संज्वलन कषायरूप होतात तेव्हां महाव्रत घडतें. देशव्रती गृहस्थाला प्रत्याख्यानावरण कर्माचा उदय विद्यमान असला तरी संज्वलन कषायपरिणाम मंद होऊं शकत नाहींत, म्हणून गृहस्थावस्थेंत संपूर्ण पापाचा त्याग केला तरी तें महाव्रत होऊं शकत नाहीं. त्याचे ठिकाणीं फक्त महाव्रताची कल्पनाच करावीं लागते. महाव्रतें हीं प्रत्याख्यानावरण कषायांचा अभाव झाल्यानेंच होत असतात.

महाव्रताची उत्पत्ति

**पंचानां पापानां हिंसादीनां मनोवचःकायैः ।**
**कृतकारितानुमोदैस्त्यागस्तु महाव्रतं महताम् ॥ ७२ ॥**

**अर्थ**— हिंसादिक पांच पातकांचा मनवचनकायेनें व कृत, कारित, अनुमोदना अशा नऊ भेदांनीं त्याग करणें हें महंत पुरुषांचें महाव्रत होय.

दिग्व्रताचे पांच अतिचार

**उर्ध्वाधस्तात्तिर्यग्व्यतिपाताः क्षेत्रवृद्धिरवधीनाम् ।**
**विस्मरणं दिग्विरतेरत्याशाः पंच कथ्यन्ते ॥ ७३ ॥**

**अर्थ**— अज्ञानामुळें किंवा प्रमादामुळें केलेल्या मर्यादेपेक्षां पर्वतादिकावर उंच चढणें, विहीर, आड, खाण इत्यादि खोल जागेंत उतरणें, विदिशेंत असणाऱ्या गुहादिकामध्यें प्रवेश करणें, अज्ञानानें किंवा प्रमादानें केलेल्या मर्यादा अधिक वाढविणें आणि केलेल्या मर्यादा विसरणें, हें पांच दिग्व्रताचे अतिचार ( दोष ) समजावे.

अनर्थदंड-त्यागव्रताचें लक्षण

**अभ्यन्तरं दिगवधेरपार्थकेभ्यः सपापयोगेभ्यः ।**
**विरमणमनर्थदण्डव्रतं विदुर्व्रतधराग्रण्यः ॥ ७४ ॥**

**अर्थ**— दिशांच्या ज्या मर्यादा केल्या असतील, त्यांच्या आंतील विनाकारण मन, वचन, कायेकडून घडणाऱ्या पातकांचा त्याग करणें यास गणधरदेव अनर्थदंडव्रत म्हणतात.

**भावार्थ**— मर्यादा केल्यानंतर पुनः ज्यापासून आपलें प्रयोजन न साधतां विनाकारण पापाचा बंध होऊन त्याबद्दल दुःख भोगावें लागणार असें काम करणें हा अनर्थदंड आहे. याचा त्याग करणें योग्य आहे. कारण ज्या क्रियेपासून आपलें कोणतेंही विषयोपभोगाचें कार्य साधत नाहीं, कांहीं लाभ होत नाहीं, कीर्ति वाढत नाहीं व धर्मसाधनही होत नाहीं, उलट पापाचा बंध

मात्र होतो व त्याचें कडू फल दुर्गतींत जाऊन भोगावें लागतें म्हणून अनर्थदंडाचा त्याग करणें हें व्रत मानलें गेलें आहे.

अनर्थदंडाचे भेद

**पापोदेशहिंसादानापध्यानदुःश्रुतीः पंच।**
**प्राहुः प्रमादचर्यामनर्थदण्डानदण्डधराः॥ ७५॥**

**अर्थ**– पापोपदेश, हिंसादान, अपध्यान, दुःश्रुति आणि प्रमादचर्या असे पांच अनर्थदंडाचे भेद दंडधरांनीं ( गणधरदेवांनीं ) सांगितले आहेत.

**भावार्थ**– अशुभ मन, वचन कायेच्या प्रवृत्तीला दंड असें म्हणतात. सर्व जीवांना आपापल्या अशुभ मन, वचन, कायेची प्रवृत्तिच दुर्गतीमध्यें अनेक प्रकारचें दुःख देवविते. अशा प्रकारची अशुभ प्रवृत्ति गणधरदेवांना नसते म्हणून त्यांना अदंडधर अशी संज्ञा आहे. त्यांनीं याचे पांच प्रकार सांगितले आहेत.

१ पापाचा उपदेश करणें हा पापोपदेश.
२ हिंसा घडेल अशा प्रकारच्या उपकरणाचें दान देणें हें हिंसादान.
३ खोटें चिंतन करणें हें अपध्यान.
४ खोटें शास्त्र श्रवण करणें ही दुःश्रुति.
५ रागद्वेषांनीं युक्त बनून आचरण करणें ही प्रमादचर्या.

पापोपदेशाचें लक्षण

**तिर्यक्क्लेशवणिज्याहिंसारम्भप्रलम्भनादीनाम्।**
**प्रसवः कथाप्रसंगः स्मर्तव्यः पाप उपदेशः॥ ७६॥**

**अर्थ**–पशुपक्ष्यांना दुःख उत्पन्न होईल असा उपदेश करणें, त्यांच्या व्यापाराचा उपदेश करणें, ज्यापासून हिंसा व आरंभ उत्पन्न होईल असा उपदेश करणें, कपटाचा आणि फसविण्याचा उपदेश करणें वगैरेना पापोपदेश म्हणतात.

**विशेषार्थ**-तिर्यंचांना मारण्याचा उपदेश करणें. जसें अमुक पशूला अमक्या ठिकाणीं मारा, त्यास अमुक ठिकाणीं डाग द्या, त्यास कोंडून घाला, त्याच्या मर्मस्थानीं घाव घाला, त्यावर अधिक ओझें लादा, त्याचे नाक व कान कापा, अमुक पक्ष्याला धरून पिंजऱ्यांत ठेवा वगैरे उपदेश देणें याला तिर्यक्क्लेश पापोपदेश म्हणतात.

अनेक वस्तुमध्यें पाप उत्पन्न करणारा व्यापार करण्याचा उपदेश करणें. ज्या व्यापार करण्यापासून षट्काय जीवांची हिंसा घडेल अशा उपदेशाला हिंसोपदेश म्हणतात.

बागबगीचे बनविणें, विवाह करणें वगैरे पापारंभाचा उपदेश करणें याला आरंभोपदेश म्हणतात.

कपट करणें व मायाचारानें लोकांस ठकविणें यास प्रलंभनोपदेश म्हणतात.

अनेक प्रकारच्या पापरूप उपदेशाच्या गोष्टी बोलून पापाची प्रेरणा करणें. हा पापोपदेश अनर्थदंड आहे.

हिंसादान अनर्थदंडाचें लक्षण

**परशुकृपाणखनित्रज्वलनायुधशृङ्गिशृङ्खलादीनां ।**
**वधहेतूनां दानं हिंसादानं ब्रुवन्ति बुधाः ॥ ७७ ॥**

**अर्थ**– हिंसेला कारण अशा परशु, तरवार, फावडे, अग्नि, शस्त्र, विष, बेडी, साखळी इत्यादि प्राणहरण करणाऱ्या वस्तूंचें दान करणें याला ज्ञानी लोकांनीं हिंसादान म्हटलें आहे.

**भावार्थ**– ज्यापासून हिंसाच होणार अशा वरील वस्तुशिवाय खुरपें, हतोडा, सुरी, कट्यार, तमंचा, भाला, धनुष्य, बाण, बंदूक, तोफ, दारूगोळा, चाबुक वगैरे वस्तु देणें, विकणें किंवा दुसऱ्याकडून मागून देणें, भाड्यानें देणें या सर्वांचा हिंसादानांत अंतर्भाव होतो.

तिसऱ्या अपध्यानाचें लक्षण

**बंधवधच्छेदादेर्द्वेषाद्रागाच्च परकलत्रादेः ।**
**आध्यानमपध्यानं शासति जिनशासने विशदाः ॥ ७८ ॥**

**अर्थ**– कोणाही प्राण्याला द्वेषबुद्धिनें बंधांत घालण्याचें, मारण्याचें अथवा त्याचे अवयव तोडण्याचें चिंतन करणें आणि कामबुद्धीनें परस्त्री वगैरेचें चिंतन करणें यांस जैनधर्मांतील विद्वानांनीं अपध्यान म्हटलें आहे.

**भावार्थ**– रागद्वेषाच्या वश झाल्यामुळें आपल्या मनांत नेहमीं " अमक्याचा पुत्र मरो, अमक्याची स्त्री मरो, अमक्याला दंड होवो, अमक्याचे हात, पाय, कान, नाक छेदिले जावो, अमक्याचें धन लुटिलें जावो, अमक्याची उपजीविका नाहींशी होवो, अमक्याचीं इंद्रियें नाहींशी होवोत, अमक्याची जगांत अपकीर्ति होवो, अमका स्थानभ्रष्ट अथवा बुद्धिभ्रष्ट होवो. " असे विचार वारंवार येत असतात. दुसऱ्याचें बरें वाईट होण्यानें आपणांस कोणताही लाभ होत नाहीं, व आपल्या चिंतन करण्यानें दुसऱ्याचेंही कांहीं नुकसान होत नाहीं. अशी वास्तविक स्थिति असतांना विनाकारण वाईट विचारांचें मनांत चिंतन करून पापाचा बंध कां करून घ्यावा? दुसऱ्याचें बरें वाईट होणें हें त्याच्या पापपुण्यावर अवलंबून आहे. त्याबद्दल आपण विनाकारण दुर्ध्यान करीत राहणें याला अपध्यान अनर्थदंड म्हटलें आहे.

दुःश्रुति अनर्थदंडाचें लक्षण

**आरम्भसंगसाहसमिथ्यात्वद्वेषरागमदमदनैः ।**
**चेतः कलुषयतां श्रुतिरवधीनां दुःश्रुतिर्भवति ॥ ७९ ॥**

**अर्थ**– आरंभ म्हणजे असि, मसि, कृषि, विद्या, वाणिज्य व शिल्प, संग म्हणजे धनधान्यादि परिग्रह, साहस म्हणजे आश्चर्य उत्पन्न करणारीं शौर्याचीं कामें, मिथ्यात्व म्हणजे ब्रह्माद्वैत, ज्ञानाद्वैत,

क्षणिक, याज्ञिकादि विरुद्धार्थ प्रतिपादक शास्त्रें, राग म्हणजे आसक्ति, द्वेष म्हणजे वैर, आठ मद, आणि मदन म्हणजे कामवेदनेपासून उत्पन्न होणारा विकार यांचे योगानें मनाला कलुषित करणाऱ्या अशा अवधि म्हणजे शास्त्रांचें श्रवण करणें याला दुःश्रुतिनामक अनर्थदंड म्हणतात.

**भावार्थ**– मिथ्यात्व व रागद्वेष वगैरे उत्पन्न करणारें, व पदार्थांचें विपरीत स्वरूप भासविणारें असें जें शास्त्र अथवा विकथा, तसेंच शृंगार, वीर, हास्य प्ररूपण करणाऱ्या व जारण, मारण, उच्चाटण, व वशीकरण करणाऱ्या कामोत्पादक शास्त्रांचें श्रवण करणें, जंगलांत असणाऱ्या सर्पादिकांचें, भूता-प्रेतांचें व रसकर्म इंद्रजालरसायन वगैरे मायाचार प्ररूपक व यज्ञयागादि हिंसा-प्ररूपक दुष्टशास्त्र, दुष्टकथा, दुष्टचेष्टा, दुष्टराग, दुष्टक्रिया व दुष्टकर्म यांचें श्रवण करणें, या सर्वास दुःश्रुति अनर्थदंड म्हणतात.

प्रमादचर्या अनर्थदंडव्रताचें लक्षण—

**क्षितिसलिलदहनपवनारम्भं विफलं वनस्पतिच्छेदम् ।**
**सरणं सारणमपि च प्रमादचर्यां प्रभाषन्ते ॥ ८० ॥**

**अर्थ**– जमीन खोदणें व दगड फोडणें, पाणी शिंपडणें, पाण्यांत बुडून क्रिया करणें, प्रयोजनाशिवाय अग्नि प्रज्वलित करणें, तो मालविणें, वारा घेणें अथवा वाऱ्याला प्रतिबंध करणाऱ्या यंत्राचा उपयोग करणें, विनाकारण अग्निवर वारा घालून पेटविणें, निष्प्रयोजन वनस्पति तोडणें, प्रयोजनाशिवाय गमन करणें, करविणें वगैरे क्रिया करणें याला प्रमादचर्या अनर्थदंड म्हणतात.

**विशेषार्थ**– गृहस्थाला गृहाचारांत अनेक प्रकारचीं पापाचरणें करावीं लागतात. त्या सर्व पापाचरणाचा त्याग करणें हा उत्तम पक्ष आहे. पण ज्याला तसें होत नसेल त्यानें ज्यांत आपलें

पापक्रियेचा दुसऱ्यास उपदेश देऊं नये

मुळींच प्रयोजन साधत नसेल अशा विनाकारण घडणाऱ्या पापबंधाचा ज्यापासून असंख्यात अनंतकाल पावेतों दुर्गतींत दुःख भोगावें लागतें अशा निंद्यकर्माचा तरी त्याग करावा. ज्याला सध्या उत्तम कुल, जिनेंद्राचा उपदेश व उत्तमधर्म या सर्व अतिदुर्लभ वस्तूंची प्राप्ति झाली आहे, त्यानें प्रयोजनाशिवाय घडणाऱ्या पापबंधाची भीति बाळगावी हें योग्य आहे. पशुप्रमाणें व्यर्थ जन्म घालविणें योग्य नाहीं. ज्याला स्वतः घरच्या पापाचा त्याग होत नसेल त्यानें निदान दुसऱ्याला "मजप्रमाणेंच करीत रहा, तुम्हांस पापत्याग होणें फार कठिण आहे" असा उपदेश तरी करूं नये. घरेंदारें बांधविण्यांत अतिशय हिंसा घडते म्हणून तीं बांधविण्याचा त्यांना सफेदी देण्याचा, त्याची दुरुस्ती करविण्याचा, बागबगीचे बनविण्याचा, खडी फोडविण्याचा; विहिर खणण्याचा, तलाव खणण्याचा, पाणी काढण्याचा, तलावाला बांध घालण्याचा, तलावाचा बांध फोडण्याचा, नदीला फळें बांधण्याचा, बांधलेलीं घरें व बागबगीचे जाळण्याचा, झाडें तोडण्याचा, घनकटाई करण्याचा, कोळसे बनविण्याचा, गवत तोडविण्याचा, आग लावण्याचा, मिथ्यादेवाचीं देवळें बांधविण्याचा, व तीं पाडण्याचा अथवा मूर्ति बिघडविण्याचा, शेती करण्याचा, सुंदर घरांचा बिघाड करण्याचा उपदेश कधींही करूं नये. याचप्रमाणें पशूंना दुःख देण्याचा, मारण्याचा;

घट्ट बांधून घालण्याचा, डाम देण्याचा, नाकांत वेसण घालण्याचा उपदेश पण देऊं नये. मनुष्य-तिर्यंचाचें आहारास प्रतिबंध करण्याचा, त्यांना कैदेंत ठेवण्याचा, त्यांच्या संततीचा वियोग करण्याचा, पक्ष्यांना पिंजऱ्यांत कोंडण्याचा, साप, विंचू, सिंह, वाघ, उंदीर, मुंगुस, कुत्रा इत्यादि हिंसक प्राण्यांचा घात करण्याचा, उवा, लिखा, ढेकूण मारण्याचा, बाज, पलंग, चौफळा उन्हांत ठेवण्याचा, रस्त्यावर पाणी शिंपडण्याचा, जीवाला धरणारीं यंत्रें बनविण्याचा, उपदेश पण देऊं नये. ज्या शास्त्रांत, शृंगाराचें मुख्यत्वें वर्णन असेल, ज्यांत जारण-मारण-उच्चाटण, वशीकरण, मंत्र-तंत्र, इंद्रजालादि अनेक कपटक्रियांचा उपदेश असेल, ज्यांत रस, भस्में. रसायनें यांचा विधि वर्णिला असेल, ज्यांत वीररस उत्पन्न होईल असें वर्णन असेल, ज्यांत हिंसेचें मुख्यत्वें प्रतिपादन केलें असेल, अशा शास्त्राचें अध्ययन करण्याचा उपदेश करूं नये. अभक्ष्य भक्षण करण्याचा, रात्रिभोजन करण्याचा, खोटें बोलण्याचा, चहाडी करण्याचा, चोरी करण्याचा, खोटी साक्ष देण्याचा, व्यभिचार करण्याचा, व्यवहारादिकांत महा आरंभ करण्याचा, रोषनाई करण्याचा, दारु उडविण्याचा आणि बागबगीचे पाहण्यास जाण्याचाही उपदेश करूं नये. याचप्रमाणें "या देशापेक्षां दुसऱ्या देशांत व्यापारधंदा फार चालतो तिकडे जा", असा उपदेश पण करूं नये. परिणामांत दुर्ध्यान उत्पन्न करविण्यास कारण असे मेळे, नाच, तमाशे, नाटक, वगैरे पाहण्याचा व व्यभिचारादि कर्मे करण्याचा आणि परस्परामध्यें कलह लावण्याचा उपदेश करूं नये. युद्ध करण्याचा, दुसऱ्याला शिवी देण्याचा, दुसऱ्याची उपजीविका बिघडविण्याचा उपदेश करूं नये. वाईट बीभत्स अशीं गाणीं नृत्य, वादित्र, कलह, विसंवाद श्रवण करण्याचा उपदेश करूं नये.

**परदुःखदायक व्यापार करूं नये**

स्वदेशांतून अथवा परदेशांतून मुलें—माणसें व स्त्रियांना फसवून आणून त्यांना गुलाम म्हणून विकण्याचा उपदेश करणें यास क्लेशवणिज्या म्हणतात; गाय, म्हैस, घोडे वगैरे अमुक देशांतून खरेदी करून अमुक देशांत नेऊन विकलें असतां पुष्कळ नफा होईल असा उपदेश करणें याला तिर्यक्वणिज्या म्हणतात; शिकार करणारे व पारधी यांना "अमुक देशांत हरिण, सूकर वगैरे पुष्कळ आहेत तेथें गेल्यास तुम्हांस शिकार चांगली करतां येईल" असा उपदेश देणें ही वधवणिज्या होय. शेती करणाऱ्याला जमीन खोदण्याचा व वनस्पति छेदनाचा उपदेश देणें हा आरंभोपदेश होय. हे सर्व पापोपदेश आहेत. यांचा त्याग करणें योग्य आहे. तंबाखू खाणें, हुक्का पिणें, भांग पिणें, अंमल खाणें, घोटा पिणें वगैरे सर्व महान् पापाला उत्पन्न करणारें आहे, म्हणून याचा उपदेश करूं नये. तंबाखू ही उत्तम कुलांत उत्पन्न झालेल्या पुरुषांस खाणें योग्य नाहीं. हुक्का पिण्यांतही अनेक दोष घडतात. धूर आणि पाण्याच्या संयोगानें गुडगुडींतील पाण्यांत त्रस जीवांची उत्पत्ति होते. त्या पाण्यास दुर्गंध येतो व तें जेथें टाकावें तेथील षट्काय जीवांची हिंसा होते. चुन्याची अथवा विटा तयार करण्याची भट्टी बांधविण्याचा उपदेश करूं नये. ज्यांत अत्यंत पाप उत्पन्न होतें असें माहित असेल असा व्यापार करण्याचा उपदेश करूं नये. गाडी, घोडा, बैल, गाय, म्हैस वगैरे पशु पाळण्याचा उपदेश

करूं नये. कोणी दाता, मनुष्य तिर्यंचांना भोजन, वस्त्र, धन देत असेल त्यास अडथळा आणूं नये. कुपात्रदानाचा उपदेश करूं नये. कोणी दान करीत असेल त्यांत विघ्न आणूं नये. व्रतभंग करण्याचा उपदेश करूं नये. याप्रमाणें अनेक गोष्टी पाप उत्पन्न होण्याच्या आहेत, त्याचें कोठवर वर्णन करावें; सारांश, ज्यापासून आपल्या धर्म, अर्थ व काम यापैकीं एकाचीही सिद्ध होत नसून केवळ पापाचाच बंध होत असेल असा उपदेश कोणालाही करूं नये.

ज्यापासून हिंसा घडेल अशीं उपकरणें कोणाला लोभानें व प्रीतीनेंही पण देऊं नये. तीं दिल्यापासून थोडासा लाभ जरी होत असेल तरी त्यापासून महान् पाप उत्पन्न होतें. जीं शस्त्रें हातांत घेतांच मनांत दुष्ट विचार उत्पन्न होतात तीं तरवार, भाला, सुरी, बाण, धनुष्य, बंदूक, कटयार वगैरे कोणालाही देऊं नये. जमीन खोदण्यास लागणारीं हत्यारें ज्यापासून भूमींत राहणारे मोठमोठे सर्प, विंचू, किडे, उंदीर वगैरे अनेक प्राणी मारले जातात व कोटयवधि जीवांची हिंसा होते अशीं खोरीं, कुदळ, खुरपीं, नांगर, हतोडा, मुद्गर हीं कोणासही देऊं नयेत. याचप्रमाणें अनेक त्रसस्थावर जीवांना चिरून टाकणारीं परशु, ( कुऱ्हाड ) वाकस, करवत वगैरे हिंसक हत्यारें पण कोणासही देऊं नये. मनुष्यतिर्यंचाना मारण्यास उपयोगीं पडणारी काठी, चाबूक, छडी, कातडीं व लोखंड हीं कोणालाही देऊं नये. विस्तव, विष, बेडी, सांखळी, पिंजरा, जाळें व पशुपक्ष्यांना धरणारीं यंत्रें कोणाला देऊं नये. कुत्रीं, मांजर वगैरे हिंसक प्राणीं पाळूं नये. पोपट, मैना, तीतर, बुलबुल, कोंबडा, कबूतर वगैरे पक्ष्यांना पिंजऱ्यांत अडकावून ठेऊं नये. याशिवाय दुसरीं अनेक पापाचीं उपकरणें घरांत पण ठेऊं नये. कारण तीं घरांत असलेलीं पाहून कधींतरी चुकून कामांत आणण्याची बुद्धि होण्याचा संभव आहे.

हिंसक उपकरणें देऊं नयेत

खालीं दाखविलेले व्यापार महान् पाप उत्पन्न करणारे आहेत. त्यामध्यें जरी थोडा लाभ होत असला तरी पापाच्या भयानें त्यांचा त्याग करणें योग्य आहे. ते व्यापार हे— लोखंड, नील, मेण, मीठ, लाकडें, ताग, साबण, लाख, कांतडीं, लोंकर, केश, कुसुंबा, गूळ, साखर, तांदूळ, शिंगाडे, शस्त्र, दारूगोळा, शिसें, लसूण, कांदा, आद्रक, फासे, गांजा, चरस, दासी, दास, सुरण, तूप, तेल, आंबे, लिंबू वगैरे वनस्पतिकाय, भांग, तंबाखु, जरदा, तिळ, पेंड, पिंजरे, घोडा, उंट, बैल, गाड्या, विटा वगैरे वस्तूंचा क्रयविक्रय करण्यांत व संचय करण्यांत हिंसा होते म्हणून हे व्यापार करूं नयेत. या सर्वांचा त्याग करणें शक्य नसेल तर त्यांतूनही ज्यांत अधिक पाप होत असेल ते सोडून, धान्याचा संग्रह करण्याचें प्रमाण करून बाकी सर्वांचा त्याग करावा. ज्या कित्येक खोट्या आजीविकेच्या साधनापासून मोठा पापबंध होऊन दुर्गति प्राप्त होते अशा आजीविकेचा त्याग करावा. कोतवालाचा धंदा, कोतवालाच्या हाताखालीं शिपायाचा धंदा, वनकटाई करण्याचा धंदा व गाडी, घोडे, उंट, बैल भाड्यानें देवविण्याचा व दलालीचा धंदा करूं नये.

कोणते व्यापार करूं नये

दलालीच्या धंद्यांत मनुष्य, बैलाला खांदा आला आहे, त्याची नाकपुडी नासून गेली आहे, घोड्याच्या पाठीवर नाळ पडून त्यांत किडे पडले आहेत, त्यांचे पाय इतका वेळ चालून दमले आहेत, जनावर वृद्ध किंवा रोगी असल्यानें त्याला गाडी ओढवणार नाहीं वगैरे गोष्टीचा विचार मनांत आणीत नाहीं. तो पावसाळ्यांतही त्यावर अतिशय ओझें लादवून गाडी ओढण्यास भाग पाडतो. म्हणून भाड्यावर उपजीविका अथवा भाड्याची दलाली हे दोन्ही व्यापार करणें महान् पापबंधाचें कारण आहे.

**लांच घेणें किंवा देणें पाप आहे**

याचप्रमाणें लोभाच्या वश होऊन म्हणजे कोणी आपणांस लांच म्हणून पुष्कळ द्रव्य देऊं करून वृद्धाचा विवाह करण्यास उद्युक्त करविलें तरी आपण तो जमवून देऊं नये. राज्याची जकात चुकवून कोणतीहि वस्तु आणूं नये. दुसऱ्याची चहाडी करूं नये. खोटी साक्ष भरूं नये. कोणाला जामीन होऊं नये. वैद्यकी करून पोट भरूं नये. मंत्र-तंत्र-यंत्र भूत-भूतिणी-डाकिणी यांचे इलाज करून पैसे मिळवूं नये. रसायनादि क्रिया धूर्तपणानें दाखवून लोकाला ठकवूं नये. या सर्व क्रिया दुर्गतीला नेणाऱ्या आहेत.

**हलके धंदे करणाऱ्याला पैसे देऊं नये**

नीच कृत्यें करणाऱ्याला रुपये व्याजानें देऊन त्यावर आपली उपजीविका चालवूं नये. लाकूडविक्या, दारू करून विकणारा कलाल, कसाई, परीट, चांभार, विटा भाजणारा, चुना करणारा, नीलगर, जुवा खेळणारा, घिसाडी, गवत कापणारे वगैरे लोकांना व्यापार करण्याकरितां व्याजानें द्रव्य देऊं नये. मांसभक्षण करणारे, वेश्या वगैरे निंद्य कर्म करून उपजीविका करणाऱ्याला व्याजीं रुपये देऊं नये.

**इतरांचे दोष पाहूं नये**

आपलें घर भाड्यानें देऊं नये. अशुभ परिणाम धारण करणारे, अन्यायमार्गी, मांसभक्षी, मद्यपानी, वेश्यासक्त, परस्त्रीलंपट व अन्यधर्मानुयायी लोकांशीं मैत्री ठेऊं नये. दुसऱ्यांच्या दोषांचें ग्रहण करूं नये. दुसऱ्याचें धन घेण्याची इच्छा करूं नये. दुसऱ्याचें धन ऐश्वर्य पाहून आश्चर्य करूं नये. आपलें दैन्य मनांत आणून त्याचें चिंतन करीत बसूं नये. दुसऱ्याच्या स्त्रीकडे कामबुद्धीनें पाहूं नये. इतर मनुष्यतिर्यंचाचे कलह लावू नये. दुसऱ्याच्या पुत्र-मित्र-स्त्रीचा वियोग व्हावा असें चिंतन करूं नये. दुसरे सुरस भोजन व मौल्यवान् वस्त्र-प्रावरणें धारण करितात तें पाहून आपल्या परिणामांत 'ते आपणास नाहींत' म्हणून दुःख उत्पन्न होऊं देऊं नये. आपणाला दारिद्र्य, रोग, वियोग प्राप्त झाला असतां परिणामांत दुःख उत्पन्न होऊं देऊं नये. धनवान् पुरुषांशीं ईर्षा करूं नये. सिंह, वाघ वगैरे प्राण्याची शिकार करावी असें मनांत चिंतू नये. युद्धांत अमक्याचा पराभव व्हावा अशी इच्छा धरूं नये. परस्त्रीशीं संसर्ग व संभाषण करूं नये. वेश्येचें गाणें, नाच, हावभाव विलास पाहण्याची इच्छा करूं नये. शिव्यागाळी बीभत्स शब्द ऐकूं नये. नटनाट्यादिकांचीं गाणीं

व कौतुक उत्पन्न करणारे पदार्थ परिणाम बिघडविण्यास कारण आहेत म्हणून त्यांचें श्रवण करण्याचा व पाहण्याचा त्याग करावा. दारिद्य प्राप्त झालें तरी नीच प्रवृत्तीनें उपजीविका करूं नये.

कोणालाही याचना करूं नये. दैन्य दाखवूं नये. निर्धनपणा प्राप्त झाला म्हणून आपल्या स्वभावांत विकार उत्पन्न होऊं देऊं नये. नीच कुलांत उत्पन्न झालेल्या लोकांनीं करण्यायोग्य कामें म्हणजे रंग देणें, धुणें वगैरे निंद्य कर्मे करण्याचा त्याग करावा. जिनालया-

**मंदिरांत विकथा करूं नयेत**

सारख्या पवित्र धर्माच्या स्थानीं स्त्रीकथा, राजकथा, चोरकथा, देशकथा या पापबंध करणाऱ्या आहेत म्हणून कधींही बोलूं नयेत. याचप्रमाणें देवळांत देणें-घेणें, लग्न-विवाहाचें भांडण व न्याय-पंचायत व जातिकुलाचा विसंवाद करूं नये. अशा गोष्टी त्याठिकाणीं केल्यानें धर्मस्थानाची मर्यादा भंग केल्यामुळें नरक-निगोदाचें कारण असा घोर कर्माचा बंध होतो, म्हणून धर्मायतनामध्यें पाप वाढविणारें कोणतेंही कर्म न होईल अशी खबरदारी घ्यावी. जिनमंदिरांत जेवणखाण, पानसुपारी, गंधपुष्प परिधान, शयन, उच्चासन, व्यापार, विवाह, भांडण, शिवीगाळ, थट्टा, अविनयाचें भाषण. आरंभ उत्पन्न होणारें भाषण वगैरे करण्याविषयीं प्रवृत्त होऊं नये. खोट्या शास्त्रांचें श्रवण करूं नये. त्यापासून विषयलालसा व हास्य, कौतुक व कामपीडा जागृत होते. भोजनाच्या अनेक स्वादामध्यें प्रीति उत्पन्न होते. स्त्री-पुरुषांच्या पापी दूराचरणाच्या गोष्टी, भूतप्रेताच्या खोट्या गोष्टी, हिंसा करण्याचें मुख्यत्वें करून प्रतिपादन करणारे वेद, स्मृति वगैरेंच्या कथा, कल्पित अनेक कादंबऱ्या, फारसी पुस्तकावरून लिहिलेले ग्रंथ ज्यास किस्सा म्हणतात ते, हे सर्व दुर्ध्यान उत्पन्न करणारे आहेत, यांचें श्रवण करूं नये. भारत-रामायणाच्या कल्पित कथा पण ऐकूं नयेत. कषाय उत्पन्न करणारीं रागीट पुरुषांचीं बोलणीं, अभिमानी पुरुषांचीं गर्वानें भरलेलीं भाषणें, मायाचारी पुरुषांचीं कुटिल वचनें, लोभी पुरुषांचीं लोभ उत्पन्न करणारीं संभाषणें, मद्यमांसादि अभक्ष्य भक्षकांचीं रसा-स्वादांची प्रशंसा करणारीं वचनें, मद्य, अंमल, भांग, तंबाखु, हुक्का वगैरे पदार्थांचीं स्तुति करणारीं वाक्यें श्रवण करूं नयेत. धर्म नाहीं, परलोक नाहीं, कांहींहीं नाहीं असें प्रतिपादन करणाऱ्या नास्तिकांचीं वचनें पापबंधाला कारण म्हणून तीं श्रवण करूं नयेत. विनाकारण आरंभ करूं नये. विसंवाद करूं नये.

केरकचरा, चिखल, कांटे, ठिकऱ्या, मल, मूत्र, कफ, उच्छिष्ट, पाणी, अग्नि, दिवा वगैरे पदार्थ भूमि पाहिल्याशिवाय एकदम टाकूं नये. घाईघाईनें दगड, लांकूड, आसन, आंथरूण, पलंग, धातूचें पात्र, तबला, चौरंग, पाट, वस्त्र वगैरे जमिनीला खरडून उचलूं

**जमिनीवर पदार्थ ठेवतां, उचलतांना सावधानता ठेवावी**

नयेत किंवा सरकावूं नयेत. असें करण्यांत पुष्कळ जीवांची विनाकारण हिंसा होते, ती आपण सावधानतेनें क्रिया न केल्यानें घडत असते. म्हणून नेहमी कोणतीही वस्तु ठेवतांना अथवा घेतांना यत्नाचारपूर्वक क्रिया करण्याची काळजी घ्यावी. विनाकारण जमीन कुरतडीत बसणें, झाडाची

डहाळी तोडणें, हिरवें गवत उपटणें अथवा कुचलणें, झाडाचीं पानें फळें तोडणें, फिरणें, पाणी शिंपडणें वगैरे क्रिया पापाचें भय बाळगून करण्याची खबरदारी घ्यावी. गृहाचारांत जितक्या वस्तु, पात्र वगैरे आपणाला उपयोगांत आणावी लागतात तितक्या सर्व वस्तु पाहून, शोधून मोठ्या सावधगिरीनें घ्याव्या व ठेवाव्या. सारांश ज्यापासून आपणाकडून हिंसा घडणार नाहीं, अर्थात् कोणत्याही जीवास दुःख होणार नाहीं अशी वागणुक ठेवावी.

भोजनपान, औषध, पक्कान्नादिकांचें आपल्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहून शोधून भक्षण करावें, गडबडीनें व आळसानें पदार्थ नीट पाहिल्याशिवाय जेऊं नये. गमनागमन क्रिया करीत असतां आपले पायाखालील जमीन पाहून हळुहळु जावें. यामुळें दयेचें रक्षण होऊन आपल्या शरीराला कोणतीही पीडा होत नाहीं. हिताहिताचा विचार न करितां, सुपात्र–कुपात्राचा विचार न करितां कोणाशींही एकदम बोलूं नये. बोलण्याचा प्रसंग आलाच तर त्यांतील गुणदोषांचा विचार करून बोलावें. कोणी आपणांस कांहीं विचारिलें तरी त्याचें एकदम उत्तर देऊं नये, यावर विचार करून आपणास जबाब देईन असें सांगावें. नंतर आपल्या फुरसतीप्रमाणें निश्चितवेळीं धर्म-अर्थ–कामाला विरुद्ध होणार नाहीं असा विचार करून नम्रतेनें त्याच्या प्रश्नाचें उत्तर द्यावें. शीघ्रतेनें उत्तर देण्यांत त्यावेळीं आपल्या मुखांतून काय शब्द निघेल याचा भरवंसा नसतो व कषायाच्या उदयानें योग्यायोग्य विचारही रहात नाहीं, म्हणून विचारणाराला पूर्णपणें बोलूं द्यावें व तें शांतपणानें ऐकून घ्यावें, बोलणाराचा सर्व अभिप्राय लक्ष्यांत घ्यावा व मग त्याला उत्तर द्यावें. केव्हांही एकांतवादी म्हणजे एकाच गोष्टीचा हट्ट धरून राहूं नये. यामुळें अथवा पक्षपात केल्यानें दोष येतो. याप्रमाणें इहपरलोकाच्या सुखाकरितां प्रमादचर्या नामक अनर्थदंडाचा त्याग केला पाहिजे. अनर्थदंडांत किती गोष्टींचा समावेश होतो याची वर लिहिल्यावरून कांहींशी कल्पना येईल. अर्थात् त्या किंवा तत्सम निरर्थक घडणाऱ्या क्रियांचा त्याग करणाराला हें अनर्थदंड व्रत घडतें.

> भोजनांत व बोलण्यांत सावधानी ठेवावी

अनर्थदंडामध्यें सर्वांत मोठा अनर्थ उत्पन्न करणारी द्यूतक्रीडा आहे. जूवा ही सर्व व्यसनांत मुख्य आहे. ती सर्व पापांचें संकेत-स्थान आहे. यापासून अतिशय आपत्ति प्राप्त होते. ही सर्व अनीतींत मोठी अनीति आहे. याचा परिणामही फार वाईट होतो. आपलें सर्व घरदार जूवा खेळण्यांत घालवूनही दुसऱ्याचें धन घेण्याची इच्छा उत्पन्न होते. जुगारी पुरुषाला असा जबरदस्त लोभ उत्पन्न होतो कीं, कोणत्याही प्रकारानें कां होईना पण दुसऱ्याचें धन आपणाला प्राप्त कसें होईल याचें रात्रंदिवस तो चिंतन करीत असतो. आपलें धन गेलें तर जावो, अपकीर्ति प्राप्त झाली तर होवो, दारिद्र्य प्राप्त झालें तरी बेहेत्तर, पण मी जर दुसऱ्याचें धन द्रव्य जिंकेन तरच माझें जन्माला येणें सफल झालें, अशी त्याची चिंतना असते. लोभकषायाची तीव्रता असणें ही महान् हिंसा आहे. जुगाऱ्याचे परिणाम निर्दय असतात. तो नेहमीं दुसऱ्याचें नुकसान इच्छित असतो. जुव्यांत धन हरलें तर तो चोरी करण्यास प्रवृत्त

> जूवेचा त्याग

होतो. एवढ्यानेंच थांबत नाहीं. याही पुढें त्याची मजल वाढते, चोरी करूनही मनाहतकें द्रव्य न मिळालें तर तो मनुष्याला ठार मारून तें प्राप्त करून घेतो. जुगारी पुरुष परस्पराला फार दुःख देतात. त्यांची परस्परांत मारामारी होते. ते एकमेकांला कपट करून फसवितात. ज्यावर अति प्रीति करीत असतील त्यालाही कपटानें फसवून त्यापासून द्रव्य काढून घेतात. जुवा हें कपटाचें अग्र-स्थान आहे. यांत हजारों युक्त्या रचून परस्पराला फसविण्याचा क्रम एकसारखा चाललेला असतो. जुगार व्यसनांत तल्लीन झालेला मनुष्य आपला पुत्र, स्त्री, मुलगी पण पैजेला लावतो व त्यांत हार झाली म्हणजे मुलगी, स्त्री अथवा पुत्र पण देऊन टाकतो. जुगारी मनुष्य आपल्या मुलींचा दरिद्री व व्यसनी पुरुषाशी विवाह करून देतो. जुवेच्या नादांत आपलें राहण्याचें घर विकून टाकतो किंवा गहाण ठेवतो. लक्षाधीश असला तरी या व्यसनानें तो भिकारी बनतो. यामुळें त्यांस भयंकर आर्तरौद्रध्यान घडतें व त्यापासून मरणानंतर दुर्गति प्राप्त होते. कदाचित् जुगारींत धन मिळालें तर त्याला आपल्या शहाणपणाचा गर्व होतो. त्याचें धन कुमार्गांतच खर्च होतें. त्याला महान् रौद्र-ध्यानाच्या प्रभावानें मरणोत्तर कुयोनिमध्यें भ्रमण करावें लागतें. जुगारी मनुष्य भांग, दारु वगैरे पितो. वेश्यासक्त होतो. त्याचें द्रव्य सत्कार्यांत खर्च होत नाहीं. जुगारी पुरुषाला न्यायानें धन उपार्जन करून आपली उपजीविका करितां येत नाहीं. जुगारी माणसाचा विश्वास जगांत कोणीही धरीत नाहीं. त्याची पत रहात नाहीं. त्याला कोणी धन देत नाहीं. जुगारी कधींही सत्य भाषण करीत नाहीं. त्याच्या मनांत कधींही शुभपरिणाम उत्पन्न होत नाहींत. आपल्या पूर्वोपार्जित कर्मा-प्रमाणें न्यायानें प्राप्त होणाऱ्या धनांत त्याला कधींही संतोष प्राप्त होत नाहीं. तो एखाद्या एकट्या मनुष्याला मारून त्याचें द्रव्य हरण करितो. आपले जवळचे आप्तवर्ग असले तरी त्यांनाही एकटेच गांठून मारहाण करून त्याजपासून अलंकार वगैरे उपटून नेतो. जुगारी माणसाचा विश्वास मूर्ख मनुष्यही धरीत नाहीं. परधन प्राप्त करून घेण्याच्या तीव्र इच्छेनें तो कुदेवाला नवस करितो, मिथ्याधर्म धारण करितो, संतोष, शील, निराकुलता वगैरे सद्गुणांवर पाणी सोडतो. अतिलोभामुळें त्याची बुद्धि विपरीत होते. परमार्थाची त्याला ओळख रहात नाहीं. धर्मावर श्रद्धा स्वप्नांतही असूं शकत नाहीं. याप्रमाणें सर्व पापाचें मूळ अशा ह्या जुगाराचा त्याग करावा. कोट्यवधि उपाय केले तरी जुगाऱ्याच्या बुद्धीला प्राप्त झालेला विपरीत–पणा नाहींसा होत नाहीं. त्याला परलोकीं दुर्गति प्राप्त व्हावयाची यांत शंका नको. जुगाऱ्यानें तीव्रलोभामुळें आपल्या आत्म्याचा घात केला आहे, असें समजावें.

कित्येक लोक जुव्यावर द्रव्य लावून हार–जीत करीत असतात. मनुष्यजन्म व्यर्थ घालवूं इच्छिणारे ते अज्ञानी लोक धन लावून जुवा खेळत नसले तरी क्रीडा म्हणून पत्ते, गंजीफा, सोंगट्या वगैरे खेळत असतात. यांत हार–जीत झाली म्हणजे त्यांना मोठी ईर्षा उत्पन्न होते. त्यांना त्यांत हर्ष–विषाद व रागद्वेष फार उत्पन्न होतो. खेळत असतांना ते अनेक प्रकारच्या कपटयुक्ति योजतात. खेळतां–खेळतां बाप–लेक पण आपापसांत कलह करूं लागतात. व खेळ-

गंजीफा, पत्ते वगैरे खेळही जुगार होत

ण्यांत हारजीत झाली असतां त्यांच्या परिणामांत तीव्रपणा उत्पन्न होतो. हें असलें वाईट व्यसन आहे कीं, यांत मनुष्य तल्लीन झाला म्हणजे त्याचीं व्यवहारांतील लिहिणें, व्यापार, सेवा वगैरे सर्व कामें दुर्लक्ष्य झाल्यानें बिघडून जातात. तरीही तो खेळण्याचें सोडीत नाहीं. जो द्यूतक्रीडा करितो त्याला दुसरा कोणताही उद्योग करितां येत नाहीं. त्याला दारिद्र्य जवळ येऊन ठेपलें असें समजावें. जुवेबाज मनुष्य नीच लोकांशीं संगति करीत असतो. त्यावेळीं त्याला, त्या पुरुषाच्या गुणावगुणांचा विचार रहात नाहीं. न्हावी, धोबी, कलाल वगैरे सर्व लोक द्यूत खेळण्यांत सामील असलेले दिसून येतात. ज्यांच्या अंगाची अतिशय दुर्गंधी येत आहे, ज्यांच्या अंगावरून प्रत्यक्ष उवा खालीं पडत आहेत अशा घाणेरड्या पुरुषाबरोबर देखील जुगारी मनुष्य खेळत असतो. अन्य अधम लोक ज्याठिकाणीं बसत असतील त्याठिकाणीं आपण जाऊन बसतो. रस्त्यानें जात असतां कोठें खेळ चाललेला असेल तर तो पहात उभा रहातो. कोणी बसा म्हटलें नाहीं अथवा बसण्यास जागा नसली तरी स्वारी उभ्या-उभ्यानेंच पहात रहाते. त्याला या व्यसनाच्या नादांत खाणें–पिणें, देणें–घेणें वगैरे कशाचेंही भान रहात नाहीं. तो मांसभक्षी व नीच कर्म करणाऱ्यांत सामील होऊन सर्व खेळ पाहतो. फार काय, पण आपलीं सर्व कामें बिघडलीं, प्रत्यक्ष आई–बाप मरण पावले तरी तो आपला डाव सोडून उठत नाहीं. अशा या तीव्र परिणामानें नरकतिर्यंच गतीचाच त्याला बंध होतो. ज्यांत कांहीं लाभ होत नाहीं व विनाकारण खोटा वादविवाद करावा लागतो असे खेळ खेळण्यांत द्रव्याची हारजीत होणाऱ्या खेळापेक्षांही तीव्र पापबंध घडतो. खरोखर ज्याच्या द्रव्याची हानि होत असेल तो निदान थोडक्यांत उमजेल. पण ज्याला कांहीं द्यावें–घ्यावें लागत नाहीं तो मात्र सर्व दिवस खेळण्यांतच मग्न झालेला दिसून येतो. या व्यसनापायीं धर्माचें नांव माहित असलें तरी तें गोड लागत नाहीं. त्याची बुद्धि विपरीत होते व त्यामुळें त्याला पापक्रिया, अन्याय, असत्य विकथा यामध्येंच गोडी वाटते. विचार करा, हा मनुष्य जन्म, हें उत्तम कुल, हें निरोगी शरीर व हा अमूल्य धर्म अनंतकाल गेला तरी प्राप्त झाले नाहींत. कांहीं अपूर्व पुण्याईनें हा संयोग प्राप्त झाला आहे त्या अर्थीं आतां यांतील एकेक क्षण कोट्यवधि रुपये दिल्यानें पुनः प्राप्त होणारा नाहीं. असा समय सिद्धांताचा स्वाध्याय, जीवादिक द्रव्याची चर्चा, अनित्याशरणादि द्वादश भावना, षोडश-कारण भावना, पंचपरमगुरूंचे नमस्कारात्मक जाप्य व त्यांचें स्मरण, या योगानें सफल करावयाचें सोडून, जर पत्ते, गंजीफा, सोंगट्या–बुद्धिबळ वगैरे खोट्या मार्गांत घालविला व धर्मपराङ्मुख होऊन महान् पापाचा बंध करून मरण पावला तर तुमचें जिणें व्यर्थ होय. अशा रीतीनें दुर्मार्ग–प्रवर्तन केल्यामुळें त्याचें फल नरकतिर्यंचादि गतीमध्यें उत्पन्न होणें हें तुम्हाला भोगावें लागेल.

भगवंतांनीं परमागमांत सप्त व्यसनाचा ज्याला त्याग असेल तोच पुरुष धर्म ग्रहण करण्यास योग्य होतो असें सांगितलें आहे. ज्याला हीं व्यसनें असतील त्याची बुद्धि स्थिर रहात नाहीं. तो सदैव पापकार्यांत निमग्न असतो. अन्यायानें आजीविका करण्यांत त्याचा काल जातो. जगांत न्यायमार्गानें वागून आपल्या कुलाला योग्य अशा षट्कर्मांनीं आपली उपजीविका करावी, शुद्ध

आहार, साधी रहाणी, न्याय्यव्यवहार, प्रयोजनाशिवाय परगृहीं अगमन व परलोक-प्राप्तीसाठीं धर्माचरण हींच कार्ये मुख्यत्वेंकरून गृहस्थाला करणें योग्य आहेत. या कार्याशिवाय जी इतर प्रवृत्ति त्याला व्यसन म्हणावयाचें. द्यूतक्रीडा, मांसभक्षण, मद्यपान, वेश्यासेवन, शिकार, चोरी, परस्त्रीचा उपभोग हीं सात व्यसनें महान् घोर पापबंध करणारीं आहेत. या व्यसनाकडे प्रवृत्ति होणें हें फार सोपें आहे. पण यापासून अलिप्त राहणें फार कठिण आहे. या व्यसनापासून झालेला पापबंध लौकर नाहींसा होत नाहीं. द्यूतव्यसनाचें जें वर्णन केलें त्यांतच पैज लावणें याचाही अंतर्भाव होतो. याशिवाय या दहावीस वर्षांमध्यें अफूचा सट्टा चालू झाला आहे ( अलीकडे अफूचा सट्टा बंद आहे तरी इतर सोनें, चांदी, कापूस, जवस वगैरेचे सट्टे चालू आहेत. ) यांत कमी मेहनतीनें अधिक धन संपादन करण्याचा मोह असल्यानें मनुष्याच्या अंतःकरणांतील संतोषवृत्ति नाहींशी होते. याचाही जुगारांतच समावेश होतो. मद्य, मांस, शिकार या क्रिया जैनांच्या कुलांत नाहींतच. पण ज्यांना यांचा नाद लागतो त्यांना हें जबरदस्त व्यसन जडतें.

**अभक्ष्यत्याग**

याशिवाय अभक्ष्य पदार्थांचें भक्षण करूं नये. विटलेल्या अन्नाचें भोजन, कातड्याचा स्पर्श झालेलें तूप, तेल, पाणी वगैरे, रात्रिभोजन हे सर्व अभक्ष्य दोषांसारखे आहेत म्हणून यांचाही त्याग करावा. भांग, तंबाखु, जरदा, अफू, हुक्का या सर्वांमुळें मनुष्य पराधीन होतो, यापासून ज्ञान नष्ट होतें, परमार्थ-बुद्धि नाहींशी होते म्हणून या पदार्थांचें भक्षण करणें हें दारु पिण्याइतकें दोषार्ह आहे म्हणून त्याचा त्याग करावा.

**शिकारीचे पर्याय**

अन्य जीवांवर दया न करितां त्यांची उपजीविका बिघडवून टाकणें, त्यांचें द्रव्य लुटविणें, त्यांना मोठा दंड करविणें हें सर्व शिकार करण्यासारखें आहे. दुसऱ्याचा मानभंग करविणें व त्याचें घर लुटविणें हें पण शिकार करण्याहून अधिक वाईट आहे म्हणून असलीं कर्मे करूं नये.

वेश्यासमागम करणाऱ्याच्या सर्व क्रिया मनास भ्रष्ट करणाऱ्या आहेत. वेश्या, चांडाल, भिल्ल, महार, म्लेंच्छ वगैरे सर्व लोकांकडून उपभोगिली जाते. वेश्या मद्य-मांसाचें भोजन नेहमी करतें अशा नीच अधम द्रव्यलोभी वेश्येचें अधरपान करणाऱ्याची जात, कुलाचार वगैरे सर्व भ्रष्ट होतात

**वेश्या त्याग**

म्हणून वेश्येचा त्याग करावा. वेश्यासमागम करणाराला चोरी, जुवा, मद्यपान वगैरे सर्व व्यसनें जडतात. त्याच्या द्रव्याची सर्वस्वीं हानि होते. तो धर्मपराङ्मुख होतो. त्याच्या बुद्धींत पालट पडतो. मायाचार, असत्य, कपट वगैरे करण्याविषयीं तो तत्पर होतो. निंद्य कर्माची ग्लानि नाहींशी होते. त्याची लाज नष्ट होते. वेश्येचें स्वरूप, तिचे हावभाव, विलास वगैरे पाहण्यांत व तिचेंच चिंतन करण्यांत त्याचें प्रेम अमर्याद वाढतें. कुलाची मर्यादा सर्वथैव नाहींशी होते. वेश्यासक्त पुरुष शेंबडांत पडलेल्या माशीप्रमाणें स्वतःला त्यापासून सोडविण्यास असमर्थ असतो.

चोरी करणें हेंही व्यसनच आहे. चोराला रात्रंदिवस दुसऱ्याचें भय असतें व दुसऱ्यांना चोराचें भय असतें. प्रत्यक्ष आईला देखील आपला पुत्र चोर निघाला असतां त्याचें भय वाटतें.

चोरी — चोराची इहलोकीं मान, प्रतिष्ठा व अब्रू नाहींशी होते. राजा चोरांना तीव्र शासन करितो. चोराचे हात, पाय, कान, नाक वगैरे अवयव तोडले जातात. चोराचे परिणाम कधींही शांत नसतात. चोराला योग्यायोग्य कृतीचा विचार रहात नाहीं. यामुळें त्याला धर्मध्यान, स्वाध्याय, धर्मकथेचें श्रवण वगैरे मुळींच होत नाहीं. कदाचित् तो शास्त्रश्रवण करित असला तरी त्याचें मन परद्रव्याकडे धांव घेत असतें. त्याला धर्माची यत्किंचित्ही श्रद्धा नसते. ज्याची जिनधर्मावर श्रद्धा असते त्या पुरुषाला चारित्रमोहनीय कर्माच्या उदयामुळें, व्रत, त्याग, संयम वगैरे क्रिया घडल्या नाहींत तरी अन्यायानें धन प्राप्त करून घेण्याची इच्छा होत नाहीं. चोरी करण्यानें दोन्ही लोक भ्रष्ट होतात म्हणून कोणीही न दिलेल्या दुसऱ्याच्या धनाची इच्छा करूं नये.

परस्त्री सेवन — परस्त्रीची इच्छा हें व्यसन तर सर्व अनर्थांचें मूल आहे. परस्त्रीलंपटाला इहपरलोकीं जीं घोर संकटें, आपत्ति, अपकीर्ति, अपयश, मरण, रोग, अपवाद, धनहानि, राजदंड, जगाचें वैर, दुर्गतिगमन, मारण, ताडन, बंदिगृहबंधन वगैरे प्राप्त होतात. यांचें वर्णन वचनद्वारें करितां येत नाहीं.

सारांश, याप्रमाणें वर्णिलेल्या सात व्यसनापासून अलिप्त राहणें योग्य आहे. यांचा त्याग केला म्हणून आपलें कोणतेंही नुकसान होत नाहीं. उलट या व्यसनांचा ज्यांनीं त्याग केला त्यांची सर्व दुःखें नाहींशीं होतात, अपकीर्ति टळते व त्याची नरकादि दुःखापासून सुटका होऊन सुख प्राप्त होतें.

**अनर्थदंडव्रताचे अतिचार**

**कन्दर्पं कौत्कुच्यं मौखर्यमतिप्रसाधनं पंच ।**
**असमीक्ष्य चाधिकरणं व्यतीतयोऽनर्थदण्डकृद्विरतेः ॥ ८१ ॥**

**अर्थ**– कंदर्प, कौत्कुच्य, मौखर्य, अतिप्रसाधन आणि असमीक्ष्याधिकरण हे पांच अनर्थदंडव्रताचे अतिचार आहेत.

**भावार्थ**– १ चारित्र मोहनीय कर्माच्या उदयानें उत्पन्न होणाऱ्या विशेष रागभावामुळें हास्यमिश्रित बीभत्स वचन बोलणें यास कंदर्प म्हणतात. २ त्याच कर्माच्या उदयानें प्राप्त होणाऱ्या तीव्र रागामुळें बीभत्स शब्द उच्चारून, मनवचनकायेनें बीभत्स ( निंद्य ) क्रिया करणें यास कौत्कुच्य म्हणतात. ३ निरर्थक बडबड करणें यास मौखर्य म्हणतात. ४ अधिक वस्तूंचा विनाकारण संग्रह करणें यास अतिप्रसाधन म्हणतात. ५ निष्कारण मनवचनकायांची प्रवृत्ति करीत राहणें यास असमीक्ष्याधिकरण म्हणतात. याचे तीन भेद आहेत. रागद्वेष उत्पन्न करणाऱ्या काव्य–श्लोक,

गाण्यांचें चिंतन करणें यास मनअसमीक्ष्याधिकरण म्हणतात. दुसऱ्याच्या मनवचनकायेला बिघड-विणाऱ्या खोट्या गोष्टी सांगणें यास वचनअसमीक्ष्याधिकरण म्हणतात. कांहींही प्रयोजन नसतां जाणें, येणें, उठणें, बसणें, पळणें, आपटणें, फेंकणें, फलपुष्पपत्रादि तोडणें, विदारण करणें, टाकणें वगैरे यास कायअसमीक्ष्याधिकरण म्हणतात. याप्रमाणें अनर्थदंड व्रताचे पांच अतिचार आहेत ते सोडावे.

भोगोपभोगपरिमाण व्रत

**अक्षार्थानां परिसंख्यानं भोगोपभोगपरिमाणम् ।**
**अर्थवतामप्यवधौ रागरतीनां तनूकृतये ॥ ८२ ॥**

**अर्थ**— परिग्रहाचें जें प्रमाण केलें असेल त्यांत देखील लालसा कमी व्हावी म्हणून प्रयो-जनभूत इंद्रियांच्या विषयांची मोजणी करून ठेवणें याला भोगोपभोगपरिमाण व्रत म्हणावें.

**भावार्थ**— संसारी जीवांची इंद्रियांच्या विषयांवर अतिशय प्रीति असते. त्यामुळें व्रत, संयम, दया, क्षमादिक अनेक गुण त्याला प्राप्त होत नाहींत. अणुव्रत धारण केलेल्या पुरुषानें हिंसा, असत्य, चोरी, परस्त्रीसेवन, अपरिमाणपरिग्रह यापासून उत्पन्न होणारी अन्याय्य-विषयावरील प्रीति कमी केलेली असते. त्यामुळेंच त्याला व्रती अशी संज्ञा प्राप्त होते. न्याय्य विषय देखील तीव्र रागाला कारण आहेत असें जाणून ज्याला त्या विषयींही अरुचि उत्पन्न झाली असेल त्यानें ती आपली आसक्ति कमी करण्याकरितां म्हणून प्रयोजनभूत अशा इंद्रियांच्या विषयांचेंही प्रमाण बांधावें म्हणजे त्याला भोगोपभोगप्रमाण व्रत घडतें. व्रती पुरुषाला इंद्रियांच्या विषयामधील निरर्गल प्रवृ-त्तीचा निरोध करून भोगोपभोगांचें प्रमाण करण्यानें महान् संवर होतो. म्हणजे संवराला भोगोप-भोगाचें प्रमाण हेंही एक कारण आहे.

भोगोपभोगाचें लक्षण

**भुक्त्वा परिहातव्यो भोगो भुक्त्वा पुनश्च भोक्तव्यः ।**
**उपभोगोऽशनवसनप्रभृतिः पांचेन्द्रियो विषयः ॥ ८३ ॥**

**अर्थ**— एक वेळ ज्या वस्तूंचा भोग घेतला असतां पुन्हां त्या भोगण्या योग्य रहात नाहींत, अर्थात् त्याज्य होतात अशा वस्तूंना भोग म्हणतात. ज्या वस्तु वरचेवर भोगतां येतात त्यास उपभोग म्हणतात. अन्न, पान, पुष्प, गंध इत्यादि पंचेंद्रियाचे विषय हे भोग आहेत. व वस्त्र, डाग-डागीने, घर, वाहन वगैरे उपभोग आहेत.

**भावार्थ**— जे पदार्थ एकवेळां भोगतां येतात पुनः भोगतां येत नाहींत ते भोग म्हणावें. वरचेवर ज्यांचा भोग घेतां येतो त्यांना उपभोग म्हणावें. जसें जेवण हें अनेकप्रकारचें असलें तरी एकवेळच भोगतां येतें. याचप्रमाणें कर्पूरचंदनाचा लेप शरीराला लावणें, अथवा फुलांचा हार गळ्यांत घालणें, चमेली, हीना, मोतिया वगैरे सुगंधित अत्तरें वापरणें, नाटक खेळ वगैरे पाहणे, इंद्रजालांचे खेळ, स्तवनाचे व गाण्याचे शब्द ऐकणें वगैरे सर्व एकवेळ भोगतां येतात. हे पंचेंद्रियांचे

विषय भोग म्हणवितात. व वस्त्र, आभरण, स्त्री, सिंहासन, पलंग, महाल, वाद्यें, चित्रें वगैरे वरचेवर वापरता येतात, म्हणून यांना उपभोग म्हणावयाचें. या दोहोंचें प्रमाण करणाऱ्याला हें व्रत घडतें.

आतां ज्यांचें प्रमाण करणें योग्य नाहीं पण ज्यांचा यावज्जीव त्याग केला पाहिजे असे पदार्थ कोणते हें सांगतात.

**त्रसहतिपरिहरणार्थं क्षौद्रं पिशितं प्रमादपरिहृतये ।**
**मद्यं च वर्जनीयं जिनचरणौ शरणमुपयातैः ॥ ८४ ॥**

**अर्थ**– जिनेंद्र भगवंताच्या चरणाला शरण गेलेल्या सम्यग्दृष्टि पुरुषांना त्रसहिंसेचा त्याग करण्याकरितां मध, मांस व प्रमाद म्हणजे हिताहित विचाराविषयीं असावधानता न यावी म्हणून मद्य यांचा त्याग करावा.

**भावार्थ**– भगवंताच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या पुरुषानें त्रसजीवांची हिंसा न व्हावी म्हणून मध आणि मांसाचा अवश्य त्याग करावा. व बेसावधगिरी न व्हावी म्हणून दारूचा त्याग करावा. ज्याला या तीन गोष्टींचा त्याग नाहीं तो जिनाज्ञापराङ्मुख असून जैन नव्हे.

त्याग करण्यायोग्य पदार्थ

**अल्पफलबहुविघातान्मूलकमार्द्राणि शृंगबेराणि ।**
**नवनीतनिंबकुसुमं कैतकमित्येवमवहेयम् ॥ ८५ ॥**
**यदनिष्टं तद्व्रतयेद्यच्चानुपसेव्यमेतदपि जह्यात् ।**
**अभिसन्धिकृता विरतिर्विषयाद्योग्याद्व्रतं भवति ॥ ८६ ॥**

**अर्थ**– ज्या पदार्थांचें सेवन करण्यापासून फलप्राप्ति थोडी पण त्यांचें भक्षण करण्यानें अनंत जीवांचा घात होतो असे पदार्थ कांदे, मुळे, आलें वगैरे कन्दमूळ, व लोणी, लिंबाचीं फुलें, केवडा व केतकीचीं फुलें, इत्यादि अनंतकाय आहेत. यांचा त्याग करावा. एका शरीरांत अनंत जीव असणें याला अनंतकाय म्हणतात. आपल्या प्रकृतीस मानवत नसतील असे पदार्थ भक्षण करूं नयेत. व सेवन करण्यास अयोग्य पदार्थ असतील त्यांचाही त्याग करावा. जरी अनिष्ट आणि अनुपसेव्य पदार्थांचें सेवन केलें जात नाहीं तरी अभिप्रायपूर्वक ( समजून उमजून ) योग्य विषयांचाही त्याग केला म्हणजे व्रत घडतें.

**विशेषार्थ**– ज्या पदार्थापासून फक्त जिह्वेला रुचि प्राप्त होणें एवढेंच क्षुल्लक फल प्राप्त होणार, पण त्या पदार्थाचा एका केसाइतका सूक्ष्मकण भक्षण करण्यानें अनंतानंत बादर जीवांचा घात होतो असे कंदमूलादि पदार्थ, लिंबाचीं व केवड्याचीं फुलें वगैरे भक्षण करण्याचा त्याग करणें अवश्य आहे. याचप्रमाणें दुसरींही फुलें त्रसजीवांनीं भरलेलीं प्रत्यक्ष आपण पाहतों, त्यांचाही त्याग केला पाहिजे. कित्येक पदार्थ शुद्ध आहेत पण त्यांचें भक्षण केल्यापासून आपल्या शरीरांत

अनिष्ट पदार्थ खाऊ नयेत

वेदना उत्पन्न होतात, अथवा शूल उत्पन्न होतो, उदर उत्पन्न होतो, वातपित्तकफादि दोषांची वृद्धि होते, रक्तांत विकार प्राप्त होतो असे पदार्थ भक्षण करूं नयेत. याचप्रमाणें इतर दुःखाला कारण अशा इंद्रियविषयांचें सेवन करूं नये. ज्याला अत्यंत आसक्ति असेल, जो इंद्रियलम्पट असेल तो अनिष्ट वस्तूंचें भक्षण करीलच. आपणाला यापासून तीव्र वेदना प्राप्त होऊन कदाचित् मरण देखील प्राप्त होणार असें माहीत असूनही, त्या दुःखाला न जुमानतां जो जिह्वेच्या लालचीनें अनिष्ट पदार्थ भक्षण करितो, त्यास इंद्रियाच्या तीव्र आसक्तिमुळें महान् पापाचा बंध होतो. अनेक प्रकारच्या भोजनांच्या आस्वादामध्यें प्रीति केल्यानें व अनिष्ट भोजन केल्यानें रोग वृद्धिंगत होतात व आर्तध्यान प्राप्त होऊन दुर्गतीला जावें लागतें. याकरितां अनिष्ट पदार्थांचें भक्षण न करणें हेंच उत्तम.

कित्येक पदार्थ आपल्या कुलाला, व्यवहाराला व धर्माला मलिन करणारे आहेत. त्यांचें सेवन करूं नये. ते पदार्थ अनुपसेव्य आहेत असें समजावें. शंख, हस्तिदन्त, केश, कस्तूरी, गोरोचन इत्यादि पदार्थांनीं स्पर्शिलेलें अन्न व पाणी सेवन करूं नये. उंटिणीचें व गाढविणीचें दूध, गाईचें

**अनुपसेव्य पदार्थ खाऊ नयेत**

मूत्र, कफ, मलमूत्र, लाळ, उच्छिष्ट हें सेवन करूं नये. म्लेंच्छ, भिल्ल, अस्पृश्यशूद्र यांनीं स्पर्श केलेलें, अशुद्ध जागेंत पडलेलें, चर्मस्पर्श झालेलें, कुत्रा, मांजरांनीं स्पर्शिलेलें, मांसभक्षी व मद्यपानी लोकांनीं बनविलेलें असें कोणतेंही अन्न भक्षण करूं नये. लोकनिंद्य भोजनही ग्रहण करूं नये. या सर्वांना अनुपसेव्य म्हटलें आहे.

किडके धान्य भक्षण करण्यायोग्य नाहीं. याचें भक्षण केल्यापासून बुद्धिमध्यें विपरीतपणा प्राप्त होतो. सन्मार्ग व धर्म यापासून भ्रष्टता येते. 'राजवार्तिक' ग्रन्थांत लिहिलें आहे कीं,

**किडकें धान्य खाऊं नये**

भोग पांच प्रकारचा आहे, तो असा–ज्यांत त्रसजीवांचा घात होत असेल, जो प्रमाद उत्पन्न करणारा असेल, जो अनिष्ट असेल, अनुपसेव्य असेल व ज्यांत बहुवध होत असेल, असे पांच प्रकार आहेत. यांचा यावज्जीव त्याग करावा. ज्यांचा यावजीव त्याग करणें शक्य नसेल त्यांचा कालाची मर्यादा बांधून त्याग करावा. कित्येक वस्तुमध्यें त्रसजीवांचा घात होतो, कित्येक वस्तूंत अनंतजीव एकत्र होऊन त्यांचा घात होतो. जसें किडलेल्या अन्नांत आळ्या; किडे वगैरे हजारों जीव उत्पन्न होतात. किडलेलें अन्न खाण्यांत अप्रमाण त्रसजीवांचा घात होतो. जो धान्यसंग्रह करून ठेवितो त्याला तर किडलेल्या अन्नांतील हिंसेपेक्षा अगणित पाप लागतें. याकरितां पापाला भिणाऱ्या जैन गृहस्थानें चांगले शुद्ध पदार्थ दोन महिन्यापुरतें विकत घ्यावेत. ते संपल्यावर त्याचप्रमाणें पुनः ज्यांत कीड लागली नाहीं असें धान्य खरेदी करावें. थोडें घेतल्यानें तें चांगल्यारीतीनें पाहतां व शोधितां येतें. थोड्या धान्याचें काळजीपूर्वक शोधन करतां येतें. चांगला तपास करून न किडलेलें धान्य घ्यावें. अधिक धान्याचा संग्रह केला तर तें काळजीपूर्वक नीट पाहतां व शोधतां येत नाहीं. त्यांत कीड

लागली तर ज्यास्त नुकसान होणार म्हणून परतही करतां येत नाहीं. मग वरचेवर त्या पदार्थांना ज्यास्त कीड लागत जाते. व आपणास तर खाणें भाग आहे. त्यामुळें दररोज ते पदार्थ वरचेवर पाहावें लागतात. त्यांत असणारे अळ्या, किडे वगैरे पाखडून काढून स्वच्छ करावे लागतात. ते किडे दररोज एका पात्रांत भरून बाहेर सडकेवर टाकून यावे लागतात. त्याठिकाणीं त्या किड्यांचा मनुष्यांच्या अथवा पशूंच्या पायाखालीं चेंगरून घात होतो. याप्रमाणें प्रतिदिवशीं असंख्यजीवांच्या हिंसेचें पातक माथीं घ्यावें लागतें. दुसरें; एकदा धान्याला कीड लागली म्हणजे प्रतिदिवशीं त्यांत पहिल्याहून दुप्पट, चौपट, शंभरपट, हजारपट लहानमोठे किडे उत्पन्न होत जातात. ते सर्व घरांत, स्वैपाक घरांत, भिंतीवर, दारावर, खाण्यापिण्याच्या वस्तूंत, जमीनीवर, छतांत वगैरे ठिकाणीं पसरू लागतात. म्हणून लोभामुळें, आळसामुळें व अभिमानामुळें धान्याचा संग्रह अधिक करूं नये.

मूग, पावटे, उडीद व इतर पदार्थ ज्यावर पांढरी फुली उत्पन्न होते, त्यांत त्रसजीव असतात म्हणून ते खाऊं नयेत. पावसाळ्याचे चार महिन्यांत ज्यांत जीव उत्पन्न होण्याचा संभव असेल अशा वस्तूंचा संग्रह करूं नये. शहरांत अथवा मनुष्यवस्तीमध्यें राहण्यांत या गोष्टीचें सुख होतें कीं, आपणास जरूर लागेल त्यावेळीं पांच-चार दिवसांचें धान्य निर्दोष, बिनकिडकें असें दहा-पांच जागीं चौकशी करून विकत घेनां येतें. वर्षाकाळांत गूळ-साखरेंत किडे, मुंग्या वगैरे उत्पन्न होतात. सुंठ, अजमोदा-ओवा, वेलदोडा, सुपारी वगैरे पदार्थांना कीड लागते.

मोड आलेलें धान्य व मर्यादाबाह्य मिठाई त्याज्य

मनुके, पिस्ते, चारोळी, खोबरें वगैरे पदार्थांत अप्रमाणजीव उत्पन्न होतात. थंडहवेच्या संयोगानें गुळांत पुष्कळ जीव उत्पन्न होतात. हळद, धणें, मिरची, अमसूल यांनही पुष्कळ जीव उत्पन्न होतात. पुष्कळ दिवसाचे लाडू, घेवर, बर्फी वगैरे मिठाईमध्येंही जीव उत्पन्न होतात. या सर्व गोष्टींचा विचार मनांत आणून नेहमीं वस्तूंचा अल्पसंग्रह करावा. नेहमीं प्रत्येक पदार्थ पाहून शोधून घ्यावा. याप्रमाणें काळजीपूर्वक क्रिया करणें यांतच अहिंसा धर्म साधिला जातो.

पीठही पावसाळ्यांत तीन दिवस, हिंवाळ्यांत सात दिवस व उन्हाळ्यांत पांच दिवस, यानंतर भक्षण करूं नये. पीठ कधींही साठवून ठेऊं नये. त्यांत पुष्कळ जीव उत्पन्न होतात. दाळ, तांदूळ ज्यावेळीं तुम्हांस शिजवावयाचे असतील त्यावेळीं दोन तीन वेळां ते शोधून मग शिजवावेत. प्रश्नोत्तर श्रावकाचारांत 'सर्वाशनं च न ग्राह्यं दिन-द्वययुतं नरैः।' सर्व प्रकारचें भोजन ऐक रात्र उलटल्यानंतर जर दुसरी रात्र उलटली तर तें अभक्ष्य होतें असें म्हटलें आहे. यांत पाण्यांचा संसर्ग झालेल्या पक्वान्नाचाही समावेश होतो. याचप्रमाणें पुडी, मालपुवे, शिरा, वडे, कचोरी वगैरे पदार्थही अभक्ष्य आहेत. यांत पाण्याचा

पीठाची मर्यादा

---

१ टीपः— वरील श्लोकांत दोन दिवसानंतरचें भोजन भक्षण करूं नये असा अशन शब्दाचा अर्थ दिला आहे पण तो चुकीचा वाटतो. दाळभात वगैरे पदार्थ सहातासानंतर बहुतेक विटत जातात म्हणून ते अभक्ष्य होतात. श्री सदासुखजीनींही पुढें तशा अन्नाचा निषेध केलेला आहेच. पण वरील प्रश्नोत्तरमालेच्या श्लोकावरून गैरसमज करून घेऊन दोनदिवसाचें आंतील भोजन भक्ष्य समजूं नये.

अधिक संसर्ग असल्यानें त्यांतील रस चलित होतो. चपाती, खिचडी, भाजी वगैरे पदार्थ आधल्या दिवशीचे भक्षण करूं नयेत. पण जर त्याच दिवशीं हे पदार्थ विटले असतील तर तेही भक्षण करूं नयेत. रात्रौ तयार केलेलें कोणतेंही अन्न भक्षण करूं नये.

दहीदूधाची मर्यादा

दही पहिल्यादिवशीं विरजलेलें दुसऱ्या दिवसापर्यंत खावें. पुढें खाऊं नये. द्विदल दही व ताकाशी मिळून खाऊं नये. हें खाण्यांत हिंसेचा दोष लागतो. कारण हे मिश्रपदार्थ मुखांत जातांच त्यांत लाळेच्या संयोगानें सम्मूर्च्छन जीवांची उत्पत्ति होते. दूध धार काढल्याबरोबर गाळून दोन घटिकांच्या आंत तापवावें. दोन घटिकानंतर त्यांत संमूर्छन त्रसजीवांची उत्पत्ति होते. लोणी हेंही ताकांतून काढल्याबरोबर तत्काल तापवून त्याचें तूप करावें व तें शोधून भक्षण करावें. तूप, तेल, पाणी वगैरे कातड्याच्या बुदलींत ठेवलेले भक्षण करूं नयेत. कारण त्यांत ठेविल्यानें असंख्यात जीवांची उत्पत्ति होते. बुदलीं ही पशूंच्या शरीरावरील चामडें आंतील मांस काढून टाकून त्याला वडवून मातीचा साचा बनवून त्यावर तयार करितात. अशाप्रकारच्या कातड्यानें बनविलेल्या भांड्यांतील तेल, तूप वगैरे पदार्थ खाणें हें मांस भक्षण केल्याप्रमाणें आहे. यार्चा प्रवृत्ति या देशांत मुसलमानांचें राज्य झाल्यापासून सुरूं झाली आहे. जर कोठें चर्मस्पर्शाशिवाय तूप, तेल मिळत नसेल तर तुपाशिवाय भोजन करावें. फाल्गुन महिन्यानंतर तिळांत व शिंघाड्यांत पुष्कळ त्रसजीव उत्पन्न होतात म्हणून त्या महिन्यानंतर ते भक्षण करूं नयेत.

बुधलींतील तेल, तूप वर्ज्य

पाणी दुहेरी वस्त्रानें गाळून प्यावें, दुसऱ्याला पण गाळून पाजावें. पशूला देखिल गाळूनच पाजावें. अगालितजलानें स्नान, भोजन, वस्त्र धुणें वगैरे कोणतीही क्रिया करूं नये. पाण्याविषयीं अतिशय काळजी घेतली तरच दया पाळिली जाते. भांड्याचें मुखापेक्षा तिप्पट लांब व दुहेरी नवें कापड घेऊन तें दुसऱ्या पात्रांत गाळावें व गाळणें धुवून तें विसळलेलें अगालित पाणी जेथून आणिलें असेल तेथें नेऊन टाकावें. पाण्याविषयीं आपण इतकी काळजी बाळगली म्हणजे आपण जलकाय जीवांची दया केली असें म्हणतां येतें. गृहस्थाला या मर्यादेबाहेर जास्त सावधानी ठेवता येणार नाहीं म्हणून पाणी सांडतांना, घेतांना वरील क्रिया सावधानतेनें करावी.गाळलेल्या पाण्याची दोन घटिकांची मर्यादा आहे. त्यानंतर पुनः तें उपयोगांत आणावयाचें झाल्यास गाळलें पाहिजे. तापविलेलें पाणी दोन प्रहर म्हणजे सहा तासपर्यंत प्रासुक ( शुद्ध ) असतें. उकळी फुटेपर्यंत तापविलेलें आठ प्रहरापर्यंत ( चोवीस तास ) शुद्ध असतें, पुढें तें निरुपयोगी होतें.

सर्वत्र वस्त्रगालित जल वापरावें

कित्येक फळामध्यें त्रसजीवांचा घात होतो म्हणून तीं खाऊं नयेत. जसें बोर हें केवळ किड्यांचें घर आहे. भेंड्यामध्यें पुष्कळ आळ्या उत्पन्न होतात. वांगी, टरबूज, कोहाळा, जांभूळ,

आड़ू ( पीचफल ), बडवाल, (?) गोल अंजीर, कठूमर ( जंगली उंबर ), उंबराचें फल, पीळू ( औषधी फल ), बटाटे, जामफल ( टींडू ) अज्ञातफल, किडकें फल, चलितरस, साराफल, शाकभाजी, कन्दमूल, आलें, सलगम, प्याज ( कांदा ) लसूण, गाजर, किशोऱ्या, कचनार, महुआ, क्षीरवृक्षाचें फल, खिरनी वगैरे, लिंबोळ्या, केवडा, केतकी इत्यादिकांचीं फुलें, यामधील दोष प्रत्यक्ष किंवा शास्त्रावरून समजून येतात. शास्त्रांत वनस्पति दोन प्रकारची वर्णिली आहे. एक प्रत्येक वनस्पति व दुसरी साधारण वनस्पति, एका शरीरांत एक जीव असणें, यास प्रत्येक वनस्पति म्हणतात. व एक शरीर असून ज्यांत अनंतानंत जीव असतात त्यास साधारण वनस्पति म्हणतात. साधारण वनस्पति भक्षण करणें यांत अनंतानंत जीवांचा घात होतो. म्हणून ती खावूं नये हें योग्य आहे.

अभक्ष्य फळ व फुलें

ज्या वनस्पतींत रेषा प्रकट झाली नसेल, ज्याची कळी उमलली नसेल, ज्यांत पेली (पेरे, कांडें) प्रकट झाली नसेल व जी तोडिली असतां अगदीं बरोबर तुटली जाते, वेडीवांकडी तुटत नाहीं, अथवा जी कापिली जात नाहीं व फुटली जात नाहीं, ज्यांत अजून तंतू प्रगट झाला नाहीं तिला साधारण वनस्पति म्हणावें. यांच्या असंख्यात प्रदेशांत अनंतानंत जीव असतात.

साधारण वनस्पति

ज्या वनस्पतींत धारा, रेषा, कळी, वेरीं वगैरे फुटलेल्या दिसत असतील तिला प्रत्येक वनस्पति म्हणावें. जी वनस्पति तोडली असतां वांकडी तिकडी तुटते. चाकूनें कापल्यासारखी अगदीं साफ तुटत नाहीं, व जींत तार रेषा प्रगट झाले असतील त्या सर्व प्रत्येक वनस्पति जाणाव्या. कित्येक वनस्पति प्रथमतः साधारण असून अंतर्मुहूर्तांत त्याच प्रत्येक होतात व कित्येक साधारणच राहातात. पान, फूल, बी, डहाळी, [ कूंपल ] कोंवळीं पानें वगैरे सर्वांची साधारण प्रत्येक ओळखण्याची हीच खूण आहे. पानें जर सारखीं विभागलीं जातील तर त्यांना साधारण म्हणावें. इतर सर्व वृक्ष साधारण नव्हत. बिया, कूंपल जर समभंग होत असतील, त्यांत रेखा प्रकट झाल्या नसतील तोंपर्यंत त्यांना साधारण म्हणतां येईल. त्याशिवाय इतर साधारण नाहींत. याप्रमाणें वनस्पतीमध्यें कोणी साधारण कोणी प्रत्येक असतात. म्हणून अशा वनस्पतींचें भक्षण करण्यांत अनेक त्रस जीवांचा घात होतो. जिनधर्म धारण करणाऱ्यांनीं पापाच्या भीतीमुळें हरितकाय वनस्पतींचा त्याग करावा.

प्रत्येक वनस्पति

कोणी जिह्वालंपट बनूं नये. ज्यांना सर्व तऱ्हेचे हरितकाय त्याग करण्याचें सामर्थ्य नसेल त्यांनीं कंदमूलादि अनंतकायाचा तरी यावज्जीव त्याग करावा. पंचोदुंबर फळामध्यें प्रत्यक्ष त्रस जीव भरलेले दिसतात. याचप्रमाणें फल, पुष्प, शाकमात्रांत ही जीव भरलेले दिसून येतील. अशा सर्व भाजीपाल्यांचा, दहावीस ज्या आपणांस योग्य वाटतील त्या ठेवून, त्याग करावा. याशिवाय सर्व वनस्पतिकाय अठ्ठावीस लाख कोटि आहेत, त्यांचा तरी नियम करून आपल्या डोक्यावरील पापाचा

कंदमूलादि अनंत काय फलभाजीचा त्याग करावा

बोजा कमी करावा. हरितकायांचें प्रमाण करून बाकींचा त्याग करणाऱ्याला कोव्यवधि अभक्ष्यांचा दोष टाळतां येतो, हरितकायेंत कोणतींही पानें भक्षण करण्या योग्य नाहींत. त्रस जीवांची उत्पत्ति टाळतां येईल अशा इतर पुष्कळ पदार्थांचा त्याग करावा. त्याग केल्याशिवाय निरर्गल राहिल्यानें असंयमपणाचे आस्रव होतात. याकरितां हरितकाय भक्षण करण्यामध्यें नियम करणें जरूर आहे हें आपणांस दिसून आलेंच असेल.

ज्या अन्नावर बुरसा आला असेल, जें अन्न नासलें असेल, ज्यावर निळा, हिरवा, तांबडा बुरसा आला असेल तें अन्न भक्षण करूं नये. त्यांत अनंतानंत जीवांचा घात होतो. मोहाला कारण, प्रमादाला उत्पन्न करणारी, ज्ञानाला बिघडविणारी, जिह्वा व उपस्थइंद्रियाला विकल करणारी भांग, तंबाखु, ( छोंतरा ) अम्मल, हुक्का, जरदा वगैरे अभक्ष्य पदार्थांचें खाणें, पिणें जिनधर्मानुयायी पुरुषाला योग्य नाहीं. या अम्मली पदार्थापासून पराधीनपणा प्राप्त होतो. यांतून अफू खाणाऱ्या मनुष्याला जर एक क्षणभर ती प्राप्त झाली नाहीं तर त्याला जमिनीवरून पाय उचलणें अशक्य होतें. ती न मिळाल्यास जनावरासारखे पाय झाडूं लागतो, निर्लज्ज होऊन वाटेल त्याजपाशीं मागूं लागतो. त्याच्या डोळ्यांतून अश्रु येऊं लागतात. अफू मिळाली म्हणजे त्याला धुंदी चढते, जिभेची तृष्णा वाढते, व स्वाध्याय, धर्मश्रवण, व्रत, संयम, उपोषणें तर होण्याचें नांवच नको. त्याची बुद्धि धर्मापासून पराङ्मुख होऊन उत्तम आचरणांचा नाश होतो. सारांश अफू खाण्याची संवय इतकी वाईट आहे म्हणून तिचा त्याग करावा.

बुरसलेलें अन्न व अंमलीपदार्थ खाऊं नये

हुक्का पिणाऱ्याची अवस्था पहा. हुक्क्याच्या मलिनपणानें व दुर्गंधीनें गुडगुडीच्या पाण्यांत तंबाखु व धुराच्या संयोगानें जीवांची उत्पत्ति होते. तें पाणी जेथें टाकावें तेथील षट्काय जीवांची हानि होते. सदाचरणी पुरुष हुक्का ओढणाऱ्या पुरुषाच्याजवळ दुर्गंधीमुळें बसत नाहींत. वारंवार हुक्का ओढणाऱ्या मनुष्याच्या घरांत सदैव त्रिस्तत्र पेटलेला असतो. हुक्का नीच पुरुषांनीं ओढावा. उत्तम पुरुषांनीं ओढणें योग्य नाहीं. हुक्का पीणाऱ्यांना गाडीवान, सैस, मेणेवाले भोई, वगैरे लोकांची संगती आवडते. उत्तम पुरुषांची सोबत त्याला आवडत नाहीं. हुक्केचें व्यसन असणाऱ्या मनुष्याला ओढण्याची तल्लफ झाली असतांना ती न मिळाल्यास वर वर्णिलेल्या लोकांजवळून चिलीम मागून आणतो. तो ओढल्यावांचून रहात नाहीं. तो पुढें पुढें या व्यसनाच्या इतका स्वाधीन होतो कीं, त्याला हुक्का न ओढला तर मोठा रोग उत्पन्न होतो असें वाटतें, अथवा पोटांत गोळा उठतो अथवा मलावरोध होतो असें वाटतें. याप्रमाणें आपल्याच कृतीमुळें अनेक मोठमोठीं दुःखें व्यसनी पुरुष ओढून घेतो व यामुळें त्यांस व्रत, उपोषणादि उत्तम कार्यावर पाणी सोडावें लागतें.

हुक्का पिऊं नये

तंबाखू हें महान् अशुद्ध द्रव्य आहे. हें तोंडांत धरून अनेक लोक मलमूत्र विसर्जन करीत

असतात. ही बहुतेक नागवेलीच्या पानाबरोबर खात असतात. प्रसंगीं पान न मिळाल्यास ती तशीच तोंडांतून चघळल्याशिवाय त्याला चैन पडत नाहीं. कोणी पुरुष

तंबाखूचे दुष्परिणाम

रस्त्यांतून मोठा डौलदार पोषाख घालून जात असतां तोंडांत पानसुपारीच्या विड्याबरोबर तंबाखु चघळीत पिचकाऱ्या थुंकीत जाण्यांत त्यांना फार अभिमान वाटतो. त्यावेळीं त्यांना त्या विड्याबरोबर लावलेला चुना किती दिवसांचा असून त्यांत किती घाण असते याची कल्पनाही मनांत येत नाहीं. नीच जातीचे लोक आपले हात पाय न धूतां अंग खाजवीत खाजवीत जरदा तयार करण्याकरितां तंबाखु मळीत असतात. त्यांना उष्टयाची ग्लानि नसते. जरदा खाणारे लोक आपल्या घरांतील प्रत्येक जागा थुंकून घाण करितात. रस्त्यानें जात असतां पशुदेखील आपलें तोंड हलवीत नाहींत. परंतु हे व्यसनी पुरुष पशूपेक्षां देखील कनिष्ठ बनून रस्त्यानें तंबाखु खात जात असतात. यांच्या तोंडाची दुर्गंधी येते. यांच्या तंबाखूची पिचकारी जेथें पडेल तेथील माशा, डांस, किडे, मुंग्या वगैरे मोठमोठे त्रस जीव मरण पावतात व पंचस्थाव-रांचा घात होतो. व्रत, संयम, उपवास, स्वाध्याय, जपजाप्य, शुभभावना अशा पुरुषाला घडत नाहींत. जरदा भक्षण करणाऱ्याची बुद्धि आत्महित करण्याकडे वळत नाहीं. ते संयम धारण करण्यास अयोग्य होतात. त्यांचे ठिकाणीं दया, क्षमा, शील, संतोष, इंद्रियविजय वगैरे उत्तम गुण कधींहि उत्पन्न होत नाहींत. ते नेहमीं पापक्रिया, मायाचार, कपटक्रिया यामध्येंच तल्लीन असतात. त्यांची अनेक व्यसनाकडे प्रवृत्ति होते. तंबाखु खाणाराला दुसऱ्यापुढें हात पसरण्याची लाज वाटत नाहीं. तो नीच पुरुषापाशीं-देखील याचना करून पण तंबाखु खातो. मद्यमांस खाणारे ज्यावेळीं मद्य पीत असतात व हुक्का पीत असतात त्यावेळीं देखील त्याजपासून जरदा अथवा विडी मागून ओढण्यास त्यास शरम वाटत नाहीं. जर्दा खाणाऱ्या पुष्कळ माणसांना निरखून पाहतां त्यांतून एकालाहि परमार्थबुद्धि अथवा परलोकासाठीं निर्मल आचरणाची बुद्धि होत नाहीं. या तंबाखूच्या भक्षणापासून हीनाचाराची वृद्धि होते. व्यसनी पुरुषाची अशी स्थिति होते कीं नाहीं याबद्दल तुम्हीं आपल्या मनांत विचार करून पहा जर याचा अनुभव तुमच्या मनास वाटला तर जरदा किंवा तंबाखु खाण्याचा त्याग करा. तंबाखूचें व्यसन असणाराला जर एक दिवस तंबाखू नसली तर तळमळ होते, पोटांत दुखूं लागते व अनेक रोग उत्पन्न होतात. सारांश, तंबाखू खाणें म्हणजे अनेक प्रकारच्या मोठमोठ्या रोगाला आमंत्रण करणें आहे. याकरितां याचा त्याग करावा.

भांग पिणें हें पण आपल्या मोठेपणाचा नाश करणारें आहे. भंगड मनुष्याचा दर्जा कमी होतो. त्याची जिव्हेंद्रियाची लंपटता वाढत जाते. त्याचीं इंद्रियें शिथिल होतात. प्रमाद उत्पन्न होतो. पुष्कळ वेळ झोंप घ्यावी, पुष्कळ गोड पदार्थ भक्षण करावे अशी इच्छा

भांग पिऊं नये

उत्पन्न होते. तो पापी इंद्रियांच्या विषयांचे स्वाधीन होतो. त्याचें ज्ञान शिथिल होतें. तो वहिमी बनतो. भांग पिणाऱ्या मनुष्याला गोड भोजनाची अतिशय इच्छा होते व तें मिळालें म्हणजे आपण सुखी झालों असें वाटतें. त्याला आत्मज्ञान

अथवा धर्माचें ज्ञान मुळींच असत नाहीं. बाह्य आचरणहि त्याचें भ्रष्ट होतें. भांगेमध्यें हजारों त्रस जीव उत्पन्न होतात. पावसाळ्यांत त्यांत अपरिमित त्रस जीवांची उत्पत्ति होते. भंगड लोक तयार केलेली भांग न गाळतां तशीच चोटल्याबरोबर पितात.

याचप्रमाणें अफू खाणें, हें ही शरीराला अपायकारक आहे त्यामुळें शरीराचा आकार बिघडून जातो व सदाचार नाहींसा होतो असा नियम आहे. निशा (धुंदी) सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्राचा घात करणारी आहे. हे सर्व अंमली पदार्थ अनर्थदंडांत येतात व व्यसनांत मोडतात, व अभक्ष्यामध्येंहि यांचा अंतर्भाव आहे. याकरितां ज्याला मनुष्य-जन्म, जिनधर्म व उत्तमकुल प्राप्त झालें आहे व त्याची सफलता करावी असें वाटत असेल त्यानें वर वर्णन केलेल्या व्यसनांचा व निशा येणाऱ्या अम्मली पदार्थांचा त्याग करावा.

अफू खाऊं नये

रात्रौ भोजन करण्याचाही त्याग करणें कां योग्य आहे या विषयीं थोडा विचार करूं या. रात्रीं भोजन करणाऱ्याला प्रथमतः यत्नाचारपूर्वक क्रिया करितां येत नाहींत व त्यामुळें त्याला जीवहिंसा घडतेच. रात्रीं किडे, मुंग्या, माशा, चिलटे, मुंगळे, वगैरे जीव अन्नांत येऊन पडतात. दिवा लावून भोजन करूं म्हटलें तर दिव्याच्या संयोगानें दूर दूरचे जीव येऊन अन्नावर पडतात. दुसरें असें कीं, जिनधर्मी पुरुषांनीं जर रात्रीं जेवण्याचा प्रघात पाडला तर पुढच्या पिढीचा सन्मार्ग बिघडविल्यासारखें होणार आहे. जैनांनींहि जर इतर लोकांप्रमाणें रात्रौ चूल पेटविणें, स्वयंपाकाची जागा सारवून अथवा धुवून साफ करणें वगैरे हिंसा होणारीं कर्में केलीं तर त्या कृत्यापासून प्रत्यहीं अनिवार्य हिंसा उत्पन्न होऊन अनेक जीवांचा घात होत राहील. मग अशा प्रकारचीं कर्में करणाऱ्याला जैन नांव तरी कसें शोभेल ? व त्याजकडून जैनधर्म तरी कसा पाळिला जाईल ? यावर कोणी म्हणेल कीं, आम्ही रात्रीं आरंभ करणार नाहीं पण कोरडें फराळ, लाडू, पेढे, बर्फी, जिलबी, पोहे, दूध वगैरे भक्षण करूं. यांत तर आरंभ होत नाहीं ना ? याचें समाधान असें, दिवसा भोजन करावयाचें सोडून रात्रौ भोजन करणाराच्या मनांत तीव्र राग उत्पन्न होतो व भोजनाविषयीं इतकी उत्कट इच्छा उत्पन्न होणें हीच महान् हिंसा आहे. जसें अन्नाच्या घासाविषयीं प्रीति व मांसाच्या घासाविषयीं प्रीति या दोन्ही जरी प्रीतीच खऱ्या पण त्या समान नव्हेत. याचप्रमाणें दिवसा भोजनाचा अनुराग हा रात्रीं भोजनाच्या अनुरागासारखा नाहीं. रात्रिभोजन करणाऱ्याला पशूप्रमाणें हिंसा—अहिंसेचा विचार राहत नाहीं. त्याला व्रत तपश्चरण होऊं शकत नाहीं. अनादि कालापासून विदेह क्षेत्रामध्यें व भारत क्षेत्रांत चौथ्या कालापासून जैन दिवसांच भोजन करीत आले आहेत. दिवसांतून एक वेळ किंवा फार तर दोन वेळां जेवण्याचा त्यांचा क्रम चालत आलेला आहे. ते रात्रीं भोजन कधींहि करीत नसत. असें असून आतां जर ते रात्रिभोजन करूं लागले, रात्रीं चूल पेटविण्याचा आरंभ करूं लागले, जमीन सारवूं लागले, रात्रौ पाणी सांडू लागले व जागा झाडून काढूं लागले तर त्यांना भोजन करण्यांत, शाकभाजी तयार करण्यांत, पुरुषाला जेऊं

रात्रीं जेऊं नये

घालण्यांत, मागाहून बायका–पोरें, गडी–माणसें जेवण्यांत, धुण्यांत, सारवण्यांत, झाडण्यांत व भांडी स्वच्छ करण्यांत दोन प्रहर रात्र उलटून जाईल. या सर्व क्रिया करण्यांत अनेक जीवांचा संहार होईल. अशा स्थितींत जैनांनीं यत्नाचारपूर्वक क्रिया करावी म्हणून आचार्यांनीं सांगितलेलें व्यर्थ झालें. रात्री क्रिया करण्यांत किडे, मुंग्या, मुंगळे वगैरे ताटांत येऊन पडतात. चूलींत पडतात, शाकभाजींत पडतात व पाणी भरून ठेवलेल्या भांड्यांतही पडतात. दिव्याच्या अथवा चुलींतील विस्तवाच्या निमित्तानें माशा, मच्छर, चिलटे, पतंग वगैरे अनेक जीवांचा दररोज होम होऊं लागतो. दिवसांहि आरंभ व रात्रींहि घोर आरंभ या योगानें सतत पापक्रिया घडत राहते व त्याच्या उदयामुळें कुटुंबांतील सर्व जीवांवर विविध संकटें प्राप्त होतात. रात्रींदेखील ज्याला, मोठमोठ्या धंदारोजगारापासून क्षणभर जर विश्रांति मिळत नाहीं त्याला धर्मसेवन, शास्त्रपठण, तत्त्वचर्चा, शंकासमाधान, सामायिक, जपजाप्य, शुभध्यान वगैरे क्रिया कशा साधणार ? या सर्व कारणांकरितां जिनेंद्रमार्गाला अनुसरून वागणारीं माणसें रात्रीं भोजन करीत नाहींत. अशी ही सनातन व उत्तम अशी आजपर्यंत चालत आलेली रीत आहे. जैन लोक रात्रीं भोजन कधींही करीत नाहींत अशी सर्व इतर लोकांत प्रसिद्धिही आहे. अशा प्रकारची उत्तम परंपरा, आपली कीर्ति, व भोजनाची शुद्धता सोडून कोणी क्षुधापीडित होऊन रात्रीं दूध, पेढे, बर्फी, वगैरे पदार्थ फराळ म्हणून अथवा औषध पाणी घेईल तर त्यानें आपल्या उत्तम जैनपणाला, उत्तम आचाराला, उत्तम धर्माला जलांजलि दिली असें म्हणावें. तो सन्मार्गापासून भ्रष्ट व उन्मत्त आहे असें समजावें. त्याच्या बाह्य अभ्यंतर सर्व क्रिया अधर्माकडे प्रवृत्ति करविणाऱ्या आहेत असें समजावें.

खऱ्या जैनानें रात्रीं तयार केलेलें अन्न दिवसां भक्षण करूं नये. याचप्रमाणें त्यानें मिथ्या धर्म धारण करणाऱ्या मांसभक्षी लोकांबरोबर भोजन करूं नये. नीच जातीशीं मैत्री ठेऊं नये. देवतेला अर्पण केलेलें अन्न भक्षण करूं नये. हस्तिदंताचे चुडे व लोंकरीचें वस्त्र नेसून तयार केलेलें अन्न ग्रहण करूं नये. मांसभक्षण करणाऱ्याचें घरीं आपण स्वतः स्वयंपाक करून जेऊं नये. नीच जातीचें घरीं पण जेऊं नये. अताराचे घरचा अर्क, माजूम, सरबत व इतर कोणतेहि पदार्थ भक्षण करूं नये.

हिंसक लोकाबरोबर अन्नव्यवहार करूं नये

जलचर, स्थलचर, नभश्चर पंचेंद्रियादिक जीवांच्या मांसाचेही अर्क काढले जातात. पुष्कळ प्रकारची दारू बनवून त्याला अर्क असें नांव दिलेलें असतें; पुष्कळ जीवांच्या अंड्यांतील रसानें पण अनेक बाटल्या भरलेल्या असतात. म्हणून कोणतेहि अर्क घेऊं नयेत. अतार लोक मध, सरबत, मुरब्बा, माजूम, रसायनें व अनेक जीवांचीं इंद्रियें, जीभ, काळीज व शुष्कमांस पण विकत असतात. अशा नीच पुरुषांच्या येथील कोणतीही वस्तु उत्तम कुलांत उत्पन्न झालेल्या माणसाची बुद्धि भ्रष्ट करते. म्लेंच्छांनीं हिंदुस्थानांतील सर्व लोकांस आपलें उच्छिष्ट सेवन करवून भ्रष्ट करण्याकरितांच कीं काय हीं

कोणताही अर्क घेऊं नये

दुकानें चालविली असावीत असें वाटतें. कोट्यावधि कसायांच्या दुकानाइतकें एका अताराचें ( निषिद्ध औषधें विकणाऱ्याचें ) दुकान आहे असें समजावें.

या देशांतील राजे लोकांनीं हिंदु धर्माच्या रक्षणाकरितां संवत् १८२२ पर्यंत अताराचीं दुकानें घालूं दिलीं नाहींत. पण पुढें कालवशात् पापप्रवृत्ती फैलावत चालली. आतां तर उत्तम कुलांतील लोक पण यांचेकडून अर्क, इंजेक्शन व औषधादिक घेऊन खाऊं लागले आहेत. उच्च लोक म्लेंच्छाचें उच्छिष्ट व मांस, मदिरा भक्षण करूं लागले, आतां ब्राह्मणपणा, वैश्यपणा, महाजनत्व कोठें राहिलें ? सर्व कुलें भ्रष्ट झालीं. व या अभक्ष्य भक्षणाच्या प्रभावानें लोकांची बुद्धि सत्यधर्मपराङ्मुख बनली. डाक्टरांच्या औषधानेंच रोग नाहींसा होतो असा तरी नियम कुठें आहे ? यांचीं वाईट औषधें पीत असूनहि लोक धर्मभ्रष्ट होऊन मरण पावतात असें दिसून येतें. ज्याला दुर्गतीचा बंध झाला असेल त्यालाच त्यांच्या औषधापासून आराम झाला आहे असें समजावें.

मद्यमांसयुक्त इंग्रेजी औषधें घेऊं नये

राजा अरविंदाला दाहज्वर झाला असतां अनेक उपाय केले असतांही तो नाहींसा झाला नाहीं. अखेर त्याच्या राजवाड्याच्या छतावर लढणाऱ्या पालींच्या शरीरांतील रक्ताचा थेंब शरीरावर पडला त्यावेळींच त्याला समाधान वाटलें. तेव्हां त्या दुष्टानें आपल्या मुलांस सांगितलें कीं, मला रक्ताची एक विहीर भरून द्या म्हणजे मी त्यांत क्रीडा करीन व त्या योगानें माझा सर्व ज्वर नाहींसा होईल. तेव्हां त्याच्या मुलांनीं पापाला भिऊन लाखेच्या रंगानें एक विहीर भरून दिली. राजाला विहीर पाहून फार संतोष झाला. व तींत तो दररोज क्रीडा करूं लागला. जेव्हां मुलानें कपटबुद्धिनें आपणास रक्ताची म्हणून लाखेच्या रसाची विहीर भरून दिली असें राजाला समजलें त्यावेळीं त्याला अतिशय क्रोध आला व आपल्या हातीं सुरी घेऊन मुलांचा वध करण्यास तो पळत निघाला असतां रस्त्यांत पडला व आपल्याच हातांतील सुरीच्या घातानें मरण पावून नरकास गेला. याच प्रमाणें ज्याची दुर्गति व्हावयाची असेल त्यालाच डॅाक्टराच्या औषधापासून आराम वाटेल व त्याचीच प्रवृत्ति तें औषध घेण्याची होईल. याकरितां प्राण गेला तरी बेहेत्तर ! पण सहा महिन्याच्या बालकाला देखील डाक्टराचें औषध देणें योग्य नाहीं. एकदां धर्मविघात झाला म्हणजे अनंतकाल गेला तरी पुनः धर्म प्राप्त होणार नाहीं. याकरितां जिनधर्म धारण करणाऱ्यांनीं आपल्या शरीराचे शतशः तुकडे तुकडे झाले तरी अभक्ष्य भक्षण करणें योग्य नाहीं.

राजा अरविंदाचें उदाहरण

बाजारांतील दुकानचें पीठ ( चून ) कधींहि भक्षण करूं नये. कारण दुकानदार लोक तें पीठ चांभार, खाटीक वगैरे लोकांकडून दळवितात. शिवाय तें तशाच माणसाकडे तयार केलेलेंही मिळतें. दुकानदार विकत घेतात. त्यामध्यें दीर्घकाल राहिल्यानें अनंत जीव उत्पन्न होतात. याचप्रमाणें अतिशय नासलेलें व किडकेंदेखील अन्न विकत घेऊन दुकानदार दळवीत असतात. दुकानदाराकडून अस्पृश्य व इतर

बाजारी पीठ खाऊं नये

लोक तें नेत असतांना आपले हात त्यांत घालतात. कधीं कधीं लग्नकार्यांत नेलेलें पीठ उरल्यानें तें दुकानदारास परत विकतात. दुकानदार तें पुनः पिठांत मिळवून विकतात. म्हणून तें खाणें योग्य नाहीं.

भाडोत्री भांडीं घेऊं नये

धर्मशाळेंतील अथवा दुकानदारांच्या येथील भांडीकुंडीं पितळेचीं, कांशाची व तांब्यालोखंडाचीं स्वयंपाकजेवणाला घेऊं नये. कारण दुकानदार लोक भाड्याच्या आशेनें कोणाही मांसभक्षी अथवा दुराचारी लोकांना तीं देत असतात. ज्याला आपलें आचरण निर्मल ठेवावयाचें असेल त्यानें दोनचार भांडीं प्रवासांत नेहमीं आपल्याबरोबर ठेवावीं. व जेथें जाणें पडेल तेथें पैसा अधिक देऊन पीठ ताजें तयार करवून घ्यावें. जर दळण्याचें साधन कोठें उपलब्ध नसलें तर खिचडी अथवा गव्हाची खीर करून खावी.

बाजारची मिठाई खाऊं नये

बाजारची मेवामिठाई पण भक्षण करूं नये. त्यांत असलेल्या तूप-साखरेला कांहीं मर्यादाच नसतें. लोभी व निंद्य कर्म करणाऱ्याला आचरणाची मर्यादा रहात नाहीं. हे हलवाई मैदा भिजवून सडवितात त्यामुळें तो आंबट होतो. त्यांत अनंत जीव उत्पन्न होतात. त्याची जिलेबी केली जाते. या वस्तु भक्षण करण्या-योग्य नाहींत.

सर्वसामान्य वर्ज्यावर्ज्य विचार

दह्यांत साखर वगैरे मिळवून पुष्कळ वेळ ठेऊं नये. त्याची दोन मुहूर्ताची मर्यादा आहे. त्यानंतर खाऊं नये. आपल्या भाऊबंद आप्तमित्राबरोबर एका ताटांत बसून जेवूं नये. कुतरा, मांजर, मनुष्य वगैरे कोणाचेंही उच्छिष्ट भक्षण करूं नये. गाई, बैल, म्हैस वगैरे पशूंच्या उष्ट्या पाण्यानें स्नान करूं नये. मग तें पाणी पिण्याचें तर लांब राहो. अन्नाची, साखरेची, लापशीची बनविलेलीं मनुष्यतिर्यंचाची आकृति भक्षण करूं नये. देवदेवी, व्यंतर, क्षेत्रपाल वगैरेंच्या पूजेच्या संकल्पानें तयार केलेलें अन्न ग्रहण करूं नये. मांसभक्षण करणाऱ्याच्या पात्रांत भोजन करूं नये. आपलीं भांडीं मांसभक्षण करणाऱ्याला देऊं नये. न्हाव्याच्या पात्रांतील पाण्यानें श्मश्रु करवूं नये. रजस्वला स्त्रीनें स्पर्श केलेलें भांडें जेवण्यास घेऊं नये. विकार उत्पन्न होतील अशीं वस्त्राभरणें अनुपसेव्य जाणून ग्रहण करूं नये. उत्तम कुलामधील पुरुषांस योग्य नव्हेत अशीं वेश्येचीं अथवा विटपुरुषांचीं वापरण्याचीं वस्त्रें, शिपाई अथवा इतर म्लेंच्छ लोकांनीं घालण्याचे पोषाख, स्वामी, योगी, फकीर,

वस्त्रप्रावरणांचा विचार

भांड वगैरे लोकांचे पेहराव परिणाम बिघडविणारे आहेत. त्यापासून आप-णांस व इतरास विकार उत्पन्न होतात, म्हणून अशीं वस्त्रप्रावरणें न वापरतां आपल्या पदवीस योग्य व जगांत संभावितपणाला शोभणारीं अशींच वस्त्र-प्रावरणें वापरणें योग्य आहे. सारांश, हा कीं, संसार-परिभ्रमणाला कारण पंचेंद्रियाचे विषयावरील लालसा ही मुख्य आहे. त्यांतही जिह्वाइंद्रिय व उपस्थइंद्रिय या दोहोंची

लालसा इहपरलोकांला बिघडविणारी आहे. या दोन इंद्रियांची लालसा ज्याला अधिक आहे तो संसारांत मनुष्यजन्मांत असूनही पशुसारखा आहे. कारण पशु याच दोन

इंद्रियनिग्रहाचा विचार

इंद्रियांच्या लालसेनें परस्पर भांडून मरण पावतात. मनुष्य जन्मांतही कलह करणें, मारणें, मरणें, निर्लज्ज होणें, उच्छिष्ट भक्षण करणें, दीन भाषण करणें, दान घेणें, अभक्ष्य भक्षण करणें, इत्यादिक सर्व नीच कर्माठायीं प्रवृत्ति रसनेंद्रियांच्या लालसेनेंच होत असते. विचार करा भोगभूमींतील व देवलोकांतील नाना-प्रकारच्या भोगांनीं जर कधीं तृप्ति झाली नाहीं तर आतां ह्याला यत्किंचित् जिह्वेचा स्पर्शमात्र स्वाद फारच थोडावेळ टिकणारा आहे, यापासून तृप्ति कशी होईल ? हा स्वाद घास गिळल्यानंतर रहात नाहीं व पहिल्यांदाही नसतो. अशा प्रकारच्या तृष्णेला वाढविणाऱ्या आहारांतील लुब्धतेचा त्याग करावा. इंद्रियांवर नियंत्रण ठेऊन सरस, नीरस भोजन जसें कर्मानें प्राप्त होईल त्यांत संतोष धारण करावा. जे अभक्ष्याचा त्याग करितात व फक्त धर्मप्राप्तीसाठीं शरीराचें रक्षण व्हावें याच हेतूनें भोजन करितात ते सर्व, पापांचा त्याग केल्यानें देवलोकाला पात्र होतात.

ज्याला भोगोपभोगांचें प्रमाण करावयाचें असेल त्यानें अगोदर आपले परिणाम दृढ राहतील किंवा नाहीं याचा पूर्ण विचार करावा. आपल्यांतील रागद्वेषांचा अंश इतका कमी झाला आहे, याहून जास्त घटण्याचा सध्यां संभव नाहीं. तसेंच आपलें सामर्थ्य अमुक प्रकारचा संयोग, दुःख, वियोग, प्राप्त झालें असतांना सहन करण्याइतकें आहे, यापेक्षां अधिक दुःख सहन करणारे आहे कीं नाहीं ? या सर्व गोष्टींचा विचार करून व्रत घ्यावें. देशाची परि-

शक्त्यनुसार व्रतग्रहण

स्थिति आपल्या निर्वाहाला योग्य अशी आहे किंवा नाहीं ? काल वेळ अनुकूल आहे कीं नाहीं ? आपली अवस्था व्रत धारण करण्यायोग्य आहे कीं नाहीं ? आपणाला कोणी प्रसंगीं सहाय होण्यासारखें आहे कां ? आपलें व्रत कोणी बिघडविण्यास कारण होईल काय ?. याचाही विचार करावा. शरीर निरोगी आहे काय ? शुद्ध आहार मिळेल किंवा नाहीं ? भोजन वगैरे आपल्या स्वाधीन आहे किंवा पराधीन आहे ? अशा प्रकारचें व्रत करण्यापासून अथवा अमुक प्रकारचा त्याग केल्यापासून आपल्या स्त्री–पुत्र–धनी वगैरे लोकांना दुःख होईल कीं काय ? आपण स्वतंत्र आहोंत किंवा परतंत्र आहोंत ? याही पण गोष्टींचा विचार करून ज्यायोगें आपलें परिणाम निर्मल राहून व्रत सांभाळलें जाईल असाच मर्यादित कालापुरता नियमरूप त्याग करावा अथवा यमरूप म्हणजे यावज्जीव त्याग करावा.

कित्येक पदार्थ यावज्जीव त्याग करण्यासारखे आहेत. जसें– ज्यांत त्रस जीवांचा उघड उघड घात होत असेल, अनंत जीवांचा नाश होऊन आपल्या कुलांत ते पदार्थ सेवन करण्यायोग्य नसतील, ज्यापासून मद उत्पन्न होत असेल, मद्य, मांस, मध, लोणी या

यमरूप त्यागाचे पदार्थ

चार महाविकृति, व रात्रिभोजन, द्यूतक्रीडादि सप्तव्यसनें, कोणीही न दिलेल्या परद्रव्यांचें ग्रहण, त्रसहिंसा, स्थूल असत्य, अन्याय्य परिग्रह, अनगल पाणी, आणि अनर्थदंड हे यावज्जीव त्याग करण्यायोग्य आहेत.

यांचा नियम करितां येत नाहीं. या सर्व क्रियांपासून सदैव पापबंध होतो. याचा त्याग केला म्हणून शरीराला कोणताहि त्रास उत्पन्न होईल असें नाहीं, किंवा मोठें संकट प्राप्त होतें असेंतलाही भाग नाहीं. यांचा त्याग करण्यासाठीं धनाची जरूरी लागत नाहीं. मोठी शक्ति अंगांत असली पाहिजे असें नाहीं. यजमान अथवा स्त्री, मित्र, पुत्र, कुटुंबादिकांच्या सहाय्याचीही अपेक्षा लागत नाहीं. यांचा त्याग करण्याकरितां कोणाची सल्ला घ्यावी लागत नाहीं. यांचा त्याग करण्यांत शीत, उष्ण, क्षुधा, तृषा वगैरेची बाधा, पीडा सोसावी लागत नाहीं, हे सर्व आपल्या स्वाधीन आहे. यांचा त्याग करण्यापासून परिणाम शुद्ध होऊन मनाला आनंद होतो. याकरितां अशी दुर्लभ सामग्री प्राप्त झाली असतां भोगोपभोगांचें प्रमाण बांधणें हें श्रेष्ठतम कर्तव्य आहे.

संकटाकालीं घाबरूं नये

प्रबल कर्माच्या उदयानें मनुष्य प्राण्याला कदाचित् परदेशांत पराधीन होऊन राहण्याचा प्रसंग आला, भयंकर रोग प्राप्त झाल्यानें पराधीन व्हावे लागलें, म्हातारपण प्राप्त झाल्यानें उठण्या बसण्याची शक्ति कमी झाली, पुत्र, मित्र, बंधुवर्ग या पैकीं कोणाचेंही सहाय्य न मिळालें, डोळे आंधळे झाले, कान बहिरे झाले, फार दिवस लांबणारा रोग येऊन प्राप्त झाला, कैदखान्यांत दुष्टांच्या स्वाधीन होऊन रहावें लागलें, दुष्ट लोकांनीं शुद्ध आहार बिघडवून टाकला व जबरदस्तीनें आपल्या-बरोबर जेऊं घातलें, तरी अंतरंगांत त्यानें व्रतसंयमाचे परिणाम सोडूं नयेत. बाह्यतः अशा संकट प्रसंगीं पंचनमस्कार–मंत्राचा जप चालू करावा. म्हणजे तो या मंत्राच्या ध्यानप्रभावामुळें शुद्ध होतो. कारण बाह्य शरीरादिक पवित्र अथवा अपवित्र असो. तें मलमूत्र रक्तानें भरलेलें असो, अशाही स्थितीला न जुमानतां जो मनुष्य परमात्म्याचें एक सारखें स्मरण करीत असतो तो बाह्यतः व अंतरंग दोन्ही बाजूंनीं पवित्रच आहे असें समजावें. कारण शरीर हें सात धातु, मलमूत्रांनीं भर-लेलें अनेक रोगांचें घर आहे, हें एका क्षणांत कुष्ठरोगानें व्यापून जातें, यावर हजारों फोड उत्पन्न होतात, त्यांतून मलमूत्र, रक्त वाहूं लागतें, अशा अवस्थेंत व्यवहारशुद्धि कशी रहावी ? व निर्धन एकट्या पुरुषाला सहाय्य तरी कोण होणार ? याकरितां धर्मवान् पुरुषांनीं अशुभ कर्माच्या उदयानें प्राप्त होणाऱ्या संकटाला व रोगाला धैर्य धारण करून तोंड द्यावें. घाबरून दुःख करीत बसूं नये. अशुभ कर्माचा उदय ही एक प्रकारची निर्जरा आहे असें समजून अंतरंगांत वीतराग भावानें संसारदेहभोगांचें स्वरूप चिंतन करावें, द्वादशभावनांच्या चिंतनानें कर्माच्या उदयाहून आत्मस्वरूप वेगळें आहे अशी जाणीव होते. आणि आत्मा हा ज्ञाता द्रष्टा शुद्ध आहे असें समजूं लागते. राग द्वेष, हर्ष, विषाद, ग्लानि, भय, लोभ, ममता वगैरे आत्म्याचे मल धुवून टाकून आपणांस शुद्ध मानावें म्हणजे त्याला खरी शुद्धता प्राप्त होते.

**भोगोपभोग परिमाण व्रताचे दोन भेद**

**नियमो यमश्च विहितौ द्वेधा भोगोपभोगसंहारे ।**
**नियमः परिमितकालो यावज्जीवं यमो ध्रियते ॥ ८७ ॥**

**अर्थ**–भगवंतांनीं भोग आणि उपभोग कमी करण्याकरितां यम आणि नियम अशा दोन प्रकारचें भोगोपभोग परिमाण व्रत सांगितलें आहे. त्यांतून कालाची मर्यादा बांधून त्याग करणें याला नियम, व शरीरांत प्राण आहे तोंपर्यंत त्याग करणें याला यम असें म्हटलें आहे.

**भावार्थ**–ज्यांचा एक वेळ उपभोग घेतां येतो अशा आहारादिक पदार्थांना भोग म्हणावें. ज्यांचा वारंवार भोग घेतां येतो अशा वस्त्रभरणादिकांना उपभोग म्हणावें. या भोगोपभोगांचे यम आणि नियम असे दोन भेद आहेत. त्यांतून ज्या भोगोपभोगांचे एक मुहूर्त, दोन मुहूर्त, एक प्रहर, दोन प्रहर, एक दिवस, दोन दिवस, पांच, दहा, पंधरा दिवस, एक, दोन, चार, सहा महिने, एक वर्ष, दोन वर्ष याप्रमाणें कालाची मर्यादा करून त्याग करणें त्याला नियमप्रमाण म्हणतात. जी वस्तु आपल्या नित्य उपयोगाची असून शुद्ध असेल तिची मर्यादा बांधूनच नियमरूप त्याग करावा. पण जी वस्तु आपल्या उपयोगाची नाहीं व परिणामहि बिघडविणारी असून सदोष असेल तिचा यावज्जीव यमप्रमाणरूप त्याग करावा हें योग्य आहे.

या भोगोपभोगप्रमाण व्रतापासून अनेक प्रकारच्या पापांचें आस्रव येण्याचें बंद होतें. इंद्रियें वश होतात. रागभाव अतिमंद होतो. व्यवहार शुद्ध होतो. मन वश होतें, व्यवहार व परमार्थ दोन्ही निर्मल होतात. यामुळें हें व्रत आत्म्याचें हित करणारें आहे असें होतें.

**या व्रताचे फायदे**

विरुद्ध भोग असतील ते तर सोडावेच. पण जे अविरुद्ध असतील ते पण आपलें शक्तिप्रमाण, देश काल पाहून कांहीं दिवस सोडावे. रात्रीची मर्यादा करून त्यांतून ही पुनः एक घटका, दोन घटका, चार घटकांची मर्यादा करून सोडीत गेल्यानें कर्माची निर्जरा होते.

**याच व्रताविषयीं विशेष**

**भोजनवाहनशयनस्नानपवित्राङ्गरागकुसुमेषु ।**
**ताम्बूलवसनभूषणमन्मथसंगीतगीतेषु ॥ ८८ ॥**

**अर्थ**–भोगोपभोगप्रमाण व्रतामध्यें दररोज नियम करीत जावें. मी आज एक वेळ, दोन वेळ, तीन वेळ, अथवा चार वेळ आहार घेईन, याहून अधिक वेळ घेणार नाहीं. किंवा आज सबंध दिवसांत अमुक जातीचें अन्न, इतके रस व इतके प्रकार भक्षण करीन, अधिक प्रकार भक्षण करणार नाहीं. वाहन म्हणजे हत्ती, घोडा, उंट, पालखी, रथ, गाडी, नांव, जहाज यांचें प्रमाण बांधावें. पलंग, बाज वगैरेवर शयन करण्याचा नियम करावा. मी पलंगावर शयन करीन अथवा जमिनीवर निजेन. आज एक किंवा दोन वेळां स्नान करीन अथवा आज स्नान करणार नाहीं. पवित्र असा अंगराग म्हणजे केशरचंदन कर्पूराची उटी लावीन किंवा लावणार नाहीं. फुलें किंवा फुलांची माळा, डागडागीने वगैरे परिधान करीन अथवा करणार नाहीं. विडा (तांबूल) वेलदोडे, लवंग, सुपारी वगैरे खाईन किंवा खाणार नाहीं. वस्त्रांचें प्रमाण म्हणजे आज इतकीं वस्त्रें वापरीन, अधिक वापरणार नाहीं. कामसेवन करण्याचा, नाच पाहण्याचा, गाणीं गाण्याचा, वेश्यागीत करविण्याचा, सिंहासन, खुर्ची, चौरंगावर वगैरे

बसण्याचा नियम करावा. याप्रमाणें नेहमीं आपल्या उपयोगांत येणाऱ्या भोगोपभोग पदार्थांचा नियम करणाऱ्याला भोजनपान करीत असूनही संवर घडून येतो.

**कालाची मर्यादा सांगतात**

**अद्य दिवा रजनी वा पक्षो मासस्तथर्तुरयनं वा ।**
**इति कालपरिच्छित्या प्रत्याख्यानं भवेन्नियमः ॥ ८९ ॥**

**अर्थ**–*अद्य म्हणजे आज एक घटका, एक प्रहर, एक मुहूर्त, दिवा म्हणजे दिवस, रजनी* म्हणजे रात्री, पक्ष म्हणजे पंधरवाडा, मास म्हणजे एक महिना ऋतु म्हणजे दोन महिने, अयन म्हणजे सहा महिने याप्रमाणें कालाचें प्रमाण बांधून त्याग करणें यास नियम म्हणतात.

याप्रमाणें भोगोपभोगपरिमाण व्रताचें वर्णन करून पुढें या व्रताचे अतिचार सांगतात.

**भोगोपभोग व्रताचे अतिचार**

**विषयविषतोऽनुपेक्षानुस्मृतिरतिलौल्यमतितृषानुभवौ ।**
**भोगोपभोगपरिमाव्यतिक्रमाः पंच कथ्यन्ते ॥ ९० ॥**

**अर्थ**–विषय हे संताप वाढविणारे आहेत, यांच्या निमित्तानें मरण देखील प्राप्त होतें. म्हणून पंचेन्द्रियांच्या विषयाला विष म्हटलें आहे. यांत आपल्या परिणामांतील राग कमी न होणें याला अनुपेक्षा अतिचार म्हणतात. पूर्वी जे विषय भोगिले असतील त्यांचें वारंवार स्मरण करणें यांस अनुस्मृति अतिचार म्हणतात. विषय भोगीत असतांना अतिशय आधाशीपणानें अथवा आसक्तीनें भोगणें याला अतिलौल्य अतिचार म्हणतात. भविष्यकालीं विषय भोगण्याची अतिशय इच्छा लागून रहाणें याला अतितृष्णा अतिचार म्हणतात. आणि विषय भोगीत नसून ही " जणूं काय प्रत्यक्ष आपण विषयोपभोग घेत आहोंत " असे परिणाम होणें यास अनुभवातिचार म्हणतात. याप्रमाणें भोगोपभोगपरिमाणव्रताचे हे पांच अतिचार टाकून व्रत शुद्ध करावें.

याप्रमाणें श्रीस्वामिसमंतभद्राचार्य–विरचित रत्नकरंड श्रावकाचाराच्या मूलश्लोकांचे हिंदी भाषेतील वचनिकेच्या अनुवादांतील हा तिसरा अधिकार संपला.

आतां चार शिक्षाव्रताचें स्वरूप–निरूपण करण्याकरितां सूत्र सांगतात—

**देशावकाशिक शिक्षाव्रत**

**देशावकाशिकं वा सामयिकं प्रोषधोपवासो वा ।**
**वैयावृत्यं शिक्षाव्रतानि चत्वारि शिष्टानि ॥ ९१ ॥**

**अर्थ**– देशावकाशिक, सामायिक, प्रोषधोपवास आणि वैयावृत्य हीं चार शिक्षाव्रतें आहेत.

**भावार्थ**– या व्रतापासून गृहस्थपणांत राहून मुनिव्रताचें शिक्षण मिळतें म्हणून यांना शिक्षाव्रत असें म्हटलें आहे.

देशावकाशिकव्रताचें लक्षण

देशावकाशिकं स्यात्कालपरिच्छेदनेन देशस्य ।
प्रत्यहमणुव्रतानां प्रतिसंहारो विशालस्य ॥ ९२ ॥

**अर्थ**– अणुव्रतें धारण करणाऱ्यांनीं दररोज कालाची मर्यादा करून विस्तीर्ण प्रदेशाची मर्यादा कमी करीत जाणें हें देशावकाशिक व्रत होय.

**भावार्थ**– दिग्व्रतामध्यें पूर्वी दहा दिशांना जाण्यायेण्याची, व वस्तु नेण्या आणण्याची जी मर्यादा यावज्जीवपर्यंतची केली होती, तींतून आतां दररोज कांहीं क्षेत्र, कालाची मर्यादा करून कमी करणें याला देशावकाशिकव्रत म्हणतात. जसें पूर्व दिशेला दिग्व्रतांत दोनशें कोसांची मर्यादा यावज्जीव केली होती.त्यांतून आतां दररोज दहावीस, पांचपंचवीस कोसांची मर्यादा कमी करावी म्हणजे पूर्वी मर्यादा केलेल्या प्रदेशापेक्षां कमी प्रदेशांत जाणें येणें वगैरे क्रियेकरितां त्या बाहेर जाणार नाहीं, असें जाणें येणें व व्यवहाराचें प्रमाण वरचेवर कमी करीत जाणें याला देशावकाशिक-व्रत म्हणावें.

देशावकाशिकव्रतांतील क्षेत्राच्या मर्यादा

गृहहारिग्रामाणां क्षेत्रनदीदावयोजनानां च ।
देशावकाशिकस्य स्मरन्ति सीम्नां तपोवृद्धाः ॥ ९३ ॥

**अर्थ**– तपोवृद्ध म्हणजे गणधरदेवांनीं घर, कटक, गांव, क्षेत्र, नदी, वन आणि योजन अशा देशावकाशिकव्रताच्या मर्यादा सांगितल्या आहेत. या हद्दींचें उल्लंघन करणार नाहीं असा नियम करावा.

देशावकाशिक व्रतांत कालाची मर्यादा

संवत्सरमृतुरयनं मासचतुर्मासपक्षमृक्षं च ।
देशावकाशिकस्य प्राहुः कालावधिं प्राज्ञाः ॥ ९४ ॥

**अर्थ**– वर्ष, ऋतु, अयन, महिना, चार महिने, पंधरवडा, सूर्यनक्षत्र अथवा दिवसनक्षत्र याप्रमाणें देशावकाशिक व्रताच्या कालाचें प्रमाण करावें असें ज्ञानी पुरुषांनीं सांगितलें आहे.

देशावकाशिकाचा प्रभाव

सीमान्तानां परतः स्थूलेतरपंचपापसंत्यागात् ।
देशावकाशिकेन च महाव्रतानि प्रसाध्यन्ते ॥ ९५ ॥

**अर्थ**– देशावकाशिक व्रत धारण करणाऱ्यानें ज्या मर्यादा केल्या असतील त्याच्या बाहेरील सूक्ष्म पांच पातकांचा त्याला त्याग झाल्यामुळें त्याचीं अणुव्रतेंदेखील महाव्रतासारखीं होतात.

देशावकाशिकाचे पांच अतिचार

प्रेषणशब्दानयनं रूपाभिव्यक्तिपुद्गलक्षेपौ ।
देशावकाशिकस्य व्यपदिश्यन्तेऽत्ययाः पञ्च ॥ ९६ ॥

**अर्थ**– आपण केलेल्या मर्यादेच्या बाहेर आपल्या कांही प्रयोजनाकरितां आपल्या चाकरास, मित्रास, मुलाबाळास पाठविणें व त्यांस 'हें काम करून या' असें सांगणें याला प्रेषणनावाचा अतिचार म्हणतात. मर्यादेच्या बाहेर असलेल्या पुरुषाबरोबर वार्तालाप (संभाषण) करणें व त्याला शब्दांच्या खुणेनें समजावून देणें यास शब्दातिचार म्हणतात. मर्यादेच्या बाहेरील माणसास बोलावणें, व वस्त्र–प्रावरणादि पदार्थ सांगून आणवून घेणें हा आनयनातिचार होय. बाह्य क्षेत्रामध्यें उभा असलेल्या पुरुषाला खूण करण्याकरितां आपलें स्वरूप दाखविणें हा रूपाभिव्यक्ति अतिचार आहे. आणि मर्यादेच्या बाहेरील क्षेत्रांत वस्त्र किंवा खडे, लांकूड वगैरे फेंकून आपण येथें आहोंत असें त्यास समजाविणें याला पुद्गलक्षेपातिचार म्हणतात. याप्रमाणें देशावकाशिकव्रताचे हे पांच अतिचार सोडणें योग्य आहे.

सामायिक व्रताचें स्वरूप

**आसमयमुक्तिमुक्तं पञ्चाघानामशेषभावेन ।**
**सर्वत्र च सामयिकाः सामयिकं नाम शंसन्ति ॥ ९७ ॥**

**अर्थ**– सामयिक म्हणजे परम शांतभावाला प्राप्त झालेल्या गणधर देवांनीं सामायिक नामक व्रताची फार प्रशंसा केली आहे. त्यांनीं सर्वत्र म्हणजे मर्यादा केलेल्या व मर्यादा न केलेल्या अशा दोन्ही क्षेत्रांत मनवचनकाय, कृत, कारित, अनुमोदना यांहीं करून कांहीं कालपावेतों संपूर्ण पंच पापांचा त्याग करणें याला सामायिक असें म्हटलें आहे.

**भावार्थ**– कालाची मर्यादा करून संपूर्ण पापांचा, कांहीं वेळ त्याग करणें हें सामायिक होय.

सामायिकामधील आसन.

**मूर्द्धरुहमुष्टिवासो बन्धं पर्यङ्कबन्धनं चापि ।**
**स्थानमुपवेशनं वा समयं जानन्ति समयज्ञाः ॥ ९८ ॥**

**अर्थ**– सामायिक करणारानें आपले केश मोकळे असल्यास बांधावे, हातावर हात ठेऊन मुष्टिबंध करावा. वस्त्र मोकळें असल्यास त्याला गांठ घालावी, पद्मासन किंवा उभें कायोत्सर्गासन घालावें. सामान्यपणें पद्मासनच असावें. हें सामायिकाचें चिह्न आहे असें शास्त्रकार म्हणतात.

**भावार्थ**– सामायिक करणारानें कालाची मर्यादा केली असेल तोंपर्यंत पांच पातकांचा संपूर्णपणें त्याग करून उभें रहावें. अथवा पर्यंकासन घालून बसावें. पर्यंकासनांत आपल्या डाव्या हातावर उजवा हात ठेवावा. आपले मस्तकावरील केश बांधावे व वस्त्र विखरूं नये म्हणून त्याला गांठ द्यावी.

सामायिकाला योग्य स्थान

**एकान्ते सामयिकं निर्व्याक्षेपे वनेषु वास्तुषु च ।**
**चैत्यालयेषु वापि च परिचेतव्यं प्रसन्नधिया ॥ ९९ ॥**

**अर्थ**– सामायिक करणें तें एकांत ठिकाणीं, निरुपद्रव स्थळीं, वनांत, घरांत, देवळांत करावें किंवा इतर अशाच ठिकाणीं प्रसन्न मनानें करावें.

**भावार्थ**– ज्या जागीं मनाला विक्षेप चंचलता उत्पन्न करणारी सामग्री नसेल, पुष्कळसे असंयमी लोकांचें जाणें येणें नसेल, अनेक प्रकारचे लोक जमून वादविवाद करून गडबड करीत नसतील, स्त्री नपुंसक यांचें जाणें येणें नसेल, आजुबाजूला नाच-रंग गाणें-बजावणें होण्याचा संभव नसेल, पशुपक्ष्यादिकांचा ज्या ठिकाणीं उपद्रव नसेल, फार थंडी, कडक उन्ह, सोसाट्याचा वारा, व दुधार पाऊस होण्याचा संभव नसेल, डांस, मच्छर, किडा, मुंगी, भुंगे, मधमाशा, सर्प विंचू वगैरे प्राण्यांपासून बाधा होण्याचा संभव नसेल, अशीं ठिकाणें सामायिक करण्यास योग्य आहेत. तें एकांत स्थान असो, निर्जन वन असो, जुन्या बगीच्यांतील बंगला असो, घर असो, देऊळ असो अथवा धर्मात्मा लोकांचें प्रोषधोपवास करण्याचें स्थान असो. त्या ठिकाणीं चित्त प्रसन्न करून सामायिक करावें.

सामायिकाची आणखी सामग्री

**व्यापारवैमनस्याद्विनिवृत्त्यामन्तरात्मविनिवृत्त्या ।**
**सामयिकं बध्नीयादुपवासे चैकभुक्ते वा ॥ १०० ॥**

**सामायिकं प्रतिदिवसं यथावदप्यनलसेन चेतव्यम् ।**
**व्रतपंचकपरिपूरणकारणमवधानयुक्तेन ॥ १०१ ॥**

**अर्थ**–शरीराची हालचाल आणि मनाची व्यग्रता बंद करून, अंतःकराणाचे विकल्प सोडून, उपवासाच्या दिवशीं किंवा एकभुक्तीच्या दिवशीं सामायिक धारण करावें. आळस सोडून दररोज वर सांगितल्या प्रमाणें तें वाढवीत जावें. कारण तें पांच व्रतांना परिपूर्ण करण्यास कारण आहे.

सामायिक करितांना मनाचे विकल्प सोडावे

**विशेषार्थ**–सामायिक करण्याविषयीं उद्युक्त झालेल्या श्रावकांनीं संपूर्ण आरंभादि पाप क्रियांचा त्याग करून व मनाचे विकल्प सोडून सामायिक करावें. कोणी पर्वतिथीच्या निमित्तानें उपोषण करितात, कोणी एक भुक्तीच्या दिवशीं करितात. कोणी प्रतिदिवशीं करितात, अथवा पूर्वाह्न, मध्याह्न व अपराह्न अशा तीन कालीं दोन घटकांची मर्यादा करून करितात.

पर्यंकासन घालून निश्चल बसावें

सामायिक हें एकांत जागीं निश्चल पर्यंकासनानें बसून अथवा कायोत्सर्गासन (उभे राहून) घालून, अंग उपांग चंचल होणार नाहींत अशा रीतीनें, काष्ठपाषाणाच्या अचल मूर्तीप्रमाणें निश्चल होऊन, दहा दिशांकडे न पाहतां, आपल्या अंगोपांगाकडे न पाहतां, कोणाशीहि न बोलतां, संपूर्ण पंचेंद्रियांच्या विषयापासून मन आंवरून, सर्व चेतन अचेतन पदार्थावरील रागद्वेष हर्ष, विषाद, वैर, स्नेह वगैरे सोडून करावें. त्यावेळीं सर्व जीवांविषयीं मैत्रीभाव ठेवावा व उत्तम क्षमा धारण करावी व मनांत पुढील विचार आणावे.

" मी सर्व जीवावर क्षमा धारण करितों. माझें जगांतील कोणाही जीवांशी वैर नाहीं. मी

उपार्जन केलेलें कर्मच माझे वैरी असून त्यां अज्ञानानें क्रोध, लोभ, अभिमान धारण करून विना-कारण विपरीत विचार मनांत आणिले. माझ्या अभिमानाला पुष्टी दिली नाहीं त्याला, ज्यानें माझी स्तुती केली नाहीं व माझ्या कर्तव्याची प्रशंसा केली नाहीं त्याला, माझा ज्यांनीं आदरसत्कार करून उत्थापन करून योग्य स्थान दिलें नाहीं त्याला, कोणी माझे दोष प्रगट केले त्याला, कोणी माझ्या म्हणण्याप्रमाणें वागला नाहीं म्हणून त्याला, वस्त्र भोजनादिक व धनधान्यादिक सामग्री प्राप्त होऊं दिली नाहीं त्याला याप्रमाणें सर्वांना वैरी मानिलें ही सर्व माझ्या मी कषायापासून उत्पन्न झालेली वैरबुद्धि आतां सोडून मी क्षमा धारण करितों व त्या सर्व जीवांनींही अज्ञानामुळें कषायांच्या स्वाधीन झालेलों समजून मजवर क्षमा करावी.

सामायिकाचे वेळीं चिंतनाचा प्रकार

वैर बुद्धि सोडून क्षमा धरावी

याप्रमाणें वैरविरोधाची बुद्धि सोडून मी सर्वांविषयीं साम्यधारण करून सामयिकाचा अंगीकार करतों व जें दोन घटिकांचें ( पंचेचाळीस मिनि-टाचें ) प्रमाण केलें आहे तेवढ्या वेळेंत मनवचन कायेनें सर्व पंचेंद्रियांचे विषय व आरंभ यांचा त्याग करून पंचपरमेष्ठीचें ध्यान करीत राहतो. " याप्रमाणें सामायिकाचे वेळीं प्रतिज्ञा करून पंचनमस्कारांच्या अक्षरांचें ध्यान करीत, त्यांच्या गुणांचें स्मरण करीत, जिने-श्वराच्या प्रतिबिंबाचें चिंतन करीत रहावें आणि आपल्या ज्ञानदर्शन--स्वभावाहून राग द्वेष भिन्न आहेत असा विचार करावा.

द्वादश अनुप्रेक्षा व षोडशकारण भावनांचें चिंतन करावें. चार मंगल पदें, चार उत्तम पदें, चार शरणपदांचें स्मरण करावें, चोवीस तीर्थंकराचें स्तवन करावें, एकेका तीर्थंकराची स्तुति व पंचगुरुंचें स्तवन यांच्या अर्थावर एकाग्रतेनें विचार करावा, प्रतिक्रमण करीत असतां सर्व दिवसभर घडलेल्या दोषांचें सायंकाळीं चिंतन करावें, व रात्रीं घडलेल्या दोषांचें सकाळीं चिंतन करावें. हा दुर्लभ मनुष्यजन्म व यांत प्राप्त झालेला परम वीतराग सर्वज्ञांनीं उपदेशिलेला हा धर्म, अनंत कालांत आपणास प्राप्त झाला. याबद्दल धन्यता मानून यांतील एक पलदेखील धर्मचिंतनाशिवाय व्यर्थ न जावा असा सदैव मनांत विचार करीत रहावें.

अनुप्रेक्षा व षोडश कारण भावनांचें चिंतन

आज जिनदर्शन, स्तवन, पूजन, ध्यान, धारणा, धर्मचिंतन, स्वाध्याय, पात्रदान वगैरे क्रियांत आपला किती वेळ खर्च झाला व व्यापारारंभक्रिया, इंद्रियांच्या विषयपोषक-क्रिया, व व्याव-हारिक विकथा, प्रमाद, निद्रा, कामसेवन, भोजन, पान वगैरे क्रियेंमध्यें किती काल गेला याचा आपल्या मनाशीं विचार करीत असावें. आपल्या मनवचन कायांची प्रवृत्ति रागादिकसंसारकार्याकडे अधिक झाली किंवा परमार्थाकडे अधि क झाली हें पहावें. याप्रमाणें सर्व दिवसाच्या कर्तव्याचें सायंकाळीं चिंतन करावें व रात्रौ घडलेल्या कार्याचें सकाळीं चिंतन करावें. कारण व्यवहारांत नेहमीं

दररोजच्या पाप-पुण्याचा हिशेब पहावा

आपण असें पाहतों कीं, जो पांच रुपयांचें भांडवल घेऊन धंदा करतो तो पण दररोज संध्याकाळीं आपणास नफा तोटा किती झाला हें पाहत असतो. ज्यांना पूर्व पुण्याईच्या प्रभावानें या जन्मीं प्राप्त झालेला उत्तम धर्म, सत्संगति, मनुष्यजन्म, इंद्रियपरिपूर्णता हेंच कोणी एक धन याचा व्यवहार करणारे ज्ञानी पुरुष आपल्या आत्म्याची होणारी हानि किंवा वृद्धि कशी पाहणार नाहींत? जर तो आपला नफा तोटा पाहणार नाहीं तर परलोकाहून आणलेल्या त्याच्या धर्मधनाचा नाश होईल, व त्याला नरक तिर्यंचादिक वा नरक निगोदादि दुर्गतीमध्यें पडावें लागून नष्ट व्हावें लागेल. याकरितां धर्मधनाच्या वृद्धिसाठीं एका दिवसांत दोन वेळां तरी निदान त्या धर्मधनाच्या संरक्षणाची काळजी घेतली पाहिजे.

**पापक्रियांचा पश्चात्ताप करावा**

कषायामुळें जी आपली मनवचनकायेची दुष्ट प्रवृत्ति झाली असेल त्याबद्दल वरचेवर आपली निंदा करून घेतली पाहिजे. ती अशी " अरेरे मी आज दुष्ट चिंतन केलें, शरीरानें दुष्ट क्रिया केली, वचनानें निंद्य बीभत्स शब्द उच्चारिले या योगानें अशुभ कर्माचा बंध झाला, धर्माला दूषण लाविलें, अपकीर्ति करून घेतली. त्या कर्मांची आठवण होण्यानें मला फारच वाईट वाटत आहे. माझें हृदय पश्चात्तापानें जळत आहे. मोहकर्म महान् बलवान् आहे. मी आपल्या दुष्ट परिणामाला, पाप उत्पन्न होतें त्यामुळें दुर्गतीला जावें लागतें, यापासून कोणतेंही प्रयोजन सिद्ध होत नाहीं, आयुष्य क्षणभंगुर आहे, मी केलेलें कर्म मलाच भोगावें लागणार आहे, वगैरे सर्व मी जाणतों, एवढेंच नव्हे पण रात्रंदिवस यांच्या दुष्परिणामांचें चिंतन करीत असूनही अजून माझ्या मनांतून अन्य जीवांविषयीं वैर व विषयावरील प्रेम नाहींसें होत नाहीं. हा जबरदस्त मोहाचा प्रभाव आहे. या मोहकर्माचा नाश करून विजयी झालेल्या पंचपरमेष्ठींचें मी स्मरण करितों. त्यायोगानें मोहकर्मांपासून उत्पन्न झालेले रागद्वेषादिक भाव व कामादि विकार, क्रोध, मान, माया, लोभादिक नाहींसें होतील. ज्याप्रमाणें जिनेंद्रदेवांनीं वीतरागता प्राप्त करून घेतली आहे तशीच मलाही प्राप्त होवो. याच अभिप्रायानें मी शरीरावरील ममत्व सोडून पंचपरमेष्ठींचें ध्यान करीत आहे.

**त्रसस्थावर हिंसेबद्दल पश्चात्ताप**

अज्ञानामुळें पूर्वीं ज्या भूमिच्छेदनादि क्रियांनीं पृथ्वीकायघात केला असेल, अवगाहन, सिंचन, स्नान वगैरेंनीं जलकायिक जीवांची विराधना केली असेल, विझविणें, पेटविणें, कुटणें वगैरे क्रियांनीं अग्निकाय जीवांची हत्या केली असेल, आणि पंखे वगैरे साधनांनीं वायुकाय जीवांचा घात केला असेल, कंद, मूल, साल, पान, फूल, डहाळी, फांटे, गवत, वेल, वेलफल वगैरे तोडून अथवा झाडेंझुडपीं उपटून, शिजवून, वाटून वगैरेंनीं वनस्पतिकाय जीवांची विराधना केली असेल, त्या सर्व क्रियांपासून उत्पन्न झालेल्या पापकर्माचा नाश परमेष्ठीच्या जाप्याच्या प्रभावापासून होऊं दे. व त्या परमेष्ठीच्या ध्यानप्रभावानें माझे परिणाम षट्कायजीवांच्या घातापासून परांङ्मुख होऊन संयमभावाची प्राप्ति होऊं दे. असें चिंतन करावें. याचप्रमाणें " माझ्या जाण्यायेण्यादि क्रियांत, उठण्या-

बसण्यांत, संकोचविस्तारादि क्रियेंत, जेवणाखाण्यांत, पदार्थ उचलण्यांत, ठेवण्यांत; चूल पेटविणें, जमीन सारवणें, पाणी शिंपडणें वगैरे क्रियांत; सेवा, कृषि वाणिज्य, लेखन, शिल्प वगैरेंनीं उपजीविका करण्यांत, गाडी, घोडा इत्यादिकांचें वाहन ठेवण्यांत मजकडून यत्नाचाररहित प्रवृत्ति झाल्यामुळें द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय जीवांची विराधना झाली असेल ती मिथ्या होवो ".

" आरंभादिक व्यवहारांत अनेक प्रकारच्या पापक्रियांपासून कल्याण होत नाहीं, संसारामध्यें भ्रमण करावें लागतें, नरक प्राप्त होतो, एकेन्द्रिय तिर्यंच योनीमध्यें अनंतानंतकाल क्षुधा, तृषा, मारण, ताडन, बंधन, छेदन, वगैरे अनेक दुःखें भोगावीं लागतात.याकरितां या आरंभांत घडणाऱ्या हिंसेपासून उत्पन्न झालेल्या कर्माचा नाश होण्याकरितां व पुढें आरंभी हिंसा न घडावी म्हणून मी आतां पंच–नमस्कार–पदांना शरण जातों.

**असत्यवचनाचा पश्चात्ताप**

अज्ञानामुळें अथवा प्रमादामुळें म्यां असत्य वचन उच्चारिलें, शिवी दिली, बीभत्स भाषण केलें, मर्मच्छेदी शब्द बोललों, कर्कश व कठोर वचन उच्चारिलें, कोणाला चोरीचा, कोणाला व्यभिचाराचा कलंक लाविला, धर्मात्मा, ज्ञानी, तपस्वी, शीलवान् पुरुषावर दोषारोप केला, त्यांची निंदा केली, देवगुरुधर्माची निंदा केली, मिथ्याधर्माचें पोषण केलें, हिंसेची प्रवृत्ति व्हावी असा उपदेश केला, मिथ्याधर्माचा प्रसार व्हावा म्हणून खटपट केली, स्त्रीकथा, राजकथा, भोजनकथा, देशकथा इत्यादि विकथा करून घोर पापांच्या प्रतिपादनांत आपली वाणी खर्च केली, त्या सर्वांबद्दल मी आतां पश्चात्ताप करितो. म्या घोर कर्माचा बंध केला, त्याचें फल नरकांचें दुःख, व पशुगतींतील घोर दुःख अनंत काल भोगावें लागणार आहे, व अनंतकालपावेतों बहिरा, मुका, आंधळा, नीचकुलोत्पन्न होऊन दारिद्र्य भोगावें लागणार आहे. म्हणून आतां तरी, असत्य व दुष्ट वचन बोलण्यापासून पापाचा नाश करण्याकरितां व यापुढें अशी दुष्ट वचनप्रवृत्ति पुनः कधींही न व्हावी यासाठीं पंचनमस्कार पदाला शरण गेलों आहे.

**परवस्तु ग्रहणाचा पश्चात्ताप**

अज्ञानामुळें किंवा प्रमादामुळें पूर्वीं म्यां दुसऱ्याचें न दिलेलें, जमिनीवर पडलेलें, विसरलेलें द्रव्य घेण्याची इच्छा केली असेल, कपटानें कोणाला ठकविलें असेल, जबरदस्तीनें एखाद्याचें द्रव्य ठेऊन घेऊन ज्याचें त्याला दिलें नसेल, ज्याचें द्रव्य त्यांस देण्याकरितां मी इतरांस फार दुःख दिलें असेल अथवा स्वतः सोशिलें असेल, यापासून घोर पापाचा बंध मला झाला. त्याचें फळ नरकतिर्यंचादिक गतींत अनंतकालपर्यंत भ्रमण व दारिद्र्यानें पीडित होऊन दुःख भोगणें हें प्राप्त झालें आहे. याकरितां चोरी करण्यापासून प्राप्त झालेल्या कर्माचा नाश व्हावा म्हणून व पुढें मला कोणी दिल्याशिवाय परधन घेण्याची इच्छा न व्हावी एतदर्थ पंचपरमेष्ठी पदांचें चिंतन करून त्याला शरण जातों.

परस्त्रीचें स्वरूप, वस्त्राभरण, अलंकारादिकांकडे रागभावानें पाहण्याची इच्छा केल्यानें, व प्रत्यक्ष पाहिल्यानें, तिजशीं संगम केल्यानें जें भयंकर पाप उपार्जन केलें त्याचें फल अनंतकाल

परस्त्रीदोष आलोचना — नरकगतीमध्यें कामरूप अग्नीनें दग्ध होणें, असंख्यात जन्मांत कामवेदनेनें पीडित होणें, दारिद्र्यादिक दुःख भोगणें, व अनेक प्रकारच्या रोगांनीं शरीर व्यापलेलें असणें, वगैरे प्राप्त होणार आहे. याकरितां परस्त्रीच्या इच्छेपासून झालेल्या पापकर्माच्या नाशार्थ व पुढें परस्त्रीची इच्छा न व्हावी म्हणून मी पंचपरमगुरूंच्या पंचनमस्कार-पदांचें ध्यान करितों.

मी महान् अज्ञानी; माझी परिग्रहावर जबरदस्त ममता; ग्या शरीरादिक पुद्गलांना माझें असें मानून हेंच माझें स्वरूप आहे असें जाणलें, रागादिकभाव मोहकर्माच्या उदयानें होणारे असून ते माझेच आहेत असें समजलों. परद्रव्यावर अतिशय आसक्ति ठेवून

परिग्रह आलोचन — धनधान्य कुटुंबादिकांची वृद्धि झाली म्हणजे आपलीच वृद्धि झाली, यांचा नाश होण्यांत आपला नाश झाला असें मानिलें; अद्यापही घर, जागा, बाजार, आजीविका, स्त्री, पुत्र, धनधान्य, आभरण वस्त्रादि हजारों वस्तु यावरील मोह नाहींसा होत नाहीं. त्या परवस्तु समजूनही आपल्याच आहेत अशी विपरीत बुद्धि नाहींशी झाली नाहीं. आत्मज्ञान, परज्ञान, पापपुण्याचें ज्ञान, परलोक-ज्ञान हें नाहींसें झालें आहे, कंठीं प्राण येऊन ठेपला तरी ममता कमी होत नाहीं. जगांमध्यें कोणीही परिग्रह आपल्या बरोबर नेला नाहीं, व तो आपल्याबरोबर येणार नाहीं असें जाणूनही प्रतिदिवशीं तो वृद्धिंगत करण्याचे प्रयत्न चालू आहेत. मी मरेतोंपर्यंत यत्किंचित्‌हि ते कमी न व्हावें अशी माझी तीव्र इच्छा आहे. या परिग्रहरूप दावाग्नीला संतोषरूपीं जलानें विझविण्याची इच्छा नाहीं. संपूर्ण पापाचें मूल एक परिग्रहाची इच्छा हेंच आहे. ग्यां मूर्खानें याच्या संग्रहासाठीं तीव्र इच्छा धारण करण्यानें, अनंतकालांत दुर्लभ अशा मनुष्यजन्मांत जिनधर्म प्राप्त झाला असूनही तो आचरण करण्याचें मनांत आणिलें नाहीं त्यामुळें नरकतिर्यंच-गतीचें दुःख प्राप्त करून घेतलें. आतां याबद्दल मला फार पश्चात्ताप होत आहे. या भयंकर पापाचा नाश करण्याचा उपाय फक्त पंचपरमेष्ठीच्या चरणकमलाला शरण जाण्याखेरीज कोणताही उरलेला नाहीं. व पुढेंही परिग्रहापासून विरक्ति उत्पन्न करण्याची बुद्धि देणारा भगवान् पंचपरमेष्ठी शिवाय दुसरा कोणी समर्थ नाहीं. या सर्व कारणाकरितां व परिग्रहाचा नाश होऊन परमसंतोष प्राप्त व्हावा म्हणून पंचनमस्काराचें ध्यान करून कायोत्सर्ग करितों.

### सामायिक करणारा गृहस्थ कसा दिसतो

**सामयिके सारम्भाः परिग्रहा नैव सन्ति सर्वेऽपि ।**
**चेलोपसृष्टमुनिरिव गृही तदा याति यतिभावम् ॥ १०२ ॥**

**अर्थ**-गृहस्थाला सामायिकाच्या वेळीं सर्व प्रकारचे आरंभ व सर्व परिग्रहांचा त्याग असतो यामुळें तो वस्त्र गुंडाळलेल्या मुनीसारखा यतिपणाला प्राप्त होतो. ( म्हणजे मुनीपेक्षां वस्त्रच काय तें याला अधिक असतें. बाकी परिणाम सारखे असतात. )

**भावार्थ**—सामायिकाच्या प्रसंगीं गृहस्थाला संपूर्ण आरंभ व परिग्रह नसतात पण तो गृहस्थ

असल्यानें फक्त वस्त्र अंगावर असतें म्हणून वस्त्राशिवाय इतर बाबतींत तो मुनितुल्य असतो. मुनीला नग्नपणा असतो, यानें वस्त्र धारण केलें आहे, एवढाच काय तो फरक. पण यामुळेंच या गृहस्थाला साक्षात् मुनि म्हणता येत नाहीं.

आतां अशा स्थितींत उपसर्ग [ परीषह ] प्राप्त झाला असतां मुनीप्रमाणें धैर्य धारण करावें, भिऊं नये असें सांगतात.

परीषह जय

**शीतोष्णदंशमशकपरीषहमुपसर्गमपि च मौनधराः।**
**सामयिकं प्रतिपन्ना अधिकुर्वीरन्नचलयोगाः ॥ १०३ ॥**

**अर्थ**–सामायिक धारण करणारे गृहस्थ मनवचनकायांच्या योगांना स्थिर करून मौन धारण करितात. आणि थंडी, ऊन, डांसमच्छरादिक प्राण्यापासून होणारा त्रास, अथवा कोणी उपसर्ग केल्यास तोही सहन करितात.

**भावार्थ**–कसलाही थंडीवाऱ्याचा, उन्हा पावसाचा त्रास झाला आणि वाघ, सिंह, व शत्रु-कडून उपसर्ग दिला गेला तरी तो धैर्यानें सहन करावा, घाबरूं नये. साम्यभाव व मौन सोडूं नये.

सामायिक करीत असतां संसाराच्या व मोक्षाच्या स्वरूपाचें चिंतन करावें तें असें:—

संसार व मोक्षाचें स्वरूप

**अशरणमशुभमनित्यं दुःखमनात्मानमावसामि भवम् ।**
**मोक्षस्तद्विपरीतात्मेति ध्यायन्तु सामयिके ॥ १०४ ॥**

**अर्थ**–सामायिक करणाऱ्यांनीं सामायिकाच्या वेळीं कोणी येथें शरण [ रक्षण करणारा ] नाहीं अशा पापरूपीं, नाशवंत, दुःखदायक, आत्मस्वरूपरहित संसारांत मी पडलों आहे आणि मोक्ष याच्या विरुद्ध–स्वरूपाचा आहे असा विचार करावा.

**विशेषार्थ**- सामायिक करतांना असा विचार करावा कीं, हा चतुर्गति भ्रमणरूपीं संसार

अशरण

अशरण आहे. यांत अनंतानंत जन्म मरण करीत असतां अनंत काल निघून गेला. सर्व पर्यायांत क्षुधा, तृषा, रोग, वियोग, ताडन, मारण भोगीत असतां त्यांतून मुक्त करणारा कोणीही भेटला नाहीं. यावरून संसारदुःखापासून रक्षण करणारा कोणी नाहीं असा निश्चय होतो.

संसार जसा अशरण आहे तसाच अशुभहि आहे. कारण अशुभ कर्माच्या बंधनानें दुःख

अशुभ

भोगणारा, अशुभ देहरूप पिंजऱ्यांत फसलेला, अशुभ कषायस्वरूपीं अशुभभावांत लीन होऊन निरंतर अशुभाचाच बंध करणारा व अशुभाला भोगणाऱ्या जीवाला हा संसार कारण आहे म्हणून संसार अशुभ आहे असेंच ठरतें.

संसारांत अनंत काल परिभ्रमण करीत असतां कदाचित् उच्च कुलांत जन्म, उत्तम क्षेत्रांत

वास्तव्य, इंद्रियपरिपूर्णता, सुंदर रूप, प्रबल बुद्धि, जगांत पूज्यपणा व मानमान्यता, राज्यसंपत्ति धनसंपदा, सद्गुणी मित्रांचा सहवास, आज्ञाधारक पुत्र, मनोहर स्त्री, पांडित्य, शौर्य, बल, आज्ञा, ऐश्वर्य, मनोवांछित भोग व नीरोग शरीर कर्मोदयानें जीवात्मा प्राप्त झालें तरी ते क्षणमात्रांत विजेप्रमाणें, इंद्रधनुष्याप्रमाणें अथवा इंद्रजालाप्रमाणें खात्रीनें नाहींसे होणारे आहेत. ते पुनः अनंतानंत काल गेला तरी प्राप्त होणार नाहींत म्हणून संसार अनित्य आहे हेंही सत्य आहे.

अनित्य

सर्व कालीं कर्मबंधनामुळें देहरूपीं पिंजऱ्यांत अडकलेला जीव, अनंतानंत जन्ममरणादिकांनीं युक्त होऊन अनंतकाल गेला तरी दुःखापासून मुक्त होत नाहीं म्हणून हा संसार दुःखरूप आहे.

संसार–परिभ्रमण हें आत्मस्वरूप नव्हे म्हणून संसार अनात्मरूप आहे. याप्रमाणें सामायिक करणाऱ्या गृहस्थानें संसाराचें चिंतन करावें.

**मोक्षाचें स्वरुप**

संसारांत मिथ्याज्ञानाच्या प्रभावामुळें अनंतकालापासून मला फिरावें लागलें. त्यापासून मुक्त होणें हाच मोक्ष होय. तो आत्म्याचें सदैव चिंतन करण्यापासून प्राप्त होणार आहे. तो प्राप्त झाल्यानंतर अनंतानंत काल गेला तरी पुनः संसारांत येण्याचें कारण उरत नाहीं. मोक्ष शुभ आहे, नित्य आहे, अविनाशी आहे, अनंतानंतकाल टिकणारा म्हणजे शाश्वत आहे. अनंतज्ञानादिस्वरूप व अनाकुलतारूप आहे. स्वस्वरूपात्मक आहे, परस्वरूपाचा नाहीं. असेंही चिंतन करावें.

**सामायिकाचें माहात्म्य**

शांत परिणाम ठेवून दोन घटका जर दररोज सामायिक केलें तर मोठमोठ्या कर्मांची निर्जरा होते. या सामायिकाचें माहात्म्य इंद्राला देखील वर्णिता यावयाचें नाहीं. याच्या प्रभावानें अभव्य जीव देखील स्वर्गांतील अत्युच्च ग्रैवयकापर्यंत जाऊन उत्पन्न होतो. सामायिकासारखा दुसरा धर्म झाला नाहीं व होणारही नाहीं म्हणून याचें अंगीकरण करण्यांत आत्म्याचें हित आहे. ज्याला सामायिकाचा पाठ मुखोद्गत येत नसेल त्यानें आपलें मन एकाग्र करून निश्चयानें सर्व आरंभ परिग्रहांचा त्याग करावा व फक्त पंचनमस्कार मंत्राचें निर्विकार मनानें ध्यान करीत जरी दोन घटका पूर्ण केल्या तरी त्याला देखील वर वर्णिल्याप्रमाणें फलप्राप्ति होणार आहे.

सामायिकाचे पांच अतिचार

**वाक्कायमानसानां दुःप्रणिधानान्यनादरास्मरणे ।**
**सामयिकस्यातिगमा व्यज्यन्ते पञ्च भावेन ॥ १०५ ॥**

**अर्थ**–सामायिक करीत असतां संसारासंबंधी कांहीं गोष्टी बोलण्याकडे वचनप्रवृत्ति करणें हा वचनदुःप्रणिधानातिचार. ज्यायोगें संयम–भ्रष्ट होईल अशी शरीराची हालचाल करणें हा कायदुःप्रणिधानातिचार. मनामध्यें आर्तरौद्रध्यानाचा विचार आणणें हा मनोदुःप्रणिधानातिचार.

सामायिक निरुत्साहानें अथवा निरादरानें करावयाचें हा अनादरातिचार आणि सामायिक करीत असतां देववंदना वगैरेचे पाठ विसरून जाणें अथवा कायोत्सर्ग करावयाचें विसरणें हा अस्मरणातिचार असे पांच सामायिक भावनेचे अतिचार (दोष) आहेत.

प्रोषधोपवास व्रताचें वर्णन

**पर्वण्यष्टम्यां च ज्ञातव्यः प्रोषधोपवासस्तु ।**
**चतुरभ्यवहार्याणां प्रत्याख्यानं सदेच्छाभिः ॥ १०६ ॥**

**अर्थ**— प्रोषधोपवास करण्याच्या इच्छेनें अष्टमी आणि चतुर्दशी या पर्वतिथींच्या दिवशीं दिवसा व रात्रीं चार प्रकारच्या आहाराचा त्याग करणें याला प्रोषधोपवास म्हणतात

**विशेषार्थ**—एका महिन्यांत दोन अष्टमी व दोन चतुर्दशी या चार पर्वतिथि अनादि कालापासून चालत आल्या आहेत. या पर्वतिथींत गृहस्थानें व्रत व संयम धारण करून रहावें. धर्मात्मा व संयमी जे जीव आहेत ते सदाकाल व्रती असतातच. पण धर्मावर प्रीति करणाऱ्या गृहस्थानें एका महिन्यांतून चार दिवस तरी सर्व पापारंभाचा त्याग करावा. इंद्रियांच्या विषयाला दाबून ठेवावें. व्रतशीलसंयमासह उपवास धारण करावा व चार प्रकारच्या आहारांचा त्याग करावा. याप्रमाणें वागणाराला प्रोषधोपवास व्रत घडतें.

प्रोषधोपवासाचें विशेषवर्णन.

प्रोषधोपवास धारण करणाऱ्यानें सप्तमीच्या व त्रयोदशीच्या दिवशीं मध्याह्नकालीं एक वेळां भोजन पान करून सर्व प्रकारच्या आरंभाचा त्याग करावा. अर्थात् व्यापार, देणें, घेणें, सेवा चाकरी कोणाची असेल तर ती देखील सोडून, शरीरावरील ममत्व कमी करून, एकांत जागीं अथवा जिनमंदिरांत, निर्जन वनांत, शून्यगृहांत वा मठांत जावें. त्या ठिकाणीं संपूर्ण विषय—कषायांचा त्याग करावा. मनवचनकायेच्या प्रवृत्तीला रोंकून धर्मध्यान करावें अथवा स्वाध्याय करीत सप्तमी वा त्रयोदशीचा अर्धादिवस घालवावा. पुनः संध्याकाळीं देववंदना सामायिकादि कार्य करून रात्रौ धर्मकथा व जिनेंद्र--स्तवन करीत करीत रात्र पूर्ण करावी. सर्व रात्र जागरण करणें शक्य नसल्यास शुद्ध अशा बिछान्यावर (गादी पलंगावर नव्हे) थोडा वेळ प्रमाद टाळण्याकरितां भगवंताचें नामस्मरण अंतःकरणांत करीत पहुडावें. अष्टमी चतुर्दशीच्या प्रातःकालीं सामायिक वंदना करून प्रासुक (शुद्ध) अष्ट द्रव्यांनीं जिनपूजन व स्वाध्याय करून द्वादश भावनांचें चिंतन करीत करीत धर्मध्यानांतच तो दिवस आणि रात्र पूर्ण करावी. नवमी आणि पौर्णिमेच्या प्रातःकालीं सर्व नित्यनियम आटोपून पूजन, वंदन, स्तवन केल्यानंतर उत्तम, मध्यम, जघन्य यापैकीं जशा पात्राचा लाभ होईल तशा पात्राला अन्नदान करून, आपण पारणें करावें. याप्रमाणें सोळा प्रहर धर्मध्यानांत जे घालवितात त्यांना उत्तम प्रोषधोपवास घडतो. याविषयीं श्रीकार्तिकेय स्वामींनीं म्हटलें आहे कीं, अष्टमी चतुर्दशीच्या दिवशीं स्नान, विलेपन, आभूषण, स्त्रीसंसर्ग, पुष्प, अत्तर, धूप दीपादिकांचा त्याग करून जे ज्ञानी लोक वीतरागता हाच कोणी एक सुंदर अलंकार धारण करून आपलें शरीर

शोभवितात, दोन्ही पर्वामध्यें सदैव उपवास, एकाशन वा नीरस भोजन यापैकीं कांहीं शक्तिप्रमाणें करितात, त्यांना प्रोषधोपवास व्रत घडतें. श्री अमितगतिकृत श्रावकाचारामध्यें पर्वतिथीच्या दिवशीं उपवास, अनुपवास व एकभुक्त करावें असे तीन प्रकार सांगितले आहेत. त्यांतून चार प्रकारच्या आहारांचा त्याग करणें याला उपवास म्हटलें आहे. एक वेळ फक्त पाणी ग्रहण करणें याला अनुपवास आणि एक वेळीं अन्न व पाणी ग्रहण करणें याला एकभुक्त अशी संज्ञा दिली आहे. यांचें तात्पर्य एवढेंच आहे कीं, आपली शक्ति न छपवितां धर्मामध्यें लीन होऊन उपवास करावा. पुढें चौथ्या प्रोषधप्रतिमेचें वर्णन करावयाचें आहे त्यावेळीं षोडशप्रहराचा नियम आवश्यक आहे. सध्यां दुसऱ्या प्रतिमेंत श्रावकाला यथाशक्ति व्रत, तप, संयम धारण करून पर्वतिथींत धर्मध्यानामध्यें मन गुंतविण्याची संवय केली तरी पुरे.

उपवासादिवशीं काय सोडावें ?

पञ्चानां पापानामलङ्क्रियारम्भगन्धपुष्पाणाम् ।
स्नानांजननस्यानामुपवासे परिहृतिं कुर्यात् ॥ १०७ ॥

**अर्थ**–उपवासाच्या दिवशीं हिंसादिक पांच पापांचा त्याग करावा. अलंकार, वस्त्राभरणें, नटणें सजणें, गृहकार्यारंभ, उपजीविकारंभ, सुगंधित–केशर कर्पूरादिकांची उटणी, व अत्तर गुलाबांचा वास घेणें, फुलांचा वास घेणें, स्नान करणें, डोळ्यांत सुरमा, काजळ घालणें, नाशी ओढणें, वाद्यें वाजविणें, गाणें ऐकणें, नाटक पाहणें, वगैरे गोष्टींचा त्याग करावा. याच प्रमाणें इतरही पंचेंद्रियांच्या भोगांचा त्याग करावा. कारण उपवास हा इंद्रियांची असक्ति कमी करण्याकरितां व विषयाकडे जाणाऱ्या प्रवृत्तिला रोकण्याकरितां, कामेच्छा कमी होण्याकरितां, प्रमाद, आळस, निद्रा न यावी म्हणून, आरंभादिकांपासून विरक्त होण्याकरितां, परीषह सहन करण्यास समर्थ होण्याकरितां, धर्म मार्गापासून न ढळण्याकरितां, जिह्वेन्द्रिय व उपस्थ इंद्रियाला दाबून टाकण्याकरितां करावा लागतो. उपवासापासून आपली प्रशंसा व्हावी, कांहीं लाभ व्हावा, परलोकीं राज्यसंपदादिक प्राप्त व्हावी हा उपवास करण्याचा हेतु नव्हे. केवळ विषयानुराग कमी व्हावा हाच फक्त हेतु असावा. उपोषणापासून खाणें पिणें व अनेक प्रकारचे रसास्वाद घेणें यामधील तीव्र इच्छा कमी होते, झोंप कमी होते, कामवेदना नाहींशी होते, असा याचा अतुल प्रभाव जाणून तो करण्याविषयीं प्रवृत्त व्हावें.

उपवासाचा दिवस कसा घालवावा

धर्मामृतं सतृष्णः श्रवणाभ्यां पिबतु पाययेद्वान्यान् ।
ज्ञानध्यानपरो वा भवतूपवसन्नतन्द्रालुः ॥ १०८ ॥

**अर्थ**– उपोषण करणाऱ्यानें त्या दिवशीं आपल्या कानांनीं अभिलाषपूर्वक धर्मरूपीं अमृत प्राशन करावें व दुसऱ्यास प्राशन करवावें. झोंप आणि आळस सोडून ज्ञान-प्राप्तिमध्यें व ध्यान करण्यामध्यें तत्पर असावें.

**भावार्थ**– उपोषण केलें असेल त्या दिवशीं धर्मकथा श्रवण करावी. इतर धर्मवान् जीवांना ती

ऐकत्वाची. ज्ञानाभ्यास करीत धर्मध्यानांत लीन होऊन तो सर्व दिवस घालवावा. आळसांत, निद्रेमध्यें अथवा आरंभादिकामध्यें व विकथा करण्यांत घालवूं नये.

**उपवासाचा अर्थ**

**चतुराहारविसर्जनमुपवासः प्रोषधः सकृद्भुक्तिः ।**
**स प्रोषधोपवासो यदुपोष्यारम्भमाचरति ॥ १०९ ॥**

**अर्थ**– खाणें, पिणें, स्वाद घेणें आणि चाटणें या चार प्रकारच्या आहारांचा त्याग करणें याला उपवास म्हणतात. उपवासाच्या आधल्या दिवशीं व उपवासाच्या दुसऱ्या दिवशीं एक वेळ भोजन करणें याला प्रोषध म्हणतात. या प्रमाणें सोळा प्रहर भोजनादिक आरंभांचा सर्वथैव त्याग करून राहणें यास प्रोषधोपवास म्हणतात.

**उपवासाचे पांच अतिचार**

**ग्रहणविसर्गास्तरणान्यदृष्टमृष्टान्यनादरास्मरणे ।**
**यत्प्रोषधोपवासे व्यतिलङ्घनपञ्चकं तदिदम् ॥ ११० ॥**

**अर्थ**– डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय, कोमल उपकरणांनीं शोधिल्याशिवाय, पूजेचीं व स्वाध्यायाचीं उपकरणें ग्रहण करणें हा ग्रहणातिचार होय. न पाहतां, न शोधतां उपकरणें ठेवणें अथवा शरीराचे हातपायादि अवयव पसरणें हा विसर्गातिचार होय. न पाहतां, न शोधतां शयन करण्याचें उपकरण म्हणजे बिछाना टाकणें हा आस्तरणातिचार, असे हे तीन व उपवासाविषयीं अनादर करणें व तो करण्याविषयीं उत्साह नसणें हा अनादरातिचार, आणि उपवासाचे दिवशीं पाठक्रिया विसरून जाणें हा अस्मरणातिचार असे पांच अतिचार आहेत. यांचा त्याग करून व्रत शुद्ध करावें.

**वैयावृत्य अथवा अतिथिसंविभाग शिक्षाव्रत**

**दानं वैयावृत्यं धर्माय तपोधनाय गुणनिधये ।**
**अनपेक्षितोपचारोपक्रियमगृहाय विभवेन ॥ १११ ॥**

**अर्थ**– रत्नत्रय-धारी, तपस्वी अशा मुनीला धर्मपालनासाठीं शुद्ध आहार देणें याला वैयावृत्य म्हणतात. ज्याला दान द्यावयाचें त्यापासून कोणताही मोबदला किंवा मंत्रतंत्रादिकांचा प्रत्युपकार मिळण्याची इच्छा नसावी.

**विशेषार्थ**– या ठिकाणीं दानाला वैयावृत्य म्हटलें आहे. ज्याचें तप हेंच धन आहे अर्थात् इच्छा-निरोधादिक तपालाच ज्यांनीं आपलें अविनाशी धन मानिलें आहे; तपाशिवाय दुसरें कर्ममल नाहींसा करणारें साधन नाहीं. या शिवाय अविनाशी मोक्ष प्राप्त होत नाहीं म्हणून रागादि कषायरूप मलाचा नाश करणारें तपरूपीं धन ग्रहण करून संसारांत बुडविणाऱ्या इतर जड, अचेतन, विनाशिक, अशा सुवर्णादि धनांचा ज्यांनीं त्याग केला आहे असे तपोनिधी जे परम

वीतरागी साधूचें वैयावृत्य करावें.

वीतरागी दिगंबर यती, त्यांना दाता ( दान देणारा ) आणि पात्र ( दान घेणारा ) या दोहोंच्या धर्मप्रवृत्तीकरितां म्हणून दान देणें हेंच वीतरागी यतींचें वैयावृत्य आहे.

**दिगंबरमुनींचें स्वरूप**

दिगंबर यती हे सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्रादि अनेक गुणांचे निधान आहेत. त्यांना अंतर्बाह्य परिग्रह मुळींच नसतात. त्यांना राहण्यास मठ, घर, आश्रम वगैरे कांहींही नसतें. ते एकटेच कधीं गुरुचरणापाशीं, कधीं वनांत, कधीं पर्वतावरील गुहेंत, कधीं भयंकर अरण्यांत, कधीं नदीच्या कांठीं, असे अनियमित फिरत असतात. ते असंयमी गृहस्थांचा सहवास करू इच्छित नाहींत. ते आत्म्याची विशुद्धता म्हणजे वीतरागता साधण्याचा प्रयत्न करीत असतात. त्यांना लौकिक जनांकडून आपली पूजा, अर्चा, मानमान्यता व प्रशंसा व्हावी अशी मुळींच अपेक्षा नसते. ते परलोकांतील देवलोकांना प्राप्त होणारे भोगोपभोग व इंद्र अहमिंद्र पदाचें ऐश्वर्य याविषयीं अत्यंत आसक्ति हाच कोणी एक सदैव संताप उत्पन्न करणारा अग्नि समजून त्यापासून अत्यंत दूर रहातात. इंद्रियांचे विषय तृष्णा वाढविणारे आहेत. त्यापासून निराकुलस्वरूपी आत्मसुखाची प्राप्ति होत नाहीं. खरें सुख आत्मनिष्ठ असल्यानें देहाविषयीं ते ममत्व ठेवीत नाहींत. ते नेहमीं आपलें आत्मकार्य साधणाऱ्या कार्यामध्येंच मग्न असतात. अशा साधूंचें वैयावृत्य करण्याचा लाभ प्राप्त होणें हें फार कठिण आहे.

**शरीर तपाचें साधन आहे**

साधूंनीं यद्यपि शरीरावरील ममत्व सोडिलें असलें तरी तें रत्नत्रय प्राप्त करून देण्यास सहायभूत आहे असें मनांत आणून, त्याला सरस–नीरस, ओलें, कोरडें, मऊ, निभर जसें मिळेल तसें अन्न देऊन, रत्नत्रयाचें साधन म्हणून कृतघ्न देहाचें ते संरक्षण करितात. जर अकालीं हें नष्ट होईल तर त्यापासून मरणोत्तर देवादिक पर्यायांत उत्पन्न व्हावें लागेल. तेथें असंख्यात वर्षेपर्यंत असंयमी राहून कर्मबंध तोडतां येणार नाहीं. याकरितां आतांच आहारादिकांचा त्याग करून या शरीराचा नाश केला तरी कर्ममय ( कर्माण ) देह थोडाच नाहींसा होणार आहे ! शरीर नष्ट झालें तर पुनः नवें प्राप्त होईल. म्हणून सर्व शरीराला उत्पन्न करणारें जें कार्माणदेहाचें बीज तेंच नाहींसें करण्याचा अथवा तें बीज जाळून टाकण्याचा प्रयत्न करावा.

**अंतराय टाळून आहार घ्यावा**

यासाठीं कषाय जिंकावे. विषयांचा निग्रह करावा. शेहेचाळीस दोष टाळून, बत्तीस अंतराय पाळून, चौदा मलांचा परिहार करून, आपणाकरितां न केलेला असा शुद्ध आहार प्राप्त होईल तरच घ्यावा. अर्धे पोट अन्नानें व चतुर्थांश पाण्यानें व ध्यानाध्ययन, कायोत्सर्गादि सुखानें करतां यावें म्हणून चतुर्थांश रिकामें ठेऊन आहार ग्रहण करावा. भोजनाचें आमंत्रण स्वीकारूं नये. याचना करूं नये. हात व डोळे वगैरेनीं खुणा करूं नये. अशा साधूंना आहारादिकांचें दान देणें याला वैयावृत्य म्हणतात.

दान हें अनपेक्षितोपचारोपक्रिय असावें. प्रत्युपकाराची इच्छारहित म्हणजे यापासून आमचेवर कांहीं तरी साधु उपकार करितील अशी इच्छा मनांत नसावी. व उपक्रिय म्हणजे प्रसन्न होऊन आम्हांस विद्या, मंत्र, औषध वगैरे देतील अशी इच्छा नसावी. तसेंच मुनीश्वरांना दान देण्यानें आपली शहरांत दाता म्हणून कीर्ति होईल अथवा राजा मोठा मान देईल, आपल्या घरीं अतूट संपत्ति प्राप्त होईल, पूर्वी दान देणाऱ्याला पंचाश्चर्याची प्राप्ति झालेली आहे म्हणून आपणालाही लाभ होईल, असे अनेक विकल्प अथवा इच्छा मनांत न आणितां केवल रत्नत्रय धारण करणारावर भक्ति ठेऊन त्यापासून आपण कृतार्थ झालों असें मानून, मन वचनकाय व गृहाचाराचा पाया हीं आज दान देण्यानें कृतार्थ झालीं असें समजून दान करावें व मोठ्या आनंदानें आपण आज कृतकृत्य झालों असें समजावें हेंच वैयावृत्याचें लक्षण आहे.

दानाचा मोबदला इच्छू नये

वैयावृत्याचें विशेष स्वरूप

व्यापत्तिव्यपनोदः पदयोः संवाहनं च गुणरागात् ।
वैयावृत्त्यं यावानुपग्रहोऽन्योऽपि संयमिनाम् ॥ ११२ ॥

**अर्थ**– संयमी पुरुषांच्या गुणांवर प्रीति करून त्यांच्या विपत्ति नाहींशा करणें, त्यांचे हात-पाय रगडणें, यासारखी आणखी जितकीं मुनीवर उपकार करणारीं कृत्यें असतील त्या सर्वांस वैयावृत्य म्हटलें आहे.

**विशेषार्थ**– साधूवर कोणी देव मनुष्य तिर्यंचाकडून अथवा अचेतन पदार्थापासून उपसर्ग प्राप्त झाला तर तो आपल्या शक्तिप्रमाणें नाहींसा करावा. साधूंना रस्त्यांत चोर, भिल्ल वगैरे दुष्ट लोकांनीं त्रास दिला असेल व त्यामुळें त्यांना दुःख होत असेल तर तें नाहींसें करण्याचें आश्वासन देऊन धैर्य धारण करवावें. रस्त्यांतून येतांना श्रम झाले असतील म्हणून त्यांचें पादसंमर्दन करावें. रोगी असतील तर त्यांचा संयम भ्रष्ट न होईल अशा रीतीनें काळजीपूर्वक आसन, शय्या, जागा वगैरे शुद्ध करावी. जपून उठवावें, बसवावें, शयन करवावें व मलमूत्र विसर्जन करवावें. अबुद्धिपूर्वक मलमूत्र अयोग्य स्थानीं अथवा राहण्याचे जागीं पडलें असेल तर तें काढून निर्जीव जागीं टाकून द्यावें. कफ, नाकांतील मळ वगैरे पुसून तोही योग्य जागीं टाकावा. आहार, औषध वगैरे संयमी पुरुषांना योग्य असेल तर तो योग्यवेळीं देवून त्यांची वेदना नाहींशी करावी. समय पाहून योग्य व बाधारहित पदार्थ देणें, वेदनेमुळें चित्त चंचल झालें असेल तर तें उपदेशानें स्थिर करणें, धर्मकथा ऐकविणें, त्यांच्या मर्जीप्रमाणें वागणें, त्यांच्या गुणांचें स्तवन करणें वगैरे त्यांच्या गुणांविषयीं प्रीति ठेऊन उपकार करणें हें सर्व वैयावृत्य होय.

वैयावृत्यांत मुख्य आहारदान

नवपुण्यैः प्रतिपत्तिः सप्तगुणसमाहितेन शुद्धेन ।
अपसूनारम्भाणामार्याणामिष्यते दानम् ॥ ११३ ॥

**अर्थ**– कांडणें, दळणें, चूल पेटविणें, पाणी भरणें आणि केरसुणीनें झाडणें याला पंचसूना म्हणतात. यांचा व शेतकी व व्यापार यांचा ज्यांनीं त्याग केला आहे अशा मुनींचा, दाताराचे सात गुण धारण करणाऱ्या श्रावकानें नऊ प्रकारच्या भक्तींनीं सत्कार करून दान द्यावें.

**विशेषार्थ**–दान हें तीन प्रकारच्या पात्राला द्यावें. त्यांतून ज्यांनीं वर सांगितलेल्या पंच-सूनांचा त्याग केला आहे व द्रव्योपार्जनादि सर्व आरंभांचा त्याग केला आहे असे दिगंबर साधु हें उत्तम पात्र होय. व्रत धारण करणारा श्रावक मध्यम पात्र आणि व्रतरहित पण सम्यक्त्व–युक्त श्रावक हें जघन्य पात्र आहे. उत्तम पात्राला दान देणाऱ्या श्रावकामध्यें सात गुण असावे लागतात. ते असे–

१ दाताराला इहलोकासंबंधी प्रसिद्धि, मान्यता, कीर्ति, राजमान्यता, धनधान्याची वृद्धि वगैरे फलांची इच्छा नसावी.

२ दाताराला क्रोध नसावा. पुष्कळ मागणारे झाले आतां कोणाकोणाला द्यावें असा विचार मनांत न आणतां मुनि व श्रावकांना दान द्यावें.

३ कपट ठेऊन त्यानें दान करूं नये. कपट म्हणजे एक बोलून एक दाखवावयाचें व दुसरेंच करावयाचें. लोकांना वरून मोठी भक्ति दाखवावयाची परंतु आंतून दान देतांना दुःख वाटावयाचें अशी वृत्ति ठेवूं नये.

४ इतर दान देणाराशीं ईर्षा करून दान देऊं नये. " यानें काय दान करावें, मी असें दान करीन कीं त्यापुढें याचें दान फिकें पडेल " असा विचार मनांत आणणें याला ईर्षा म्हणतात.

५ दान देऊन विषाद करूं नये. म्हणजे काय करावें, माझी जगांत मानमान्यता मोठी आहे. आतां यावेळीं जर मी दान देणार नाहीं तर लोकांत माझी मोठी अपकीर्ति होईल असें मनांत आणून दान देऊं नये.

६ मनांत आनंद ( मुदित भाव ) मानून दान द्यावें. आज उत्तम, मध्यम वा जघन्य यांपैकीं कोणत्याही पात्राचा योग मिळून त्यांना निर्विघ्नपणें आहार मिळेल तर आपणाला अपूर्व निधि प्राप्त झाल्यासारखें होईल असा विचार मनांत आणून दान द्यावें.

७ दान दिल्याचा अहंकार करूं नये. हा निरहंकारतानामक गुण आहे.

याप्रमाणें पात्र दान करणाऱ्या श्रावकाचे हे सात गुण आहेत. ते श्रावकानें पाळावयास पाहिजे आहेत. पात्राला दान देणें तें, मुनि, श्रावक अथवा जशी त्याची योग्यता असेल त्याप्रमाणें भक्तिपूर्वक द्यावें. नवधा भक्ति येणें प्रमाणें–

१ संग्रह अथवा प्रतिग्रह–मुनीश्वर अथवा क्षुल्लक यांना " तिष्ठ तिष्ठ " म्हणजे 'उभे रहा' 'उभे रहा' असे तीन वेळां म्हणावें. हें ज्याच्या मनांत अतिशय पूज्यपणा अथवा आदर असेल तोच म्हणेल. मुनि–क्षुल्लका खेरीज इतर कोणी श्रावक वगैरे योग्यपात्र आपले घरीं आले तर

त्याला “ यावें, बसावें महाराज ” वगैरे आदराचें वचन उच्चारणें याला प्रतिग्रह वा संग्रह म्हणतात.

२ उच्चस्थान देणें—आपलें घरी आलेल्यास उच्च जागी ( पाट, चौरंग, अथवा खुर्चीवर ) बसविणें.

३ शुद्ध पाण्यानें मुनीश्वर अथवा क्षुल्लकांचे पाय धुणें.

४ मुनि अथवा श्रावक जे असतील त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांना नमस्कार करणें.

५ जशी वेळ असें पात्र असेल त्याप्रमाणें त्याचें योग्य पूजन वा स्तवन करणें, अथवा स्तवन पूजनाचें वचन बोलणें.

६ मनाची शुद्धता म्हणजे त्यावेळी वाईट विचार मनांत न आणणें.

७ वचनाची शुद्धता ठेवणें—म्हणजे अयोग्य वचन मुखावाटें न उच्चारणें.

८ कायशुद्धि ठेवणें म्हणजे यत्नाचार पूर्वक चालणें, बसणें वगैरे क्रिया करणें.

९ भोजनशुद्धि ठेवणें. म्हणजे पात्राला योग्य असें निर्दोष भोजन देणें. याला एषणाशुद्धि असेंही म्हणतात.

याप्रमाणें जिनसूत्रानुसार पात्रांना योग्य व देशकालाला अनुसरून आहार द्यावा. तो पात्राच्या गुणांवर प्रीति ठेऊन दिला तरच सार्थक होतो, नाहींतर निष्फल होतो. धर्मप्रिय माणसाची धर्मात्मा पुरुषावर प्रीति असते. मुनीश्वरांना या नवधा भक्तीमुळें श्रावकाची परीक्षा होते. ज्याचे मनांत नवधा भक्ति नाहीं त्याला धर्म नाहीं, धर्मरहित असणाऱ्याच्या घरीं मुनीश्वर कधींही आहार घेत नाहींत. याशिवाय इतर धर्मवान् गृहस्थादिक देखील आदरातिथ्यानें बोलाविल्याशिवाय धर्माचा निरादर करणाराच्या येथें दीनवृत्ति धारण करून भोजन करीत नाहींत. दीनपणाचा त्याग व परम संतोष हीच जैनपणाची मोठी खूण आहे.

दाता असेल त्यानें राग द्वेष उत्पन्न होणार नाहीं अशा तऱ्हेनें आहार, औषध, शास्त्र, वसतिका, वस्त्र वगैरेचें दान द्यावें. दान देणाऱ्यानें आपले द्रव्याचा योग्य स्थलीं उपयोग होतो कीं नाहीं याचा विचार करावा. ज्यामुळें मोह, काम, आळस व गर्व वगैरे विकार उत्पन्न होण्याचा संभव असेल असे पदार्थ भोजनांत देऊं नयेत. ज्यापासून स्वाध्याय, ध्यान व तपश्चरणादि करण्याचा उत्साह वाढेल असेच पदार्थ दिल्यानें संयमी पुरुषाच्या मनांतील संक्लेश दूर होतात. ज्यांपासून मोह, काम, आळस, चिंता, असंयम, भय, दुःख, अभिमान वगैरे उत्पन्न होतील व गर्व वाढेल असें पदार्थ दान देण्यायोग्य नाहींत. ज्या पासून स्वाध्याय, ध्यान, तप संतोषादिकांची वृद्धि होईल असें, अथवा जें देण्यापासून पात्राचें दुःख नाहींसे होत असेल व परिणामांतील संक्लेश दूर होत असेल असेंच दान देणें योग्य आहे.

दानामध्यें दाता, देय, पात्र, विधि आणि काल असे पांच प्रकार आहेत. यांतून दाता सात गुणांचा धारक असावा.

१. भक्ति-पात्रांतील गुण ग्रहण करण्याची बुद्धि असणें, त्यासाठीं प्रमाद न करितां ज्ञान संपादन करावें व आपले परिणाम शांत ठेवण्याचा सतत प्रयत्न करावा.

२ तुष्टिगुण-तुष्टि म्हणजे दान देण्याविषयीं ज्याला अतिशय तळमळ वाटते त्याला पात्राचा संयोग मिळाला म्हणजे दरिद्री माणसाला अचानक धन प्राप्त झाल्यानें जसा आनंद होतो तसा आनंद होणें. अशा प्रकारच्या दातारांतील गुणाला तुष्टिगुण म्हणतात.

३ श्रद्धा—साधूला दान देणें हेंच इहपरलोकीं कल्याण करणारें आहे असा भरंवसा असणें.

४ विज्ञान—द्रव्य, क्षेत्र, काल, भाव यांचा योग्य विचार करून दान देणें.

५ अलोलुप—संसारसंबंधी धन, राज्य, ऐश्वर्य, विद्या, मंत्र, यश, कीर्ति वगैरे फलांची इच्छा न करणें.

६ सात्त्विक—श्रीमंत पुरुषालाही आश्चर्य उत्पन्न होण्यासारखें दान अल्प धन असणाऱ्या पुरुषानें देणें हा सात्त्विक गुण होय.

७ क्षमा—क्रोध उत्पन्न होण्याचीं कारणें येऊन प्राप्त झालीं तरी कोणावरही रोष न करणें.

दाताराचे इतर गुण

याशिवाय मुनि, श्रावक, व अव्रतसम्यग्दृष्टि या तीन प्रकारच्या पात्राला दान देणाऱ्या उत्तम दाताराचे अनेक गुण आहेत. तो विनयवान् म्हणजे नम्र असावा. उद्धटपणानें दिलेलें दान निष्फळ होतें. देण्याला जवळ कांहीं नसलें तरी फक्त विनय करणें हें देखील मोठें दान आहे. कोणाचाही सत्कार करणें, त्यांशीं मधुर भाषण करणें, येणाऱ्याला उच्चासनावर बसविणें, त्याच्या गुणांची स्तुति करणें हें देखिल मोठें दान आहे. धर्मावर प्रीति असणें, दानाच्या क्रमाचें ज्ञान असणें, दान कोणत्या वेळीं करणें योग्य आहे हें समजणें, जिनशास्त्राला जाणणें, विषयोपभोगाची इच्छा नसणें, सर्व जीवांवर दया करणें व करण्याचे विचार मनांत असणें, रागद्वेषादिक मंद करीत जाणें, सारासार विचार करणें, समदर्शी होणें, इन्द्रियांना जिंकणें, प्राप्त झालेल्या परीषहानें न भिणें, मत्सर उत्पन्न न होऊ देणें, स्वमत व परमताचें ज्ञान असणें, प्रिय भाषण बोलणें, व्रती पुरुषांतील पवित्र गुणांनीं मनाला सन्तुष्ट करणें, लोकव्यवहार व परमार्थ या दोहोंना जाणणें, सम्यक्त्वगुण धारण करणें, अहंकारादि दुर्गणांचा त्याग करणें, वैयावृत्य करण्याविषयीं तत्पर असणें, असे अनेक उत्तम गुण दातारांत असणें हें त्याला भूषणावह आहे. तसेंच त्याच्या मनांत सदैव पुढील विचार येतात. "आपलें द्रव्य व्रती पुरुषांच्या सेवेंत खर्च व्हावें, सहधर्मी लोकावर उपकार करण्यांत लागावें, ज्याला दुःख प्राप्त झालें असेल तें निवारण करण्याचें कामीं उपयोगीं पडावें, धर्माच्या वृद्धीकडे त्याचा उपयोग व्हावा; अशा सन्मार्गाकडे उपयोगी पडेल तेंच माझें द्रव्य. इतर सांसारिक कार्यांत अथवा कुटुम्बीजनांच्या विषयपोषणार्थ जें धन खर्च होईल तें केवळ बंध करण्यास कारण होऊन त्यापासून अनन्तकाल संसारसमुद्रांत फिरावें लागेल. कुटुम्बांतील माणसें जीं माझ्या धनाचा उपभोग घेत आहेत त्यांचा मी ऋणी ( कर्जदार ) आहे. ते धन वाटून घेणारे व जबरीनें

लुटून नेणारे असून रागद्वेषादिकषाय उत्पन्न करून व्रत संयमाचा घात करणारे आहेत. मला पापाची प्रेरणा करणारे आहेत. मीही त्यांच्या संयोगानें अशा जबरदस्त अज्ञानांधकाराच्या छायेंत सांपडलों आहे. त्यांच्यावरील खोट्या प्रेमाला बळी पडून मलाही धर्म, अधर्म, न्याय, अन्याय, यश, अपयश हीं मुळींच दिसेनाशीं झालीं आहेत. स्त्री-पुत्रादिकांच्या विषयांची पुष्टि करण्याकरितां इतर दुर्बल भोळ्या अज्ञानी जीवापासून द्रव्य ठगवून वा लुटून घ्यावें असें मला नेहमीं वाटूं लागलें. कुटुंबाला धनवस्त्राभरण-भोजनादिकांच्या योगें तृप्त करण्याकरितां रात्रंदिवस खोटें बोलणें, चोरी करणें वगैरे कृत्यें करण्याची इच्छा होते. आतां भगवान् वीतरागदेवांनीं उपदेशिलेल्या धर्माची प्राप्ति झाली आहे त्या अर्थी कुटुम्बपोषणाकरितां अथवा धनोपार्जन करण्याकरितां मी अन्याय व अनीतिमध्यें प्रवृत्त होणार नाहीं. न्यायमार्गानें जें प्राप्त होईल तेवढ्यांत माझी व कुटुंबाची, धर्माकरितां दानाचा विभाग काढून, बाकी राहील तेवढ्यांत उपजीविका करीन. धन, यौवन व आयुष्य हीं क्षणभंगुर आहेत. एक दिवस निश्चयानें मरण प्राप्त होणार आहे व तें अचानक प्राप्त होईल. त्यावेळीं धन-सम्पदा, कुटुम्बांतील माणसें वगैरे कोणीही बरोबर येणार नाहींत. फक्त मी उपार्जन केलेलें दान, तप, शील, भावना यापासून उत्पन्न केलेलें पुण्य हेंच परलोकीं सहाय करण्यास मजबरोबर येईल. या ठिकाणीं जी सामग्री प्राप्त झालेली आहे ती सर्व पूर्वजन्मांत दान दिलें त्याचें फळ आहे. आतां दान देण्यांत, धर्मवान् पुरुषांची सेवा करण्यांत, दुःखित बुभुक्षितांवर उपकार करण्यांत जर मी प्रवृत्त होईन तर परलोकीं सर्व सुखांची व मोक्षमार्गाची सम्यग्ज्ञानादि सामग्री प्राप्त होईल.

आधीं पात्रदान देऊन नंतर जे स्वतः भोजन करतील त्यांचें जिणें सफल समजावें. एरवीं पशु देखिल आपलें पोट भरीत असतात. ज्याच्या घरीं पात्रदान दिलें जातें तेंच खरें घर म्हणावें. पशूंना राहण्यास बिळें व पक्ष्यांना राहण्यास घरटीं असतात.

**गृह व धनाचें साफल्य**

मग मनुष्यांच्या घरांत व पशूंच्या बिळांत अन्तर तें काय? समुद्रांत पाणी व रत्नें हीं पुष्कळ आहेत. परन्तु पाणी हें अतिशय खारट व रत्नें महा-मत्स्यादि प्राण्यांनीं व्यापिलेलीं आहेत. त्या अर्थी तीं विपुल असून काय उपयोगाचीं? अर्थात् तीं विपुल असूनही जशीं निष्फल तद्वत् ज्या गृहस्थापाशीं पुष्कळ धन असून त्याचा जर आपल्या समानधर्मीय लोकांच्या व दीन अनाथ लोकांच्या सत्कार्यार्थ उपयोग होत नसेल तर तें धन विपुल असूनही काय करावयाचें? तें निष्फळच म्हटलें जाईल. तें त्याचें मालकीचें नाहीं. तें दुसऱ्या कोणातरी पुण्यवान् जीवाच्या उपयोगीं पडणार आहे. हा फक्त त्याचा रक्षक आहे. रात्रंदिवस तें कोणी नेत आहे कीं काय याची चौकशी करणारा आहे. ज्याच्या घरीं सुदैवानें सत्पात्र प्राप्त झालें असतां देण्याची सामग्री तयार असूनही देववत नाहीं त्याच्या हातीं चिन्तामणि रत्न प्राप्त होऊन तें नष्ट झाल्यासारखें आहे. द्रव्य प्राप्त झालें असून जो त्याचा व्यय पात्रदानाकडे करीत नाहीं तो मूर्ख आपल्या आत्म्याला ठकवित आहे असें समजावें.

सत्पात्राला दान द्यावें

जो आपलें द्रव्य दान करण्याकडे लावितो तोच त्याचा स्वामी समजावा. ज्याचे परिणाम नेहमीं सत्पात्राला दान देण्याविषयीं, उत्सुक असतात त्यांना दान देण्याचा प्रत्यक्ष संयोग प्राप्त झाला नाहीं तरी ते निरन्तर दान करीत आहेत असें समजावें. द्रव्य अगदीं थोडें अथवा पुष्कळ असूनही जे अतिशय भक्तीनें दान देतात तेच दातार होत. ज्यांना भक्ति नाहीं ते दातार नव्हत. वेळ सोडून अकालीं जे दान करितात त्यांचें दान अकालीं पेरलेल्या बीजाप्रमाणें निष्फळ होतें. जे अपात्राला दान देतात त्याचें दान खारट भूमींत पेरलेल्या बीजाप्रमाणें निरर्थक होतें. दुष्ट पुरुषाला दिलेलें दान सर्पाला पाजलेल्या शर्करामिश्रित गोड दुधापासून उत्पन्न होणाऱ्या विषाप्रमाणें संसारांत घोर दुःख, मरण व सन्ताप देणारें होतें. आपल्या नशीबानुसार जेवढें धन मिळेल तेवढ्यांतून दानाचा विभाग करून तें खर्चीत जावें. त्यावेळीं मनांत असा विचार करूं नये कीं, मजजवळ अधिक धन असतें तर मी अधिक खर्चिलें असतें. दानाकरितां अभिमान धरून अधिक धनाची इच्छा करूं नये. आपल्या लाभान्तराय कर्माच्या क्षयोपशमापासून मिळेल तेवढ्यांत संतोष मानणें व अधिक न इच्छिणें हेंही मोठें दान आहे. न्यायानें जें द्रव्य मिळविलें असेल त्यांतून कांहीं याचकांना देण्यांत उपयोगीं पडलें व गृहखर्चांत व देण्याघेण्यांत जर त्या द्रव्यापासून उपयोग झाला तर तें कमविणें सफल झालें, असे परिणाम दाताराचे नेहमी असावेत. जें दान द्यावयाचें तें आनंदानें द्यावें. तें क्रोध करून दिलें, अपमान करून दिलें, तिरस्कार करून दिलें व दूषण ठेऊन दिलें तर त्यापासून देणाऱ्याची जगांत अपकीर्ति होते व कलह उत्पन्न होतो. परलोकीं अशुभ कर्माचें फल दारिद्र्य व अपमान वगैरे अनेक जन्मपर्यंत भोगावे लागतें.

कुदान करूं नये

जे देण्यायोग्य नाहीं असें दान देणें याला कुदान म्हणतात. ते देणें योग्य नाहीं. भूमिदान करूं नये. कारण नांगर, फाळा, खोऱ्या, कुदळ यांनीं जमीन नेहमीं खोदली जाते. त्यावेळीं अनंत जीवांची हिंसा होते. मोठमोठे पंचेन्द्रिय जीव, सर्प, उंदीर वगैरे प्राणी धान्य फळादिकांचा नाश करणारे आहेत म्हणून मारावे लागतात. जमीनी वरील प्रेमामुळें भाऊ भाऊ परस्पर लढून प्राणास मुकतात. अशा तीव्र रागद्वेषाला उत्पन्न करणाऱ्या भूदानाला घोर पापबंधाचें कारण जाणून तें करूं नये. ज्यापासून तीव्र हिंसा उत्पन्न होते असें लोखंड दान देऊं नये. याचप्रमाणें सुवर्णदानही करूं नये. यापासून पात्र म्हणजे घेणाऱ्याचा नाश होतो. तो मारला जातो. त्याला सदैव भीति असते. सुवर्णदानापासून संयमाचा नाश होतो. राग, द्वेष, काम, क्रोध, लोभ, भय, मद, मत्सर वगैरे वरचेवर अधिक प्रमाणांत उत्पन्न होतात. आत्मस्वरूपाचा विसर पडतो. त्याअर्थी वीतराग धर्माची इच्छा करणाऱ्या पुरुषांनीं सुवर्णदान पाप आहे असें समजून तें देऊं नये. कोट्यवधि त्रस जीवांच्या उत्पत्तिला कारण अशा तिळाचें दान करूं नये. जातें, चूल, केरसुणी, मुसळ, खोऱ्या, मोड आलेलें धान्य, तेल, दिवा, गूळ, उसाचा रस इत्यादि पदार्थ तयार करण्यांत अनेक जीवांची हिंसा होऊन त्यावर अत्यंत मोह उत्पन्न

होतो. हे पदार्थ देण्यानें धर्म घडतो अशा विचारानें मिथ्यामार्गी लोक दान देतात. पण या सर्वांना कुदान म्हटलें आहे. हें संसाराचें बंधन वाढविणारें आहे. कन्येचें दान हेंही कुदान आहे. यावर कोणी म्हणेल कीं, गृहस्थाला कन्यादान केल्यावांचून कसें चालेल ? हें खरें. गृहस्थानें आपल्या कन्येचा विवाह योग्य कुलांत उत्पन्न झालेल्या जिनधर्मी, व्यवहारचतुर व गुणसंपन्न वराला पाहून करावा. परंतु कन्यादान करण्यांत धर्म घडतो अशी कल्पना करूं नये. जैन लोक कन्यादानाला पाप मानतात. जसें गृहकर्में आरंभादि करण्यांत अनेक पापांची उत्पत्ति होते तशीच कन्यादानांतही घडते. पण याचें पाप फार मोठें प्रायश्चित घेण्यानें नाहींसें होणार आहे. इतर लोक कन्यादान देण्यांत फार पुण्य प्राप्त होतें असें मानतात. ते कन्यादानाला लक्ष यज्ञ केल्याचें फल प्राप्त होतें व कोट्यवधि ब्राह्मणांना भोजन करविण्याहून व कोटी गाईचें दान देण्याहूनही अधिक फल प्राप्त होतें असें म्हणतात. पण जैन याला संसार–परिभ्रमण करविणारें कुदान म्हणतात. याशिवाय अनेक संसारसमुद्रांत बुडविणारी मिथ्यादृष्टि, लोभी, विषयलंपटी लोकांनीं वर्णिलेलीं कुदानें आहेत तीं सर्व जैन गृहस्थानें देऊं नयेत. त्यापैकीं कांहींचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

गोदान करूं नये

सोन्याची गाय, रुप्याची गाय, तिळाची गाय, तुपाची गाय तयार करून कित्येक दान करीत असतात, हें दान घेणारा या तुपाच्या व तिळाच्या गाई खातो. सुवर्ण रुप्याच्या गाई तोडून भट्टींत घालून आटवितो. गाईच्या शेपटींत तेहतीस कोटी देवता व अडुसष्ट तीर्थें आहेत असें ब्राह्मण प्रतिपादन करितात. मिथ्याधर्मी लोक दासदासीचें दान करीत असतात. संक्रान्त, ग्रहण, व्यतिपात, वगैरे दिवशीं दान देतात. हें सर्व मिथ्यात्व आहे. मेलेल्या माणसाच्या तृप्तिकरित ब्राह्मण–भोजन करवितात. ब्राह्मणांना जेऊ घातल्यानें मेलेल्या माणसाची तृप्ति कशी होते ? दान मुलानें द्यावें व बाप पापापासून मुक्त व्हावा हें आश्चर्य आहे. पुष्कळ दिवसापूर्वी मरण पावलेल्या माणसांचीं हाडें गंगेंत नेऊन टाकल्यानें मरणाऱ्याला मोक्ष प्राप्त होतो म्हणून मानतात. गयेंत जाऊन श्राद्ध केल्यानें एकवीस पिढ्यांचा उद्धार होतो. गयेंत पिंड दान केल्यानें दहा पिढ्या पहिल्या व दहा पिढ्या मागल्या व एक आपण अशा एकवीस पिढ्या संसारांत कुगतींत पडलेल्या निघून वैकुंठांत जाऊन राहतात. पहिल्यांदा मुलानातवांनीं व त्यांच्या संतानांनीं हवें तेवढें पाप केलेलें असो गयेला जाऊन श्राद्ध केलें म्हणजे एकवीस पिढी सुद्धा सर्वांची मुक्ति होतें म्हणून कोणीही पापाची भीति बाळगण्याचें कारण नाहीं असें वर्णन इतर लोकांच्या ग्रंथांतून आढळतें. श्राद्धांत ब्राह्मणांना मांसपिंडाचें भोजन करवितात. मांसानें देवदेवतांची तृप्ति होते; दुर्गा भवानी वगैरे देवी जीवांचें, राक्षसांचें व पशूचें रक्त प्राशन केल्यानें तृप्त होतात; देवतेला बकरे, हाले वगैरे कापून बलिदान करितात. याप्रमाणें अनेक पापकर्में करण्यांत धर्म घडतो अशी लोकांची खोटी समजूत घालतात. पापी लोकांनीं खोटीं शास्त्रें रचिलीं व मांस भक्षणासारखें महान् घोर कर्म करून स्वतः नरक मार्गी झाले व दुसऱ्यांनाही नरक मार्गानुगामी केलें. सारांश जिह्वेन्द्रियास लोलुप झाल्यानें कोणतेंही घोर कर्म करण्याचें बाकी ठेविलें नाहीं. पापी लोकांनीं मनुष्यजन्मांत येऊनही कोल्हे, कुत्रे,

बापासारखें दुष्ट आचरण केलें आहे. ज्यांच्या शास्त्रांत अशा भयंकर पाप उत्पन्न होण्यासारख्या गोष्टी वर्णिल्या आहेत म्हणून त्यांच्या व म्लेच्छांच्या धर्मांत कांहीं फरक नाहीं. हीं अक्षरें म्लेच्छांची आहेत ती वेदांतील आहेत असें अज्ञानी लोकांना भासवून शिकार करण्यांत धर्म आहे असें प्रतिपादन केलें. ज्यांचे देव गळ्यांत मुंडमाळा घालून मांस व रुधिर भक्षण करितात त्यांची सेवा करणाऱ्यां पाप्यांचें किती वर्णन करावें? अशा कुपात्रांना दान देण्यापासून भयंकर दुःख उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. कुदान देण्यापासून व घेण्यापासून नरक तिर्यंचामध्यें पुष्कळ वेळां जन्म मरण करावें लागून पुनः निगोदांत, एकेन्द्रियांत, द्वीन्द्रियांत अनंतकालपर्यंत असंख्यात परावर्तनें करावीं लागतील, असें जाणून कुदान करण्यास प्रवृत्त होऊ नये.

आतां पहिल्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें दान दिल्यास त्याचें काय फल प्राप्त होतें तें दाखवितात

सद्दानाचें फल

**गृहकर्मणापि निचितं कर्म विमार्ष्टि खलु गृहविमुक्तानाम् ।**
**अतिथीनां प्रतिपूजा रुधिरमलं धावते वारि ॥ ११४ ॥**

**अर्थ**–गृहरहित जे अतिथि म्हणजे मुनि. त्यांची प्रतिपूजा म्हणजे दान, सन्मान, उपासनादि करणें हें गृहस्थानें षट्कर्मापासून उपार्जन केलेल्या पापकर्मरूपमलाला शरीरावर लागलेला रक्ताचा डाग पाणी नाहींसें करतें त्याप्रमाणें नाहींसें करतें.

**भावार्थ**–गृहस्थाला नेहमीं आरंभादिकांच्या योगानें पापोपार्जन होत असतें. तें पाप नाहींसें करण्यास मुनीश्वरांना दिलेलें दान हेंच समर्थ आहे. अंगाला रक्ताचा डाग पडला तर तो रक्तानेंच धुतला असतां जात नाहीं, तो पाण्यानें धुतला जातो. तसें गृहाचारांत आरंभापासून उत्पन्न झालेलें पाप हें गृहत्यागी साधूना दान देण्यानेंच नाहींसें होतें.

दानाचा प्रभाव

**उच्चैर्गोत्रं प्रणतेर्भोगो दानादुपासनात्पूजा ।**
**भक्तेः सुन्दररूपं स्तवनात्कीर्तिस्तपोनिधिषु ॥ ११५ ॥**

**अर्थ**–तपस्वी मुनीला नमस्कार केल्यानें उच्च गोत्र प्राप्त होते. त्यांना दान दिल्यानें भोग-भूमीचें सुख मिळतें. त्यांची उपासना केल्यानें आपली पूजा होतें, त्यांची भक्ति केल्यानें सुंदर स्वरूप प्राप्त होतें आणि त्यांची स्तुति केल्यानें आपली कीर्ति होते.

**भावार्थ**– तपोनिधान, परमशान्त भावाला धारण करणारें, बावीस परीषह सहन करणारे, आपल्या देहाविषयीं ममत्व न ठेवणारे, पंचेन्द्रियांच्या विषयापासून अत्यंत विरक्त, अभिमान–कषाय-रहित, आत्मविशुद्धतेची इच्छा करणारे असे जे उत्तम पात्र मुनि त्यांना नमस्कार केल्यानें उच्च-गोत्र म्हणजे स्वर्गलोकीं जन्म व तेथून तीर्थंकरकुलांत जन्म किंवा चक्रवर्तीच्या कुलांत जन्म प्राप्त होऊन क्रमानें सर्वोत्कृष्ट सिद्धपदाची प्राप्ति होते. उत्तम पात्राला दान दिल्यानें भोगभूमीचे भोग वा देव लोकांतील भोग, राज्यवैभवाचे भोग, अहमिन्द्रपदांतील भोग प्राप्त होऊन पुढें तीर्थंकर-

चक्रवर्तिपद प्राप्त होतें. क्रमानें निर्वाणांतील अनंत सुख प्राप्त होतें. साधूंची उपासना म्हणजे सेवा केल्यानें त्रैलोक्यपूज्य केवलीचें पद प्राप्त होतें. त्यांची भक्ति केल्यानें सुंदर रूप प्राप्त होतें.

दानांचा प्रभाव

**क्षितिगतमिव वटबीजं पात्रगतं दानमल्पमपि काले ।**
**फलति च्छायाविभवं बहुफलमिष्टं शरीरभृताम् ॥ ११६ ॥**

अर्थ– योग्यवेळीं सत्पात्राला दिलेलें थोडें देखिल दान चांगल्या जमिनींत पेरलेल्या वडाच्या बीजाप्रमाणें प्राणिमात्रांना छाया म्हणजे माहात्म्य, ऐश्वर्य व वैभव वगैरे भोगोपभोगांच्या संपत्तिरूपानें फल देतें. सत्पात्र–दानाचें अचिन्त्य फल आहे. याच्या प्रभावानें सम्यक्त्व ग्रहण होतें. सम्यक्त्व नसणारा मिथ्यादृष्टि देखिल सत्पात्रदानाच्या प्रभावानें उत्तम भोगभूमींत जन्म घेतो. भोगभूमींत तीन पल्याचें आयुष्य, तीन कोस उंचीचें शरीर, समचतुरस्र संस्थान, ( अत्यंत सुंदर शरीर ) महान् बल, अतुल पराक्रम वगैरे गुणांची प्राप्ति होते. त्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांची जोडी ( युगल ) एकदम उत्पन्न होते. तीन दिवस गेल्यानंतर आहाराची इच्छा उत्पन्न झाली तर बोराएवढा आहार घेतल्यानें त्यांच्या क्षुधेची शान्ति होते.दहा जातीच्या कल्पवृक्षापासून त्यांना मनोवांछित भोगांची सामग्री प्राप्त होते. तेथें शीत उष्णाची बाधा मुळींच होत नाहीं. उन्ह किंवा पाऊस या दोहोंचाही त्रास नाहीं. दिवस रात्रीचा भेद नाहीं. नेहमीं प्रकाश असावयाचा. शीतल, मंद, सुगंध असा वारा नेहमीं वाहत असावयाचा. तेथील जमीनीवर खडे, दगड, गवत, कांटे, चिखल वगैरे मुळींच नसतो. जमीन स्फटिकमण्यासारखी निर्मळ असते. यावज्जीव शरीराला रोग होत नाहीं. म्हातारपण नाहीं. दुसरें कोणतेंही दुःख नाहीं. तेथें सेव्य–सेवकभाव नाहीं. परचक्राची भीति नाहीं. षट्कर्म करून उपजीविका करावी लागत नाहीं. तेथें दहा प्रकारचे कल्पवृक्ष आहेत. ते असेः—

१ तूर्यांग जातीच्या कल्पवृक्षापासून वीणा, बासुरी, सतार, मृदंग वगैरे कर्णमधुर वाद्यांची प्राप्ति होते.

२ पात्रांग जातीचे कल्पवृक्ष रत्नाचीं, सोन्याचीं वगैरे अनेक प्रकारचीं पात्रें, उपकरणें, दर्पण, झारी, आसन, पलंग वगैरे देतात.

३ भूषणांग जातीचे कल्पवृक्ष अनेक प्रकारचीं आभूषणें पुरवितात. शरीराला शोभविणारीं रत्नजडित कुण्डलें, बिंधवाळ्या, हार, कंठे,कडे, साकळे व इतर सर्व अलंकारांना आभूषणें म्हणतात.

४ पानांग जातीच्या कल्पवृक्षापासून पिण्यायोग्य असे मधुर सुवासानें भरलेलें पाणी व इतर पेयपदार्थ प्राप्त होतात.

५ आहारांग जातीचे कल्पवृक्ष अनेक प्रकारचें स्वादिष्ट भोजन तयार आणून देतात. पण क्षुधेची पीडा नसल्यामुळें त्याची विशेष जरूरी पडत नाहीं. रोगावांचून औषध कोण ग्रहण करील? भोगभूमींत जन्म घेणारांना क्षुधेची वेदना नसते. ते तीन दिवसानंतर बोरा एवढा आहार घेतात.

६ गृहांग कल्पवृक्षापासून अनेक प्रकारच्या रत्नांचीं घरें, प्रासाद प्राप्त होतात.

७ पुष्पांग जातीच्या कल्पवृक्षापासून नाना प्रकारच्या कोमल व सुगंधी फुलांच्या आभूषणांची प्राप्ति होते.

८ ज्योतिरंग जातीचे कल्पवृक्ष आपल्या प्रकाशापुढें सूर्यचन्द्राचा प्रकाश पडू देत नाहींत. सूर्यप्रकाशापेक्षा यांचा अधिक प्रकाश असतो म्हणून तेथें दिवस व रात्रीचा भेद राहत नाहीं.

९ वस्त्रांग जातीच्या कल्पवृक्षापासून नाना प्रकारचीं मनोवाञ्छित सुंदर वस्त्रें, शय्या, आसन, बिछायती वगैरे प्राप्त होतात.

१० दीपांग--दीपांगजातीचे कल्पवृक्ष दीपावलीची शोभा देतात.

भोगभूमींत स्त्री-पुरुषाच्या जोडीला मरणसमयीं पुरुषाला शिंक व स्त्रीला जांभई येते. त्यावेळीं त्यांना एक युगल म्हणजे एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें एकदम प्राप्त होतात.

**भोगभूमींत युगलोत्पत्ति**

आपल्या मुलास पाहण्यास मातापित्याचें युगल जीवंत राहत नाहीं व मुलें ही आपल्या मातापित्यांना पाहत नाहींत. म्हणून यांना वियोगदुःख नाहीं. मरणानंतर त्यांचा देह शरदऋतूंतील मेघाप्रमाणें विखरून जातो. युगल उत्पन्न झाल्यानंतर सात दिवसपर्यंत तें आपलें अंगुष्ठ चोखतें. पुढें सात दिवस खालीवर उलथें-पालथें होत असतें. पुढें सात दिवसांत अस्थिर असें गमन करितें. पुढें सात दिवसानंतर पूर्ण यौवन प्राप्त होतें. यानंतर सात दिवसांत सर्व शास्त्रकला-चातुर्यांत निपुणता प्राप्त होते. याप्रमाणें एकूणपन्नास दिवसांत तें परिपूर्ण बनतें. अनेक प्रकारच्या पृथक् व अपृथक् विक्रियांनीं नाना प्रकारच्या मंदिरांत विहार करीत प्रतिक्षणीं अनेक प्रकारच्या नवीन नवीन प्राप्त होणाऱ्या भोगसामग्रीचा ते उपभोग घेतात. अनेक क्रीडा, रागरंग वगैरे प्रकारच्या विलासक्रियेंत तीन पल्य आयुष्य पूर्ण करून मरणसमयीं शिंक व जांभईच्या निमित्तानें प्राणत्याग करितात. तें युगल सम्यग्दृष्टि असेल तर सौधर्म व ऐशान स्वर्गांत उत्पन्न होतें व मिथ्यादृष्टि असेल तर मरणोत्तर भवनवासी, व्यंतर, ज्योतिष देवांमध्यें उत्पन्न होतें. कषायाचा प्रभाव मंद असल्यानें देवगतिशिवाय दुसरी गति त्यांना प्राप्त होत नाहीं.

सम्यग्दृष्टि असून श्रावकांचीं व्रतें धारण करणारा असेल व त्यानें सत्पात्र दान केलें तर तो सोळाव्या स्वर्गापर्यन्त महर्द्धिक देव होऊनच जन्म घेतो. शास्त्रांत पात्राचे उत्तम, मध्यम आणि जघन्य

**श्रावकाचे तीन भेद**

असे तीन भेद सांगितले आहेत. त्यांतून महाव्रत धारण करून अठ्ठावीस मूलगुण व उत्तरगुण पाळणाऱ्या निर्ममत्वी वीतरागी साधूला उत्तम पात्र म्हटलें आहे. अकरा प्रतिमाधारी सम्यग्दृष्टि श्रावक व स्त्रीपर्यायांत आपल्या मर्यादेप्रमाणें व्रत धारण करणारी स्त्री, एक वस्त्राशिवाय इतर परिग्रहांचा त्याग करून दुसऱ्याचे घरीं एकवेळां याचना न करितां मौन धारण करून भिक्षा भोजन करणारी व अर्जिकेच्या समूहांत राहून धर्मध्यान करीत महान् तपश्चरण करणारी अर्जिका व अणुव्रतें व सम्यग्दर्शन धारण करणारी श्राविका ही मध्यम पात्र जाणावी. व्रतरहित पण जिनेन्द्राच्या वचनांवर भरवसा ठेवणारे सम्यग्दर्शन-

युक्त पुरुष व स्त्री जघन्यपात्र होत. या तीन पात्रांना चार प्रकारचें दान देणें, त्यांचें आदरातिथ्य करणें, उच्चस्थान देणें, त्यांचें यथायोग्य स्तवन, पूजन करणें, प्रशंसापर वचन बोलणें, उठून उभे राहणें, उच्च मानणें, वगैरे सर्व क्रियांचा दानांत अन्तर्भाव होतो.

**चार प्रकारचें दान**

**आहारौषधयोरप्युपकरणावासयोश्च दानेन ।**
**वैयावृत्त्यं ब्रुवते चतुरात्मत्वेन चतुरस्राः ॥ ११७ ॥**

**अर्थ**– चतुरस्र म्हणजे प्रवीण अशा ज्ञानवान् आचार्यांनीं वैयावृत्त्याचें आहारदान, औषध-दान, उपकरणदान आणि वसतिकादान असे चार भेद वर्णिले आहेत.

**भावार्थ**– गृहस्थांना चार प्रकारचें दान करण्यास आचार्यांनीं सांगितलें आहे. अभयदान मुख्यत्वें करून, षट्कायजीवांचा कृतकारित अनुमोदनांनीं विराधना करण्याचा त्याग केल्यानें तें अंशतः घडतें. पण विशेषतः आरंभत्याग ज्यांनीं केला आहे अशा दिगंबर यतींना घडतें. श्रावकालाही त्रसजीवांच्या संकल्पी हिंसेचा त्याग व विषयापासून पराङ्मुखता झाल्यानें होतें. याप्रमाणें गृहस्थानें आपला आचार, विचार, संपत्ति, ऐश्वर्य वगैरे पाहून व न्यायरूपानें प्राप्त होणाऱ्या विषयोपभोग त्यागतां येत नाहींत तोपर्यन्त आहारादि चार प्रकारचें दान करून पापाचा नाश करीत राहावें.

संपत्ति, आयुष्य, शरीर वगैरे अस्थिर आहेत. म्हणून दान केल्यानें गृहस्थ पूज्य होतो. गृहस्थपणा प्राप्त होऊन दान केलें नाहीं व सदैव पापारंभ करीत राहिलें तर तो गृहस्थपणा आरंभाच्या भारानें पाषाणाच्या नावेसारखा संसारसमुद्रांत बुडविणारा होतो.

दान विचार

ज्ञानी पुरुष असें चिंतन करितात कीं, "मी जें हें द्रव्य उपार्जन केलें आहे अथवा माझ्या वडिलांनीं मजकरितां मिळवून ठेवलेलें जें मला अनायासें प्राप्त झालें आहे, अथवा राज्य, ऐश्वर्य, देश, नगर, वस्त्राभरण, सेवकसमूह वगैरे सामग्री कांहींही श्रम न करितां प्राप्त झाली आहे, ती सर्व पूर्वजन्मीं दिलेल्या दानाचें म्हणजे दुःखितांचें पालन-पोषण केल्याचें फल आहे. मी पूर्वी दुसऱ्याचें धन हरण करावें असा स्वप्नांत देखील मनांत विचार आणिला नाहीं त्याचें व प्राप्त झाल तेवढ्यांत संतोष धारण करून विषयापासून विरक्त होऊन निर्वांछकता धारण केली त्याचें हें फल आहे. अथवा दीन, दुःखित, असहायी, रोगी, बाल, वृद्ध याजवर दया करून उपकार केला त्याचें फल म्हणून ही संपदा प्राप्त झाली आहे. हिचा संयोग अल्पकाल राहणार आहे. ही संपत्ति परलोकीं मजबरोबर येणारी नाहीं. ती जमिनींत पुरलेल्या ठिकाणींच राहील. अथवा दुसऱ्या कोठें ठेविली असेल तेथेंच राहील. दुसऱ्या कोणाजवळ ठेवरूपानें ठेविली असेल तर ती तेथेंच राहून जाईल. अथवा त्या संपत्तीचे स्त्री, पुत्र, कुटुंब वगैरे जे कोणी हक्कदार असतील ते मालक होतील. तिचा कोणी वारस न मिळाला तर राजा नेईल. हिचा संबंध जर सोडला नाहीं तर मी मात्र अचानक मरून दुर्गतीला जाईन. मी हें धन अनेक

प्रकारचें कपट करून, महान् पापारंभ करून, देशविदेशांत परिभ्रमण करून अतिशय कष्टानें संपादन केलें असून प्राणापेक्षांही अधिक याचें रक्षण केलें आहे. आतां याचा उपभोग न घेतां मरावें लागणार आहे."

शहाण्या पुरुषानें वरील विचार मनांत आणूं नये. जगाच्या रहाटीकडे पहावें. लाखो रुपायांचें धन जवळ आहे त्यांना तरी त्याचा उपभोग मिळतो काय ? उपभोग तर शेर पावशेर अन्नाचा मिळणार ! पण धन तृष्णा फार मोठी असतें. त्यामुळें आपलें धन कोणत्या उपायांनीं वाढेल याच्या विचारानें त्याला रात्रंदिवस चैन पडत नाहीं. दुसऱ्याजवळ पहातां पहातां पन्नास लाखांचें धन झालें व मजजवळ अवघें पांच लाखच ! आतां काय करावें ! आपलें धन कसें वाढवावें ! काय उपाय करावा ! कोणता व्यापार करावा ! कोणत्या राजाचें मन प्रसन्न करावें ! कोणाशीं मैत्री करावी कीं ज्याच्या सहायानें माझें धन तत्काल वृद्धि पावेल ? अथवा असा एखादा नौकर मिळावा कीं त्यानें थोडा पगार घेऊन माझें धन दुप्पट करून द्यावें. याप्रमाणें हजारों प्रकारांचे विकल्प करीत संसारी जीव प्राप्त झालेल्या सर्व संपत्तीचा व ऐश्वर्याचा भोग न घेतां रात्रंदिवस आर्तपरिणामानें तळमळ करीत मरण पावतो. व नरकांतील भयंकर पापाचा भोक्ता होतो. संसारांत अनंत दुःख भोगून परिभ्रमण करीत व क्षुधा, तृषा, रोग, दारिद्र्यांचा उपभोग घेत घेत त्याचा अनंतकाल लोटतो. या निकृष्ट कालांत कदाचित् कोणाला मोहरूपीं निद्रेचा उपशम होण्यानें जिनवचनांवर भरवसा बसला तर त्याच्या प्रभावानें जागृत होऊन आपल्या हिताच चिंतन केलें तर चार प्रकारचें दान करावें अशी त्याला बुद्धि होते.

सर्व दानांत आहार दान हें श्रेष्ठ आहे. कारण हा जीव आहारदानानें जगतो. कोट्यवधि रुपयांचे सुवर्णदान केलें तरी त्याची आहारदानाशीं बरोबरी होणार नाहीं. आहारापासूनच देह टिकतो. देह असेल तर रत्नत्रय-धर्माचें पालन होतें. रत्नत्रय-धर्मापासून निर्वाण प्राप्त होतो. निर्वाणांत

**आहार दान**

अनंत सुख आहे म्हणून निर्वांछिक साधूवर उपकार झाला तर फक्त आहारदानापासून होतो. साधु आहाराशिवाय दुसरी कोणतीही तिलतुषमात्र वस्तु ग्रहण करीत नाहींत. आहाराशिवाय शरीर टिकत नाहीं. आहार नसेल तर शरीरांत अनेक रोग उत्पन्न होतात. आहाराशिवाय ज्ञानाभ्यास होत नाहीं. आहाराशिवाय व्रत, संयम, तप यापैकीं एकही पाळतां येत नाहीं. आहारावाचून सामायिक, प्रतिक्रमण, कायोत्सर्ग, ध्यान यापैकीं एकही होत नाहीं. आहारावांचून परमागमाचा उपदेशही करता येत नाहीं. आहारावाचून उपदेशग्रहणाची ताकद रहात नाहीं. आहाराशिवाय शरीराची कांति रहात नाहीं. आहारावांचून क्षमा, शांति, नीति, गति, रति, उक्ति, शक्ति, द्युति, प्रीति, प्रतीति वगैरे सर्व नाहींशा होतात. आहाराशिवाय समभाव, इंद्रियदमन, जीव-दया, मुनिश्रावकाचा धर्म, विनयप्रवृत्ति, न्यायप्रवृत्ति, तपःप्रवृत्ति, यशःप्रवृत्ति वगैरे सर्वांचा नाश होतो. आहाराशिवाय वचनप्रावीण्य नाहींसें होतें. आहाराशिवाय शरीराचा वर्ण बिघडून जातो. शरीर व मुखाची दुर्गंधी येऊं लागते. आहारावांचून शरीर जीर्ण होऊन जातें. आहारावांचून सर्व

शरीराच्या चेष्टा ( व्यापार ) नष्ट होतात. आहार न मिळाला तर कित्येक लोक आपल्या प्राणप्रिय पुत्रपुत्री व प्रसंगी स्त्रीला देखील विकतात. आहार नसेल तर डोळ्याला अंधारी येते. कान बहिरे होतात, नाकाला वास येत नाहीं, स्पर्श समजत नाहीं. आहार नसेल तर मनुष्याची हालचाल नाहींशी होऊन तो मढ्यासारखा निश्चेष्ट होतो. आहार नसेल तर प्राण नाहींसा होतो. आहार नसेल तर चिंता, शोक, भय, क्लेश, संताप वगैरे उत्पन्न होतात. आहार न मिळाला तर दीन अवस्था होते. दैन्य प्राप्त झालेल्या माणसाचा जगांत फार अपमान होतो. याप्रमाणें घोर दुःख व दुर्ध्यान नाहींसें करणारें आहारदान ज्यानें दिलें त्यानें व्रतसंयम वगैरे सर्वांचें रक्षण केले. फार काय पण त्यानें सर्व रोग देखील नाहींसें केलें असें म्हटलें तरी चालेल. म्हणून आहारदानासारखा उपकार दुसरा कोणताही नाहीं.

**औषधदान**

दुसरें औषधदान हें सर्व रोगांचा नाश करणारें आहे म्हणून श्रेष्ठ आहे. रोगानें व्रतसंयमांचा विघाड होतो. स्वाध्याय, ध्यान वगैरे सर्व धर्मकार्याचा लोप होतो. रोगी पुरुषाला सामायिकादि आवश्यक क्रिया होऊं शकत नाहींत. रोगामुळें नेहमीं आर्तध्यान घडतें व त्यामुळें मरण बिघडतें. रोगी पुरुषांचें दुःख दररोज वाढत असतें. रोगी दुःखातिशयानें अपघात करूं इच्छितो. रोगी पराधीन होतो. त्याचें मन व इंद्रियें चंचल होतात. त्याला उठणें, बसणें, निजणें, चालणें फार कठिण होतें. प्रत्येक श्वासाबरोबर त्याची वेदना वाढत जाते. क्षणमात्रही त्याला चैन पडत नाहीं. फार काय पण, रोगी माणसाला खाणें, पिणें, बोलणें, चालणें, उठणें, बसणें, निजणें वगैरे सर्व कार्यें विषप्राशनाप्रमाणें दुःख देणारीं होतात. म्हणून प्रासुक [ शुद्ध ] औषधाचें दान करून रोग नाहींसें करणें यासारखा दुसरा उपकार नाहीं. रोग नाहींसा झाला असतां आहार घेतां येतो. व्रत, तप, संयम, ध्यान, स्वाध्याय कायोत्सर्गादिक करितां येतात म्हणून औषधदान करणें हें महत्पुण्याचें कार्य आहे.

**ज्ञानदान**

तिसऱ्या ज्ञानदानासारखा उपकार जगांत दुसऱ्या कोणत्याही वस्तूंनीं करतां येण्यासारखा नाहीं. ज्ञानाशिवाय मनुष्यजन्म हा पशुसारखा आहे. ज्ञानाभ्यासाशिवाय आपला व इतरांतील भेद समजत नाहीं. ज्ञानावांचून इहलोक परलोकाचा जाणपणाही होत नाहीं. ज्ञानावांचून धर्म कोणता, अधर्म कोणता, पाप कोणतें, योग्यायोग्य काय याचा विचार करितां येत नाहीं. ज्ञानाशिवाय देव, कुदेव, गुरु, कुगुरु, यांतील भेद समजत नाहीं. ज्ञानाशिवाय मोक्षमार्ग कळत नाहीं. ज्ञानाशिवाय मोक्षही नाहीं. ज्ञानरहित पुरुष व पशु यांत भेद नाहीं. इंद्रियांचे विषय पुष्ट करणें, कामसेवन करणें हें तर पशु देखील करितात. मनुष्य जन्म हा ज्ञानामुळेंच पूज्य आहे. म्हणून ज्ञानदान दिलें त्या पुरुषानें सर्व दान दिलें असें म्हणतां येईल. ज्ञान दान देणें हा मोठा उपकार आहे.

वसतिकादान म्हणजे स्थानदान होय. ज्याठिकाणीं शीत, उष्ण, पाऊस, वारा यांची बाधा

न होतां ध्यान-स्वाध्याय करितां येईल अशी जागा तयार करून अथवा बांधून देणें याला वसतिकादान म्हणतात. उत्तम पात्र जें परम दिगंबर महामुनीचा

वसतिकादान

समागम क्वचितकालीं घडून येतो. जगांत सर्वत्र पाषाण भरलेले आहे. त्यांतून चिंतामणि रत्नाची क्वचित् कोणाला तरी प्राप्ति होते. तसें वीत-राग साधूंचा समागम फार दुर्लभ. कदाचित् असा समागम प्राप्त झाला तरी त्यांना आहारदान आपल्या हातून घडणें कठिण. तो आहारही मुनीच्या निमित्तानें केलेला नसून सोळाप्रकारचे उद्गम दोष, सोळा उत्पादनदोष, दहा एषणादोष, याप्रमाणें बेचाळीस दोष व १ प्रमाण, १ संयोजन, १ धूम, १ अंगार असे चार मिळून शेंहेचाळीस दोष टाळून केलेला असावा. दिगंबर साधु शेंहे-चाळीस दोष, बत्तीस अंतराय, चौदा मल टाळून एकवार भोजन घेतात. तेंही अर्धें पोट अन्नानें, चतुर्थांश पाण्यानें व चतुर्थांश रिकामें ठेऊन घेतलें पाहिजे अशी परमागमाची आज्ञा आहे. कधीं एका उपवासाचें, कधीं दोन, कधीं तीन, कधीं चार, कधीं पक्षोपवास तर कधीं मासोपवासही मुनि करितात. भिक्षेच्या वेळीं अयाचक वृत्ति धारण करावयाची व नवधा भक्तिनें अन्न मिळालें तर घ्यावयाचें असा दंडक आहे. याप्रमाणें मुनीला आहार एखाद्या पुण्यवान् पुरुषाचें घरीं मिळावयाचा. अयाचक वृत्ति धारण करणाऱ्या मौनी मुनीला औषधदान देण्याचा योग जमणें फार कठिण. कोणा गृहस्थानें आपणाकरितां शुद्ध औषधी तयार करविली असेल व अचानक मुनीश्वरांचा समागम प्राप्त झाला तर त्यांच्या शरीरांतील रोग, चेहेऱ्यावरूनच त्यांनीं न सांगतां जाणून योग्य औषध असेल तर द्यावें. पण असा योग जमणें कठिण असल्यामुळें मुनींना औषधदान मिळत नाहीं. शास्त्रदान दिलें तर तें वाचण्याची इच्छा असेल तर वाचेपर्यंत ठेवतात. पुढें चैत्यालयांत ठेऊन निघून जातात. मुनिना वसतिकादान ही दुर्लभ आहे. कारण दिगंबरसाधु एकाच जागीं राहत नाहींत. कधीं पर्वताच्या गुहेंत तर कधीं भयंकर वनांत, कधीं नदीच्या वाळवंटांत बसून ध्यान करितात. एखाद्या वसतिकेमध्यें वा खेड्यांत एक दिवस व शहर असल्यास पांच दिवस व पावसाळ्यांत चार महिने एका जागीं त्यांना राहावें लागते. अथवा एखाद्या साधूची समाधि-मरणाची वेळ आली असेल तर ते महिना-दोन महिनें एक जागीं रहातात. याशिवाय जैनसाधु एक जागीं रहात नाहींत. एक रात्र किंवा दोन रात्रीं क्वचित् एखाद्या निर्दोष वसतिकेंत रहातात. ती वसतिका पण त्यांचेकरितां मुद्दाम तयार केलेली नसावी. त्यांच्या देखत जागा झाडून काढतां कामा नये. त्यांच्या समक्ष ती धूतां उपयोगी नाहीं. उजेड येण्याचीं दारें पण त्यांचे समक्ष उघडूं नयेत. दार लावलें असेल तर त्यांच्या समक्ष उघडूं नये. भाड्याची जागा त्यांचेकरितां घेऊं नये. आपली जागा राहण्यास देऊन दुसऱ्याची जागा बदल्यांत घेऊं नये. याचना करून अथवा राजाचें भय दाखवून पण ती घेतली नसली पाहिजे. अशी वसतिका असेल तर तेथें कदाचित् वर सांगितल्याप्रमाणें मुनि राहिले तर राहतात. याप्रमाणें शेंहेचाळीस दोषरहित वसतिका असेल, अथवा ओसाड जागीं एखादें घर असेल, ज्या ठिकाणीं असंयमी लोकांचें येणें-जाणें, व स्त्री नपुंसक तिर्यंचाचें आगमन नसेल, ज्या ठिकाणीं

जीवांची विराधना होत नसेल व अंधकार नसेल तेथें साधु एक किंवा दोन रात्रीं राहतात. अनेक देशांत विहार करणाऱ्याला वसतिकादानाचा उपयोग होणें फार कठिण आहे. अशा उत्तम पात्राला दान देण्याचा प्रसंग प्राप्त होणें कठिण. सध्यां पंचमकालांत वीतरागी भावलिंगी साधु क्वचित् कोठें तरी असावयाचे. अशा साधूंचा समागम होणें शक्य नाहीं. चतुर्थकालांत अशा पात्रांचा लाभ महत् भाग्यानेंच होत असे. परंतु त्यावेळीं या क्षेत्रांत उत्तम पात्रें तरी पुष्कळ असत. पण आतां या दुःखमाकालांत यथार्थ धर्म पाळणारे पात्र पाहण्यासही मिळणें कठिण झालें आहे. धर्मभ्रष्ट, लोभी, अज्ञानी, वगैरे पुष्कळ साधु आढळतात. पण ते सर्व अपात्र आहेत. या कालांतही जिनधर्माचें श्रद्धान पक्के असणारे गृहस्थही कोठें कोठें आढळतात. वीतराग धर्माचें श्रवण करून कुधर्माची आराधना करण्याचा ज्यांनीं त्याग केला आहे व अहिंसा धर्म धारण करून जिनवचनरूपीं अमृत-पान करून शील व संतोषवृत्ति धारण केली आहे असे तपस्वी हेंच उत्तम पात्र आहे. याशिवाय इतर भेषधारी पुष्कळ असून काय उपयोग ! ज्यांना मुनिधर्म व श्रावकधर्म यांतील भेद कळला नाहीं, सम्यग्दर्शन वगैरेचें यथार्थ ज्ञानही नाहीं, त्यांचें ठायीं सत्पात्रत्व तरी कोठून असणार ! मिथ्यादर्शनाच्या प्रभावानें आत्मज्ञान होत नाहीं. अंतरंगांतील लोभवृत्तीमुळें मधुर भोजनाची इच्छा करणारे पुष्कळ आढळून येतात. ते सर्व अपात्र समजावेत.

या कलिकालांत भावलिंगी मुनीश्वर, अर्जिका, व क्षुल्लक यांचा समागम मुळींच नाहीं. पण चिंतामणि रत्नाप्रमाणें एखाद्या भाग्यवान् पुरुषांना त्यांचा समागम होऊन दान देण्याचा योग आला तर त्यांना पवित्र अन्नाचें भोजन द्यावें. अर्जिकेचा समागम घडल्यास त्यांना एक पांढरें वस्त्र द्यावें. तिनें तें वस्त्र घेऊन जुनें तेथेंच टाकावें. क्षुल्लकाला एक कौपीन ( लंगोटी ) व अपुरें वस्त्र ज्या योगें त्याला आपलें सर्वांग झांकता येणार नाहीं असें हलक्या किंमतीचें द्यावें. त्यानेंही नवें मिळाल्या-नंतर जुने तेथेंच टाकावें. याशिवाय दुसरें कांहींही ग्रहण करूं नये. आपण

**मुनी, आर्जिका व क्षुल्लक यांना दान द्यावें**

आमंत्रण न देतां कदाचित् असें पात्र आपल्या घरीं अचानक आलें तर गृहस्थानें आपणाकरितां केलेल्या अन्नांतून ते द्यावें. अशी दान देण्याची पद्धति असल्यामुळें गृहस्थाला दानासाठीं वेगळ्या खर्चाचा बोजा पडत नाहीं. अशा स्थितींत धनवान् पुरुषानें आपलें द्रव्य कोणत्या कामीं लावून तें सफल करावें ? असा प्रश्न उत्पन्न होतो. भोगोपभोगामध्यें त्याचा विनियोग करावा तर ते भोगोप-भोग तृष्णा वाढविणारे व इंद्रियांना विकल करून महान् पापामध्यें प्रवर्तविणारे आहेत व त्यापासून नरक-गतीची प्राप्ति होते व आपल्या हिताहिताचें ज्ञान नाहींसें होतें. मोहामुळें, ममतेमुळें आपले पुत्रादिक त्या द्रव्याचे मालक आपोआप होतातच. त्याअर्थी पापाचार करून दुर्ध्यानानें धर्माचा विध्वंस करून जी प्राप्त करून घेतली त्या संपत्तीचा अर्धा भाग धर्माकरितां, दयेकरितां, सत्पात्राला दान देण्यांत खर्च करून आपलें हित करून घ्या.

येथील संपत्ति सोडून परलोकीं जाल त्यावेळीं पुत्रपौत्रांना पाहण्याला परत याल काय ?

कुटुंबाचा संबंध तुमच्यांशीं या चर्माच्छादित मुखनासिकानेत्राशीं आहे. यांचा नाश होऊन

**कुटुंब, संपत्ति व वैभव नश्वर आहे**

हे मातीशीं मिळून जातील. कुटुंबांतील माणसें तुमचा दुसरा पर्याय पाहावयास येणार नाहींत. तुम्ही त्यांना पाहावयास येणार नाहीं. कारण ज्या इंद्रियांनीं तुम्ही कुटुंबाला जाणतां तीं जळून भस्म झालीं. आतां तुम्हीं तुमच्या कुटुंबाला कशानें पाहणार ! पुत्रादि कुटुंबाचा संबंध तुमच्या शरीरावरील चामड्याशीं आहे. ते तुमच्या आत्म्याला जाणींत नाहींत. मग तुमचें चामडें जळून राख झाल्यावर तुमच्याशीं कोठें संबंध करणार ! म्हणून हे ज्ञानी पुरुषांनो, जीवन हें अल्प आहे. पुत्रपौत्रादिकांचा संबंधही अल्पकाल राहणारा आहे. संसारांत आपलें रक्षण करणारा कोणीही नाहीं. फक्त एक धर्मच शरण आहे. हें द्रव्य तुमचें नव्हे. कांहीं एखादा पुण्यप्रभावानें दोन दिवस याचा मालक झाला तरी पुनः त्याचा त्याग करून त्यास मरावें लागणार आहे. हें द्रव्य परलोकीं बरोबर येणारें नाहीं. पुत्राच्या प्रीतीनें अनेक प्रकारचे दुराचार करून जें द्रव्य तुम्ही सांठवीत आहांत तें हें धन व पुत्रावरील ममत्व ( प्रेम ) तुम्हाला संसारांत स्वत्वाची भूल पाडून नरकाला पोंचवील. त्यापासून अनेक जन्मांत दरिद्री होऊन फिरावें लागेल. हजारों माणसें दररोज अन्नान्न करून मरत आहेत. दरिद्री व दीन होऊन घरोघर भीक मागत आहेत. त्याकडे कोणी पाहत नाहीं. त्यांचें म्हणणें कोणी ऐकून घेत नाहीं. तरी हा सर्व प्रभाव त्यांनीं पूर्वी अनेक जन्मांत द्रव्यावर तीव्र ममता केली त्याचें फल आहे. तुम्हाला वैभव, संपत्ति, रत्न, सुवर्ण, रुपें वगैरे वैभव प्राप्त झालें आहे, अनेक प्रकारचे सुरस अन्नाचें मधुर भोजन दररोज मिळत आहे, रूपवती, शीलवान् व प्रीतिरसानें भरलेल्या स्त्रीचा समागम प्राप्त झाला आहे, आज्ञा धारण करणारे पुत्र आहेत, सदैव धन्याचें हित इच्छिणाऱ्या व चतुर अशा सेवकाचा लाभ झालेला आहे, मोठमोठीं विस्तृत व सुंदर अशी घरें व बंगले राहण्यास मिळत आहेत, याशिवाय इतरही पुष्कळ सुखसामग्री प्राप्त झाली आहे, हें सर्व पूर्वजन्मीं दान दिलें त्यांचें फल आहे. दानाच्या प्रभावानें भोगभूमींत जन्म, व स्वर्गांतील विमानांचा स्वामीपणा प्राप्त होतो. त्याठिकाणीं असंख्यात कालपर्यंत सुख भोगतां येते. असें असतां इहलोकीं प्राप्त झालेली थोड्या वेळपर्यंत टिकणारी व दुःखदायक अशा तुच्छ संपदेची व अतिशय मलिन अशा देहाची मातबरी कां ठेवावी ? ही संपदा तुमचेजवळ स्थिर राहणारी नाहीं. ही लक्ष्मी आमची आहे. आमच्या कुलपरंपरेनें चालत आली आहे, ही आमच्यापासून नाहींशी होण्याइतकें मूर्ख अजून आम्ही बनलों नाहीं, म्हणून ती आमचेपासून नाहींशी होणार नाहीं असें तुम्हांस वाटत असेल तर हा तुमचा निवळ भ्रम आहे. या भ्रमाचें कारण मिथ्यादर्शन आहे. अनंतानुबंधी कषायाच्या उदयानें तुम्हाला अभिमान उत्पन्न झालेला आहे. तो थोड्याच दिवसांत तुम्हाला नारकी बनवील. याकरितां हे सत्पुरुषहो !

**नश्वर संपत्तीचा अभिमान धरूं नये**

जर तुमची जिनवचनावर श्रद्धा असेल, धर्मावर प्रीति असेल, दुःखी लोकांना पाहून दया प्राप्त होत असेल, तर मनांत सम्यक्त्वाचें चिंतन करा कीं, " आपण द्रव्यावर ममत्व करून पूर्वीच्या धनाची महत्प्रयासानें रक्षा केली व नवीनही पुष्कळ मिळविलें. तें उपार्जन करण्याकरितां क्षुधा, तृषा,

शीत, उष्णादिक व्यथा भोगिल्या. अनेक प्रकारचे व्यापार, राजसेवा, विदेशगमन, समुद्रप्रवेश वगैरे आरंभ केले. अधर्मी अशा म्लेंच्छ लोकांना खुष करण्यासाठीं निंद्य कर्में केलीं, हरेक प्रयत्न करून धन उपार्जन केलें. आतां अचानक मरण प्राप्त झालें तर या द्रव्याचें रक्षण कोण करील? आतां आपण अन्याय, अनीति व पापरूप व्यापार, पापी लोकांची सेवा करून धन उपार्जन करण्याचा अवश्य त्याग लौकर केला पाहिजे. न्यायानें प्राप्त होणाऱ्या द्रव्यामध्यें मर्यादा करून राहिलें पाहिजे. तसेंच आजपर्यंत ज्यापासून अन्यायानें व बळजबरीनें धन घेतलें, अथवा लोकांच्या मनाला दुःख देऊन, त्यांना थापा देऊन, भुरळ पाडून, चकवून, फसवून, जें घेतलें तें सर्व त्यांना परत देऊन त्यांची क्षमा मागावी. आपल्या द्रव्यांतून मुलाबाळांचा भाग व धर्माचा भाग असे दोन निरनिराळे विभाग करावे व परोपकाराकरितां दानविभागांतून नेहमीं द्रव्य खर्चीत जावें. आपण जें नवीन धन संपादन करीत असूं त्यांतून देखील चौथा, सहावा, आठवा अथवा अगदीं जघन्य म्हणजे दहावा भाग तरी निदान पुण्यकार्यामध्यें लावावा. त्या दानाचा विभाग संकटग्रस्त, निर्धन, दुःखी वगैरे सर्वांना प्राप्त व्हावा. ज्याला आपलें उदरपूर्ती इतकें देखील अन्न मिळत नाहीं, अर्धे पावशेर कसें तरी महान् कष्टानें अन्न प्राप्त होतें. त्यानें देखील मिळालेल्या अन्नांतून दानविभाग म्हणून वर वर्णिल्याप्रमाणें वेगळा काढून तो दुःखी व भुकेलेल्यांना दिला पाहिजे. दानाशिवाय नुसतें घर स्मशानाप्रमाणें असून त्या घरांतील माणसें मेलेल्या माणसासारखीं व इतर कुटुंबीजन गिधाड पक्ष्याप्रमाणें त्या पुरुषाचें धनरूपीं मांस वारंवार टोचें मारून खात आहेत असें समजावें.

*उत्पन्नांतून दहावा भाग तरी धर्मार्थासाठीं द्यावा.*

जे गृहस्थ धनवान् आहेत ते जैनांचे अनेक प्रकारें पालन करितात. जे धर्मांत शिथिल झाले असतील त्यांचा धनाढ्य पुरुषांनीं सन्मान केला व त्यांशीं मिष्ट भाषण केलें तर ते धर्मांत पुनरपि दृढ होऊन राहतात. कित्येक काम करण्यायोग्य, चाकरी करण्यायोग्य असतील त्याजकडून काम करून घेऊन त्यांचें उदरपोषण करावें. कित्येक व्यापार करून द्रव्य कमावण्या लायक असतील त्यांना द्रव्य सहाय देऊन त्यांचें रक्षण करावें. कित्येकांना व्यापारधंद्यास लावून त्यांचा उदरनिर्वाह करवावा. कित्येकांना धैर्य देऊन, व्यापार करवून द्रव्य उत्पादन करविण्यास शिकवावें. कित्येकांना दुसऱ्यास सांगून रोजगाराला लावावें. कित्येकांना योग्य मार्गदर्शन देऊन धंद्याला लावावें. पुण्यवान् जीवांच्या आश्रयाखेरीज मनुष्याला आपल्या पायावर उभा राहतां येणें फार कठिण पडतें. अशा कृत्यांनीं आपलें धन नाहींसें होईल अशी भीति बाळगूं नये. आपल्या धर्मबांधवाच्या कामीं उपयोगीं पडणारें धन हेंच आपलें आहे असा विचार मनांत आणावा.

*स्वधर्मीयाचें पालन करावें.*

जें धन याप्रमाणें आपल्या धर्मबंधूच्या उपयोगीं पडलें नाहीं तें आपलें नव्हे असें समजावें. यापूर्वीं कित्येक मोठमोठे धनवान् व प्रतिष्ठित होऊन गेले, त्याचें धन कर्मोदयानें

श्रीमंताच्या आपत्तींत त्याला आश्रय द्यावा.

नाहींसें झालें, आजीविका नाहींशी झाली. खाण्यापिण्याची पंचाईत पडली, भुकेमुळें घरांत बायका-पोरांचा भयंकर त्रास होऊं लागला. अशा पुरुषाला मेहनत-मजूरी होत नाहीं. त्याच्यानें हलकें काम होत नाहीं. मोठा मनुष्य म्हणून कोणी ठेवून घेत नाहींत ! आभरण, वस्त्र, पात्र वगैरे सर्व विकून आजपर्यंत चाललें. आतां कोणाला सांगावें ! काय उपाय करावा ! अशा विवंचनेंत पडलेल्या प्रतिष्ठित दुःखी पुरुषाला आजीविका करून द्यावी. घाबरलेल्या मनुष्यास दुःख-समुद्रांतून हात देऊन वर काढावें. धर्माकडे त्याचें लक्ष वेधावें. थोडाबहुत आश्रय देऊन त्यांस आपण मदत करावी अथवा इतराकडून करवावी.

याशिवाय जे कोणी स्त्री-पुत्ररहित असतील त्यांना धर्मकार्याकडे लावून त्यांचें खाण्यापिण्याचें दुःख नाहींसें करावें. कित्येक वृद्ध झाल्यामुळें उद्योग करण्यास असमर्थ असतील, कित्येक जिनधर्मावर दृढ श्रद्धा ठेवीत असूनही इंद्रियें शिथिल झाल्यानें व शरीरांत रोग प्राप्त झाल्यानें कांहीं काम करवत नसेल अशांना कोणाचें तरी सहायाची जरूरी असते. त्यांना धनवान् पुरुषांनीं आश्रय देऊन धर्मांत स्थिर करावें. हें कार्य द्रव्यवान् पुरुषांकडूनच होणारें आहे. कित्येकांना पुत्रादि नसल्यानें निराश बनावें लागलें असेल त्यांना धर्माचा आश्रय करवावा.

वृद्ध अथवा निराश्रितांना आश्रय द्यावा.

कित्येक श्राविका दुर्दैवानें विधवा झाल्यानें व त्यांना कोणाचाही आधार न राहिल्यानें अन्नवस्त्राची उणीव भासत असेल त्यांना करुणाबुद्धिनें अन्नवस्त्राची सोय करून देऊन धर्ममार्गाकडे लावावें. धनवान् पुरुषांच्या सहाय्यानें निर्धन लोकांचें स्वधर्माचें अवलंबन स्थिर राहतें. कित्येक अणुव्रतें धारण करितात, कित्येक पांचवी प्रतिमा धारण करून सचित्त वस्तु खाण्याचा त्याग करितात, कित्येक पर्वतिथीला उपोषणें करूं लागतात, कित्येक नियमितकाल ब्रह्मचर्याचा व कित्येक आजन्म स्त्रीत्यागाचा नेम घेतात. कित्येक परिग्रहाचा, पापकार्याला अनुमोदन देण्याचा, उद्दिष्ट आहाराचा त्याग करितात. याप्रमाणें श्रावकाच्या अकरा प्रतिमा धारण करण्यानें दान घेण्याला पात्र होतात. धनवान् पुरुषांची धर्माकडे प्रवृत्ति पाहून अनेक लोक त्याच मार्गाचें अनुकरण करितात.

श्रीमंत माणसांनीं विद्या पठण करण्याचीं स्थानें ( पाठशाळा ) तयार करावीत. त्यांत शिकणाऱ्यांच्या उपजीविकेची सोय करावी. त्यांत व्याकरण, न्याय, काव्य, गणित, तर्क वगैरे अनेक विद्या शिकण्याची सोय असावी. यांतून जैनामध्यें शेंकडों विद्यार्थी शिकून तयार होतील तर धर्मपरंपरा टिकेल. कित्येक बुद्धिमान असून त्यांना उपजीविकेचें साधन नसेल तर कांहीं तरी साधन करून देऊन त्यांना निराकुल केल्यानें धर्मप्रवृत्ति चालू राहते. याचप्रमाणें अनेक ग्रंथ लिहवून ते विद्यार्थ्यांना अथवा वाचणारांना द्यावेत. ग्रंथ शोधण्याकरितां योग्य असलेल्या लोकांना मदत करावी. ज्ञानाभ्यास करणाऱ्यावर प्रेम करावें, आपल्या आत्म्याला ज्ञानाभ्यासांत लावावें, आपल्या पुत्रांना व कुटुंबीजनांना ज्ञानाभ्यासांत लावावें व जसें बनेल तशी लोकांना शास्त्राच्या अभ्यासांत रुचि उत्पन्न

ज्ञानदानाची सोय करावी.

करावी. शास्त्र हें धर्माचें बीज आहे. शास्त्राचें ज्ञान झालें असतां शेकडों दुराचार नष्ट होतात.

औषधदान देण्यांत फार पुण्य आहे. अनेक रोगाला नाहींशी करणारीं औषधी तयार करून रोग्यांना देण्याची सोय करावी. निर्धन माणसांना आयतीं तयार औषधें मिळाल्यास त्यांना त्याचा फार उपयोग होऊन उपकार घडतो. केवळ निर्धन माणसांनाच त्याचा उपयोग होत नसून श्रीमंत माणसाला देखील त्याचा उपयोग होतो. निर्धन व दुःखी लोकांना औषधदान देण्यांत महत्पुण्य आहे. गरीब व दरिद्री माणसांना औषध मिळत नाहीं. त्यांना कोणी तयार करून देत नाहीं. तयार करून देणारा असला तरी जवळ पैसे नसल्यानें त्यास सामग्री आणून देतां येत नाहीं, म्हणून त्यांना आयतीं तयार औषधें मिळण्यानें रोगप्रतीकार करितां येतो. रोग नाहींसा करण्यासारखें दुसरें दान कोणतेंही नाहीं.

औषधदान.

अभयदान हेंही तसेंच श्रेष्ठ आहे. धर्मवान् जीवांना राहण्याकरितां, त्यांना धर्मसाधन करण्याकरितां आपल्या शक्तिप्रमाणें धर्मशाळा वगैरे बांधवून द्याव्या. आपल्या घरीं जागा असल्यास तेथें त्यांची राहण्याची सोय करावी. कारण राहण्यास योग्य स्थल मिळाल्या-शिवाय धर्मसाधन करण्यांत परिणाम स्थिर होऊं शकत नाहींत. कोणी सहधर्मी, परदेशी, दुःखी, आगंतुक आला तर महिना-दोन महिने त्याचे जेवणाची सोय करून द्यावी. कोणी प्रवास करीत असतां त्याजजवळील धन संपून अडचणींत पडला व त्यामुळें त्यांस आपल्या गांवीं पोंचण्या इतकेही पैसे नसले, अथवा रस्त्यांत चोरांनीं गांठून त्याजपासून सर्व द्रव्य नेलें व तो स्वधर्मीय जाणून आपल्याकडे आला तर त्याला गांवीं पोंचण्याइतकी मदत करावी. परदेशी असून रोगी असेल त्याला राहण्यास जागा देऊन औषधोपचार करवावा. वरचेवर त्याला धर्मोपदेश देत असावें. त्याचा दररोज समाचार घ्यावा. त्याचें वैयावृत्य करावें. निर्धन माणसाकडून न होणारें असें औषधदान धनवान् पुरुषानें अवश्य करीत रहावें. ज्यांच्या परिणामांत चंचलता प्राप्त झाली असेल, रोगानें, वियोगदुःखानें, दारिद्र्यानें जे घाबरले असतील त्यांना धर्मोपदेश देऊन धैर्य धारण करवावें.

अभयदान.

आपण आपल्या आत्म्याला निरंतर ज्ञानसमृद्ध करीत असावें. ज्ञानवान् असलों तर अनेक जीवाला धर्मोपदेश द्यावा. अथवा कोणी शास्त्रार्थ जाणणाऱ्या पुरुषाची प्राप्ति झाली तर तो कल्पवृक्षा-सारखा लाभ समजून मोठ्या हर्षानें त्याच्या उपजीविकेची व्यवस्था करून द्यावी. त्याशीं अतिशय नम्रपणानें वागून आदरानें धर्म ग्रहण करावा. धर्म वृद्धिकरितां ज्ञानी पुरुषांचा सन्मान करून धर्मोपदेशाची, तत्त्वनिर्णयाची गुणस्थानमार्गणांची चर्चा करवावी. धर्माची व सम्यग्ज्ञानाच्या प्रभावनेची प्रवृत्ति करावी. ज्याठिकाणीं धर्मप्रवृत्ति शिथिल झाली असेल त्या गांवीं शास्त्रें लिहवून, भाषांतर करवून योग्य अशीं पुस्तकें पाठवून द्यावीं. ज्ञानदान सर्व लोकांना करीत जावें. संपत्ति प्राप्त झाली असतां दान सन्मानानें, प्रियवचनानें, आपल्या मित्र कुटुंबाला देऊन आनंदित करावें. संपदेचा समागम आणि

स्वतः व इतरांसही ज्ञान द्यावें.

आयुष्य हें क्षणभंगुर आहेत. धनानें, देहानें व वचनानें अन्य जीवांवर नेहमीं उपकार करीत राहणें हेंच मनुष्यजन्मांतील श्रेष्ठ कर्तव्य आहे.

गोड बोलणें हें मोठें दान आहे. शत्रूवरील आपलें वैर सोडून प्रियवचनांनीं त्याची क्षमा मागणें हें देखील मोठें दान आहे. आपलें द्रव्य, जमीन जुमला देऊनही प्रसंगीं त्याला संतुष्ट करावें. त्याविषयीं आपल्या मनांतून वैर नाहींसें करावें व अभिमान नाहींसा करावा. दरिद्री असून कुटुंबवत्सल असेल त्याचा शक्तिप्रमाणें दान देऊन सन्मान करावा. आपली बहीण, मुलगी, निर्धन असेल तर त्यांना वरचेवर भोजन-पान, वस्त्रप्रावरणादिकांनीं संतुष्ट ठेवावें. दयाळु पुरुष दुसऱ्याचें दुःख, दानसन्मानादिकांच्या योगें नाहींसें करितात. मग जीं माणसें भाऊ, बहिण, आत्या, मुलगी, जांवई वगैरे आपल्या कुटुंबाचीं अंगें आहेत त्यांना कधींही दुःखी ठेऊं नये.

मधुर भाषण हेंही एक दानच आहे.

कोणी आपलें नुकसान केलें तरी त्याला कटु वचन बोलूं नये. त्यांना म्हणावें, " आपण आपल्या परिणामांत संताप होऊं देऊं नका. गृहस्थाश्रमांत लाभ अलाभ कर्मानुकूल होत राहणार. आजुबाजूची सर्व सामग्री विनाशिक आहे. तुम्ही आपल्याकडून होईल तितक्या प्रयत्नानें व सद्धेतूनें आमचें कार्य सुधारावें म्हणून प्रयत्न करीत आहां. पण आमच्या कर्मानुसार त्यांत यश येत नाहीं. याबद्दल आपण वाईट मानूं नये. " अशा मधुर भाषणांनीं त्याला संतुष्ट करावें.

कटु भाषण करणारावरही दया करावी.

आपल्या धनापासून कोणा तरी जीवावर सदैव उपकार घडावा अशी चिंता करीत असावें. इतर लोक आपलें हित करोत वा अहित करोत आपण मात्र सदैव उपकार करण्याविषयीं तत्पर असावें. याचप्रमाणें कोणी कैदेंत पडला असेल, कोणावर खोटा खटला झाला असेल तर त्याला आपण मदत करून सोडविण्याचा प्रयत्न करावा. कोणी आपलें धन चोरिलें असेल तर मधुर भाषणांनीं शांतभाव धारण करून त्याला समजावून तें परत घ्यावें. निर्धनाशीं कोणत्याही कारणामुळें तंटा करूं नये. कोणी कांहीं वस्तु चोरून खात असेल व तें पाहून त्याची चारचौघांत फजीती करूं नये. आपले आश्रित असतील त्यांचे पालनपोषण करावें. विधवा स्त्रिया, अनाथ मुलें, माणसें, रोगी व वियोग दुःखानें व्यापलेले असतील त्यांचें दुःख नाहींसें करण्यांत तत्पर असावें. बालक वा बालविधवा असेल तर त्यांचें काळजीपूर्वक पालनपोषण करावें. आपणाशीं जे वैर करीत असतील व आपण उपकार केला असूनही त्याला जे अपकार मानीत असतील त्याविषयीं मनांत विषाद न मानतां त्यांचा दानसन्मान करावा. योग्य प्रसंग प्राप्त झाला असून जर आपल्या आप्तमित्रांचा आपण सन्मान केला नाहीं तर आपणांस प्राप्त झालेलें धन व ऐश्वर्य व्यर्थ समजावें. आपापल्या मुलालेंकरांचें पालन कुतरीं मांजरें देखील करितात. त्याप्रमाणें आपणही आपल्याच मुलाबाळांचें कल्याण केलें यांत महत्त्व नाहीं. प्रसंगानुसार आपला नाश करणाराचें, आपलें द्रव्य हरण करणा-

आपल्या द्रव्याचा परोपकाराकडे उपयोग करावा.

रावें, व शत्रूचें देखील आदरातिथ्य करून त्याचा दानसन्मानादिकांनीं आदर करून वैराचा अभाव करणें फार कठिण आहे व तें करणें यांतच खरा पुरुषार्थ आहे. मनुष्यजन्म, धन, संपदा, यौवन, ऐश्वर्य वगैरे सर्व क्षणभुंगर आहेत. आजपर्यंत अनेकांचें धन व ऐश्वर्य नष्ट झालें आहे. त्यांच्या नांवाचा मागमूसही कोठें उरला नाहीं. श्रीकार्तिकेयस्वामींनीं म्हटलें आहे—पुष्कळशा सुशोभित वस्त्राभरणांनीं, स्नान, सुगंधविलेपन, विविधसुरस भोजनपानादिकांनीं अत्यंत काळजीनें पोषिलेला हा देह देखील एका क्षणांत थोड्याशा आघातानें कांचेच्या भांड्याप्रमाणें नाश पावणार आहे. जी लक्ष्मी चक्रवर्त्यादिक महान् पुण्यवान् जीवाजवळ रममाण होऊन राहिली नाहीं ती अन्य पुण्यरहित जीवांवर प्रेम करून त्यापाशीं स्थिर कशी राहील ? लक्ष्मी पुण्यवान् जीवाजवळही सदैव राहूं शकत नाहीं. कोणी म्हणेल कीं, माझें कुल उंच आहे. माझ्या कुलांत आज पावेतों लक्ष्मी रहात आली आहे म्हणून ती सदैव राहीलच—असें समजूं नये. ती कुलवानाजवळ राहील अथवा राहणारही नाहीं. कदाचित् नीच कुलवाल्याजवळही जाऊन राहील- धीर पुरुषापाशीं रममाण होईल अथवा होणारही नाहीं. पंडित वा चतुर पुरुषापाशींही टिकेल अथवा टिकणार नाहीं. शूरापाशीं अथवा भित्र्यापाशींही राहील किंवा राहणार नाहीं. पूज्य पुरुषापाशीं, सज्जनापाशीं, महापराक्रमी पुरुषापाशीं, व धर्मवान् जीवापाशींही नियमानें राहीलच असा नेम नाहीं.

चंचल लक्ष्मीचा अभिमान धरूं नये.

**भावार्थ**-संसारांत अज्ञानी लोकांना भ्रमामुळें असें वाटत असतें कीं, मी कुलवान् असल्यानें मला सोडून लक्ष्मी जाणार नाहीं. मी पराक्रमी आहे, धीर आहे, त्याअर्थी मजजवळ ती स्थिर राहिलीच पाहिजे. मी पंडित असल्यानें हिचें मोठ्या चातुर्यानें रक्षण करीन कारण मी मोठ्या शहाणपणानें ती प्राप्त करून घेतली आहे. मूर्ख लोक अज्ञानानें हजारों चुका करितात. त्यामुळें त्याजपासून ती नाहींशीं होत असते. तशी स्थिति माझी नसल्यानें मी हिचें रक्षण करीन. मी शूर व वीर आहे. त्याअर्थी इचें शौर्यानें मी रक्षण करीत असतांना मजपासून ती कशी नाहींशी होणार? भित्रा असेल त्याची कदाचित् नाहींशी होईल. मी पूज्य आहे. सर्वांची लक्ष्मी पूज्यपुरुषापाशीं राहिली पाहिजे. कोणी नीच असेल त्याची नाहींशी होणार असेल तर होईल. मी सुखी आहे. माझ्या चर्येवर लक्ष्मीचें तेज झळकत आहे. दरिद्री मनुष्याच्या मुखावर तेज नसतें. मी सज्जन असून सर्वांना आवडता आहे. त्याअर्थी मजपासून ती नाहींशी होणार नाहीं. सर्वांना अप्रिय असणाऱ्या जवळून ती नष्ट होत असते. मी मोठा साहसी व उद्योगी असल्यानें नवीन धंदे निर्माण करून द्रव्य उपार्जन करित असतों. त्याअर्थी मजपासून ती नाहींशी होण्याचा मुळींच संभव नाहीं, आळशी व निरुद्यमी पुरुषापासून ती नष्ट होत असते. निवळ हा असा विचार मनांत आणणें भ्रम आहे.

लक्ष्मी पूर्वी केलेल्या पुण्याची दासी आहे. पुण्यपरमाणु नष्ट होतांच ती नाहींशी होते. जीवाच्या पुण्याईचा अस्त होतांच सर्व लक्ष्मी, कांति, बुद्धि, प्रीति, प्रतीति वगैरे एका क्षणांत नष्ट होतात. म्हणून लक्ष्मीचा उपयोग न्याय्य भोग भोगण्यांत करा. परिणामांत

लक्ष्मी पुण्याचें फल आहे.

दयाभाव ठेऊन दुःखित बुभुक्षितांना दान करा. इचा संबंध पाण्यांतल्या तरंगाप्रमाणें क्षणभंगुर आहे. पश्चात् हिचा वियोग ठरलेला आहे. जो पुरुष निरंतर या लक्ष्मीचा संचय करण्यांत गढून जाईल, तिचा उपभोग घेणार नाहीं व पात्रांना दानही करणार नाहीं. तो आपल्या आत्म्याला ठकवीत आहे असें समजावें. कारण अचानक मरण प्राप्त झाल्यास त्यास दुर्गतीस जावें लागणार. मग मनुष्यजन्मांत येऊन काय मिळविलें ? जे संपत्तीचा संचय करून तिला जमिनींत पुरून ठेवितात ते त्या लक्ष्मीला पाषाणासारखी करितात हें त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. कारण जमिनींत पुष्कळसे पाषाण जसे पुरलेले आहेत तसें लक्ष्मीही पुरलेली राहील. संपत्तीचा दान, भोग, उपभोग याकडे उपयोग केला नाहीं तर तो पुरुष संपत्तिमान् असूनही दरिद्री पुरुषासारखा झाला व त्याची स्वतःची लक्ष्मी ही दुसऱ्याची लक्ष्मी झाली. कारण गांवांत पुष्कळाजवळ लक्ष्मी असली अथवा आपल्याच शेजाऱ्या-जवळ असली तरी तिचा आपणाला काय उपयोग ? ती फक्त आपणाला दिसेल, भोगतां यावयाची नाहीं. त्याप्रमाणेंच जो आपल्या लक्ष्मीचा भोग घेत नाहीं त्याची स्थिति असते.

द्रव्यावर अतिशय प्रेम करणारा पुरुष स्वतःच्या पोटाला पुरेसें खात नाहीं. औषध, वस्त्र-प्रावरण, राहण्याची जागा वगैरे भोगोपभोगाच्या सामग्रीच्या अभावानें नेहमीं दुःख भोगतो. पण याहीपेक्षां पैसे खर्च होण्याचें त्याला तीव्र दुःख होत असतें. म्हणून तो आपले दिवस अशा कष्टांत काढतो. असा पुरुष राजाचे किंवा आपले वारस जे स्त्री, पुत्र, भाऊबंद यांचे अनायास हित करून देतो. जो मूर्ख मनुष्य अनेक प्रकारांनीं आपल्या बुद्धीचा उपयोग करून संपत्ति वाढ-विण्याचा प्रयत्न करीत असतो व ती कितीही वाढली तरी संतुष्ट होत नाहीं, पुनः तिची वृद्धि करण्याकरितां अनेक पापारंभ करतो, पापाला भीत नाहीं, रात्रंदिवस धन-संपादनाचे विकल्प करीत अनेक रात्री झोंप घेतल्याशिवाय घालवितो, दिवस निघतांच पुनः द्रव्यो-त्पादनाच्या धंद्याला लागतो, देण्याघेण्याच्या व्यवहारांत अनेक प्रकारचा खोटा वादविवाद करीत असतां त्याला भुकेचें भान रहात नाहीं. रात्रौ हिशेब-ठिशेब, देणें-घेणें, सट्टे-सौदे यांच्या चिंतेनें त्यास झोंप येत नाहीं. अशा प्रकारचा मूढ पुरुष लक्ष्मीरूपी तरुण स्त्रीचा दास होऊन अनेक संकटें भोगून दुर्गतीला जातो. जो वृद्धिंगत होणाऱ्या लक्ष्मीचा निरंतर धर्मकार्यांत उपयोग करितो त्याची पंडित पुरुषाकडून स्तुति केली जाते व त्यालाच लक्ष्मी प्राप्त होणें सफल होय. याप्रमाणें विचार करून धर्मवान् पण दारिद्र्यानें पीडित मनुष्यांना, स्त्रियांना निरंतर ख्याति, लाभ, पूजा, यश यांची अपेक्षा न धरितां व त्याकडून आपणावर प्रत्युप-काराची इच्छा न ठेवतां मोठ्या आदरानें व हर्षानें दान देतात त्यांचें जीवन सफल आहे. ज्या अर्थी धन, यौवन व जीवन हीं प्रत्यक्ष पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें अस्थिर आपणास दिसून येतात व दानापासून स्वर्ग व

कृपण लक्ष्मीचा उपभोग घेत नाहीं.

दानानें भोगभूमींत व स्वर्गांत जन्म होतो.

भोगभूमीची लक्ष्मी असंख्यातकालपर्यंत उपभोगितां येते असें शास्त्रें वर्णन करितात, त्या अर्थी आपण नेहमीं दान करण्यास प्रवृत्त झालें पाहिजे हें उघड आहे. यांत विशेष हें कीं, पूर्वजन्मीं सत्पात्र दान ज्यांनी दिलें आहे, सम्यक् तपश्चरण केलें आहे असे पुरुष या दुष्षम-पंचमकालांत भरत-क्षेत्रांत जन्म घेत नाहींत. या कालांत सम्यग्दृष्टि उत्पन्न होत नाहींत. जे सम्यग्दृष्टि देवगति, नरक-गतींतून येतील ते विदेहक्षेत्रांत जन्म घेतील. मनुष्य तिर्यंच गतींतील सम्यग्दृष्टि मरून स्वर्गलोकीं जन्म घेतील. याठिकाणीं कोणा पुण्यवान् जीवाला काललब्धि वगैरे सामग्री प्राप्त झाली तर सम्यक्त्व उत्पन्न होतें. पूर्वजन्मीं ज्यानें जिनधर्म पाळून पुण्य संपादन केलें असेल तो येथें सध्यां जन्म घेत नाहीं. म्हणूनच जैनधर्मांत सध्या क्षत्रियवंशी महापुरुष उत्पन्न होत नाहींत, तसेंच धनाढ्य पुरुष देखील विशेष दिसून येत नाहींत.

जैनकुलांत कोणी धनाढ्य झाले तर त्यांना धर्माची रुचि नसावयाची. एखाद्या पुण्यवान् जीवाला कदाचित् सत्संगति प्राप्त झाली व जैनसिद्धांत श्रवण करण्याचा लाभ मिळाला तर तो स्वधर्माविषयीं प्रेम धारण करील. या कालांत कोणी जैन श्रीमंत असला व तो धर्म जाणणारा असला व व्रत, उपोषण, त्याग वगैरे करीत असला तरी त्याला दानामध्यें द्रव्य खर्च व्हावें असें वाटत नाहीं. लाखों रुपयांचें धन येथें सोडून तो मरण पावतो. परंतु त्यापैकीं अर्धें किंवा चतुर्थांश देखील दानाकडे लावीत नाहीं.

कलिकालांतील धनाढ्य पुरुषांना सदैव क्रोध वाढता असावयाचा. आपल्या पुरुषार्थाचा जबरदस्त अभिमान असावयाचा. वत्सलता (प्रीति) समूळ नाहींशी व्हावयाची. दुसऱ्यांनी कांहीं सत्कर्म केलेलें पाहवत नसावयाचें. सर्वांची अक्कल वा बुद्धि कमी दिसावयाची. दया असावयाची नाहीं. अन्य पुरुषांचा अपशब्दानें अपमान व तिरस्कार करण्यांत शंका धरावयाची नाहीं. कोणी नीतीनें बोलत असला तर त्याचें अपशब्द बोलून अथवा कुयुक्ति रचून खंडन करावयाचें. धर्मात्मा पुरुष आपणाजवळ विनयानें संभाषण करीत आहे त्याअर्थीं याचा हेतु कांहीं तरी मागण्याचा असावा अशी शंका यावयाची. निर्वांछक व सहधर्मी लोकांचें भय वाटावयाचें, कारण तो कदाचित् धन खर्चण्याचा उपदेश देईल. वरचेवर अभिमान वाढत जावयाचा. स्वभाव फार तामसी बनावयाचा. आपलें काम तत्काल व्हावें अशी नेहमीं इच्छा असावयाची. नोकर माणसांच्या दुःखाकडे न पाहतां आपलें काम कसें साधेल हाच सदैव विचार चालावयाचा. दुसऱ्यांचें दुःख व दुसऱ्याचें प्रयोजन तुच्छ मानावयाचें. संपत्ति वाढेल तसा खर्च वाढावयाचा व खर्चाच्या मागून दुःख वाढावयाचें. यामुळें रात्रंदिवस खर्च कमी कसा होईल हीच चिंता असावयाची. आपल्या भोगोपभोगाची वस्तु आपल्याला अर्ध्या किंमतींत मिळावी अथवा आपण धनाढ्य म्हणून लोकांनीं पुष्कळ किंमतीची वस्तु अल्प मोलांत द्यावी अशी इच्छा करावयाची. कोणी चोरीची

कलिकालांतील श्रीमंताची विचारसरणी.

वस्तु आणून अल्पमोलांत दिली असतां फार संतोष मानावयाचा. द्रव्याचा संचय होत असूनही तृप्ति व्हावयाची नाहीं. धनवान् असून पापी असला तरी त्यावर प्रीति करावयाची. इतर पुरुष धनवान् असून परधर्माचा असला व त्याची सद्बुद्धि असली तरी तो चांगला आहे असें मानावयाचें नाहीं. धनवानापाशीं आपल्या औदार्याच्या गोष्टी बोलावयाच्या. निर्धनापाशीं आपलें दुःख सांगावयाचें. दुःखी कोणी भेटला कीं त्यापाशीं आपलें दुःख सांगावयाचें. इतरांची किंवा निर्धनाची अब्रु कमी मानावयाची. निर्धनी माणसाला आपली वस्तु देण्याचा प्रसंग आला असतां त्याच्याबद्दल मोठा अविश्वास प्रदर्शित करावयाचा. निर्धनाला चोर व दगाबाज समजावयाचें. आपण लोकांचें सर्वस्व गिळून टाकलें असलें तरी स्वतःच्या खरेपणाबद्दल डौल मिरवावयाचा. आपल्या कर्तव्याची सदैव प्रशंसा करावयाची. दुसऱ्याच्या उत्तम कार्याला नांवें ठेवावयाची. आपण स्वतः निस्पृह असून दुसरे सगळे अत्यंत लोभी आहेत असें म्हणावयाचें. आपण स्वतः अजर व अमर आहों असें समजावयाचें. आपण स्वतः न्यायी, सर्वांत श्रेष्ठ असून इतर लोक रंक आहेत असें म्हणावयाचें. आरंभ-परिग्रह वाढवीत असतां कंटाळा वाटावयाचा नाहीं. मरणापर्यंत संतोष धारण करवत नाहीं. खोटें काम करण्यांतही आपण तरबेज आहोंत असें समजावयाचें, अत्यंत धूर्त, अतिशय कपटी, अप्रतिम लबाड पुरूषाला व आपलें काम साधून देण्यांत प्रवीण असणाराला पुरुषार्थी समजावयाचें. सत्यवादी व मर्यादित प्रवृत्तीनें राहणारा निरपेक्ष असेल त्याला बुद्धिहीन समजावयाचें. ज्या ठिकाणीं आपले कषाय पुष्ट होतील, आपलें नांव होईल, आपला अभिमान वाढेल अशा मंदिर, बागबगीचे, लग्नकार्य, यात्रा वगैरे जागीं पुष्कळ द्रव्य खर्च करावयाचें. देऊळ बांधविल्यानें आपली मान्यता वाढेल म्हणून पैसे खर्चावयाचे व पंचांत अभिमान रक्षणासाठीं द्रव्य खर्च करावयाचें. पण जीर्ण झालेल्या देवळाचें पुनरुत्थापन करण्यांत एक पैही खर्चावयाची नाहीं. निर्धन, भुकेनें पीडित यांना दमडीदेखील न देण्याचा पक्का निश्चय असावयाचा. दुर्बल, दीन,अनाथ, वृद्ध, रोगी, विधवा यांचें पालन करण्यांत कवडी देखील खर्चावयाची नाहीं, गोरगरीबांना दिलेलें द्रव्य फुकट जातें असें मानावयाचें. सर्व कुटुंबांतील माणसांना आपल्या बरोबरीनें वाढावें लागेल म्हणून स्वतःसाठींही पक्वान्नाचें जेवण करावयाचें नाहीं. पुष्कळसे धर्मात्मा, पंडित, तपस्वी आमचे घरीं येतात व अनेक येतील, सर्व देशी, परदेशी गुणवान् जैनांना मोठें ठिकाण काय तें माझें घरच आहे व मीच फक्त दाता आहे, दुसरें येथें कोण आहे? असा अभिमान धरावयाचा. कित्येक आपल्या घरचीं कार्ये करण्यांत व ती सुधारण्यांत मग्न असून धर्मकार्यांत ज्यांचें लक्ष आहे त्यांचा द्रव्याच्या मदानें मोठा अपमान करावयाचा. माझ्यापासून यांचा उदरनिर्वाह चालत असून मला सोडून कोठें राहतील! वगैरे अनेक तऱ्हेचे विचार मनांत आणावयाचे. याप्रमाणें पंचमकालांतील धनाढ्य पुरुषाची बुद्धि मोहानें विकृत झाली आहे.

पूर्व जन्मीं जिनधर्म रहित असून कुतपश्चरण केलें, कुपात्रांना दान दिलें, त्यामुळें सध्यां हें वैभव व संपत्ति प्राप्त झाली आहे. ही सोडून धनावरील मूर्च्छेनें ( प्रेमानें ) मरण

धनाच्या आसक्तीचे परिणाम

प्राप्त होईल व जशी कषायांची तीव्रता मंदता असेल त्याप्रमाणें सर्पादिक तिर्यंच, वृक्षादि वनस्पति, मधुमक्षिकादि पक्षी या योनींत जन्म होईल व नरकांत अनन्तकाल भ्रमण करावें लागेल. ही धनावरील आसक्ति इहलोकीं वैर व अपयशाला कारण आहे. कृपण पुरुषाला सर्व लोक नांवें ठेवीत असतात. कृपणाचे परिणाम नेहमीं दुर्ध्यानानें भरलेले असतात. यासाठीं बाबानो, दानमार्गी खर्च होणारें धन हेंच आपलें आहे असें समजा.

पात्रदानाचें फल

पात्रदानांत खर्चलेलें धन मरणसमयीं परिणाम निर्मल करून अंतमुहूर्तांत स्वर्गसंपत्तीला प्राप्त करून देतें. सांप्रत, उत्तम पात्र निर्ग्रंथ, वीतरागी, सर्व प्रकारचे मूलगुण व उत्तरगुण धारण करून दशलाक्षणिक धर्म पालन करणारे, बावीस परीषह सहन करणारे साधु आहेत. दर्शनप्रतिमेपासून उद्दिष्टाहारत्यागप्रतिमेपर्यंत अकरा प्रतिमा धारण करणारे श्रावक मध्यम पात्र आहेत. ज्यांना व्रत नाहीं पण जिनेश्वरांनीं वर्णिलेल्या तत्त्वांवर आमरण पक्का भरंवसा आहे, जे जन्ममरणरूपी संसारपरिभ्रमणापासून भयभीत असून चार प्रकारच्या संघाचें सदैव हित व्हावें अशी इच्छा ठेवणारे, संसार, देह, भोग यांविषयीं विरक्ति उत्पन्न झालेले, जिनशासनाचा उद्द्योत करणारे, आपली निंदा करून स्वपरतत्त्वविचारांत लीन असणारे, जिनकथित तत्त्वांत व धर्मावर दृढ निश्चय करणारे, धर्म-अधर्माच्या फलांवर अनुराग करणारे, संपूर्ण जीवाविषयीं अंतःकरणांत दया ठेवणारे, मंदकषायी, परमेष्ठीची भक्ति करणारे, सम्यक्त्वाचें संपूर्ण गुण धारण करणारे पुरुष आहेत ते जघन्य पात्र जाणावें. याप्रमाणें तीन प्रकारच्या पात्रांना यथायोग्य आहार, औषध, शास्त्र, वसतिकास्थान, वस्त्र, उपजीविका वगैरे, स्थैर्य प्राप्त व्हावें म्हणून भक्तिपूर्वक व विनायानें दिलें असतां त्यांच्या परिणामानुसार उत्तम, मध्यम, जघन्य भोगभूमींत दात्याला जागा मिळते व सम्यग्दृष्टिजीव सौधर्मादिक स्वर्गामध्यें महर्द्धिक देवामध्यें उत्पन्न होतात.

कुपात्राचें लक्षण

कुपात्राचीं लक्षणें अशीं असतात-खोट्या धर्माविषयीं अंतःकरणांत दृढ प्रेम असतें. त्यांना मिथ्यातपश्चरण करणाऱ्यावर दया करून त्यांस मदत करावीशी वाटते. खोटें अथवा कठोर वचन न बोलतां ते सर्वांशी गोड बोलतात स्त्री-पुत्रमित्रकुटुंबाविषयीं निस्स्पृहता ठेवतात पण निरंतर मिथ्याधर्माचें सेवन करितात, जप, तप, संयम, शील, नियम याविषयीं त्यांना आदर असतो. कषाय मंद करून व परिग्रहांचा त्याग करून जे अरण्यांत राहतात. पापारंभ न करितां परीषह सहन करितात. कोणत्याही प्रकारचें दुःख न करितां संतोषानें सरस नीरस प्राप्त झालेल्या भोजनाचा शांतपणें लाभ घेतात. क्षमा धारण करितात पण आत्मज्ञानाशिवाय बाह्य क्रियाकांडानेंच मोक्ष होतो असें मानतात ते सर्व कुपात्र जाणावें.

कित्येक जिनधर्मांतील लोक एकांती बनून आपल्याच मताचा हट्ट धरून स्वतःस धर्मात्मा

मानतात. यांपैकीं कित्येक जिनेश्वराचें भजन, पूजन, आराधन इत्यादिकृत्यांत कृतकृत्यता मानतात. ज्ञानाभ्यासव्रतादिक क्रियाविषयीं अनास्था दाखवितात. कित्येक पाण्यानें वरचेवर अंगोपांग स्वच्छ करणें, अन्नादिक सामग्री वरचेवर धूणें, स्नान करून आपल्या हातानें बनविलेलें भोजन करणें, वस्त्रप्रावरणें धुणें, धुतलेल्या जागींच भोजन घेणें वगैरे क्रिया करण्यांतच धर्म घडतो असें मानतात. दुसरे कित्येक सावधानपूर्वक चालणें, बसणें, उठणें, निजणें, पाणी वगैरे मोठ्या काळजीनें सांडणें, वापरणें, गाळणें या क्रिया केल्यानेंच आपण कृतार्थ होऊं, याशिवाय इतर क्रिया निरर्थक आहेत असें मानतात. कित्येक उपोषण, व्रत, रसपरित्यागांनीं आपणांस श्रेष्ठ मानतात. कित्येक दुःखित बुंभुक्षितांना दान देण्यांत धर्म मानतात. कित्येक भोळे जीव सर्व धर्म समान आहेत, त्याबाबत अधिक सूक्ष्म विचार करण्याची जरूरी नाहीं असें मानतात. कित्येक फक्त परमेश्वराचें नामस्मरण करण्यांतच धर्म आहे असें मानतात. कित्येक इतर जीवांवर उपकार करण्यांत व सर्वांचा विनय करण्यांत धर्म मानतात. कित्येक फक्त इंद्रियनिग्रह करून उपोषण करण्यातच धर्म मानतात. कित्येक अनेक प्रकारचे भेष धारण करून कषाय मंद करून, परिग्रह सोडून राहतात. कित्येक एक वेळ अन्न ग्रहण करून पुनरपि याचना न करितां तेवढ्यांत संतोष मानून रहातात. याप्रमाणें अनेक लोक एकान्तपक्षी बनल्यानें त्यांना खरें आत्मज्ञान होत नाहीं. त्यामुळें ते सर्व कुपात्र जाणावेत. त्यांना दान दिलें असतां तें अनेक प्रकारांनीं फलाला येतें. जसें पात्र, जसा दाता, जसे परिणाम, जसें द्रव्य व जसा विधि असेल तसें फल प्राप्त होत असतें.

**जैनांतील कुपात्र**

कित्येक जीव कुपात्र-दानामुळें कुभोगभूमींतील असंख्यात द्वीपामध्यें पंचेंद्रिय तिर्यंचाचें युगल होऊन जन्मतात. त्याठिकाणीं त्यांना चार अंगुलप्रमाण सुगंधी गवत भक्षण करण्यास मिळतें, अमृतासारखें मधुर पाणी पिण्यास प्राप्त होतें. परस्परांत वैर विरोध मुळींच नसतो. शीत, उष्ण, ऊन, थंडी, वारा, पाऊस यांची बाधा होत नाहीं. एक पल्य आयुष्य प्राप्त होतें. विकलत्रयाची त्याठिकाणीं पीडा नसते. तेथें अनेक प्रकारचे स्थलचर, नभश्चर, तिर्यंच जीव असून यथेच्छ विहार करून सुखाचा अनुभव घेतात. एक युगलानंतर त्यामागें दुसरें युगल उत्पन्न होतें. पहिलें युगल मरणानंतर व्यंतरवासी, भवनवासी, ज्योतिषवासी देवांमध्यें उत्पन्न होतें. कोणी कुपात्र-दानाच्या प्रभावानें उत्तरकुरु देवकुरु भोगभूमींत तिर्यंच होऊन तेथें तीन पल्यपर्यंत सुख भोगून देवलोकीं उत्पन्न होतात. कित्येक हरिक्षेत्र रम्यकक्षेत्रामध्यें दोन पल्य आयुष्य घेऊन व कित्येक हैमवत, हैरण्यवत क्षेत्रांत एक पल्याचें आयुष्य घेऊन तिर्यंच युगलांत जन्म घेतात व तेथून मरणानंतर देवलोकीं जन्मतात.

**कुभोगभूमीतील अवस्था**

कित्येक कुपात्रदानप्रभावानें शहाण्णव अंतर द्वीप आहेत त्यांत मनुष्ययुगल होऊन जन्मतात.

समुद्राच्या चतुर्दिशांना चार द्वीप आहेत. त्यांतून पूर्व दिशेच्या द्वीपामध्यें एक पाय असणारीं माणसें, दक्षिण दिशेच्या द्वीपामध्यें शेंपूट असणारीं माणसें, पश्चिमेला शिंगें असणारीं व उत्तरेला वचन नसणारीं मुकी माणसें उत्पन्न होतात. चार विदिशांच्या चार द्वीपांत अनुक्रमें सुपासारख्या कानाचीं व शष्कुली ( कानवाल्याच्या आकारासारख्या ) कानाचीं माणसें उत्पन्न होतात. एक कान आंथरून एक कान पांघरून निजण्याइतके लांब त्यांचे कान असतात. लंबकर्ण व सशासारखे कान असलेलीं माणसें समुद्राच्या विदिशांनाच उत्पन्न होतात. सिंहासारखे, घोड्यासारखे, कुतऱ्यासारखे, डुकरासारखे, हलगटासारखे, वाघासारखे, घुबडासारखे, वानरासारखे, माशासारखे, मेंढ्यासारखे, गाईसारखे, हत्तीमुखासारखे ज्यांचे मुख आहे व ज्यांचे मुख काळे, ढगाच्या रंगाचें, विजेसारखेच चमकदार व दर्पणासारखें निर्मल अशीं तोंडें धारण करणारीं माणसें सोळा विदेशांच्या अंतर्गत भागांत व पर्वताच्या अंतापर्यंत जे द्वीप आहेत त्यांत उत्पन्न होतात. याप्रमाणेंच लवणसमुद्राच्या एका तटावर चोवीस अंतर द्वीप आहेत. दोन्ही तटावर मिळून ४८ अंतरद्वीप व कालोदधि समुद्राचे ४८ एकूण ९६ अंतरद्वीपांत कुभोगभूमि आहे. त्याठिकाणीं कुपात्रदानाच्या प्रभावानें मनुष्ययुगल उत्पन्न होतें. आतां एक पाय असणारें युगल गुहेंत राहतें व गोड अशी तेथील माती भक्षण करितें. याहून दुसरीं जीं या प्रकारचीं माणसें आहेत तीं वृक्षाखालीं रहातात व कल्पवृक्षापासून प्राप्त होणारीं अनेक प्रकारचीं फळें भक्षण करित असतात.

अंतरद्वीपांतील मनुष्याचें स्वरूप.

कुभोगभूमींत मनुष्य होऊन जन्म घेण्याला कारण असे परिणाम कसे असतात याचें वर्णन त्रैलोक्यसार ग्रंथांत केलें आहे तें असें—

**जिणलिंगो मायावी जोइसमंतोवजीवि धणकंखा ।**
**अइगउरवसंजुत्ता करंति जे परविवाहं च ।। १ ।।**
**दंसणविराहिया जे दोसं णालोचयंति दूसणगा ।**
**पंचग्गितवा मिच्छा मोणं परिहरिय भुंजंति ।। २ ।।**
**दुब्भाव असुइसूदगपुप्फेहिं जाइसंकरादीहिं ।**
**कयदाणा वि कुपत्ते जीवा कुणरेसु जायंते ।। ३ ।।**

**अर्थ**–जिनमुद्रा धारण करून अनेक परीषह सहन करीत असूनही जे मायाचाराचे परिणाम धारण करितात; जिनलिंग धारण करून कित्येक ज्योतिषविद्या, मंत्रविद्या, वैद्यविद्या, यांहीं करून जगांत आपलें उदरंभरण करितात व द्रव्याची इच्छा ठेवितात; जिनलिंग घेऊन प्राप्त झालेल्या ऋद्धीचा गर्व करितात; आम्हीच काय ते जगांत पूज्य, आमचीच काय ती जगांत प्रतिष्ठा म्हणून गर्वानें फुगून जातात; साताकर्माच्या उदयानें प्राप्त होणाऱ्या सुखामुळें ज्यांना गर्व वाटतो; जिनलिंग धारण केलें असून ज्यांना आहाराची इच्छा होते; अशुभ कर्माच्या उदयानें ज्यांना भय वाटतें; मैथुन करण्याची ज्यांना इच्छा असते; परिग्रह, शिष्यसांप्रदायाची ज्यांना अपेक्षा असते

व जिनलिंग धारण करून दुसऱ्याचे विवाह करून देण्यांत जे प्रवृत्त होतात ते सर्व कुतपाच्या प्रभावानें कुमनुष्यांत जाऊन जन्मतात. जिनमुद्रा धारण करून ज्यांनीं सम्यग्दर्शनाची विराधना केली आहे असे तपस्वी आपल्या गुरूजवळ घडलेल्या दोषांची आलोचना करीत नाहींत; आपण धारण केलेल्या लिंगास अयोग्य असे लोकांचे दोष आपल्या मुखावाटें काढतात; जे मिथ्यादृष्टि पंचाग्नि-तपश्चरणानें कायक्लेश करितात; जे मौन न धरितां भोजन करितात; जे दुष्ट विचारानें दान देतात; अशुद्ध राहून दान देतात. सूतक असतांना दान देतात, रजस्वला स्त्रीचा संसर्ग करून दान देतात, जातिसंकर करून दान देतात, व कुपात्राला दान देतात ते कुमानुषांत उत्पन्न होतात. कोणत्याही प्रकारचें दुःख न भोगतां एक पल्यपर्यंत आयुष्य धारण करून एकाच वेळीं दोघेही मरण पावतात व बरोबरच जन्म घेतात. दानाच्या व तपाच्या प्रभावानें सदैव सुखांत मग्न होऊन काल पूर्ण करितात व मंदकषायांच्या प्रभावानें भवनत्रिकामध्यें जाऊन उत्पन्न होतात. कित्येक कुपात्रांना दान देऊन पुष्कळ भोगोपभोग भोगणारे म्लेंच्छ होऊन मनुष्यलोकांत जन्म घेतात. कित्ये-कांना नीचकुलांत उत्पन्न होऊनही पुष्कळ धनप्राप्ति होते. मांसभक्षण, मद्यपान, वेश्यासक्ति, करूनही ते निरोगीच असतात. कित्येकांना कुदानाच्या प्रभावामुळें राजाचे घरीं दास-दासी, हत्तीघोडा, श्वान, वानर वगैरे योनींत जन्म घेऊन रहावें लागतें व सुंदर भोजन, वस्त्र आभरण वगैरे भोगोपभोगांची प्रचुर सामग्री भोगण्यास मिळते. पण मरणोत्तर सर्वांना दुर्गतीला जावें लागतें. ज्याअर्थी कुपात्र अनेक प्रकारचें, व दाताराचे परिणामही अनेक प्रकारचे व दानाची सामग्रीही अनेक प्रकारची आहे त्याअर्थीं त्याचें फलही अनेक प्रकारचें प्राप्त होत असतें.

जो भुकेला, दरिद्री, आंधळा, लंगडा, पांगळा, रोगी, अशक्त, वृद्ध, बालक, अनाथ, विदेशी, संघांतून चुकलेला, बंदिग्रहांत अडकलेला, बांधलेला, दुष्टांच्या तापानें भयभीत होऊन आलेला, लुटला गेलेला, विधुर व भयभीत पुरुष, वा स्त्री, बालक, कन्या, पशु कोणीही असो, जो क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, रोग व वियोगादि दुःखानें गांजलेला असेल त्याला दुःखित जाणून करुणाबुद्धीन भोजनवस्त्रादिक देणें याला दयादान म्हणतात. यांतही जाति, कुल, आचरण वगैरे पाहून यथायोग्य दान करावें. अभक्ष्य भक्षण करणारे असतील त्यांना फक्त अन्न व औषधीच द्यावी. पैसे देऊं नयेत. ज्यांचें निंद्य आचरण नसेल त्यांचें दुःख दूर होण्याइतकेंच द्रव्य व स्थान द्यावें. हा दुःखी मनुष्य उपदेश देण्यायोग्य आहे असें वाटल्यास त्याला उपदेश, भोजन, वस्त्र, औषध, स्थान वगैरे द्यावें. उपदेश देण्यायोग्य नाहीं त्याअर्थीं दुःखित जाणून भाकर तुकडा द्यावा. ज्यांची सेवा करण्यासारखी असेल त्यांचें वैयावृत्य करावें. करुणादान हें पात्रापात्राचा विचार न करितां केवल दया मनांत ठेऊन द्यावें. तरी पण देश, काल, परिणाम, जाति, कुल यांचा विचार करून देत असलें पाहिजे. मांस-भक्षी, मद्यपी लोकांना पैसे देऊं नयेत. अतिशय दुःखी असलेला पाहून करुणा उत्पन्न झाली तर अन्नदान द्यावें. त्यापासून आपली कीर्ति व्हावी अशी इच्छा करूं नये. दान देण्यायोग्य नाहींत ते अपात्र जाणावेत.

दयादानाचें लक्षण

ज्यांच्या मनांत दया नसेल, जे नेहमी हिंसा करीत असतील, जे अत्यंत लोभी असतील, परिग्रह वाढावा अशी ज्यांची सदैव इच्छा असेल, जे केवळ धनवान् पुरुषाजवळ नेहमीं याचना करणारे असतील, वेदोक्त धर्माविषयीं ज्यांना प्रेम वाटत असेल, चंडी, भवानी, वगैरे देवींची जे सेवा करीत असतील, बकरा, रेडा वगैरे पशूंचा जे घात करवीत असतील, कुदान ग्रहण करीत असतील, मद्य, मांस, वेश्या वगैरे व्यसनांत आसक्त असतील, जिनधर्माचा द्रोह करीत असतील, परधन, परस्त्रीची इच्छा करून आपली प्रशंसा करीत असतील, व्रतांचें ढोंग दाखवून पंचपापाचरण करीत असतील, बहारंभ, बहुपरिग्रह, तीव्र-कषाय, असत्य भाषण, कुशास्त्रोपदेशक आणि जिनशासनांत खोटें लिहून त्यांचें प्ररूपण करणारे असतील, व्यसनी, पाखंडी, अभक्ष्यभक्षक, व्रत, शील, संयम, तपापासून पराङ्मुख, विषयलोलुप, जिह्वेन्द्रियाच्या वश झालेले, मिष्टान्न भक्षक, असे सर्व जीव अपात्र जाणावेत. त्यांचे ठिकाणीं रत्न-त्रयाचा अभाव असल्यानें पात्रपणा नाहीं. अन्य धर्मानुयायाप्रमाणें दया, क्षमा, संतोष, सत्य, शील, त्याग, पूजा, जपजाप्य, नामस्मरण वगैरें कृत्यामध्येंही ज्याला प्रीति नसते तो कुपात्राच्याही पलीकडचा अधम अपात्र असून अत्यंत लोभी, मदोन्मत व विषय लंपटी असतो. धर्माचरणाची इच्छा असून त्याचे मनांत नसते. केवल जिह्वेन्द्रियाला नाना प्रकारच्या भोजनांनीं पुष्ट करण्याकरितां जैन नांव धारण केलें आहे. धन लुटण्याकरितां जैनाचा भेष घेतला आहे. आपली पूजा व्हावी व धनाचा लाभ व्हावा या हेतूनें व्रत, तपश्चरण, पठनवाचनादिक क्रिया करीत आहे. तो अपात्र म्हणून दानाला योग्य नाहीं. अशा पुरुषाला दान देणें हें पाषाणाच्या जागीं बीं पेरिल्याप्रमाणें; कडू तुंब्यांत दूध ठेवण्याप्रमाणें; अरण्यांत चोराच्या ताब्यांत आपलें धन सोंपण्यासारखें; जगावें म्हणून विषभक्षण करण्यासारखें; रोग दूर करण्याला अपथ्य भोजनासारखें; सापाला दूध पाजण्यासारखें दुःखोत्पत्तीचें बीज आहे. अंधकूपांत धन टाकून द्यावें पण अपात्राला दान करूं नये. अपात्राला दान करणें हें आपल्या घरांत विषाचें झाड वाढविणें आहे. अपात्राचा संबंध दावाग्निसारखा दुरूनच त्यागण्या सारखा आहे. ज्याप्रमाणें विषवृक्षाची वासना मूर्च्छित करण्यास कारण होतें तशी अपात्राची वासना आत्मज्ञानापासून भ्रष्ट करिते.

अपात्राचें लक्षण

आतां चार प्रकारचें दान देऊन जे आगमप्रसिद्ध झाले त्यांचीं नांवें सांगतात—

**श्रीषेणवृषभसेने कौण्डेशः सूकरश्च दृष्टान्ताः ।**
**वैयावृत्यस्यैते चतुर्विकल्पस्य मन्तव्याः ॥ ११८ ॥**

**अर्थ**– चार प्रकारच्या वैयावृत्याचे ( दानाचे ) चार दृष्टांत आहेत. आहारदानाच्या फलानें श्रीषेण राजा, औषध दानाच्या प्रभावानें वृषभसेना नामक एका सावकाराची मुलगी, शास्त्रदानाच्या प्रभावानें कौंडेश नांवाचा गवळी जो पुढच्या जन्मीं श्रुत केवली झाला, आणि वसतिकादानाच्या प्रभावानें सूकर, जो मरणानंतर स्वर्गांत महर्द्धिक देव झाला असे हे चार जीव प्रसिद्ध आहेत.

दानाचा प्रभाव अचिंत्य आहे. इहलोकीं देखिल दान करणाऱ्या पुरुषांची मान्यता होते. पण दान देऊन त्यापासून अमुक अमुक विषयोपभोगांची प्राप्ति व्हावी अशी इच्छा त्यानें मनांत मुळींच ठेवतां कामा नये. दानाचें फल इंद्रियोपभोग प्राप्त व्हावें अशी जे इच्छा करितात ते चिंतामणि रत्न देऊन त्याचे बदल्यांत कांचेचा तुकडा घेतात, ते अमृत टाकून विष प्राशन करितात, दोऱ्याकरितां नवरत्नाचा हार देऊन टाकतात. जाळण्याकरितां कल्पवृक्ष तोडतात, लोखंड पाहिजे म्हणून नाव तोडतात व आपल्या गळ्यांत मोठा दगड बांधून खोल डोहांत उडी मारतात असें समजावें.

दानाचा अचिंत्य प्रभाव

इंद्रियांचे विषय अग्निप्रमाणें दाह उत्पन्न करणारे आहेत, कालकूट विषाप्रमाणें अचेतन करून मारणारे आहेत, पंचपापामध्यें प्रवृत्ति करविणारे आहेत, तृष्णा उत्पन्न करून नरकाला पोंचविणारे आहेत. म्हणून वैर उत्पन्न करण्यास कारण असून ज्वराप्रमाणें संताप, मूर्छा, प्रलाप, दुःख, भय, शोक व भ्रम उत्पन्न करणारे आहेत. विषयांचें चिंतन जीवाला अचेतन करतें मग त्याचें सेवन केलें तर अनेक भवांत मरणप्राय दुःख देईल यांत नवल नाहीं. म्हणून विषयांची इच्छा न ठेवतां दान-धर्म करण्यास प्रवृत्त व्हावें. लाभांतराय कर्माच्या क्षयोपशमापासून आपणांस जेवढें धन प्राप्त होईल त्यांत संतोष मानून पुढें अधिक इच्छा करूं नये. पावशेर अन्न खाण्यास मिळालें तरी त्यांतून दानाचा भाग काढून ठेवावा. दान करण्याकरितां म्हणून धन पाहिजे असेंही मनांत बाळगूं नये. सर्वत्र इच्छेचा अभाव हेंच दान व हेंच उत्कृष्ट तप आहे. वैयावृत्याला अतिथिसंविभाग व्रत असें म्हटलें आहे.

इंद्रियांचे विषय दुःख देणारे आहेत

वैयावृत्यांत जिनपूजेचाही अंतर्भाव होतो म्हणून त्याविषयीं सूत्र सांगतात—

**देवाधिदेवचरणे परिचरणं सर्व दुःखनिर्हरणं ।**
**कामदुहि कामदाहिनि परिचिनुयादादृतो नित्यम् ॥ ११९ ॥**

**अर्थ**— देव म्हणजे इंद्र. त्यांचा अधिदेव म्हणजे स्वामी जे अरिहंतदेव त्यांच्या चरणाचें परिचरण म्हणजे पूजन हें नेहमीं आदरानें करावें. तें सर्व दुःखांचा नाश करणारें असून कामाला ( मदनाला ) जाळून टाकणारें आहे.

**विशेषार्थ**— गृहस्थानें दररोज जिनपूजन करणें यासारखें दुसरें उत्तम कार्य कोणतेंही नाहीं, अशुभ कर्माच्या अभावामुळें मनुष्य तिर्यंचाप्रमाणें सप्तधातुमय देह ज्यांना नाहीं, आहाराची इच्छा नसल्यानें क्षुधा तृषेची ज्यांना वेदना नाहींशी करण्याचें कारण पडत नाहीं. कंठांत अमृत वाहत असल्यानें ज्यांना क्षुधातृषेची बाधा होत नाहीं, जरा, रोग वगैरे विकार ज्यांना होत नाहींत, त्यांना देव म्हटलें आहे. ज्यांना ज्ञानावरण वीर्यांतरायादिक कर्मांचा यांहून अधिक क्षयोपशम झाला असेल त्यांना इतर देवामध्यें नसणारी ज्ञान व वीर्याची शक्ति अधिक प्राप्त झाली आहे. म्हणून देवांचा स्वामिपणा

वैयावृत्यांत जिनपूजेचाही अंतर्भाव होतो

प्राप्त झाला. ज्यांना असंख्यात देव वंदना करितात, ज्यांनी संपूर्ण ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय, अंतराय वगैरे आत्म्यांचा घात करणाऱ्या कर्मांचा नाश करून जिनेंद्रपद प्राप्त करून घेतलें तेच इंद्रादिकांकडून वंद्य झाले. अशा देवाधिदेवाच्या चरणांचें पूजन संपूर्ण दुःखाचा नाश करणारें आहे, व इंद्रियांच्या विषयांच्या इच्छेचा नाश करून मोक्षरूपीं कामना पूर्ण करणारें आहे, म्हणून अन्य देवांची आराधना सोडून जिनेश्वराची आराधना करावी.

पुष्कळ काल रागी, द्वेषी, मोही जीवांची आराधना करून भयंकर कर्मबंध करून संसारांत परिभ्रमण केलें. त्या ऐवजीं वीतराग सर्वज्ञाचें आराधन केलें असतें तर कर्मांचा नाश होऊन मोक्षरूप अक्षय्य सुख प्राप्त झालें असतें. सर्व दुःखांचा नाश जिनपूजनानें होतो म्हणून तें करणें अवश्य आहे.

**शंकाः**–अर्हंत लोकांच्या अग्रभागीं (मोक्षस्थानीं) जाऊन राहिले. ते धातुपाषाणाच्या स्थापना केलेल्या प्रतिबिंबांत कसे येतील? व त्यांना आपलें पूजन स्तवन व्हावें अशी इच्छा तरी कशी असणार? ते आपल्या अनंत ज्ञान व अनंत सुखांत मग्न झालेले आहेत. जो कषायानें व्याप्त असेल, ज्याला आपली पूजा व्हावी असें वाटत असते तोच आपली कोणी स्तुति केली असतां संतुष्ट होतो. तो संसारी असून रागद्वेषसंयुक्त असतो, त्यालाच पूजा आवडते. वीतराग भगवंतपरमेष्ठी अनंत-चतुष्टयांत लीन असल्यानें त्यांना पूजेची इच्छा नाहीं. ते धातुपाषाणाच्या मूर्तींत येत नाहींत, कोणावर उपकार किंवा अपकार करीत नाहींत, आपलें पूजनस्तवन करणारावर संतुष्ट होत नाहींत, निंदा करणारावर द्वेष करीत नाहींत. अशा अवस्थेत भगवंताचें पूजन कां करावें?

**समाधानः**-भगवंताला आपल्या पूजेची स्तुतीची मुळींच इच्छा नाहीं हें खरें आहे. पण गृहस्थाचें परिणाम सदैव शुद्ध आत्म्याचें चिंतन करण्यांत स्थिर राहत नाहींत व साम्यभावांतही राहत नाहींत. गृहस्थाचें मन निरालंब राहूं शकत नाहीं. परमात्मभावनेच्या अवलंबनानें वीतराग स्वरूपाचें ध्यान व्हावें म्हणून, शुद्धात्म्याचें अवलंबन करण्याकरितां, विषयकषायांचें अवलंबन सोडून साक्षात् परमागम स्वरूपाचा धातुपाषाणाच्या प्रतिबिंबामध्यें संकल्प करून त्यांचें ध्यान व पूजन करणें अवश्य आहे. त्यावेळीं विषयकषायांच्या संकल्पाचा अभाव असतो म्हणून दुर्ध्यान होत नाहीं व परिणाम शुद्ध होतात. परिणाम-विशुद्धतेच्या प्रभावानें अशुभ कर्माचा रस सुकून जातो, त्याची स्थिति व अनुभाग कमी होतो, अर्थात् पापकर्म नाहींसें होतें. याशिवाय परिणाम शुद्ध झाले असतां शुभ प्रकृतींतील रस वाढतो व आयुकर्माशिवाय इतर कर्माच्या प्रकृतींची स्थिति कमी होत जाते. म्हणूनच वीतरागप्रभूच्या स्तवन–पूजन–ध्यानाच्या प्रभावानें पापांचा नाश होऊन सातिशय पुण्यकर्माचें उपार्जन होतें.

पुण्यपाप बंधाचें कारण आपलेच परिणाम आहेत. बाह्यतः जसें अवलंबन असेल तसेच आपले परिणाम होत असतात. यद्यपि भगवंत अरहंत धातुपाषाणाच्या प्रतिबिंबांत येत नाहींत व ते स्वतः

पापपुण्य आपले परिणामावर अवलंबून आहे

कोणाचा अपकार उपकार करीत नाहींत, तरी वीतराग परमात्म्याचें ध्यान–पूजन हें आपले परिणाम शुद्ध करण्यास आणि रागद्वेषांचा नाश करण्याचें बाह्य कारण आहे. त्यामुळें जीवावर मोठा उपकार होतो. जसें काष्ठपाषाणाच्या स्त्रीच्या चित्राला पाहून अंतःकरणांत प्रीति उत्पन्न होतें, अथवा अचेतन अशा सुवर्ण मणि, माणिक, बागबगीचे, महाल, शहर, पाषाण, वगैरे पदार्थांच्या पाहण्यानें व श्रवण करण्यानें रागद्वेष उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें शुभाशुभ वचन, राग, रुदन, सुगंध, दुर्गंध हीं सर्व अचेतन पुद्गल द्रव्यें असून त्यांचें श्रवण, अवलोकन, चिंतन, अनुभवन करण्यानें रागद्वेष उत्पन्न होतात, त्याप्रमाणेंच जिनेंद्राची परमशांत मुद्रा ज्ञानी पुरुषाला वीतरागता उत्पन्न करण्यास सहकारी कारण होते. ती प्रेरक कारण होत नाहीं. भव्य जीवांना वीतरागतेशिवाय दुसऱ्या कशाचीही इच्छा नसते. जिनेंद्राच्या चरणाची पूजा करण्यांत जलचंदनादि अष्टद्रव्यें वहावीं लागतात. तीं भगवंताला भक्षण करण्याकरितां नव्हेत. अथवा पूजा न केली तर अपूज्य राहतील म्हणून नव्हेत. अथवा त्यांच्या इच्छेकरितां म्हणून चढवावीं लागत नाहींत. अष्टद्रव्याचें समर्पण हें भगवंताला पाहून पूजकाला अतिशय आनंद झाला म्हणून जलचंदनाच्या मिषानें अर्घ्यावतारण आहे. जसें राजाला भेटण्यास गेलें असतां त्याला नजराणा करणें अथवा त्याला पाहून संतोष झाला असतां त्यावरून आरती ओवाळणें, अक्षतपुष्पादिकांची वृष्टि करणें, मोत्यांची थाळ भरून ओवाळणें, सोन्याच्या मोहरांची थाळ भरून ओवाळून ती वाटून टाकणें, रत्नांच्या थाळी भरून त्या ओवाळून टाकून देणें, वगैरे क्रिया राजावरील भक्तीनें आनंद प्रकट करण्याकरितां केल्या जातात. राजाला त्याची अपेक्षा नसते. मौल्यवान वस्तूंच्या थाळी भरून ओवाळल्या म्हणजे तें राजाला दान दिलें असें होत नाहीं. राजाची ओवाळणी त्याजवळ असलेले लोक घेतात. त्याप्रमाणेंच भगवान् अरिहंताच्या पुढें अष्टद्रव्य चढविणें आहे.

पूजन करण्यायोग्य नऊ देवता आहेत त्याविषयीं गोमट्टसारांत असें लिहिलें आहे—

**अरहंतसिद्धसाहुतिदयं जिणधम्मवयणपडिमा हू ।**
**जिणणिलया इदि एदे णवदेवा दिंतु मे बोहिं ॥ १ ॥**

**अर्थ**– अरिहंत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय, सर्वसाधु, जिनधर्म, जिनवचन, जिनप्रतिमा आणि जिनमंदिर ह्या नवदेवता आहेत त्या माझ्या रत्नत्रयाची पूर्णता करोत.

जेथें अरिहंताचें प्रतिबिंब आहे तेथें नऊही देवता गर्भित आहेत असें जाणावें. कारण आचार्य, उपाध्याय व साधु हे तर अरहंताच्या पूर्व अवस्था आहेत. सिद्ध ही नंतरची अवस्था आहे.

पूजनयोग्य नऊ प्रतिमा

प्रथमतः अरहंतपद नंतर सिद्धपद प्राप्त होतें. अरहंताची वाणी तें जिनवचन; वाणीनें प्रकट केलेला तो जिनधर्म; अरहंताचें स्वरूप जेथें विराजमान केलें आहे तें जिनालय. याप्रमाणें नवदेवतारूप भगवान् अरिहंताच्या प्रतिबिंबाचें दररोज पूजन करणें योग्य आहे. अरिहंताच्या प्रतिबिंबाची अधो-

लोकांत भवनवासींतील चमरवैरोचनादिक इंद्र व असंख्यात भवनवासी देव, मध्यलोकीं चक्रवर्ती, नारायण, बलिभद्रादिक अनेक धर्मात्मा जीव, व्यंतरलोकांतील देव, ज्योतिर्लोकांतील चंद्रसूर्यादि असंख्यात देव, स्वर्गलोकांतील सौधर्म-इंद्रादि असंख्यात कल्पवासी देव त्यांची पूजा करितात. याप्रमाणें त्रैलोक्यांतील भव्यजीवांकडून वंद्य व पूज्य अशा अरहंताच्या तदाकार प्रतिबिंबाचें भव्य-जीवांकडून सदैव पूजन केलें जातें.

पूजा दोन प्रकारची आहे. एक द्रव्यपूजा, दुसरी भावपूजा. त्यांतून अरिहंताच्या प्रतिबिंबाला मुखानें स्तुति करीत, नमस्कार करून, तीन प्रदक्षिणा देऊन, दोन्ही हात जोडून मस्तक नमविणें. त्यापुढें जलचंदनादि अष्टद्रव्यें चढविणें याला द्रव्यपूजा म्हणतात. अरिहंताच्या गुणांच्या चिंतनांत एकाग्र होऊन इतर सर्व विकल्पसमूह सोडणें व अरिहंताच्या प्रतिबिंबाचें ध्यान करणें याला भावपूजा म्हणतात. अथवा पूजेकरितां शुद्धजागीं थोड्या पाण्यानें स्नान करून शुद्धवस्त्रानें, विनयपूर्वक हात जोडून भक्तिसहित उज्ज्वल व निर्दोष जलानें प्रतिमेचा अभिषेक करणें यालाही पूजन म्हणतात. त्यावेळीं मी साक्षात् अरिहंताला स्पर्श करीत आहे, त्यांचा अभिषेक करीत आहे असा विचार मनांत आणावा. हा शुद्ध भक्तीचा महिमा आहे. शुद्ध पाणी झारीमध्यें घेऊन भगवंताच्या प्रतिमेपुढें उभें राहून पुढील चिंतन करावें.

पूजेचे प्रकार

"हे जन्मजरामरणाला जिंकणाऱ्या जिनेश्वरा! मी जन्म-जरा-मरण-निवारणार्थ पाण्याच्या तीन-धारा आपल्या चरणारविंदापुढें सोडितों; भगवन्! आपल्या चरणाला शरण येणें हेंच जन्मजरामरण-रहित होण्याचें कारण आहे. संसारपरिभ्रमणाचा ताप नाहींसा करणाऱ्या देवा! मी पण तोच ताप नष्ट करण्याकरितां चंदनकर्पूरादिक द्रव्यें आपल्या चरणारविंदापुढें चढवितों. अविनाशीपदधारक भगवंता! मी पण अक्षयपद प्राप्त्यर्थ आपल्यापुढें अक्षता–क्षेपण करितों. हे कामबाणविध्वंसका! मी तुज-पुढें कामवेदना नाहींशा करण्याकरितां पुष्पराशि अर्पण करितों. क्षुधारोग नाहींसा करणाऱ्या जिनेन्द्रा! मी तोच रोग नष्ट होण्याकरितां नैवेद्य अर्पण करितों. मोहान्धकार नाहींसा करणाऱ्या जिनेन्द्रा! मी अज्ञानान्धकार नष्ट होण्याकरितां तुजपुढें दीप समर्पण करितों. अष्टकर्मदाहक जिनेन्द्रा! मी अष्टकर्मनाशनार्थ धूप समर्पण करितो." मोक्षस्वरूप धारण करणाऱ्या भगवन्ता! मला मोक्षरूप फल प्राप्त व्हावें म्हणून तुजपुढें फल अर्पण करितों याप्रमाणें आपल्या योग्यतेनुसार एक द्रव्यानें, दोन, तीन, चार, पांच, सहा, सात व आठही द्रव्यांनीं पूजन करून आपले परिणाम परमेष्ठीच्या ध्यानामध्यें लावावे. भगवंताच्या गुणांचें स्तवन करून महान् पुण्य उपार्जन करून घ्यावें व पापाची निर्जरा करावी. जिनेश्वराची पूजा करणारे चार प्रकारचे देव कल्पवृक्षापासून उत्पन्न होणाऱ्या गंध पुष्पफलादि सामग्रीनें पूजन करितात. सौधर्मेन्द्रादि सम्यग्दृष्टि जीव जिनवराची भक्ति व पूजन यानेंच आपला उत्तम जन्म सफल आहे असें मानतात. मनुष्यांत चक्रवर्ती, नारायण, बल-

पूजेच्यावेळीं काय चिंतावें!

भद्रादिक राजेन्द्र आहेत, ते मोत्यांचे अक्षत, रत्नांचीं पुष्पें, फलें, दीप व अमृतपिण्ड वगैरे पदार्थांनीं जिनेन्द्राचें पूजन, स्तवन, गान, नृत्य करून महापुण्य उपार्जन करितात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे सर्व आपआपलें सामर्थ्य, ज्ञान, कुल, बुद्धि, संपत्ति, संगति पाहून जिनेन्द्राची पूजा करितात. तसेंच देशकालाला योग्य असे अनेक स्त्री-पुरुष धनाढ्य निर्धन, रोगी, निरोगी, सर्व पूजन करितात. कित्येक गांवांत, शहरांत, अरण्यांत, खेड्यांत राहत असतात. त्यांतूनही कित्येक लोक अष्टद्रव्याची निर्मल सामग्री तयार करून भगवंताचें गुणगान करून पूजन करितात. कोणी कोरडे गहू, जवस, हरभरे, मका, बाजरी, उडीद, मूग वगैरे धान्याच्या मूठी भरून देवाला चढवून पूजा करितात. कोणी भाकरी चढवितात. कोणी क्षीर, खिरा, भात, दाळ वगैरे अनेक प्रकारचें अन्न चढवितात. कोणी नानाविध मेवामिठाई आणून चढवितात. कोणी मोत्याचे तांदूळ, रत्नाचे दीप, सोन्यारुप्यांनीं व पंचरत्नांनीं जडलेलीं जडावाचीं फुलें व फलें वगैरे चढवून पूजा करितात. कोणी दूध, दहीं, तूप चढवितात. कोणी घेवर, लाडू, पेढे, बरफी, पुड्या, पूवा वगैरे पक्वान्न चढवितात. कित्येक नुसती वंदनाच करितात. कित्येक स्तवन, गान, नृत्य, वादित्रांनीं भजन करितात. कित्येक अस्पर्श्य-शूद्र मंदिराबाहेरूनच शिखरावरील जिनबिंबाला नमस्कार करितात. याप्रमाणें ज्यांना जशी संगति, जसें ज्ञान, जसें सामर्थ्य, जशीं धनसंपत्ति व शक्ति असेल त्याप्रमाणें देशकाल पाहून जिनेश्वराची आराधना करावी. या प्रमाणें वीतरागप्रभूंचें स्तवनपूजन करून आपापल्या परिणामाप्रमाणें सर्वांनीं उत्तम, मध्यम, जघन्य पुण्य उपार्जन करावें.

जैनधर्म जाति किंवा कुलावर अवलंबून नाहीं. धनसंपत्तीच्या आधीन नाहीं. बाह्य क्रियेवर अवलंबून नाहीं. हा फक्त ज्याच्या त्याच्या परिणामाच्या विशुद्धतेवर अवलंबून आहे. कोणी मोठा अभिमानी, श्रीमान् पुरुष असला व त्यानें आपली कीर्ति व्हावी म्हणून मोत्यांच्या अक्षता, रत्नांचे दिवे, सुवर्णाचीं पुष्पें वगैरेंनीं पूजन केलें व अनेक प्रकारच्या गानवादित्र-भजनपूजनांनीं मोठी प्रभावना करून दाखविली तरी तो अल्पपुण्य संपादन करणारा होईल. कदाचित् अल्पपुण्यबंध देखील न होतां उलट कर्मबंध देखील होईल. कारण बंध हा कषायाच्या आधीन आहे, कोणी आपल्या भावविशुद्धीनें प्रेमळ भक्तिमान् बनून एखादें फळ वा पान वा अन्नाचा कण अर्पण करील व मनोभावापासून निर्मल स्तवन करील त्याला महान् पुण्याचा बंध होईल व तो अनेक जन्मांत संचय केलेल्या पापाचा नाश करील. द्रव्यानें पुण्य विकत मिळत नाहीं. ज्यांनीं इच्छा नाहींशीं केली, कषाय मंद केले व ख्याति, लाभ, पूजा वगैरे कशाचीच पर्वा न करितां केवळ परमेष्ठीवरील गुणावर प्रीति केली, त्यांनाच जिनपूजनाचें विशेष फल प्राप्त झालें आहे व होईल.

जैनधर्म जातिकुलावर अवलंबून नसून परिणामावर अवलंबून आहे

जिनपूजन सचित्त व अचित्त द्रव्यांनीं करावें असें परमागमांत सांगितलें आहे. ज्यांना

कमी जास्त उंची आहे. अशा आकाराला धारण करणाऱ्या लोकाचा एक राजू रुंद, एक राजू लांब व एक राजु उंच असा विभाग आहे अशी कल्पना केली तर त्याचे तीनशें त्रेचाळीस तुकडे होतील. या लोकरूपी क्षेत्रांत अनन्तानन्तकाल परिभ्रमण करीत आपला काल निघून गेला. कोणताही पुद्गल-परमाणु लोकांत शिल्लक उरलेला नाहीं कीं जो आतां जीवाला धारण करावयाचा राहिला असेल.तीनशें त्रेचाळीस राजू प्रमाणक्षेत्रांत असा एकही प्रदेश बाकी राहिला नाहीं कीं ज्याठिकाणीं अनंतवेळां या जीवानें जन्ममरण प्राप्त करून घेतलें नाहीं. उत्सर्पिणी व अवसर्पिणी कालाच्या वीस कोडा-कोडी सागरामध्यें कालाचा एकही असा समय उरला नाहीं कीं, ज्या कालीं या जीवानें जन्ममरण केलें नाहीं. नरक, तिर्यंच, मनुष्य, देव या चार गतींत जघन्य आयुपासून उत्कृष्ट आयुपर्यंत समयोत्तर असा कोणताही पर्याय बाकी राहिला नाहीं जो अनंतवेळां याला प्राप्त झाला नाहीं.

संसारपरिवर्तनाचें भय

ज्ञानावरणादि सर्व कर्मांच्या बंध होण्यायोग्य जघन्यस्थिति अन्तः कोटाकोटि सागरप्रमाण आहे व उत्कृष्टस्थिति ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, व अन्तराय या चार कर्मांची तीस कोडाकोडी सागरप्रमाण आहे. मोहनीय-कर्माची उत्कृष्टस्थिति सत्तर कोडाकोडी सागर आहे. नामकर्म व गोत्र-कर्माची उत्कृष्टस्थिति वीस कोडाकोडी सागराची आहे. आयुकर्माची उत्कृष्टस्थिति तेहतीस साग-रांची आहे. याप्रमाणें जघन्यस्थितिपासून समयसमयांच्या उत्कृष्टस्थिति वृद्धिपर्यंत कर्माची जी स्थिति आहे त्या सर्व स्थितीच्या एकेका स्थानाला असंख्यात लोकप्रमाण कषायांचें स्थान कारण आहे. तें कषायांचें एकेक स्थान अनन्तवार जीवाला प्राप्त झालेलें आहे. म्हणून अशा परिभ्रमणरूप जगांत जीव नानाभेदरूप चतुर्गतींत परिभ्रमण करीत निरन्तर दुःख भोगून राहिला आहे. कोणताही जीव निश्चल नाहीं. पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें त्याचें जीवन चंचल आहे. भोगसम्पदा आकाशांतील ढगाप्रमाणें विनाशी आहे. राज्य, धन, ऐश्वर्य हें इन्द्रधनुष्याप्रमाणें क्षणभंगुर आहे. अशा संसारांत हा प्राणी अनन्तानन्त परिवर्तन करीत आहे. असें संसाराचें खरें स्वरूप चिन्तन करण्यानें संसार-परिभ्रमणाचें भय उत्पन्न होतें.

शरीराचें चिन्तन असें करावयाचें कीं, हें मनुष्यशरीर रोगरूपसर्पाचें बिल आहे. हें अनित्य आहे. दुःखाचें कारण आहे. अपवित्र व निःसार असून अनेक प्रयत्न करीत असूनही नाहींसें

शरीराचें स्वरूप

होऊन जाणारें आहे. याला जसें धुवावें तसें यांतून अधिक मल निघत असतो. याला पौष्टिक पदार्थ चारीत असूनही हें बलिष्ट होत नाहीं. सुगंधि अत्तरें वगैरे लावित असूनही यांतून दुर्गंध येत असतो. सुखांत ठेऊनही हें तसें राहत नाहीं. अनेक वस्त्रालंकारांनीं शोभविन असूनही प्रतिदिवशीं कुरूप होत जातें. सुन्दर ठेवण्याचा प्रयत्न रात्रंदिवस करीत असूनही हें भयानक दिसू लागतें; सुख देतां देतां दुःखी होतें अनेक प्रकारचे मन्त्रोपचारांनीं याचें भय नाहींसें होत नाहीं; दीक्षा धारण करूनही साधुमार्ग दूषित करितें; रात्रंदिवस गुणग्रहण करण्याचें शिक्षण देत असूनही हें गुणामध्यें रममाण होत नाहीं; निरंतर

दुःख भोगीत असूनही कषायांचा उपशम करूं शकत नाहीं; नको नको म्हणत असतांही हें पापाकडे प्रवृत्त होतें. प्रेरणा करीत असूनही धर्म धारण करीत नाहीं; मर्दन करीत असूनही कठोर बनत जातें; रूक्ष ठेवण्याचा प्रयत्न करूनही ओलें होतें; सुगंधित तेल वगैरे माखित असूनही दुर्गंध टाकीत नाहीं; चन्दनादिकांनीं सिंचन करीत असूनही पित्तप्रकोपानें जळत राहतें; शोषणोपचार करीत असूनही तोंडांतून कफ बाहेर टाकतें, शरीर स्वच्छ ठेवीत असतांही कोडादिरोग प्राप्त होतात; चामड्यानें वेष्टिलें आहे तरी क्षीण होत चाललें आहे. रात्रंदिवस सांभाळूनही अखेर कालाच्या मुखांत जाऊन पडतें. असा शरीराचा स्वभाव आहे. त्यावरील प्रेम नाहींसें होतें म्हणून जगाचा व शरीराचा स्वभाव, संवेग म्हणजे संसाराची भीति उत्पन्न होण्याकरितां व वैराग्य उत्पन्न होण्याकरितां चिंतीत असावें.

## षोडशकारण भावना

याचप्रमाणें षोडशकारण भावनांचेंहीं श्रावकांनीं चिंतन करावें. यांच्या चिंतनानें अव्रत-सम्यग्दृष्टीलाही तीर्थंकर प्रकृतीचा बंध होतो. तसाच देशव्रती श्रावकाला, प्रमत्तसंयतांना व अप्रमत्त-संयतांनाही होतो. याहून अधिक श्रेष्ठ पुण्यप्रकृति त्रैलोक्यांत दुसरी नाहीं.

गोम्मटसारांत याविषयीं असें सांगितलें आहे—

**पढमुवसमिये सम्मे सेसतिये अविरदादि चत्तारि ।**
**तित्थयरबंधपारंभया णरा केवलिदुगंते ॥ १ ॥**

**अर्थ**— तीर्थंकर प्रकृतीच्या बंधाचा प्रारंभ कर्मभूमीच्या पुरुषलिंगधारी मनुष्यालाच होतो. अन्य तीन गतींत या प्रकृतीचा आरंभ होत नाहीं. तसेंच केवली व श्रुतकेवलींच्या चरणकमलाजवळच तो होतो, केवली व श्रुतकेवलीच्या सान्निध्यावाचून अन्यत्र तीर्थंकर प्रकृतीच्या बंधाला योग्य अशी परिणामशुद्धि होऊं शकत नाहीं. हा तीर्थंकर प्रकृतीचा बंध प्रथमोपशम सम्यक्त्व, द्वितीयोपशम सम्यक्त्व, क्षायोपशमिक आणि क्षायिक सम्यक्त्व या चार सम्यक्त्वापैकीं कोणत्याही एका सम्यक्त्वांत होतो.

तीर्थंकर प्रकृतीचा बंध होण्यास षोडशकारण भावना कारण आहेत. या भावना सर्व पापांचा नाश करितात, परिणामांची अशुद्धता नष्ट करितात. यांचें श्रवण व पठण करणाऱ्यांच्या संसाराचा नाश करितात म्हणून यांचें निरंतर चिंतन करावें.

षोडशभावनांच्या सोळा जयमालांचा अर्थ समजून घेऊन भक्तिपूर्वक त्यांचें पठण केल्यानें महान्पुण्य प्राप्त करून घेतां येतें. परिणामांच्या विशुद्धतेसाठीं त्यांचा सविस्तर अर्थ यापुढें देत आहोंत—

हे संसार समुद्रांतून तारून नेणाऱ्या, कुमतीचे निवारण करणाऱ्या, तीर्थंकर पदवीला प्राप्त करून देणाऱ्या, निर्वाण पदाला पोहोंचविणाऱ्या, षोडशकारणा, मी तुला नमस्कार करून तुझें स्तवन करितों.

षोडशकारण भावना ज्याला होतात तो तीर्थंकर होणारच असा नियम आहे. त्याची कुगति संपली व तो संसारसमुद्रांतून पार पडला! विदेहक्षेत्रांत कित्येक जीवांना गृहस्थाश्रमांत असतांना केवली श्रुतकेवलींच्या जवळ षोडशकारणभावनांचें चिंतन केल्यानें त्याच जन्मांत देवांकडून त्यांचें तपःकल्याणक, ज्ञानकल्याणक व निर्वाणकल्याणक केलें जातें व ते मोक्षाला जातात. कित्येक पूर्वजन्मीं केवली श्रुतकेवलीपाशीं षोडशकारणभावनांचें चिंतन करून सौधर्मस्वर्ग आदि सर्वार्थसिद्धींत अहमिंद्रपर्यंत जन्म घेतात व तीर्थंकर होऊन निर्वाण पावतात. कित्येकांनीं पूर्वजन्मीं मिथ्याश्रद्धान करून नरकगतीचा बंध केला. पुढें केवली श्रुतकेवलीच्या आश्रयानें सम्यक्त्व ग्रहण करून षोडशकारणभावनांचें चिंतन केलें तरी पूर्वपापामुळ झालेल्या गतिबंधामुळें त्यांना नरकाला जावें लागलें तरी नरकांतून निघून तीर्थंकर होऊन मोक्षाला जातात. पूर्वजन्मीं षोडशभावनांच्या योगानें जे तीर्थंकरप्रकृति बांधतात त्यांस पांच कल्याणकांची महिमा प्राप्त होते. आणि जे विदेहक्षेत्रांत गृहस्थपणामध्यें तीर्थंकर प्रकृति बांधतात ते त्याच जन्मांत तप, ज्ञान आणि निर्वाण अशीं तीन कल्याणकें भोगून मोक्षाला जातात. कित्येक विदेह क्षेत्रांत मुनींचीं व्रतें घेऊन नंतर केवली, श्रुतकेवलीपाशीं षोडशकारण भावनांचें चिंतन करून त्याच जन्मांत तीर्थंकर होऊन ज्ञान आणि निर्वाण अशीं दोन कल्याणकें भोगून मोक्षाला जातात. कारण तपःकल्याणक त्यांचें आधींच होऊन गेलें असल्यामुळें पुनः होत नाहीं. ज्यांना तीर्थंकर प्रकृतीचा बंध पडला ते, भवनत्रिक देवांमध्यें, कुमनुष्य-तीर्यंचांमध्यें, भोगभूमीमध्यें, स्त्री, नपुंसक, एकेंद्रीय, विकल चतुष्कादि भवामध्यें उत्पन्न होत नाहींत. तसेंच तिसऱ्या नरकाच्याखालीं जन्म घेत नाहींत. म्हणून षोडशकारणभावना कुगतीचें निवारण करणारी आहे. इतकेंच नव्हें तर षोडशकारणभावना झाल्यानंतर तिसऱ्या जन्मांत निर्वाण प्राप्त होतोच. म्हणून ती मोक्षाला कारण आहे असें म्हटलें आहे, अशा षोडशकारणभावनांना नमस्कार करून त्यांचें वर्णन करितों.

षोडशकारण-भावना वर्णन

१. हे भव्य जीवहो, दुर्लभ मनुष्यजन्म तुम्हांस प्राप्त झाला आहे, सबब तुम्हीं पंचवीस दोष टाळून दर्शनविशुद्धि नांवाच्या भावनाचें चिंतन करा. सम्यग्दर्शनाला नाहींसें करणारे तीन मूढता, आठ मद, सहा अनायतनें आणि शंकादि आठ दोष मिळून जे पंचवीस दोष आहेत त्यांचा त्याग करा म्हणजे तुमचें सम्यग्दर्शन अतिशय निर्मळ होईल. ही दर्शनविशुद्धिभावना होय.

२. विनयसंपन्नता म्हणजे पांच प्रकारचा विनय यथायोग्य पाळणें. हे पांच भेद सर्वज्ञ प्रभूंनीं परमागमांमध्यें सांगितले आहेत. दर्शनविनय, ज्ञानविनय, चारित्रविनय, तपोविनय, आणि उपचारविनय. हा पांच प्रकारचा विनय जिनशासनाचें मूळ आहे. जेथें हा पांच प्रकारचा विनय नाहीं तेथें जिनधर्माची प्रवृत्तिच नाहीं. म्हणून जिनेंद्रदेवांनीं ह्याला जिनशासनाचें मूळ असें म्हटलें आहे.

३. अतिचाररहित शील पालन करा. शील मलिन होऊं देऊं नका. निर्मळ शील मोक्षाच्या मार्गांत मोठें साहाय्यकारी आहे. ज्याचें शील निर्मळ आहे त्याला इंद्रियविषय आणि कषायपरिग्रहा-

दिक मोक्षमार्गामध्यें विघ्न करूं शकत नाहींत.

४. दुर्लभ मनुष्यजन्मामध्यें ज्ञानाभ्यासांतच मन गुंतवून ठेवा. सम्यग्ज्ञानाशिवाय एक क्षण देखील फुकट घालवूं नका. अन्य संकल्प विकल्प संसारांत बुडविणारे समजून त्यांचा त्याग करा.

५. धर्मावर प्रीति ठेवून संसारांतील शरीरसंबंधी भोगांपासून विरक्त होऊन संवेगभावना अंतःकरणांत चिंतीत रहा. ह्यापासून संपूर्ण विषयांवरील प्रीति नाहींशी होऊन धर्मामध्यें आणि धर्माच्या फलामध्यें प्रवृत्ति दृढ होईल.

६. आत्म्याचा घात करणारे लोभादिक चार कषाय आहेत त्यांचा त्याग करा; आणि आपल्या शक्तीप्रमाणें सुपात्राच्या गुणांमध्यें प्रीति ठेवून त्यांस आहारादिक चार प्रकारचें दान देण्यामध्यें उद्युक्त असा. ही शक्तितस्त्यागभावना आहे.

७. अंतरंग आणि बहिरंग अशा दोन प्रकारच्या परिग्रहांवरील आसक्ति सोडा आणि संपूर्ण विषयाची इच्छा नाहींशी करून आपल्या शक्तीप्रमाणें तपश्चरण करा म्हणजे शक्तितस्त्यागभावना होईल.

८. अंतःकरणांतील रागादिक विकार आणि इंद्रियविषय सोडून देऊन परम वीतरागतारूप साधुसमाधि धारण करा. साधुपुरुषावर संकट येईल त्यावेळीं तें दूर करण्याचा प्रयत्न करा.

९. संसारांतील दुःखाचें निराकरण करणारें असें दहा प्रकारचें वैय्यावृत्य करा.

१०. अरिहंताच्या गुणांमध्यें भक्ति ठेवून त्यांच्या नामादिकाचें ध्यान करा म्हणजे अर्हंतभक्ति घडेल.

११. जे पांच प्रकारच्या आचाराचें स्वतः आचरण करून इतर शिष्यांकडून तसें आचरण करवितात, आणि दीक्षा शिक्षा देण्यामध्यें निपुण असतात अशा, धर्माचे आधाररूपीं स्तंभासारख्या आचार्य परमेष्ठीच्या गुणांवर अंतःकरणपूर्वक प्रीति ठेवा ह्याला आचार्यभक्ति म्हणतात.

१२. ज्ञानामध्यें प्रवृत्ति करविणारे, निरंतर सम्यग्ज्ञानाचें पठण स्वतः करून अन्य शिष्यांना शिकविण्यामध्यें तत्पर, चारी अनुयोगांच्या शास्त्रामध्यें पारंगत, आणि अंगपूर्वादि श्रुतज्ञानाचे धारक असे जे उपाध्याय परमेष्ठी त्यांच्याविषयीं भक्ति ठेवणें यास बहुश्रुतभक्ति म्हणतात.

१३. जिनशासनाला पुष्ट करणारा, संशयादिक अंधकाराला दूर करून सूर्याप्रमाणें ज्ञानाचा प्रकाश देणारा असा जो सर्वज्ञप्रणीत अनेकान्तात्मक आगम, तो शिकण्यामध्यें, ऐकण्यामध्यें, चिंतन करण्यामध्यें भक्ति ठेवणें ह्यास प्रवचनभक्ति म्हणतात.

१४. करण्यायोग्य सहा आवश्यक क्रिया आहेत. त्या अशुभकर्माच्या आस्रवाला रोंकून कर्माची निर्जरा करणाऱ्या आहेत. अशरणाला शरण आहेत. त्या वेळच्या वेळीं करणें यांस आवश्यकापरिहाणिभावना म्हणतात.

१५. लोकांमध्यें पसरलेलें अज्ञान नाहींसें करून विद्वरोच्या आणि शुद्ध आचरणाच्या प्रभावानें जिनमार्गाचें माहात्म्य प्रकट करणें ह्यास मार्गप्रभावना म्हणतात. मार्गप्रभावनेपासून अनेक पुरुषांची वीतरागधर्मामध्यें प्रवृत्ति होते आणि कुमार्गाचा अभाव होतो.

१६. धर्मामध्यें, धर्मात्मा पुरुषांमध्यें, धर्माच्या आयतनामध्यें आणि परमागमाच्या अनेकान्त-रूप वाक्यामध्यें, अत्यंत प्रीति करणें यास वात्सल्यभावना म्हणतात. ह्या वात्सल्य अंगापासून दुर्धर मोह व मान यांचा नाश होतो.

ह्याप्रमाणें निर्वाणसुखाला देणाऱ्या ह्या सोळा भावनांचें जो भव्यजीव स्थिर चित्त ठेवून चिंतन करतो, व ज्याच्या आत्म्यामध्यें ह्या भावना अत्यंत उत्कट होऊन स्फुरण पावतात त्यालाच समस्त जीवांचें कल्याण करणारें तीर्थंकरपद प्राप्त होतें व तो पंचमगति प्राप्त करून घेतो. असें ह्या सोळा भावनांचें संक्षिप्त स्वरूप सांगितलें. आतां प्रत्येक भावनेचें तपशीलवार वर्णन करतों.

## दर्शनविशुद्धि व तिच्या अंगाचें स्वरूप

हे भव्यजीवहो, ह्या मनुष्यजन्म प्राप्त झाला आहे तो सफल व्हावा अशी इच्छा असल्यास सम्यग्दर्शनाची शुद्धि करा. तें सम्यग्दर्शन संपूर्ण धर्माचें मूळ आहे. सम्यक्तावांचून श्रावकधर्म होऊं शकत नाहीं आणि मुनिधर्महीं होऊं शकत नाहीं. सम्यग्दर्शनावांचून ज्ञान आहे तें कुज्ञान आहे, चारित्र असल्यास कुचारित्र आहे आणि तप असेल तर तें कुतप आहे. सम्यग्दर्शनावांचून या जीवानें अनंतानंत काल परि-

१ दर्शनविशुद्धि.

भ्रमण केलें आहे. तेव्हां आतां जर या चतुर्गतिरूपी संसारपरिभ्रमणापासून सुटावें, जन्म, जरा, मरणापासून मोकळें व्हावें, आणि अनंत अविनाशी अशा आत्मसुखाचा लाभ मिळावा असें वाटत असेल तर अन्य समस्त परद्रव्यांवरील अभिलाषा सोडून सम्यग्दर्शनाची शुद्धि करा. ह्या दर्शन-विशुद्धीपासून दुर्गतीचा नाश होऊन निर्वाणसुख प्राप्त होतें. विनयसंपन्नतादिक ज्या पंधरा भावना आहेत त्या सर्वांचें मूळ ही दर्शनविशुद्धि भावनाच आहे. ही नसेल तर बाकीच्या पंधरा भावना होणारच नाहींत. म्हणून ही भावना संसारदुःखरूपी अंधकाराचा नाश करण्यास सूर्यासारखी आहे. भव्य जीवाला परम शरण आहे. ज्यायोगानें स्वपरद्रव्यांतील भेदविज्ञान स्पष्ट होईल असा यत्न करा. ह्या जीव अनादि कालच्या मिथ्यात्वकर्माला वश झाल्यानें त्याला, आपण कोण आणि पर कोण याची ओळख झाली नाहीं. जें जें शरीर कर्माच्या उदयानें प्राप्त झालें त्या त्या शरीरालाच आपलें स्वरूप समजून तो आपलें खरें स्वरूप विसरला; देव कोण, कुदेव कोण, धर्म काय, अधर्म काय, सुगुरु कोण, कुगुरु कोण, हें समजेनासें झालें. तसेंच पुण्य, पाप, इहलोक, परलोक हेंही कळेना. ग्रहण काय करावें, त्याग कशाचा करावा, खावें कोणतें, खाऊं नये कोणतें, सोबत कोणाची असावी, कोणाची नसावी, शास्त्र कोणतें मानावें, कोणतें टाळावें, ह्याविषयीं विचार नाहींसा झाला. आणि कर्माच्या उदयानें जें सुख दुःख भोगावें लागलें त्यांतच एकरूप होत्साता आपलें हित अहित न ओळखतां परद्रव्यांतच निमग्न झाला आहे. त्यामुळें त्याला सदैव दुःख होत आहे. काललब्धीच्या प्रभावानें उत्तम कुलांत जन्म होऊन मला जिनधर्म प्राप्त झाला आहे. त्यामुळें वीतराग सर्वज्ञाच्या अनेकांत रूप परमागमाच्या प्रसादानें प्रमाण नयनिक्षेपांनीं परीक्षा करून निर्णय करण्याची शक्ति आली आहे; शरीरादिक परद्रव्यापासून वेगळा असा अखंड अविनाशी चैतन्य लक्षणांनीं युक्त व

(ज्ञाता) जाणणारा असा मीच एक आत्मा आहे. शरीर, जाति, कुल, रूप, नांव, इत्यादिक मजपासून अगदीं भिन्न आहेत. राग, द्वेष, काम, क्रोध, मद, लोभादिक हे कर्माच्या उदयानें उत्पन्न होतात, ते माझ्या ज्ञायक स्वभावामध्यें विकार आहेत. जसा स्फटिकमणि मूळचा शुभ्र निर्मल स्वभावाचा असतो परंतु डाकाच्या संसर्गानें काळा, पिवळा, हिरवा, लाल असा अनेक रंगाचा दिसूं लागतो; तसा आत्मा हा स्वच्छ, ज्ञायक, निर्विकारस्वरूप असून मोहकर्मजनित रागद्वेषादि विकार यामध्यें झळकतात, तें माझें स्वरूप नसून पर आहेत. असा आपल्या स्वरूपाचा निश्चय करावा व खऱ्या देवगुरुशास्त्राचें स्वरूप मनांत आणावें.

सर्वज्ञ, वीतराग, परमहितोपदेशक असा, व क्षुधा, तृषा, जन्म, जरा, मरण, रोग, शोक, भय, विस्मय, राग, द्वेष, निद्रा, स्वेद, मद, मोह, चिंता, खेद, अरति असे अठरा दोष ज्याचे अगदीं नाहींसे झाले, अनंत ज्ञान, अनंत दर्शन, अनंत वीर्य, अनंत सुख इत्यादि आत्मिक अविनाशी अनंत गुण ज्याच्यामध्यें प्रकट झाले, तोच आप्त आम्हाला वंदन स्तवन पूजन करण्याला योग्य आहे. अन्य कामी, क्रोधी, लोभी, मोही, स्त्रियांमध्यें आसक्त, शस्त्रादिक धारण करणारा, जो कर्माच्या स्वाधीन झालेला, सर्वज्ञतारहित, केवळ इंद्रियजन्य ज्ञानांचाच धारक, तो मला स्तवन पूजन नमस्कारास योग्य नाहीं. जो चोरांचा व जारांचा शिरोमणि आहे अशाचें आराधन केल्यानें काय हित होणार? तसेंच जें शास्त्र सर्वज्ञ वीतरागानें उपदेशिलेलें आहे, ज्यांत प्रत्यक्ष अनुमानादिकांनीं कोठेंही बाधा येत नाहीं, ज्यामध्यें संपूर्ण सहा काय जीवांच्या हिंसेचा निषेध केला आहे, आणि आत्म्याचा उद्धार होण्याचा उपाय आहे, वस्तूचें अनेकांत स्वरूप साक्षात् ज्यांत दाखविलें आहे, तेंच शास्त्र आगम होय. आणि तेंच शास्त्र शिकण्यास, शिकविण्यास, ऐकण्यास, श्रद्धान करण्यास, आणि नमस्कार करण्यास योग्य आहे. या उलट जें शास्त्र, रागी, द्वेषी अशांनीं प्ररूपण केलेलें, ज्यापासून विषयवासना व कषाय वाढतात, व ज्यांत हिंसा करण्याचा उपदेश केलेला असतो, जें प्रत्यक्ष अनुमानादिकांनीं बाधित, व एकांतरूप आहे, तें शिकण्यास, ऐकण्यास किंवा नमस्कार करण्यास योग्य नाहीं. तसेंच ज्यांची विषयवांछा मावळली आहे, कषाय ज्यांचे अत्यंत मंद झाले आहेत, आरंभ आणि परिग्रहांचा ज्यांनीं त्याग केला आहे, जे केवळ आत्म्याची उज्ज्वलता करण्यांतच उद्युक्त असून ध्यानस्वाध्यायामध्यें लीन आहेत, कर्माच्या उदयामुळें उत्पन्न झालेल्या सुखदुःखामध्यें साम्यभाव धारण करतात, जीवन, मरण, लाभ, अलाभ, स्तवन, निंदा, वगैरेमध्यें रागद्वेषरहित असतात, उपसर्ग आणि परीषह सहन करण्यामध्यें अकंप होत्साते धैर्य धारण करतात, असे परम निर्ग्रंथ दिगंबर गुरूच वंदन व स्तवन करण्यास योग्य आहेत. आरंभी, कषायी, विषयानुरागी असे कुगुरु स्तवन वंदन करण्यास योग्य नाहींत. प्राणिमात्रांवर दया हाच धर्म आहे. हिंसा करणें हा केव्हांही धर्म होणार नाहीं. जरी सूर्य पूर्वेचा पश्चिमेस उगवला, अग्नि शीत झाला, सर्पाच्या तोंडांत अमृत झालें, मेरूदेखील चलायमान झाला, आणि पृथ्वी उलथीपालथी झाली तरी हिंसेमध्यें धर्म कधींही होणार नाहीं असें दृढ श्रद्धान सम्यग्दृष्टीला

निःशंकित अंग

असतें. ज्याला आपल्या आत्म्याच्या अनुभवामध्यें, सर्वज्ञ वीतरागरूप आप्ताच्या स्वरूपामध्यें, निर्ग्रंथ विषयकषायरहित गुरूमध्यें, अनेकांत स्वरूप आगमांमध्यें आणि दयारूप धर्मामध्यें शंका राहात नाहीं त्यालाच निःशंकित अंग आहे असें समजावें.

तसेंच जो सम्यग्दृष्टी आहे तो धर्मसेवनापासून विषयसुखाचें फळ इच्छीत नाहीं. कारण सम्यग्दृष्टीला इंद्र, अहमिंद्र लोकांचे विषय देखील महावेदनारूप, विनाशिक, आणि पापाचें बीज असेच दिसत असतात आणि धर्माचें फल अनंत, अविनाशी, स्वाधीन, सुखानें युक्त असें मोक्षच दिसत असतें. म्हणून जसें बहुत मोलाचें रत्न सोडून कांचेचा तुकडा जोहरी ग्रहण करीत नाहीं, तसें ज्याला खरें आत्मिक, अविनाशी, व निराबाध सुख समजलें तो खोट्या आणि दुःखमय अशा विषयसुखाची वांछा कशाला करील ? ह्यासाठीं सम्यग्दृष्टी जीव वांछारहितच असतो. आणि जो अव्रती सम्यग्दृष्टी आहे त्याला वर्तमानकाळीं आपल्या उपजीविका वगैरेमध्यें, आणि स्थान परिग्रहादिकांमध्यें, वेदना नाहींशा व्हाव्यात म्हणून जी वांछा होते ती वर्तमानकाळच्या वेदना सहन करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळेंच होत असते. तो वेदनांचा इलाज फक्त इच्छीत असतो. जसें रोगी मनुष्याला कडू औषध नकोसें वाटत असतें तथापि दुःखाच्या वेदना सहन होत नाहींत म्हणून कडू औषध उलटी होण्यासारखें असलें तरी तो तें ग्रहण करतो, त्याला इंद्रियांचे विषय भोगण्याची बिलकुल आवड नसते. तसें सम्यग्दृष्टी हा निर्वांछक आहे. तथापि वर्तमानकालचें दुःख मिटण्यासाठीं विषयाची इच्छा करितो. अप्रत्याख्यानावरणीय कर्माच्या उदयाच्या अभावानें ज्यानें व्रतग्रहण केलें असेल तो कसेंही संकट आलें तरी विषयाची इच्छा करीतच नाहीं. ह्यावरून सम्यग्दृष्टीला निःकांक्षित गुण असतोच ह्यांत शंका नाहीं.

निःकांक्षित अंग

सम्यग्दृष्टिजीवाला अशुभ कर्माच्या उदयानें मनाला न आवडणारी सामग्री प्राप्त झाली तर तो त्याविषयीं मनांत किळस करीत नाहीं व आपले परिणाम बिघडूं देत नाहीं. तो असा विचार करतो कीं, मीं पूर्वी जसें कर्म बांधलें आहे त्याला अनुसरूनच मला भोजन, पान, स्त्री, पुत्र, दारिद्र्य, संपदा, आपदा वगैरे प्राप्त झालें आहे. तसेंच तो अन्य कोणी रोगी, दरिद्री, हीन, नीच, मलिन वगैरेना पाहून मनांत किळस आणीत नाहीं. तें पापाचें फळ आहे समजून तो त्यांचा तिरस्कार करीत नाहीं. तसेंच मलमूत्र, चिखल वगैरे पदार्थाला पाहून, भयंकर अशा स्मशान, वन, डोंगर वगैरे जागा पाहून, भयरूप दुःखदायी अशा काळाला पाहून, आणि दुष्टपणा, कडूपणा, वगैरे वस्तूंच्या स्वभावाला पाहून आपल्या परिणामांत क्लेश उत्पन्न न होऊं देणें, हें निर्विचिकित्साअंग सम्यग्दृष्टीला असतेंच.

निर्विचिकित्सा अंग

खोट्या शास्त्रांनीं व व्यंतरादिक देवांनीं केलेल्या चमत्कारांनीं आणि मणिमंत्र औषधादिकांच्या प्रभावांनीं अनेक वस्तूंचे विपरीत स्वरूप पाहून सत्यार्थ धर्मापासून चलायमान न होणें हा सम्यग्दृष्टीचा अमूढदृष्टिगुण आहे.

अमूढदृष्टी

तसेंच सम्यग्दृष्टी जीव अन्य जीवाला अज्ञानामुळें व अशक्ततेमुळें घडलेले दोष पाहून ते

झांकतो. संसारी जीव ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय कर्माच्या उदयानें आपला स्वभाव विसरून कर्माच्या स्वाधीन झाल्यामुळें असत्य भाषण करतात, परधन हरण करतात, कुशील सेवन करतात. जे ह्या पापापासून दूर असतील ते धन्य होत. कोणा धर्मात्मा अथवा नामांकित मनुष्याच्या हातून पापाच्या उदयानें कांहीं दोष घडलेला पाहून सम्यग्दृष्टी असा विचार करतो कीं, मी हा दोष जर प्रगट केला तर अन्य धर्मात्मा जीवाची आणि जिनधर्माची निंदा होईल, असें मनांत आणून तो ते दोष झांकतो. हा उपगूहन गुण आहे.

उपगूहन अंग

धार्मिक मनुष्याचे परिणाम कदाचित् रोगाच्या वेदनेमुळें किंवा दारिद्र्यामुळें अथवा उपसर्ग व परीषहामुळें चलायमान होऊं लागले किंवा कोणी साहाय्य नसल्यामुळें अथवा आहारपाणी न मिळाल्यामुळें धर्मापासून ढळूं लागले, तर त्याला उपदेश देऊन धर्मामध्यें दृढ करावे. त्याला असें समजवावें कीं, " अहो धर्मात्मा, अहो ज्ञानीपुरुष, तुम्ही असें घाबरतां कां ? सावध व्हा. रोगाच्या वेदनेमुळें धर्म टाकतां काय? तुम्ही समजदार असून असें चुकतां कसें ? हें असातावेदनीयकर्म त्याची वेळ आल्यामुळें उदयास आलें आहे. ह्यावेळीं तुम्ही घाबरें झालां किंवा दीन होऊन रडूं ओरडूं लागलात तरी तें भोगावें लागणारच. कर्म तुम्हांला सोडणार नाहीं. कर्माला दया नसते. ह्मणून धैर्य ठेवून तें सहन करा. या प्रसंगीं कोणी देव, दानव, मंत्र, तंत्र, औषधादिक आणि स्त्री, पुत्र, मित्र, बांधव, सेवक, सुभटादिक हे उदयाला आलेलें कर्म हरण करण्यास समर्थ नाहींत, हें तुम्ही चांगल्या रीतीनें जाणत आहां, तर मग ह्या वेदनेनें घाबरे होऊन आपला धर्म, आपलें यश, आणि आपला परलोक काय म्हणून बिघडवितां ? धर्म बिघडून स्वच्छंदचेष्टा व विलापादि केल्यानें वेदना कमी होत असतील तर मग असो ! परंतु वेदना कमी न होतां जसजसें तुम्ही घाबरे व्हाल तसतसें त्या वेदनेचें दुःख वाढेल. ह्यासाठीं आतां धैर्य ठेवून धर्माकडे लक्ष द्या. धर्मच काय तो दुःखांत समाधान करणारा आहे. ह्या संसारांत भ्रमण करितांना नरकगतींत अनंत वेळां ताडण मारणादि दुःख असंख्यात काळ सहन केलें आहे. पशुयोनींत क्षुधा, तृषा वगैरे पराधीनपणाचें दुःख अनेक वेळां सहन केलें आहे. मनुष्ययोनींत नानाप्रकारचे रोग अनेक वेळां भोगले आहेत. ह्यांपेक्षांही कठिण वेदना तुम्ही अनेक वेळां भोगिल्या आहेत. पुत्रशोक, स्त्रीवियोग, वैधव्यदुःख वगैरे मानसिकव्यथाही अनेक वेळां भोगाव्या लागल्या आहेत. ह्यापुढें हें तुमचें दुःख कितीसें आहे ? हें तर थोडक्याच वेळांत मिटून जाईल. रोग वेदना कदाचित् शरीराला मारतील, परंतु तुमचा आत्मा चैतन्यस्वरूप आहे त्याला त्या मारणार नाहींत. शरीराला मरण अवश्य आहेच. कारण शरीर ज्याअर्थीं धारण केलें आहे त्याअर्थीं तें सोडावें लागणारच. तेव्हां आतां तुम्ही सावध व्हा. हा प्रसंग कर्माला जिंकण्याचा आहे. यावेळीं भगवान पंचपरमेष्ठीचें ध्यान करा, आणि आपलें स्वरूप, जरारहित, मृत्युरहित, अखंड, ज्ञाता, द्रष्टा असें असलेलें लक्षांत आणा. असा प्रसंग पुन्हां मिळणें कठीण आहे." याप्रमाणें धर्माचा उपदेश

स्थितीकरण अंग

देऊन त्याला धर्मामध्यें दृढ करावें आणि अनित्य, अशरण इत्यादि भावनांचें चिंतन करण्याकडे त्याचें लक्ष ओढावें. नेम किंवा घेतलेली व्रतें त्यानें सोडून दिलीं असल्यास तीं पुनः त्याजकडून ग्रहण करवावीं. तसेंच त्याला गोड वाटेल अशा रीतीनें आपण त्याचें अंग रगडावें. हातपाय दाबावें आणि त्याचें दुःख दूर करावें. कोणी त्याच्याजवळ बसण्यासाठीं नसल्यास आपण जवळ बसावें. दुसऱ्या साधर्मी माणसाचा संबंध मिळवून द्यावा. मळमूत्र, कफ दूर टाकण्याची त्याला शक्ति नसल्यास ते आपण काढावें, अन्न, पाणी, औषध पथ्य वगैरे देऊन त्याला धर्ममार्गांत स्थिर करावें. दारिद्र्यामुळें पीडित झाला असल्यास त्याची जेवणाखाणाची व उपजीविकेची सोय करून द्यावी. एकंदरीत ज्या उपायांनीं तो धर्ममार्गी स्थिर राहील असें करणें ह्यास स्थितीकरण अंग म्हणतात.

वात्सल्य नांवाचा गुणही सम्यग्दृष्टीच्या अंगीं असतो. संसारी जीवाला आपल्या स्त्रीपुत्रादिकांवर तसेंच इंद्रियांचे विषय भोगण्यामध्यें आणि धन उपार्जन करण्यामध्यें पुष्कळ प्रीति असतेच.

**वात्सल्य अंग**

परंतु जे स्त्री, पुत्र, धन, परिग्रह विषयादिक हे संसार परिभ्रमणाला कारण आहेत असें समजून मुनि, अर्जिका, श्रावक, श्राविका वगैरे रत्नत्रयांचे धारक धर्मात्मा जीवांवर आणि धर्माच्या आयतनावर अत्यंत प्रीति करतात त्यांस सम्यग्दर्शनाचें वात्सल्य अंग घडतें.

आपल्या मनानें, शब्दानें, शरीरानें, द्रव्यानें, दानानें, व्रतानें, तपानें आणि भक्तीनें रत्नत्रयांचा प्रभाव प्रगट करणें त्यास प्रभावना अंग म्हणतात. ह्याचें अधिक

**प्रभावना अंग**

वर्णन मार्गप्रभावना भावनेचें वेगळें वर्णन पुढें येणार आहे तेथें करूं.

अशीं ही सम्यग्दर्शनाचीं आठ अंगें धारण केल्यानें ह्या गुणांचे प्रतिपक्षी जे शंका कांक्षादिक दोष आहेत. त्यांचा नाश होऊन दर्शनविशुद्धि होते.

## तीन मूढता

लोकमूढता, देवमूढता, आणि गुरुमूढता अशा तीन मूढता सोडून यापुढें सम्यग्दर्शन शुद्ध करावें. लोकमूढता म्हणजे मेलेल्या माणसांचीं हाडें भागीरथीला पोहोंचविण्यापासून त्याची सद्गति

**लोकमूढता**

झाली असें मानणें; गंगेचें पाणी पवित्र मानणें; गंगास्नान आणि अन्य नद्यांचीं स्नानें करण्यांत, नद्यांच्या लाटा व समुद्राच्या लाटा अंगावर घेण्यांत धर्म मानणें, मृत्यु पावलेल्या पतिसमागमें त्याची जीवंत स्त्री किंवा दासी अग्नींत जळून गेल्यामुळें तिला सती मानून पूजणें; मेलेल्यांस पितर मानून पूजणें, पितराला ताईतांत स्थापून तो गळ्यांत वापरणें, सूर्य, चंद्र, मंगळ वगैरे ग्रह सोन्या रुप्याचे बनवून गळ्यांत घालणें, ग्रहणाचा दोष दूर होण्यासाठीं दान देणें, संक्रांति, व्यतीपात, सोमवती अमावास्या इत्यादि पर्व मानून दान करणें; सूर्यचंद्राच्या ग्रहणामुळें स्नान करणें, दर्भाला शुद्ध मानणें, हस्तिदंताला शुद्ध मानणें, विहीरीची पूजा करणें, सूर्यचंद्राला अर्घ्य देणें, उंबरठा पूजणें, मुसळ पूजणें, शिंकें पूजणें, विनायकाच्या नांवानें गणपतीला पूजणें, दिव्याच्या ज्योतीला पूजणें, देवतेचे नवस करणें, जावळ किंवा

केंस राखणें, देवाला अमुक दिल्यामुळें आपलीं मुलें वाचलीं असें मानणें; अमुक देवानें हा मुलगा दिला असें मानणें, आपल्या लाभासाठीं किंवा कार्यसिद्धीसाठीं जर मला धन प्राप्ति झाली किंवा माझा रोग मिटला, अथवा मुलगा झाला, किंवा वैऱ्याचा नाश झाला, तर मी तुम्हाला छत्र वाहीन, तुमच्यासाठीं देऊळ बांधीन, तुम्हापुढें अमुक रुपये भेट ठेवीन, वगैरे करार करणें, देवाला लांच देऊन कार्य करून घेण्याची इच्छा ठेवणें, जाग्रण घालणें, कुलदेवीला पूजणें, शीतला देवीला पूजणें, लक्ष्म्या बसविणें, सोन्यारुप्याची पूजा करणें, दौतीची पूजा, गाईची पूजा, अन्नाची पूजा, जलपूजा, शस्त्रांची पूजा, झाडांची पूजा, अग्नीची पूजा, हीं सर्व लोकमूढता होय. मिथ्यादर्शनाच्या योगानें असें विपरीत श्रद्धान होतें तें सोडलें पाहिजे.

**देवमूढता** — तसेंच देव कुदेव ह्याचा विचार न करितां कामी, क्रोधी, शस्त्रधारी ईश्वर देवदेवतेला मानणें, हा श्रीविष्णु भगवान् परमेश्वर आहे; ही सृष्टीची संपूर्ण रचना यानेंच केली आहे; हाच कर्ता हर्ता आहे; जें कांहीं होतें तें ईश्वरानें केल्यामुळेंच होत आहे; लोकांकडून चांगलें, वाईट सगळें ईश्वरच करवितो; ईश्वरानें केल्यावांचून कांहीं होत नाहीं; सर्व कांहीं ईश्वराच्या इच्छेच्या स्वाधीन आहे; चांगलें कृत्य अथवा वाईट कृत्य ईश्वराच्या प्रेरणेवांचून होत नाहीं; इत्यादि समजूत करून घेणें ही देवमूढता होय.

**गुरुमूढता** — पाखंडी, नीच आचरण करणारे, परिग्रही, लोभी, विषयांचें लालची ह्यांस करामती मानणें, यांना वचनसिद्धि आहे असें मानणें, अथवा हे प्रसन्न झाले तर आमची कार्यसिद्धि होईल असें मानणें; हे तपस्वी आहेत, महापुरुष आहेत, पूज्य आहेत असें पूर्ण श्रद्धान करणें ह्यास गुरुमूढता म्हणतात. ज्यांच्या श्रद्धानामध्यें ह्या तीन मूढतेचा अंश राहत नाहीं त्याला दर्शनविशुद्धि होते.

सहा अनायतनांचा त्याग केल्यानें दर्शनविशुद्धि होते. अनायतन म्हणजे आयतन नसणें. आयतन म्हणजे स्थान. कुदेव, कुगुरु आणि कुशास्त्र हे तीन, आणि ह्या तीहींचें सेवन करणारे

**सहा अनायतनें** — तीन, मिळून सहा अनायतन होत. जे रागी, द्वेषी, कामी, क्रोधी, लोभी, शस्त्रधारण करणारे मिथ्यात्वी असतात, त्यांना सम्यग्धर्म नसतो; म्हणून कुदेव हे पहिलें अनायतन आहे. पंचेंद्रियांच्या विषयांमध्यें लुब्ध झालेले, परिग्रहधारी, आरंभ करणारे असे जे भेषधारी ते गुरु नव्हेत; ते धर्महीन आहेत; म्हणून ते दुसरें अनायतन आहे. तसेंच हिंसेच्या आरंभाची प्रेरणा करणारें, रागद्वेष कामादिक दोषांना वाढविणारें, सर्वथा एकांतमताचें प्ररूपक जें शास्त्र तें कुशास्त्र होय. हें तिसरें अनायतन आहे. देव–देवी, क्षेत्रपालादिक देवाला वंदन करणारे जे प्राणी तें चवथें अनायतन होय. कुगुरूचे सेवक पांचवें अनायतन. आणि मिथ्याशास्त्र शिकणारे, मिथ्याशास्त्राची सेवा व भक्ति करणारे जे लोक ते सहावें अनायतन होय. ह्या सहाही अनायतनामध्यें सम्यग्धर्म नाहीं असें दृढ श्रद्धान केल्यानें दर्शनाची शुद्धता होते.

जातिमद, कुलमद, ऐश्वर्यमद, रूपमद, ज्ञानमद, तपमद, बलमद, विज्ञानमद अशा आठ प्रकारच्या मदांचा ज्यानें नाश केला त्याला दर्शनविशुद्धता होते. सम्यग्दृष्टी असा विचार करतो कीं, हे आत्मन् ! ही उंच जात आहे तो तुझा स्वभाव नव्हे. ती कर्माची प्रकृति आहे; परकृत आहे; विनाशिक आहे; कर्माच्या उदयानें संसारांत अनेक वेळां अनेक जाति प्राप्त झाल्या आहेत. मातेच्या पक्षाला जाति म्हणतात. हा जीव अनेक वेळां महारिणीच्या पोटीं, भिल्लिणीच्या पोटीं, चांभारिणीच्या पोटीं, मुसलमानिणीच्या पोटीं, परिटिणीच्या, न्हाविणीच्या, कलालिणीच्या, वेश्येच्या वगैरे नीच जातींतील मानवस्त्रीच्या पोटीं जन्मला आहे. इतकेंच नव्हे तर, जनावरांमध्यें हलक्या प्रतीच्या जनावरांचे पोटीं म्हणजे कुतरी, डुकरी, गाढवी, कोल्हीण, कावळीण वगैरे नीच पशुपक्ष्यांच्या गर्भांतसुद्धां अनंत वेळां जन्मला आहे. अनंत वेळां नीच जाति मिळाल्यावर एक वेळां उंच जात मिळते. नंतर पुन: अनंत वेळां नीच जाति भोगल्यावर एक वेळां उंच जाति मिळते, अशा रीतीनें उंच जातींतही अनंत वेळां जन्म घेतले, तथापि संसारपरिभ्रमण नाहींसें झालें नाहीं. तसेंच पित्याच्या पक्षाकडील कुळही उंच नीच अनेक वेळां मिळालें. तेव्हां संसारांत जातीचा आणि कुळाचा गर्व काय म्हणून करावा ?

जातिमद

स्वर्गांतील महर्द्धिक देव देखील मरून एकेंद्रिययोनींत जन्म घेतो व कोल्ह्या-कुत्र्यासारख्या नीच योनींत जन्मतो. उत्तम कुळांतील मनुष्य असून देखील मेल्यावर चांडाळाच्या जन्माला जातो; तेव्हां जाति आणि कुळाचा गर्व करणें हें मिथ्यादर्शन आहे. हे आत्मन् , तुझी जाति आणि कुळ तर सिद्धासारखें आहे. तें तूं विसरलास; आणि आईच्या रक्तापासून आणि बापाच्या वीर्यापासून उत्पन्न झालेल्या जाति कुळामध्यें लटकेंच आपण उच्च म्हणवून घेऊन पुन: अनंत काल निगोदामध्यें भ्रमण करण्यास तयार झालास, तरी असें करूं नकोस. तूं ज्याअर्थीं वीतरागाचा उपदेश ग्रहण केला आहेस त्याअर्थीं ह्या शरीराच्या जातिला संयम, शील, दया, सत्यभाषण यांहींकरून सफल कर. मला उत्तम जाति उत्तम कुळ प्राप्त झालें आहे, त्याअर्थीं मी नीच जातीसारखें हिंसा, असत्य, परधनहरण, कुशीलसेवन, अभक्ष्यभक्षणादिक निंद्य आचरण करणार नाहीं असा अभिमान ठेव.

कुलमद

सम्यग्दृष्टीला कर्मकृत देहादिक परवस्तूंमध्यें बिलकुल आत्मबुद्धि होत नसते. तूं ऐश्वर्याचा गर्व तरी काय म्हणून करावा ? पहा, हें ऐश्वर्य तुला भूल पाडून रागद्वेषानें पापारंभामध्यें प्रवृत्ति करविणारें आहे. आणि त्यायोगें तुला चतुर्गतींमध्यें भ्रमण करविण्यास कारण आहे. निर्ग्रंथपणा मात्र त्रैलोक्यांत पूज्य आहे व चिंतन करण्यास योग्य आहे. हें ऐश्वर्य क्षणभंगुर आहे. मोठमोठ्या इंद्र, अहमिंद्र, बलभद्र, नारायण इत्यादिकांचें ऐश्वर्य क्षणमात्रामध्यें नाहींसें झालें, तेथें मग इतर जीवांच्या ऐश्वर्याची विशाद काय ? असा विचार करून जर दोन दिवस ऐश्वर्य प्राप्त झालें आहे त्याअर्थीं त्याचा दु:खी लोकांवर उपकार

ऐश्वर्यमद

करण्यांत विनियोग कर. विनयानें दान दे. परमात्मस्वरूप हेंच आपलें खरें ऐश्वर्य आहे असें समजून ह्या कर्मकृत ऐश्वर्यापासून विरक्त होणें हेंच योग्य आहे.

स्वरूपाचा गर्व करूं नकोस. हें नाशवंत शरीराचें स्वरूप जें दिसत आहे तें आत्म्याचें स्वरूप नव्हे. हें विनाशिक असल्यामुळें प्रतिक्षणीं नष्ट होत आहे. ह्या स्वरूपाला रोग, वियोग, दारिद्य, वृद्धपणा हे कुरूप करून टाकतील. अशा ह्या हाडामांसाच्या स्वरूपाला मोहित होऊन गर्व करणें मोठी चूक आहे. ह्या आत्म्याचें स्वरूप तर केवलज्ञान आहे व त्यामध्यें लोक अलोक सर्व प्रतिबिंबित होतात. ह्यासाठीं कातड्याच्या स्वरूपाचे आपण नसून आपल्या अनंत व अविनाशी ज्ञान स्वरूपाचे आपण आहोंत असें समजावें.

रूपमद

शास्त्रज्ञानाचाहि गर्व करूं नकोस. आत्मज्ञानरहित असलेलें शास्त्रज्ञान व्यर्थ आहे. कारण, अकरा अंगांचें ज्ञान असूनही अभव्य जीव आत्मज्ञानाच्या अभावीं संसारामध्येंच रखडत असतो. सम्यग्दर्शनाशिवाय अनेक प्रकारचे छंद, व्याकरण, अलंकार, काव्यकोशादिकांचें ज्ञान असलें तरी तें विपरीत धर्मामध्यें, अभिमान आणि लोभामध्यें प्रवर्तन करवून संसाररूपी आडांत ढकलणारें आहे असें समज. ह्या इंद्रियजन्य ज्ञानाची काय शाश्वती आहे? एका क्षणांत वात, पित्त, कफ कमी जास्त झाल्यानें लागलीच बिघडून जातें आणि इंद्रियजन्यज्ञान हें इंद्रियांचा नाश झाला कीं त्याबरोबर नाश पावतें. मिथ्याज्ञान तर जसजसें वाढेल तसतसें खोटीं काव्यें, खोट्या टीका रचण्यांतच प्रवर्तन करवील आणि त्यायोगें अनेक प्राण्यांला दुराचरणामध्यें प्रवर्तन करवील. ह्यासाठीं शास्त्रज्ञानाचा गर्व सोडून दे. ज्ञान प्राप्त झालें असल्यास आत्म्याची शुद्धि कर. ज्ञान असून अडाण्यासारखें आचरण करून संसारांत भ्रमण करणें योग्य नाहीं.

ज्ञानमद

तपश्चरणाचा गर्व करूं नका. सम्यक्त्वाशिवाय मिथ्यादृष्टीचें तप व्यर्थ आहे. मी मोठा तपस्वी आहे म्हणून जो गर्व करतो त्याची त्यायोगानें बुद्धि भ्रष्ट होऊन तेंच तप त्याला दुर्गतीला पोहोंचवितें. ह्यासाठीं तपाचा गर्व करणें मोठा अनर्थ आहे असें समजून भव्य जीवांनीं तपाचा गर्व करणें योग्य नाहीं.

तपमद

बळाचा ( शक्तीचा ) गर्व करूं नका. ज्या बळानें कर्मरूप वैऱ्याला जिंकतां येतें व काम, क्रोध, लोभाला जिंकतां येतें तेंच बल प्रशंसेस पात्र आहे. बाकीचें शारीरबल, तारुण्यबल, ऐश्वर्यबल मिळालें म्हणून त्यायोगानें इतर निर्बल, अनाथ प्राण्याला मारणें, त्याचें द्रव्य लुटून घेणें, जमीन व इस्टेट बळकावणें, व्यभिचार करणें, दुराचरणी होणें वगैरे कृत्यांत बळाचा उपयोग केल्यानें या जन्मीं आणि परलोकीं नरकाचें दुःख भोगून तिर्यंचगतींत मारण, ताडन, छेदन वधबंधनादिक अशीं अनेक पराधीन दुःखें भोगावीं लागतील व शेवटीं एकेंद्रिययोनींत बलरहित होऊन जन्मावें लागेल. ह्यासाठीं बळाचा गर्व सोडून

बलमद

देऊन क्षमा ग्रहण करावी आणि उत्तम तप धारण करावें.

विज्ञानमद

विज्ञानमद म्हणजे अनेक प्रकारच्या हस्तकला, वचनकला, आणि अनेक प्रकारचे मनःसंकल्प, ज्याच्या योगानें हा आत्मा चतुर्गतिरूप संसारांत भ्रमण करून दुःख भोगतो तें सगळें विज्ञान म्हणावें. ह्या संसारांत खोट्या चातुर्याचा आणि खोट्या कलेचा मोठा गर्व वाटतो. तो नेहमीं असें म्हणत असतो कीं, " पहा, माझें सामर्थ्य असें आहे कीं, सांगाल तर खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें करून दाखवीन. निर्मल चारित्रवानाला कलंक लावीन. शीलवानाला दुःखी करून सोडीन. निरपराध्याला शिक्षा ठोकवीन. धनवानापाशीं सांचलेलें द्रव्य बाहेर काढीन. धर्मावरील श्रद्धान बदलून टाकीन. प्राण्यांस वश करणें, अनेक जीवांला मारणें, पाण्यांत जाणें, जमिनींत शिरणें, आकाशांत फिरणें, अनेक यंत्रें बनवून देणें, वगैरे ज्या कला आहेत तें सर्व विज्ञान आहे. ह्याचा गर्व करणें हें नरकाच्या घोर दुःखाला कारण आहे. जें कलाचातुर्य आपल्या आत्म्याला विषयकषायापासून पलटवील, आणि इतरांना हिंसारहित सत्यमार्गाकडे प्रवर्तवील, तेंच सम्यक् कलाचातुर्य ज्ञान होय. बाकीचें विज्ञान स्वतःला आणि दुसऱ्याला संसारांत फसविणारें आहे.

ह्याप्रमाणें सत्यार्थ वस्तूंचें स्वरूप समजून जाति, कुल, धन, ऐश्वर्य, रूप, विज्ञानादिक हे कर्माचे स्वाधीन आहेत म्हणून ह्यांचा गर्व सोडा आणि दर्शनविशुद्धि करा. असे तीन मूढता, शंकादिक आठ दोष, सहा अनायतन, आणि आठ मद, मिळून पंचवीस दोष टाळल्यानें सम्यग्दर्शन उज्ज्वल होतें असें समजून ह्या दर्शनविशुद्धिभावनेचें निरंतर चिंतन करा. हिचें ध्यान करा. जे ह्या भावनेची स्तुति करून अर्घ्यावतारण करितात ते मुक्तिरूपी स्त्रीशीं संबंध करितात. येथपर्यंत दर्शनविशुद्धिभावनेचें वर्णन केलें.

## २ विनयसंपन्नता

आतां विनयसंपन्नता नांवची दुसरी भावना सांगतों. विनय पांच प्रकारचा सांगितला आहे १ दर्शनविनय, २ ज्ञानविनय, ३ चारित्रविनय, ४ तपोविनय, आणि ५ उपचारविनय. त्यांत

पंचविनय

आपल्या श्रद्धानाला शंकादिक दोष न लागूं देणें, सम्यग्दर्शनाच्या शुद्धीनेंच आपला जन्म सफल मानणें, सम्यग्दर्शन धारण करणाऱ्यावर प्रीति ठेवणें, आणि आत्मा व पर ह्यांतील भेदविज्ञानाचा अनुभव करणें हा दर्शनविनय आहे. सम्यग्ज्ञानाच्या प्राप्तीसाठीं उद्यम करणें, सम्यग्ज्ञानाच्या वर्णनाविषयीं आदर ठेवणें, सम्यग्ज्ञानाला कारण जें अनेकांतरूप जिनसूत्राचें श्रवण, पठन, पाठनामध्यें उत्कंठित असणें, तें वाचतांना स्तवन नमस्कारपूर्वक मोठ्या आदरानें वाचणें, ज्ञानव्यासंगी असे ज्ञानी लोक भेटल्यानें व जिनागमाचें पुस्तक मिळाल्यानें मोठा लाभ मानून सत्कार, स्तवन, आदर वगैरे करणें हा ज्ञानविनय होय. आपल्या शक्तीप्रमाणें चारित्र धारण करण्यामध्यें हर्ष मानणें, चारित्र निर्मळ होण्यासाठीं विषयकषाय कमी करणें, आणि चारित्र धारण करणाऱ्याच्या गुणांवर प्रीति करणें, त्यांचा

आदरसत्कार करणें, त्यांची स्तुति करणें ह्यास चारित्रविनय म्हणतात. इच्छेला दाबून, मिळालेल्या विषयावरच संतोष ठेवून ध्यान स्वाध्यायामध्यें उद्युक्त होणें, कामविकाराला जिंकण्यासाठीं व इंद्रियांची विषयावरील प्रवृत्ति रोकण्यासाठीं अनशनादिक तपामध्यें उद्यम करणें हा तपोविनय आहे. दर्शन, ज्ञान, चारित्र आणि तप ह्या चार आराधनांचा उपदेश देऊन जे मोक्षमार्गामध्यें प्रवर्तन करविणारे आहेत आणि ज्यांचें स्मरण केल्यानें परिणाम शुद्ध होतात, त्या पंचपरमेष्ठीच्या नाम स्थापनेचा विनय करणें, नमस्कार करणें आणि स्तवन करणें, ह्यास उपचारविनय म्हणतात.

आणखीहि उपचारविनयाचे पुष्कळ भेद आहेत. अभिमान सोडून आठ मदांचा ज्यांनीं अगदीं नाश केला आहे, ज्यांनीं कठोरपणा सोडून कोमलपणा धारण केला आहे, त्यांच्या अंगीं विशेष नम्रता असते. त्यांचे विचार असे होतात कीं, हें धन, यौवन, जीवित सारें क्षणभंगुर आहे; कर्माच्या स्वाधीन आहे. दिसतें तें सगळें संयोगवियोगरूप आहे. मला कितीक दिवस वांचावयाचें आहे ? प्रतिक्षणीं मीं काळाच्या समोर एकसारखा चाललों आहे. कोणत्याही वस्तूचा संबंध स्थिर नाहीं. तेव्हां माझ्यापासून कोणाही जीवाला दुःख होऊं नये असा तो नेहमीं विचार करीत असतो.

भगवंतांनीं विनयधर्मच मनुष्यजन्माचें सार असें म्हटलें आहे. हा विनय, संसाररूपी वृक्षाला भस्म करण्यासाठीं अग्नीसारखा आहे. विनय हा त्रैलोक्यांत प्रधान आहे आणि त्रैलोक्यांतील जीवाच्या मनाची शुद्धी करणारा आहे. विनय हें समस्त जिनशासनाचें मूळ आहे.

विनयापासून नफा नुकसान

ज्याला विनय नाहीं त्याच्यानें जिनशासनाची शिक्षा ग्रहण करवत नाहीं. विनयरहित जीव सर्व दोषाला पात्र आहे. विनय हा मिथ्या श्रद्धानाला तोडणारी कुऱ्हाड आहे. विनयावांचून मनुष्यरूपी कातड्याचा वृक्ष गर्वरूपी अग्नीनें भस्म होत आहे. मानकषायाच्या योगानें येथेंच भयंकर दुःख सोसावें लागतें व परलोकीं निंद्य जाति, नीच कुळ, कुरूपता, बुद्धिहीनपणा, निर्बलता अशा स्थितींत जन्म मिळतो. गर्विष्ठ मनुष्याला येथें कोणाचाही शब्द सोसवत नाहीं, परंतु मेल्यावर तिर्यंचगतींत दुसऱ्याच्या शिव्याच काय, पण नाक टोंचून वेसण घालून घेणें, दोरीन बांधून घेणें, ओझें लादूं देणें, लाथ खाणें, मार खाणें, चाबकाचे तडाके मर्मस्थानीं बसणें वगैरे दुःख पराधीन होऊन सोसावें लागतें. तसेंच चांडालाच्या मलिन घरांत दोरीनें बांधून घेऊन राहावें लागतें व पाठीवर मळमूत्र वगैरे निंद्य वस्तु लादून घ्याव्या लागतात. गर्विष्ठ माणसाचे ह्या लोकींसुद्धां सगळे लोक वैरी बनतात. त्याची निंदा करतात. त्याची फार अपकीर्ति होते. गर्विष्ठ माणसापासून दूर असावें असें सगळ्याला वाटतें. मानकषायापासून क्रोध प्रगट होतो कपट उत्पन्न होतें, लोभ वाढतो, दुर्वचनांत प्रवृत्ति होते. एकंदरींत जितकी कांहीं जगांत अनीति आहे तितकी सगळी मानकषायापासून उत्पन्न होते. गर्विष्ठ मनुष्य आपला अभिमान पुष्ट होण्यासाठीं परधनहरणादिक निंद्य काम देखील करतो. ह्यावरून मानकषाय हा ह्या जिवाला मोठा वैरी आहे.

म्हणून विनयगुणामध्यें मोठा आदर ठेवून आपले दोन्ही लोकांत कल्याण करून घ्या.

देवाचा विनय करा; शास्त्राचा विनय करा; गुरूचा विनय करा; काया, वाचा, मनानें प्रत्यक्ष करा,

कोणाचा विनय करावा. व परोक्षही करा. देव म्हणजे भगवान अरिहंत वीतराग, जो समवसरण-विभूतिसहित गंधकुटीमध्ये सिंहासनावर अधर विराजमान, चौसष्ठ चामरांनीं शोभित, छत्रत्रयादिक प्रातिहार्यांनीं विभूषित, कोटि-सूर्यांच्या प्रभेसारखा प्रकाशित, परमौदारिक देहाचा धारक, बारा सभेकडून सेवित, आपल्या दिव्यध्वनीनें अनेक लोकांवर उपकार करणारा, असा जो सर्वज्ञ प्रभु त्याचें चिंतन करून ध्यान करणें हें परोक्षविनय करणें होय. भगवंताचें विनयपूर्वक मुखानें स्तवन करणें हा वचनानें केलेला परोक्षविनय होय. आणि हात जोडून मस्तकावर ठेऊन नमस्कार करणें हा कायेनें केलेला परोक्षविनय होय. जिनेंद्राच्या मूर्तीची शांतमुद्रा प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून मोठ्या आनंदानें मनांत ध्यान करून स्वतःला कृतकृत्य मानणें हा मनःकृत प्रत्यक्षविनय आहे. जिनेंद्राच्या मूर्तीच्या सन्मुख होऊन स्तवन करणें हा प्रत्यक्ष वचनविनय आहे. दोन्हीं हात जोडून मस्तकावर ठेऊन वंदना करणें, व जमिनीवर पडून साष्टांग दंडवत् घालणें हा कायकृत प्रत्यक्षविनय आहे. सर्वज्ञ वीतरागपरमात्मा जो जिनेंद्र भगवान त्याचें नामस्मरण करणें, ध्यान करणें, वंदनास्तवन करणें, हा सर्व परोक्षविनय आहे. असा हा देवाचा विनय संपूर्ण अशुभ कर्माचा नाश करणारा आहे असें सांगितलें आहे. निर्ग्रंथ वीतरागी मुनीला प्रत्यक्ष पाहून उभे राहणें, हर्षानें त्यांच्यासमोर जाणें, त्यांची स्तुति करणें, त्यास वंदना करणें, गुरूला पुढें करून आपण मागेंमागें चालणें, कदाचित् बरोबर चालण्याची आवश्यकता असल्यास त्यांच्या डाव्या हाताकडे चालणें, गुरूला आपल्या उजव्या हाताकडे ठेऊन चालणें, बसणें, गुरु जवळ असतांना आपण उपदेश न करणें, कोणी प्रश्न केल्यास गुरु असतांना आपण उत्तर न देणें, आपण उत्तर द्यावें अशी इच्छा असल्यास गुरूच्या इच्छेच्या अनुकूल असें उत्तर देणें. गुरु जवळ असतांना आपण उंच ठिकाणीं न बसणें, गुरु व्याख्यान देत असतील अथवा उपदेश करीत असतील तेव्हां आपण हात जोडून मोठ्या नम्रतेनें ऐकून तो ग्रहण करणें, गुरूच्या गुणामध्यें प्रीति ठेऊन त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागणें, जर गुरु दूर ठिकाणीं असतील तर त्यांची आज्ञा जशी असेल त्याप्रमाणें वर्तन करणें आणि गुरूची स्तुति, ध्यान, नमस्कारादि दुरून करणें वगैरे सर्व गुरूचा विनय आहे.

शास्त्राचा विनय करावा. शास्त्राचाहि विनय करावा. मोठ्या आदरानें शास्त्र वाचावें व ऐकावें. द्रव्य, क्षेत्र, काल, भाव पाहून व्याख्यान वगैरे करावें. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें व्रतसंयमादिक आपल्याच्यानें होत नाहींत म्हणून शास्त्राज्ञेचा लोप करूं नये. शास्त्राची आज्ञा असेल तसेंच सांगावें. सूत्राची आज्ञा एकाग्रचित्तानें श्रवण करावी. श्रवण करतांना दुसऱ्या गोष्टी काढू नयेत. आदरपूर्वक मौन धरून शास्त्रश्रवण करावें. जर आपणास संशय येईल तर तो दूर करण्यासाठीं सभेच्या लोकांना आणि वक्त्याला क्षोभ उत्पन्न होणार नाहीं अशा रितीनें नम्रपणानें प्रश्न करावा आणि उत्तर मिळेल तें ऐकून घ्यावें.

शास्त्र उंच आसनावर ठेवून आपण खालीं बसावें. शास्त्राची स्तुति करावी, प्रशंसा करावी. शास्त्राला नमस्कार करावा. ह्यापासून शास्त्राचा विनय होतो. अशा रितीनें देव, गुरु, शास्त्राचा विनय करणें हा धर्म आहे.

आत्म्याच्या गुणांचा घात रागद्वेषांनीं होत असतो. तो न होईल अशा रितीनें वागणें हा आत्म्याचा विनय आहे. यापुढें आतां मला या चतुर्गतींतील भ्रमण नको.

आत्मविनय

माझ्या आत्म्याला मिथ्यात्व, कषाय, अविनयादिकाच्या योगानें जे आजपर्यंत संसारांत भटकावें लागलें तें आतां पुढें त्याला न व्हावें असें चिंतन करावें. मिथ्यात्व, कषाय, अविनयादिकाच्या योगानें आत्म्याच्या ज्ञानादिक गुणांचा घात न करणें हा आत्म्याचा विनय आहे. यालाच निश्चयविनय म्हणतात. हा परमार्थ विनय होय.

व्यवहारविनय तरी ज्याचा मानकषाय कमी होईल त्यालाच घडतो. कोणत्याही माणसाचा मजकडून अपमान होऊं नये असें मनांत चिंतीत असावें. जो दुसऱ्याचा अपमान करतो तो स्वतः अपमान पावतो. जो दुसऱ्याचा सन्मान करतो तोच मानास पात्र होतो.

व्यवहारविनय

सर्वांशीं गोड भाषण करणें हा विनय आहे. कोणत्या जीवाचा तिरस्कार न करणें हाही विनय आहे. आपल्या घरीं कोणी आल्यास त्याचा यथायोग्य सत्कार करावा. ज्याच्यासमोर जाऊन बोलावणें योग्य असेल त्याच्या समोर जावें. ज्याच्या येण्याच्या वेळीं आपण उभे राहणें जरूर असेल त्यावेळीं उठून उभे राहावें. ज्यांना हात जोडून नमस्कार करावयाचा असेल त्याचा तसें करून सन्मान करावा. ज्याला "यावें, यावें, यावें" असें तीन वेळा उच्चारून मान देणें असेल त्यास तसा मान द्यावा. आपण आदरानें त्याजपुढें बसावें. कोणाला आपल्या जागेवर बसविणें योग्य असेल त्याला आपल्या जागेवर बसवून आपण बाजूला अथवा समोर बसावें. बसण्यासाठीं गादी, तक्या, खुर्ची वगैरे योग्य वाटेल तें द्यावें. " या, बसा, " असें म्हणावें. शरीराचें क्षेमकुशल विचारावें. घरच्या मंडळीचेंही क्षेमकुशल विचारावें. " मी आपलाच आहें, कांहीं कामकाज असल्यास सांगा " असें म्हणावें. " भोजनास चला, घर आपलें आहे, " असें म्हणावें. " पाणी आणूं काय ? " असें विचारावें व आणून हजर करावें. " हें घर आपल्या येण्यानें पवित्र झालें " असें म्हणावें. " आपली कृपा मजवर पूर्वीपासून आहेच" असें म्हणावें. हा सर्व व्यवहार-विनय आहे. तसेंच दान देणें; सत्कार करणें क्षेमकुशल विचारणें, रोगी व दुःखी ह्यांची सेवा करणें हें सर्व विनयवंताच्या हातूनच घडतें. कोणी दुःखी मनुष्य आपलें दुःख सांगण्यास आला असेल तर त्याचें म्हणणें ऐकून घ्यावें व आपल्या सामर्थ्याप्रमाणें मदत करावी. आपणाकडून तसें कांहीं होण्यासारखें नसल्यास निदान त्याला धैर्य द्यावें; संतोष मानण्याचा उपदेश द्यावा. हा देखील व्यवहारविनयच आहे व तो परमार्थविनयाला कारण आहे. ह्यापासून कीर्ति होते व धर्मप्रभावना होते. मिथ्यादृष्टीचा देखील अपमान करूं नये. त्याच्याशींही गोड भाषण करावें आणि यथायोग्य त्याचा आदरसत्कार करावा, हाही विनय आहे. महान् पापी, द्रोही, दुराचारी असला तरी त्याला देखील वाईट शब्द बोलूं नयेत. एकेंद्रिय, विकलें-

द्रियादिक आणि सर्पासारखें दुष्ट जीव आहेत त्यांचा प्राण घेऊं नये. त्यांचे प्राण वांचतील असेंच आपण वागावें. ह्याच त्यांचा विनय आहे. अन्य धर्माच्या मूर्ति व देवळें असतील त्यांच्याशीं वैर ठेवून निंदा करूं नये. येणेंप्रमाणें परमार्थ आणि व्यवहार असा दोन्ही प्रकारचा विनय पाळणें गृहस्थाचें कर्तव्य आहे. सकलसंग परित्याग केलेले वीतरागी मुनीश्वर देखील कोणा मिथ्यादृष्टीनें वंदना केल्यास त्याला आशीर्वाद देतात. चांडाळ, भिल्ल, धीवरादिक ज्या नीच जाति आहेत त्यांनीं वंदना केल्यास त्यांना " पापक्षयोऽस्तु " असा आशीर्वाद देतात. ह्यासाठीं विनयगुण धारण करीत असाल तर लहान मूल, अज्ञान, धर्मरहित अशांचा आणि नीच जातीचाहि तिरस्कार किंवा निंदा करूं नका. ह्या मनुष्यजन्माची शोभा विनयापासूनच आहे. विनयाशिवाय मनुष्यजन्माची एक घटका देखील न जावी, असें भगवान गणधरदेव सांगतात.

ह्याप्रमाणें विनयगुणाची महिमा समजून ह्याचा महान् अर्घ्य उतरा. हे विनयसंपन्नताअंग! तूं माझ्या अंतःकरणांत निरंतर वास कर. तुझ्या प्रसादानें आतां माझा आत्मा आठ प्रकारच्या गर्वाला कधींहि प्राप्त न होवो. अशा या विनयसंपन्नता नांवच्या दुसऱ्या भावनेचें वर्णन केलें.

## ३ शीलव्रतेष्वनतिचार

आतां तिसरी शीलव्रतेष्वनतिचार भावना सांगतात. शीलव्रतेष्वनतिचार ह्याचा अर्थ वार्तिकांत असा सांगितला आहे कीं, अहिंसादिक पांच व्रतें आणि हीं व्रतें पाळण्यासाठीं क्रोधादि कषायांचा त्याग करण्याची शील म्हणजे मन, वचन कायेची जी निर्दोष प्रवृत्ति तिला शीलव्रतेष्वनतिचार भावना म्हणतात. शील म्हणजे आत्म्याचा स्वभाव. या आत्मस्वभावाचा नाश करणारीं हिंसादिक पांच पातकें आहेत. त्यांत कामसेवन म्हणून जें एक पाप आहे तें हिंसादिक सर्व पापांना वाढविणारें आणि क्रोधादिक कषाय वाढविणारें आहे म्हणून येथें ब्रह्मचर्याची प्रधानता समजून वर्णन केलें आहे.

निर्दोष शीलाचें स्वरूप.

शील दुर्गतीच्या दुःखाचें हरण करणारें आहे. स्वर्गादिक शुभगतीला कारण आहे. तप, व्रत, संयम ह्यांचा प्राण आहे. शीलावांचून तप करणें, व्रत धारण करणें, संयम पाळणें, हें सगळें प्रेताच्या अंगासारखें त्याज्य आहे. शीलरहित असणाऱ्याचें तप, व्रत, संयम हीं सगळीं धर्माची निंदा करविणारीं आहेत, म्हणून शील धर्माचें अंग समजून तें अवश्य पाळलें पाहिजे. ह्या चंचल मनरूप पक्ष्याला शील व्रतरूप स्तंभाला बांधून ठेवा. आपलें शील निर्दोष करून त्याला पुष्ट करा.

धर्मरूप बागेचा विध्वंस करणाऱ्या मनरूप मदोन्मत्त हत्तीला रोका. भटकलेला मनरूप हत्ती महान् अनर्थ करतो. उन्मत्त होतो तेव्हां तो आपलीं बंधनें तोडून पळून जातो, तसा मनरूपी हत्ती कामविकारानें उन्मत्त झाला म्हणजे साम्यभावरूप स्वरूपांतून निघून पळूं लागतो. त्याला कुळाची मर्यादा व विवेक राहत नाहीं. मदोन्मत्त हत्ती सांखळी तोडून जातो आणि मनरूपी हत्ती हा सद्बुद्धिरूपी सांखळी तोडून फिरूं लागतो. हत्ती हा महाताला पाडून टाकतो. कामांधाचें मन सम्यग्ध-

काम व माजलेल्या हत्तीची तुलना.

र्माच्या मार्गांत प्रवर्तविणाऱ्या ज्ञानाला टाकून देतें. हत्ती अंकुशाला मोजीत नाहीं आणि मनरूपी हत्ती हा गुरूंचें शिक्षाकारी वचन मानीत नाहीं. हत्ती हा छायावान् आणि फलद्रुप अशा वृक्षाला उपटून टाकतो. आणि कामविकारानें व्याप्त झालेलें मन हें स्वर्गमोक्षरूपी फळ देणारा, यशरूपी सुगंध पसरणारा, व संपूर्ण विषयांचा ताप नाहींसा करणारा असा ब्रह्मचर्यरूपी वृक्ष उपटून टाकतो. हत्ती सरोवरांत स्नान करून पुन: मस्तकावर धूळ टाकून मातीशीं खेळतो; आणि कामविकारानें व्याप्त झालेलें मन सिद्धांतरूप सरोवरामध्यें फिरून अज्ञानरूपी मळ धुवून पुन: पापरूपी मातींत लोळूं लागतें. हत्ती आपले कान नेहमीं हालवीत असतो; आणि कामसंयुक्त मन हें पांचही इंद्रियांच्या विषयामुळें चंचल झालेलें असतें. हत्ती हा हत्तिणीशीं रममाण होतो, आणि कामसंयुक्त मन हें कुबु-द्धिरूपी हत्तिणींत रंजित होतें. हत्ती हा स्वच्छंदपणें झुलत असतो. कामसंयुक्त मनही स्वच्छंदी होऊन जातें. हत्ती हा मदानें मत्त होतो; आणि कामीपुरुषाचें मन रूपादिक आठ मदांनीं उन्मत्त होतें. उन्मत्त हत्तीच्या जवळ कोणी येत नाहीं, कामविकारानें उन्मत्त झालेल्या माणसाजवळ कोणताही गुण नसतो. यास्तव कामविकारानें उन्मत्त झालेल्या मनरूपी हत्तीला वैराग्यरूपी खांबाला बांधा. तें मोकळें राहिल्यानें फार अनर्थ करील.

कामाची इतर नांवें

कामाला अनंग म्हणतात म्हणजे त्याला अंग नाहीं. कामाला मनसिज म्हणतात, म्हणजे मनामध्येंच ह्याचा जन्म आहे. कामाला मन्मथ म्हणतात म्हणजे हा मनांतील ज्ञानाचें मंथन करणारा आहे. तसेंच हा संवराचा अरि म्हणजे वैरी आहे म्हणून यांस संवरारि म्हणतात. कामापासून खोटा गर्व उत्पन्न होतो म्हणून त्याला कंदर्प म्हणतात. ह्याच्या योगानें अनेक मनुष्य व तिर्यंच परस्परांत भांडून मरतात म्हणून ह्याला मार म्हणतात. मनुष्याच्या अन्य इंद्रियांनीं विषयभोग उघडपणें घेता येतात. परंतु कामसेवनाचीं इंद्रियें झांकलेलीं आहेत. कामविषयाच्या इंद्रियाचें नांव सुद्धां सभ्य पुरुष आणि सभ्य स्त्रिया उच्चारीत नाहींत. कामविकार हा धर्मापासून भ्रष्ट करणारा आहे. ह्यासारखें दुसरें पाप नाहीं. ह्या कामविकारानें हरिहरब्रह्मादिकांनाही भ्रष्ट करून आपल्या स्वाधीन करून घेतलें आहे. ह्यावरून सगळ्या जगाला जिंकणारा एक कामच आहे. कामाला जो जिंकील तो मोहाला सहज जिंकील.

स्त्रियांशीं संबंध ठेऊं नका.

कामविकार नाहींसा करण्यासाठीं मनुष्यस्त्री, देवांगना आणि तिर्यंचिणी यांचा संबंध ठेऊं नका. ह्यांच्या सोबतींत बसूं नका. स्त्रियांविषयींची आवड सोडून द्या. आपण कुशीलमार्गानें वागूं नका. दुसऱ्याला कुशीलमार्गाचा उपदेश देऊं नका. इतर कोणी कुशील-मार्गानें वागत असल्यास त्याला अनुमोदन देऊं नका. लहान मुलीला पाहाल त्यावेळीं ही आपली मुलगी आहे असें मनांत आणा. तरुण स्त्रीला पाहाल त्यावेळीं ती आपली बहीण आहे असें मनांत वागवा. तिच्याशीं बोलणें चालणें विशेष ठेवूं नका. जे शीलवान आहेत त्यांची दृष्टि स्त्रियांकडे गेल्याबरोबर

भिट्न जाते. जो स्त्रियांशीं अधिक बोलणें चालणें ठेवील, स्त्रियांच्या अंगाकडे पाहात राहील त्याचा शीलभंग होण्याचा संभव आहे. ह्यासाठीं गृहस्थानें आपल्या स्त्रीशिवाय अन्य स्त्रीचीं सोबत वर्ज्य करावी. अन्य स्त्रियांच्या गोष्टींत मन घालूं नयें. आपली आई, बहीण किंवा मुलगी जरी असली तरी तीच्याशीं एकान्त जागीं बोलत बसूं नये. मुनि तर स्त्रियांशीं संबंधच ठेवीत नाहींत. स्त्रियांमध्यें बसून उपदेश करीत नाहींत. स्त्रीचीं नांवेंच दोषदर्शक आहेत. स्त्रीला नारी म्हणतात. म्हणजे स्त्रीसारखा अरि म्हणजे वैरी दुसरा नाहीं म्हणून हिचें नांव नारी पडलें आहे. दोषांना प्रत्यक्ष पाहतां पाहतां झांकून टाकते म्हणून हिला स्त्री म्हणतात. हिला पाहिल्याबरोबर पुरुषाचें पतन होतें म्हणून हिला पत्नी म्हणतात. कुमरण करण्याला ही कारण आहे म्हणून हिला कुमारी म्हणतात. हिच्या संगतीनें पुरुषाची बुद्धि आणि बलादिक नाहींसे होतात म्हणून हिला अबला म्हणतात. संसाराच्या बंधाला कारण आहे म्हणून हिला वधू म्हणतात. कुटिलता ( मायाचारीस्वभाव ) धारण करते म्हणून हिला वामा म्हणतात. हिच्या डोळ्यांत कुटिलता आहे म्हणून हिला वामलोचना म्हणतात. हिचीं नांवें सगळीं दोषदर्शकच आहेत.

शीलवान् पुरुषाला इंद्र देखील नमस्कार करतात. शीलवान् पुरुष रत्नत्रयरूपी धन घेऊन कामादिक लुटारूंच्या भयापासून रहित होऊन निर्भयपणें निर्वाणपुरीला गमन करतात. शीलानें भूषित असा पुरुष कुरूप असला, मलिन असला, रोगग्रासित असला तथापि शीलवान् पूज्य बनतो. तो आपल्या शीलगुणानें संपूर्ण सभाजनाला मोहित करतो. सुखी करतो. आणि शीलरहित जो व्यभिचारी आहे तो कामदेवासारखा स्वरूपवान् असला तथापि लोक त्याची छी थूं करतात कारण ह्याचें नांवच कुशील आहे. शील हें नांव स्वभावाचें आहे. आत्म्याचा स्वभाव जो ब्रह्मचर्य तो कामी पुरुषानें भ्रष्ट केल्यामुळें त्याला कुशील म्हणावें लागतें. कामी मनुष्य धर्मापासून, आत्म्याच्या स्वभावापासून व व्यवहाराच्या शुद्धिपासून चलायमान होतो म्हणून ह्याला व्यभिचारी म्हणतात. ह्यासारखें जगामध्यें अन्य कुकर्म नाहीं म्हणून कामाला कुकर्म म्हणतात. कामविकारानें मनुष्य पशुसारखा होतो म्हणून ह्याला पशुकर्म म्हणतात. ब्रह्म जो आत्मा त्याच्या ज्ञानदर्शनादि स्वभावाचा घात ह्यापासून होतो म्हणून ह्याला अब्रह्म म्हणतात. कुशीलेच्या संगतीनें कुशील होतो. ज्यानें शील पाळलें त्यानेंच क्षमा, तप, व्रत, संयम हे सगळे पाळले. आपल्या स्वभावापासून चलायमान न होणें ह्याला मुनीश्वर शील म्हणतात. शील नांवचा गुण सगळ्या गुणांत मोठा आहे. शीलवान् पुरुषाचें थोडेसें तप फार मोठें फलदायक होतें. शीलाशिवाय पुष्कळसें तप निष्फल आहे. ह्याप्रमाणें आत्म्याचें शील शुद्ध होण्यासाठीं शीलाचें नित्य पूजन करा. हें शीलव्रत मनुष्यजन्मांतच पाळतां येण्यासारखें आहे. अन्यगतींत नाहीं. ह्यासाठीं मनुष्यजन्म सफल व्हावा असें इच्छीत असाल तर शीलाचीच कास धरा. अशा शीलव्रतेष्वनतिचार नांवाच्या तिसऱ्या भावनेचें वर्णन केलें.

## ४ अभीक्ष्णज्ञानोपयोग

आतां अभीक्ष्णज्ञानोपयोग नांवाच्या चौथ्या भावनेचें वर्णन करतात.

हे आत्मन्, मनुष्यजन्म प्राप्त झाला आहे त्याअर्थी निरंतर ज्ञानाभ्यासांत वेळ घालव. ज्ञानाभ्यासावांचून एक क्षण देखील जाऊं देऊं नकोस. ज्ञानाभ्यासाशिवाय मनुष्य पशुसारखा आहे म्हणून यथाकाल जिनागमाचा पाठ करीत जा. साम्यभाव झाल्यावेळीं ध्यान करीत जा आणि शास्त्राच्या अर्थाचें चिंतन करीत जा. ज्ञानी गुरुजनाची नम्रतेनें वंदना करीत जा. धर्मश्रवण करण्यास इच्छितील त्यांस धर्माचा उपदेश कर. याप्रमाणें आपला सर्व वेळ ज्ञान देण्यात व घेण्यांत घालविणें यास अभीक्ष्णज्ञानोपयोग म्हटलें आहे. या सर्व गुणांचें अष्टद्रव्यांनीं पूजन करून अर्घ्य उतरा. व पुष्पांची ओंजळ भरून पुढच्याभागीं क्षेपण करा. ज्ञानोपयोग हा चैतन्यगुणाचा परिणाम आहे म्हणून प्रतिक्षणीं याची भावना धरावी. असा विचार करावा कीं, अनादिकालापासून काम, क्रोध, अभिमान, लोभादिकांचा संस्कार माझ्या चैतन्यस्वरूपांत घुसला आहे. तो सर्वज्ञ प्रभूच्या परमागमाच्या प्रभावानें नाहींसा होऊन मी आपल्या ज्ञायकस्वभावस्वरूपामध्यें स्थिर व्हावें आणि रागादिक विकारांच्या स्वाधीन होऊं नये ह्यांतच माझें हित आहे, अशी माझी मनोवृत्ति व्हावी. नवीन शिष्यापुढें श्रुताचा अर्थ असा सांगावा कीं, त्यापासून त्याचे संशय दूर होऊन अंतःकरणांत स्वपर–पदार्थाचें यथावत् स्वरूप प्रकट व्हावें. पाप पुण्याचें, लोक अलोकाचें आणि मुनिधर्म व श्रावकधर्माचें यथार्थ स्वरूप त्यांना समजलें जावें. आपण अंतःकरणांत संसारदेहभोगापासून विरक्त होण्याचें चिंतन करावें. संसार-देहभोगांच्या यथार्थ स्वरूपाचें चिंतन केल्यापासून राग, द्वेष आणि मोह हे आपल्या ज्ञानाला विपरीत करूं शकत नाहींत. इतर द्रव्यांशीं आत्मा एकरूप झालेला आहे तरी त्याला भिन्न अनुभविणें हाच ज्ञानोपयोग आहे. ज्ञानाभ्यास केल्यानें विषयावरील इच्छा नाहींशीं होते, कषायाचा अभाव होतो, माया, मिथ्या आणि निदान हीं तीन शल्यें नाहींशीं होतात, मन स्थिर होतें, अनेक प्रकारचे विकल्प नाहींसे होतात, धर्मध्यान, शुक्लध्यानांत मन अचल राहतें, व्रतसंयमापासून मन चलायमान होत नाहीं, जिनेंद्राची शासन–परंपरा चालू राहते, अशुभ कर्माचा नाश होतो, जिनधर्माची प्रभावना होते व लोकांच्या हृदयांत सांचलेलें पापरूपी ऋण नाहींसें होतें. अज्ञानी जीव घोर तपश्चरण करून कोट्यवधि वर्षांत जीं कर्में नाहींशीं करतो, तीं कर्में ज्ञानी जीव अंतर्मुहूर्तांत नाहींशीं करतो. जिनधर्माचा आधार–स्तंभ म्हणजे ज्ञानाभ्यासच होय. ज्ञानाच्या प्रभावानें संपूर्ण विषयांवरील वांछा नाहींशीं होऊन संतोष प्राप्त होतो. ज्ञानानेंच उत्तम क्षमादिक गुण प्रकट होतात. ज्ञानाभ्यासापासूनच भक्ष्य, अभक्ष्य, योग्य, अयोग्य, त्याज्य, ग्राह्य, इत्यादि विचार सुचतात. ज्ञानाशिवाय परमार्थ आणि व्यवहार यांतून एकही साधत नाहीं. ज्ञानरहित राजपुत्राचा निरादर होतो आणि ज्ञानवान् अशा गरीब माणसाचा सत्कार होतो. ज्ञानासारखें कोणतेंही धन नाहीं. ज्ञानदानासारखें दुसरें दान नाहीं. दुःखी आणि सुखी प्राण्याला ज्ञान हें नेहमीं सहाय्य देतें. ज्ञान हेंच स्वदेशांत आणि परदेशांत आदर

सदैव ज्ञानाभ्यासांत काल घालवा

संसारांत तुम्ही आजवर अनेक दुःखें भोगलीं आहेत. म्हणून आतां वीतरागपणाचा आश्रय केला तरच दुःखाचा नाश होऊन कल्याण होईल. " या प्रमाणें समजावून त्यास मार्गापासून चलायमान होऊं देत नाहींत म्हणून आधारवान् गुरूंचाच आश्रय असणें अवश्य आहे.

३ तिसरा भेद जो व्यवहारवान् म्हणून सांगितला तो असा. तो प्रायश्चित्त सूत्रांचा जाणता असला पाहिजे. जो पुढें आचार्य होण्यासारखा असेल त्यालाच त्यानें प्रायश्चित्तशास्त्र शिकविलें पाहिजे. जिनागमाचा जाणता असून महान् धैर्यवान् व प्रबल बुद्धीचा धारक असेल तोच प्रायश्चित्त देण्यास योग्य असतो. द्रव्य, क्षेत्र, काल, भाव, क्रिया, परिणाम, उत्साह, संहनन, पर्याय, दीक्षेचा काल, शास्त्रज्ञान, पुरुषार्थ वगैरे चांगल्या प्रकारें जाणून राग द्वेषरहित होऊन प्रायश्चित्त द्यावें. सारांश, अमक्याला अमुक प्रायश्चित्त दिल्यानें त्याचे परिणाम सुधरतील व दोष नाहींसे होऊन त्याच्या व्रतामध्यें दृढता होईल इत्यादि गोष्टींचें ज्ञान त्यास असलें पाहिजे. तसेंच आहाराच्या योग्यायोग्यतेचें ज्ञानही त्याला असलें पाहिजे. ह्या क्षेत्रांत हें प्रायश्चित्त निभेल किंवा नाहीं. ह्या प्रांतांत वात, पित्त, कफ, शीत, उष्ण हे कमी आहेत, जास्त आहेत किंवा समान आहेत; येथें मिथ्यादृष्टी जीव अधिक आहेत कां कमी आहेत; धर्मात्मा जास्त आहेत कां थोडे आहेत; इत्यादि गोष्टींचा विचार करून प्रायश्चित्त दिलें पाहिजे. हिंवाळा, उन्हाळा, पावसाळा व अवसर्पिणी उत्सर्पिणीचा तिसरा, चौथा वा पांचवा काळ पाहून त्या धोरणानें प्रायश्चित्त दिलें जावें. त्याची शक्ति कशी आहे, परिणाम कसे आहेत, तपश्चरणामध्यें त्याला उत्साह आहे कीं नाहीं, त्याचें संहनन कसें आहे, पुष्कळ दिवसांचा दीक्षित आहे कीं नवा आहे, सहनशील आहे कीं घाबरा आहे, तरुण आहे कीं म्हातारा आहे, आगमाचा जाणता आहे कीं अडाणी आहे; पुरुषार्थी आहे कीं आळशी आहे; इत्यादिकांचा विचार करून प्रायश्चित्त दिलें जावें. जो गुरुपाशीं प्रायश्चित्तसूत्र शब्दार्थासहित न शिकतां दुसऱ्याला प्रायश्चित्त देतो तो संसाररूपी चिखलांत फसून, अपकीर्ति करून घेतो, उन्मार्गाचा उपदेश करून सम्यङ्मार्गाचा नाश करतो आणि मिथ्यादृष्टी होतो. गुरु ज्याला आचार्यपद देतात त्याच्या अंगीं पुढील गुण असले पाहिजेत. तो उच्च कुळांत जन्मलेला असावा, व्यवहार परमार्थाचा जाणता असावा, त्यानें आपल्या मूळ-गुणाला कधींहि अतिचार लावलेला नसावा, चारी अनुयोगांचा पारगामी असावा, धैर्यवान् असावा, परीषह सहन करण्यासारखा शक्तिमान् असावा, देवादिकांनीं केलेल्या उपसर्गापासून सुद्धां चलायमान न होणारा असावा, वक्तृत्व शक्तीचा, वादी प्रतिवादी यांस जिंकण्याला समर्थ, विषयांपासून अत्यंत विरक्त, पुष्कळ वर्षें गुरूची सेवा केलेला, सर्व संघाला मान्य असेल तोच आचार्यपदवीला योग्य आहे. हें आधींच सगळ्या संघानें जाणलें असावें. सारांश, मूर्ख वैद्य, देश, काल, प्रकृती वगैरे न समजल्यामुळें रोग्याला मारतो, तसा व्यवहारसूत्र न जाणणारा मूर्ख गुरुही संसारांत बुडवितो म्हणून आचार्य हा व्यवहारवान् असला पाहिजे.

४ आचार्य हा प्रकर्ता गुणयुक्त असला पाहिजे. संघामध्यें कोणी रोगी, वृद्ध, अशक्त व वयानें लहान असून त्यानें संन्यास धारण केला असेल त्याच्या सेवेसाठीं नेमलेले मुनि वैयावृत्य

करीत असतातच; तरी आचार्यही कोणी मुनि अशक्त असल्यास त्याला उठविणें, बसविणें, निजविणें, त्याचें मळमूत्र, थुंकी, पू, रक्त वगैरे काढून टाकणें, तें धुऊन टाकणें, त्यास चांगल्या जागेंत बसविणें, धर्मोपदेश देणें, धैर्य ग्रहण करविणें, इत्यादिक वैयावृत्य करतात. तें पाहून समस्त संघांतील मुनिही वैयावृत्य करण्यास तयार होतात. त्यावेळीं ते विचार करतात कीं, " अहो धन्य हे करुणानिधान गुरु ! धर्मात्मा पुरुषाविषयीं त्यांना किती वात्सल्य वाटतें तें पहा. आम्ही मात्र कांहीं न करीतां आळशी होऊन बसलों आहों ! आम्ही असतांना गुरु महाराजांनीं आजाऱ्यांची सेवा--चाकरी करावी आणि आम्ही बसून राहावें ? धिक्कार असो आमच्या प्रमादाला ! " असें मनांत आणून सगळा संघ वैयावृत्य करण्याला उद्युक्त होतो. जर आचार्यच स्वतः प्रमादी असेल तर सगळा संघही प्रमादी होतो. म्हणून आचार्यांत कर्तृत्वगुणाची मुख्यता असावी. सगळ्या संघाचें वैयावृत्य करण्याचें ज्याचें अंगीं सामर्थ्य असेल तोच आचार्य होतो. कोणी आचारहीन असेल त्याजकडून शुद्ध आचरण करवितात, कोणी मंदज्ञानी असेल त्याला नीट समजावून चारित्रांत स्थिर करितात, कित्येकाला प्रायश्चित्त देऊन शुद्ध करतात व कोणाला उपदेश देऊन दृढ करतात. धन्य ते आचार्य ! त्यांना जे शरण जातात त्यांना ते मोक्षाच्या मार्गाला लावून उद्धार करतात म्हणून आचार्यांच्या ठिकाणीं प्रकर्ता नांवाचा गुण प्रधान आहे.

५ अपायोपायविदर्शी नांवाचा पांचवा गुण आचार्यांच्या ठिकाणीं असला पाहिजे तो असा. जेव्हां कोणी साधु पुरुष क्षुधा, तृषा, रोग वगैरेच्या वेदनेनें पीडित झाल्यानें दुःख करीत असेल अथवा तीव्र रागद्वेषानें संतप्त झाला असेल, किंवा लज्जेनें, भयानें यथावत् आलोचना करीत नसेल, रत्नत्रय धारण करण्याचा उत्साह न राहिल्यानें धर्ममध्यें शिथिल झाला असेल तेव्हां त्याला रत्नत्रयाच्या नाशापासून अपाय कसा होतो आणि रत्नत्रयाच्या रक्षणापासून कल्याण कसें होतें हें अशा तऱ्हेनें दाखवितात कीं, त्यानें रत्नत्रयाच्या नाशापासून भयभीत व्हावें. रत्नत्रयाचा नाश झाल्यानें आपला नाश होऊन नरकादि कुगतीमध्यें लागलीच पडावें लागेल आणि रत्नत्रयाचें संरक्षण केल्यानें संसारांतून उद्धार होऊन अनंत सुखाची निश्चित प्राप्ति होणार अशी खात्री होते. अशा उपदेशाचें सामर्थ्य ज्यांच्यामध्यें असेल तो अपायोपायविदर्शी नांवच्या गुणाचा धारक आचार्य म्हणावा.

६ आतां अवपीडक नांवचा सहावा गुण सांगतात. कोणी मुनि रत्नत्रय धारण करून लज्जेनें, भयानें, अभिमानानें किंवा गौरवामुळें आपण केलेल्या दोषाची आलोचना यथावत् करीत नसेल त्यास आचार्य मधुर व अंतःकरणास पटेल अशा शब्दांत सांगतात, " अहो, अत्यंत दुर्लभ अशा रत्नत्रयाचा लाभ तुम्हाला झालेला आहे तो तुम्ही व्यर्थ दवडूं नका. आईबापासारख्या गुरूपाशीं आपले दोष सांगण्यामध्यें काय लाज आहे ? तुमचे गुरु वात्सल्य गुणाचे धारक आहेत, ते आपल्या शिष्याचे दोष प्रगट करून शिष्याला आणि धर्माला कलंक लावणार नाहींत. ह्यासाठीं तुम्ही मनांत कांहीं शल्य न ठेवतां आलोचना करा. ज्यामुळें तुमच्या रत्नत्रयाची

शुद्धि आणि तपश्चरणाचा निर्वाह होऊं शकेल तसलेंच प्रायश्चित्त द्रव्य, क्षेत्र, काल, भाव पाहून तुम्हाला दिलें जाईल. यास्तव तुम्ही भय सोडून आलोचना करा." असें सांगूनही जर तो मायाशल्य सोडीत नाहीं असें दिसेल तर, हे तेजस्वी आचार्य त्याचें शल्य जबरीनें बाहेर काढण्यासाठीं त्याला म्हणतात, "हे मुने, तुमच्याकडून हे दोष घडले आहेत कीं नाहीं. खरें सांगा पाहूं?" हें ऐकतांच गुरूच्या कडकडीत तपाच्या प्रभावानें, जसें सिंहाला पाहून कोल्हा खाल्लेलें मांस ओकून टाकतो, अथवा एखादा महान् तेजस्वी राजानें दटावल्याबरोबर अपराधी लागलींच खरें सांगूं लागतो, तसें तो शिष्यही मायाशल्य टाकून खरें सांगूं लागतो. इतकें करूनही तो जर खरें सांगत नाहीं असें आचार्यांस वाटेल तर त्यावेळीं ते तिरस्काराचे शब्द उच्चारून म्हणतात "हे मुने, तुम्ही आमच्या संघांतून निघून जा. आमच्याशीं तुमचें आतां काय प्रयोजन आहे? ज्याला आपल्या शरीराचा मळ धुवावा अशी इच्छा आहे तो निर्मळ पाण्याच्या सरोवरापाशीं जाईल. ज्याला आपला महान् रोग दूर व्हावा अशी इच्छा आहे तो प्रवीण वैद्याच्या म्हणण्याप्रमाणें वागेल. तसेंच जो रत्नत्रयरूपी परम धर्माचा अतिचार दूर करून तें निर्मळ करण्याची इच्छा ठेवील तोच गुरूच्या आश्रयानें राहील. तुम्हाला रत्नत्रयाची शुद्धि करण्याची इच्छा नाहीं तेव्हां हा मुनिपणा धारण करणें व नग्न राहून क्षुधादिक परीषह सहन करण्याची विटंबना सोसणें ह्याचा काय उपयोग? संवर आणि निर्जरा कषायाला जिंकण्यापासून होते. आणि तुम्ही जर माया कषायाचा त्याग केला नाहीं तर व्रत, संयम, मौनधारण हें सगळें व्यर्थ आहे. मायाचार ठेवून नग्न राहणें आणि परीषह सहन करणें निरर्थक आहे. कारण तिर्यंचसुद्धां नग्न राहतात. तुम्ही दूरभव्य आहांत, तुमचें चांगलें होण्याची अजून वेळ आली नाहीं. आम्हाला वंदन करण्यास तुम्ही योग्य नाहीं. तुमच्या मनांत आपला दोष प्रगट झाला तर निंदा होईल व आपला मोठेपणा कमी होईल असें आहे. असें वाटणें हें बंधाला कारण आहे. मुनींनीं स्तुतिमध्यें आणि निंदेमध्यें सारखे परिणाम ठेवले पाहिजेत." इत्यादि कठोर शब्द बोलून त्याचा मायाचार नाहींसा करितात. हा आचार्याचा अवपीडक गुण समजावा. अवपीडक आचार्य उपसर्ग परीषह आल्यानें घाबरे होत नाहींत. ते बलवान् व धैर्यवान् असल्यामुळें तो सहन करतात. त्यांचा प्रभावही असा असतो कीं, त्यांचें वचन कोणी उल्लंघन करूं शकत नाहीं. त्यांचा प्रतापही असा असतो कीं, त्यांना पाहिल्याबरोबर दोषधारी साधु थरथर कांपूं लागतात. त्यांना पाहून मोठमोठे विद्वान् नम्र होऊन वंदन करतात. त्यांच्या कीर्तीचा सुगंध इतका पसरतो कीं त्यांच्या गुणाविषयीं उत्कट प्रेम उत्पन्न होतें त्यांचें वचन दूरदूरच्या देशांत प्रमाण मानलें जातें. असा हा अवपीडक आचार्य सिंहासारखा निर्भय होत्साता शिष्यांचें हित ज्या उपायांनीं होईल तशा रितीनें त्याजवर उपकार करीत असतो. जशी आई आपल्या लेंकराच्या हितासाठीं तें रडत असलें तरी जबरीनें त्याला दूध पाजतें, तसें शिष्यांचें हित चिंतन करणारे आचार्यही मायाशल्य ठेवणाऱ्या शिष्याचे दोष बलात्कारानें सोडवितात. औषध प्रथम कडू वाटतें परंतु मागाहून तें हितकर होतें. जो जिव्हेनें नुसतें गोड बोलतो व शिष्यांचे दोष सोडवीत नाहीं तो खरा गुरु नव्हे.

जो लाथा मारून कां होईना परंतु शिष्याचे दोष दूर करतो तोच अवपीडक गुणाचा धारक आचार्य म्हणावा.

७ आतां अपरिस्रावी गुण सांगतात. शिष्य आपले दोष गुरूपुढें आलोचना करून सांगतो. ते दोष गुरूंनीं प्रकट करूं नयेत. जसें तापलेल्या लोखंडाच्या गोळ्यावर शिंपलेलें पाणी पुन: दिसत नाहीं तसें शिष्याकडून ऐकलेले दोष आचार्यांनीं कोणाला समजूं देऊं नये. ह्या अपरिस्रावी नांवाचा गुण आहे. शिष्य विश्वासानें गुरूला आपले दोष कळवितो, पण गुरु शिष्याचे दोष प्रगट करील तर तो गुरु नव्हे. तो अधम विश्वासघाती आहे. कोणी शिष्य आपले दोष प्रकट झालेले जाणून दु:खी होतो आणि आत्महत्याही करतो, किंवा क्रोधवश रत्नत्रयधर्माचा त्याग करतो, अथवा गुरूचा दुष्टपणा पाहून, जशी माझी अवज्ञा ह्यांनीं केली तशी तुमचीहि अवज्ञा ते करतील असें संघाला सांगून अन्य संघामध्यें जातो. ह्या योगानें सगळ्या संघाचा आचार्यावरचा विश्वास उडतो व सगळेच आचार्याचा त्याग करतात. म्हणून अपरिस्रावी गुणाचा धारकच आचार्य योग्य आहे.

८ आतां आचार्याचा निर्यापक नांवचा आठवा गुण सांगतात. जसा नावाडी नांव हाकतांना अनेक अडचणी टाळून आपली नाव पार पाडतो. तसेंच जे आचार्य शिष्याला अनेक विघ्नापासून बचावून संसारसमुद्रांतून पार करतात ते निर्यापक गुणाचे आचार्य होत.

असे गुण धारण करणाऱ्या आचार्यांच्या गुणामध्यें अनुराग असणें ह्यांस आचार्यभक्ति म्हणतात. असें आचार्यांच्या गुणांचें स्मरण करून त्यांचं जो स्तवन करतो, त्यांस वंदना करतो व अर्घ्य उतरतो तो पापरूप संसाराच्या परंपरेचा नाश करून अक्षय सुखाला पावतो.

## १२ बहुश्रुतभक्ति.

आतां बहुश्रुतभक्ति नांवच्या बाराव्या भावनेचें वर्णन करतात. जे अंगपूर्वाचे ज्ञाते, चार अनुयोगाचे पारगामी बनून निरंतर परमागमाचा अभ्यास करितात व शिष्याकडून करवितात ते बहुश्रुत होत. ज्यांचें श्रुतज्ञान हेंच दिव्य नेत्र आहेत, जे आपलें आणि इतरांचें हित करण्याविषयीं प्रवृत्त होतात, जे जिनसिद्धांताला व अन्य एकांत–मताच्या सिद्धांताला विशदपणें जाणतात व जे स्याद्वादरूपी परम विद्येचे धारक ते बहुश्रुत म्हणावेत. त्यांची भक्ति ती बहुश्रुतभक्ति होय. बहुश्रुताचा महिमा वर्णन करण्यास कोण समर्थ आहे? निरंतर ज्ञानदान करणारे असे जे उपाध्याय त्यांची जे विनयसहित भक्ति करतात ते शास्त्ररूपी समुद्राचे पारगामी होतात. जें अंगपूर्व प्रकीर्णक जिनेंद्रदेवांनीं वर्णन केलें आहे, तो समस्त जिनागम जे स्वत: शिकतात आणि इतरांना शिकवितात ते बहुश्रुत होत. बारा अंगें व चौदा पूर्वांपैकीं प्रत्येकांत कोणतें वर्णन आहे व त्यांचीं पदें किती आहेत त्याचा तपशील:—

१. आचारांगाचीं अठरा हजार पदें आहेत व त्यांत मुनिधर्माचें वर्णन आहे,

२. सूत्रकृतांगाचीं छत्तीस हजार पदें आहेत, त्यांत जिनेंद्राच्या शास्त्राचें आराधन कसें करावें ह्याविषयीं क्रिया सांगितल्या आहेत.

३. स्थानांगाचीं बेचाळीस हजार पदें आहेत, त्यांत सहा द्रव्यांच्या अनेक स्थानांचें वर्णन आहे.

४. समवायांगाचीं एक लाख चौसष्ट हजार पद आहेत, त्यांत जीवादिक पदार्थांचें द्रव्य, क्षेत्र, काल व भाव ह्यांच्या आश्रयानें वर्णन आहे.

५. व्याख्याप्रज्ञप्ति अंगाचीं दोन लक्ष अठ्ठावीस हजार पदें आहेत, त्यांत जीवाच्या अस्ति–नास्ति वगैरे प्रकारांनीं गणधरांनीं वर्णन केलेल्या साठ हजार पदांचें वर्णन आहे.

६. ज्ञातृधर्मकथा अंगाचीं पांच लक्ष छप्पन हजार पदें आहेत, त्यांत गणधरांनीं केलेल्या प्रश्नांच्या अनुसारें जीवादिकांच्या स्वभावाचें वर्णन आहे.

७. उपासकाध्ययन अंगाचीं अकरा लक्ष सत्तर हजार पद आहेत, त्यांत श्रावकाच्या व्रतशील व आचारादि क्रियांचें आणि त्यांच्या मंत्रांचें वर्णन आहे.

८. अंतकृद्दशांगाचीं तेवीस लक्ष अठ्ठावीस हजार पदें आहेत, त्यांत एकेक तीर्थंकराच्या तीर्थामध्यें दहा दहा मुनीश्वर उपसर्ग सहन करून निर्वाण पावले त्यांचें वर्णन आहे.

९. अनुत्तरोपपादक दशांगाचीं ब्याण्णव लक्ष चव्वेचाळीस हजार पदें आहेत. त्यांत एकेक तीर्थंकराच्या तीर्थामध्यें दहा दहा मुनीश्वर भयंकर घोर उपसर्ग सहन करून देवताकडून पूजिले जाऊन विजयादिक अनुत्तर विमानामध्यें जन्मले त्यांचें वर्णन आहे.

१०. प्रश्नव्याकरण नांवच्या अंगामध्यें त्र्याण्णव लक्ष सोळा हजार पदें आहेत. त्यांत नष्ट, मुष्ट, लाभ, अलाभ, सुख, दुःख, जीवित, मरण वगैरे प्रश्नांचें वर्णन आहे.

११. विपाकसूत्रांगाचीं एक कोटि चौऱ्यांशी लक्ष पदें आहेत. त्यांत कर्माचें उदय, उदीरणा व सत्ता ह्यांचें वर्णन आहे.

१२. दृष्टिवाद नांवचें बारावें अंग आहे. त्याचे पांच भेद आहेत. १ परिकर्म, २ सूत्र, ३ प्रथमानुयोग, ४ पूर्व आणि ५ चूलिका.

त्यांत परिकर्माचेहि पांच भेद आहेत. १ चंद्रप्रज्ञप्ति, २ सूर्यप्रज्ञप्ति, ३ जंबुद्वीपप्रज्ञप्ति, ४ द्वीप-सागरप्रज्ञप्ति आणि ५ व्याख्याप्रज्ञप्ति.

चंद्रप्रज्ञप्तीचीं सहा लक्ष पांच हजार पदें आहेत. त्यांत चंद्राचें आयुष्य, गति, कलेची हानिवृद्धि, देवी, वैभवपरिवार इत्यादि वर्णन आहे.

सूर्यप्रज्ञप्तीचीं पांच लक्ष तीन हजार पदें आहेत. त्यांत सूर्याचें आयुष्य, गति, वैभव वगैरेचें वर्णन आहे.

जंबूद्वीपप्रज्ञप्तीचीं तीन लक्ष पंचवीस हजार पदें आहेत. त्यांत जंबूद्वीपासंबंधीं क्षेत्र, कुलाचल पर्वत, ऱ्हद [ सरोवरें ], नदी इत्यादिकांचें निरूपण आहे.

द्वीपसागरप्रज्ञप्तीचीं बावन लक्ष छत्तीस हजार पदें आहेत. त्यांत असंख्यात द्वीप–समुद्रांचें, मध्य लोकांतील जिनभवनांचें आणि भवनवासी, व्यंतर, जोतिष्क देवांच्या निवासांचें वर्णन आहे.

व्याख्या प्रज्ञप्तीचीं चौऱ्यांशी लक्ष छप्पन हजार पदें आहेत. त्यांत जीव-पुद्गलादि द्रव्यांचें निरूपण आहे.

असे पांच प्रकारचे परिकर्माचे भेद आहेत.

दृष्टिवाद अंगाचा दुसरा भेद जो सूत्र, त्यात अठ्यांशी लक्ष पदें आहेत. त्यांत जीव अस्तिरूपच आहे, नास्तिरूपच आहे, कर्ताच आहे, भोक्ताच आहे इत्यादि एकांतवादानें जीवाचें कल्पितस्वरूपांचें वर्णन आहे. दृष्टिवादाच्या तिसऱ्या प्रथमानुयोगाच्या पांच हजार पदांमध्यें त्रेसष्ट महापुरुषांच्या चरित्राचें वर्णन आहे.

दृष्टिवाद अंगाचा चौथा भेद पूर्व नांवचा आहे, त्यांत चौदा पूर्व आहेत ते असे:—

१. उत्पादपूर्वाचीं एक कोटि पदें आहेत. त्यांत जीवादिक द्रव्याच्या उत्पादादिक स्वभावाचें निरूपण आहे.

२. अग्रायणी पूर्वाचीं शहाण्णव कोटि पदें आहेत. त्यांत द्वादशांगाचीं सारभूत सप्ततत्वें, नऊ पदार्थ, सहा द्रव्यें, सातशें सुनय व दुर्नय वगैरेच्या स्वरूपाचें वर्णन आहे.

३. वीर्यानुवाद पूर्वाचीं सत्तर लक्ष पदें आहेत. त्यांत आत्मवीर्य, परवीर्य, क्षेत्रवीर्य, कालवीर्य भाववीर्य, तपोवीर्यादि संपूर्ण द्रव्यगुणपर्यायाचें वर्णन आहे.

४. अस्तिनास्तिप्रवाद पूर्वाचीं साठ लक्ष पदें आहेत. त्यांत जीवादि द्रव्यांचें स्वद्रव्य अपेक्षा अस्ति आणि परद्रव्य अपेक्षा नास्ति इत्यादि सप्त भंगादिक आणि नित्य अनित्य एक अनेकादिक यांतील विरोधाच्या खंडनाचें वर्णन आहे.

५. ज्ञानप्रवाद पूर्वाचीं एक कोटि उणें एक पदें आहेत. त्यांत मति, श्रुति, अवधि, मनःपर्यय आणि केवळ हीं पांच ज्ञानें आणि कुमति, कुश्रुति, विभंगावधि हीं तीन अज्ञानें, ह्यांचें स्वरूप, संख्या, विषय व फलाच्या आश्रयानें प्रामाण्य अप्रामाण्य ह्यांचें वर्णन आहे.

६. सत्यप्रवाद पूर्वाचीं एक कोटि सहा पदें आहेत. त्यांत वचनगुप्ति, वचनाच्या संस्काराचें कारण, बारा भाषा, वक्त्याचे भेद, असत्याचे प्रकार आणि दहा प्रकारचें सत्य ह्यांचें वर्णन आहे.

७. आत्मप्रवाद पूर्वाचीं सव्वीसकोटि पदें आहेत. त्यांत आत्मा आहे, कर्ता आहे, भोक्ता आहे, प्राणधारी आहे, वक्ता आहे, पुद्गल आहे, वेद आहे, विष्णु आहे, स्वयंभू आहे. तो शरीरप्रमाण असून वक्ता, जंतु, मानी, मायावी, योगी, असंकुट (असंकुचित), क्षेत्रज्ञ इत्यादि स्वरूपाचा कसा बनतो याचें वर्णन आहे.

८. कर्मप्रवाद पूर्वाचीं एक कोटि ऐंशी लाख पदें आहेत. त्यांत कर्माचे बंध, उदय, उदीरणा, सत्त्व, उत्कर्षण, अपकर्षण, उपशमन, संक्रमण, निधत्ति व निःकांचित इत्यादि अवस्थांचें, ईर्यापथाचें, तपस्येचें व अधःकर्मादिकांचें वर्णन आहे.

९. प्रत्याख्यानपूर्वाचीं चौऱ्यांशी लक्ष पदें आहेत. त्यांत नाम, स्थापना, द्रव्य, क्षेत्र, काल, भावाच्या आश्रयानें पुरुषांचें संहनन, बलादिकांच्या अनुसारानें प्रमाणित काल किंवा अप्रमाणित

कालापर्यंत त्याग, पापक्रियेची निवृत्ति, उपवासाचा विधि, उपवासाची भावना, पंच समिति आणि गुप्ति ह्यांचें वर्णन आहे.

१०. विद्यानुवादपूर्वाचीं एक कोटि दहा लक्ष पदें आहेत. त्यांत अंगुष्ठप्रसेनादिक सातशें अल्पविद्या व रोहिण्यादि पांचशें महाविद्यांचें स्वरूप, सामर्थ्य, ह्यांचें साधन मंत्र, तंत्र, पूजाविधान आणि सिद्ध झालेल्या विद्यांच्या फलाचें आणि अंतरिक्ष, भौम, अंग, स्वर, स्वप्न, लक्षण, व्यंजन, छिन्न अशा आठ प्रकारच्या निमित्तज्ञानाचें वर्णन आहे.

११. कल्याणवादपूर्वाचीं सव्वीस कोटि पदें आहेत. त्यांत तीर्थंकर, चक्रधर, बलदेव, वासुदेव, प्रतिवासुदेव इत्यादिकांच्या गर्भकल्याणादि महान् उत्सवाचें व ह्या पदाला कारण सोळा भावना आणि तप विशेषाच्या आचरणादिकांचें, चंद्रमा, सूर्य, ग्रह, नक्षत्रांचें गमन, ग्रहण व शकुनादिकांच्या फलांच वर्णन आहे.

१२. प्राणप्रवादपूर्वाचीं तेरा कोटि पदें आहेत. त्यांत शरीराच्या चिकित्सेचें अष्टांग आयुर्वेद म्हणजे वैद्यशास्त्र, जांगलिका, इडा, पिंगलादिक श्वासोच्छ्वास आणि गतीच्या अनुसरानें दहा प्राणांच्या उपकारक अनुपकारक द्रव्यांचें वर्णन आहे.

१३. क्रियाविशाल पूर्वाचीं नऊ कोटि पदें आहेत. त्यांत संगीतशास्त्र, छंदःशास्त्र, अलंकारशास्त्र, बहात्तर कला, स्त्रियांचे चौसष्ट गुण, शिल्पशास्त्र, गर्भाधानादिक चौऱ्यांशी क्रिया, सम्यग्दर्शनादि एकशें आठ क्रिया आणि देववंदनादिक नित्यनैमित्तिक पंचवीस क्रियांचें वर्णन आहे.

१४. त्रिलोकबिंदुसार पूर्वाचीं साडेबाराकोटि पद आहेत. त्यांत त्रैलोक्याचें स्वरूप, सव्वीस परिकर्म, अष्ट व्यवहार, चार बीज, मोक्षस्वरूप, मोक्षगमनाचें कारण, क्रिया आणि मोक्षसुखाचें वर्णन आहे.

असें पंचाण्णव कोटि पन्नास लक्ष आणि पांच पदांमध्यें चौदा पूर्वांचें वर्णन केलें आहे.

आतां दृष्टिवाद अंगाचा पांचवा भेद जो चूलिका नांवचा आहे. त्याचे पांच भेद आहेत. प्रत्येक चूलिकेचीं दोन कोटि नऊ लक्ष एकोणनव्वद हजार दोनशें पदें आहेत.

१ जलगता चूलिकेंत जलाचें स्तंभन, जलामध्यें गमन, अग्नीचें स्तंभन, भक्षण, अग्नीवर आसन, अग्नींत प्रवेश, इत्यादींचें मंत्र तंत्र, तपश्चरण ह्यांचें वर्णन आहे.

२ स्थलगता चूलिकेंत मेरु कुलाचलादिक पर्वतावर व भूमींत प्रवेश करण्याचें, शीघ्र गमन करण्याचें कारण मंत्र, तंत्र व तपश्चरणाचें वर्णन आहे.

३ मायागता चूलिकेंत मायारूप इंद्रजालादिविक्रियांचें मंत्र, तंत्र, तपश्चरणादिकांचें वर्णन आहे.

४ आकाशगता चूलिकेंत आकाशगमनाचें कारण, मंत्र, तंत्र, तपश्चरणादिकांचें वर्णन आहे.

५ रूपगता चूलिकेंत सिंह, हत्ती, घोडा, मनुष्य, वृक्ष, हरिण, ससा, बैल, वाघ वगैरे रूप बदलण्याचें कारण, मंत्र, तंत्र व तपश्चरणाचें वर्णन आहे. तसेंच चित्रें, माती, पाषाण, लांकूड इत्यादि शिल्पकला, धातुवाद व रसवाद इत्यादिक क्रियांचें वर्णन आहे.

पांच चूलिकेचीं मिळून दहा कोटि एकोणपन्नास लाख शेहेचाळीस हजार पदें आहेत. व संपूर्ण द्वादशांग वाणीची एक उणे एकट्ठी प्रमाण अक्षरें आहेत. त्यांची संख्या १८४४६७४४०-७३७०९५५१६११५ इतकी अपुनरुक्त अक्षरें ( म्हणजे एकवेळ आलेलें पुनः येत नाहीं अशीं ) आहेत. त्यांत चौसष्ट संयोगी अक्षरें आहेत. मध्यमपदाचें प्रमाण सोळाशें चौतीसकोटि त्र्यांशीलक्ष सात हजार आठशें अठ्यांशी ( १६३४८३०७८८८ ) अपुनरुक्त अक्षरें आहेत. ह्या अक्षरांच्या प्रमाणाचा भाग एकट्ठी प्रमाणाला दिल्यानें एकशें बारा कोटि त्र्यायेंशी लक्ष अट्ठावन हजार पांच पदें येतात. इतक्या अक्षरांत समस्त द्वादशांग भरलेलें आहे. बाकीचीं अक्षरें आठ कोटि एक लक्ष आठ हजार एकशें पंचाहत्तर राहिलीं ( ८०१०८१७५ ). त्या अक्षराचें एक पद पूर्ण होत नाहीं म्हणून यांस अंगबाह्य म्हटलें. ह्या अक्षरांचीं सामायिकादि चौदा प्रकीर्णकें आहेत. तीं अशीं:—

१. सामायिक प्रकीर्णकांत मिथ्यात्व कषायादिकांच्या क्लेशांचा अभाव, नाम, स्थापना, द्रव्य, क्षेत्र, काल व भाव या सहा प्रकारानें कसा करावा याचें वर्णन आहे.

२. स्तवन नाम प्रकीर्णकांत चौतीस अतिशय, अष्ट प्रातिहार्य, परमौदारिक दिव्यदेह, समवसरण सभा, धर्मोपदेशादिकांनीं तीर्थंकराच्या माहात्म्याचा प्रकाश इत्यादिकांचें वर्णन आहे.

३. वंदना प्रकीर्णकांत एक तीर्थंकराचें, त्यांच्या चैत्यालयाचें व प्रतिमांच्या वंदनेचें वर्णन आहे.

४. प्रतिक्रमण नाम प्रकीर्णकांत पूर्वकृत प्रमादजनित दोषांच्या निराकरणासाठीं दैवसिक, रात्रिक, पाक्षिक, चातुर्मासिक सांवत्सरिक, ऐर्यापथिक व उत्तमार्थ अशा सात प्रकारच्या प्रतिक्रमणांचें वर्णन आहे.

५. विनय नाम प्रकीणकांत सम्यग्दर्शन, ज्ञान, चारित्र, तप, उपचार अशा पांच प्रकारच्या विनयांचें वर्णन आहे.

६. कृतकर्म प्रकीर्णकांत नऊ देवतांच्या वंदनेसाठीं तीन प्रदक्षिणा, चार शिरोनति, मनवचनकायत्रयांची शुद्धता व बारा आवर्त इत्यादि नित्य नैमित्तिक क्रियांचें वर्णन आहे.

७. दशवैकालिक प्रकीर्णकांत साधूंच्या आचाराला योग्य शुद्ध आहाराचें वर्णन आहे.

८. उत्तराध्ययन प्रकीर्णकांत चार प्रकारचे उपसर्ग, बावीस प्रकारचे परीषह सहन करण्याचीं विधानें आणि त्याच्या फलांचें वर्णन आहे.

९. कल्पव्यवहार नाम प्रकीर्णकांत साधूला योग्य आचरणाचें विधान आणि अयोग्य आचरणाचें प्रायश्चित्त सांगितलें आहे.

१०. कल्पाकल्प नाम प्रकीर्णकांत द्रव्य, क्षेत्र, काल, भावाच्या आश्रयानें साधूला हें योग्य आहे, हें अयोग्य आहे अशा विभागाचें वर्णन आहे.

११. महाकल्प नाम प्रकीर्णकांत उत्कृष्ट संहननादिकांनीं संयुक्त द्रव्य, क्षेत्र, काल, भावाच्या प्रभावानें उत्कृष्ट चर्येनें वागणाऱ्या जिनकल्पी साधूला योग्य जें त्रिकाल योगादि आचरण, आणि

स्थविरकल्पीमुनींची दीक्षा, शिक्षा, गणपोषण, आत्मसंस्कार, भावना आणि सल्लेखना ह्यांचें वर्णन आहे.

१२. पुंडरीक नाम प्रकीर्णकांत भवन, व्यंतर, ज्योतिष्क आणि कल्पवासीच्या विमानामध्यें उत्पत्तीचें कारण, दान, पूजा, तपश्चरण, अकामनिर्जरा, सम्यक्त्व, संयम इत्यादींचें विधान, त्यांचीं उत्पन्न होण्याचीं स्थानें आणि वैभव ह्यांचें वर्णन आहे.

१३. महापुंडरीक प्रकीर्णकांत महर्द्धिक देवांपैकीं इंद्र प्रतींद्रामध्यें उत्पन्न होण्याचें कारण आणि तपोविशेषादिकांचें वर्णन आहे.

१४. निषिद्धिका प्रकीर्णकांत प्रमादापासून उत्पन्न झालेल्या दोषांच्या त्यागाचें वर्णन आहे.

असें हें द्वादशांगरूपी सूत्राचें ज्ञान आहे तें तपाच्या प्रभावानें उत्पन्न होतें. हीं द्वादशांग सूत्रें जे स्वतः शिकतात व इतर शिष्यांना शिकवितात ते बहुश्रुत होत. त्यांची भक्ति करणें ती बहुश्रुतभक्ति होय. गुणांमध्यें अनुराग करणें त्याला भक्ति म्हणतात. आवडीनें शास्त्र शिकणें, शास्त्राचा अर्थ दुसऱ्याला सांगणें, द्रव्य खर्च करून शास्त्र लिहविणें, आपल्या हातानें शास्त्र लिहिणें, लिहिलेल्या शास्त्रांतील कानामात्रा, कमजास्त अक्षरें तपासणें, शिकणाराला शास्त्र लिहून देणें, व्याख्यान करणें, शिकविणाऱ्यांची व वाचणाऱ्यांची उपजीविका कायम करून देऊन शास्त्राच्या ज्ञानाभ्यासांत प्रवर्तन करविणें, स्वाध्याय करण्यासाठीं निराकुल स्थान देणें, हीं सर्व ज्ञानावरणीयकर्म नष्ट करणारी बहुश्रुतभक्तीच आहे. शास्त्र बांधण्यासाठीं उत्तम उंची किंमतींचीं बंधनें, पुठे, दोऱ्या देऊन त्यांत पुस्तकें बांधणें, हीहि बहुश्रुतभक्ति आहे. सुवर्णाच्या आणि पांच प्रकारच्या रत्नजडित पुष्पांनीं शास्त्राची पूजा करणें ही बहुश्रुतभक्तीच आहे. बहुश्रुतभक्तिपासून सम्यग्ज्ञान उत्पन्न होतें, आणि क्रमाक्रमानें केवळ ज्ञान प्राप्त होतें. जो पुरुष आपलें मन इंद्रियविषयांपासून आवरून पुनः पुनः श्रुतदेवीचे गुण स्मरण करण्यांत गुंतवितो, आणि उत्तम प्रकारचा पवित्र अर्घ्य श्रुतदेवीला अर्पण करितो तो समस्त शास्त्रांत पारंगत होऊन केवलज्ञान प्राप्त करून घेऊन मोक्षाला जातो. ह्याप्रमाणें बहुश्रुतभक्ति नांवाच्या बाराव्या भावनेचें वर्णन केलें.

## १३ प्रवचनभक्ति.

आतां प्रवचनभक्ति नांवची तेरावी भावना सांगतात. प्रवचन म्हणजे जिनेंद्र सर्वज्ञ वीतरागांनीं प्ररूपण केलेला आगम होय. त्यामध्यें षट्द्रव्य, पंचास्तिकाय, सप्ततत्त्व व नऊ पदार्थांचें वर्णन असून कर्माच्या प्रकृतीचा नाश करण्याचें वर्णन आहे. ज्याचे प्रदेश पुष्कळ असतात त्याला अस्तिकाय म्हणतात. ज्यांत गुण व पर्याय सतत होतात त्यास द्रव्य म्हणतात. एक वस्तु म्हणून ज्याचा निश्चय करतां येतो त्याला पदार्थ म्हणतात. वस्तूंतील स्वभावाला तत्त्व ही संज्ञा आहे. यांचें विशेष वर्णन पुढें प्रसंगानुसार होईल. अंधार असलेल्या घरांत हातांत दिवा घेऊन सगळे पदार्थ पहावे लागतात तसें त्रैलोक्यरूपी मंदिरांत प्रवचनरूप दिव्याच्या सहाय्यानें लहान मोठे मूर्तिक, अमूर्तिक पदार्थ समजतात. प्रवचनरूपी डोळ्यांनींच मुनीश्वर हे चेतनादि गुणांचे धारक जे जीवद्रव्य आणि अचेतन अशीं बाकीचीं

प्रवचनाचें लक्षण

द्रव्यें पाहूत असतात. जिनेंद्राचा परमागम योग्यवेळीं विनयानें वाचणें ह्यास प्रवचनभक्ति म्हणतात.

प्रवचनामध्यें सहा द्रव्यें, सात तत्त्वें, नऊ पदार्थ त्यांचे भेद आणि त्यांच्या समस्त गुणपर्यायाचें वर्णन आहे; तसेंच नरकांच्या सात पृथ्वी, नारकी जीवांच्या उत्पत्तीच्या आणि राहण्याच्या जागा, त्यांचें आयुष्य, शरीरवेदना, गति वगैरेचें वर्णन आहे. अनंत भूत, भविष्य अन् वर्तमान कालांत घडून येणाऱ्या अवस्थांचें वर्णन आहे. अधोलोकांतील भवनवासी देवांचे सात कोटि बाहात्तर लाख भवनांचें, त्यांचें आयुष्य, शरीर, वैभव, क्रिया, भोग इत्यादिकांचें वर्णन आहे. मध्यलोकासंबंधीं असंख्यात द्वीपसमुद्र, मेरू, कुलाचल, नदी, ऱ्हद इत्यादिकांचें व कर्मभूमीच्या विदेहादि क्षेत्रांचें, भोगभूमीचें, शहाण्णव अंतरद्वीपसंबंधी मनुष्यांचें, कर्मभूमि भोगभूमींतील मनुष्यांच्या कर्तव्याचें, त्यांचें आयुष्य, शरीर, सुखदुःख वगैरेचें व तिर्यंचाचें आणि व्यंतराचें निवास, वैभव, परिवार, आयुष्य, शरीर, सामर्थ्य, विक्रिया ह्यांचें वर्णन आहे. मध्यलोकांत जोतिषी देव आहेत. त्यांचें विमान, वैभव, परिवार, आयुष्य, शरीर आणि सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रांच्या गतींचें व संयोगादिकांचें वर्णन आहे. उर्ध्वलोकांतील त्रेसष्ट पटलांचें, स्वर्गांतील अहमिंद्राच्या पटलांचें, व इंद्रादिक देवांच्या वैभव, परिवार, आयुष्य, शरीर, शक्ति, गति, सुखदुःखादिकाचें वर्णन आहे. ह्याप्रमाणें सर्वज्ञांनीं प्रत्यक्ष पाहिलेल्या त्रैलोक्यवर्ती समस्त द्रव्यांचें प्रवचनांमध्यें वर्णन आहे.

प्रवचनांतील वर्णितविषय.

*जीवाला कर्माच्या प्रकृतीचा बंध होणें, त्या उदयास येणें, त्यांचें सत्तेंत असणें, त्यांचें संक्रमण होणें* ह्यांचें संपूर्ण वर्णन आगमांत आहे. संसारांतून उद्धार करणारें जें रत्नत्रय तें प्राप्त होण्याचा उपाय परमागमांत सांगितला आहे. गृहस्थपणांतील श्रावकधर्माची जघन्य मध्यम, उत्कृष्टचर्या आणि श्रावकाच्या व्रत संयमादिक व्यवहार, परमार्थरूप प्रवृत्तीचें वर्णन हें प्रवचनापासून समजतें. मुनीचें महाव्रतादि अठ्ठावीस मूळगुण आणि चौऱ्यांशी लाख उत्तरगुण, स्वाध्याय, ध्यान, आहार, विहार, सामायिक वगैरे चारित्र, धर्मध्यान, शुक्लध्यान, सल्लेखना वगैरेचें सर्व वर्णन प्रवचनांतच आहे. चौदा गुणस्थानांचें स्वरूप, चौदा जीवसमासांचें आणि चौदा मार्गणांचें वर्णन प्रवचनांतून समजावें लागतें. जीवांची एकशें साडेनव्याण्णव–लक्ष कोटी कुलें आणि चौऱ्यांशी लाख जातीच्या योनिस्थानांचें वर्णन प्रवचनांतून जाणलें जातें. चार अनुयोग, चार शिक्षाव्रतें, तीन गुणव्रतें हीं आगमापासूनच माहीत होतात. चार गतीचे भेद, सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र, ह्यांचें स्वरूप भगवंतांनीं सांगितलेल्या आगमापासून समजण्यांत येतें. बारा भावना, बारा प्रकारचीं तपें, अकरा अंगें, चौदा पूर्व, चौदा प्रकीर्णकें ह्यांचें स्वरूप प्रवचनापासून जाणलें जातें. उत्सर्पिणी अवसर्पिणी कालाचें चक्र आणि त्यांतील सहा सहा प्रकारांत होणाऱ्या पदार्थांच्या अवस्थांचे भेद आगमापासूनच समजतात. कुलंकर, तीर्थंकर, चक्रवर्ती, बलदेव, वासुदेव, प्रतिवासुदेव इत्यादिकांची

गृहस्थधर्म व क्रियाकर्म प्रकृतीचें वर्णन

उत्पत्ति, प्रवृत्ति, धर्मतीर्थाचें प्रवर्तन, चक्रवर्तीचें साम्राज्य, वासुदेवादिकांचें वैभव, परिवार, ऐश्वर्यादिक हे आगमापासूनच जाणण्यांत येतात. जीवादिक द्रव्यांचा प्रभाव आगमापासूनच जाणला जातो. तेव्हां अशा ह्या आगमाच्या भक्तिपूर्वक सेवेशिवाय हा मनुष्यजन्म पशुसमान आहे.

भगवान् सर्वज्ञ वीतरागांनीं समस्त लोक अलोकाला अनंतानंत भूत, भविष्य, वर्तमान कालच्या पर्यायासहित एका समयांत युगपत् क्रमरहित हातांतील रेषासारखें प्रत्यक्ष पाहिलें आणि जाणलें आणि त्यांनीं प्ररूपण केलेल्या स्वरूपाला सप्तऋद्धि आणि चार ज्ञानधारी गणधर देवांनीं जाणून द्वादशांगरूपी रचना केली. श्रीऋषभनाथ तीर्थंकरापासून चोविसाव्या महावीर तीर्थंकरापर्यंत असा क्रम चालत आला आहे. शेवटचे चोविसावें तीर्थंकर श्रीवर्धमानस्वामी देवाधिदेव, परमपूज्य धर्मतीर्थाचे प्रवर्तक, अनंतदर्शन, अनंतज्ञान, अनंतसुख आणि अनंतवीर्यरूपी अंतरंग लक्ष्मीनें आणि समवसरणादि बाह्य लक्ष्मीनें मंडित आहेत. इंद्रादिक असंख्यात देवांच्या समूहाकडून वंदनीय, चौतीस अतिशय, अष्टप्रातिहार्य इत्यादि अनुपम ऋद्धींनीं युक्त, क्षुधातृषादि अठरा दोषरहित, संपूर्ण जीवांवर उपकार करणारे, लोकअलोकाच्या अनंत गुणपर्यायाला युगपत् जाणणारे, अनंतशक्तिमान्, संसारांत बुडणाऱ्या प्राण्याला हस्तावलंबन देणारे, समस्त प्राण्यांवर दया करणारे आहेत. परमात्मा, परमेश्वर, परब्रह्म, परमेष्ठी, स्वयंभू, शिव, अजर, अमर, अरिहंतादि नांवानें विख्यात आहेत. शरणरहिताला परमशरण, शेवटल्या परमादारिक शरीरांत राहणारे, गणधरादि मुनीश्वरांकडून वंदनीय आहेत. त्यांच्या मुखांतून निघणारा दिव्यध्वनि कंठ, तालु, ओष्ठ, जिह्वा ह्यांचें हलनचलन न होतां निघतो. तो त्यांच्या इच्छेवांचून अनेक प्राण्यांच्या पुण्यप्रभावानें निघणारा, आर्य अनार्य अशा सर्व देशांतील लोकांना समजणारा, संपूर्ण पातकांचा नाश करणारा व भव्य जीवाच्या मोहांधकाराला दूर करणारा असा असतो. ज्यांच्या मस्तकावर तीन छत्रें आहेत, बाजूला चौसष्ट चामरें ढळत आहेत, जे रत्नमयी सिंहासनावर चार बोटें अधर बसले आहेत, असे परमपूज्य भगवान् देवाधिदेव वर्धमान तीर्थंकर ह्यांनीं मोक्षमार्गाचा प्रकाश करण्यासाठीं संपूर्ण पदार्थांचें स्वरूप आपल्या सातिशय दिव्यध्वनीमध्यें प्रगट केलें. त्यावेळीं जवळ असलेले, निर्ग्रंथ ऋषीश्वरांकडून वंदनीय, सप्तऋद्धीचे आणि चार ज्ञानाचे धारक असे गणधर देव ह्यांनीं आपल्या कोष्ठबुद्धी आदि ऋद्धींच्या प्रभावानें भगवंतांनीं सांगितलेल्या अर्थाला न विसरतां, तो अर्थ लक्षांत ठेवून द्वादशांगरूपी आगमाची रचना केली. चतुर्थ काळाचें तीन वर्षें साडे आठ महिने बाकी राहिले त्यावेळीं श्रीवर्धमानस्वामी निर्वाण पावले.

आदिप्रभूची परंपरा

नंतर गौतमस्वामी, सुधर्माचार्य, जंबूस्वामी, असे तीन केवलज्ञानी बासष्ट वर्षांत झाले. त्यांनीं केवलज्ञानानें संपूर्ण पदार्थांना जाणून निरूपण केलें. त्यानंतर अनुक्रमानें विष्णु, नंदिमित्र, अपराजित, गोवर्धन, भद्रबाहु असे पांच मुनि द्वादशांगाचे धारक श्रुतकेवली शंभर वर्षांत झाले. ह्यांच्या वेळीं भगवान् केवलीप्रमाणेंच पदार्थांचें ज्ञान आणि निरूपण चालू राहिलें. नंतर एकशें त्र्याऐंशी वर्षांत विशाखाचार्य, प्रोष्ठिलाचार्य, क्षत्रिय, जयसेन, नागसेन, सिद्धार्थ, धृतिषेण, विजय, बुद्धि-

गणधर व आचार्य परंपरा

मान्, गंगदेव, धर्मसेन असे अकरा परमनिर्ग्रंथ मुनीश्वर दहापूर्वज्ञानाचे धारक झाले. त्यांनींही तशीच प्ररूपणा केली. पुढें दोनशें वीस वर्षांत नक्षत्र, जयपाल, पांडु, ध्रुवसेन, कंसाचार्य असे पांच महामुनि एकादशांगविद्येचे पारगामी झाले. त्यांनींही यथावत् प्ररूपणा केली. नंतर एकशें अठरा वर्षेपर्यंत सुभद्र, यशोभद्र, भद्रबाहु, महायश, आणि लोहाचार्य असे पांच महामुनि एका–प्रथम अंगाचे पारगामी झाले.ह्याप्रमाणें भगवान महावीरस्वामी मोक्षास गेल्यानंतर सहाशें त्र्याऐंशी वर्षेपर्यंत अंगपाठाचें ज्ञान राहिलें. पुढें कालाच्या प्रभावानें बुद्धिवीर्यादिक मंद झाल्यामुळें अंगपाठाचें ज्ञान नष्ट झालें. नंतर श्रीकुंदकुंदादि अनेक निर्ग्रंथ वीतरागी मुनि एका अंगाच्या अनेक विभागांचे ज्ञानी झाले. नंतर उमास्वामी झाले. असे हे पापापासून भयभीत, ज्ञानविज्ञानसंपन्न, परम संयमगुणानें मंडित, गुरूंच्या परिपाटीनें श्रुताच्या अव्युच्छिन्न अर्थाला धारण करणाऱ्या वीतरागी मुनींची परंपरा चालत आली आहे.

श्रीकुंदकुंदस्वामींनीं समयसार, प्रवचनसार, पंचास्तिकाय, नियमसार, रयणसार, अष्टपाहुड इत्यादिक अनेक ग्रंथ रचले. ते हल्लीं वाचण्यांत येत आहेत. ह्या ग्रंथांचें जें विनयपूर्वक आराधन करणें ही प्रवचनभक्ति होय. श्री उमास्वामींनीं तत्त्वार्थसूत्र दहा अध्यायांचें रचिलें. त्यावर सर्वार्थसिद्धि नांवची टीका पूज्यपादस्वामींनीं रचिली व राजवार्तिक नांवचा सोळा हजार श्लोकांचा ग्रंथ श्री अकलंकस्वामींनीं रचिला व श्लोकवार्तिक नांवचा वीसहजार श्लोकांचा ग्रंथ श्रीविद्यानंदिस्वामींनीं रचिला. ह्याच तत्त्वार्थसूत्रावर श्रीसमंतभद्रस्वामींनीं चौऱ्यांशी हजार श्लोकांचा गंधहस्तिमहाभाष्य नांवचा ग्रंथ रचिला ( जो हल्लीं सांपडत नाहीं ). ह्या गंधहस्तिमहाभाष्याचें प्रथमारंभीं मंगलाचरण एकशें पंधरा श्लोकांचें देवागमस्तोत्र नांवचें त्यांनीं केलेलें आहे. त्यावर आठशें श्लोकांची टीका अष्टशती नांवची श्री अकलंकस्वामींनीं रचिली. ह्या देवागम अष्टशतीवर आप्तमीमांसा जिला अष्टसहस्री म्हणतात, ती आठहजार श्लोकांची टीका श्रीविद्यानंदिस्वामींनीं रचिली. त्या अष्टसहस्री ग्रंथावर सोळाहजार श्लोकाचं टिपण लघुसमंतभद्रांनीं केलें आहे. विद्यानंदिस्वामींनीं आप्तपरीक्षा नांवचा तीनहजार श्लोकांचा ग्रंथ रचला आहे. माणिक्यनंदीस्वामींनीं परीक्षामुख ग्रंथ रचला. त्यावरील मोठी टीका प्रभाचंद्राचार्यकृत प्रमेयकमलमार्तंड नांवची बारा हजार श्लोकांची आहे, आणि धाकटी टीका प्रमेयरत्नमाला नांवची अनंतवीर्य आचार्यांनीं रचलेली आहे. अकलंक देवकृत लघुत्रयीवर न्यायकुमुदचंद्रोदय नांवचा सोळाहजार श्लोकांचा ग्रंथ प्रभाचंद्र आचार्यांनीं रचला. तसेंच आणखी कित्येक न्यायाचे ग्रंथ प्रमाणपरीक्षा, प्रमाणनिर्णय, प्रमाणमीमांसा, न्यायदीपिका इत्यादि जिनधर्माचे आधार ग्रंथ आहेत. त्यांत प्रमाणांनीं निर्णय केलेल्या पदार्थांचें अनेकांतस्वरूप वर्णन केलें आहे. ते सर्व द्रव्यानुयोगाचे ग्रंथ जयवंत असोत.

आचार्यप्रणीत ग्रंथपरंपरा

करणानुयोगाचे ग्रंथ गोम्मटसार, लब्धिसार, क्षपणासार, त्रिलोकसार इत्यादि अनेक ग्रंथ आहेत. चरणानुयोगाचे ग्रंथ मूलाचार, आचारसार, रत्नकरंडश्रावकाचार, भगवतीआराधना, स्वामीकार्तिके-

पानुप्रेक्षा, आत्मानुशासन, पद्मनंदिपंचविंशति इत्यादि ग्रंथ आहेत. प्रथमानुयोगाचे ग्रंथ जिनसेनाचार्यकृत आदिपुराण, गुणभद्राचार्यकृत उत्तरपुराण वगैरे जिनेंद्राच्या परमागमानुसार लिहिलेले ग्रंथ आहेत. तसेंच पूज्यपादाचार्यांचा जैनेंद्र व्याकरण हा अपूर्व ग्रंथ आहे. ह्या सर्व ग्रंथांचें स्वाध्याय व मनन करणें, भक्तिपुरःसर वाचणें, ऐकणें, व्याख्यान करणें, नमस्कार करणें, लिहिणें, लिहविणें, शोधणें ही सर्व प्रवचनभक्ति आहे.

प्रवचनाच्या अभ्यासाचें फल.

वरील शास्त्रांच्या अभ्यासामध्यें गेला तो दिवस धन्य समजावा. परमागमाच्या अभ्यासावांचून काळ जाईल तो व्यर्थ आहे. स्वाध्यायावांचून शुभध्यान होत नाहीं. स्वाध्यायावांचून धर्माचें ज्ञान होत नाहीं व कषाय मंद होत नाहींत. शास्त्रचिंतनावांचून संसार–देह-भोगापासून विरक्तता होत नाहीं. संपूर्ण व्यवहाराची उज्ज्वलता आणि परमार्थविचार आगमाच्या अभ्यासानेंच होतो. आगमाच्या अभ्यासानें जगामध्यें मान्यता, उच्चता, निर्मलयश, आदरसत्कार हे प्राप्त होतात. सम्यग्ज्ञान हा परमबंधु आहे, उत्कृष्ट धन आहे, परम मित्र आहे. सम्यग्ज्ञानच अविनाशी धन आहे. स्वदेशांत, परदेशांत, सुखावस्थेंत, दुःखावस्थेंत, संपत्तींत, विपत्तींत परम शरणभूत सम्यग्ज्ञानच आहे. स्वाधीन आणि अविनाशी धन ज्ञानच आहे. म्हणून आगमांतील अर्थाचा अभ्यास नेहमीं करावा. आपल्या आत्म्याला निरंतर ज्ञान–दान करा. आपल्या मुलाबाळांना आणि इतर मुलांना ज्ञानदानच करा. कोट्यवधि संपत्ति ज्ञानधनाची बरोबरी करूं शकत नाहीं. धन हें गर्व उत्पन्न करणारें आहे; विषयामध्यें गुंतविणारें आहे; दुर्ध्यान उत्पन्न करणारें आहे; संसाररूपी अंधकूपांत बुडविणारें आहे. ज्ञानदानापासून हा कोणताही दोष उत्पन्न होत नाहीं. म्हणून ज्ञानदानासारखें दुसरें दान नाहीं. दररोज एक श्लोक किंवा अर्धा श्लोक अथवा एक पदाचा नित्य अभ्यास केला तर कांहीं दिवसांनीं तो शास्त्रार्थामध्यें पारंगत होईल. विद्या ही मोठी देवता आहे. जे आईबाप आपल्या मुलांमुलींना ज्ञानाभ्यास करवितात, ते त्यास कोट्यावधि रुपयांच्या दौलतीपेक्षांही अधिक दौलत देतात. सम्यग्ज्ञान देणारे जे गुरु आहेत त्यांच्या सारखे उपकार करणारे ह्या त्रैलोक्यांत दुसरे कोणी नाहींत. ज्ञान देणाऱ्या गुरूचा जो उपकार मानीत नाहीं त्याच्यासारखा कृतघ्नी व पापी दुसरा नाहीं. ज्ञानाच्या अभ्यासावांचून व्यवहार परमार्थ दोन्हीही साधत नाहींत. म्हणून प्रवचनभक्ति हीच कल्याण करणारी आहे. प्रवचनभक्ति ही हजारो दोष नाहींसे करणारी आहे, ह्यासाठीं हिचा भक्तिपूर्वक अर्घ्य उतरा. ह्यापासूनच सम्यग्दर्शन उज्ज्वळ होईल.

ह्याप्रमाणें प्रवचनभक्ति नांवच्या तेराव्या भावनेचें वर्णन केलें.

## १४ आवश्यकापरिहाणि.

आतां आवश्यकापरिहाणि नांवच्या चौदाव्या भावनेचें वर्णन करतात. अवश्य करण्यायोग्य

ज्या क्रिया त्याला आवश्यक म्हणतात.आवश्यकाची हानि न करण्याचें जें चिंतन त्याला आवश्यकापरि-हाणि भावना म्हणतात. अथवा इंद्रियाला वश नसणारे जे अवश म्हणजे मुनि त्यांची जी क्रिया ती आवश्यक क्रिया होय. ही आवश्यक क्रिया सहा प्रकारची आहे. १ सामायिक, २ स्तवन, ३ वंदना, ४ प्रतिक्रमण, ५ प्रत्याख्यान, आणि ६ कायोत्सर्ग.

मुनीच्या सहा आवश्यक क्रिया

१. सामायिक म्हणजे साम्यभाव. सुंदर अथवा कुरूप वस्तूंमध्यें रागद्वेष करूं नये. शुभ किंवा अशुभ कर्मांच्या उदयामध्यें हर्षविषाद करूं नये. आहार वसतिकादिक मिळाले अथवा न मिळाले तरी साम्यभाव ठेवावा. स्तुति किंवा निंदा, आदर किंवा तिरस्कार, रत्न अथवा पाषाण, जीवन अथवा मरण, मित्र किंवा शत्रू, सुख किंवा दुःख, महाल अथवा स्मशान ह्यांविषयीं रागद्वेषरहित परिणाम होणें ह्यास समभाव किंवा सामायिक म्हणतात. जे साम्यभावाला धारण करितात ते बाह्य जडपदार्थांला आपणाहून भिन्न समजतात व ते आपल्या स्वभावांत कोणताही विकार उत्पन्न करण्यास समर्थ नाहींत असें समजून त्याविषयीं रागद्वेष सोडून देतात. आपण शुद्ध ज्ञाता द्रष्टा आहोंत असें मानतात. शरीराहून भिन्न ज्ञान हाच आपला देह आहे असें मानून कर्मरहित चैतन्य स्वरूपी शुद्ध जीवाचेंच एकाग्रतेनें ध्यान करितात. तेच सर्वोत्कृष्ट निर्वाणपदाला प्राप्त होतात. अशा निर्वि-कल्प आत्मगुणांमध्यें आपलें मन स्थिर होत नसेल तर ह्या सहा आवश्यक क्रियांमध्यें मन गुंतवून ज्या योगानें वरील साम्यभाव प्राप्त होईल असा प्रयत्न करणें हें सामायिक होय.

सामायिक

२. स्तवन म्हणजे भगवान् सर्वज्ञाची अनेक नांवांनीं स्तुति करणें. हें स्तवन नांवचें आव-श्यक आहे. जसें, "हे प्रभो! आपण कर्मरूपी वैऱ्याला जिंकिलें म्हणून आपण जिन आहांत. आपल्या स्वरूपांतच सदैव राहता म्हणून स्वयंभू आहांत. केवलज्ञानरूप नेत्रांनीं त्रिकालवर्ती पदार्थाला जाणतां म्हणून त्रिलोचन आहांत. मोहरूपी अंधासुराला मारलें त्यामुळें अंधकान्तक आहांत. घातियकर्मरूपी अर्ध-वैऱ्याचा नाश करून अद्वितीय ईश्वरपणा प्राप्त करून घेतला त्यामुळें अर्धनारीश्वर आहांत. शिवपद म्हणजे निर्वाणपदामध्यें वास करतां म्हणून आपण शिव आहांत. पापरूपी वैऱ्याचा संहार करता म्हणून आपणास आम्ही हर म्हणतों.लोकांचें कल्याण करणारे आहांत म्हणून आपण शंकर. शं म्हणजे परमानंदरूपी सुख, त्यांत उत्पन्न झालांत म्हणून आपण शंभव आहांत. वृष म्हणजे धर्म त्यायोगानें आपण शोभतां म्हणून आपण वृषभ आहांत. जगांतील सर्व प्राण्यापेक्षां गुणांनीं श्रेष्ठ आहांत म्हणून आपण जगज्ज्येष्ठ आहांत. कं म्हणजे सुख, त्यानें आपण संपूर्ण जीवांचें पालन केलें म्हणून आपण कपाली आहांत. केवल ज्ञानानें संपूर्ण लोकालोकांला व्यापून आहांत म्हणून आपण विष्णु आहांत. जन्म, जरा, मरणरूपी त्रिपुराला आपण मारलें त्यामुळें आपण त्रिपुरान्तक आहांत."

स्तवन

याप्रमाणें एक हजार आठ नांवांनीं इंद्रानें आपलें स्तवन केलें आहे. गुणांच्या अपेक्षेनें आपलीं अनंत नांवें आहेत. तीं मनांत आणून स्तवन करणें हें स्तवन नांवाचें आवश्यक आहे.

३. चोवीस-तीर्थंकरांतील एका तीर्थंकराची, किंवा अरिहंत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय, सर्व साधु ह्यांतून एकाची मुख्यत्वानें स्तुति करणें हें वंदना आवश्यक आहे.

वंदना.

४. प्रतिक्रमण—दिवसभर रागद्वेषांच्या वश होऊन अथवा विषयांवरील अत्यंत आसक्तीमुळें एकेंद्रियादिक जीवांचा घात केला असेल, निरर्थक प्रवर्तन केलें असेल, सदोष भोजन केलें असेल, कोण्या जीवाचे प्राण पीडित केले असतील, कर्कश, कठोर, मिथ्याभाषण केलें असेल, अथवा स्त्रीकथा, भोजनकथा, चोरकथा, राजकथा केल्या असतील, अदत्त धनग्रहण केलें असेल, परक्याच्या धनावर लालसा ठेवली असेल, परस्त्रीची इच्छा केली असेल, धन परिग्रहावरची लालसा ठेवली असेल, तर तें सगळें मीं वाईट केलें, पाप केलें. आतां त्याबद्दल मला पश्चात्ताप होत आहे म्हणून ते माझे दोष नाहींसे होवोत. पंचपरमेष्ठीच्या प्रसादानें पुनः माझे परिणाम पापरूप न होवोत, असें मुखानें बोलून आपलें भाव शुद्ध होण्यासाठीं कायोत्सर्ग करून, पंच नमस्काराचे नऊ जप करावेत. ह्याप्रमाणें दिवसभर झालेल्या प्रवृत्तीचें संध्याकाळीं चिंतन करून पापपरिणामाची निंदा करणें हें दैवसिक प्रतिक्रमण आहे.

दोषांचा पश्चात्ताप करावा.

२. रात्रीसंबंधीं पापाला दूर करण्यासाठीं सकाळीं प्रतिक्रमण करणें तें रात्रिक प्रतिक्रमण म्हणावें.

३. रस्त्यानें चालतांना दोष लागले असतील त्यांच्या शुद्धीचें जें प्रतिक्रमण त्याला ऐर्यापथिक प्रतिक्रमण म्हणतात.

४. पंधरवड्यांतील दोषनिराकरण करणें तें पाक्षिक प्रतिक्रमण होय.

५. चार महिन्यांचे दोष निराकरण करण्यासाठीं जें प्रतिक्रमण तें चातुर्मासिक प्रतिक्रमण होय.

६. एक वर्षाचे दोष निराकरण करण्यासाठीं प्रतिक्रमण करणें तें सांवत्सरिक प्रतिक्रमण होय.

७. सगळ्या आयुष्यभर घडलेल्या दोषांचें निराकरण करण्यास्तव शेवटीं संन्यासमरणाचे पूर्वीं जें प्रतिक्रमण करणें तें उत्तमार्थ प्रतिक्रमण आहे.

असें सात प्रकारचें प्रतिक्रमण आहे. यांतून गृहस्थांनीं आपल्या हातून दिवसभर आणि रात्रभर जें कांहीं चांगलें वाईट झालें ह्याचा सकाळ संध्याकाळ विचार केला पाहिजे. शेंपन्नास रुपयांचा व्यवहार करणारे गृहस्थ देखील संध्याकाळीं आपल्या नफानुकसानीचा हिशोब पाहतात, मग ह्या अत्यंत दुर्लभ अशा मनुष्य जन्माची एक घटका देखील गेलेली पुनः मिळत नाहीं त्याचा आपण काय विनियोग केला हें अवश्य तपासलेंच पाहिजे. आज परमेष्ठींचें पूजन, स्तवन करण्यांत माझा किती वेळ गेला? स्वाध्याय करण्यांत किती गेला? जप करण्यांत, शास्त्रश्रवण करण्यांत,

तत्त्वार्थाची चर्चा करण्यांत,धर्मात्म्यांचें वैयावृत्त्य करण्यांत किती वेळ गेला ? आणि घरच्या आरंभ प्रपंचांत, विषयभोगांत, कषायांत, विकथा करण्यांत, विसंवादांत, खाण्यापिण्यांत, झोपेंत, आळसांत, शरीर शृंगारण्यांत आणि हिंसादिक पांचपातकांत किती वेळ गेला ह्याचा विचार करावा. जर पापकर्मांत अधिक प्रवृत्ति झाली असेल तर आपला धिक्कार करून पापबंधाचीं कारणें नाहींशी करावी व धर्मकार्यांमध्यें आपले परिणाम लावावे. पंचम काळांत प्रतिक्रमण हाच आत्मशुद्धीचा मार्ग आहे.

५. प्रत्याख्यानः—म्हणजे यापुढें मी असलें पाप, मन, वचन, कायेनें करणार नाहीं अशी प्रतिज्ञा करणें ह्यास प्रत्याख्यान नांवचें आवश्यक म्हणतात.

६. कायोत्सर्गः— चार बोटांच्या अंतरानें दोन्ही पाय सारखे ठेऊन उभे राहणें, दोन्ही हात लांब सोडणें, शरीरावरील ममत्व सोडून नाकाच्या अग्रभागीं दृष्टि लावणें, शरीरापासून आत्मा वेगळा आहे अशी भावना करणें ह्याला कायोत्सर्ग म्हणतात. हें पद्मासनानें अथवा उभे राहूनही होतें. दोन्ही आसनांत शुभध्यान असलें म्हणजे तें सफल आहे.

हीं सहा आवश्यकें परम धर्मस्वरूपाचीं द्योतक आहेत म्हणून यांची पूजा करून पुष्पांजली टाकावी आणि अर्घ्य उतरावा.

१ या आवश्यकाचे परमागमांत सहा प्रकार सांगितलें आहेत. ते असे– नाम १, स्थापना २, द्रव्य ३, क्षेत्र ४, काल ५ आणि भाव ६.

शुभ अशुभ नांवें ऐकून रागद्वेष न करणें हें नामसामायिक म्हणावें १. एखादी स्थापना ( मूर्तीचा आकार ) प्रमाणबद्ध असल्यानें सुंदर व एखादी अप्रमाणबद्ध हीनाधिक असल्यामुळें असुंदर असेल त्याविषयीं रागद्वेषाचा अभाव तें स्थापना सामायिक होय २. सोनें, रुपें, रत्न, मोती इत्यादिक मौल्यवान वस्तूंमध्यें आणि माती, लांकूड, दगड, कांटे, क्षार, राख, इत्यादिकांकडे रागद्वेषरहित दृष्टीनें पाहणें हें द्रव्यसामायिक आहे ३. महाल, बगीचा वगैरे रमणीय पदार्थांविषयीं आणि श्मशानादिक नावडत्या वस्तूंविषयीं रागद्वेष न करणें ह्याला क्षेत्रसामायिक म्हणतात ४. हिम, शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत् ह्या ऋतूंविषयीं आणि रात्रि, दिवस, कृष्णपक्ष, इत्यादि शुक्लपक्ष कालाविषयीं रागद्वेष सोडणें हें कालसामायिक होय ५. आणि समस्त प्राण्याला दुःख न होवो असा मैत्रीभाव ठेवणें हें भावसामायिक आहे ६. असें सहा प्रकारचें सामायिक सांगितलें आहे.

नामसामायिकाचे प्रकार.

२. स्तवनाचे सहा प्रकारः– चोवीस तीर्थंकराच्या एक हजार आठ नांवचें अर्थासह स्तवन करणें ह्यास नामस्तवन म्हणतात१. कृत्रिमअकृत्रिम चैत्यालयांतील अरिहंताच्या प्रतिबिंबाचें स्तवन करणें तें स्थापनास्तवन होय २. समवसरणांतील प्रभुच्या देहाचें, कांतीचें, त्यांच्या प्रतिहार्यादिकांचें स्तवन करणें हें द्रव्यस्तवन आहे ३. कैलास, संमेदशिखर, गिरनार, पावापुरी, चंपापुरी वगैरे निर्वाण क्षेत्राचें आणि समवसरणांतील धर्मोपदेशाच्या क्षेत्रांचें स्तवन करणें हें क्षेत्रस्तवन आहे ४. तीर्थंकराचें स्वर्गावतरण, जन्म, तप,

स्तवनाचे प्रकार.

ज्ञान, निर्वाण ह्या कालांचें स्तवन करणें हें कालस्तवन आहे ५. आणि केवलज्ञानादि अनंतचतुष्टय भावाचें स्तवन करणें तें भावस्तवन आहे ६. असें सहा प्रकारचें स्तवन-सामायिक सांगितलें.

वंदनाः- तीर्थंकर अथवा सिद्ध, आचार्य, उपाध्याय, साधू ह्यांपैकीं एकाच्या नांवाचा उच्चार करून वंदना करणें ही नामवंदना होय १. अरहंत, सिद्ध. आचार्यादिकांतील एकाच्या प्रतिबिंबाची वंदना करणें ती स्थापना वंदना म्हणावी २. त्यांच्या शरीराची वंदना करणें ती द्रव्य वंदना आहे ३. अरिहंत, सिद्ध, आचार्यादिकांनीं व्याप्त अशा क्षेत्राची वंदना करणें क्षेत्रवंदना होय ४. त्याच पंचपरमेष्टींतून कोणत्याहि जन्म दीक्षादिकांच्या कालापैकी एका कालाची वंदना करणें ती कालवंदना होय ५. तीर्थंकर, सिद्ध, आचार्य, उपाध्याय, किंवा साधु यांपैकीं एकाच्या आत्मगुणांची वंदना करणें ती भाववंदना म्हणावी ६. अशी सहा प्रकारची वंदना समजावी.

वंदनेचे प्रकार

४. सहा प्रकारचें प्रतिक्रमण :— अयोग्य नाम उच्चारण केल्यानें कृत—कारित-अनुमोदनरूपी मन वचन कायेपासून उत्पन्न झालेल्या दोषांचें निराकरण करण्यासाठीं प्रतिक्रमण करणें हें नाम प्रतिक्रमण आहे १. एखाद्या शुभ अशुभ स्थापनेच्या निमित्तानें मन वचन कायेकडून घडलेल्या दोषांपासून आत्म्याला निवृत्त करणें हें स्थापना प्रतिक्रमण आहे २. द्रव्य म्हणजे आहार, पुस्तक, औषधादिक देण्याच्या निमित्तानें मन वचन कायेपासून उत्पन्न झालेल्या दोषांचें निराकरण करणें द्रव्यप्रतिक्रमण आहे ३. क्षेत्रांत गमनस्थानादिकांच्या निमित्तानें उत्पन्न झालेल्या अशुभ परिणामाच्या दोषांचें निराकरण करणें क्षेत्र प्रतिक्रमण आहे ४. दिवस, रात्रि, पक्ष, ऋतु, शीत, उष्ण, वर्षाकाल ह्यांच्या निमित्तानें उत्पन्न झालेले अतिचार दूर करण्यासाठीं प्रतिक्रमण करणें तें कालप्रतिक्रमण होय ५. आणि रागद्वेषादि भावापासून उत्पन्न झालेले दोष दूर करण्यासाठीं जें प्रतिक्रमण तें भावप्रतिक्रमण आहे ६. असें सहा प्रकारचें प्रतिक्रमण समजावें.

प्रतिक्रमणाचे प्रकार.

५. आतां सहा प्रकारचें प्रत्याख्यान सांगतात. अयोग्य पातकाच्या नांवाचें उच्चारण करण्याचा त्याग करणें तें नाम-प्रत्याख्यान आहे १. अयोग्य मिथ्यात्वादिकांची प्रवृत्ति करणाऱ्या स्थापनेचा त्याग करणें तें स्थापना-प्रत्याख्यान म्हणावें २. पापबंधाला कारण जें सदोष द्रव्यग्रहणाचा व तपासाठीं निर्दोष द्रव्यग्रहणाचा मन वचन कायेनें त्याग करणें तें द्रव्यप्रत्याख्यान आहे ३. असंयमाला कारण अशा क्षेत्राचा त्याग करणें तें क्षेत्रप्रत्याख्यान म्हणावें ४. असंयमाला कारण अशा कालाचा त्याग करणें तें कालप्रत्याख्यान म्हणावें ५. आणि मिथ्यात्व, असंयम कषायादिकांचा त्याग करणें तें भावप्रत्याख्यान म्हणावें असें सहा प्रकारचें प्रत्याख्यान सांगितलें.

प्रत्याख्यानाचे प्रकार

६. आतां सहा प्रकारचें कायोत्सर्ग सांगतात. पापाला कारण जे कठोर व कटु नामादिका-

पासून उत्पन्न झालेले दोष दूर करण्यासाठीं कायोत्सर्ग करणें तो नामकायोत्सर्ग आहे १. पापरूपी स्थापनेच्या द्वारांनीं आलेले अतिचार दूर करण्यासाठीं कायोत्सर्ग करणें तो स्थापना कायोत्सर्ग आहे २. सदोष द्रव्याच्या सेवनानें व सदोष क्षेत्र, कालाच्या संयोगानें उत्पन्न झालेले दोष दूर करण्यास्तव जो कायोत्सर्ग करणें तो द्रव्य, क्षेत्र व काल कायोत्सर्ग आहे. ३, ४, ५, आणि मिथ्यात्व असंयमादिक भावापासून उत्पन्न झालेल्या दोषांचें निराकरण करण्यासाठीं जो कायोत्सर्ग करणें तो भावकायोत्सर्ग म्हणावा ६ असे सहा प्रकारचे भावकायोत्सर्ग सांगितले.

कायोत्सर्गाचे प्रकार

येणेंप्रमाणें सहा सहा प्रकारचीं सहा आवश्यकें वर्णिलीं.

आतां गृहस्थाचीं आणखी सहा प्रकारचीं आवश्यकें आहेत तीं अशी. १ भगवान् जिनेंद्राचें नित्य पूजन करणें, २ निर्ग्रंथ गुरूंचें सेवन, स्तवन, चिंतन नित्य करणें, ३ जिनेंद्रांनीं प्ररूपण केलेल्या आगमाचा नित्य स्वाध्याय करणें, ४ इंद्रियाच्या विषयाला रोकणें व षट्काय जीवांची दया पाळणें, ५ शक्तिप्रमाणें नित्य तप करणें आणि शक्तिप्रमाणें नित्यदान देणें ६ हीं सहा प्रकारचीं आवश्यकें गृहस्थांनीं नित्यशः पाळणें अवश्य आहे.

गृहस्थाचे सहा आवश्यक

अशी ही समस्त पापाला नाश करणारी आणि आपले विचार उज्ज्वल करणारी आवश्यकापरिहाणि नांवची चौदावी भावना वर्णिली.

## १५ मार्गप्रभावना.

आतां मार्गप्रभावना नांवची पंधरावी भावना सांगतात.

येथें मार्ग म्हणजे मोक्षाचा जो सत्यार्थ मार्ग त्याचा प्रभाव प्रकट करणें ती मार्गप्रभावना म्हणावी. तो मार्ग रत्नत्रयात्मक आहे. रत्नत्रय हा आत्म्याचा स्वभाव आहे. तो मिथ्यात्व, रागद्वेष, काम, क्रोध, मान, माया, लोभ ह्यांनीं अनादिकालापासून मलिन आणि विपरीत केला आहे. आतां मला परमागमाचें ज्ञान झालें आहे त्याअर्थी मी मिथ्यात्वादिक दोष दूर करून माझ्या रत्नत्रय स्वभावाला निर्मल करतो. मला हा मनुष्यजन्म, इंद्रियाची पूर्णता, ज्ञानशक्ति, परमागमाचें सहाय्य, धार्मिकांचा समागम, आरोग्य, निर्बाध उपजीविका इत्यादि पुण्यरूप सामग्री प्राप्त झाली असून जर मी आपल्या आत्म्याला मिथ्यात्व आणि विषयकषायापासून सोडविलें नाहीं तर अनंतानंत दुःखानें भरलेल्या संसार-समुद्रांतून माझी सुटका अनंत काळांतही होणार नाहीं. हल्लीं जी सामग्री मिळाली आहे ती पुनः मिळणें फार कठिण आहे. तेव्हां ही अंतरंग बहिरंग दोन्ही प्रकारची सामग्री मिळाली असून जर मी आत्म्याचा प्रभाव प्रकट केला नाहीं, तर अकस्मात् काल येऊन हा सगळा संयोग नाहींसा करील. यासाठीं रागद्वेष, मोह यांना दूर करून ज्यायोगानें माझें शुद्ध वीतरागस्वरूप प्रत्ययास येईल, अशा रीतीनें मीं ध्यान स्वाध्यायामध्यें तत्पर झालें पाहिजे. मीं आपली बाह्य वर्तणूकही शुद्ध ठेवून अंतर्गत धर्माचा प्रभाव प्रकट करून मार्गप्रभावना केली पाहिजे. ती मार्गप्रभावना पाहून अनेक

रत्नत्रय प्राप्ति

मनुष्यांच्या हृदयांत धर्ममाहात्म्याचा प्रकाश पडावा.

जिनेंद्र-जन्माभिषेकाचा उत्सव असा करावा कीं, तो पाहून हजारो लोकांना असें वाटावें कीं, इंद्रादिक देवांनीं भगवंताचा अभिषेक करून आपला जन्म सफल केला तसा जयजयकार शब्दांनीं हजारो स्तवनांचा उच्चार करून आपणही कृतार्थ व्हावें. जिनेंद्राचें अत्यंत भक्तीनें व विनयानें ध्यान करून असें पूजन करा कीं, तें पाहून आणि तुमच्या वाणीचे पाठ ऐकून हर्षाचे अंकुर प्रकट होऊन इतरांच्या हृदयांतील आनंद बाहेर उतू जावा. मिथ्यादृष्टीच्या मुखांतून सहजरीत्या आश्चर्यजनित उद्गार निघावेत कीं, "केवढी ही जैनांची भक्ति! किती ही उत्तम व स्वच्छ सामग्री! सोन्यारुप्याचीं आणि तांब्यापितळेचीं पूजेचीं भांडीं तरी किती शोभिवंत! पाठ म्हणतात तो तरी किती शुद्ध आणि भक्तिरसानें भरलेला! त्यांतील अर्थ तरी किती बोधप्रद! एकाग्रचित्तानें बहुमूल्य शुद्ध पदार्थ देवाला निष्कामबुद्धीनें समर्पण करण्याची पद्धति तरी किती सुरेख! देवाची मूर्ति किती तरी शांत! रागद्वेषरहित उत्कृष्ट वैराग्याची आणि ध्यानाची मुद्रा मूर्तीमध्यें कशी स्पष्ट दिसत आहे! प्रातिहार्य किती मोठें वैभव दाखवीत आहेत! धन्य असो त्या पुरुषांना कीं, ज्यांच्या हातून असें पूजन घडतें! धन्य त्यांची भक्ति! जे कोणतीही आशा न धरतां आपलें द्रव्य अशा कामांत खर्च करतात! त्यांचा जन्म धन्य आहे."

अभिषेकोत्सव

भक्ति ही संसारसमुद्रांत बुडणाऱ्याला हात देऊन काढणारी आहे. आम्हाला जन्मोजन्मीं जिनेंद्रभक्तीचेंच शरण असो. असें जिनेंद्राचें नित्य पूजन करावें. अष्टाह्निक पर्वांत, षोडशकारण, दशलक्षण, रत्नत्रय वगैरे पर्वांत पापारंभ सोडून जिनपूजन करावें. आनंदानें नृत्य करावें. कानाला गोड अशीं वाद्यें वाजवावीं. तालसुरावर जिनेंद्राचे गुण गावेत. ही सर्व मार्गप्रभावना आहे. ज्यांच्या हृदयांत सत्य धर्माचें वात्सल्य आहे त्यांनाच अशी प्रभावना घडते.

पूजनानें प्रभावना

जिनेंद्रांनीं सांगितलेल्या चार अनुयोगांच्या सिद्धांताचें असें व्याख्यान करावें कीं, तें ऐकणाराचा एकांतमताचा हट्ट नाहींसा होऊन त्यांच्या हृदयांत अनेकांत ठसावा. त्यानीं पातकाला पाहून थरथर कांपावें. त्यांचीं दुर्व्यसनें सुटावींत, दयाधर्माकडे त्यांची प्रवृत्ति व्हावी. अभक्ष्य भक्षण सुटावें. हजारो मनुष्यांचें मिथ्यात्व नाहींसें व्हावें. कुदेव, कुगुरु, कुधर्म आराधना सुटावी आणि वीतराग देव, दयारूप धर्म, आरंभ व परिग्रहरहित गुरु ह्यांच्या आराधनेकडे त्याचें दृढ श्रद्धान व्हावें. रात्रिभोजन, अयोग्य भोजन, अन्याय, विषयभोग, परधन हरण इत्यादि गोष्टींवरील प्रीति सोडून व्रत, शील, संयम, संतोष ह्यांमध्यें लीन होतील व आत्मा शरीरादिक परद्रव्यापासून वेगळा आहे हें त्यांच्या अनुभवास येईल असा उपदेश करावा. जीव अजीवादिक पदार्थांचा प्रमाणनयनिक्षेपांनीं निर्णय करून द्रव्यगुणपर्यायाचें यथार्थ स्वरूप समजावून सांगून त्यांचा मिथ्या अंधकार दूर करावा. अशा आगमाच्या व्याख्यानांनीं सन्मार्गाची प्रभावना होते.

उपदेशानें प्रभावना

इतरानें न होण्यासारखें असें बिकट तपश्चरण केल्यानेंही मार्गप्रभावना होते. कारण विषयानुराग सोडून निर्वांछक झाल्यानें आत्म्याचा प्रभाव प्रगट होतो आणि धर्माचा मार्गही तपानें शोभतो. तपश्चरण हें दुर्गतीचा नाश करणारें आहे. तपाशिवाय कामादिक विषय हे ज्ञानाला आणि चारित्राला नष्ट करून टाकतात. तपाच्या प्रभावानें कामविकाराचा क्षय होऊन रसनेंद्रियाची लालसा नाहींशी होते म्हणून रत्नत्रयाची प्रभावना तपश्चरणानें दृढ होते.

तपानें प्रभावना

जिनेंद्राच्या प्रतिबिंबाची प्रतिष्ठा करणें, जिनेंद्राचें मंदिर बांधविणें, ह्यापासूनही मार्गप्रभावना होते. कारण प्रतिष्ठा करविल्यानें जोपर्यंत जिनबिंब राहील तोपर्यंत दर्शन, स्तवन, पूजनादिक करून अनेक भव्यजीव पुण्य उपार्जन करतील. जे गृहस्थ जिनमंदिर करवितील त्यांचें धन यामुळें सफल होतें. जिनमंदिर असल्यानें तेथें पूजन, रात्रिजागरण, शास्त्राचें व्याख्यान, श्रवण, पठण, जिनेंद्राचें स्तवन, सामायिक, प्रतिक्रमण, अनशनादिक तप, नृत्य, गायन, भजन, उत्सव हे होत असतात. जिनमंदिर नसलें तर हीं धर्माचीं कार्यें होत नाहींत. तेव्हां या बाबतींत जास्त काय सांगावें ? मंदिर बांधविणें आणि प्रतिष्ठा करविणें हें आपल्यावर आणि इतरांवर उपकार करण्याचें मूळ आहे.

मंदिरानें प्रभावना

धर्माचा उत्कृष्ट मार्ग म्हटला तर संपूर्ण परिग्रह सोडून वीतरागपणा अंगीकारणें हाच होय. परंतु ज्यांना प्रत्याख्यान अप्रत्याख्यान नांवच्या कषायाचा उपशम झाला नाहीं व त्यामुळें घरदाराच्या संपत्तीचा मोह सोडवत नाहीं, त्यांनीं आपल्यापाशीं संपत्ति पुष्कळ असल्यास ज्याचें धन आपण अन्यायमार्गानें घेतलें असेल त्याजवळ जाऊन त्याची क्षमा मागून त्याचें धन त्याला परत द्यावें. तें परत दिल्यानंतरही जर पुष्कळ धन आपल्यापाशीं असलें तर नवीन धन उत्पन्न करण्याचा त्याग करावा. तीव्रराग वाढविणाऱ्या इंद्रियविषयांवरील लालसा सोडून संवर धारण करावा आणि जें धन आपल्यापाशीं आहे त्यांतून आपले बंधुजन, मुली, बहिणी, आत्या, मित्र, हितेच्छुक यांस व जे निर्धन, रोगी, दुःखी, अनाथ, विधवा असतील त्यांस यथायोग्य देऊन संतुष्ट करावें. तसेंच आपलें आश्रित व चाकर नौकर व आपल्या जवळ बसणारे त्यांनाही यथायोग्य संतुष्ट करून पुत्र, स्त्री यांचे हिस्से असतील ते वेगळे ठेवून जें द्रव्य शिल्लक राहील त्यांतून जिनबिंबाची प्रतिष्ठा करविण्यांत आणि जिनेंद्रधर्माचे आधारभूत सिद्धांत लिहिविण्यामध्यें कृपणता सोडून, उदार मनानें दुसऱ्यावर उपकार करावा. याप्रमाणें जे आपल्या धनाचा विनियोग करतात त्यासारखी दुसरी प्रभावना नाहीं. जे मंदिरप्रतिष्ठा करवितात परंतु अनीतीचें आणि अन्यायाचें धन ग्रहण करतात त्यांची सगळी प्रभावना व्यर्थ होते. प्रतिष्ठा करविणारा आणि जिनमंदिर बांधविणारा खोटा व्यापार व्यवहार करीत राहून हिंसादिक पातकामध्यें, निंद्य आणि अयोग्य भाषण करण्यामध्यें, तीव्र लोभामध्यें व व्यभिचार करण्यांत खंत मानीत नसेल, तर त्याची सगळी प्रभावना व्यर्थ होईल. तसेंच खर्च करतांना कृपणतेमुळें तळमळ करीत

त्यागानें प्रभावना

असेल तर त्याचीही प्रभावना निरर्थक होईल. ह्यासाठीं मंदिर बांधविणारा किंवा प्रतिष्ठा करविणारा ह्यांची बाह्य प्रवृत्ति शुद्ध असेल तरच तो धर्माची प्रभावना करूं शकेल. मंदिरावर शिखर बांधणें, त्यावर कळस चढविणें, देवळांत घांट बांधणें, चांदवा बांधणें, सिंहासनादि उत्तम उपकरणें देणें, स्वाध्यायाची प्रवृत्ति करणें, इत्यादिपासूनही प्रभावना होते.

शुद्धाचरणानें प्रभावना.

प्रभावना शुद्ध आचरणानें होते. तेव्हां जो जिनवचनाचा श्रद्धानी असतो तो धर्माची प्रभावनाच करीत असतो. जैन लोकांचा दृढ निश्चय पाहून मिथ्यादृष्टी लोकांनाही जैन धर्माचे मोठें माहात्म्य वाटूं लागतें. ते म्हणतात–"पहा जैन लोकांचा धर्म, प्राण गेला तरी ते अभक्ष्य भक्षण करीत नाहींत; तीव्र रोगाच्या वेदना झाल्या तरी रात्रीं औषधपाणी देखील घेत नाहींत; धन अभिमानादि गेले तरी असत्य भाषण करीत नाहींत; मोठें संकट आलें तरी परधनावर लोभ ठेवित नाहींत; आपला प्राण गेला तरी अन्य प्राण्यांचा घात करीत नाहींत." याप्रमाणें अन्यधर्मी माणसानेंही आश्चर्य करण्यासारखें आचरण ठेवणें ही मार्गप्रभावना आहे. दृढपणें शील पाळणें, परिग्रहाचें प्रमाण ठेवणें, आणि परमसंतोष धारण करण, ह्यापासून आत्मप्रभावना आणि मार्गप्रभावना अशा दोन्ही प्रभावना होतात. तेव्हां सगळें धन गेलें किंवा प्राण गेला तरी आपल्या निमित्तानें धर्माची निंदा किंवा उपहास होऊं देऊं नये ही पण मार्गप्रभावना आहे. मार्गप्रभावनेचें माहात्म्य वर्णन कोटि-जिह्वांनीं करण्यास कोणी समर्थ नाहीं. ह्यासाठीं हे भव्य जीवहो, त्रैलोक्यांत पूज्य असें जें प्रभावना अंग धारण करा. ह्याची भक्तिपुरःसर पूजा करा आणि ह्याला महान अर्घ्य उतरा. याप्रमाणें जे प्रभावना अंग धारण करतात ते इंद्रादिक देवांकडून पूज्य असें तीर्थंकरपद प्राप्त करून घेतात. अशी मार्गप्रभावना नांवची पंधरावी भावना वर्णिली.

## १६ प्रवचनवत्सलत्व.

आतां प्रवचनवत्सलत्व नांवची शेवटची सोळावी भावना सांगतात.

वात्सल्य कोणावर करावें.

प्रवचन म्हणजे देव, गुरु आणि धर्म ह्यांविषयीं जें वात्सल्य म्हणजे प्रीति त्याला प्रवचन-वत्सलत्व म्हणतात. जे चारित्रगुणांनीं युक्त, शीलवान, परमसाम्यभावाचे धारक, बावीस परीषह सहन करणारे, देहावरील ममता सोडलेले, संपूर्ण विषयांची इच्छा नाहींशी करणारे, आत्महित तत्पर, दुसऱ्यावर उपकार करण्यांत सावधान असे जे साधुपुरुष आहेत त्यांच्या गुणांविषयीं आदर व प्रीति करणें वात्सल्य होय. अणुव्रतें पाळणारे, पापाला भिणारे, न्यायमार्गी, धर्मानुरागी, मंदकषायी व संतोषी असे श्रावक आणि श्राविका ह्यांच्या गुणांवर प्रीति ठेवणें हेंही वात्सल्य आहे. स्त्रीपर्यायांत व्रतांतील शेवटची मर्यादा गांठून, सर्व परिग्रह सोडून, कुटुंबांवरील व स्वतःच्या देहावरील मोह सोडतात, पंचेंद्रियांच्या विषयांचा त्याग करून एक वस्त्र मात्र परिग्रह ठेवतात, भूमीवर शयन करून, क्षुधा, तृषा, शीत, उष्णादि परीषह सहन करतात, संयम, ध्यान, स्वाध्याय, सामायिकादिक आवश्यक क्रियेमध्यें तत्पर असणाऱ्या ज्या आर्यिका, त्यांच्या गुणांवर अनुराग करणें हा वात्सल्यभाव आहे. मुनीश्वरासारखें वनामध्यें

राहून बावीस परीषह सहन करतात, उत्तम क्षमादि धर्मांचे धारक बनून देहावरील ममत्व सोडतात, आपल्यासाठीं केलेलें औषध व अन्नपान ग्रहण करीत नाहींत, एका लंगोटी शिवाय बाकी सर्व परिग्रहांचा त्याग करतात, असे जे अकराव्या प्रतिमेचे उत्तम श्रावक, त्यांच्या गुणाविषयीं जो अनुराग, तेंही वात्सल्य होय. तसेंच अव्रतसम्यग्दृष्टी म्हणजे जे देव, गुरु आणि धर्म ह्यांचें सत्यार्थ स्वरूप समजून त्यावर दृढ श्रद्धा ठेवतात त्याविषयीं प्रीति असणें हेंही वात्सल्य आहे.

संसारामध्यें अनादिकालापासून आपल्या स्त्री, पुत्र, कुटुंबादिकांवर, शरीरावर, इंद्रियांच्या विषयांवर, व ते विषय मिळवून देणारांवर, अत्यंत प्रेम करून यांच्यासाठींच स्वतः मरण्यास व इतरांना मारण्यास तयार होतात. तिर्यंच देखील आपल्या संततिसाठीं भांडून मरतात व दुसऱ्याला मारतात. असें मोहाचें अद्भुत महात्म्य आहे. जे पुरुष सम्यग्ज्ञानानें मोहाला नाहींसें करून आत्म्याच्या गुणांवर प्रीति करतात ते धन्य होत. संसारी मनुष्यें द्रव्यप्राप्तिसाठीं अतिशय तळमळ करीत धर्मावरील प्रेम सोडून देतात. जसजसें त्यांचें धन वाढत जातें तसतशी त्यांची तृष्णाही वाढत जाते आणि मग ते धर्माचा मार्ग विसरून धर्मात्मा जीवांचें वात्सल्य करणें सोडून देतात. रात्रंदिवस धनसंपत्ती वाढविण्यांतच गढून गेल्यानें अशी स्थिति होते. लाख रुपयांचें धन जवळ झालें म्हणजे कोट रुपयांची इच्छा होते व ती पूर्ण होण्यासाठीं अनेक आरंभ परिग्रह वाढवावे लागतात. पापपुण्यकर्मांचा विचार राहात नाहीं त्यामुळें धर्मावरील प्रीति अजीबात नाहींशी होते. परोपकारामध्यें धन खर्च करण्याची बुद्धि होत नाहीं. बहु आरंभ, बहु परिग्रह, अतितृष्णा, ह्यामुळें नजीक येऊन ठेपलेला नरकवास त्याला दिसत नाहीं. त्यांतही या पंचम कालांतील धनाढ्य लोकांकडे दृष्टि दिली म्हणजे वाटतें कीं, पूर्वीं यांनीं मिथ्याधर्म, कुपात्रदान आणि कुदान दिल्यानेंच त्यांचें तन, मन, धन, धर्मकार्यांत लागत नाहीं. रात्रंदिवस तृष्णा आणि आरंभ ह्यांतच त्यांचें आयुष्य निघून जातें. अशांना धर्मवान् पुरुषाविषयीं किंवा स्वतः धर्म धारण करण्याविषयीं कशी आवड होणार? हे लोक धार्मिक परंतु धनहीन माणसाला हलके मानतात. ह्यावरून ह्यांची नरकतिर्यंच गतींत फिरण्याची मर्यादा असंख्यात कालपर्यंत सुटणार नाहीं असें समजलें पाहिजे.

लोभी जीवांना वात्सल्य नसतें

हे आत्महिताचे वांछक हो, धनसंपदा ही महान् मद उत्पन्न करणारी आहे; हा देह क्षणभंगुर आणि दुःखदायी आहे; कुटुंब हें महान् बंधन आहे असें समजून त्यांच्यावरील प्रीति सोडून आपल्या आत्म्यावर प्रीति करा. धर्मात्म्यामध्यें, व्रती पुरुषामध्यें, स्वाध्यायामध्यें, जिनपूजनामध्यें वात्सल्य करा. सम्यक्चारित्ररूपी आभरणांनीं भूषित अशा साधु जनांचें जें स्तवन व गौरव करितात त्यांचा हा वात्सल्य गुण सुगतीला प्राप्त करून देतो. वात्सल्य गुणाच्या प्रभावानेंच द्वादशांग विद्या सिद्ध होते. कारण सिद्धांतसूत्रामध्यें आणि सिद्धांताचा उपदेश करणाऱ्या उपाध्यायामध्यें खरी भक्ति असल्यानें श्रुतज्ञानावरणीय कर्माचा रस नाहींसा होतो. तेव्हां सकल विद्या सिद्ध होतात.

स्वतःवर प्रीति करा

वात्सल्य गुणाच्या धारकाला देव नमस्कार करतात. अठरा प्रकारची बुद्धि, आठ प्रकारची ऋद्धि, दोन प्रकारची आकाशगामिनी विद्या, अनेक प्रकारची चारणऋद्धि, तीन प्रकारची बलऋद्धि, सात प्रकारची तपऋद्धि, सहा प्रकारची रसऋद्धि, सहा प्रकारची औषधऋद्धि, दोन प्रकारची क्षेत्रऋद्धि इत्यादिक अनेक ऋद्धि प्रकट होतात. येथें ऋद्धीचें वर्णन लिहिल्यानें ग्रंथ वाढेल म्हणून लिहिलें नाहीं. तें अर्थप्रकाशिकादि ग्रंथांतून पाहावें. वात्सल्याच्या योगानें मंदबुद्धी जीवाचें मतिज्ञान व श्रुतज्ञान वाढूं लागतें. वात्सल्याच्या प्रभावानें पापाचा प्रवेश होत नाहीं. वात्सल्यानें तपश्चरणाला शोभा येते. हा जिनेंद्रधर्म वात्सल्यानेंच शोभायमान होतो व शुभध्यान वाढूं लागतें. वात्सल्यानेंच सम्यग्दर्शन निर्दोष होतें. वात्सल्यानेंच दान दिलेलें कृतार्थ होतें. पात्रावर प्रीति नसतांना दिललें दान निंदेला कारण होतें.

वात्सल्यानें ऋद्धि प्राप्त होतात

जिनवाणीविषयीं प्रीति ठेवणाऱ्या पुरुषाला शास्त्राचा खरा अर्थ समजतो. ज्याची जिनवाणीवर प्रीति नाहीं व ज्याला विनय नाहीं त्याला खरा अर्थ समजणार नाहीं. तो त्याचा विपरीत अर्थच करील. मनुष्यजन्माचें भूषण वात्सल्यच आहे. वात्सल्यावांचून मोठीं मनोहर आभूषणें व वस्त्रें नेसलीं तरी त्याची काय थोरवी? इहलोकीचें कार्य जें कीर्ति-संपादन करणें, धर्म उपार्जन करणें, धन कमविणें हें सगळें वात्सल्य अंगानेंच होतें. परलोकीं स्वर्ग प्राप्त होणें, महर्द्धिक देवपणा मिळणें हेंही वात्सल्य गुणानेंच होतें. वात्सल्यावांचून इहलोकींचीं सर्व सुखें रूक्ष वाटूं लागतात. परलोकीं देवादिक गति प्राप्त होत नाहीं. अरिहंत देव, निर्ग्रंथ गुरु, स्याद्वादरूप परमागम, दयारूपी धर्म ह्यांविषयीं मनांत वात्सल्य असलें तरच संसारपरिभ्रमणाचा नाश होऊन मोक्षप्राप्ति होते. जिनमंदिराची सेवा, जिन-सिद्धांताचा अभ्यास, साधर्मी माणसाचें वैयावृत्य, धर्मावर अनुराग, दान देण्यामध्यें प्रीति, हे सगळे गुण वात्स-ल्यानें प्राप्त होतात. ज्यांनीं षट्काय जीवाविषयीं वात्सल्य धारण केलें आहे त्यांनीं त्रैलोक्यांतील उत्कृष्ट अशी तीर्थंकर-प्रकृति प्राप्त करून घेतली. ह्यासाठीं ज्यांना आपलें कल्याण करून घेण्याची इच्छा आहे त्यांनीं भगवान् जिनेश्वरांनीं सांगितलेल्या वात्सल्य गुणाचा महिमा समजून घेऊन त्याचें स्तवन करावें, पूजन करावें. आणि त्याचा महान् अर्घ्य उतरावा. ह्या योगानें सम्यग्दर्शन शुद्ध होऊन तपश्चरणानें अहमिंद्रादि देवगति प्राप्त होईल. नंतर जगाचा उद्धार करणारें तीर्थंकरपद मिळून निर्वाण प्राप्त होईल. ह्याप्रमाणें प्रवचन-वत्सलत्व नांवची सोळावी भावना वर्णिली.

वात्सल्य गुणापासून लाभ

———:•:———

## दशलाक्षणिकधर्म.

यापुढें धर्माचें स्वरूप सांगतात. धर्म हा दशलक्षण–स्वरूपाचा आहे. या स्वरूपावरून आत्म्याच्या अंतर्गत स्वभावाची ओळख पटते. उत्तम क्षमा, उत्तम मार्दव, उत्तम आर्जव, उत्तम सत्य, उत्तम शौच, उत्तम संयम, उत्तम तप, उत्तम त्याग, उत्तम आकिंचन्य आणि उत्तम ब्रह्मचर्य हीं धर्माचीं दहा लक्षणें आहेत. धर्म म्हणजे पदार्थाचा मूल स्वभाव. जगांतील सर्व पदार्थ आपला स्वभाव कधींही सोडीत नाहींत. पदार्थांतील स्वभावाचा नाश होतो असें मानलें तर पदार्थाचाच अभाव मानणें भाग पडेल म्हणून तसें मानतां येत नाहीं. आत्म्याचा मूल स्वभाव क्षमामार्दवादि लक्षणांनीं युक्त आहे. त्याच्याठिकाणीं क्रोधादिक विकारांचें प्राबल्य दिसून येतें तीं कर्मजनित उपाधि होय. या उपाधिमुळें मूळ स्वभावावर आवरण पडतें व तो मूळ स्वभावांत दिसेनासा होतो. क्रोधादिकांचा अभाव झाला म्हणजे तो प्रकट होतो. उदाहरणार्थः– क्रोध नष्ट झाला म्हणजे क्षमा, मानाच्या अभावानें मार्दव, मायेच्या ( कपटाच्या ) अभावानें आर्जव, लोभाच्या अभावानें शौच वगैरे आत्म्याचे सर्व गुण त्या त्या विकाराच्या अभावीं प्रगट होतात. म्हणूनच आत्म्याला क्षमादि दशलक्षणस्वरूपाचा म्हटलें आहे. मोहनीय कर्माचे क्रोधलोभादिक कषाय हे भेद आहेत. त्यांनी अनादिकालापासून आत्मा आच्छादिलेला आहे. म्हणजे कषायाचा अभाव झाला कीं त्याचें स्वाभाविक मूल स्वरूप प्रगट होतें.

याप्रमाणें आत्म्याच्या दशलाक्षणिक स्वभावाचें संक्षिप्त वर्णन करून यापुढें प्रत्येक धर्माचें सविस्तर स्वरूप सांगतात.

### क्षमा.

आत्म्याच्या स्वाभाविक गुणापैकीं पहिला गुण क्षमा आहे. आत्म्यांत उत्पन्न होणाऱ्या क्रोध-रूपीं विकाराला नाहींसें करणें म्हणजे क्षमा गुण प्रगट करणें होय. क्रोधापासून आत्म्यांत निरंतर वास करणाऱ्या संतोष, संयम, निराकुलता वगैरे गुणांचा नाश होतो व

क्रोधाचे दुष्परिणाम

त्यामुळें त्याची जगांत अपकीर्ति होते.क्रोधामुळें ज्यास कार्याकार्य विचार राहात नाहीं त्याला आपल्या मनवचनकायेच्या क्रिया स्वाधीन ठेवण्याचें सामर्थ्य नसतें. पुष्कळ दिवसाचें प्रेमाचें नातें असलें तरी तो एका क्षणांत नाहींसें करून टाकतो. तो सर्वांचा मोठा शत्रु बनतो. त्याला सत्यासत्य भाषण करण्याचा विचार राहात नाहीं. तो नीच लोकांना देखील न शोभणारी भाषा आपल्या मुखावाटें बोलूं लागतो. त्याला धर्माधर्माचा विचार राहात नाहीं. तो रागाच्या आवेशांत आपल्या बापाचा, भावाचा, मुलाचा, बायकोचा, धन्याचा, चाकराचा व प्रत्यक्ष जन्म देणाऱ्या मातेचा देखील खून करण्यास प्रवृत्त होतो. एवढेंच नव्हे तर तो स्वतःच विहीरींत पडून प्राण गमावून बसतो. थोडक्यांत त्याला कोणतीच शुद्धि राहत नाहीं. म्हणून क्रोधी पुरुष वेळेवर काय करील याचा चांगल्या लोकांस भरंवसा वाटत नसल्यामुळें ते त्यापासून फटकूनच राहतात. क्रोधी पुरुषाला यमराजाची उपमा देण्यांत येते ती विचारांतीं यथार्थच वाटते.

दुसऱ्या तऱ्हेनें क्रोधी पुरुषाचें काय नुकसान होतें तें पहा. प्रथमतः त्याच्या ज्ञानदर्शनादि आत्मिक गुणांचा घात होतो. क्रोधाच्या तडाख्यांत सांपडल्यानें महान् तपस्वी दिगंबर मुनि धर्मभ्रष्ट होऊन नरकाला गेले आहेत. क्रोधामुळें अत्यंत तीव्र पापबंध होऊन नरकवास भोगावा लागतो. बुद्धिभ्रष्ट होऊन मनुष्य निर्दयी बनतो. परोपकाराचा विसर पडून कृतघ्नता पदरीं येते म्हणून मनुष्यमात्रानें क्रोधाला भयंकर शत्रु जाणून त्यापासून आपण दूर राहण्याचा अवश्य प्रयत्न करावा. क्रोधापासून आत्मघातासारखें भयंकर पाप घडतें हें जाणून हा विकार आपल्यांत उत्पन्न होऊं न देण्याचा जीवापाड प्रयत्न करीत राहावें.

पुण्यवान् लोकांनाच क्षमा-गुण धारण करण्याची सद्‌बुद्धि उत्पन्न होते. क्षमा हें नांव संस्कृत भाषेंत पृथ्वीला दिलेलें आहे. पृथ्वी आपल्यावर होणारे आघात सहन करीत असते. सर्व प्राणीमात्राची धडपड जरी पृथ्वीच्या पाठीवर चाललेली आहे व त्यापासून पृथ्वीला अपरिमित त्रास होत आहे तरी ती सर्व सहन करतेच ना! याचप्रमाणें जे लोक पर-पदार्थापासून होणारे अनेक प्रकारचे त्रास सहन करतात त्यांनाच क्षमा हा गुण प्राप्त होतो. स्वतः प्रतीकार करण्याचें सामर्थ्य असूनही जे इतरांनीं दिलेला उपसर्ग स्वहितासाठीं सहन करितात त्यांच्याच सहनशीलतेला उत्तम क्षमा म्हणावें. एरवीं आपल्या लौकिकाकरितां, द्रव्य-प्राप्तिकरितां किंवा दुसऱ्या कोणत्याही हेतूनें दुसऱ्याचा उपद्रव सोसणाऱ्या व्यक्ति जगांत दिसून येतात, पण त्यांनीं धर्माकरितां क्षमा धारण केली आहे असें नव्हे. मूळ मुद्दा रागद्वेषरहित होऊन आत्म्याचा यथार्थ स्वभाव प्रगट करण्याकडे आहे म्हणून क्षमेच्यामागें मुद्दाम 'उत्तम' हें विशेषण दिलेलें आहे. याशिवाय 'उत्तम' विशेषणाचा दुसराही हेतु असा आहे कीं, ती क्षमा सम्यग्ज्ञानपूर्वक असली पाहिजे. अशा प्रकारची उत्तम क्षमा अंगीं असणें हें त्रैलोक्याचें सार अंगीं असण्यासारखें आहे. हीच क्षमा जीवांना संसार समुद्रांतून तारून नेण्यास समर्थ आहे. उत्तम क्षमेंत रत्नत्रयाचा समावेश झालेला असतो म्हणून त्यास दुर्गतींतील दुःख भोगण्याचा प्रसंग येत नाहीं. क्षमा धारण करणाऱ्या पुरुषाला नरकगति व तिर्यंच गतीला जावें लागत नाहीं. ही एक उत्तम क्षमा अंगीं असली तर त्याबरोबर अनेक गुणांचा प्रादुर्भाव होतो. दिगंबर मुनींचा क्षमा हा प्राण आहे. उत्तम क्षमेचा लाभ होणें म्हणजे चिंतामणि रत्नाचा लाभ होणें असे ज्ञानी लोक समजतात. उत्तम क्षमा अंगीं असल्यानें मन अतिशय शुद्ध राहतें. क्षमेशिवाय मनाची स्थिरता व उज्ज्वलता राहणें शक्य नाहीं. सारांश, सर्व मनोरथाची सिद्धि एका उत्तम क्षमेपासून होते म्हणून ती धारण करण्याचा सर्वांनीं प्रयत्न करावा.

उत्तमक्षमेचें लक्षण

प्रसंगानुसार याठिकाणीं क्रोध उत्पन्न झाला असतां तो कसा जिंकावा, त्यावेळीं मनांत कोणते विचार आणावे हें सांगितलें असतां वावगें होणार नाहीं म्हणून त्याविषयीं थोडेसें विवेचन केलें आहे. क्रोध उत्पन्न झाला असतां पुढें लिहिल्याप्रमाणें प्रत्येकानें विशेषतः मुनींनीं आपल्या मनाशीं विचार करावा.

कोणी एखाद्यानें आपल्याला दुर्वचन बोलून दुःख दिलें, शिव्या गाळी केली, चोर म्हटलें, अन्यायी, पापी, दुराचारी, दुष्ट, नीच, दुबळा, चांडाळ, कृतघ्नी वगैरे शब्दांनीं संबोधिलें तर त्यावेळीं ज्ञानी पुरुषांनीं असा विचार करावा कीं, "मीच याचा कांहीं तरी अपराध केला असला पाहिजे ? किंवा रागद्वेषाच्या भरांत एखादा अपशब्द बोलून याचें अंतःकरण दुखविलें असलें पाहिजे, मग त्याबद्दल त्यानें मला उलट शिवीगाळी केली, धिक्कार केला, नीच, चोर, कपटी, अधर्मी वगैरे शब्द उच्चारून अपमान केला तर त्यांत वावगें तें काय ? याहूनही अधिक जरी त्यानें दंड दिला असता तरी तें देखील योग्य झालें असतें. ज्याअर्थी मी त्याचा अपराध केला आहे त्याअर्थी त्याचीं दुर्वचनें ऐकणें मला भाग आहे. तीं ऐकून उलट क्रोध करणें योग्य नाहीं. अपराधी पुरुषाला येथें नाहीं तरी नरकांत जाऊन दंड भोगावा लागतोच कीं नाहीं ? ज्याअर्थी माझ्या निमित्तानें याला दुःख झालें आहे व त्या दुःखाच्या आवेशांत तो मला दुःशब्द बोलून आपलें सांत्वन करून घेत आहे त्याअर्थी मी त्यापासून वाईट मानून घेण्याचें कारण नाहीं." इत्यादि.

क्रोध कसा जिंकावा.

एखाद्या गृहस्थाकडून विकारवश कचित् दुर्वचन निघालें तर त्यानें आपण केलेल्या दुष्कृत्याबद्दल ज्याचा गुन्हा केला असेल त्याची क्षमा मागावी व त्यावेळीं असें म्हणावें कीं, "हे दयानिधे ! मी अज्ञानी आहे. रागद्वेषाच्या वश होऊन आपल्या मनाला दुखविलें ही फार वाईट गोष्ट मजकडून घडली. त्याबद्दल मला क्षमा करा. यापुढें अशी गोष्ट मजकडून कधींही घडणार नाहीं. एकवेळीं होणाऱ्या चुकीबद्दल सत्पुरुष नेहमीं क्षमाच करीत असतात."

दुर्वचनाबद्दल क्षमा मागावी.

ज्याजवळ क्षमा मागण्यास जावयाचें तो पुरुष जर तीव्र–क्रोधी व अन्यायाचरणी असेल तर मंदकषायी पुरुषानें त्यापाशीं आपण केलेल्या अपराधाबद्दल क्षमा करा असें म्हणण्यास जाऊं नये. कालांतरानें त्याचा क्रोध शमला आहे असें समजल्यावर जावें.

स्वतः कोणत्याही प्रकारचा अपराध केला नसून शिवीगाळ करणारा पुरुष केवळ ईर्षेनें अथवा द्वेषानें आपल्यावर अनेक प्रकारचे दोषारोप करीत असेल तर त्याबद्दल ज्ञानी पुरुषानें मुळींच दुःख करूं नये. त्यावेळीं असा विचार मनांत आणावा, "जर आपण याचें धन किंवा जमीन जुमला हरण केला असेल, त्याच्या उपजीविकेच्या साधनांचा नाश केला असेल, त्याची खोटी चहाडी कोणाजवळ करून नुकसान केलें असेल, अथवा त्याचे दोष प्रगट करून जगांत नाचक्की केली असेल तर या अपराधाबद्दल पश्चात्ताप करून त्याची माफी मागणें योग्य आहे. पण जर तसा कोणताही अपराध केला नसेल तर त्याबद्दल माफी मागण्याचें मुळींच कारण नाहीं. जरी तो मला उद्देशून आपल्या मुखानें अभद्रवचन उच्चारीत असला तरी ते शब्द माझ्या आत्म्याला मुळींच लागत नाहींत. तो माझें नांव व कुल उच्चार करून त्याला शिव्या देत आहे. पण नांव व कुल हें कांहीं

निर्दोष पुरुषाचे विचार.

माझें स्वरूप नव्हे. माझें खरें स्वरूप ज्ञान आहे. तो ज्याला शिव्या देत आहे तो मी नव्हे. मी आहे त्याला हे शब्द मुळीं ऐकूंच जात नाहींत. म्हणून आपण यावेळीं क्षमाच धारण केली पाहिजे. दुसरी गोष्ट अशी कीं, हा जीं दुर्वचनें उच्चारीत आहे तीं त्याच्या मुखापासून, त्याच्या मनांतील अभिप्रायाला अनुसरून, जिह्वा व दांत यांच्या साह्यानें पुद्गल परमाणु शब्दरूपानें प्रगट होत आहेत. त्या वचनाला ऐकून जर मी आपल्या आत्म्यांत विकारभाव उत्पन्न होऊं दिला तर माझ्या इतका मूर्ख दुसरा कोण असूं शकेल ? हा मनुष्य ईर्षेनें मला शिवीगाळ करीत आहे. पण वास्तविक पाहूं जाता शिवीगाळ ही कांहीं एखादी वस्तु नव्हे. ती माझ्या अंगाला लागल्या सारखींही दिसून येत नाहीं. अवस्तुमध्यें देवघेवीचा व्यापार होतो हें मी ज्ञानी असून कसें मानावें ? आतां यानें मला चोर, अन्यायी, कपटी, अधर्मी वगैरे म्हटलें तरी त्यांत वावगें काय झालें ? आपण अनेक जन्मांत चोर झालों नाहीं काय ? केवळ चोरच नव्हे पण व्यभिचारी, अभक्ष्य भक्षण करणारे भिल्ल, चांडाळ, चांभार, महार, कुत्रा, गाढव वगैरे नर व पशूंच्या अनेक अवस्था धारण केल्या आहेत. जगांत जेवढ्या म्हणून अन्यायाचरणाचीं कृत्यें असतील तितकीं सर्व आपल्या हातून अनेक जन्मांत अनेक प्रसंगीं घडलीं आहेत. अजूनही संसार-परिभ्रमण करावयाचें आहे, तोपर्यंत अनेक पर्यायांत वेगवेगळ्या, वेळेवर त्याहूनही नीच अवस्था धारण कराव्या लागतील. मग यानें आपणांस तसें म्हटलें याबद्दल वाईट कां वाटून घ्यावें बरें ! आपण कधीं तरीं या सर्व अवस्था भोगलेल्या आहेतच. त्याचा त्यानें उच्चार केला यांत वाईट मानण्यासारखें काय आहे ? त्यानें आपणाला गाढव म्हटलें म्हणून वाईट मानून घेऊन त्यामुळें आपल्या शुद्ध आत्म्यांत विकारभाव उत्पन्न होऊं देणें चुकीचें आहे. दुष्टलोक दुर्वचन बोलून मला दु:ख देण्याचा प्रयत्न करितात यांत वास्तविक त्यांचा मुळींच अपराध नाहीं. आपण पूर्व जन्मीं जें जें कर्म बांधलेलें असेल तें उदयाला आलेलें आहे व तेंच या दुष्ट मनुष्याच्या तोंडून मला अपशब्द बोलून नाहींसें होत आहे. हा कांहीं थोडा लाभ नव्हे ! खरोखर या दुष्टलोकांचे मजवर फार उपकार आहेत. कारण ते मला शिव्या देऊन आपल्या पुण्य संचयाचा नाश करून मी केलेल्या पापाला नाहींसे करीत आहेत. अशा उपकार करणाऱ्यावर जर मी क्रोध करीन तर माझ्या इतका अधम दुसरा कोण असूं शकेल ? अरे ! यानें मला फक्त शिव्याच दिल्या, मारलें नाहीं, हा थोडा लाभ झाला काय ? क्रोध आलेला मनुष्य मारण्यासही प्रवृत्त होतो. त्याला आईबाप, मुलगा, भाऊ, स्त्री, मित्र यांपैकीं कोणाचीही पर्वा नसते. असें असून त्यानें मला मारिलें नाहीं हा उपकारच म्हणावयाचा ?"

याही पुढें क्रोधी पुरुष प्रत्यक्ष मारण्यास तयार झाला तर त्यावेळीं ज्ञानी पुरुषानें पुढील विचार मनांत आणून क्षमा धारण करावी. "यानें मला फक्त मारिलें. माझा प्राण घेतला नाहीं. दुष्ट लोक स्वतःच्या जीवावर उदार होऊनच दुसऱ्याचा घात करण्यास तयार होत असतात. यानें अजून माझी तशी अवस्था केली नाहीं हाही एक लाभच घडला." यापुढें तो प्राण घेण्यास प्रवृत्त झाला तर पुढील विचार

प्रत्यक्ष मारणाऱ्या-विषयीं विचार

मनांत आणावा. "एक वेळ कधीं तरी मरावयाचें होतेंच तें आतां प्राप्त झाल्यामुळें कर्माचें ऋण फिटलें हें बरें झालें. या मरणानें माझा धर्म नष्ट झाला नाहीं. धर्माचें पालन होत राहून जर जगतां आलें तरच तें जगणें खरें. हे द्रव्यप्राण ( श्वासोच्छ्वासादि ) पुद्गलस्वरूपी आहेत. ज्ञानदर्शनादि स्वाभाविक आत्मगुणाला भाव-प्राण म्हणतात. त्यांचा घात मी क्रोधादिक विकारांच्या आधीन होऊन केला नाहीं हा फार मोठा लाभ झाला. याहून श्रेष्ठ लाभ जगांत दुसरा नाहीं. उत्तम कामांत हजारों विघ्नें येणें हा सृष्टिक्रम आहे. त्याअर्थी मला विघ्नें आलीं हें योग्यच झालें. मी जर यावेळीं क्षमाभाव धारण करून प्राप्त होणारे उपसर्ग सहन करणार नाहीं व विकारांच्या स्वाधीन होऊन क्षुब्ध होईन तर माझें हें आचरण पाहून, माझ्याहून अल्पज्ञानी, भित्रे असे त्यागी, तपस्वी वगैरे आपली क्रिया निर्दोषरीतीनें पाळण्यांत दृढ निश्चयी कसें राहूं शकतील ! ते सर्व आपापल्या कर्म-मार्गांत शिथिल होतील व त्यामुळें धर्ममार्ग सदोष बनेल. दुसरें, मी सध्यां वीतरागी बनलों आहे. अशा प्रसंगीं इतर विकारांच्या आधीन होऊन जर मुखावाटें दुर्वचन बोलूं लागलों तर मला पाहून इतर लोकही तसेंच बोलूं लागतील व मी धर्माची मर्यादा सोडून पापाची परंपरा चालविणारा ठरेन. याकरितां मी आतां प्राणांतींही धारण केलेल्या क्षमागुणाला सोडणार नाहीं. पूर्वीं जें मी अशुभ कर्म संपादन करून ठेविलें त्याचें फल मला एकट्यालाच भोगावें लागणार आहे. इतर पदार्थ केवळ निमित्त मात्र आहेत. यांच्या निमित्तानें माझें कर्म उदयाला आलें नसतें तर दुसऱ्या कोणाच्या निमित्तानें तरी तें आलेंच असतें. उदयाला आलेलें कर्म फल दिल्याशिवाय राहत नाहीं असा जैन-सिद्धांत आहे. हे अज्ञजीव माझ्यावर मोठा क्रोध करून दुर्वचनांनीं मला त्रास देत आहेत, त्यांना जर मीही तसेंच उलट बोलूं लागलों, तर माझ्यांत व त्यांच्यांत फरक तो काय ! मीही विकारवश झालों तर मला तत्त्वज्ञान होऊनही तें निरर्थक झालें असें म्हणावें लागेल." उदयाला आलेलें पापकर्म आपलें फल देण्यास तयार झालें असतां त्यामुळें चिडून जाऊन कोणाही विचारी पुरुषानें आपल्या आत्म्याला क्रोधादिक विकारांच्या स्वाधीन होऊं देऊं नये. त्यावेळीं त्यानें आपल्या मनांत असा विचार करावा- "हे आत्मन् ! तूं पूर्वीं जीं अशुभ कर्में केली आहेत. तीं आतां उदयाला येऊन दुःख देत आहेत. त्यांना प्रतिबंध करणें अशक्य आहे म्हणून आतां तीं सहन कर. दुःखामुळें भय-भीत झालास तरी तीं कर्में तुला सोडतील असें नाहीं. उलट त्यापासून पुनः अधिक पापबंध मात्र होईल. म्हणून प्राप्त झालेल्या दुःखाला मुळींच न भीतां तूं परम शांतभावानें तीं सहन कर. तुझ्या आजुबाजूला दुष्ट लोकांचा मोठा समूह जमलेला आहे. तो आपल्या सामर्थ्यानें तुझ्या क्रोधरूपीं अग्नीला प्रज्वलित करून परम शांतभावरूपीं संपदेला भस्म करूं पाहत आहे. या प्रसंगीं सावध न होतां जर तूं क्षमा सोडशील तर अवश्यमेव तुझ्या साम्यभावाचा, धर्माचा व कीर्तिचा नाश होईल."

ज्ञानी पुरुष असह्य दुःख प्राप्त झालें म्हणजे आपल्या पूर्व कर्माचा नाश होऊं लागला आहे असें समजून फार आनंदित होतात. मग ते असा विचार करतातः—

"जर या दुष्टांनीं अनेक प्रकारच्या कटुभाषणांनीं व पीडनादिकांनीं मला त्रास दिला नसतां तर

माझी अशुभ कर्मापासून सुटका झाली नसती. त्यांनीं हा मजवर खरोखर उपकार केला. अथवा त्यांच्या दुष्ट वचनामुळेंच माझी विवेकशक्ति जागृत होऊन जिनागमाच्या साह्यानें मी साम्यभावाचा जो अभ्यास केला होता त्याची कसोटी लागली. माझी परीक्षा घेण्याकरितांच कर्मही उदयाला आलें आहे. याप्रसंगीं साम्य-भाव सोडून जर मी त्याजवर रोष करीन तर ज्ञाननेत्र प्राप्त होऊनही साम्यभाव प्राप्त झाला नाहीं असें ठरेल व क्रोधरूपी अग्नींत जळून मी भस्म होईन. मी वीतराग प्रभूंनीं उपदेशिलेल्या मार्गानें जाऊन, संसारबंधन तोडून टाकण्याविषयीं उद्युक्त झालों असतां माझें चित्त क्षुब्ध होईल तर संसार-परिभ्रमण करणाऱ्या अज्ञानी मिथ्यादृष्टी सारखाच मी ठरेन.

असह्य दुःखाचे वेळीं काय विचार करावा.

सत्पुरुष अज्ञ जीवांना धर्ममार्गाचा उपदेश देत असतात पण त्याचा उपयोग होत नाहीं. तरी त्याविषयीं ते मनांत वाईट वाटून घेत नाहींत. जसें एखादा वैद्य विषनाश करण्याचा प्रयत्न करीत असून त्यामुळें तें नष्ट न झालें म्हणून आपण स्वतः तें भक्षण करीत नाहीं. रोग्यास गुण न आला म्हणून वैद्यानें मरावें असें नाहीं. त्याचप्रमाण पुरुषानें प्रथमतः ज्यास उपदेश द्यावयाचा त्याची पात्रता पहावी व आपल्या उपदेशाचा इष्ट परिणाम घडून न येतां उलट होण्यासारखा असेल तर तो देऊं नये. आपल्या सांगण्याचा एखाद्यावर परिणाम होत असेल व आपण सांगणार तें समजण्याची त्यांत पात्रता आहे असें आपणास वाटत असेल तर प्रसंगानुसार थोडक्यांत गोड शब्दांनीं चार शब्द सांगावें. तेवढ्यावर त्यानें आपला दुष्टपणा सोडला नाहीं तरी त्यामुळें आपण क्रोधवश होऊं नये. त्याची उपेक्षा करावी.

या दुष्टानें आपल्या मुखावाटें अशी अभद्र वाणी उच्चारून आपणांस उपद्रव दिला नसता तर आपण तरी शांत राहून धर्माला शरण गेलों नसतों. ज्याअर्थी उपद्रव देणाऱ्यानें मला पापा-पासून भयभीत करवून धर्माचा संबंध जोडून दिला आहे त्याअर्थी तो उपद्रव देणारा पुरुषच माझ्या रागद्वेषादिक विकारांना सोडविणारा व उप-कारकर्ताच झाला असें समजलें पाहिजे. जगांत कित्येक असे उपकारी पुरुष आहेत कीं,ते दुसऱ्याच्या सुखाकरितां धन वगैरे देतातच, पण प्रसंगीं आपला प्राण देखील खर्ची घालितात. मग मला तर दुष्टांचीं फक्त दुर्वचन ऐकावयाचीं आहेत यांत अवघड तें काय? तीं दुर्वचनें बोलण्यापासून जर तो सुखी होत आहे तर त्यांत आपलें काय नुक-सान आहे ! दुःख देणाऱ्याविषयीं जर मी मनांत द्वेष न केला तरच माझें आत्महित होणार आहे.

दुष्टानें उपद्रव दिल्या वेळीं काय विचार करावा?

तसेंच ज्याअर्थी मी सर्वसंग परित्याग करून मुनिव्रतांत क्षमा अंगिकारिलेली आहे त्याअर्थी या वचनापासून माझा साम्यभाव टिकतो कीं नाहीं हें दिसून येईल. तसेंच माझ्या साम्यभावाचा नाश करावा म्हणून अनेकांनीं अनेक प्रकारें आपली पराकाष्ठा केली तरी मी अणुमात्रही आपली शांति सोडणार नाहीं. तसेंच चिरकाल शास्त्राध्ययन करून साम्यभावाचें महत्त्व समजून घेतलें पण प्रसंगी तो टिकला नाहीं तर त्या शास्त्राध्ययनाचें तरी काय फल ! आजपर्यंत प्रसंग पडला तर असें धैर्य

धारण करूं, असें वागूं असें मनोरथ ठरविले पण प्रसंग येतांच ते सर्व नाहींसे झाले. अशा पोकळ धैर्याचा काय उपयोग ! दुष्ट आपल्या कृतीनें अथवा शद्बांनीं आपणांस दुःख देत आहे व त्यावेळीं आपण अणुमात्र देखील मनांत विकार न येऊं देतां दृढ भावनेनें उपद्रव सहन केला तरच तें खरें धैर्य ! अशा धैर्याचीच जगांत सज्जन लोक प्रशंसा करितात. उपद्रव, संकट किंवा दुःख हे जोपर्यंत प्रत्यक्ष येऊन प्राप्त झाले नाहींत तोपर्यंतच पुष्कळ लोक सत्य, शौच, क्षमा, दया वगैरे अनेक सद्गुणांचे धारक म्हणून म्हणवून घेतात. पण प्रत्यक्ष प्रसंग आला कीं ते सर्व गुण नाहींसे होऊन त्या ऐवजीं अवगुणच भरलेले दिसून येतात. खरे सज्जन असा डौल कधींच मिरवीत नाहींत. दुर्जनांनीं हवे तेवढे अपकार केले तरी सज्जन हे सज्जनच ठरतात. दुष्टाच्या अपकाराबद्दल मुखावाटें कधीं ब्रदेखील काढावयाचा नाहीं असा त्यांचा बाणा असतो व असा बाणा बाळगणारेच खरे साधु किंवा सज्जन होत. अशा सज्जनांच्या कार्याची सिद्धि ठरलेली असते. दुसऱ्याकडून उपसर्ग होवो किंवा तो आपोआप येऊन पडो त्यामुळें ज्यांचें अंतःकरण कलुषित होत नाहीं त्यांनाच अविनाशी संपदेची प्राप्ति होते. अज्ञानी जीव आपण केलेल्या पूर्व पापकर्माबद्दल स्वतःवर रोष न करतां कर्मफल देण्यास उद्युक्त झालेल्या बाह्य निमित्तांवरच रोष करितात. हा संसार अनंत दुःखांनीं भरलेला आहे. यांत भ्रमण करणाराला कोणकोणतीं दुःखें भोगावीं लागत नाहींत ? संसारांत तर सदैव दुःख ठेवलेलें. जर संसारांत सम्यग्ज्ञानरहित, कार्याकार्यविचार सोडणारे, जिनसिद्धांताविषयीं द्वेष बाळगणारे, अत्यंत निर्दयी, परलोकीं हित व्हावें अशी इच्छा न ठेवणारे, क्रोधी-दुष्ट, विषयी, हट्टी, दुराग्रही, महाभिमानी, कृतघ्न असे जीव उत्पन्न झाले नसते तर निर्मल बुद्धि धारण करणाऱ्या सज्जनांना व्रत, तपश्चरणादि क्रिया करून मोक्ष प्राप्तिकरितां उद्योग करण्याचें तरी काय प्रयोजन होतें ? अशांना पाहूनच सत्पुरुषांना उद्वेग उत्पन्न होतो व ते वीतराग होण्याकडे आपलें मन वळवितात. मला पूर्वकृत जबरदस्त पुण्याईमुळें परमात्मस्वरूपाचें ज्ञान झालें आहे, सर्वज्ञांनीं उपदेशिलेल्या पदार्थांनाही यथावत् जाणण्याची शक्ति मजमध्यें उत्पन्न झाली आहे म्हणून संसार परिभ्रमणाची भीति वाटल्यामुळें वीतराग धर्म धारण करून त्याप्रमाणें आचरण करूं लागलों. अशा स्थितींत जर मी क्रोधाच्या वश होईन तर माझें ज्ञान चारित्र वगैरे सर्व निष्फळ ठरेल. श्रीपद्मनंदि मुनींनीं म्हटलें आहे " जो मूर्ख लोकांनीं केलेल्या उपद्रवांना, थट्टेला, शिवीगाळी, अपमानादि अनेक क्रियांना न जुमानतां आपलें मन शांत ठेवतो, त्यांत अणुमात्र विकार उत्पन्न होऊं देत नाहीं त्या पुरुषालाच उत्तम क्षमा घडते व ती क्षमा मोक्षमार्गाकडे प्रवृत्त झालेल्या पुरुषाला उत्तम पदास पोंचविते."

विवेकी पुरुष असें चिंतन करीत असतात कीं, "आपण तर रागद्वेषादि मल रहित उज्ज्वल अंतःकरणाचे आहोंत. इतर लोक आपणांस खोटे म्हणोत वा खरे म्हणोत. त्यांशीं आपलें काय प्रयोजन ? ज्यानें वीतराग धर्म धारण केलेला आहे त्यास आपल्या आत्म्याच्या

विशिष्ट शुद्धतेकडेच फक्त दृष्टि ठेवून जागरूक राहिले पाहिजे. आपले विचार वाईट असले व इतरांनीं आपल्या मतलबाकरितां आपली फार स्तुति करून चांगलें म्हटलें म्हणजे आपण चांगलें होतों असें नाहीं. या उलट आपले विचार चांगले असून कोणी द्वेषबुद्धीनें आपणांस खोटें म्हटलें म्हणून तेवढयानें आपण खोटें ठरतों असेंही नाहीं आपले जसे विचार असतील तसेंच फल मिळतें. कोणी कांचेला रत्न अथवा रत्नाला कांच म्हटल्यानें कांच रत्न किंवा रत्न कांच होत नाहीं. किंमत खऱ्या रत्नाचीच व्हावयाची. कांचेला कोण विचारणार ? म्हणून इतरत्रांच्या म्हणण्यावर खरें खोटें अवलंबून नाहीं. त्याचा स्वतःच विचार केला म्हणजे झालें. दुष्टांचा स्वभाव दुसऱ्यांचे दोष प्रगट करण्याचा असतो. त्यांना तसें केल्याशिवाय कधींही समाधान वाटत नाहीं. म्हणून अतःपर दुष्ट लोकांनीं माझ्यांत नसलेले देखील दोष प्रत्येक घरीं जाऊन सांगावें व स्वतः सुखी व्हावें. ज्यांना द्रव्य पाहिजे असेल त्यांनीं माझें सर्वस्व हरण करून समाधान मानावें. माझा प्राण घेण्याची ज्या माझ्या शत्रूची इच्छा असेल त्यांनीं तत्काल ती अमलांत आणावी. ज्यांना माझी जागा, जमीन-जुमला वगैरे हवे असेल त्यांनींही तत्काल तीं ग्रहण करावी. मी आतां रागद्वेष सोडून माध्यस्थ्य ( तटस्थ ) भाव धारण केला आहे. जगांतील संपूर्ण प्राणी माझ्या निमित्तानें सुखी होवोत. मजकरितां कोणत्याही प्राण्याला कोणत्याही प्रकारें दुःख होऊं नये. कारण माझी अशी खात्री झालेली आहे कीं माझे प्राण आयुकर्माच्या स्वाधीन आहेत. द्रव्य आणि जमीन-जुमला यांचा लाभालाभ पाप-पुण्याच्या स्वाधीन आहे. मी आतां कोणत्याही जीवाशीं वैर, विरोध न करितां सर्वाबद्दल क्षमा धारण केली आहे. असें असूनही जे दुष्टलोक स्वहिताहिताचा विचार न करितां दुर्वचनादि उपद्रवांनीं मला दुःख व्हावें म्हणून प्रयत्न करीत आहेत त्या त्यांच्या उपद्रवांनीं दुःखी होऊन मी क्षमा सोडण्यास तयार व्हावें म्हणजे त्रैलोक्य चूडामणि भगवान् वीतराग प्रभूच्या यथार्थ स्वरूपाला न जाणण्यासारखें आहे. अथवा आजपर्यंत मी वीतराग धर्माची उपासना केलीच नाहीं अथवा मूर्ख लोकांचा स्वभाव जाणला नाहीं असें समजलें पाहिजे. मूढ लोकांचें ज्ञान यथार्थ नसतें. त्यांची वृत्ति सर्वस्वीं मोह कर्माच्या स्वाधीन बनलेली असते. म्हणून अशा लोकांविषयीं मी क्षमाच धारण करणें योग्य आहे. ही क्षमा इहलोकीं परमशरण आहे. आईसारखी आपलें रक्षण करणारी आहे. फार काय क्षमा हेंच जिनधर्माचें मूळ आहे. हिच्या आधारानेंच इतर सर्व गुणांचें वास्तव्य आहे. या क्षमेमुळें कर्मनिर्जरा होते व हीच हजारों संकटापासून प्राणिमात्रांचें रक्षण करण्यास समर्थ आहे. म्हणून धन देऊन अथवा प्रसंगीं प्राण देखील देऊन क्षमेचें रक्षण करणें योग्य आहे. हिला सोडतां कामा नये. कोणी दुष्टपणानें आपला प्राण घेऊं लागला तरी देखील त्याला उद्देशून कटुवचन मुखावाटें काढूं नये. त्यावेळीं अंतर्गत वैर सोडून जर त्या दुष्टाला म्हटलें, " महाराज ! आपण आमचे खरोखरी रक्षणकर्ते आहांत. आमच्या मरणाची वेळ येऊन ठेपली त्याला तुमचा काय इलाज आहे. आमच्याच पाप-कर्माचा उदय आला म्हणून अशी स्थिति प्राप्त झाली आहे. तरी पण आपल्यासारख्या महंत पुरुषाच्या हातून आम्हांस मरण येत आहे

सत्पुरुषाचें क्षमा चिंतन.

ही त्यांतल्या त्यांत आमच्या विशेष भाग्योदयाची गोष्ट समजली पाहिजे. दुसरें असें कीं, आमच्यासारख्या अपराधी पुरुषांना जर आपण दंड देणार नाहीं तर दुनियेंतून सन्मार्ग नष्ट होऊन जाईल. आम्ही जो इहलोकीं अपराध केला त्याचें फल नरकतिर्यंच गतींत जाऊन पुढें आम्हांस भोगावें लागलेंच असतें. त्या ऐवजीं येथेंच आपण आम्हांस दंड करून ऋणमुक्त केलें हा आपला केवढा उपकार ! आम्ही आपल्याशी असलेला वैरविरोध मनवचन कायेनें सोडून सर्व अपराधाबद्दल क्षमा मागतों. आपणही आम्हांस अपराधाबद्दल दंड देऊन क्षमा करावी. आम्हांला अनेक प्रकारचे व्याधि जडून त्यापासून उत्पन्न होणाऱ्या अनंत वेदनांच्या कष्टांत मरावें लागलें असतें, पण वेळींच धर्माला शरण जाण्याची बुद्धि उत्पन्न झाल्यामुळें येथें कर्माचें ऋण नाहींसें होऊन आपणासारख्या सत्पुरुषाच्या हातानें मरण प्राप्त झालें ही फार समाधानाची गोष्ट घडून आली. आतां आम्ही सुखानें मरूं " आपण अशा विकट प्रसंगींही विकारवश झालों नाहीं असें ठरेल व त्या मारण्यास तयार झालेल्या पुरुषांसही क्षमा कशी असते व सत्पुरुष प्रसंगीं ती कशी पाळितात याचें ज्ञान होऊन जैनधर्म खरा असें त्याच्या अंतःकरणांत वाटल्याशिवाय राहणार नाहीं. असो, याप्रमाणें उत्तम क्षमेचें वर्णन केलें.

## मार्दव.

मान कषायाच्या उदयानें आत्म्यांत उत्पन्न होणाऱ्या कठोर विचारांचा अभाव झाल्यानें मनांत कोमलपणा उत्पन्न होणें हा आत्म्याचा मार्दव नामक गुण होय. नम्रता व मान यांतील भेद समजून मदाचा त्याग करणें यालाही मार्दवगुण म्हणतात. मान कषाय हा संसार वृद्धीस व मार्दव गुण हा संसारनाशास कारण आहे. मार्दव गुण दयाधर्माचें मूल आहे. अभिमानी पुरुषाच्या अंतःकरणांत दयाधर्माचा लेशही असूं शकत नाहीं. ज्याचे विचार अत्यंत कठोर असतात तो निर्दयीच असतो. म्हणून मार्दव गुण धारण करण्यापासून सर्वांचें हित होतें असें आचार्यांनीं सांगितलें आहे तें यथार्थ आहे. ज्यांनीं मार्दव गुण आपल्या अंगीं धारण केला आहे त्यांच्या व्रतपालन, संयम–धारण व ज्ञानाभ्यास या क्रिया सफल होतात. अभिमानी पुरुषांच्या या क्रिया सफल होत नाहींत. मार्दव गुण अंगीं असल्यापासून कषायांचा नाश होतो व पांच इंद्रियें आणि मन हीं ताब्यांत राहतात. मार्दव धर्माच्या प्रसादानें चित्तरूपीं जमिनींत करुणारूपी वेल उत्पन्न होते. या गुणामुळेंच जिनभगवंताविषयीं व जिनागमाविषयीं निर्मलभक्तीचा अंतःकरणांत उदय होतो. गर्विष्ठ पुरुषाला जिनेंद्राच्या गुणाविषयीं अनुराग नसतो. मार्दवगुणानें कुमतिज्ञानाचा नाश होतो. तिचा अधिक प्रसार होत नाहीं. अभिमानी पुरुषाला अनेक प्रकारची कुबुद्धि उत्पन्न होत असते. मार्दव–गुणानें मनुष्य अत्यंत नम्र होतो व त्यामुळें पुष्कळ दिवसांचा शत्रु असला तरी तो आपलें वैर सोडण्यास तयार होतो. अंतःकरणांतून मान नाहींसा झाला म्हणजे परिणाम निर्मल होतात. त्यामुळें इहपरलोकाची सिद्धि होते. अत्यंत नम्र व विनयी पुरुषांचीच जगांत कीर्ति होते. परलोकीं त्याला देवगति प्राप्त

अभिमान सोडा

होते. कोमल परिणामांनींच अंतरंग बहिरंग तपाला शोभा येते. अभिमानी पुरुषाचे तप जगांत निंद्य गणलें जातें. कोमलपरिणामी पुरुषालाच लोकांचें अंतःकरण रंजविता येते या गुणामुळें जिनशासनाचें यथार्थ ज्ञान होतें. मार्दव गुण असेल तरच स्वपरस्वरूपाचा अनुभव होतो. गर्विष्ठ पुरुषाला स्वपरविचार राहत नाहीं. मार्दव गुणामुळेंच सर्व दोष नाहींसे होतात व संसारांतून पार होतां येतें. म्हणून मार्दवगुणाचा अंगीकार करावा.

**मिथ्यादर्शनामुळें आठ मद होतात**

संसारी जीवांना अनादिकालापासून मिथ्यादर्शनाचा उदय असल्यामुळें पर्यायाविषयीं आत्मबुद्धि उत्पन्न होते व त्यामुळें जाति, कुल, विद्या, बल, ऐश्वर्य, रूप, तप आणि धन यांना आपलें स्वरूप जाणून त्याविषयीं ते अत्यंत गर्व मानूं लागतात. हे जातिकुलादिक आठ पदार्थ कर्मोदयाधीन असून पुद्गलाचे विकार आहेत. आपलें खरें स्वरूप अविनाशी अमूर्तिक असून आपण अनादिकालापासून असे अनेक पर्याय धारण करून सोडिले आहेत. आतां आपण त्यापैकीं कोणता पर्याय आपला म्हणून समजावें. धनयौवनसंपदादिक आणि इंद्रियजनित ज्ञानादिक सर्व पदार्थ नश्वर असून क्षणभंगुर आहेत. यांचा लाभ झाला म्हणून अभिमान बाळगणें संसारपरिभ्रमणाचें कारण होय. स्वर्गांतील महान् ऋद्धिधारण करणारा देवही मरणोत्तर एकेंद्रिय जीव होऊन जन्मतो अथवा द्वींद्रियापासून पंचेंद्रियापर्यंत चांडाल, कुत्रा, मांजर वगैरे अनेक अवस्था धारण करतो. नवनिधि व चौदा रत्नें धारण करणारा चक्रवर्ती मरणोत्तर सातव्या नरकांत जाऊन जन्म घेतो. बलभद्र नारायणासारख्या पुण्यवान् पुरुषांचें ऐश्वर्य नाहींसें होतें. त्यापुढें इतरांचा काय पाड! ज्यांची सेवा करण्याकरितां हजारों देव हात जोडून तयार असत त्यांच्या पुण्याचा क्षय होतांच मरणसमयीं तोंडांत पाणी घालण्यास देखील कोणी राहात नाहीं मग इतर पुण्यरहित जीवांची काय अवस्था! त्यांनीं आपल्या यत्किंचित् पुण्याचा अभिमान तरी कां बाळगावा? जगांत आपल्या श्रेष्ठ ज्ञानामुळे जे उच्चपदवीला पोंहोंचले आहेत, निरंतर उत्कृष्ट तपश्चरण करण्यांत जे मग्न झालेले आहेत व जे सदैव उत्तम दान करण्यांत तत्पर आहेत व इतकेंही करून जे स्वतःला कमी प्रतीचे असें मानून राहतात त्यांनाच मार्दव गुण प्राप्त झाला असें समजावें.

**विनय धारण करा**

विनय अथवा गर्वरहित अवस्था हेंच धर्माचें मूळ आहे. सम्यग्दर्शनादि अनेक गुणांची प्राप्ति व्हावी, जगांत कीर्ति व्हावी, कोणीही आपणांशीं वैर करूं नये वगैरे गोष्टींची आवश्यकता भासत असेल तर गर्व सोडून विनयशील व्हा. सर्वांत अगोदर गर्व नाहींसा केला पाहिजे. त्याशिवाय नम्रपणा, वचनमाधुर्य, पूज्यपणा, दान, सन्मान वगैरे अनेक गुणांपैकीं एकही गुण प्राप्त होणार नाहीं. गर्विष्ठ पुरुषाला कारणाशिवाय शत्रु उत्पन्न होतात. त्याची सर्वत्र निंदा होते. सर्व लोक गर्विष्ठ पुरुषाची मानखंडना व्हावी असे इच्छित असतात. उद्धत नोकराचा मालक देखील त्याग करितात. मदानें फुगलेल्या शिष्याला गुरु विद्या शिकविण्याविषयीं अनुत्साह दाखवितात. मत्त पुरुषाजवळ नोकर राहूं इच्छित

नाहींत. गर्विष्ठ पुरुषाचें मानखंडन होण्यांत मित्र, भाऊबंद, शेजारीपाजारी, हितकर्ते वगैरे सर्व राजी असतात. या उलट नम्र पुत्र अथवा शिष्यांची अवस्था असते. गुरूंना व पित्यांना आपलीं मुलें अथवा शिष्य विनयशील पाहून अत्यंत आनंद होतो. उद्धत मुलें व शिष्य आपल्या पित्याची व गुरूची मर्यादा भंग करून त्यांच्या अंतःकरणाला दुःख देतात. पुत्रांनीं व शिष्यांनीं कोणतेंही नवीन कार्य करावयाचें असल्यास स्वबुद्धीनें न करतां आपल्या आई–बापाच्या व गुरूच्या परवानगीनें करण्यास उद्युक्त व्हावें. परवानगी मागण्या इतका वेळ नसल्यास मागाहून त्यांत अमुक अमुक हेतु होता, असें कळवून त्यांचें समाधान करावें. अशा कृतीलाच विनय अथवा भक्ति म्हणतात. ज्यांच्या शिरोभागीं आज्ञा करणारे मातापितर अथवा गुरु आहेत ते धन्यभाग समजावेत. सर्वांनाच असा योग मिळालेला नसतो.

निरभिमानी व विनयशील पुरुष आपलीं सर्व कार्यें गुरूच्या आज्ञेनेंच करीत असतात. जे याप्रमाणें गर्व सोडून वागतात ते खरोखरीच धन्य होत. उत्तम पुरुष, बालक, वृद्ध, निर्धन, रोगी, मूर्ख, ज्ञानी, नीच यापैकीं कोणी कसाही येवो सर्वांशीं यथायोग्य प्रिय भाषण व त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांचा आदरसत्कार वगैरे क्रियांमध्यें कधींही चूक करीत नाहींत. ते नेहमीं आपल्या मुखावाटें गोड भाषण करितात. उत्तम पुरुष उद्धत पुरुषासारखा पोषाख करीत नाहींत व ज्यांत आपला व दुसऱ्याचा अपमान होण्याचा प्रसंग प्राप्त होईल असा व्यवहारही करीत नाहींत. जो उद्धत असेल त्यांशीं बोलणें चालणें देखील ठेवूं इच्छित नाहींत. मग इतर व्यवहार करतील तरी कसें? अशा रीतीचें वर्तन ठेवण्यानें त्यांना लोकमान्य अशा विनयगुणाची प्राप्ति होते. अशा सत्पुरुषांनाच वरील आठ पदार्थांची म्हणजे धन, रूप, ज्ञान, विद्या, कला, ऐश्वर्य, बल, जात, कुल, वगैरे प्राप्ति होणें सफल होतें. ते स्वतः अभिमान करीत नाहींत. सर्वांशीं नम्रतेनें वागतात. आपण सर्वांहून लहान आहोंत. कर्माच्या वश झाल्यानें अनेक दुष्कर्में आपल्याकडून घडतात. आपल्या अंगीं इतके उत्तम गुण येण्यास फार अवधि लागणार आहे अशी त्यांची समजूत असते. असे पुरुष गर्वाच्या स्वाधीन कधींही होत नाहींत. म्हणून भव्यपुरुष हो! मार्दव हा सम्यग्दर्शनाचें एक अंग जाणून त्याचें आपल्या अंतःकरणांत सदैव स्मरण ठेवा व त्याचें ध्यानस्तवन करा. यापुढें आर्जव गुणाचें स्वरूप सांगतों.

गुरु व वडील-पुरुषांची आज्ञा पाळावी

## आर्जव.

आर्जव हेंही धर्माचें लक्षण आहे. मनवचनकायेच्या सरलतेला आर्जव म्हणतात. यांत मायाचार अथवा कपट बिलकुल नसलें पाहिजे. आर्जवधर्म अंगीं असला म्हणजे त्यापासून अनेक पापांचें क्षालन होऊन सुख उत्पन्न होतें म्हणून कपट सोडून याचा अंगीकार करा. यापासून कर्मांचा क्षय होतो. कुटिलता अथवा कपट यापासून अशुभ कर्मांचा बंध होऊन जगांत अपकीर्ति होते. म्हणून आत्महितेच्छु पुरुषांनीं

आर्जवाचें लक्षण

आर्जवधर्माचें अवलंबन करावें. आपण जसें मनांत आणिलें असेल तसेंच दुसऱ्याला सांगणें व तदनुरूप बाह्य शरीराचीही पण क्रिया करणें, आंत एक व बाहेर दुसरें असा भाव किंवा क्रिया न करणें यालाच सरळपणा अथवा आर्जव म्हटलें आहे. अशी सरळता अंगीं असणें हें धर्माचें एक अंग मानलें आहे. अंतःकरणांतून कपटाचा कांटा काढून तें निर्मल करावें व त्या जागीं आर्जव-धर्माची स्थापन करावी. मनांत कपट ठेऊन बाह्यतः कितीहि कठिण व्रत, तपश्चरण व संयमन केलें तरी तें सर्व निरर्थक होतें निर्वाणमार्ग ज्यांना खरोखरी पत्करावयाचा आहे त्यांना आर्जवधर्म हाच एक सहायक आहे. हा आर्जवधर्म दर्शनज्ञानचरित्राचें खरें व अखंड स्वरूप आहे. अतींद्रिय सुखाची तिजोरी आहे. याच्या प्रभावानेंच अविनाशी सुखाची प्राप्ति होणार आहे. संसारसमुद्रांतून तारून नेण्यास जहाजाप्रमाणें हा आर्जव धर्म आहे म्हणून याचा अंगीकार करा.

कपट करणें ही फार लाजिरवाणी गोष्ट आहे. तें उघडकीला आलें म्हणजे पुष्कळ दिव-साच्या प्रीतीमध्यें अंतर पडतें. जसें दुधांत मिठाचा खडा टाकला म्हणजे तें दुध नासून जातें तद्वत् कपट कितीही छपविलें तरी तें उघडकीस आल्यावाचून रहात नाहीं. दुस-ऱ्याची चहाडी करणें, अथवा त्याचे दोष प्रगट करणें यांत कित्येकांना फार आनंद होत असतो पण तसें केल्यानें दुसऱ्याची निंदा होतेच असा नियम नाहीं. त्याच्या अशुभ कर्माच्या उदयाची वेळ आली म्हणजे आपोआप ती गोष्ट घडून येते. त्याकरितां आपणाला प्रयत्न करण्याची जरूरी नाहीं. पण परक्याची निंदा होण्याकरितां आपण कपटकृति करणें हें मात्र अत्यंत निंद्य आहे. अशा मनुष्याचें हित करणारे सर्व मित्र आपोआप शत्रु बनतात. जो व्रती, तपस्वी, अथवा त्यागी असेल त्याचें कपट एकदां उघडकीला आलें म्हणजे सर्व लोक त्याला धर्मभ्रष्ट समजून निंदा करूं लागतात. त्यावर कोणाचाही भरंवसा रहात नाहीं. कपटी पुरुषावर त्याची आईही विश्वास ठेवीत नाहीं. कपटी पुरुष मित्रद्रोही, स्वामिद्रोही, धर्मद्रोही व कृतघ्नी असतो. जैनधर्म कपटरहित आहे. यांत तिळमात्रदेखील कपट नाहीं. वांकड्या म्यानांत सरळ तल-वार जाऊं शकत नाहीं तसें कपटानें ज्याचें अंतःकरण वक्र झालेलें आहे त्याच्या अंतःकरणांत जिनेंद्र-प्रणीत आर्जव (सरळपणा) धर्म प्रविष्ट होत नाहीं. कपटी पुरुषाचे दोन्ही लोक नष्ट होतात. म्हणून तुम्हांस धर्म धारण करण्याची, ज्ञान प्राप्त करून घेण्याची व कीर्तीची इच्छा असेल तर अगोदर कपट सोडून आर्जवधर्माचा अंगीकार करा. या धर्माची वैरी देखील प्रशंसा करितात. सरलचित्त माणसानें कदाचित् अपराध केला तरी त्याला दंड होत नाहीं. आर्जवधर्म धारण करणारा पुरुष परमात्म्याचा अनुभव घेण्याचा, कषाय जिंकण्याचा, व संतोष धारण करण्याचा संकल्प करतो. त्यानें जगांतील मायाचाराचा दुरूनच त्याग केला पाहिजे. तो आत्म्याला असहाय व चैतन्यस्वरूप मात्र समजतो. जो धनसंपदा कुटुंबादिकांना आपलें स्वरूप मानील तोच कपटानें कोणाला तरी ठकवूं पाहील. पण जो आत्म्याला संसार-परिभ्रमणापासून सोडवूं इच्छितो व त्यामुळें परद्रव्यांना स्वस्वरूपाहून भिन्न जाणतो व आत्मा असहाय स्वतंत्र ज्ञाननिधान आहे असें समजतो तो धनसंपदे-

कपट सोडा

करितां कधींही कपट करीत नाहीं. तुमचीही तशीच इच्छा असेल तर मायाचार सोडून आर्जवधर्म धारण करा. असें आर्जवधर्माचें स्वरूप आहे. यापुढें शौचधर्माचें विवेचन करितात.

## शौच.

शौच याचा शब्दशः अर्थ पवित्रता असा आहे. बाह्य बुद्धि ठेवणारे ( बहिरात्मा ) संसारी जीव स्नानादिक क्रियेनीं शरीराला स्वच्छ करणें याला शौच मानतात. परंतु सप्त धातूंनी व मल-मूत्रांनीं भरलेलें शरीर पाण्यानें धुतल्यानें पवित्र होऊं शकत नाहीं हें विसरतात. मलमूत्रांनीं भरलेली घागर बाहेरून पुष्कळ धूतली म्हणून ती शुद्ध झाली असें होत नाहीं. तद्वतच शरीराला पुष्कळ पाण्यानें वरचेवर धुतलें तरी तें शुद्ध होत नाहीं. म्हणून स्नानादिकांनीं तें शुद्ध होतें असें मानणें व्यर्थ होय. खरा शौच धर्म आत्म्याला उज्वल करण्यांतच आहे. आत्म्यावर क्रोध, लोभ, माया, मान वगैरे अनेक कषायांचीं आवरणें पडलेली आहेत. तीं पूर्णपणें नाहींशी करणें हीच खरी आत्म्याची शुद्धि. आत्मा हा देहापासून निराळा, ज्ञानदर्शन स्वरूपी, अखंड, अविनाशी, जन्म-जरामरणरहित, त्रैलोक्यवर्ति पदार्थ प्रकाशक असा आहे असें मानणें व त्याचेंच चिंतन करणें हा शौच धर्म होय. मनाला मायाचारलोभ वगैरे विकाराच्या वश होऊं न देणें हेही एक प्रकारचे शौच होय. ज्याचें मन कामक्रोधादिक विकारांच्या वश होतें त्याला शौचधर्म घडत नाहीं. धनाविषयीं असलेल्या तीव्र इच्छेचा त्याग करण्यानें शौचधर्म घडतो. परिग्रहावरील ममत्व सोडून इंद्रियांच्या विषयाशीं रममाण न होतां तपश्चरणादि धर्मक्रियेकडे प्रवृत्त होण्यानें शौचधर्म घडतो. ब्रम्हचर्य धारण करण्यानें शौचधर्माचें पालन होतें. अष्टमदाचा त्याग करून नम्रतेनें वागल्यास शौचधर्माचें पालन होतें. अभिमानानें ज्याचें अंतःकरण महामलिन झालें त्याला हा शौचधर्म कसा घडेल ? हे मलीन अंतःकरण वीतरागप्रणित तत्वज्ञानाच्या चिंतनानें, तदनुसार आचरण ठेवल्यानेंच शुद्ध होतें, इतर उपायांनीं होत नाहीं.सबब बाह्य स्वच्छतेच्या भानगडींत न पडतां अंतर्शुद्धता करावी म्हणजे शौचधर्माचें पालन केल्याचें श्रेय लागतें. बाह्यतः शरीरावर आसक्ती ठेवल्यानें क्रोधादिक कषायांची वृद्धि होते व त्यामुळें जीवाला खाद्याखाद्याचा, भक्षाभक्ष्याचा विचार राहात नाहीं. मग तो अनाचारी व निर्लज्ज बनतो. संसारांत मुख्यत्वेंकरून सर्व जीव जीव्हेंद्रिय व उपस्थेंद्रिय यांच्या वश होऊन स्वतःला विसरून जातात व नरकतिर्यंचादि गतीला कारणीभूत अशा निंद्य विचारांनीं आपलें मन कलुषित करून घेतात.

*शरीर केवळ पाण्यानें शुद्ध होत नाहीं.*

जगांत सर्वत्र परद्रव्यापहरण, परस्त्रीसेवन आणि भोजन लोलुपता या तीनच गोष्टी मनाला बिघडविणाऱ्या आहेत. या तिहींपासून दूर राहून आत्महित साधण्याविषयीं तत्पर असलें पाहिजे. परस्त्री, परधन व जीवहिंसा याहीं करून आत्मा मलिन होतो. या तिहींची सदैव इच्छा बाळगणारे लोक कोट्यावधि तीर्थांत स्नान करोत, सर्व तीर्थांची वंदना करोत, लक्ष्यावधि रुपयांचे दान करोत, कोटि वर्षें तप करोत किंवा सर्व शास्त्रांचे पठणपाठन करोत त्यांना कधींही शुद्धि प्राप्त व्हावयाची नाहीं.अभक्ष्य भक्षण करणारांचे,

*दुःखाचें मूळ*

अन्यायानें विषयोपभोग भोगणारांचे व परद्रव्य हरण करणारांचे परिणाम इतके मलिन होतात कीं त्यांना कितीही धर्मोपदेश केला किंवा सर्व सिद्धांताचें सार वर्षानुवर्ष समजावून सांगितलें तरी त्याचा त्यांचे मनावर अणु इतकाही परिणाम होत नाहीं. दुराचार सोडून सद्गुरूचा उपदेश ग्रहण करावा अशी बुद्धीच त्यांना होत नाहीं. व्यवहारांत हजारों माणसें आपण नेहमीं अशी पाहतों कीं, ज्यांनीं पंचवीस, तीस किंवा पन्नास वर्षे शास्त्र श्रवण करण्यांत घालविलीं तरी त्यांना धर्माचें स्वरूप समजलें नाहीं. हें सर्व अन्यायाचरण आणि अभक्ष्यभक्षणाचें फल आहे. म्हणून आपला आत्मा शुद्ध व्हावा अशी ज्यास इच्छा असेल त्यानें प्रथमतः अन्यायानें धन संपादन न करण्याचा निश्चय करावा, परस्त्रीविषयीं अनुराग मनांत ठेवूं नये व अभक्ष्यभक्षण करूं नये. परमात्मस्वरूपाचें सदैव ध्यान करीत राहावें. यापासूनच आत्म्याला खरी शुद्धता प्राप्त होते. अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रम्हचर्य व परिग्रह त्याग या पांच महाव्रतापासूनच खरा शौचधर्म घडतो. जे सतत पंचपापांचा संचय करण्यांत गढून गेले आहेत, त्यांचा आत्मा सदैव मलिनच राहणार. जे परोपकाराला जाणित नाहींत ते कृतघ्नी होत. त्यांच्या आत्म्याला शुद्धि कोठली ? गुरुद्रोही, धर्मद्रोही, स्वामिद्रोही, मित्रद्रोही, व कृतघ्नी लोकांच्या पापांची परंपरा असंख्यात जन्मपर्यंत तुटत नाहीं. त्यांनीं मोठमोठ्या तीर्थांत जाऊन स्नान केलें, अथवा दान केलें म्हणून त्यांचें पाप नाहींसें होत नाहीं. विश्वासघात करणाऱ्याचे विचारही वरच्याप्रमाणेंच नेहमीं दुष्ट असतात. म्हणून या सर्वांचा विचार करून परम वीतराग भगवंताच्या आज्ञेप्रमाणें शुद्ध सम्यग्दर्शन ज्ञानचारित्रांचें पालन करावें. कामक्रोधादि कषायांना जिंकून उत्तमक्षमा मार्दवादि गुण धारण करावेत. यांनींच आत्मा शुद्ध होतो. सर्व व्यवहार सदैव निष्कपटपणें करीत राहावें. दुसऱ्याचें वैभव, कीर्ति व पुण्योदय यांना पाहून आपल्या अंतःकरणांत मत्सर उत्पन्न होऊं देऊं नये. मनुष्य जन्म, त्यांत प्राप्त होणारे इंद्रियांचे विषय, बल, आयुष्य, संपत्ति वगैरे सर्व क्षणभंगुर आहेत असा विचार करून एकाग्र चित्तानें आत्मस्वरूपाचें चिंतन करण्यांत काल घालवावा म्हणजे त्यापासून अशुभ विचारांचा प्रादुर्भाव न होतां आत्म शुद्धि होइल. आत्म्याला शुद्ध ठेवण्याचा व त्यांत विकार उत्पन्न न होऊं देण्याचा प्रयत्न करणें हाच खरा शौचधर्म होय. शौचधर्म हाच मोक्षमार्ग असून आत्म्याला अविनाशी पदाला पोचविणारा आहे.

अन्याय, अभक्ष्य व परस्त्री त्यागानेंच आत्मशुद्धि

## सत्य.

सत्य बोलणें हा धर्म आहे. सत्यवचन हेंच दयाधर्माचें मूल कारण आहे .यापासून अनेक दोषांचे परिमार्जन होतें. या जन्मीं व परजन्मीं सुख उत्पन्न होण्यास सत्यवचन हेंच कारण आहे. सत्य बोलण्यापासून मनुष्य जगांत विश्वासपात्र होतो. सर्व धर्मांत ' सत्य बोलणें ' हा धर्म मुख्य आहे. तो संसारसमुद्रांतून तारून नेण्यास जहाजासारखा आहे. सर्व विधानांत सत्य हें मोठें विधान आहे. फार काय सर्व सुखाचें आदिस्थान सत्य आहे. सत्य वचनानेंच मनुष्यजन्माची शोभा आहे. सत्य भाषण असेल

सत्यमहिमा

तरच सर्व पुण्यकर्मे उज्ज्वल होतील. पुण्योत्पादक अशीं अनेक उच्च कार्यें जगांत होतात त्या सर्वांच्या मूळाशीं सत्य असल्याशिवाय प्रभाव पडणार नाहीं. सत्यधर्म अंगीं असेल तर सर्व गुणांचा महिमा वाढेल. सत्याच्या प्रभावानें देव देखील सेवा करूं लागतात. अणुव्रतें या गुणानेंच महाव्रतें बनतात. सत्याशिवाय व्रत, संयम करूनही तीं निरुपयोगी होतात. सत्यापासून सर्व संकटाचें निवारण होतें. म्हणून जें बोलावयाचें तें स्वपरहित करील असें बोला. कोणालाही आपल्या बोलण्यापासून दुःख उत्पन्न होईल असें बोलूं नका. सत्य असूनही परजीवांना बाधा उत्पन्न करीत असेल तर तें सत्य देखील बोलूं नका. नेहमीं मुखावाटें मृदु वचनांचें उच्चारण करा. परमात्म्याचें अस्तित्व ज्या भाषणानें स्थापित होईल असेच शब्द मुखावाटें काढा. नास्तिकासारखें ' पापपुण्य म्हणजे काय ? तें कसें असतें ? प्रत्यक्ष दिसत नाहीं ना ? स्वर्ग, नरक कोठें आहेत ? ती निव्वळ कल्पना आहे. त्यांत खरें कांहीं नाहीं ' वगैरे वचन बोलूं नका. आपण कोण, कोठून आलों, कोठें जाणार, आपली अवस्था कोणती, या सर्वांचा परमागमाच्या आश्रयानें विचार करून जें बोलावयाचें तें बोलावें.

ह्या जीवानें अनंतानंत काल निगोदांत वास केला. त्या ठिकाणीं त्याला वचनरूप कार्मण वर्गणा ग्रहण करण्याचें सामर्थ्य नसल्यानें बोलण्याची शक्ति नव्हती. यापुढें पृथ्वीकाय, अप्काय, तेजस्काय, वायुकाय व वनस्पतिकाय या पंचस्थावर एकेंन्द्रिय जीवामध्येंही अनंतकाल घालविला. तेथें जिह्वेन्द्रिय नसल्यानें बोलण्याची शक्ति प्राप्त झाली नाहीं. यानंतर द्वींद्रियापासून पंचेंद्रियापर्यंत विकलचतुष्क योनींत उत्पन्न झाला. पुढें पंचेंद्रिय तिर्यंचामध्यें जन्मला. तेथें जिह्वेन्द्रियाची प्राप्ति झाली तरी अक्षर उच्चारण करण्याचें सामर्थ्य नसल्यानें बोलतां आलें नाहीं. जेव्हां मनुष्ययोनि प्राप्त झाली तेव्हांच जीवाला वचनोच्चारण करण्याची शक्ति प्राप्त झाली. फक्त मनुष्य जन्मांतच ही शक्ति प्राप्त होते. ती प्राप्त होण्यास दीर्घ काल लागतो. अशी दुर्लभ वचनशक्ति फक्त मनुष्य जन्मांत प्राप्त झाली असतां तिचें महत्त्व न समजतां उगाच कांहीं तरी बकून तिचा अपव्यय करणें हा मोठा अनर्थ आहे. मनुष्य जन्माची महिमा एका वचनावरच अवलंबून आहे. इतर जीभ, कान, नाक वगैरे इंद्रियें व आपल्याप्रमाणेंच खाणें, पिणें, आहार, विहार वगैरे सर्व पशूंनाही त्यांच्या पापपुण्यानुसार प्राप्त होत असतात. आभरण वस्त्रप्रावरणादि आपल्याप्रमाणें त्यांनाही कधीं कधीं प्राप्त होतात. कारण आपण हत्ती, घोडा, उंट, बैल वगैरे पशूवर मोठमोठ्या उंची झुली, गाशे वगैरे शोभेकरितां घालतों. पण त्यांना बोलण्याचें सामर्थ्य, तें श्रवण करून त्याचें उत्तर देण्याचें सामर्थ्य नसतें. तें फक्त मनुष्य जन्मांतच प्राप्त होणारें आहे. वचनद्वारेंच शिकणें किंवा शिकविण्याचें काम होतें. तें नसेल तर काय शिकवावें व कसें शिकवावें ? याप्रमाणें दुर्लभ मनुष्य जन्म प्राप्त होऊनही त्यांत जर आपण आपलें वचन सांभाळलें नाहीं तर आपला सर्व जन्म फुकट गेला असें होईल. मनुष्यजन्मांत देणें, घेणें, ऐकणें, धर्म, कर्म, प्रीति, वैर वगैरे सर्व प्रवृत्ति-

वचनोच्चाराची दुर्लभता

रूप अथवा निवृत्तिरूप क्रिया वचनाच्या आधारानेंच होत असतात. जर आपण वचनालाच दूषित केलें तर मनुष्य जन्मांतील सर्व व्यवहार दूषित केला असें होईल. म्हणून प्राण गेला तरी बेहेत्तर पण आपलें मिथ्या वचन बोलूं नका.

परमागमांत असत्यवचन चार प्रकारचें असतें असें सांगितलें आहे त्याचा त्याग करा. पहिलें असत्य, आगमोक्त तत्त्राचें स्वरूप नाकारणें. जसें कर्मभूमीतील मनुष्य तिर्यंचांना अकाल मृत्यु येत नाहीं असें प्रतिपादन करणें, हें पहिलें असत्य होय. कर्मभूमींतील मनुष्य व पशूंना अकाल मृत्यु आहे असें भगवंताचें वचन असून तद्विरुद्ध बोलणें हें खोटें आहे. देव, नारकी व भोगभूमींतील मनुष्य तिर्यंचाना आयुष्य पूर्ण झाल्याशिवाय मरण येत नाहीं. पण कर्मभूमींत विषभक्षणानें, ताडन, मारण, छेदन, भेदन, बंधनादिक वेदनांनीं, रोगाच्या तीव्र तापानें, रक्ताच्या अभावानें, दुष्ट मनुष्य व तिर्यंचांनीं दिलेल्या उपद्रवानें, देवदानवाच्या भीतीनें, वज्रपातानें, स्वचक्रपरचक्राच्या भयानें, शस्त्रघातानें, पर्वतावरून उडी टाकण्यानें, आगींत, पाण्यांत पडण्यानें, झंझावातानें भांडणतंट्यांतील संतापानें, श्वासोच्छ्वास रोंकण्यानें, धुरामुळें दम कोंडल्यानें, आहारपानाचा निरोध केल्यानें वगैरे अनेक बाह्य साधनांनीं आयुष्याचा नाश होतो. आयुष्याची स्थिति पुरी झाली नसून वरील कारणांनीं मरण प्राप्त होतें. कित्येकांची समजूत आयुष्य संपल्याशिवाय मरण येत नाहीं अशी असते. पण तसें असतें तर विषभक्षणापासून पराङ्मुख होण्याचें काय प्रयोजन ? विष भक्षणावर उलटीचें औषध देऊन तें पाडण्याचा प्रयत्न तरी कां केला गेला असता ? आपणावर शस्त्र घेऊन येणाऱ्या माणसाला पाहिल्याबरोबर आत्मरक्षणार्थ भय बाळगण्याचें तरी काय कारण ? सिंह, वाघ, सर्पासारख्या प्राण हरण करणाऱ्या प्राण्यांना पाहतांच दूर तरी कां पळावें ? नदी, समुद्र, विहिर वगैरेमध्यें पडणें अथवा अग्नीच्या ज्वालेंत उडी घालणें यापासून तरी भीती कां बाळगावी ? रोग प्राप्त झाला असतां त्याचा इलाज तरी कां करावा ? अशीं कोठवर उदाहरणें द्यावीं. जर आयुष्य पूर्ण झाल्याशिवाय मरण येणारच नाहीं असा नियम असता तर वरील सर्व कारणामुळें मनुष्यप्राण्याला भय बाळगण्याचें मुळींच कारण नव्हतें. पण तशी स्थिति नाहीं. आयुर्घात होण्यास अंतरंग वा बाह्य कारणें येऊन मिळतांच तो व्हावयाचा असाच नियम यावरून सिद्ध होतो.

असत्याचे चार प्रकार

अकालीं मरण येतें

आयु कर्माप्रमाणें इतर कर्मेंही बाह्य कारण मिळतांच उदयाला येऊन आपला रस देऊं लागतात. सर्व जीवांच्या पापपुण्याचा उदय सत्तेंत विद्यमान असतो व बाह्यतः द्रव्यक्षेत्रकालभावादि-परिपूर्ण सामग्री प्राप्त होतांच कर्म आपलें फल देऊं लागतें. बाह्य सामग्री न मिळाली तर तें उदयाला न येतां फल दिल्याशिवायही नाहींसें होतें. याप्रमाणें विद्यमान पदार्थांना ' नाहीं ' असें प्रतिपादन करणें हें पहिलें असत्य होय.

२ असद्भूत म्हणजे जें मुळींच नाहीं त्याला ' आहे ' असें प्रतिपादन करणें हें दुसरें असत्य होय. जसें– देवांना अकालमृत्यु आहे; देव आहार ग्रहण करितात; देव मांसभक्षण करितात; मनुष्य आणि देवस्त्रिया यामध्यें अथवा देव आणि मनुष्यस्त्रिया यामध्यें परस्पर मैथुन–व्यवहार होतो वगैरे म्हणणें, हा दुसरा असत्याचा भेद जाणावा.

३ पदार्थाचें विपरीत स्वरूप सांगणें हा असत्याचा तिसरा भेद आहे.

४ निंद्य वचन मुखावाटें उच्चारणें हा असत्याचा चौथा भेद आहे. याचे गर्हित, सावद्य, आणि अप्रिय असे तीन भेद आहेत.

गर्हित वचन त्याग

पैशून्य, हास, कर्कश, असमंजस, प्रलपित वगैरे अनेक प्रकारांनीं शास्त्रविरुद्ध संभाषण करणें हें गर्हित वचन होय. यांतच इतरांचे विद्यमान वा अविद्यमान दोष, त्यांचें पश्चात् बोलणें, दुसऱ्याच्या धनाचा, उपजीविकेचा व प्राणांचाही नाश वेळेवर होईल असें भाषण करणें, जगांत आपल्या भाषणामुळें कोणाची निंदा होईल अथवा त्यावर अपवाद येईल असें बोलणें याचाही अंतर्भाव होतो. अर्थात् असें संभाषण करणें यालाही गर्हित असेंच नांव आहे. थट्टेमध्यें अभद्र शब्द मुखावाटें उच्चारणें व ज्यापासून ऐकणाराला क्रोध उत्पन्न होईल असें बोलणें हें हास्यनामक गर्हित वचन म्हणावें. दुसऱ्याला तोंडावर मूर्ख, गाढव, अज्ञान वगैरे म्हणणें हें कर्कश वचन जाणावें. देशकालाला अनुसरून नसणारें व ज्यापासून आपणाला व दुसऱ्यांनाही संताप उत्पन्न होईल असें संभाषण करणें याला मूर्खपणाचें अथवा असमंजस वचन म्हणतात. प्रयोजनाशिवाय विनाकारण धिटाईनें बडबड करणें याला प्रलपित गर्हित वचन म्हणतात. हे गर्हिताचे भेद आहेत.

सावद्य वचनाचा त्याग

ज्या भाषणानें एखाद्याचा प्राण जाईल, देशावर संकट येईल, देश लुटला जाईल, राजाशीं वैर बांधलें जाईल, शहराला आग लावून देण्यास कोणी तयार होईल, कोणाचें घर अथवा अरण्य यांना भस्म करून टाकण्याची बुद्धि उत्पन्न होईल, कलह, विसंवाद अथवा युद्ध यांचा आरंभ होईल, कोणावर वाईट परिणाम होऊन त्या दुःखानें तो मरून जाईल, सर्वांशीं शत्रुत्व उत्पन्न होईल, षट्काय जीवांची हिंसा केली जाईल व महान हिंसा होण्याचा संभव प्राप्त होईल अशा सर्व भाषणाला सावद्य वचन म्हणावें. याचप्रमाणें दुसऱ्याला चोर, लबाड, व्यभिचारी वगैरे म्हणणें याचाही सावद्य वचनांतच अंतर्भाव होतो. हें वचन दुर्गतीचें कारण आहे म्हणून बोलणें योग्य नाहीं.

अप्रिय भाषेचे दहा भेद

अप्रिय वचनही त्याग करण्यायोग्य आहे. प्राण गेला तरी आपल्या मुखावाटें अप्रिय भाषणाचें उच्चारण करूं नये. याचे कर्कश, कटुका, परुषा, निष्ठुरा, परकोपिनी, मध्यकृशा, अभिमानिनी, अनयंकरी, छेदंकरी, भूतवधकरी वगैरे भेद आहेत. या सर्वांपासून पापबंध होऊन जगांत जीव अत्यंत निंद्य ठरतो. म्हणून वरील दहा भाषा सत्यवादी जीवांनीं बोलूं नयेत. कोणालाही मूर्ख, गाढव, बैल वगैरे म्हणणें ही कर्कश

भाषा होय. याचप्रमाणें कोणालाही नीच, हलका, अधर्मी, महापापी, अस्पर्श्य वगैरे शब्दांनीं लावून बोलणें ही कटुका भाषा आहे. आचार-भ्रष्ट, दुष्ट वगैरे मर्मच्छेदन करणाऱ्या भाषेला परुषाभाषा म्हणतात. 'मारून टाकूं, नाक कापूं, शिरच्छेद करूं' वगैरे बोलणें याला निष्ठुराभाषा म्हणतात. 'अरे मुर्खा, निर्लज्जा, तुझ्या जातिकुलाचा पत्ता नाहीं, तूं महानीच असून दुष्ट आहेस. तपश्चरणाचें ढोंग करून जगाला फसवणारा आहेस. अभक्ष्य भक्षणानें त्वां आपल्या कुलाला व धर्माला बट्टा आणलास;' वगैरे भाषणाला परकोपिनीभाषा म्हणतात. हृदयाचें पाणी होऊन जाईल असें बोलणें मध्यकृशाभाषा होय. जगांत आपले गुण व परक्याचे दोष प्रगट करणें, व स्वतःच्या जाति, कुल, स्वरूप, ज्ञान वगैरेचा अभिमान धरून बोलणें यास अभिमानिनी भाषा म्हणतात. ज्या भाषणापासून एखाद्याच्या शीलाला बाध येईल अथवा कोणी कोणाशीं द्वेष करण्यास तयार होईल अशा भाषेला अनयंकरी भाषा म्हणतात. ज्यामुळें मूळच्या वीर्य, शील वगैरे गुणांचा नाश होऊन खोटे दोष पसरविले जातात ती छेदंकरी भाषा होय. ज्या भाषणापासून मरणप्राय वेदना उत्पन्न होतात अथवा प्राण देखील जातो त्या भाषणाला भूतवधकरी भाषा म्हणतात. याप्रमाणें ही दहा प्रकारचीं निंद्य संभाषणें आहेत त्यांचा अवश्य त्याग करावा.

**चार विकथेचा त्याग करावा**

याशिवाय स्त्रियांच्या हावभाव विलास विभ्रमरूप क्रीडा, व्यभिचारादि संबंधीं संभाषण, कामोत्पादन करून ब्रम्हचर्याचा नाश करणाऱ्या स्त्रीसंबंधी कथा, जेवणखाणाविषयीं लालसा उत्पन्न करणाऱ्या गोष्टी, भयंकर कर्म करण्यास उत्सुक करणाऱ्या मोठमोठ्या राजाच्या पराक्रमाच्या कथा, चोरांच्या कथा, लबाड भेषधारी साधूंच्या कथा, अनेक प्रकारांनीं द्रव्य संपादन करण्याविषयीं प्रोत्साहन देणाऱ्या कथा, दुष्टांचा व शत्रूंचा तिरस्कार उत्पन्न होण्यासारख्यां गोष्टी, हिंसेला पुष्टी देणाऱ्या गोष्टी, वेद स्मृति पुराण वगैरे अनेक शास्त्रांतील खोट्या कथा सागणें किंवा ऐकणें योग्य नाहीं. याप्रमाणें पाप उत्पन्न करणाऱ्या अप्रिय भाषणाचा त्याग करावा.

ज्ञानी पुरुषांनीं वरील मुख्य चार असत्य भाषा क्रोधानें, लोभानें, मद्देनें, गर्वानें, भयानें अथवा द्वेषानें कधींही बोलूं नयेत. नेहमीं आपलें व दुसऱ्याचें हित होईल असेंच बोलावें. जीवावर ज्याप्रमाणें हित व मित भाषणापासून उपकार होतो अथवा त्याला जसें शांति व सुख होतें तशी शांति व तसें सुख चंद्रकांतमणि, जल, चंदन अथवा मुक्ताफलासारख्या इतर कोणत्याही पदार्थापासून होत नाहीं. धर्मरक्षण होत असेल, एखाद्या प्राण्यावर उपकार होऊन तो दुःख मुक्त होत असेल तर त्याठिकाणीं कोणीही न विचारतांही बोलावें. जेथें आपलें अथवा परक्याचें हित होणार नाहीं तेथें मुळींच न बोलतां मौन धरावें.

**परहित होईल असेंच बोलावें**

सत्य बोलण्यापासून अनेक फायदे आहेत. त्यांतून एक फायदा असा आहे कीं, सत्यवचनी

पुरुषाला सर्व विद्या सिद्ध होतात. दुसरें, त्याच्या कर्मांची निर्जरा होतें. तिसरें, सत्यवचनाच्या प्रभावानें अग्नि, जल, विष, सिंह, सर्प, दुष्ट देव व मनुष्यें कोणत्याही प्रकारें आपणास उपद्रव देऊं शकत नाहींत. उलट आपल्या सत्य भाषणाच्या प्रभावानें अनेक देवदेवता वश होतात. सत्यवचनापासून आपली प्रीति व ज्ञान वाढतें. सत्यवादी मातेप्रमाणें जगांत सर्वांच्या विश्वासाला पात्र होतो. त्याची गुरुप्रमाणें सर्वत्र पूज्यता मानिली जाते. तो सर्वांना मित्रासारखा प्रिय होतो. त्याची सर्वत्र उज्वल कीर्ती पसरूं लागते. तपश्चरण, संयमादिक क्रियेला सत्यवचनापासून विशेष शोभा येते.

सत्य वचनाचे फायदे

अमृतासारख्या मिष्ट अन्नांत ज्याप्रमाणें विष कालविलें असतां त्याचा नाश होतो त्याप्रमाणें असत्य भाषणापासून अहिंसादिक पंच महाव्रतांचा व इतर सर्व गुणांचा नाश होतो. असत्य भाषण करणाऱ्याचीं जगांत निंदा होऊन त्यावर कोणी विश्वास ठेवीत नाहीं. असत्य भाषणापासून जगांत अपकीर्ति होते. अपवाद येतो. आपल्याला व दुसऱ्याला दुःख उत्पन्न होऊन वैर, कलह, भय, शोक उत्पन्न होतो. असत्य भाषण करणाराला वध, बंधन, जिव्हाछेदन, सर्वस्वहरण, तुरुंगवास, अपमृत्यु व दुर्ध्यान यांचें दुःख भोगावें लागतें. तसेंच व्रत, शील, संयम, तपश्चरणाचा नाश होऊन नरकतिर्यंचादि दुर्गतीला जावें लागतें. याशिवाय भगवंताच्या आज्ञेचा अवमान होऊन परमागमाचें रहस्य समजून घेण्याची पात्रता अंगीं येत नाहीं. त्यामुळें रात्रंदिवस पापास्रव घडून जन्माचें मातेरें होतें. याप्रमाणें असत्य बोलण्यापासून हजारों दोष घडून येतात.

असत्य भाषणाचे परिणाम

सत्पुरुष नेहमीं हित, मित व प्रिय असेंच सत्य वचन मुखांतून उच्चारण करीत असतात. संसारांत मधुर शद्बाची उणीव नाहीं. हजारों गोड व कर्णमधुर वाक्यें बोलण्यासारखीं उपलब्ध असतांना निंद्य व कटु वचन बोलण्यास कां उद्युक्त व्हावें समजत नाहीं. हाच हेतु मनांत ठेऊन आचार्यांनीं वरचेवर उपदेश केलेला आहे कीं, ' बाबानो, प्राण गेला तरी हरकत नाहीं पण नीच लोकांप्रमाणें निंद्य वचन तुम्ही बोलूं नका. नीचपणा अथवा उच्चपणा याची पारख वचनावरूनच होत असते. म्हणून निंद्य वचनाचा त्याग करून गोड असें मधुर, पथ्य व धर्मयुक्त वचन बोला, जे दुसऱ्याला दुःख होईल असें बोलतात, कोणावर खोटा आळ आणण्याचा प्रयत्न करतात त्यांची पापामुळें बुद्धिभ्रष्ट झाली आहे असें समजावें. असें संभाषण नेहमीं करणाऱ्याची जिव्हा व टाळू नाहींशी होते, डोळे जातात, पाय जातात व रात्रंदिवस दुर्ध्यान घडल्यामुळें त्यांना नरकतिर्यंचगतीला जावें लागते. या उलट सत्य वचनापासून कीर्ती वाढून द्वादशांगवाणीचें ज्ञान प्राप्त होतें. क्रमानें राजा, महाराजा, चक्रवर्ति, इंद्र, महर्धिकदेव व तीर्थंकर पदवी प्राप्त होऊन शेवटीं निर्वाण प्राप्त होतें. म्हणून अशा सर्वोत्कृष्ट सत्य धर्माचा तुम्ही अंगीकार करा.

मधुर बोलावें

## संयम

अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रम्हचर्य आणि परिग्रह त्याग हीं पांच महाव्रतें होत. या व्रताच्या एक-देशपालनाला अणुव्रत म्हणतात. याच्या उलट हिंसा, चोरी, लबाडी, मैथुन सेवन आणि अपरिमित परिग्रह त्यांना पंच महापापें म्हणतात. या पंचमहापापांचा सर्वथैव त्याग केल्यानें महाव्रत घडतें व एकदेश त्याग केल्यानें अणुव्रत घडतें.

**संयमाचे लक्षण**

इर्यासमिती, भाषासमिति, एषणासमिति, आदाननिक्षेपण व प्रतिष्ठापना अशा पांच समिति आहेत. चालतांना मागे, पुढें, आजूबाजूस पाहून कोणत्याहि जीवाची हिंसा न घडेल असें चालणें ही ईर्यापथसमिति, हित मित व प्रिय संभाषण करणें ही भाषासमिति, निर्दोष शुद्ध आहार ग्रहण करणें ही एषणासमिति, शास्त्रादि उपकरणीं काळजीपूर्वक पाहून, जागा झाडून ठेवणें किंवा घेणें ही आदाननिक्षेपणसमिति; आणि अन्य जीवांना त्रास न होईल किंवा ग्लानि न येईल अशा ठिकाणीं मलमूत्र कफादिक टाकणें ही प्रतिष्ठापनासमिति होय. या पंच समितीचें व पंच महाव्रताचे पालन करणें, क्रोधमानमायालोभ या चार कषायांचा निग्रह करणें, मनवचनकायेची अशुभ प्रवृत्ति न होऊं देणें, आणि पंचेंद्रियांना त्यांच्या विषयापासन परावृत्त करून ताब्यांत ठेवणें यांस संयम म्हणतात.

या संयमाची प्राप्ति होणें महाकठीण असते. कारण ज्यांचा पूर्वीच्या अशुभ कर्माचा उदय अत्यंत क्षीण झालेला असून मनुष्य जन्म, उत्तम देश, उत्तम कुल, उत्तम जाति, इंद्रिय परिपूर्णता, नीरोगता, कषायांचा अनुद्रेक, उत्तम संगति, जिनेंद्र भगवंताच्या आगमाचें परिशीलन, सद्‌गुरूचा संयोग सम्यग्दर्शन वगैरे सामग्री प्राप्त झालेली असते त्यांनाच अप्रत्याखानावरणीय कर्माच्या क्षयोपशमापासून संसारदेहभोगादिकां विषयीं विरक्तता उत्पन्न होऊन देशसंयम प्राप्त होतो. आणि ज्यांना अप्रत्याखान आणि प्रत्याखान या दोन कषायांचा क्षयोपशम होतो त्यांना सकलसंयम प्राप्त होतो. म्हणून त्याची प्राप्ति होणें महाकठीण असे म्हटलें आहे. नरकगती, तिर्यंचगति आणि देवगति या तीन गतींत तर संयम प्राप्तीची अनुकूलता नाहीं. क्वचित तिर्यंच योनींत एखाद्या तिर्यंचाला त्याच्या स्थितिप्रमाणें संयमाची कांहीं कारणें प्राप्त होतात. मनुष्यगतींत सर्वांनाच संयम प्राप्त करून घेण्याची पात्रता असते असें नाहीं. नीच कुलोत्पन्न, अपूर्ण इंद्रियें असणारा, सदा रोगी, दरिद्री, विषयी, क्रोधी आणि नेहमीं निंद्यकर्म करण्याकडे प्रवृत्ति असणाऱ्या मनुष्याला संयम प्राप्ति होत नाहीं. नीच कुलांत किंवा अधम देशांत जन्म झाला, इंद्रियें परिपूर्ण नसलीं, ज्ञान प्राप्त करून घेण्याचीं साधनें अपूरीं असलीं, स्वतः सदैव रोगांनीं व्याप्त असला, अठराविश्वे दारिद्र्य घरीं नांदत असलें, स्वतःचा ओढा अन्यायमार्गाकडे अथवा विषयोपभोगाकडे असला, क्रोधादिक विकारांचें यत्किंचित् कारण मिळतांच प्राबल्य झालें, निंद्यकर्म करण्याची प्रवृत्ती वाढत चालली, तर अशा स्थितींत संयम कसा साधेल ? कधींही साधणार नाहीं. यावरूनही संयम प्राप्त होणें दुर्लभ आहे हेंच ठरतें.

**संयम प्राप्तीची दुर्लभता**

अशी अनुकूल परिस्थिति असणाऱ्यालाच संयमप्राप्तीचा उपाय सुचतो. ज्याला संयम-प्राप्तीचीं साधनें हातीं आलीं त्यानें पुन्हां विषयाकडे प्रवृत्त होऊन तीं गमावून बसणें म्हणजे जन्म मरणांचे फेऱ्यांत सापडणें होय. अर्थात् त्याला आत्मशुद्धि करून घेतां येणें

संयम त्यागाचें फल

अशक्य होय. संयम धारण करून तो सोडणाऱ्या पुरुषाला अनंतकाल नरकनिगोदगतींत भ्रमण करावें लागतें. संयम धारण करून तो बिघडविणें यासारखी दुसरी अनर्थावह गोष्ट जगांत नाहीं. त्या पुरुषाची स्थिति प्राप्त झालेलें अमूल्य चिंतामणि रत्न कवडीमोलानें विकण्यासारखी आहे अथवा जळणाकरितां कल्पवृक्ष तोडणाऱ्या मूर्ख पुरुषासारखी आहे. विषयसुख हें खरें सुख नव्हे. तो केवळ सुखाभास आहे. विषयसुख हें क्षणभंगुर असून भयंकर दुःखांचें कारण आहे. किंपाकफल खातानां गोड लागतें पण शेवटीं जसें अत्यंत दाह-कारक ठरतें तद्वत् हे इंद्रियजन्यभोग अज्ञानामुळें जीवांना शेवटीं सुख देतात असें वाटतें पण शेवटीं त्यामुळें दुःख भोगणेंच प्राप्त होतें म्हणून संयमपालनासाठीं प्रयत्न करणें इष्ट आहे.

इंद्रियांना विषयप्रवृत्त न होऊं देणें, कषायांचा नाश करणें, दुर्द्धर तपश्चरण करणें, रस-त्याग करून आहारावरील प्रेम कमी करीत जाणें, मनांत संकल्पविकल्प होऊं न देणें, मोठमोठे कायक्लेश सहन करणें, अनशनादिक बाह्य तपश्चरण करून शरीर कृश

संयम कशानें घडतो

करणें, अंतःकरणांतून लोभाची व परिग्रहाची लालसा कमी करीत जाणें, त्रसस्थावर जीवांची रक्षा करणें, मनवचनकायेच्या प्रवृत्तीला आळा घालणें, शरीराच्या इतर अवयवांना स्वैर न वागूं देणें, जाण्यायेण्याची क्रिया बंद ठेवणें, मनांत सदैव दया जागृत ठेवणें, सतत परमार्थाचा विचार करीत राहून परमात्म्याचें ध्यान करणें वगैरे गोष्टींनीं संयम घडतो. संयमामुळें सम्यग्दर्शन दृढ होतें व संयम हाच मोक्षाचा मार्ग आहे. याशिवाय मानवजन्म व्यर्थ होय. आजपर्यंत संयम धारण न केल्यामुळेंच अनेक दुर्गति प्राप्त झाल्या. संयमाशिवाय ज्ञान, बुद्धि, शरीर वगैरे सर्व प्राप्त होऊन उपयोग नाहीं. संयमाशिवाय दीक्षा, व्रतवैकल्य, नग्नपणा, साधुत्व हेंही व्यर्थ. म्हणून संयमधारण करणें हेंच युक्त आहे.

संयमाचे इंद्रियसंयम आणि प्राणसंयम असे दोन भेद आहेत. ज्याला विषयापासून इंद्रि-यांची प्रवृत्ति हटवितां आली नाहीं, व षट्काय जीवांची विराधना करण्याचें ज्यानें सोडिलें नाहीं, त्यानें बाह्य तपश्चरण कितीही कठिण रीतीनें केलें, परिषहसहन केलें व

संयमाचे भेद

दीक्षा धारण केली तरी त्याचा कांहींही उपयोग नाहीं. संसारांतील दुःखी जीवांना संयमाशिवाय इतर कोणीही शरण जाण्यास योग्य नाहीं असें ज्ञानी व सत्पुरुषांनीं म्हटलें आहे. ते नेहमीं असेंच चिंतन करीत असतात कीं, संयमावांचून आमच्या आयुष्यांतील एक क्षणही फुकट न जावो. संयमाशिवाय आयुष्यभर जगणें व्यर्थ आहे. संयम हाच इहपरभवीं शरण जाण्यायोग्य आहे. संयम हा दुर्गतीरूप सरोवराला शोषण करण्यास सूर्यासारखा

आहे. संयम ग्रहण करण्यानेंच संसाररूपी विषम वैऱ्याचा नाश करण्याचें सामर्थ्य प्राप्त होतें. संसार-परिभ्रमण संयम धारण केल्यावाचून कधींही संपावयाचें नाहीं, असा नियम आहे. सारांश, जो अंतरंगांत कषाय उत्पन्न होऊं देऊन आत्म्याला मलिन होऊं देत नाहीं व बाह्यतः यत्नाचार पूर्वक प्रमादरहित वर्तन करितो त्याचें हातूनच संयम धर्माचें पालन घडतें. असें संयम धर्माचें वर्णन केलें. यापुढें तप धर्माचें स्वरूप सांगतों.

## तप.

इच्छेचा निरोध करणें याला तप म्हटलें आहे. हें तप चार आराधनेंत श्रेष्ठ आहे. सोन्याला ताव दिल्यानें जसें तें मलरहित होऊन शुद्ध होतें तद्वत् बारा प्रकारच्या अंतर्बाह्य तपश्चरणानें आत्माही कर्ममलरहित होऊन शुद्ध होतो. अज्ञानी जीव पंचाग्निसाधनांनीं व इतर कायक्लेशादिकांनीं शरीराला कृश करणें याला तप समजतात, पण वास्तविक तें तप नव्हे. शरीराला कृश केलें अथवा त्याला पुष्कळसा दंड दिला म्हणून काय होणार ? त्यामुळें आत्म्याचें कर्म-बन्धन नष्ट होत नाहीं. भेदविज्ञान झाल्याशिवाय आत्म्याचें यथार्थ स्वरूप समजत नाहीं. भेदविज्ञानानेंच आत्म्याचा स्वभाव आणि रागद्वेष-मोहादि भावकर्में हीं परस्पर भिन्न आहेत याची जाणीव होतें. जसजसें रागद्वेषादि विकार कमी होत जातात तसतसें आत्म्याचें ज्ञानदर्शनस्वरूप प्रगट होत जातें आणि तेंच तप होय. हीच दृष्टि समोर ठेऊन ठिकठिकाणीं उपदेश केला आहे. जर मनुष्यजन्म प्राप्त होऊन स्वपर-तत्त्वाचें ज्ञान झालें असेल तर मन व पंचेंद्रियें यांना रोंकून विषयापासून विरक्त व्हावें. संपूर्ण परिग्रहाचा त्याग करून बंधांत पाडणाऱ्या रागद्वेषप्रवृत्तीला सोडून पापाचें अवलंबन यापुढें न घडावें व ममता नाहींशी व्हावी म्हणून अरण्यांत जाऊन तपश्चरण करावें. याप्रकारचें तप सत्पुरुषांनाच घडतें. संसारी जीव मायेच्या-मोहाच्या जाळ्यांत फसलेले असतात त्यामुळें त्यांना निरंतर पापकर्म करावें लागतें व रोगादिकांच्या तीव्र वेदनेनें तसेंच स्त्रीपुत्रमित्रादिक कुटुंबाच्या व परिग्रहाच्या वियोगानें उत्पन्न झालेल्या आर्तध्यानांत मरण पावून दुर्गतीला जावें लागतें. संसारी जीवांना अरण्यवास धारण करून तपश्चरणाकडे प्रवृत्ति करण्याची बुद्धि होत नाहीं. ती क्वचितच कोणा महाभाग पुरुषांना होते.

तपाचें लक्षण

जे पापापासून विरक्त होऊन स्त्रीपुत्रधनादिकांवरचा मोह सोडून, धर्माला शरण जाऊन वीतराग निर्ग्रंथ गुरूची सेवा करण्यास तयार होतात व सद्गुरूला शरण जातात त्यांच्या अशुभ कर्माचा उदय मंद होऊन सम्यक्त्वरूपी सूर्याचा अंतःकरणांत उदय होतो. संसारविषयभोगादिकांविषयीं विरक्ति उत्पन्न होऊन ते तपश्चरण व संयम ग्रहण करितात. असें दुर्द्धर तपश्चरण करीत असतांना जर कोणी पापी जीव विषयासक्तीनें तें बिघडवितील, तर त्यांना अनंतानंत काल गेला तरी पुनः तपश्चरण करण्याची संधि प्राप्त होणार नाहीं. म्हणून मनुष्यजन्माला येऊन, तत्त्वाचें स्वरूप यथार्थ जाणून, पंचेन्द्रियांच्या विषयाला न भुलतां वैराग्यवृत्ति धारण करावी आणि सर्व परिग्रहांचा त्याग करून

खरें तप कोणतें ?

अरण्यांत जाऊन आत्मध्यानांत लीन व्हावें, हें खरें तप होय. परिग्रहावरील मोह नाहींसा करून इच्छेचा निरोध करणें व कामविकार अंतःकरणांत मुळींच उत्पन्न न होऊं देणें हेंच सर्वांत मोठें तप आहे. तसेंच नग्न दिगंबर रूप धारण करून शीतोष्ण हवेची वेदना व डांस, मच्छर, सर्प, विंचू, वगैरे प्राण्यांपासून होणारा उपद्रव यत्किंचित्‌ही न डगमगतां सोसणें हेंही तप आहे. भयंकर निर्जन गुहेंत व पर्वतांच्या दरींत विहार करणाऱ्या सिंह वाघ वगैरे क्रूर पशूंनीं व्यापलेल्या वनांत जाऊन निर्भयतेनें राहणें याचाही तपांत समावेश होतो. दुष्ट मनुष्य, शत्रु, चोर, शिकारी अथवा दुष्ट व्यंतरदेव अथवा हिंस्र पशु यांनीं उपसर्ग केला असतां न भिणें, त्याप्रसंगीं धैर्यानें परमसाम्य-भाव धारण करून परमात्म्याचें ध्यान करण्यांत लीन होणें, सर्व जीवांना सतवून सोडणाऱ्या राग-द्वेषांच्या वश न होतां त्यांना जिंकणें, याचना न करितां भिक्षेच्या प्रसंगीं श्रावकाच्या घरीं नवधा-भक्तिपूर्वक हातांत ठेवलेल्या सरस, नीरस, कडू, खारट, तुरट, आंबट आहाराविषयीं आसक्ति न ठेवतां, संक्लेशरहित निर्दोष व प्रासुक आहाराचें एकवेळ ग्रहण करणें, पांच समिति पाळणें, मन वचनकायेच्या प्रवृत्तीला चंचल न होऊं देणें, रागद्वेषरहित आत्मस्वरूपाचा अनुभव घेणें, स्वपर-तत्वाचा विचार करून त्याविषयीं वाटाघाट करणें, चार अनुयोगांच्या अभ्यासांत काल घालविणें, अभिमान सोडून सर्वांशीं नम्रतेनें वागणें, कपट सोडून सरळपणा अंगीं ठेवणें, क्रोध सोडून क्षमा धारण करणें, लोभ सोडून निर्वांछक बनणें, कर्मांचा नाश होऊन आत्मा स्वतंत्र होत जाईल अशी क्रिया करणें, शास्त्राभ्यास स्वतः करून लोकांना करविणें; शास्त्रांतील गूढ अर्थाचें प्रतिपादन करून त्याचा अर्थ लोकांस समजाऊन देणें, तपस्वी, देव, इंद्र यांचें स्तवन करून त्याविषयीं भक्ति प्रगट करणें या सर्वांना तप म्हटलें आहे.

तपश्चरणानें केवलज्ञान उत्पन्न होतें असा तपाचा अचिंत्य प्रभाव आहे. असें तप आपल्या कडून घडावें असा विचार मनांत येणें ही कठिण गोष्ट आहे. नरक–तिर्यंच–देवगतीमध्यें तप कर-ण्याची योग्यता नाहीं. हें फक्त एका मनुष्यगतींतच घडतें. त्यांतही उत्तम कुल, उत्तम जाति,बल, बुद्धि, इंद्रियपरिपूर्णता वगैरे ज्याला अनुकूल असतील त्यालाच तें घडणार. तपाचे बाराभेद आहेत त्यांतून आपापल्या शक्तिप्रमाणें करीत असावें. भगवंतानीं जें तपाचें स्वरूप सांगितलें आहे तें बालकाला, वृद्धाला, धनवानाला, दरिद्र्याला, बलवंताला, दुर्बलाला, सर्व सामग्रीची सहायता असणाऱ्याला अथवा नसणाऱ्याला, कोणा-लाही करतां येण्याजोगें आहे. कोणालाही तें अशक्य नाहीं. ज्यायोगें वात, पित्त, कफादिक त्रिका-रांचा प्रकोप होऊन रोगांची वृद्धि होणार नाहीं व शरीर नेहमीं रत्नत्रय धर्म धारण करण्यास सहा-यीभूत बनून राहील असेंच तप शक्ति पाहून करावें. देश,काल, आहार वगैरेची अनुकूलता पहावी. दिवसेंदिवस उत्साह वाढत जाऊन परिणामांची उज्ज्वलता चढत्या प्रमाणावर होत जाईल असेंच तप करीत जावें. इच्छेचा निरोध करून विषयावरील प्रीति कमी करीत जाणें हेंच खरें तप आहे. तें मुख्य समजून बाकीच्या बाह्य साधनांनीं जसजसें तें पूर्णावस्थेला पोंचत जाईल तसतशी उच्च

तपाचा प्रभाव

क्रिया करून अखेर पूर्ण निर्वांछक बनावें. तप करण्यापासून सर्व जीवांचें कल्याण आहे. तपापासून निद्रा, काम, प्रमाद नष्ट होतो. म्हणून अभिमान सोडून यथाविधी बारा प्रकारचें तप सामर्थ्यानुरूप ग्रहण करावें. बारा प्रकारच्या भेदांचें वर्णन पुढें करूं. याप्रमाणें तपधर्माचें स्वरूप आहे. यापुढें त्यागधर्माचें वर्णन करितो.

### त्याग.

धन, संपत्ति, गाडी, घोडे वगैरे अनेक बाह्यपरिग्रह कर्मोदयापासून प्राप्त होतात. हे पराधीन असून नाशवंत आहेत. यामुळें आपल्या मनांत अभिमान, तृष्णा, तीव्र रागद्वेष वगैरे विकार उत्पन्न होतात. तसेंच यांचें संरक्षण करण्याकरितां अनेक पापक्रियां कराव्या लागतात. म्हणून जे सत्पुरुष या बाह्य परिग्रहाला हिंसादिक पंचमहापापांचें मूळ जाणून मुळींच ग्रहण करीत नाहींत ते खरोखर धन्य होत. कित्येक प्रथमतः हा सर्व खटाटोप गळ्यांत घेऊन मागाहून त्यांना हलाहल विषासारखें अथवा कुजलेल्या गवतासारखें जाणून तात्काल सोडून विरक्त होतात. त्यांचा महिमा पहिल्याहूनही अधिक आहे. कारण प्रथमतः ग्रहणच न करणें हें चांगलें, पण एकवेळ ग्रहण केल्यानंतर त्यावरील मोह कमी करणें फारच कठिण असतें. असा मोह जे कमी करितात त्यांचा पराक्रम अधिक समजला पाहिजे.

त्यागाचें लक्षण

कित्येक जीवांचा तीव्रराग अथवा मोह कमी होत नाहीं म्हणून त्यांना संपूर्णतया परिग्रहाचा त्याग होणें कठिण जाते. पण. धर्मावरील प्रीतिमुळें त्यांना पापाविषयीं भीति वाटते. ते आपले द्रव्याचा उत्तम पात्रावर उपकार करण्याच्या हेतूनें दान करण्यांत, आणि धर्मसेवक निर्धन लोकांना अन्नवस्त्रादि पुरविण्यांत उपयोग होईल असा विनियोग करितात. धर्मायतन ( म्हणजे धर्म साधला जाईल अशी स्थानें ) जिननंदिर, सरस्वतीभुवन, जिनसिद्धांत लेखन, उपकरण, पूजन, प्रभावना इत्यादि कार्यांत खर्च करितात. दुःखी, दरिद्री, रोगी लोकांवर करुणाबुद्धीनें उपकार व्हावा म्हणून जे आपलें तनमनधन लावितात त्यांचें धन आणि जीवितव्य सफल होतें असें समजावें. दान हें एक धर्माचें अंग आहे. तें शक्त्यनुरूप भक्तिपूर्वक निर्मल व गुणवान् पुरुषांना दिल्यानें परलोकीं सुखसामग्रीचा साठा बरोबर नेल्यासारखें आहे. दानाच्या प्रभावानें स्वर्गांतील आणि भोगभूमींतील निर्विघ्न सुखाची प्राप्ति होते. दानाचें माहात्म्य लहानापासून थोरापर्यंत सर्व जाणतात. ज्याला येथें अनेक प्रकारचें वैभव प्राप्त होतें तें पाहून असं म्हणण्याची रूढी पडली आहे कीं, ' त्यानें पूर्वजन्मीं दान दिलें आहे त्याचें फल अनेक प्रकारच्या सुखोपभोगाच्या रूपानें त्याला मिळत आहे, याप्रमाणें जो दान देईल त्यालाही असें फल प्राप्त होईल, म्हणून सुखसंपदेची इच्छा असेल त्यांनीं दान करण्यास तयार व्हावें. ज्यांनीं मरेतोंपर्यंत कवडी दखील न खर्चतां केवळ द्रव्याचा संचय करण्यांत काल घालविला, त्यांना सदैव आर्तरौद्रध्यानाचें चिंतन घडून मरणोत्तर सर्पव्याघ्रादिक तिर्यंचगतींत उत्पन्न व्हावें लागतें. तेथून पुनः निगोदांत जाऊन अनंत दुःख भोगावें लागतें,

स्वद्रव्याचा विनियोग दानांत करावा

त्यावेळीं धन बरोबर येत नाहीं. धन प्राप्त होऊन त्याचा जर सत्पात्रीं दान करण्यांत उपयोग केला तरच तें सफल म्हणतां येईल. एरव्हीं कोट्यवधि रुपयाचें धन घोर दुःखाचें कारण आहे.

**कृपणाची निंदा व उदाराची स्तुति**

इहलोकीं कृपण मनुष्याची सर्व जगांत निंदा होतेच. कृपण माणसाचें सकाळीं नामोच्चारण करणें अमंगल मानलें जातें. इतका कृपण माणसाविषयीं जगांत तिरस्कार असतो. या उलट दानी पुरुषांत कांहीं दोष असले तरी ते त्याच्या दातृत्व गुणामुळें झांकले जातात व जगांत त्याची कीर्ति पसरूं लागते. दान देण्यानें शत्रु देखील वैर सोडून आपले हित करणारे मित्र बनतात.

**दानाची थोरवी**

जगांत दानाची फार मोठी थोरवी आहे. थोड देखील दान खऱ्या भक्तीनें करणाऱ्या पुरुषाला भोगभूमींतील तीन पल्याचें सुखमय आयुष्य प्राप्त होऊन अंतीं स्वर्ग प्राप्त होतो. जगांत जर कोणती अत्यंत श्रेष्ठ पदवी असेल तर ती दानवीरता होय. दान देणाऱ्या पुरुषाइतका उच्च पुरुष संसारांत दुसरा नाहीं. दान देणें तें विनयपूर्वक मधुर वचन बोलून द्यावें. दानी पुरुषानें दान देत असतां आपण कोणावर मोठा उपकार करीत आहोंत अशी भावना ठेऊन दान देऊं नये व दानाचा अभिमान बाळगूं नये. दान देणाऱ्या पुरुषानें उलट ज्याला दान द्यावयाचें त्या पात्राला अत्यंत उपकार करणारा समजून त्याविषयीं आदर बाळगला पाहिजे. कारण लोभरूपीं अंधकूपांत पडलेल्या जीवांना पात्राशिवाय कोण उद्धरूं शकणार आहे ! दान घेणाऱ्या व्यक्ति जर संसारांत नसत्या तर लोभी पुरुषांचा लोभ कमी कसा झाला असतां व संसारांतून उद्धार करून नेणारें दान तरी कसें घडलें असतें ? म्हणून धर्मवान् पुरुषांना सत्पात्र व दान या दोहोंचा लाभ झाला असता त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही बाबतींत अधिक आनंद होत नाहीं. सत्पात्राला योग्य दान दिलें म्हणजे आपण फार थोर, ज्ञानी, श्रीमंत झाला असें ते समजतात. म्हणून सर्वांनीं दान देण्याचा क्रम ठेवावा.

**अभयदान**

षट्काय जीवांचें नेहमीं रक्षण करून त्यांना अभयदान द्यावें. अभक्ष्यभक्षण, अप्रमाण परिग्रह, अयत्नाचारपूर्वक क्रिया व इतर जीवांना दुःख हें मनवचनकायेकडून कधींही घडूं न देण्याचा प्रयत्न करावा. दुःखी जीवांना पाहतांच अंतःकरणांत करुणा यावी . यामुळें गृहस्थांना अभय दान घडतें व त्यापासून जन्मजरामरण, रोग, शोक, दारिद्य, वियोग, संयोग, संताप वगैरे आपत्तींचा त्रास होत नाहीं. हिंसेची वृद्धि करणाऱ्या व मिथ्याधर्माचा प्रसार करणाऱ्या युद्धशास्त्र, शृंगारशास्त्र, रसायन–शास्त्र, कपट, मंत्र, तंत्र, जारण, मारण, उच्चाटण, वशीकरण वगैरे अनेक पापाला प्रवृत्त करणाऱ्या शास्त्राचा अभ्यास करण्यांत काल घालवूं नये. यापासून आत्म्याचें यत्किंचितही हित न होतां उलट अनंत संसार परिभ्रमण करावें लागेल.

भगवान् वीतराग सर्वज्ञप्रभूंनीं वर्णिलेल्या दयामयी धर्माचें प्ररूपण करणाऱ्या शास्त्राचें अव-

लोकन करावें. स्याद्वाद म्हणजे अनेक धर्मात्मक वस्तूंचें प्रतिपादन करणाऱ्या नयप्रमाणात्मक शास्त्राचें अध्ययन करून आत्म्याचा उद्धार करण्याकरितां अशा शास्त्राचें दान करावें. तत्त्वाचें स्वरूप स्वतः समजून घेऊन त्याचा लोकांनाही उपदेश करावा. आपल्या मुलाबाळांना बालपणापासून धर्माची गोडी लावावी व इतर अन्य धर्मानुयायी तत्त्वजिज्ञासु लोकांना शास्त्रदान द्यावें. संसारांत सर्वत्र ज्ञानप्रसार व्हावा या हेतूनें पाठशाला स्थापन कराव्या म्हणजे त्यापासून ज्ञानदान घडतें. कारण सर्व धर्माचा मुख्य आधार ज्ञान आहे. जेथें ज्ञान जागृत असेल तेथेंच धर्माचें वास्तव्य राहणार. ज्ञानाच्या अभावीं धर्माचाही अभाव होणार. म्हणून धर्माच्या अस्तित्वाकरितां ज्ञानदान देणें अवश्य आहे. ज्ञानदानाच्या प्रभावानें आत्म्यांत केवलज्ञान उत्पन्न होण्याची शक्ति प्राप्त होते.

शास्त्रदान

याचप्रमाणें अनेक रोगांचा नाश करणाऱ्या प्रासुक औषधांचें दान करावें. औषधदानापासून फार उपकार घडतो. रोगी माणसांना जर तयार औषध मिळण्याची सोय झाली तर त्यांना मोठा आनंद होतो. गरीब आणि ज्यांची कोणी सेवा करणारा नाहीं अशा असहाय माणसांना जर तयार औषध मिळालें तर एखाद्या दरिद्री पुरुषाला धन सांपडल्याइतका आनंद होतो. औषध ग्रहण केल्यापासून रोग नाहींसे होतात व त्यामुळें व्रत, शील, संयम, तपश्चरण करतां येतें. तसेंच शरीर निरोगी झाल्यानें ज्ञानाभ्यास वाढवून आत्म्याचें कल्याण करून घेतां येतें. औषध दान देणाऱ्या पुरुषामध्यें सम्यग्दर्शनाचीं इतर अंगें वात्सल्य, स्थितीकरणत्व, निर्विचिकित्सता वगैरे दिसून येतात. औषधदानाच्या प्रभावानें पुढील जन्मीं सप्तधातुवर्जित निरोगी अशा देवाचें वैक्रियक शरीर प्राप्त होतें.

औषधदान

याचप्रमाणें आहार दान हेंही सर्व दानांत श्रेष्ठ आहे. प्राणिमात्रांचें जीवन, शक्ति, बल, बुद्धि वगैरे सर्व गुण आहाराशिवाय नष्ट होतात. ज्यानें आहारदान केलें त्यानें वरील सर्व गुणांचें दान केलें असें होतें. आहारदानापासून मुनि आणि श्रावक यांचा धर्म पाळला जातो. आहार नसता तर सर्व धर्ममार्ग भ्रष्ट झाले असते. आहारापासूनही अनेक रोग नाहींसे होतात. आहारदान देणारा कोणीही असो, तो मिथ्यादृष्टी असला तरी आहारदानाच्या प्रभावानें भोगभूमींत उत्पन्न होऊन तेथें कल्पवृक्षापासून प्राप्त होणाऱ्या दहा प्रकारच्या भोगांचा असंख्यात काल अनुभव घेतो. तेथें क्षुधा तृषेची बाधा फारच कमी होते. भोगभूमींत तीन दिवसाआड बोराएवढा आहार घेण्यानें क्षुधा शमते. कोणतेंही दुःख तेथें नसतें. असंख्यात वर्षे तेथील सुख भोगून पुढे देवलोकांत जन्म होतो. म्हणून जर कांहीं द्रव्यसंचय असेल तर त्याचा या चतुर्विध दानांत उपयोग करून वरील फल प्राप्त करून घ्यावें. निर्धन पुरुषानें देखील आपल्या आहारांतून शक्य तितका भाग बाजूला काढून तो दुःखित बुभुक्षितांना देऊन नंतर आहार ग्रहण करावा. ज्याला एक वेळचें पोटभर अन्न देखील मिळत नाहीं त्यानें देखील मिळेल त्यांतून दोन घास तरी बुभुक्षिताला देऊन नंतर शेष राहील तेवढ्यांत संतोष मानून राहावें, पण दान केल्यावाचून राहूं नये.

आहारदान

याचप्रमाणें मुखावाटें मधुर वचन काढणें, गोड बोलणें, कोणाचाही आदर सत्कार-करणें, नम्रपणानें व विनयानें अभ्यागताचें स्वागत करून उच्चासनावर बसविणें, कुशल समाचार विचारून त्याला आनंदित करणें वगैरे क्रिया करणें हेंही महादान आहे. मनांत दुष्ट संकल्प विकल्प उत्पन्न होऊं देऊं नये. पापक्रियेकडे प्रवृत्ति करूं नये. कामक्रोधादिक विकारांच्या स्वाधीन होऊं नये. विकथा बोलूं नये. दुसऱ्याचे खरे खोटे दोष आपल्या मुखावाटें काढूं नये. अन्यायानें कोणाचेंही धन ग्रहण करण्याची इच्छा करूं नये. याप्रमाणें ज्यांना स्वतःच्या आत्म्याचें हित करून घ्यावयाचें आहे त्यांनीं वागावें व नेहमीं दुःखी, भुकेले, दीन लोक पाहून त्यांना दान द्यावें. सम्यग्दर्शनादि गुणांना धारण करणारे भेटल्यास त्यांचा सन्मान करावा. सव जीवांवर करुणा करावी. मिथ्यादर्शन उत्पन्न होऊं देऊं नये. रागद्वेषी व मोही अशा कुदेवांना आरंभ परिग्रह धारण करणाऱ्या भेषधारी गुरूंना, हिंसा करण्यास प्रोत्साहन देणाऱ्या शास्त्रांना वंदन करूं नये व त्यांची स्तुति करूं नये. रात्रंदिवस काम, क्रोध, मान, माया, लोभ हे विकार नाहींसे होतील असाच प्रयत्न करीत असावें. कोणालाही दुःख उत्पन्न होईल, अप्रिय वाटेल असें भाषण, अपमान करणारें वचन आणि अभद्र शब्दांनीं भरलेलें संभाषण गर्वानें उद्धत होऊन आपल्या मुखावाटें उच्चारूं नये. याप्रमाणेंच दुसऱ्यांना दुःख उत्पन्न होऊन जगांत आपल्या कीर्तीला कलंक लावणारी कोणतीही मनवचन-कायेची क्रिया कधींही घडूं न देणें याला त्यागधर्म म्हटलें आहे त्याचा अंगीकार करावा. असें त्यागधर्माचें स्वरूप वर्णिलें. यापुढें आकिंचन्य धर्माचें स्वरूप सांगतों.

कोणाचेंही मन दुखवूं नये

## आकिंचन्य.

आपल्या ज्ञानदर्शन स्वरूपाशिवाय दुसरें कोणतेंही आपलें स्वरूप नव्हे. अन्य द्रव्यें आपलीं नव्हेत व आपणही अन्य द्रव्य स्वरूपाचे नाहीं, असा विचार करणें याला आकिंचन्य धर्म म्हणतात. यांत आत्म्याला उद्देशून असा विचार करावा कीं, "हे आत्मन्, तूं शरीराहून भिन्न, ज्ञानस्वरूपी, अन्यद्रव्याच्या उपमेनें रहित. स्पर्शरसगंध-वर्णविवर्जित, स्वाधीन, ज्ञानानंदसुखानीं परिपूर्ण, अतीन्द्रिय, व निर्भय आहेस असें जाणून घे. अर्थात् देह म्हणजे मी नव्हे. देह रक्त, मांस, हाड, पू व चर्म यांनीं बनलेला अचेतन आहे. त्याहून आपण अत्यंत भिन्न आहोंत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र जातिकुलादिक वगैरे शरीराचे आहेत. त्यांत माझा संबंध नाहीं. स्त्रीपुरुष-नपुंसक-लिंगाचा भेद शरीराशीं आहे, माझ्याशीं नव्हे. गोरा, काळा, राजा, रंक, स्वामी, सेवक, पंडित, मूर्ख हीं सर्व विशेषणें कर्माच्या उदयानें शरीराला प्राप्त होतात. त्याचा माझ्याशीं कोणताही संबंध नाहीं. मी ज्ञायक असून शरीराशीं ज्यांचा संबंध होतो तें कांहीं माझें स्वरूप नव्हें. माझ्या स्वरूपाला अन्य द्रव्याची उपमाच देतां येत नाहीं. थंड, गरम, मृदु, कठोर, स्निग्ध, रूक्ष, हलका, भारी हे आठ प्रकारचे स्पर्श आहेत. तेही माझें स्वरूप नसून पुद्गलाचे विकार आहेत. तिखट, खारट, तुरट,

आकिंचनाचें लक्षण

स्वस्वरूपाचें चिंतन

आंबट आणि कडू हे पांच प्रकारचे रस, सुगंध आणि दुर्गंध, काळा, पिवळा, पांढरा, हिरवा आणि तांबडा असे पांच वर्ण, हेही माझे स्वरूप नव्हे. हे सर्व पुद्गलाचें स्वरूप म्हणवितात. माझा स्वभाव सुखमय आहे. पण मी कर्माच्या स्वाधीन होऊन राहिल्यानें दुःखानें गांजलेलों आहे. माझें स्वरूप इंद्रियाला समजणारें नाहीं, अतीन्द्रिय आहे. इंद्रियें हीं पुद्गलाचे विकार असून कर्मामुळें प्राप्त होतात. मी निर्भय, अविनाशी, अखंड, आद्यंतरहित, शुद्ध व ज्ञानस्वभावी आहे. परंतु अनादिकालापासून जसें सोनें आणि माती एकत्र मिळालेली आहे त्याप्रमाणें अथवा दुध पाण्याप्रमाणें मीही कर्माशीं मिळून गेलों आहे. त्यांतून मिथ्यात्व नामक कर्माच्या उदयानें मला माझ्या स्वरूपाचें ज्ञान होत नाहीं. देहादिक परद्रव्याला आपलें स्वरूप जाणून अनंत कालापासून मिथ्यात्वानें परिभ्रमण करावयास लावल आहे. आतां यत्किंचित् त्याचें आवरण दूर झाल्यानें व भगवंताच्या परमागमाच्या परिशीलनानें मला स्वपररूपाचें ज्ञान झालें आहे. हिऱ्या माणकाचा व्यापार करणारा जोहरी ज्याप्रमाणें गुरुकृपेनें व सतत अभ्यासानें रत्नाच्या अनेक अलंकारांतून खरीं खोटीं रत्नें कोणतीं, त्यांत रंग देऊन बसविलेली कांच कोणतें, प्रत्येकाचें वजन व किंमत किती वगैरे वेगवेगळे जाणूं शकतो, त्याप्रमाणें मी परमागमाच्या निरंतर अभ्यासानें माझ्या ज्ञानस्वभावांत मिसळलेल्या रागद्वेषमोहकामादिक विकारांना वेगळें जाणलें आहे व या सर्वांहून आत्मा वेगळा आहे असा माझा पक्का निश्चय झाला आहे. म्हणून अतःपर त्या रागद्वेषादिक कर्मावर अथवा कर्मोदयानें प्राप्त होणाऱ्या विनश्वर शरीरधनधान्यादि परिग्रहावर पुनः ममत्वबुद्धि इहजन्मीं व परजन्मीं उत्पन्न होणार नाहीं अशा आकिंचन्य भावनाचें चिंतन करतों.

हा आकिंचन्य विचार अनादिकालापासून कधींही मनांत आला नाहीं. आजपर्यंत सर्व परपदार्थांनाच आपलें जाणिलें व रागद्वेषमोहकामक्रोधादि परिणाम कर्मकृत असून त्यांनाही आपलेच मानलें. या विपरीतभावनेनें घोर कर्मबंध करून घेतला. यापुढें या आकिंचन्य भावनेंत कोणतेंही विघ्न येऊं नये म्हणून मी पंच परम-गुरूला शरण जातों. त्रैलोक्यांत मला या आकिंचन्य भावनेखेरीज दुसरी कोणतीही इच्छा न घडो अशी अनन्यभावें प्रार्थना करितों. ही आकिंचन्य भावनाच संसार समुद्रांतून तारण्यास जहाजाप्रमाणें माझ्या उपयोगीं पडणारी होवो.

स्वपरभेद विज्ञान

परिग्रह बंधाचे कारण आहेत त्याविषयीं आकांक्षा उत्पन्न न होऊं दिली म्हणजे आकिंचन्य धर्म घडतो. हा धर्म ज्यानें ग्रहण केला त्याला परिग्रहाची इच्छा कधींही होत नाहीं. त्याचें चित्त आत्मध्यानांत लीन होतें. देहादिक बाह्य पदार्थाविषयीं आपलेपणा राहत नाहीं. स्वस्वरूप जें रत्नत्रय त्याचा विचार करण्यांत मन रममाण होतें. इंद्रियांच्या विषयाकडे धांव घेणारें मन शांत होतें. शरीरावरील प्रेम नाहीसें होतें. सांसारिक व देवादिकांचे सुख, चक्रवर्तीचें किंवा अहमिंद्राचें सुखदेखील दुःखरूपच वाटूं लागतें. मग तें प्राप्त व्हावें अशी त्याला इच्छा उत्पन्न होत नाहीं. परिग्रह

परिग्रह त्यागानें आकिंचन्य घडतें.

म्हणजे धन, धान्य, रत्न, सुवर्ण, स्त्री, पुत्र वगैरे पदार्थावरील प्रेम हें जीर्णतृणाप्रमाणें नाहींसें करण्यांत कांहींच क्लेश होत नाहींत.

आकिंचन्य म्हणजे परम वीतरागपणा. हा गुण ज्यांना यापुढें संसार परिभ्रमण घडावयाचें नसेल त्यालाच प्राप्त होतो. हा गुण ज्याला लाधतो त्याला परमार्थाचा म्हणजे शुद्ध आत्म्याचा विचार करण्याची शक्ति प्रगट होते व पंच परमेष्ठीविषयीं अत्यंत भक्ति, दुष्ट संकल्पविकल्पांचा नाश, इष्टानिष्ट पदार्थाविषयीं रागद्वेषांचा अभाव वगैरे अनेक गुण प्राप्त होतात. याचप्रमाणें स्वादिष्ट भोजनाविषयीं लालसा नाहींशी होऊन कसा तरी पोटाचा खड्डा भरण्याकरितां सरसनीरस आहार निर्विकार मनानें घेण्याची प्रवृत्ति होते. सर्व धर्मांत आकिंचन्य हाच प्रधान धर्म आहे. याच्या चिंतनानें मोक्षाचा मार्ग संनिध होतो.अनादिकालापासून जेवढे म्हणून सिद्ध झाले ते याच धर्मानें व पुढें होणार तेंही याचाच अंगीकार करून मुक्त होतील. हा धर्म संपूर्णतया योगीश्वर अथवा साधु लोकांकडून पाळला जातो. तरी अंशतः गृहस्थांना याचें पालन करतां येतें.गृहस्थानें आपल्या अवस्थेंत आपलें रागद्वेष कमी करून विरक्त बनावें. परिग्रहाचें प्रमाण करावें. पुढील निदान बांधू नये. अन्यायानें धन कधींही ग्रहण करूं नये. थोड्या परिग्रहांत संतुष्ट राहावें व परिग्रह दुःख देणारे असून इतर सर्व पदार्थ अस्थिर आहेत असा विचार करावा. याप्रमाणें वागणाऱ्या गृहस्थाला हा धर्म घडतो. असें आकिंचन्य धर्माचें स्वरूप वर्णिलें. पुढें ब्रह्मचर्याचें स्वरूप सांगतों.

आकिंचन्याचे फायदे.

## ब्रह्मचर्य.

प्रथमतः ब्रह्मचर्य याचा शब्दशः अर्थ काय आहे तो पाहूं. सर्व विषयावरील अनुराग नाहींसा करून ब्रह्म म्हणजे ज्ञायकस्वभावी आत्म्याच्या ठायीं चर्या म्हणजे प्रवृत्ति होणें याला ब्रह्मचर्य म्हणतात. हें व्रत फार कठिण आहे. संसारांत प्रत्येक प्राणी विषयाच्या अधीन असल्यानें नेहमीं आत्मज्ञान पराङ्मुख असतो म्हणून त्याला हें व्रत धारण करवत नाहीं. जीं माणसें देवतुल्य असतात तींच हें व्रत धारण करण्यास समर्थ होतात. इतर विषयलोलुपी जीवांना हें ग्रहण होणें शक्य नाहीं. म्हणूनच हें व्रत सर्वांत दुर्धर आहे असें म्हटलें आहे. जे लोक हें व्रत धारण करितात त्यांना इंद्रियें वश होऊन रागद्वेषादिक विकारांना सहज जिंकता येतें. म्हणून स्त्रीसुखांत अनुरक्त होणाऱ्या मनरूपीं मदोन्मत्त हत्तीला वैराग्यचिंतनाकडे लावून विषयाशेचा नाश करावा.

ब्रह्मचर्याचें लक्षण

काम हा चित्तरूपीं भूमींत उत्पन्न होतो व याच्या वेदनेनें मनुष्य न करण्यायोग्य अशीं नीच कर्में करण्यास प्रवृत्त होतो. हा काम मनाचें मंथन करतो, त्याचें ज्ञान नष्ट करतो म्हणून त्याला मन्मथ असेंही नांव आहे. एकदां ज्ञान नाहींसें झालें म्हणजे स्त्रियांच्या निंद्य व दुर्गंधी शरीराविषयीं प्रेम उत्पन्न होतें व कामानें अंध होऊन अनेक प्रकारची अनीति करण्याची प्रवृत्ति वाढते. स्वस्त्री परस्त्रीचा विचार

काम वेदनेपासून अनर्थ

राहत नाहीं. परस्त्रीकडे पापबुद्धीनें पाहण्यापासून प्रसंगीं मरावें लागेल, राजा तीव्र दंड देईल, कीर्तीला बट्टा लागेल, धर्मभ्रष्ट व्हावें लागून सत्यार्थ-बुद्धीचा नायनाट होईल, मरणानंतर नरकांतील भयंकर दुःख असंख्यात कालपर्यंत भोगावें लागेल, पुनरपि पशुयोनींत उत्पन्न व्हावें लागून तेथील दुःख भोगावें लागेल. तेथून पुनः कुमनुष्य-योनींत जन्म घ्यावा लागून तेथें आंधळा, पांगळा, कुबडा, रोगी, दरिद्री, इंद्रियहीन, बहिरा, मुका व्हावें लागून चांडाळासारख्या नीच योनींत जन्म घ्यावा लागेल. पुनः त्रसस्थावर-योनींत जावें लागेल. याप्रमाणें एकसारखें परिभ्रमण चालू राहील. या गोष्टींचा मुळींच विचार मनांत येत नाहीं. कामाच्या शब्दार्थावरूनच त्याची शक्ति प्रगट होते. कं म्हणजे खोटा, दर्प म्हणजे गर्व उत्पन्न करणारा म्हणून याला कंदर्प असें नांव आहे. दुष्ट संकल्प उत्पन्न करून दुःख देणारा म्हणून याला कंदर्प असें म्हटलें आहे. तियच योनींत आणि मनुष्ययोनींत यामुळेंच परस्पर द्वेष उत्पन्न होऊन मरेपर्यंत तंटे व वैर होतें. म्हणून याला ' मार ' असें नांव आहे. संवराचा हा अरि म्हणजे शत्रु आहे म्हणून याला संवरारि ह्मणतात. ब्रह्म म्हणजे तप संयमादि क्रिया त्यापासून सुवति म्हणजे चलायमान करणारा म्हणून ' ब्रम्हसू ' असें ही नांव आहे. याप्रमाणें कामाचे दोष दाखविणारीं शेंकडों नांवें आहेत. त्याचा विचार करून हा उत्पन्न न होईल असा उपाय योजणें अवश्य आहे.

कामविकार उत्पन्न न होण्यासाठीं शरीर व आत्मा हे परस्पर अत्यंत भिन्न आहेत, या विचारांचा जोराचा संकल्प मनांत करीत राहणें हाच एकमेव उपाय आहे. यास भेदविज्ञान म्हणतात. हें भेदविज्ञान झालें नसेल व पुष्कळसें शास्त्रज्ञान असेल तरी तें कामविकाराचा नाश करूं शकत नाहीं. यासाठीं वरील भेदविज्ञान प्राप्त करून घेणें हेंच ब्रह्मचर्य होय. ब्रह्मचर्यव्रताशिवाय इतर अनेक व्रतें व तपश्चरण केलें तरी तें व्यर्थ आहे. ब्रह्मचर्याशिवाय कायक्लेश करणें निष्फल आहे. बाह्यतः स्पर्शनेंद्रियाच्या सुखावरच दृष्टि ठेऊन त्यांत आसक्त न होतां, अभ्यंतर परमात्म-स्वरूपाकडे व त्याच्या उज्ज्वलतेकडे लक्ष देऊन, आत्मा कामविकारानें मलिन होणार नाहीं असाच प्रयत्न नेहमीं करीत राहिलें पाहिजे.

कामविकार भेदविज्ञानानें नष्ट होतो

ब्रह्मचर्य व्रत पाळण्यानें इहलोकीं व परलोकीं अशा दोन्ही लोकांत शोभा वाढते. आपलें शील पाळलें जावें, जगांत कीर्तीचा परिमल पसरावा, धर्म साधन व्हावें, प्रतिष्ठा वाढावी, अशी ज्यांना इच्छा असेल त्यांनीं अंतःकरणांत परमागमाचा उपदेश धारण करावा, 'परस्त्रीकडे पाहावयाचें नाहीं; त्यांच्याविषयीं गोष्टी बोलावयाच्या नाहींत, त्यांच्या चेष्टा, राग, रंग, नृत्य वगैरे क्रियेकडे पहावयाचें नाहीं, व्यभिचारी पुरुषांची संगत करावयाची नाहीं, अफू, गांजा, भांग वगैरे मादक पदार्थ सेवन करावयाचे नाहींत, तांबूल, पुष्पमाला, अत्तर, सुगंधित उट्या लावावयाच्या नाहींत. या सर्व क्रियापासून परिणाम बिघडून व्रतभंग होण्याचा संभव आहे, म्हणून या सर्व कारणांचा त्याग केला पाहिजे. गाणें, बजावणें, नृत्य श्रवण करूं नये. रात्रीं

ब्रह्मचर्य रक्षणाचे उपाय.

भोजन करूं नये. भपकेदार पोशाख किंवा सभ्यतेला सोडून वस्त्राभरणें धारण करूं नयेत. एकांतीं कोण-त्याही स्त्रीशीं संबंध ठेवूं नये. रसनेंद्रियाची लंपटता टाकावी. एका जिभेच्या लंपटते मागें शेंकडों दुसरे दोष अंगांत शिरतात. त्यामुळें आपलें श्रेष्ठत्व, कीर्ति व धर्म सर्व नाहींसे होतात. जिह्वेंद्रियलंपट पुरुषाचा संतोष नाहींसा होतो. समभाव त्याच्या स्वप्नांतही राहात नाहीं. लोकव्यवहार भ्रष्ट होतो-ब्रह्म-चर्य नाहींसें होतें. म्हणून आत्महितेच्छु पुरुषांनीं या सर्व गोष्टींचा त्याग करून ब्रह्मचर्यव्रताचें पूर्णपणें पालन होईल अशीच क्रिया सदैव करावी.

याप्रमाणें दशलाक्षणिक धर्माचें स्वरूप भगवंतांनीं सांगितलें आहे. ज्याच्या ठायीं हीं दहा लक्षणें प्रगट होतात त्याला हा धर्म घडतो.

## सारांश

उत्तम क्षमा-मार्दवादिक धर्माचा घात करणारे क्रोध वगैरे विकार आहेत. या विकारामुळें अनेक दोष उत्पन्न होतात हें मनांत आणून, क्षमादिगुण धारण व्हावेत अशी भावना वारंवार ठेवावी. क्षमा धारण करणें म्हणजे आपल्या प्राणाची, धनाची, कीर्तीची, धर्माची, व्रतशील-संयमसत्याची रक्षा करणें आहे. कलह करण्यापासून होणाऱ्या दुःखाच शमन करण्यास क्षमा हीच समथ आहे. अनेक प्रकारचे उपद्रव व वैर यापासूनही क्षमाच रक्षण करणारी आहे. क्रोध हा धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांचा मूळापासून नाश करणारा आहे. क्रोधामुळें स्वतःच्या प्राणाचा देखील नाश होतो. क्रोधापासून प्रचंड रौद्रध्यान उत्पन्न होतें. क्रोधी पुरुष तळ्यांत, विहिरींत, समुद्रांत उडी टाकून मरण पावतो. तो शस्त्र-घात, विषभक्षण, झंपापात वगैरे अनेक कुकर्मांनीं आत्मघात करून घेतो. दुसऱ्याचा प्राण घेत असतां क्रोधी पुरुषाला दया येत नाहीं. क्रोधी पुरुष आपल्या पित्याला, पुत्राला, भावाला, मित्राला, मालकाला, गुरूला, सेवकाला मारण्यास उद्युक्त होतो. क्रोधी पुरुष नरकाला पात्र होतो. क्रोधी पुरुषाची सर्वांना भीति वाटते. तो धर्माचा नाश करणारा आहे. क्रोधी पुरुष सत्य बोलूं शकत नाहीं. नेहमीं स्वतःला, धर्माला, व परम शांतीला भस्म करणाऱ्या कुवचनरूप अग्नीला उत्पन्न करणारा आहे. क्रोधी पुरुष धर्मात्मा, संयमी, शीलवान् अशा मुनि व श्रावकांवर चोरीचे व इतर अन्यायाचे खोटे आरोप करून त्यांना कलंकित करीत असतो. क्रोधाच्या प्रभावानें ज्ञान कुज्ञान बनतें. आचरण विपरीत होतें, श्रद्धान भ्रष्ट होतें, अन्यायप्रवृत्ति वाढते, नीतीचा नाश होतो, स्वभाव हट्टी बनतो, धर्माच्या उलटा मार्ग स्थापन करण्याची बुद्धि उत्पन्न होते, धर्म, अधर्म, उपकार, अपकार यांचा विचार राहत नाहीं म्हणून तो कृतघ्न बनतो. याप्रमाणें एका क्रोधामुळें हजारों दोष उत्पन्न होतात. ज्याला वीतराग धर्म साधन करावयाचा असेल त्यानें कधींही क्रोधवश होऊं नये.

क्षमा

मार्दव म्हणजे कठोर किंवा निर्दयी विचार सोडून नेहमीं कोमल परिणाम धारण करणें. या गुणानें गुरुविषयीं व देवाविषयीं अत्यंत पूज्यभाव उत्पन्न होतो. ज्याचे परिणाम अतिकोमल असतात त्यालाच सज्जनांनीं साधु म्हटलें आहे. ज्याच्या ठायीं मान नसून अत्यंत नम्रता

मार्दव

असते त्यालाच ज्ञान प्राप्त होतें. विनयशील नम्र पुरुषाला जो गुण शिकवावा अथवा जी कला शिकवावी त्यांत तो तयार होतो. सर्व धर्माचें व विद्येचें मूल विनय आहे. विनयी पुरुषच सर्वांना प्रिय होतो. इतर कोणतेही गुण नसून फक्त विनय-गुणानेंच पुरुषांना सभ्यलोकांत मान मिळतो. विनय अंगीं असणें हें बहुमूल्य आभूषण धारण करण्यासारखें आहे. ज्याचे परिणाम कोमल असतात त्याचेच अंगीं दया असते. मार्दव धर्माचा अंगीकार करण्यापासून स्वर्गलोकांतील वैभव व क्रमानें निर्वाणपदाची अविनाशी संपदा प्राप्त होते. उद्धतता अथवा गर्व धारण करणाऱ्या पुरुषावर उपदेशाचा अथवा शिक्षणाचा परिणाम होत नाहीं. साधुपुरुषांना अशा उद्धत पुरुषांची संगति मुळींच आवडत नाहीं. ते अशा लोकांपासून दूर राहूं इच्छितात. पाषाणांत जलाचा प्रवेश होत नाहीं तसें उद्धत पुरुषांच्या अंतःकरणांत सद्-गुरूचा उपदेश प्रविष्ट होत नाहीं. दुसरें उदाहरण असें पहा कीं, एखादा पाषाण अथवा लांकूड जर नरम असेल तरच त्यावर मनोदयाप्रमाणें सुंदर आकृति तयार करतां येते. पण नरमपणा जर त्या पाषाणांत व लाकडांत नसला तर शिल्पकाराच्या हत्याराचा स्पर्श होतांच एकदम त्याला चीर पडून तुकडा पडतो. त्यामुळें शिल्पकाराच्या इच्छेप्रमाणें आकृति तयार होत नाहीं. याप्रमाणेंच उद्धत अथवा गर्विष्ठ पुरुषावर उपदेशाचा परिणाम होत नाहीं. गर्विष्ठ पुरुष कोणालाही प्रिय नसतो. कारणाशिवाय त्याचें सर्व लोक वैर करूं लागतात. मरणोत्तर तिर्यंच योनींत उत्पन्न होऊन असंख्यात काल अनेक प्रकारचें दुःख व तिरस्कार सोसावे लागतात. म्हणून गर्व सोडून नम्रपणा धारण करावा म्हणजे मार्दवधर्म अंगीं आणण्याचा प्रयत्न करावा.

आर्जव

कपट हें सर्व अनर्थांचें मूळ आहे. कपटामुळें प्रीति आणि विश्वास नाहींसा होतो. कपटी पुरुषामध्यें असत्य, छल, निर्दयता, विश्वासघात वगैरे अनेक दोष भरलेले असतात. गुणांचा लव-लेशही त्या पुरुषाच्या अंगीं सांपडणें मुष्कील. कपटी पुरुषाची जगांत अपकीर्ति होते. परलोकीं नरकतिर्यंचादि गतींत उत्पन्न व्हावें लागून अनंत दुःख भोगावें लागतें व असंख्यात काल परिभ्रमण सुटत नाहीं. म्हणून प्रत्येकानें कपट सोडून आर्जव म्हणजे सरळपणा हा एक धर्म आहे तो धारण करावा. सरळपणा ज्याच्या अंगीं असतो त्याचे ठायीं सर्व गुण भरलेले असतात. सर्व लोक त्यावर प्रीति करतात व त्यावर विश्वास ठेवितात. परलोकीं त्या पुरुषाला देवादिकही ज्याला मान देतात अशी इंद्रमहेंद्राची पदवी प्राप्त होते. यावरून सरळ परिणाम ठेवणें यांतच आत्म्याचें हित आहे असें सिद्ध होतें.

शौच

शौचधर्म म्हणजे आत्मा व शरीर पवित्र ठेवणें. शुचि याचा शब्दशः अर्थ पवित्रता, निर्मलता असा आहे. ज्याची आहार विहारादिक सर्व प्रवृत्ति हिंसारहित असते, हिंसा होईल या भीतीनें जो नेहमीं सावधानतेनें प्रत्येक क्रिया करीत असतो, दुसऱ्याचें धन व स्त्री यांची स्वप्नांत देखील इच्छा करीत नाहीं त्यालाच निर्मल आचरण घडतें.

जगांत सर्वत्र त्या पुरुषालाच पूज्य मानलें जातें. निर्लोभी पुरुषावर सर्व लोक विश्वास ठेवितात. अशी निर्लोभवृत्ति ठेवणें हेंच जगांत उत्तम मानलें जातें. यापासून स्वर्गमोक्षादिकांची क्रमानें प्राप्ति होते. निर्लोभी पुरुषाची जगांत कीर्ति पसरते. या उलट लोभी पुरुष अत्यंत अपवित्र व अनेक दोषांनीं भरलेला असतो. नेहमीं त्या पुरुषाचा निंद्य कर्म करण्याकडे ओढा असतो. त्याला ग्राह्याग्राह्य, खाद्याखाद्य, कृत्याकृत्य याचा विचार राहत नाहीं. तो इहलोकीं निंद्य, धर्मपराङ्मुख व निर्दय बनतो. धर्म, अर्थ, काम या तीन पुरुषार्थांचा नाश करून कुमरणानें दुर्गतीला जातो. त्याच्या अंतःकरणांत सद्गुणाला प्रवेश करण्यास वाव मिळत नाहीं. त्यामुळें त्याला अचिंत्य दुःख इहलोकीं भोगावें लागतेंच व परलोकीं तर अपार दुःख प्राप्त होतें. त्यापेक्षां लोभ सोडून येथें शौच धर्म धारण करणें उत्तम आहे.

सत्य भाषण करणाऱ्या पुरुषांत वरील सर्व गुण असतात. त्याचे ठायीं कपट वगैरे दोष नसल्यानें सर्व जगांत त्याची मान्यता होते. परलोकीं देखील सर्व देव, मनुष्य ज्याची आज्ञा शिरसावंद्य मानतील अशी अवस्था प्राप्त होते. असत्य भाषण करणारांची इहलोकीं

सत्य

सर्वत्र निंदा व अपकीर्ति होतेच व कोणीही त्यावर विश्वास ठेवीत नाहीं. आप्तवर्ग, बंधुमित्रादि देखील अवज्ञा करून त्याचा त्याग करतात. राजा खोटें बोलणाराची जीभ कापतो. त्याचें सर्वस्व हरण करून दंड देतो. परलोकीं तिर्यंच योनींत उत्पन्न व्हावें लागतें व तेथें बोलण्याचें सामर्थ्य नसतें. एकेंद्रियापासून विकलेंद्रियापर्यंत अनंत पर्याय त्या योनींत धारण करून दुःख भोगावें लागतें. यासाठीं सत्यधर्म धारण करून राहणें श्रेष्ठ आहे.

संयमधर्म धारण करण्यापासून आत्म्याचें हित होतें. हा धर्म धारण करणाऱ्या पुरुषाची इहलोकीं चोहोंकडे पूज्यता होते. कोणतही पाप त्याच्या अंगीं जडत नाहीं व परलोकीं अचिंत्य सुखाची प्राप्ति होते. असंयमी पुरुष प्राणघात व विषयानुराग यामध्येंच सदैव

संयम

लीन असतो. त्यामुळें त्यास अशुभ कर्माचा बंध होतो. म्हणून नेहमीं संयम धर्म पाळण्यांतच जीवाचें हित आहे.

तप धारण करण्यापासून कर्माचा संवर आणि निर्जरा होते. तप हेंच आत्म्याला कर्ममलरहित करतें. तपाच्या प्रभावानें येथें अनेक ऋद्धि प्रगट होतात. याप्रमाणें तपाचा अचिंत्य प्रभाव आहे. तपाशिवाय काम आणि निद्रा जिंकली जात नाहीं. तपाशिवाय

तप

इच्छेचा अभाव होत नाहीं. इंद्रियांच्या विषयांचें दमन, आशारूपी पिशाचिणीचा अभाव, कामविजय हे सर्व तपापासूनच होणारे आहेत. तपश्चरण करणारा पुरुष उपसर्ग, किंवा आपत्ति प्राप्त झाली तरी आपल्या रत्नत्रयधर्मापासून ढळूं शकत नाहीं, म्हणून तपश्चरण करणें योग्य आहे. तपाशिवाय संसारांतून सुटका होणें शक्य नाहीं. साम्राज्याधिपति व चक्रवर्ती महामंडलेश्वर राजांनीं देखील ऐहिक विभूति व राज्य सोडून जेव्हां तपोवृत्ति धारण केली तेव्हांच त्यांना त्रैलोक्यपूज्य अशी निर्वाणपदवी प्राप्त झाली व ते जगद्वंद्य

झाले. या उलट जे तपश्चरण सोडून मोहवश होऊन पुनः राज्यग्रहण करतात त्यांची जगांत अत्यंत छीः थू होते. म्हणून तपश्चरण सोडून राज्यग्रहण करण्याचा विचार कधींही मनांत आणूं नये. तपश्चरणाइतकी श्रेष्ठ वस्तु दुसरी त्रैलोक्यांत नाहीं. त्याचा यथाशक्ति अंगीकार करण्याचा प्रयत्न करीत असावें.

त्याग

त्यागधर्माचें लक्षण पूर्वी सविस्तर वर्णिलें आहेच. सारांश इतकाच कीं, परिग्रहाविषयीं आसक्ति न ठेवितां आत्मकल्याणाकडे प्रवृत्ति ठेवावी. कारण परिग्रहाइतकें जबरदस्त ओझें जगांत दुसरें नाहीं. सर्व प्रकारचें दुःख, दुर्ध्यान, क्लेश, वैर, वियोग, शोक, भय, अपमान वगैरे परिग्रहापासून उत्पन्न होतात व ते परिग्रहाची इच्छा ठेवणाराला अत्यंत पीडा देतात. जसजसा परिग्रह कमी तसतसें दुःख कमी. जसें एखाद्या पुरुषाच्या डोक्यावर अतिशय ओझें लादलेलें असलें म्हणजे तो पुरुष त्या ओझ्यानें बेजार होतो, तें ओझें थोडेंथोडें कमी करीत गेलें म्हणजे त्यास सुख वाटतें, तसें परिग्रहाची वासना कमी होत गेली कीं सुख होतें. सर्व प्रकारचें दुःख व पाप यांचें उगमस्थान परिग्रह आहे. जसें अनेक नद्या समुद्राला मिळाल्या तरी त्याची तृप्ति होत नाहीं अथवा अग्नींत कितीही इंधन घातलें म्हणून तो तृप्त होत नाहीं. त्याप्रमाणें हा आशारूपी खड्डा अगाध आहे. याचा ठाव कोणालाही लागत नाहीं. प्रतिदिवशीं हा भरावा म्हणून जितकें धन टाकावें तितका तो मोठा दिसूं लागतो. तो मोठ्या थोरल्या निधीनें देखील भरावयाजोगा नाहीं. मग त्यांत इतर संपत्ति कितीही आणून टाकली तरी त्यानें काय होणार ? तो फक्त जसजसें परिग्रहाचा त्याग करीत जावें तसतसा भरत जातो म्हणून सर्व दुःखापासून मुक्त होण्यास फक्त हा त्यागधर्म समर्थ आहे, त्याअर्थी अंतर्बाह्य परिग्रह सोडून बंधनरहित होण्याकरितां त्यागधर्म धारण करणें योग्य आहे. यापासून अनंतसुख प्राप्त होईल. परिग्रहाच्या बंधनांत सांपडलेल्या जीवाची मुक्ति परिग्रहाचा त्याग केल्यापासूनच होणारी आहे.

आकिंचन्य

आकिंचन्यधर्माचा सारांश असा आहे– हा धर्म धारण करतांना पुढील चिंतन करावें. हे आत्मन् ! हा संसार, हा देह, स्त्री, पुत्र, मित्र, धनधान्यराज्यैश्वर्यादिक विभूति यापैकीं एक परमाणु देखील तुझा नाहीं. हें सर्व पुद्गलद्रव्य असून विनाशिक व अचेतन आहे. या परद्रव्याविषयीं 'अहंबुद्धि' दर्शन मोहनीय कर्माच्या तीव्र उदयानें उत्पन्न होते. ती मला कधींही न होवो. कारण इतर सर्व परपदार्थ असून मी संकल्प– विकल्परहित अत्यंत निराळा आहे, अर्थात् अकिंचन आहे. असें अकिंचन भावनेचें चिंतन करण्यानें आत्मा कर्ममल–रहित होऊन त्यांचा बंध येथेंच नाहींसा होतो. हा धर्म साक्षात् मोक्षाला कारण आहे म्हणून याचा अंगिकार करणें अवश्य आहे.

ब्रह्मचर्य नामक दहावा धर्म धारण करतांना कुशीलासंबंधीं अत्यंत तिरस्कार मनांत बागविला

पाहिजे. कारण कुशील सेवन करणें हें महापातकांत गणलेलें आहे. संसार परिभ्रमणाचें तें बीज आहे. ब्रह्मचर्य-व्रत पालन करणाराला हिंसादिक पंच महापातकें मुळींच घडत नाहींत. सर्व गुण व ऐश्वर्य या एका ब्रह्मचर्य व्रतांत एकवटून राहिले आहेत. हें व्रत पाळल्यापासून मनुष्यांत इंद्रियें वश ठेवण्याचें सामर्थ्य प्रगट होतें व त्यामुळें त्याच्या कुलाला व जातीला अत्यंत शोभा येते. परलोकीं या व्रताच्या प्रभावानें अनेक ऋद्धि प्राप्त होतात व देवयोनींत जन्म होतो, असें भगवंतांनीं वर्णिलें आहे.

ब्रह्मचर्य

याप्रमाणें दशलक्षणधर्म हा आत्म्याचा स्वभाव आहे. हा धर्म परवस्तु नव्हे. क्रोधादिक कर्मजनित उपाधि नाहींशी झाली कीं स्वयमेव आत्म्याचा यथार्थ स्वभाव प्रगट होतो. क्रोधाच्या अभावीं क्षमा, मानाच्या अभावीं मार्दव, कपटाच्या अभावीं आर्जव, लोभाच्या अभावीं शौच, असत्याच्या अभावीं सत्य, कषायांच्या अभावीं संयम, इच्छेच्या अभावीं तप, ममत्वाच्या अभावीं त्याग, परद्रव्याविषयीं आत्मबुद्धीचा त्याग केला म्हणजे आकिंचन्य आणि वेदनीय कर्माच्या अभावीं आत्मस्वरूप प्रवृत्तिरूप ब्रह्मचर्य असे दहा स्वाभाविक धर्म प्रगट होतात. हा धर्म कोणाला हिरावून घेतां येत नाहीं. चोर याला लुटीत नाहींत. राजाला बळजबरीनें नाहींसा करतां येत नाहीं. स्वदेश अथवा परदेश यांत याचें स्वरूप बदलत नाहीं. कोणी या धर्माचा विघाड करूं इच्छील तर तें शक्य नाहीं. कोणी पुष्कळसें द्रव्य देऊन हा धर्म विकत घेऊं म्हणेल तर तो त्याला मिळणार नाहीं. आकाशांत, पाताळांत, दिशाविदिशांत, पर्वतावर, पाण्यांत, तीर्थक्षेत्रांत किंवा मंदिरांत हा सांचवून ठेवलेला नाहीं. म्हणून कोणालाही थोड्या अथवा बहुत श्रमानें तरी तो आणितां येईल! हा आत्म्याचा खरा स्वभाव आहे. याचा लाभ सम्यग्ज्ञान व सम्यक्‌श्रद्धान यापासून होणार आहे. हा धर्म इतका सोपा आहे कीं बालक, वृद्ध, तरुण, धनवान्, निर्धन, बलवान्, अशक्त, असहाय, रोगी, निरोगी वगैरे सर्वांना सहज स्वाधीन करून घेतां येईल. हा धारण करण्यांत कोणतेंही दुःख, अपमान, क्लेश, भय, विषाद, कलह, शोक वगैरे होत नाहींत, म्हणून हा दुर्लभ नाहीं. हा धारण व्हावा म्हणून फार मोठें ओझें वाहावें लागतें अथवा देशांतर करावें लागतें अथवा थंडी, ऊन, वारा यांची वेदना सहन करावी लागते किंवा कोणाशी मोठा झगडा करावा लागतो असेंही नाहीं. अर्थात् हा अत्यंत सुगम, संपूर्ण क्लेशरहित, स्वाधीन आत्म्याचें सत्यपरिणमन आहे. हा धारण करण्यानें संसारपरिभ्रमण चुकून अनंत ज्ञानदर्शनसुखवीर्य प्राप्त होऊन सिद्ध अवस्था प्राप्त होते. याप्रमाणें हा दशलाक्षणिक धर्माचें संक्षेपतः स्वरूप वर्णिलें.

## शल्य

आतां 'निःशल्यो व्रती' म्हणजे शल्याचा अभाव असेल त्यालाच व्रती म्हटलें आहे. शल्य ठेवणारा व्रती होऊं शकत नाहीं. म्हणून शल्याचे स्वरूपाचा विचार करूं. शल्य तीन प्रकारचें आहे, मायाशल्य, मिथ्यादर्शनशल्य व निदानशल्य. या तीन्ही शल्यापासून व्रतांचा घात होतो. शल्य याचा अर्थ कांटा असा आहे. तेव्हां ज्यावेळीं

शल्याचें लक्षण.

आपण धर्म धारण करण्याकरितां व्रतोपोषणें करूं लागतों त्यावेळीं मनांतून अगोदर कपट, मिथ्यात्व व निदान म्हणजे अमुक व्रतापासून अमुक फल प्राप्त व्हावें अशी इच्छा या तीन गोष्टी नाहींशा झाल्या तरच तें खरें व्रत होतें व त्यापासून इष्ट साध्य होतें. हे जर मनांतून नाहींसे झाले नाहींत तर धर्म साध्य होणार नाहीं. म्हणून या तिहींना सन्मार्गांतले कांटे असें अलंकारानें नांव दिलें आहे.

निदान शल्याचे भेद

यांतून निदान शल्याचे तीन भेद आहेत. एक प्रशस्तनिदान, दुसरें अप्रशस्तनिदान व तिसरें भोगार्थनिदान. हीं निदानेंच संसाराला कारण आहेत. १ संयम धारण करण्याकरितां उत्तम-कुल, उत्तम संहनन, उत्कृष्ट बल, शुभसंगति व बंधुवर्गाची सहायता व उज्ज्वलबुद्धि वगैरे असावीं अशी इच्छा करणें याला प्रशस्तनिदान म्हणतात. २ या उलट अभिमानाकरितां वरील सर्व गुण व आचार्यगणधर-तीर्थंकराचें पद प्राप्त व्हावें, आपली आज्ञा सर्व जगांनीं मानावी, जगांत सर्वांकडून आपला आदर व्हावा वगैरे इच्छा करणें याला अप्रशस्तनिदान म्हणतात. क्रोधानें इतरांचा नाश करण्याची इच्छा करणें अथवा अन्य स्त्री, पुत्र, राज्य, ऐश्वर्याचा नाश व्हावा असें इच्छिणें याचाही अप्रशस्तनिदानांत अंतर्भाव होतो. ३ संयम धारण करून घोर तपश्चरण करीत असतां त्याचें फल इंद्रियाचें विषय, राज्यैश्वर्य, देवपद, अनेक अप्सरांचें प्रभुत्व, जातिकुलाचें श्रेष्ठत्व, चक्रवर्तित्व वगैरे भोग प्राप्त व्हावें अशी इच्छा करणें, यापासून दीर्घकालपर्यंत संसारपरिभ्रमण घडतें, याला भोगार्थनिदान म्हणतात.

संयमाच्या प्रभावानें संपूर्ण कर्मांचा नाश होऊन अतींद्रिय अविनाशी निर्वाणाचें अनंतसुख प्राप्त होतें, असें असूनही त्यापासून विषयोपभोगाची इच्छा करणें हें चिंतामणि रत्न कवडीला विकण्यासारखें वेडेपणाचें आहे. अथवा अनेक मौल्यवान् रत्नांनीं भरलेली नाव समुद्रांतून जात असतां तिला इंधनाकरितां तोडण्यासारखें आहे, अथवा आपल्या गळ्यांतील रत्नाला मालेला दोरा पाहिजे आहे म्हणून तें तोडून फेंकून देण्यासारखें आहे, अथवा राख पाहिजे म्हणून चंदन जाळून टाकण्या-प्रमाणें आहे. निदान केल्यानें पुण्य नष्ट होऊन पापाचा बंध होतो. निर्वांछक परिणामानें पुण्यबंध होत असतो. सम्यग्दृष्टि पुरुषाला भोगोपभोगांची मुळींच इच्छा नसते. त्याला अहमिंद्राचें सुख देखील विनाशिक व पराधीन वाटतें. खरें सुख म्हणजे आत्म्याच्या स्वाधीन असलेल्या अतींद्रिय सुखाचा अनुभव हेंच आहे. मग तो सम्यग्दृष्टी इंद्रियजनित संतापापासून महान् दुःखानें भरलेल्या तृष्णारूपीं संतापाला वाढविणाऱ्या व विषयांच्या अधीन अशा पदार्थाला सुख कसें मानील? ज्यानें अमृताचा स्वाद घेतला त्याला दुर्गंधी, कडू व त्रास उत्पन्न करणारी पेंड आवडणार नाहीं, अथवा त्याची तो इच्छाही करणार नाहीं. सम्यग्दृष्टी पुरुषाला अशी इच्छा असतेः—

विषयोपभोगाची इच्छा करूं नये.

दुक्खक्खओ कम्मक्खओ समाहिमरणं च बोहिलाहो य।
एयं पत्थेदव्वं ण पत्थणीयं तदो अण्णं॥

अर्थ— माझ्या जन्म-मरण-क्षुधा-तृषादि दुःखांचा क्षय होवो. आत्मगुण नष्ट करणाऱ्या मोहनीय, ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय कर्मांचा क्षय होवो. मला या पर्यायांत चार आराधनासंयुक्त समाधिमरण प्राप्त होवो. रत्नत्रयाचा लाभ होवो. सम्यग्दृष्टी पुरुषानें एवढीच प्रार्थना करणें योग्य आहे. याशिवाय दुसरी कसलीही प्रार्थना या जन्मीं व परजन्मीं देखील करणें योग्य नाहीं.

**सम्यग्दृष्टी पुरुषाचे निदानासंबंधीं विचार**

संसारांत परिभ्रमण करीत असतां जीवाला उच्चकुल, नीचकुल, राज्य, ऐश्वर्य, लक्ष्मी, दारिद्र्य, दैन्य, रोग, सुस्वरूप, कुरूप, शक्ति, दौर्बल्य, पांडित्य, मूर्खत्व, स्वामित्व, सेवकत्व, राजत्व, रंकत्व, गुणवत्व, निर्गुणवत्व हे अनंतवेळां प्राप्त होऊन नाहींसेही झाले आहेत. म्हणून अशा संयोग-वियोगस्वरूप संसारांत सम्यग्दृष्टी पुरुष अमुक प्राप्त झालें पाहिजे असें निदान करीत नाहीं. संसारांत अनंतपर्याय दुःखांचे प्राप्त झाल्यानंतर एखादा पर्याय इंद्रियजन्य सुखानुभव मिळण्याचा क्वचित् प्राप्त होतो. पुनः अनंतपर्याय दुःखाचे प्राप्त होतात. याप्रमाणें परिभ्रमण करीत असतां इंद्रियजनित सुखही अनंत वेळां प्राप्त झालें आहे. आतां पुनः तें सुख प्राप्त व्हावें अशी सम्यग्दृष्टी पुरुष कशी इच्छा करील? संसारांत स्वयंभूरमण समुद्रांतील पाण्याइतकें दुःख भरलें आहे व एका केंसाच्या अग्रभागांवरील पाण्याचे अनंतभाग केले असतां एका भागाइतकें इंद्रियजनित सुख आहे. एवढ्या अल्पसुखापासून तृप्ति कशी होईल? भोगोपभोग व इतर पदार्थांच्या संयोगाचें जितकें सुख आहे त्याहून अनंतपट दुःख त्यांचा वियोग झाला असतां होणारें आहे. ज्याचा संयोग होईल त्याचा खात्रीनें वियोग होणारच असा नियम आहे. जसें मधानें माखलेली तरवार आपल्या जिभेनें चाटणाऱ्याला क्षणभर गोडीचें सुख वाटतें पण जीभ कापली जाते त्याचें दुःख भोगावें लागतें. तद्वत् विषयांच्या संयोगाचें सुख आहे. अथवा जसें किंपाकफल हें दिसण्यांत फार मोहक दिसतें व खाण्यांतही गोड लागतें पण प्राणांचा घात करितें, तद्वत् भोगजनित सुख आहे. एखाद्या पुरुषाजवळ पुष्कळ मौल्यवान् रत्नें असून त्याची किंमत आपणांस थोडी मिळाली तरी पुरें आहे असें म्हणून तीं अल्प किंमतींत विकून टाकतो. पण हलक्या किंमतीच्या वस्तूचें मोल फार यावें अशी त्यानें इच्छा केली तर ती पूर्ण होणार नाहीं. कारण भारी वस्तु सोइस्कर मिळाल्यास कोणीही घेईल, पण हलकी वस्तु जबर किंमतींत कोण शहाणा घेईल? याचप्रमाणें आपणाला स्वर्गांतील ऐश्वर्य प्राप्त होईल असा पुण्यबंध केला व मागून निदान केलें कीं मला या ऐवजीं राज्यसंपदा प्राप्त व्हावी अथवा व्यंतरदेवाचा पर्याय प्राप्त व्हावा तर तसें होईल. निदान बांधण्यानें अधिक पुण्य असल्यास त्याचा घात होऊन तुच्छ संपदा प्राप्त होते, पण पुनः संसारपरिभ्रमण करावें लागतें. जसें सुताच्या लांब दोरीनें बांधलेला पक्षी दूर गेला तरी पुनः त्याच जागीं येतो, तो कोठवर दूर उडून जाणार? त्याच्या पायांत दोरी आहे त्यायोगें त्यास लांब जातां येणार नाहीं. त्याप्रमाणें निदान बांधणारा अतिदूर म्हणजे स्वर्गांत महर्द्धिकदेव

झाला तरी तो पुनः संसारांतच परिभ्रमण करील. देवलोकाला जाऊनही निदानाच्या प्रभावानें एकेंद्रिय तिर्यंचामध्यें, पंचेंद्रिय तिर्यंचामध्यें अथवा मनुष्य–योनीमध्यें येऊन पुनः पापसंचय करून दीर्घकाल परिभ्रमण करील. अथवा कर्जदार मनुष्याला तुरुंगांत बसविलें असतां तो तेथून कांहीं मुदतींत पैसे देऊन कर्जमुक्त होईन असा करार करून सुटून आला तरी तेवढ्या मुदतींत पैसे न दिल्यास पुनः तुरुंगांत जावें लागतें. तद्वत् निदान बांधणारा मनुष्य तपसंयमाच्या द्वारें पुण्यसंपादन करून स्वर्गलोकीं जातो व तेथील आयुष्य पूर्ण झाल्यानंतर पुनः संसारांतच परिभ्रमण करतो. सारांश— मुनि अवस्थेंत अथवा गृहस्थावस्थेंत मंदकषायाच्या प्रभावामुळें अथवा तपश्चरणाच्या प्रभावामुळें अहमिंद्रपद अथवा स्वर्ग प्राप्त होईल असा पुण्य–संचय केला असेल व मागाहून अमुक भोग प्राप्त व्हावे असें इच्छारूप निदान बांधलें तर भवनत्रिक अशुभ देवांत जाऊन तो जन्मेल. ज्याचें पुण्य अधिक असेल व तो अल्प पुण्ययोग्य निदान करील तर अल्पपुण्यधारी देव होऊन उत्पन्न होईल. अधिक पुण्य धारण करणारा भवनत्रिक देवांत जन्मणार नाहीं. स्वर्गमोक्षादिकाला देणारा असा जो मुनि व श्रावकाचा उत्तम धर्म तो धारण करून ज्यानें निदान बांधून बिघडविला त्यानें इंधनाकरितां कल्पवृक्ष तोडला असें होतें. याप्रमाणें निदान शल्याचे दोष आहेत.

पूर्वीं मायाचाराचे दोष सांगितले आहेतच. मायाचारी पुरुषाचें व्रत, शील, संयम वगैरे सर्व व्यर्थ आहेत. भगवान् जिनेंद्राचा धर्म धारण करावा अशी इच्छा असेल व आत्म्याच्या दुर्गतीला जाण्याचा मार्ग रोंकावा असें वाटत असेल तर कोट्यवधि उपदेशांतील मुख्य उपदेश ' माया-शल्य ( कपट ), अंतःकरणांतून काढून टाकावें. कीर्ति आणि धर्माचा नाश करणाऱ्या मायाचाराचा त्याग करून सरलता धारण करावी.

माया शल्य

मिथ्यात्वाचें वर्णन पूर्वी केलेलें आहे. तें मिथ्यात्वच सर्व संसारपरिभ्रमणाचें बीज आहे. त्याच्या प्रभावानेंच अनंतानंत परिवर्तन होत आहे. मिथ्यात्व सोडल्याशिवाय सत्यधर्माचा अंतःकरणांत प्रवेश होणार नाहीं, म्हणून मिथ्यात्वशल्य नाहींसें करावें. मायामिथ्यात्व-निदान या तीन शल्यांचा अभाव झाल्यावांचून मुनिश्रावकांचा धर्म साधणार नाहीं. तात्पर्य निःशल्य होणाराच व्रती होऊं शकेल.

दुष्ट माणसांची संगती धरूं नये. त्यांच्या संगतीपासून पापाविषयीं वाटत असलेली ग्लानि नाहींशी होते. पाप करण्याचा प्रसंग प्राप्त होईल अशा लोकांचा सहवास मुळींच ठेऊं नये. जुगारी, चोर, कपटी, परस्त्रीलंपट, जिह्वालोलुपी, कुलाचार भ्रष्ट, विश्वासघातकी, मित्रद्रोही, गुरुद्रोही, धर्मद्रोही, अपकीर्तीची भीति न बाळगणारा, निर्लज्ज, पाप क्रियेमध्यें निपुण, व्यसनी, खोटें बोलणारा, असंतोषी, अतिलोभी, निर्दयी, कठोरपरिणामी, कलहप्रिय, विसंवादी, कुचाळ, अभक्ष्यभक्षक, वेश्यासक्त, मद्यपी व नीचकर्मी इत्यादि लोकांची संगत धरूं नये. श्रावकधर्माचें रक्षण करून आपलें कल्याण करून घ्यावयाचें असल्यास अग्निसारख्या व विषासारख्या दुःसंगतीचा त्याग करावा.

दुष्टसंगतीचे परिणाम

संगति ठेवावी तशी बुद्धि होत असते असा नियम आहे. अचेतन अशी माती फुलांच्या संगतीनें सुगंधी बनते. दुर्जनाच्या संगतीनें सज्जन देखील आपला स्वभाव सोडून दुर्जन होतात. जसें थंड पाणी हें अग्नीच्या संगतीमुळें आपला स्वभाव टाकून गरम होतें, तसें उत्तम पुरुष देखील अधमाच्या संगतीनें अधम होतात. दुष्टांच्या संगतीनें त्यागी व संयमी पुरुषालाही दोष लागतो. कलालाच्या हातीं दुधाचा तांब्या असला तरी लोक तो मदिरेचाच कलश असेल अशी शंका घेतात. अथवा कलालाच्या घरांत दुग्धपान करणाऱ्या ब्राह्मणालाही लोक दारू पिणारा म्हणून दोष देतात. लोक दुसऱ्याचीं छिद्रें पाहत असतात. दुसऱ्याचें दोष सांगण्यांत त्यांना फार गोडी वाटते. तुम्ही दुष्टांची अथवा दुराचारी लोकांची संगति धराल तर लोकनिंदेला प्राप्त होऊन धर्मावर अपवाद आणाल. म्हणून कुसंगति धरूं नका. कुसंगतीनें निर्दोष मनुष्य देखील दोषी होऊन मिथ्यामार्गी बनतो. मिथ्यात्वाचा व कषायांचा परिचय या जीवाला अनादिकालचा आहे. वीतरागभावाचा प्रादुर्भाव मोठ्या कष्टानें येथें झाला आहे, तो कुसंगतीमुळें एका क्षणांत नाहींसा होईल. अनादिकालच्या मोहनीयकर्माचा प्रभाव जबरदस्त आहे. याच्या उदयानें विषय-कषायामध्यें कोणीही न शिकवितां जीव आपोआप प्रवृत्त होतो. त्यांत कुसंगति मिळाली म्हणजे अग्नीला वाऱ्याचें सहाय मिळाल्याप्रमाणें तो पराकाष्ठेचा दुष्ट बनतो. याकरितां कुसंगति सोडून सुसंगति धरावी.

सज्जनांच्या संगतीनें दुष्ट देखील आपला स्वभाव सोडतात. सत्संगतीच्या प्रभावानें निर्गुण पुरुष देखील जगांत मान्यता पावतात. निर्गंधीं पुष्पें देखील देवाच्या सहवासानें मस्तकावर धारण केलीं जातात. एखाद्याला धर्मावर प्रीति नसल्यानें परीषह सहन करून, इंद्रि-

सज्जन-संगति करा

यांच्या विषयापासून पराङ्मुख होऊन त्याग करवत नसला तरी त्याला संयमी, त्यागी, व्रती पुरुषांच्या संगतीनें लोकलज्जेमुळें, भयानें, अभिमानानें अथवा कशानेंही म्हणा पण विषयकषायापासून विरक्ति होण्याचा संभव आहे. मग जे स्वभावतःच मंदकषायी, धर्मानुरागी, पापभीरू आहेत त्यांना सत्संगति लाधली तर ते सत्यधर्माचें ग्रहण करून संसारांतून मुक्त होतील यांत संशय बाळगण्याचें कारण नाहीं. ज्याच्या उपदेशामुळें सम्यक् धर्माकडे प्रवृत्ति होईल, ज्याच्या संगतीनें अनेक लोक विषयकषायापासून विरक्त होऊन त्याग, संयम तपश्चरण करण्यांत तत्पर होऊं शकतील अशा न्यायमार्गी व धर्मचर्येचा धारक एक पुरुषही जगाला शोभवितो. तो पुरुष धन्य समजावा. धर्मरहित व विषयकषायी पुष्कळ लोक असून काय उपयोग ? एकच कल्पवृक्ष सर्वांचें दुःख नाहींसें करून इच्छित फल देतो. विषाचे अनेक वृक्ष केवल दुःखाचें कारण बनतात. जगांत सर्व अनर्थ कुसंगतिपासून उत्पन्न झाले आहेत. कुसंगति नसेल तर जुगारी, चोर, परस्त्रीलंपट, वेश्यासक्त, अभक्ष्यभक्षक, मद्यपी वगैरे लोकांच्या बुद्धींत विकार उत्पन्न होणार नाहींत. इहपर अशा दोन्ही लोकांमध्यें आपलें कल्याण इच्छिणारांनीं कुसंगति मुळींच धरूं नये. उत्तम कुलांत उत्पन्न होऊन व उत्तम धर्म प्राप्त होऊनही कुदेव, कुगुरु, कुधर्म, पाखंडी लोकांची जे उपासना करितात, भांग पीतात, तंबाखू खातात, अफू खातात, हुका पीतात, रात्रिभोजन करितात,

बेश्येचें उष्टें भक्षण करितात, जुवा खेळतात, चोरी करितात, चहाडी करितात, परधन-परस्त्रीची इच्छा करितात, जिव्हेंद्रियाचे लोलुपी बनतात, निर्दय परिणाम धारण करितात, खोटें बोलण्यांत तरबेज होतात, दुसऱ्याला विघ्न करून संतोष मानतात, ते सर्व दुर्गतीला जातात म्हणून कुसंगत सोडून सज्जन संगत धरावी. असा योग पुण्यवान् पुरुषालाच या विषम कलिकालांत घडून येतो.

वरील दुष्कृत्यांच्या गोष्टी टाळून ज्यांनीं या जन्मांत जैनधर्म धारण केला आहे त्यांनीं स्वतःची प्रशंसा व दुसऱ्याची निंदा करूं नये. जे स्वमुखानें आपली आपण प्रशंसा करितात त्यांची कीर्ति नाहींशी होते. अतिमानी अथवा अतिशय गर्व ज्याला चढलेला असेल त्या-

स्वप्रशंसा करूं नका.

शिवाय इतर कोणीही आत्मप्रशंसा करीत नाहीं. आत्मप्रशंसा करणारा जगांत यःकश्चित् पुरुष गणला जातो व त्याची लोक अवज्ञा करितात. आपणांत विद्यमान असलेले गुण सांगितले व कांहीं वेळानें ते नाहींसे झाले म्हणजे तो दोषपात्र बनतो. ज्यामध्यें दुसरा कोणताही दाखवितां येण्यासारखा दोष नसून फक्त आत्मप्रशंसा एवढाच दोष असेल तरी तो सर्वांत मोठा दोष आहे असें जाणावें. आपल्या मुखानें आपली प्रशंसा न करणें हा श्रेष्ठतम गुण आहे. अशा पुरुषाच्या विद्यमान गुणांचा नाश होत नाहीं. आपल्या तेजाची प्रशंसा न करणारा सूर्य जगांत प्रसिद्ध आहे. आपल्यांत गुण नसतांना आपली प्रशंसा करणाऱ्या पुरुषाला गुणवान् असें कोणीही म्हणत नाहींत. हावभाव, विलास, विभ्रम, शृंगार, अंजन, वस्त्रादि धारण करून स्त्रीप्रमाणें आचरण करणारा नपुंसक पुरुष, स्त्री होत नाहीं, तो नपुंसकच म्हटला जातो. आपल्यांत गुण विद्यमान असून त्याची कोणी प्रशंसा केली तर उत्तम पुरुष लज्जित होतो. सत्पुरुषांना आपल्या कीर्तीची आवड नसते. आपली कीर्ति श्रवण करून ते लज्जित होतात व आत्म-निंदा करून म्हणतात, "अरेरे, जे आम्ही संसारी अनेक दोषांनीं भरलेले त्या आमची प्रशंसा करून लोक आम्हांवर जबरदस्त ओझें लादतात. जगांत खरे प्रशंसायोग्य, ज्यांनीं आपल्या आत्म्याची विशुद्धि केली ते किंवा तसें करूं इच्छिणारे होत. त्यानीं कामक्रोधावर विजय मिळविला. आम्ही संसारी रागद्वेषांनीं सर्वतः माखलेले, इंद्रियांच्या विषयांनीं तहानलेले, परिग्रहासक्त, अतिनिंद्य आहोंत. आमचा सर्व वेळ प्रमादांत धर्मसंपादन न करितां व्यर्थ जात असतो. आम्ही महामूढ असून निंद्य आहोंत. मनुष्यजन्म दुर्लभ, त्यांत जैनधर्म लाभणें अतिशय दुर्लभ, अशा स्थितींतही ज्यांनीं प्राप्त झालेला धर्म सोडून विषयसेवनास अंगिकारिलें त्यांनीं घरांत उत्पन्न झालेला कल्पवृक्ष तोडून विषवृक्ष लाविला असें म्हणावें लागतें. अथवा चिंतामणीरत्न प्राप्त झालें असून तें कावळ्याला उडविण्याकरितां फेंकून दिल्यासारखें आहे, अथवा तें रत्न कांचेच्या मोबदल्यांत विकण्यासारखें आहे. मनुष्यजन्मांतील प्रत्येक क्षण कोट्यवधि रुपये दिले तरी मिळणारा नाहीं. तो व्यर्थ जात आहे. लोकांची वृत्ति व लोकांची रागद्वेषांची प्रवृत्ति पाहून आम्ही कषाय करून दुर्ध्यानांत मनुष्यजन्म व्यर्थ घालवीत आहोंत. त्याअर्थी आमच्यासारखा निंद्य दुसरा कोण असूं शकेल" याप्रमाणें आपली निंदा करीत असणाऱ्या उत्तम पुरुषांना आत्मप्रशंसा कशी आवडेल ? ते सदैव आपण नीच आहोंत असें मानतात. जे स्वमुखानें आपली प्रशंसा

करतात त्यांना नीचकर्माचा बंध होतो. इहलोकीं त्यांची फजिती होते. सत्पुरुष आपले गुण आपल्या मुखानें उच्चारीत नाहींत. निर्मल आचरणानें त्यांचे गुण आपोआप प्रसिद्ध होतात. चंद्राचा शीतल-पणा, उद्योत व आल्हादकत्व हे गुण वर्णन केल्यावांचूनही लोक समजूं शकतात.

परनिंदा कधींही करूं नका. यासारखें दुसरें पाप जगांत नाहीं. परनिंदा ही महान् वैर उत्पन्न करण्याला व दुर्ध्यान उत्पन्न करण्याला, कलहाला, भयाला, दुःखाला, पश्चात्तापाला, शोकाला, विसंवादाला व अप्रीतिला कारण आहे. यापासून आपली जगांत निंदा होते.

परनिंदा टाळा

परनिंदा करणारा आपला धर्म, यश व मोठेपणा यांचा नाश करून घेतो. लोकांचे दोष प्रगट करून आपण निर्दोष बनावें असें इच्छिणारा, लोकांनीं औषध खाऊन आपला रोग बरा व्हावा असें इच्छिणाऱ्यासारखा मूर्ख आहे. कोठ्यवधि दोषांत शिरो-मणि असा हा परनिंदा–दोष आहे. तुम्ही जैनधर्म धारण केला आहे त्याअर्थी दुसऱ्याचे दोष आपल्या मुखावाटें काढतां कामा नये. सत्पुरुषांना दुसऱ्याचे दोष पाहून लाज वाटते. म्हणून ते आपल्या सामर्थ्यानुरूप परदोष झांकण्याचा प्रयत्न करीत असतात. सत्पुरुष जसें आपणा स्वतःवर येणाऱ्या अपवादाला भीत असतात तद्वत् दुसऱ्यावर अपवाद देण्यालाही ते भीतात. संसारी जीवांचें ज्ञानावरण, दर्शनावरण कर्माच्या प्रबल उदयानें अज्ञान वाढत जातें, व मोहनीयकर्माच्या उदयानें ते रागी, द्वेषी, कामी, क्रोधी, लोभी, मानी, कपटी बनतात. ते भयभीत, शोकग्रस्त व ग्लान होऊन रति व अरति कर्माच्या वश झाल्यामुळें नाना प्रकारचे विकार त्यांच्या मनांत उद्भवतात. जसें दारू पीणारा मनुष्य परवश होऊन स्वतःला विसरतो व धत्तूरा खाऊन उन्मत्त चेष्टा करणाऱ्याप्रमाणें आपणही उन्मत्त बनून निंद्य चेष्टा करूं लागतो, अथवा वातपित्तानें उन्मत्त झालेला परवश होऊन बडबड करतो तद्वत् संसारी जीव विषयकषायाच्या वश होऊन निंद्य चेष्टा करितात. त्यांना करुणा धारण करणाऱ्या अशा म्यां सोडविलें पाहिजे. असें असतां उलट त्यांची निंदा कशी करूं ? दुस-ऱ्यावर अपवाद देऊन आजपर्यंत अनेकदां निंद्य पर्याय प्राप्त करून घेतला व दुर्गतिगमन करून पुष्कळ तिरस्कार सोसला. आतां तरी परनिंदा वर्जन करूं दे. “ मला परनिंदा करण्यांत मौन घडो. माझें सर्व आयुष्य सर्व जीवांशीं प्रिय हित व मधुर भाषण करण्यांत जावो ” अशी सम्यग्दृष्टि प्रार्थना करीत असतात. जैनधर्मी लोक तर गुणग्राहीच असले पाहिजेत. मिथ्यादृष्टी लोकांचें व तीव्र कषाय असणारांचें मिथ्या आचरण पाहून ते वैर–बुद्धीनें त्याची निंदा करीत नाहींत व त्यावर कांहीं अपवाद आला तर बरें असें पण इच्छित नाहींत. अनादि मिथ्यात्व व इतर दोषांपासून अनंत-काल दुःख होतें असें जाणून करुणाबुद्धीनें, मंदकषायी जीवांना ते गुणदोषाचें स्वरूप समजावून सांगतात.

निद्रा, आळस, प्रमाद यांना जिंका. निद्रा ही संपूर्ण धर्माचा अभाव करणारी आहे. ज्यानें निद्रा जिंकली नाहीं त्याला षडावश्यकें, स्वाध्याय, ध्यान, जपजाप्य वगैरे उत्तम कार्यें मुळींच घडत नाहींत. मुनीश्वरांना तप, निद्रा जिंकण्याकरितांच करावें लागतें. निद्रा ही

दर्शनावरण कर्माच्या उदयापासून उत्पन्न होणारी असून सर्वघाती आहे. ती आत्म्याला अचेतन करते. ज्यानें तिला जिंकलें नाहीं त्याच्या सर्व हितरूप कार्याचा नाश झालाच असें समजावें. तो शास्त्रपठण करूं लागला अथवा जिनसूत्र श्रवण करूं लागला व त्यावेळीं जर त्याला झोंप आली तर त्याला काय समजणार? उलट जिनसूत्राच्या श्रवणपठनाविषयीं अरुचि उत्पन्न होईल.ध्यान,सामायिक करतांना झोंप आली तर आत्मध्यान, जाप्य, सामायिक, द्वादश भावना वगैरे सर्व नाहींशा होतील. झोंपेमध्यें जीव एकेंद्रिय जीवासारखा होतो. त्या पुरुषामधील सर्व ज्ञान झोंपेमध्यें नाहींसें होतें. झोंपेंत अबुद्धिपूर्वक अनेक विकल्प मनांत उत्पन्न होतात. बुद्धिपूर्वक आत्म्याचें कल्याण करणाऱ्या भावनेचा झोंपेंत अभाव असतो. दिवसा झोंप घेण्यामध्यें दर्शनावरण कर्माचे आस्रव होतात. मुनीश्वर तर एक प्रहररात्र उलटल्यानंतर खेदप्रमाद दूर होण्याकरितां मध्यरात्रीच्या दुसऱ्या प्रहरांत झोंप घेतात. त्यावेळींसुद्धां अल्प निद्रा घेऊन जागृत होतांच द्वादश भावनेचें चिंतन करूं लागतात. पुनः थोडीशी निद्रा घेऊन पुनः जागृत होऊन धर्मध्यानांत लीन होतात. याप्रमाणें मधल्या दोनप्रहरांत देखील अनेकवेळां जागृत होऊन धर्मध्यान करीत राहतात. कदाचित् एक मुहूर्तप्रमाण निद्रेंत अचेतन राहिले तर तेवढी देखील निद्रा अधिक समजून ती कमी व्हावी म्हणून एक, दोन, तीन, चार, पांच वगैरें उपोषणें, रसपरित्याग वगैरे तीव्र तपश्चरण करून निद्रेचा अभाव करतात. निद्रा व काम जिंकण्याकरितां अनशनादि तप निरंतर करतात. निद्रेंत वचनकायेची सावधगिरी नाहींशी होते. ज्यांना उत्तम मनुष्यजन्म आणि उत्तम धर्म यांचा नाश करून एकेंद्रियाप्रमाणें आपलें आयुष्य पूर्ण करावयाचें असेल तेच अतिशय निद्रा घेतात. दिवसा झोंप घेणाराचें व्रत, संयम नाहींसें होतें. आळस व श्रम नाहींशी करण्याकरितां रात्रौ थोडी निद्रा घेणें हेंच योग्य आहे. निद्रा, आळस वगैरे जीवाचे अंतर्गत मोठे वैरी आहेत. झोंपेंत हेयोपादेय, कार्याकार्य, हिताहित, योग्यायोग्य याचा विचार राहात नाहीं. निद्रा जिंकल्याशिवाय इहलोकच्या सर्व कार्याचा नाश होतो, म्हणून ज्यांना विद्या, विनय, तप, संयम, स्वाध्याय, ध्यान, जाप्य वगैरे प्राप्त करून घ्यावयाची इच्छा असेल त्यांनीं निद्रेला जिंकिलें पाहिजे.

निद्रा, आळस व प्रमाद जिंका

## आठ प्रकारच्या शुद्धि

या अष्टशुद्धि परम वीतरागी साधु मुनीश्वरांनाच होत असतात. तथापि साधुपदाची इच्छा करणाऱ्या गृहस्थाला याची माहिती असणें जरूर आहे. म्हणून त्याविषयीं विचार करणें अवश्य आहे. १ भावशुद्धि, २ कायशुद्धि, ३ विनयशुद्धि, ४ ईर्यापथशुद्धि, ५ भिक्षाशुद्धि, ६ प्रतिष्ठापनाशुद्धि, ७ शयनासनशुद्धि, ८ वाक्यशुद्धि. या आठप्रकारच्या शुद्धि आहेत. यांतून—

अष्टशुद्धि

**१ भावशुद्धि**— मोहनीय कर्माच्या क्षयोपशमापासून उत्पन्न होणारी जी मोक्षमार्गाविषयीं अभिरुचि त्यामुळें परिणामांची निर्मलता होते ती अशी:—" हा रत्नत्रय मार्गच सत्य आहे. याशिवाय अन्य सर्व मार्ग संसारांत बुडविणारे कुमार्ग होत. आत्म्याचें हित मोक्ष आहे. तो मोक्ष कर्मबंधनांनीं

रहित आहे व तें कर्मबंधन रत्नत्रयापासूनच नाहींसें होणारें आहे." अशा प्रकारच्या दृढ श्रद्धान व ज्ञानापासून संसार-देह-भोगाविषयीं उत्पन्न झालेली वीतरागता हीच संपूर्ण रागद्वेषादि मल नाहींशी करून मन निर्मल करितें. या निर्मलतेलाच भावशुद्धि म्हणतात. कारण विचारांमधून विषयांची इच्छा, रागद्वेषादि उपद्रव व मिथ्यात्व नाहींसे झाल्यावांचून मुनींचे व श्रावकाचे आचार शुद्ध होत नाहींत. वाळलेल्या मऊ व स्वच्छ जमिनीवर रांगोळी काढिली असतां ती सुंदर व खुलून दिसतें, तीच जर चिखलानें भरलेल्या एखाद्या जमिनीवर नामांकित चिताऱ्याकडून काढविली तरी चांगली निघणार नाहीं. याप्रमाणेंच मिथ्यात्व कषायादिकांनीं ज्यांचें अंतःकरण लिप्त झालें आहे त्यांनाही सम्यग्ज्ञान व चारित्र होत नाहीं.

२ **कायशुद्धि**– साधूंना शरीरशुद्धि कशी होते? ज्यांना सुताचीं, रेशमाचीं, सणाचीं, गवताचीं, लोंकरीचीं, चामड्याचीं व सालीचीं देखील वस्त्रप्रावरणें ठेवावयाचीं नाहींत, तसेंच अंगाला भस्म पण लावावयाचें नाहीं, सर्व प्रकारचें आभरणालंकार व स्नान, गंधविलेपन, संस्कार करावयाचें नाहींत, अंगावर धूळ वगैरे पदार्थ येऊन घामाशीं संलग्न होऊन राहिले तरी ते काढून शरीर स्वच्छ करावयाचें नाहीं, नाक, तोंड, डोळे, कपाळ, भुवया, डोकें, बाहू, हात, बोटें वगैरेचें अनावश्यक हलनचलन पण ज्यांना करावयाचें नाहीं, ज्यांना आपल्या दैनंदिन क्रिया अत्यंत सावधानतेनें कराव्या लागतात, त्यांचें मन आत्मचिंतनांत सदैव गुंतल्यानें बाह्य पदार्थाविषयीं कोणताही विकल्प उत्पन्न होत नाहीं, अशी अवस्था प्राप्त झाली म्हणजेच खरी आत्मशुद्धि होते. म्हणून त्यांना बाह्यशुद्धिची अवश्यकता भासत नाहीं. अशी शुद्धि दिगंबर साधूंनाच होते. ते सर्व आपली क्रिया यत्नाचारपूर्वक करीत असतात. श्रावकानें एकदेशशुद्धि करावी. त्यानें जीं वस्त्रें, आभरणें आपल्या अंगावर घालावयाचीं असतात तीं अशा प्रकारचीं घालावीं कीं त्यापासून आपणाला किंवा इतराला कामबुद्धि उत्पन्न होणार नाहीं. अभिमान व भय उत्पन्न होणार नाहीं. लोकांत बरें दिसेल असा, आपल्या दर्जास शोभेल असा व आपल्या वयास योग्य असा पोषाख करावा व आपल्या शरीराची व अवयवाची वागणूक, बोलणें, चालणें, बसणें, निजणें, रागद्वेषादि अभिमान वगैरे क्रिया निर्दोष करण्याविषयीं जपत असावें. ही गृहस्थांची कायशुद्धि जाणावी.

३ **विनयशुद्धि**– अरहंतादि परमगुरूच्या पूजेंत मग्न होणें, सम्यग्ज्ञानादिकांमध्यें यथाविधि भक्ति ठेवणें, नेहमीं गुरूच्या मर्जीप्रमाणें वागणें, प्रश्न करण्यांत, स्वाध्यायांत, वाचनेंत, चर्चेंत, स्तुतींत निपुण असणें, देशकालभाव जाणून चातुर्यानें आचार्याच्या अनुकूल आपली वागणूक ठेवणें याला विनयशुद्धि म्हणतात. विनय हाच सर्व चारित्रसंपदेचें मूल आहे. विनय हाच पुरुषाचा अलंकार आहे. विनय हीच संसारसमुद्रांतून तारणारी नाव आहे. याकरितां गृहस्थांनीं मन-वचन--कायेनें प्रत्यक्ष व परोक्ष विनय धारण करावा. याचें विशेष वर्णन पुढें तपाच्या वर्णनांत येईल.

४ **ईर्यापथशुद्धि**–नाना प्रकारचीं जीवांचीं स्थानें, जीवांच्या उत्पन्न होण्याच्या योनि व जीवांचीं आश्रयस्थानें जाणून पीडा होणार नाहीं अशा रीतीनें सूर्याच्या प्रकाशांत निरीक्षण करून गमन

करावें. रस्त्यांतून उतावळीनें अथवा अगदीं हळू जाणें अथवा भ्रमांत, विस्मयांत, आश्चर्यांत गढून जाऊन गमन करणें, खेळत खेळत व शरीराचे अवयव वेडेवांकडे करीत गमन करणें व दिशाविदिशांकडे पहात पहात गमन करणें हे सर्व गमनाचे दोष आहेत. हे टाळून चार हातप्रमाण पुढील जमिनीकडे पाहून, अनेक लोक, गाड्या, घोडे, बैल वगैरे ज्या मार्गानें गेले असतील, ज्या मार्गावरून वारा वाहून गेला असेल, व सूर्याच्या किरणांचा प्रकाश पडला असेल त्या मार्गानें दिवसा गमन करणें याला ईर्यासमिति म्हणतात. नीति व वैभव हीं दोन्ही एकत्र आढळून येतात तद्वत् समिति व संयम हे दोन्ही साधूंच्या ठिकाणीं असूं शकतात. या साधूंच्या मार्गाच्या एकदेशाचा अंगीकार करणाऱ्या गृहस्थानें मार्ग पाहून गमन करण्याची भावना ठेवावी. रस्त्यांतून जातांना किडा, मुंगी, हिरवें गवत, चिखल वगैरे टाळून गमन करावें. सामान्यतः खालीं पाहून चालणाराला खांचखळग्यापासून बचावून जातां येतें व सर्पादिक दुष्ट जीवांवर पाय पडण्यानें होणाऱ्या बाधेची भीति नसते. म्हणून ईर्यापथ समिति पाळण्यांत सर्वांचेंच हित होऊन जिनाज्ञेचें पालनही होतें.

**५ भिक्षाशुद्धि**– साधु देशकालवर्तमान स्थितीचा विचार करून आहारासाठीं गमन करतात. जर गांवांत कोठें आग लागली असेल, परचक्राचा उपद्रव झाला असेल, राजा वगैरे कोणी प्रसिद्ध पुरुष मरण पावला असेल, धर्मावर कांहीं विघ्न उत्पन्न झालेलें असेल तर ते भिक्षेकरितां निघत नाहींत. तसेंच कोठें हिंसा होत आहे असें समजलें तर निघत नाहींत. गडबडीनें किंवा अगदीं हळु असें गमन करीत नाहींत. चालतांना कोणाशीं बोलत नाहींत. गमन करीत असतांना अरण्यांतून वनश्रीच्या व शहरांत वरादारांच्या शोभेकडे पहात नाहींत. जेथें कलह, विसंवाद, कौतुक, नृत्यगीतादिक होत असेल तें स्थल सोडून दुसऱ्या बाजूनीं जातात. जेथें दुष्ट माणसें, दुष्टपशु, उन्मत्त पुरुष व स्त्री, पान, फल, फूल, बीं, पाणी, चिखल वगैरे असेल तो रस्ता टाळून दुसऱ्या बाजूनें जातात. भिक्षेस निघतांना अमुक दाताराच्या घरीं जाईन अथवा जो लौकर भोजन देईल त्याचें घरीं आहार मिळाला तर बरें अथवा गोड भोजन मिळाल्यास उत्तमच. जेवणांत मीठ असावें, जेवण गरम असावें, थंड स्वाद गेलेलें नसावें, अशा प्रकारचे विकल्प साधूंनीं मनांत आणूं नयेत. अंतरायकर्माच्या क्षयोपशमाप्रमाणें लाभालाभ होणार आहे असें जाणून त्याविषयीं अथवा मानापमानाविषयीं मनाची वृत्ति समान ठेवावी. मनांत धर्मध्यानाचें चिंतन करीत चार आराधनांना शरण जावें. क्षुधातृषादि वेदनांचा विचार मनांत आणूं नये. अशी जैनसाधूंच्या भिक्षेची पद्धति आहे. साधु निंद्यकुल असेल त्याचे घरीं आहाराकरितां जात नाहींत. उत्तमकुल असूनही जेथें दानशाला असेल, लग्न वगैरे होत असतील, मृत पुरुषाचें सूतक असेल, गाणें, बजावणें चाललें असेल, वादित्रांचा घोष चालला असून पुष्कळ लोक एकत्र झालेले असतील, दरवाजे बंद असतील, जाणाऱ्याला मज्जाव असेल, दरवाज्यांत हत्ती, घोडे वगैरे उभे असतील किंवा बांधून ठेवलेले असतील, अनेक माणसांचें जाणें येणें चालू असेल, अरुंद रस्ता असल्यानें पुष्कळ लोकांना खेटून जाणें येणें करावें लागत असेल, कमरेहून अधिक खोल उतरावें लागत असेल, उंच भूमीच्या मर्यादेचें उल्लंघन होत

असेल अशा घरांत साधु भोजनाकरितां प्रवेश करीत नाहींत. चंद्राचा प्रकाश जसा गरीब व श्रीमंताचे घरीं सारखाच पडतो त्याप्रमाणें हे साधूही गरीब, श्रीमंत सर्वांचे घरीं आहाराकरितां जातात. दीन, अनाथ, निंद्यकर्म करून आपलें उदरभरण करणारे वगैरे सोडून भिक्षेकरितां कोणाही श्रावकाचे घरीं जोंपर्यंत अन्यभिक्षुकांना अथवा प्रत्येक येणाऱ्या जाणाऱ्याला मोकळीक आहे. त्या मर्यादेपर्यंत जाऊन, धर्मलाभादि आशीर्वाद मुखावाटें उच्चारण न करतां, हुंकारशब्दांनीं अथवा नेत्रांनीं खूण न करतां, पोटाचा कृशपणा न दाखवितां, हातांनी याचनेची खूण न करितां, दाताराला किंवा अन्नाला पाहण्याकरितां उंच अथवा इकडे तिकडे न पहातां, फार वेळ उभे न राहतां, वीजेच्या प्रकाशासारखे अर्ध्या अंगणांत जातात न जातात तोंच 'तिष्ठ, तिष्ठ, तिष्ठ' असें आदरपूर्वक तीन वेळां म्हणून प्रतिग्रह केला तर उभें राहतात. तेथून निघाले म्हणजे पुनः त्या घरांत प्रवेश करीत नाहींत. दुसऱ्या घरीं जातात. तेथें अंतराय झाला तर तिसऱ्या घरीं न जातां परत वनांत जातात. आचारांग सूत्रांत वर्णिल्याप्रमाणें शेहेचाळीस दोष, चौदा मल व बत्तीस अंतराय टाळून आहार मिळाल्यास हे प्राणांची रक्षा होईल इतकाच आहार ग्रहण करतात. सरस निरस, लाभ-अलाभ याविषयीं समान भाव ठेवतात. जसें साधुपुरुषाच्या सेवेपासून अनेक गुण प्राप्त होतात तद्वत् अशा भिक्षेपासून चारित्रशुद्धि प्राप्त होते. ही भिक्षा मुनीश्वर पांच प्रकारानें घेत असतात. गोचरीवृत्ति, अक्षम्रक्षणवृत्ति, उदराग्निप्रशमनवृत्ति, भ्रामरीवृत्ति आणि गर्तपूर्णवृत्ति याप्रमाणें पांच प्रकारानें साधु आहार घेतात.

१ **गोचरीवृत्ति**– हिरवें गवत वस्त्रालंकारांनीं विभूषित अशा सुंदर स्त्रीनें आणून जरी गाईपुढें ठेविलें तरी ती गाय त्या स्त्रीकडे न पाहतां आपल्या पुढील गवत खात असते, तद्वत् जे साधु दाताराच्या वस्त्राभूषण सौंदर्याला न पाहतां नवधाभक्तियुक्त प्रतिग्रहपूर्वक आपल्या हातांत ठेवलेला ग्रास भक्षण करितात, ते त्यांच्या वस्त्राभरणाकडे पाहत नाहींत. अशा प्रकारच्या साधुवृत्तीला गोचरीवृत्ति असें नांव आहे. अथवा ज्याप्रमाणें गाय अरण्यांत अनेक-स्थलीं असणारें गवत भक्षण करते, ती वनाची शोभा वगैरे पाहण्यांत गुंग होत नाहीं. तद्वत् जैन-साधूही गृहस्थाच्या घरांत गेले तर त्याचें घर, महाल, शय्या, आसन वगैरे पाहण्यांत अथवा सुवर्ण, रुपें, कासें, पितळ, मातीचीं भांडीं पाहण्याकडे आपली दृष्टि ठेवीत नाहींत. आपल्या हातांत ठेवलेला ग्रास ग्रहण करण्याकडेच त्यांचें लक्ष्य असतें. त्या घरांतील परिवारजनांचे मनोहर पोषाख अथवा स्वरूपाकडे पाहत नाहींत. सरस नीरस मिळेल तशा आहाराकडेही न पाहतां गाईप्रमाणें आहार घेतात म्हणून याला गोचरीवृत्ति अथवा गवेषणावृत्ति म्हटलें आहे.

२ **अक्षम्रक्षणवृत्ति**– ज्याप्रमाणें कोणी व्यापारी रत्नांनीं लादलेला गाडा वरचेवर वंगण करून आपल्याला इच्छित अशा देशांतराला घेऊन जातो तद्वत् साधुही गुणरूपीं रत्नांनीं भरलेला देहरूप गाडा निर्दोष असें भिक्षाभोजन देऊन आपल्याला वांछित अशा समाधिरूप पत्तना (शह-राला) नेतात, म्हणून अशा प्रकारच्या वृत्तीला अक्षम्रक्षणवृत्ति म्हटलें आहे.

**३ उदराग्निप्रशमनवृत्ति**– ज्याप्रमाणें अनेक प्रकारच्या मौल्यवान् वस्त्राभरणांनीं भरलेल्या भांडारास आग लागली असतां ती जशी शुद्ध वा अशुद्ध पाण्यानें विझवून गृहस्थ आपल्या भांडारांचें रक्षण करतात. तद्वत् साधुही उदररूपीं भांडारांत उत्पन्न झालेल्या क्षुधातृषादिरूप अग्नीला सरसनीरस भोजनानें शांत करतात. अशा प्रकारच्या वृत्तीला उदराग्नि–प्रशमवृत्ति म्हणतात.

**४ भ्रमराहारवृत्ति**– जसे भुंगे फुलाला यत्किंचितही बाधा न करतां त्यांतील गंध (वास) हरण करतात तसे साधु देखील दाताराला थोडेंही न दुखवितां भोजन करतात. याप्रमाणें भोजन घेणें याला भ्रमराहारवृत्ति म्हणतात.

**५ गर्तपूर्णवृत्ति**– जसें आपल्या घरांत एखादा खड्डा पडला तर तो दगडमाती घालून आपण भरून काढतों त्याप्रमाणें साधु आपल्या उदररूपी खड्डयाला सरसनीरस आहारांनीं भरून टाकतात. याला गर्तपूर्णवृत्ति म्हणतात.

याप्रमाणें पांच वृत्तींनीं साधु शुद्ध भोजन घेत असतात.

श्रावकानें आपली भोजनशुद्धि अन्याय व हिंसा उत्पन्न करणारे व्यवहार सोडून कर्मानुसार प्राप्त होईल त्यांत, संतोष धारण केल्यानें होते. इतरांना दुःख न देतां न्यायानें संपादन केलेल्या धनाचा गर्व, विषाद आणि दैन्य सोडून, दानाचा विभाग काढून ठेऊन अन्नाचा उपभोग घ्यावा. अभक्ष्यादि सदोष भोजनाचा त्याग करून दिवसा आपल्या भोगांतराय व लाभांतरायाच्या क्षयोपशमाप्रमाणें सरसनीरस प्राप्त होणाऱ्या आहारांतून कुटुंबाचा व दानाचा भाग काढून ठेऊन भोजन करावें. या प्रकारें गृहस्थांनीं अति आसक्ति व लालसा यांचा त्याग केल्यानें भोजनाची शुद्धि होते.

**६ प्रतिष्ठापनाशुद्धि**– संयम धारण करणाऱ्या मुनींनीं आपल्या शरीरावरील नख, केश, कफ, नासिकामल, मूत्र वगैरे, कोणालाही त्रास न होईल, कोणताही जीव मरण पावणार नाहीं, कोणाही जीवाचे परिणाम मलिन होणार नाहींत अशा जागीं टाकावे. याप्रमाणें आचरण करणाराला प्रतिष्ठापनाशुद्धि होते. गृहस्थांनीं आपल्या शरीराचा मल, पाणी, राख, माती, दगड, लांकडें वगैरे इतर जीवांना पीडा होणार नाहीं अशा ठिकाणीं टाकावीं. तेथें टाकतांना कोणाही जीवाची विराधना होऊं नये, कोणाशींही कलह, विसंवाद होऊं नये, आपल्या शरीराला अपाय होऊं नये, दुसऱ्याला ग्लानि उत्पन्न होऊं नये याची खबरदारी घ्यावी.

**७ शयनासनशुद्धि**– हें साधूचें मुख्य आचरण आहे. जेथें स्त्री, नपुंसक, चोर, मद्यपी, शिकारी वगैरे पापी लोकांचें येणें जाणें नसेल तेथेंच साधूंनीं राहणें योग्य आहे. जेथें शृंगारवस्त्राभरण धारण करणाऱ्या स्त्रिया राहत असतील, अथवा क्रीडा करण्याकरितां बाग तयार केलेला असेल, जेथें गाणें, बजावणें वगैरे क्रिया चालत असतील अशी जागा साधु पुरुषांना राहण्यास योग्य नाहीं. म्हणून ते अशा स्थानाचा त्याग करून दूर राहतात. जैनसाधु अकृत्रिम अशा पर्वताच्या गुहेंत, अथवा झाडाच्या ढोलींत, अथवा उजाड घरांत, अथवा आपणाकरितांच मुद्दाम न

उभारलेल्या स्थानीं व शुद्ध भूमीवर शयन, आसन करतात. गृहस्थांनींही स्त्री, नपुंसक, दुष्ट, कलह, विसंवाद आणि विकथा वगैरेंनीं परिणामाची निर्मलता बिघडणार नाहीं अशा जागीं शयन व आसन करावें. स्थानदोषानें परिणामांतही दुर्ध्यान उत्पन्न होतें व दुष्ट चिंतन होतें, म्हणून गृहस्थांनीं आपली आजीविका न्यायमार्गानें करून बसणें-उठणें वगैरे क्रिया निराकुल जागींच कराव्या.

८ **वाक्यशुद्धि**– मुनि आपल्या मुखावाटें पृथ्वीकायादि जीवांची विराधना होईल असें कठोर, निंद्य व परपीडा उत्पन्न करणारें वचन कधींही काढीत नाहींत. ते नेहमीं आपल्या मुखानें व्रत, शील, संयम, तपाचाच उपदेश हित पण मित अशा मधुर मनोहर वचनांनीं करतात. अशा मुनींना वाक्यशुद्धि घडतें. गृहस्थानेंही आपणास जितकीं वाक्यें उच्चारावयाचीं असतील तितकी विचारपूर्वक बोलावीं. लोकविरुद्ध, धर्मविरुद्ध, हिंसोत्पादक, असत्य, बहुकर्कश अशी वचनें मुखावाटें कधींही उच्चारूं नयेत म्हणजे त्याला वाक्यशुद्धि घडतें.

याप्रमाणें या अष्टशुद्धि संयमी पुरुषाला करण्यायोग्य आहेत. याचें गृहस्थानें पण चिन्तन करून ह्या आपणास घडाव्यात अशी भावना ठेवावी, म्हणजे तो विशेष पापांत लिप्त न होतां धर्मवृद्धिचें चिन्तन करण्यास अधिक समर्थ होईल.

## तपभावना

तपभावनेचें पण गृहस्थांनीं चिन्तन करणें योग्य आहे. यद्यपि तप हें मुख्यत्वेंकरून मुनीश्वरांनीं करावें असें आहे. तथापि गृहस्थानेंही याचा अभ्यास करीत असावें म्हणजे रोग वगैरे प्राप्त झाले असतां तो व्रतापासून चलायमान होत नाहीं. इंद्रियांवरील नियंत्रणामुळें वृद्धापकाळीं बुद्धि चंचल होत नाहीं. आहारपानाविषयीं होणारी आकुलता सहन केल्यानें सन्तोषवृत्ति प्रकट होऊन दैन्य नाहींसें होतें व परलोकीं स्वर्गाची प्राप्ति होतें म्हणून तप करणें योग्य आहे. हें तप बाह्य व अभ्यन्तर असें दोन प्रकारचें आहे. बाह्य तपाचे अनशन, अवमोदर्य, वृत्तिपरिसंख्यान, रसपरित्याग, विविक्त–शय्यासन आणि कायक्लेश असे सहा भेद आहेत.

१ **अनशन**–अशन म्हणजे भोजन. त्याचा त्याग करणें यास अनशन म्हणतात. हें तप जो दृष्टफलाची अपेक्षा न करतां करील त्यासच लाभणारें आहे. इहलोकीं आपली कीर्ति व्हावी म्हणून, प्रसिद्धि व्हावी म्हणून, लोकांनीं आपणास नमस्कार करावा म्हणून, मन्त्रसाधन व्हावें म्हणून, ऋद्धि व संपत्ति प्राप्त व्हावी म्हणून, शत्रूंचा नाश होऊन परलोकीं वैभव प्राप्त व्हावें म्हणून, कषायानें अथवा वैरानें दुःखित होऊन आपला घात व्हावा या इच्छेनें जें केलें जातें तें खरें अनशन तप नव्हे. तें तप निव्वळ संसारपरिभ्रमणाचें कारण आहे. इंद्रियांची विषयावरील प्रीति कमी व्हावी, षट्काय जीवांचें रक्षण व्हावें, रागभाव कमी व्हावा, निद्रा जिंकिली जावी, कर्माची निर्जरा व्हावी, ध्यानाची सिद्धि व्हावी, देहाचा सुखीपणा नाहींसा व्हावा म्हणून जे उपवास वगैरे करावयाचे त्यासच खरें तप म्हणतात. हें तप दोन प्रकारचें आहे. एक कालमर्यादेचें व दुसरें यावज्जीव. दिवसांतून दोन वेळां भोजन करण्याचा प्रघात आहे. त्यांतून एकवेळां

भोजन करणें व एकवेळा त्याग करणें याला तप म्हटलें आहे. पहिल्या दिवशी एकवेळ जेवून दुसऱ्या वेळच्या जेवणाचा त्याग, दुसरे दिवसाच्या दोनवेळां जेवणाचा त्याग व पारण्याच्या दिवशीं एकवेळ भोजन करून एक भोजनाचा त्याग याप्रमाणें चार भोजनांचा त्याग करणें याला प्रोषधोपवास म्हणतात. सहा भोजनांच्या त्यागाला बेला म्हणतात. आठ भोजनांचा त्याग करणें याला तेला म्हणतात. दहा भोजनांचा त्याग करणें यास चौला म्हणावें. याप्रमाणें कालाची ज्यांत मर्यादा असते त्यास कालमर्यादारूप अनशन म्हणतात. आयुष्याच्या शेवटीं यावज्जीव भोजनाचा त्याग करणें याला यावज्जीवानशन म्हणतात. भगवंतांनीं इंद्रियांचा उपशम व्हावा म्हणून उपवास करण्यास सांगितलें आहे, म्हणून इंद्रियांना जिंकणारे मुनि भोजन करीत असून उपवासी म्हणविले जातात. पण जे उपवास करीत असूनही इंद्रियाला जिंकित नाहींत, अनेक प्रकारचे आरंभ करतात, कषाय-प्रवृत्ति करतात त्यांचें अनशन तप निष्फल होतें. तें तप कर्मांची निर्जरा करूं शकत नाहीं. याप्रमाणें अनशन तपाचें स्वरूप आहे. गृहस्थांनीं ज्यायोगें आपले वात, पित्त, कफादि विकार वृद्धिंगत होणार नाहींत, रोगांचा उपशम होऊन उत्साह वाढत जाईल त्याप्रमाणें व आपले परिणाम वरचेवर शुद्ध व्हावेत म्हणून देशकालानुकूल आहारपानाची योग्यता जाणून, कुटुंबांतील माणसांच्या सहायांचें बलाबल पाहून, आपल्या संहननाप्रमाणें शरीरांत बिघाड होणार नाहीं अशा रीतीनें शक्त्यनुसार अनशन तपाचा अंगीकार करावा.

२ **अवमोदर्य**– अवम–कमी उदर ज्यांत राहील त्यास अवमोदर्य म्हणतात. म्हणजे आपण नेहमीं जितकें अन्न ग्रहण करतों त्याहून कमी ग्रहण करावयाचें हें अवमोदर्य होय. यापासून इन्द्रियांचा संयम होतो. भोजनाच्या आसक्तीचा अभाव होतो. अल्पाहारापासून वात, पित्त, कफादि विकारांचा प्रकोप होत नाहीं. रोगाचा उपशम होतो. आळस व झोप कमी होते. स्वाध्याय, सामायिक, कायोत्सर्ग, ध्यान वगैरे करण्यांत कष्ट होत नाहींत. सुखानें आवश्यक क्रिया करतां येतात. अवमोदर्य करण्यानें उपवासापासून होणारी उष्णता व खेद होत नाहींत. पुढें क्रमानें उपवासही सहज होऊं शकतात ! आकंठ भोजन करणाऱ्याला आवश्यक क्रिया, ध्यान, कायोत्सर्गादि सुखानें होत नाहींत. त्याचा आळस, निद्रा वाढते, तहान लागते, उष्णता वाढून रोग वाढतात. इन्द्रियांची लालसा कमी होण्याकरितां व मनाला प्रतिबंध करण्याकरितां ज्ञानी मुनि अर्द्धभोजन, पावभोजन, दोन घांस व अखेर एक घासांपर्यंत कमी, असे अवमोदर्याचे भेद करितात. पण जर ते मिष्ट भोजनाकरितां अथवा कीर्तिकरितां अल्पभोजन करीत असले तर त्याला अवमोदर्य म्हणतां येणार नाहीं. अवमोदर्य हें भोजनाची लालसा कमी करण्याकरितां आहे. गृहस्थी श्रावकानेंही अन्तराय कर्माच्या क्षयोपशमाप्रमाणें प्राप्त होणाऱ्या भोजनांत संतोष मानून, भोजनाची लालसा सोडून, इच्छेचा निरोध करण्याकरितां अवमोदर्य तप करावें.

३ **वृत्तिपरिसंख्यान**– हें तप फक्त मुनीश्वरांनाच घडतें. मुनीश्वर भोजनास निघतांना प्रतिज्ञा करतात कीं, आज एक, दोन, चार, पांच अथवा सात घरीं जावयाचें. जर सरळ मार्गांत

असलेल्या घरीं आहार मिळाला तर घ्यावयाचा. वक्रमार्गानें जाऊन अमक्या अमक्यानें दिला तर घ्यावयाचा. तसेंच त्यानें अमुक पात्रांतून अमक्या तऱ्हेनेंच दिला तर ग्रहण करावयाचा, इतर प्रकारानें मिळाला तर घ्यावयाचा नाहीं. याप्रमाणें अनेक कठिण मर्यादा करून ते आहारासाठीं निघतात. अशा प्रकारच्या प्रतिज्ञेला वृत्तिपरिसंख्यान तप असें म्हटलें आहे. हें दुर्धर तप मुनीश्वरांनाच घडतें. इतर गृहस्थांना हें धारण करणें अशक्य आहे. गृहस्थाला जर हें तप धारण करावें असें वाटलें तर त्यानें प्रथमतः वीतराग गुरूच्या प्रसादानें अशी प्रतिज्ञा करावी कीं, मी उज्ज्वल जिनधर्माला धारण करीन, धर्माचा घात होईल अशा तऱ्हेनें वागणार नाहीं. ज्यांत माझें ज्ञान, श्रद्धान, तप, व्रत नष्ट होईल अशा तऱ्हेनें आजीविका पण करणार नाहीं. पुष्कळशी हिंसा, असत्य व कपट ज्यांत भरलेलें असेल अशी नौकरी करणार नाहीं. खोटे व पाप उत्पन्न होणारे व्यवहार करणार नाहीं. प्रामाणिकपणाचेच व्यापार करीन. आरंभरहित, कपटरहित, असत्यरहित उपजीविकेचेंच अवलंबन करीन. अन्यायानें उपजीविका करणार नाहीं. याप्रमाणें आपल्या आजीविकेचा नियम करावा. तसेंच एवढें धन, एवढा परिग्रह, इतकीं वस्त्रें यांचाच भोगोपभोग घेईन, रोगादि प्राप्त झाले तर इतकीं औषधें घेईन, याशिवाय दुसरीं औषधें भक्षण करणार नाहीं; आपल्याच मुखानें सांगून मी कांहीं करविणार नाहीं व कांहीं आणविणार नाहीं; अथवा आज आपल्या घरांत जेवण्याच्या वेळीं पात्रांत पहिल्यांदाच जें ठेवतील तेवढेंच भक्षण करीन फिरून मागणार नाहीं. याप्रमाणें इच्छा रोकण्याकरितां गृहस्थानें प्रतिज्ञा कराव्या म्हणजे त्यास हें व्रत घडल्यासारखें होतें.

**४ रसपरित्याग**– दूध, दही, तूप, गूळ, मीठ आणि तेल हे सहा रस आहेत. यांतून जिह्वेची व इतर इंद्रियांची इच्छा व मनाची लोलुपता नाहींशी करण्याकरितां, कामाला जिंकण्याकरितां, निद्रा कमी होण्याकरितां व संयम घडावा म्हणून कांहीं रसांचा त्याग करावा. कधीं एका रसाचा तर कधीं दोन, तीन, तर कधीं सहाही रसांचा त्याग करणें याला रसपरित्याग म्हणतात. संसारी जीवाला गोड भक्षण करण्याची आवड असते, त्यामुळें ते प्रसंगीं लाजलज्जा सोडून अभक्ष्य भक्षण देखील करतात. भोजनाच्या लोलुपतेनें व्रत, तपश्चरण तर बिघडवितातच, पण शूद्रादिक जे अयोग्य कुलांत जन्मलेले आहेत त्यांचे येथें देखील जाऊन जेवतात. भुकेनें दीन होतात. गोड खाण्याकरितां तंटे करण्यास तयार होतात. प्रसंगीं त्यासाठीं जीव देखील देतात. रसलोलुपी लोक बहुतेक अन्नाच्या लोभामुळें भ्रष्ट होतात. कोणत्याही उत्तम पुरुषाला स्वादिष्ट भोजनांत इतकी लोलुपता असत नाहीं. ते प्रथमपासूनच आपल्या घरांत नानाप्रकारच्या घृतशर्करेनें बनविलेल्या मिष्टपदार्थावरील लालसा कमी करून खारट, सपक, असें कोरडें किंवा सचिक्कण वगैरे जसें आपल्या अवस्थानुसार प्राप्त होईल त्यांत संतोष मानून भक्षण करीत असतात. रसलंपटता दोन्ही लोकांना भ्रष्ट करणारी आहे, म्हणून ती नाहींशी करण्याकरितां, इंद्रियांना वश करण्याकरितां, उत्कृष्ट संवर व निर्जरेकरितां, दीनतेच्या नाशार्थ व संतोषवृत्ति धारण करतां यावी म्हणून रसपरित्याग नामक तपश्चरण करणें योग्य आहे.

५ **विविक्तशय्यासन**—शून्य म्हणजे जेथें कोणीही रहात नाहीं अशा घरांत, एकांत जागीं, विकलत्रयाची बाधा होणार नाहीं अशा ठिकाणीं, स्त्रीनपुंसक वगैरे असंयमी लोकांचें येणें जाणें नसेल अशा जागीं, पर्वताच्या गुहेंत, अरण्यांत, ध्यान, अध्ययन, शयन, आसन करणें याला विविक्तशय्यासन तप म्हणतात. एकांत स्थलीं निवास करणाऱ्या साधूंना हिंसा, ममत्व, विकथा आणि कामविकार हे उत्पन्न होत नाहींत. त्यामुळें त्यांना ध्यानाची सिद्धि होते. दुसऱ्या कोणाचा संगम घडला तर त्याशीं बोलणें भाग पडते. बोलण्यापासून मनांत संकल्प उत्पन्न होतात. संकल्प उत्पन्न झाले म्हणजे ध्यान चलायमान होतें व रागभावाची वृद्धि होते. म्हणून संयमी मुनि एकांत जागींच शयन आसन करीत असतात. गृहस्थानही धर्मसाधन करावयाचें असल्यास पापाची भीति बाळगून आपलीं उपजीविकचीं कार्यें न्यायपूर्वक करावीं. आरंभादिकार्यापासून पाप कमी लागेल अशा रितीनें स्नानभोजनादिक कार्यें सावधगिरीनें करावीं. एकांत जागीं आपल्या घरांत अथवा मंदिरांत अथवा धर्मशाळेंत अथवा वनांतील चैत्यालयांत, सहधर्मी लोकांच्या संगतींत धर्मचर्चा स्वाध्याय, जिनागमपठण,पाठण, व्याख्यान, जिनागमाचें श्रवण व पंच नमस्कार मंत्राचें स्मरण करीत आपला दिवस व रात्र पूर्ण करावी. स्त्रीकथा, राजकथा, भोजनकथा, देशकथा करण्यांत आपला वेळ उगाच दवडूं नये. याचप्रमाणें कामविकाराला वाढविणाऱ्या व राग उत्पन्न करणाऱ्या शय्यासनाचा त्याग करावा. म्हणजे गृहस्थालाही हें विविक्तशय्यासन तप घडतें व तें त्याच्या कर्माच्या निर्जरेला कारण होतें.

६ **कायक्लेश**—हें मुनीचें जबरदस्त तपश्चरण आहे. एका आसनावर बसावयाचें, एकाच कुशीवर निजावयाचें, मौन धारण करावयाचें, कडक उन्हाळ्यांत पर्वताच्या शिखरावरील दगडावर सूर्याकडे तोंड करून कायोत्सर्ग धारण करून. सूर्याचा भयंकर आताप व अग्नीसारख्या तप्तायमान वायूच्या लहरींनीं होणाऱ्या वेदना सहन करावयाच्या व अशा वेदना सहन करीत असतांनाही बारा भावनांचें चिंतन करीत धर्मध्यानामध्यें परिणाम स्थिर ठेवावयाचे.परिणामांत यत्किंचितही क्लेश उत्पन्न होऊं द्यावयाचा नाहीं. याचप्रमाणें पावसाळ्यांत झाडाखालीं योग धारण करून, काळोखानें व्यापून गेलेल्या भयानक रात्रीच्या वेळीं अखंड मुसलसदृश पावसाच्या सरींनीं व मेघांच्या गर्जनेनें आकाश आणि पृथ्वी जणु जलमयच झाली आहे कीं काय असा भास होत असतांना, उंच अशा पर्वता-वरून खालीं पडणाऱ्या नदीप्रवाहानें भयंकर कोलाहल माजविला असतांना, वृक्षावर पुष्कळ पाऊस पडल्यामुळें त्यांतून एकसारखी मोठी धार अंगावर पडत असतांना, विजेच्या चकाकीनें व घोर कड-कडाटानें जणुं वज्राघात होतो कीं काय असा भास होत असतांनाही मुनीश्वर ती सहन करीत राहून धर्मध्यानांत व शुक्लध्यानांत तल्लीन झालेले असतात. धन्य आहे त्यांना !!! याचप्रमाणें हिंवाळ्यांत नदीच्या काठीं व वाळवंटांत उघड्या अंगावर बर्फ पडत असणें, अतिशय थंडगार वारा सुटलेला असणें, त्यावेळीं दुःख न मानतां धर्मध्यानांत रात्र काढणें, तसेंच दुष्ट लोकांनीं दिलेला भयंकर उप-

द्रव सहन करून समभाव कायम ठेवणें हें सर्व कायक्लेश तप आहे. हें करण्याचा असा उद्देश असतो कीं, पारतंत्र्यामुळें दुःख प्राप्त झालें तरी आपले परिणाम उद्दिष्ट कार्यापासून चळूं नयेत; शरीरापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाची अभिलाषा नाहींशी व्हावी; रोग प्राप्त झाला असतां चित्त चंचल होऊं नये. भीति जिंकावी आणि परीषह सहन करून कर्माची निर्जरा करावी. गृहस्थांना असलें तप सहन करणें घडणार नाहीं. असें घोर तपश्चरण दिगंबर साधूच करण्यास समर्थ आहेत. गृहस्थानें आपण होऊन मुद्दाम कायक्लेश करूं नये. पण सामायिकादि क्रिया करीत असतां कांहीं परीषह प्राप्त झाले तर आपलें चित्त चळूं देऊं नये. आपण सावधगिरीनें वागत असूनही जर कर्मोदयानें शीतज्वर, दाहज्वर, वात, शूल वगैरे रोग प्राप्त होतील, अथवा दुष्ट, धर्मद्रोही, म्लेंच्छादिक येऊन उपसर्ग करूं लागतील, अथवा बंदीगृहांत कोंडून हाणमार करतील तर गृहस्थांनीं मुनीच्या काय-क्लेश तपाची भावना चिंतून साम्यभाव धारण करावा. त्यावेळीं घाबरूं नये. दारिद्र्यामुळें क्षुधातृषादि शीत, उष्ण वेदना कर्मोदयानें प्राप्त झाल्या तरीही धीर सोडूं नये. त्यावेळीं धर्माला शरण जाऊन सर्व दुःख सहन करावें. यालाच कायक्लेश असें नांव आहे. मुनि असा कायक्लेश मोठ्या उत्साहानें सहन करितातच. त्यासारखें आम्ही कायक्लेश करूं शकत नाहीं. तरी पण असाताकर्माच्या उद-यानें दुःख प्राप्त झालें व त्या दुःखाची फार भीति वाटली तरी, तें दुःख कोण नाहींसें करणार ? त्यावेळीं धैर्य धारण करून जर सहन केलें तर तें आपला रस देऊन नाहींसें होईल. कर्माच्या उदयाला मुळींच दया नसते. घाबरून दुःख करण्यानें उदयांत आलेलें दुःख भोगावें लागेलच. पण याहीपेक्षां पुष्कळपटीनें जास्त असा पुढील दुःखाचा बंध होईल. म्हणून जिन-वचनावर भरंवसा ठेऊन कर्मोदयाच्या प्रसंगीं धैर्य धारण करणें हेंच श्रेष्ठ आहे. गृहस्थाला ज्यावेळीं अन्तरायकर्माचा उदय प्राप्त होतो त्यावेळीं त्याला पोटभर अन्न मिळत नाहीं, मग तूप, साखर कोठून मिळणार ? म्हणून कर्मानुसार जें थोडें बहुत प्राप्त होईल त्यांत संतोष मानून रहावें. लोकांचें वैभव पाहून आपणाला तसें प्राप्त व्हावें अशी इच्छा करूं नये. साम्यभाव ठेवावा. म्हणजे सहज-रीतीनें कायक्लेश तप घडतें व त्यामुळें कर्माची निर्जरा होते.

याप्रमाणें सहा प्रकारचें बाह्यतप वर्णिलें. हें इतरांना प्रत्यक्ष केलेलें दिसून येतें, अथवा बाह्य जें भोजन वगैरे यांचा त्याग केल्यापासून घडतें, अथवा अन्यधर्मीही कोणी याला समजूं शकतात म्हणून या तपाला बाह्यतप असें म्हटलें आहे. पुष्कळसा अग्नि गोळा केला असतां तो गवत वगैरेंना जाळून टाकतो त्याप्रमाणें हें पूर्वसंचिताला दग्ध करणारें आहे, म्हणून याला तप अशी संज्ञा दिली आहे. अथवा इंद्रियांना त्रास देऊन त्यांना विषयादिकांमध्यें रममाण होऊं देत नाहीं म्हणून तप म्हटलें आहे. सुवर्णपाषाणाला तापविलें असतां तो जसा आपला मल टाकून शुद्ध सुवर्णमय बनतो, तद्वत् आत्मा ही तपाच्या प्रभावानें कर्ममलरहित होतो म्हणून भगवंतांनीं याला तप असें म्हटलें आहे.

यापुढें प्रायश्चित्त, विनय, वैयावृत्य, स्वाध्याय, व्युत्सर्ग आणि ध्यान, असे अंतरंगतपाचे सहा भेद आहेत. यांत प्रायश्चित्ताचे नऊ, संख्यात व असंख्यातभेद आहेत.

अंतरंग तपाचे भेद

त्यापैकीं पहिल्या नऊ आलोचना वगैरेचें वर्णन करूं लागलों तर ग्रंथ-विस्तार होईल म्हणून ते संक्षेपांत सांगतों.

**१ प्रायश्चित्त**–धर्मात्मा पुरुषानें आपल्या व्रतधर्मांत दोष लागेल असें स्वतः आचरण करूं नये, दुसऱ्याकडून करवूं नये.कोणी करील त्याला मनवचनकायेनें बरें असें म्हणूं नये.कदाचित् प्रमादामुळें दोष लागला तर साधूजवळ जाऊन सरळ परिणामानें दहा दोष टाकून निवेदन करून आलोचना करावी व गुरूनीं दिलेलें प्रायश्चित्त पूर्ण श्रद्धेनें आदरपूर्वक धारण करावें.गुरूनीं मला प्रायश्चित्त जबर दिलें अथवा थोडें दिलें अशी मनांत शंका आणूं नये. प्रमादानें एकवेळां दोष घडला असतां तो प्रायश्चित्त घेऊन दूर करावा. पुढें आपले शतशः कोणी तुकडे तुकडे केले तरी दोष लागूं देणार नाहीं अशी खबरदारी ठेवणाराचेंच प्रायश्चित्त घेणें सफल होतें. प्रायश्चित्त हें अनेक गुण धारण करणारा, सिद्धांताचें रहस्य जाणणारा, अतिशय शांत ज्याचें मन आहे असा, अपरिस्रावी ( दुसऱ्याचे दोष न सांगणारा ) गुणाला धारण करणारा, तापलेल्या गोळ्यावरील पाणी जसें पुनः बाहेर दिसत नाहीं त्याप्रमाणें शिष्यानें प्रगट केलेले दोष कधींही प्रगट न करणारा, देश-कालाला जाणणारा, एकांतीं बसलेला व पूर्वी वर्णिलेल्या आचार्याच्या अनेक गुणाला धारण करणारा जो गुरु असेल त्याजवळ जाऊन घ्यावें. व हात जोडून, मोठ्या विनयानें, बालकाप्रमाणें सरल चित्त होऊन, आत्मनिंदा करीत आलोचना करावी. ज्याप्रमाणें रक्तानें भरलेल्या वस्त्रावरील डाग रक्तानें धुतल्यानें जात नाहींत, अथवा चिखलानें चिखल धुतला जात नाहीं, तसें ज्या गुरूंत दोष भर-लेले असतील ते साधू शिष्याला निर्दोष करूं शकत नाहींत.मूर्ख वैद्य रोग्याचा प्राण घेतो त्याप्रमाणें अज्ञानी गुरु शिष्याला संसारसमुद्रांत बुडवितो. निर्दोष गुरूच प्रायश्चित्त देऊन शुद्ध करण्यास समर्थ आहे. संयमी पुरुष एकांतीं आलोचना करतात. आर्यिका वगैरेनीं, उघड्या जागीं एक गुरु, दोन आर्यिका, एक गणिनी अथवा जिला दोष लागला असेल ती असे तिघे असतांना आलोचना करावी. जर त्यानीं लज्जेनें व तिरस्कार होईल अथवा प्रायश्चित्त जबर भोगावें लागेल या भीतीनें, अथवा अभिमानानें आपले दोष सांगितलें नाहींत तर, त्यांना नफातोट्याचा हिशेब न पाहणाऱ्या व्यापाऱ्याप्रमाणें कर्मरूप ऋणामुळें भ्रष्ट व्हावें लागेल. दोषांची आलोचना न करितां व भयंकर तप-श्चरण केलें तरी त्यापासून वांछितफलाची प्राप्ति होणार नाहीं. आलोचना केली व गुरूनीं दिलेलें प्रायश्चित्त घेतलें नाहीं तर वैद्यानें दिलेल्या औषधी भक्षण न करणाऱ्या रोग्याप्रमाणें तो शुद्ध होणार नाहीं. अथवा नांगर मारून साफ न केलेल्या जमिनींत जसें धान्य उत्पन्न होत नाहीं अथवा साफ न केलेल्या दर्पणांत रूप स्वच्छ दिसत नाहीं त्याप्रमाणें चित्ताची शुद्धता झाल्याखेरीज आत्म्यांत चारित्राची उज्ज्वलता भासत नाहीं. कलिकालाच्या प्रभावानें प्रायश्चित्त देणारे निर्दोष गुरु दिसत नाहींत. जे स्वतःच अनेक पापांनीं लिप्त आहेत ते दुसऱ्याला कसें शुद्ध करणार?

एकानें एक कसें सुतलें जाईल ? आत्मानुशासन ग्रंथांत म्हटलें आहे—

**कलौ दंडो नीतिः स च नृपतिभिस्ते नृपतयो। नयंत्यर्थार्थं तं न च धनमदोऽस्त्याश्रमवताम्। नतानामाचार्ये नहि नतिरताः साधुचरिता। स्तपस्तेषु श्रीमन्मणय इव जाताः प्रविरलाः॥१४९**

**अर्थ**—कलिकालांत नीतिमार्ग हा दंडावर अवलंबून आहे. दंडाची भीति असल्याशिवाय कोणी ही स्वयं न्यायमार्गाकडे प्रवृत्त होत नाहीं. दंड देण्यास फक्त राजाच समर्थ आहे. राजासारख्या बलिष्ठ पुरुषाशिवाय इतर जे सहधर्मी अथवा वृद्ध अथवा समाज यापैकीं कोणी दंड केला तर तो मानीत नाहींत. पण या कालांत राजे देखील ज्यापासून धन मिळेल असें वाटेल त्यालाच दंड देतात. निर्धनाला दंडच करीत नाहींत. आश्रमांत राहणाऱ्या संन्याशाजवळ धन कोठलें ? म्हणून संयम ग्रहण करून कुमार्गानें चालणाऱ्याला राजा दंड करीत नाहीं. त्यांना आचार्यांनीं दंड द्याव-यास पाहिजे. सध्यां आचार्य शिष्यांवर प्रीति करितात व जे आपणांस शरण येतील त्यांना दंड करीत नाहींत. आपला संप्रदाय वाढविण्याकरितां जो त्यांना नमस्कार करील त्याला ते आपला समजून शिक्षा देत नाहींत. यामुळें त्यांचे शिष्य शास्त्रविरुद्ध आचरण करूं लागतात. या कारणांनीं या कालांत तपस्वी लोकांतही सत्यनिष्ठुर असे साधु थोडे दिसून येतात. निवळ ढोंगी लोकांचाच भरणा दिसून येतो. सारांश, प्रायश्चित्त घेतल्यापासून जीवाचें परमकल्याण होणारें आहे. गृह-स्थानें जिनप्रतिमेच्या समोर उभे राहून आपल्या अपराधाची आलोचना करावी व पुनः ते अपराध घडणार नाहींत अशी खबरदारी घ्यावी म्हणजे गृहस्थास प्रायश्चित्त घडतें.

**२ विनय**—याचे दर्शनविनय, ज्ञानविनय, चारित्रविनय, तपविनय, आणि उपचारविनय असे पांच भेद आहेत. पदार्थांचें श्रद्धान करीत असतां शंका वगैरे जे आठ दोष आहेत ते मुळींच उत्पन्न न होणें याला दर्शनविनय म्हणतात. सम्यग्दर्शनाला योग्य परिणाम होण्यांत हर्ष वाटणें अथवा सम्यक्त्व शुद्ध घडावें म्हणून नेहमीं उद्यम करीत राहणें, सम्यग्दृष्टी पुरुषाची सोबत घडावी अशी नेहमीं इच्छा ठेवणें, मिथ्याधर्मांची प्रशंसा न करणें, मिथ्यादृष्टीच्या तपाची, दानाची, ज्ञानाची प्रशंसा न करणें व वीत-राग प्रभूंनीं सांगितलें तें प्रमाण आहे अशी बुद्धि असणें या सर्वांना दर्शनविनय म्हणतात. यांत मिथ्यादृष्टीच्या तपाची, ज्ञानाची, आचरणाची प्रशंसा करूं नये म्हणून सांगितलें आहे. त्याचें कारण असें कीं, मिथ्यादृष्टीच्या आचरणापासून इहपरलोकीं कीर्ति, प्रसिद्धि, विषयसुख धनसंप-देची इच्छा हेंच उत्पन्न होणार. त्यानें आत्मप्राप्ति कशी होणार ? म्हणून तें बंधाला कारण अस-ल्यानें प्रमाण नाहीं. याकरितां त्यांची प्रशंसा वगैरे करूं नये.

दर्शनविनय

ज्ञानविनयाचें लक्षण असें आहे कीं, आळस टाकून विक्षेप सोडून व विषयकषायरूपीं मल नाहींसे करून, शुद्ध मनानें, देशकालाच्या विशुद्धतेचें चातुर्य असलेल्या पुरुषानें, मोठ्या सन्मानानें आपल्या शक्त्यनुरूप तपश्चरण करून, वीतराग सर्वज्ञांनीं प्ररूपण केलेल्या परमागमाचें ज्ञान ग्रहण करण्याकरितां अभ्यास व चिंतन करीत

ज्ञानविनय

राहणें याला ज्ञानविनय म्हणतात. ज्ञानाचा अभ्यास करणें यांतच जीवाचें कल्याण आहे. ज्ञानाशिवाय मनुष्य पशुसारखा आहे. मनुष्याला मनुष्यत्व ज्ञानाभ्यासानें येतें. कामसेवन, अन्नभक्षण, इंद्रियविषय हे तर पशूलाही आहेतच. ज्ञानविनय धारण करणारा नेहमीं सम्यग्ज्ञानाचीच इच्छा करीत असतो.

चारित्रविनय

ज्ञान व दर्शन ज्या पुरुषाच्या ठायीं असतें त्याला पंचाचाराचें वर्णन ऐकतांच सर्व शरीरावर रोमांच उभे राहून अंतरंगांत भक्ति प्रगट होते त्यायोगें विषयकषायांचा निग्रह होऊन शांत परिणाम होतात. तेव्हां तो नम्र मस्तक करून चारित्र धारण करण्यास तयार होतो. हा चारित्रविनय होय.

तपविनय

संसारांतील दुःख नाहींसे करणारें, आत्म्याला निर्बाध सुख प्राप्त करून देणार, विषयकषायादिक रोगांचा उपद्रव जिंकणारें एक तपच समर्थ आहे व त्याला शरण गेलें पाहिजे असा विचार ज्यांच्या मनांत येतो त्याला तपविनय घडतो. तपस्व्यांना उच्च व सर्वोत्कृष्ट समजून त्यांची सेवा, भक्ति, वैयावृत्य, स्तुति वगैरे करणें हाही तपविनयच आहे. आपल्या शक्तिप्रमाणें इंद्रियांचा निग्रह करून देशकालानुसार अनशनादिक तप करण्यास प्रवृत्त होणें, याचाही तपविनयांत अंतर्भाव होतो.

उपचारविनय

उपचारविनयाचें स्वरूप असें आहे कीं, आचार्यादिक पूज्य पुरुषांना पाहतांच उठून उभे राहणें, गुरूच्या सन्मुख सात पाउलें चालून जाणें, त्यांना मस्तक नमविणें, हात जोडणें, त्यांना पुढें करून आपण मागून चालणें, ते बसल्यानंतर आपण बसणें, नमस्कार करून रत्नत्रयाचें कुशल विचारणें, त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागणें, पठन, पाठन, तपश्चरण, आतापनयोग व सिद्धांताचा अभ्यास करणें, विहार करणें, वंदना करण्याकरितां क्षेत्रांतरीं गमन करणें वगैरे सर्व क्रिया गुरूना विचारून करणें, गुरु समक्ष असतांना आपण खालीं बसणें हा सव उपचारविनय आहे. ह्या क्रिया प्रत्यक्ष गुरु असतांना करावयाच्या. पण जर गुरु वगैरे पूज्य पुरुष परोक्ष असले तर मनवचनकायेची शुद्धि करून त्यांना नमस्कार करणें, हात जोडणें, त्यांच्या गुणांचें स्मरण करणें, त्यांनीं केलेली आज्ञा पाळणें हा सर्व उपचारविनय आहे. याच्या प्रभावानें सम्यग्दर्शनाचा लाभ होतो. अनेक विद्या सिद्ध होतात. मदाचा अभाव होतो. आचाराची उज्ज्वलता होते. सम्यक् आराधना घडते. कीर्ति निर्मल होते व कर्माची निर्जराही होते. याशिवाय इतरधर्मी लोकांचा व मंदज्ञानी जीवांचाही यथायोग्य विनय करावा. मिथ्यादृष्टी असला तरी त्याचाही तिरस्कार करूं नये. त्यांशीं मिष्टभाषण मोठ्या आदरानें संतोष होईलसें बोलावें. त्यांचें दुःख नाहींसें होईल अशी वाणी मुखावाटें उच्चारावी. उद्धट वर्तनानें दोन्ही लोक बिघडतात. उपचारविनय मनवचनकायेच्या मार्गांनीं अनेक प्रकारचा आहे. गुरूंचें अथवा सम्यग्दर्शनादि गुण धारकांचें शय्यासन स्वच्छ करणें, त्यांच्याहून खालीं बसणें, निजणें, त्यांना सोसेल अशा बेतानें पादसंमर्दन करणें, त्यांना दुःख प्राप्त

झालें, रोग प्राप्त झाला तर त्यांची सेवा करून आपला जन्म सफल मानणें, त्यापुढें न थुंकणें, आळस न घेणें, ढेंकर अथवा जांभई न घेणें, बोटें न मोडणें, हातपाय न पसरणें, टाळी न वाजविणें, अंग भुवया यांचे वेडेवाकडे विकार न करणें, शरीर सुशोभित न करणें वगैरे क्रियांचाही विनयांत अंतर्भाव होतो. विनयी पुरुष आपण उच्च स्थानावर बसून संयमी पुरुषांना वंदन करीत नाहींत. जेथें संयमी असतील तेथें जाऊन नमस्कार करितात. संयमी येतातसें पाहतांच आसनावरून उठून उभे राहतात. गुरूची आज्ञा आम्ही धारण करूं तर आम्ही पुण्यवान् बनूं अशी त्यांची भावना असते. या उलट उद्धट पुरुषाला व्रत, संयम, विद्या, शील वगैरे असूनही तीं सर्व निष्फल होतात. विनयाच्या प्रभावानें क्रोध, मान, वैरादिक सर्व दोष नाहींसे होतात. तसेंच संसारासंबंधी लक्ष्मी, सौभाग्य, कीर्ति, मित्रता, गुणग्रहण, सरलता, मान्यता, कृतज्ञता वगैरे गुणही नाहींसे होतात म्हणून साधु व गृहस्थ या दोघांनाही संपूर्ण धर्माचें मूळ विनय धारण करणें योग्य आहे.

**३ वैयावृत्य**— म्हणजे सेवा. ही ज्यांना गुणांवर प्रीति आणि धर्मावर श्रद्धान, धर्मात्मा पुरुषावर वात्सल्य, निर्विचिकित्सा वगैरे गुण असतील त्यांनाच घडते. कृतघ्नाला आचार्यादिकांचें वैयावृत्य करावें असा विचार मनांत येत नाहीं. दहा प्रकारच्या साधूंचें वैयावृत्य करावें असें आगमांत सांगितलें आहे. ते दहा प्रकारचे साधु-आचार्य, उपाध्याय, तपस्वी, शैक्ष्य, ग्लान, गुण, कुल, संघ, साधु आणि मनोज्ञ होत. त्यांतून जे सम्यग्ज्ञानादिक गुणांना व स्वर्गमोक्षाचें सुख हेंच कोणी एक अमृत त्याचें बीज जें व्रत संयम तपादिकांना स्वहितार्थ धारण करितात त्यांना आचार्य म्हणतात. अशा आचार्यांची आपल्या शरीरानें व इतर क्षेत्र शय्या-आसनादिकांनीं सेवा करणें याला आचार्य वैयावृत्य म्हणतात. आचार्याचें वैयावृत्य करणें म्हणजे परंपरेनें सर्व संघाचें वैयावृत्य करण्यासारखें आहे. कारण सर्व संघाचें अस्तित्व आचार्यांच्या प्रभावा-वरच अवलंबून असतें.

वैयावृत्य

जिनवरांनीं वर्णिलेल्या व्रत, शील, तप, संयम धारण करणाऱ्या मुनीजवळ जाऊन जे परमागमाचें अध्ययन व पठन करतात ते उपाध्याय होत. मोठमोठीं अनशनादिक तपश्चरणें जे करतात ते तपस्वी. श्रुतज्ञानाच्या शिक्षणांत आणि व्रतशीलांच्या भावनेंत जे निरंतर तत्पर असतात ते शैक्ष्य. रोगादिकांनीं ज्यांचें शरीर पीडित झालें असेल ते ग्लान. वृद्ध मुनीचा समूह तो गण. दीक्षा देणाऱ्या आचार्याचा जो शिष्यसमूह तो कुल. चार प्रकारच्या मुनीश्वरांचा समुदाय तो संघ. पुष्कळ वर्षांपासून दीक्षा घेतलेला तो साधु. लोकांत पंडित म्हणून ज्याची मान्यता असेल, मोठा वक्ता व कुलीन म्हणून प्रसिद्ध असेल तो मनोज्ञ होय. याप्रमाणें ज्यांच्या योगानें धर्माचें गौरव वाढतें, अशा प्रकारच्या दशविध मुनींच्या शरीरांत कांहीं रोग उत्पन्न होईल, त्याजवर संकट येईल अथवा त्यांचे परिणामांत मिथ्यात्वाचे भाव उत्पन्न होतील तर यथाक्रमें त्यांना भोजन, पात्र, वसतिका, संस्तरण, धर्मोपदेश वगैरे देऊन श्रद्धान दृढ करणें, पुस्तक, पिंछिकमंडलु वगैरे धर्मोपकरणाचें दान देणें, प्रसंगीं धैर्य व

मुनींचे भेद

यापुढें विकलत्रयांतून सुटून कदाचित् पंचेंद्रिय तिर्यंच होऊन जन्मले तरी जलचर जीवांत जे अधिक बलवान् असतील ते निर्बलांचें भक्षण करतात. धीवराच्या गळाला अडकून किंवा त्याच्या जाळ्यांत सांपडून कित्येक मृत्यूच्या भक्ष्यस्थानीं पडतात. कित्येक लोक तर जिवंत मासे तळून खातात. अरण्यांत असलेल्या पंचेंद्रिय-जीवांना मरणाच्या भीतीमुळें तहान, भुकेची वेदना सहन करीत गुहेंत पडून रहावें लागतें. अरण्यांतील जीवांना उन्ह, पाऊस, थंडी यापासून होणारी वेदना सहन करावी लागते. सकाळीं उठल्याबरोबर त्यांच्या पुढें अन्नानें भरलेलें ताट कोण आणून ठेवणार आहे? जबरदस्त भुकेची वेदना होत असतां कदाचित् कोठें भक्ष्य मिळालें तर पाणी मिळत नाहीं. तहानेच्या वेदनेनें त्याचे प्राण कासाविस होतात. शिकारीलोक, पारधीलोक शिकार करण्यासाठीं त्यांचा शोध करीत असतातच. त्यांच्या तडाक्यांत सांपडतांच बाण मारून त्यांचा प्राण घेतात. कदाचित् पारध्यांनीं त्या पशूंना पाहिलें नाहीं तरी दुसरे बलवान् पशु त्या निर्बल पशूंना मारून टाकतात. याशिवाय पारधी लोक शिकारीकरितां म्हणून त्या तिर्यंच प्राण्यांना त्यांच्या रहाण्याच्या ठिकाणापासून बळजबरीनें हुसकून बाहेर घालतात तें निराळेंच. सिंह, वाघ वगैरेसारखे क्रूर व सर्वांत श्रेष्ठ असे प्राणी पर्वतावर, गुहेंत, वृक्षावर वगैरे जागीं लपून राहिलेल्या प्राण्यांना पकडून मारून टाकतात. खुद्द सिंह व वाघांना पण पुष्कळ भीति वाटते. त्यांना नियमित आहार मिळत नाहीं. एखादे वेळीं भक्ष्य मिळालें तरी पुढें दोन दोन तीन तीन दिवस कांहींच मिळत नाहीं यामुळें त्यांना भुकेची वेदना सहन करावी लागतें. पारधी वगैरे लोक अनेक प्रकारचे फासें, जाळीं वगैरे घालून पुष्कळशा रानटी प्राण्यांना धरून मारून खातात किंवा विक्रीकरितां बाजरांत आणतात. जीवंत पशूंचे पाय, हात, जीभ, शेपूट वगैरे कापून विकतात. तसेंच अनेक प्रकारांनीं त्यांचीं मर्मस्थानें काढून तीं शिजवून खातात. तिर्यंचगतींत कोणीही या सर्व दुःखापासून रक्षण करणारा नाहीं. अथवा एखादा उपायही त्याजपाशीं नाहीं. या योनींत आईदेखील आपल्या मुलाला भुकेच्या वेदनेनें भक्षण करते. मग दुसरें कोण भक्षण करण्यासारखें राहिलें?

पंचेंद्रियांचें दुःख.

यापुढें आकाशांत उडणारे पक्षी तरी निर्भय असतील. त्यांना वर सांगितलेली भीती असण्याचें कारण नाहीं. कारण आकाशांत विहार करितात म्हणून त्यांना येथील स्थलचर क्रूर प्राण्याची भीति कसची? असें कोणी म्हणतील पण ही शंका बरोबर नाहीं. जरी त्यांना पृथ्वीवरील हिंस्र पशूपासून कांहीं अशी भीति नसली तरा आकाशांतील बलिष्ठ पक्षी निर्बल पक्ष्यांना मारून खातात. शिकारी जातीचे पक्षी आपलें भक्ष्य आकाशांत विहार करणाऱ्या इतर पक्ष्यांना मारूनच मिळवितात. घुबड वगैरे रात्रीं विहार करणारे पक्षी रात्रीच्या वळीं आपल्या घरट्यांत अथवा वृक्षावर बसलेल्या पक्ष्यांचा कंठ फोडतात. अथवा मांजर, कुतरे वगैरे देखील एखादेवेळीं त्यांच्या तावडींत सापडलेल्या पक्ष्यांना मारून टाकतात. रात्रौ पक्षी भयभीत होऊन झाडाच्या पोकळींत अथवा फांद्यावर बसतात. त्यांना झोप घेण्याकरितां हांतरूण पांघरूणाची कांहीं सोय

पक्ष्यांचें दुःख.

नसते. वाऱ्याची, पावसाची, थंडीची व उन्हाची तीव्र वेदना सहन करावी लागते. कित्येक पक्ष्याचे पंख उपटतात. कित्येक त्यांना चिरतात व तापलेल्या तेलांत जिवंत टाकून तळून खातात. सारांश कोठेंही पहा, तिर्यंचांना भयंकर दुःख सोसावें लागतें. हें सर्व पूर्वकृत हिंसेचें फल आहे.

आतां हत्ती, घोडे, उंट, बैल, रेडा, गाढव वगैरे चतुष्पाद प्राण्याच्या दुःखाविषयीं विचार केला तर असें दिसून येतें कीं, हे प्राणी पराधीन असतात व यामुळें त्यांना होणारें दुःख काय सांगावें ? बैलाचें नाक चिरून त्यांत वेंसण घालणें, सर्व दिवस रात्र एक

चतुष्पाद पशूंचें दुःख.

जागीं बांधलेले राहणें, स्वतंत्रतेनें कोठें फिरणें, खाणेंपिणें वगैरे प्राप्त होत नाहीं त्यामुळें त्यांना अतिशय दुःख सोसावें लागतें. याचप्रमाणें सर्व दिवस-भर त्यांना उन्हांत, पावसांत, थंडींत बांधून घालतात.कातड्याच्या वादीच्या केलेल्या चाबकानें मारतात, असूडाला लोखंडाची अणी खोंवून त्यानें टोंचतात, शक्तीपेक्षां अधिक ओझें लादतात, लाकडानें मर्मस्थानावर मारतात, जड जू वाहिल्यानें बैलाच्या खांद्यावर रक्त निघून त्यांतून पू रक्त गळूं लागतें तरी पुनः त्याच खांद्यावर गाडीचे जूं लादतात, त्यावेळीं त्या जखमेवर पुनः अधिक जखम वाढून मांस बाहेर दिसूं लागतें, त्याजागीं किडे पडतात तरी दगडानें किंवा लाकडानें भरलेली गाडी ओढायला लावतात. ती जर ओढली न गेली तर मारून मारून हाडांचें चूर्ण करून टाकतात. ओढतांना त्या जनावरांना शक्ति न राहिल्यानें त्यांचे पाय गळून जातात. तसेंच पुष्कळ रोग उत्पन्न होतात, नाक तुटून जातें, बसल्या जागेहून उठवत नाहीं, पाठीवर नाळ पडून किडे पडतात, तरी त्यावर ओझें लादावयाचें कोणी सोडत नाहीं. त्यांच्या शक्तीहून अधिक लांब नेतात, त्यावेळीं त्या पशूला भूक, तहान, ऊन्ह, पाऊस व रोग यांपासून वेदना होत असेल याचा कोणीही विचार करीत नाहीं. अर्ध रात्र उलटल्यावर जें त्याच्या अंगावर ओझें घालावयाचें तें दुसरे दिवशीं तीन प्रहर जावें तेव्हां तें अंगावरून काढतात. पशुयोनींतील दुःखाइतकें दुसरें तीव्र दुःख दुसरें कोठें पाहावयास सांपडणार नाहीं. निरंतर त्यांना पिंजऱ्यांत व बंधनांत अडकून रहावें लागत असल्यानें अतिशय दुःख सोसावें लागतें. कांहीं पशु चांडालाच्या दारीं बांधलेले असतात. तेथें त्यांना खायाला मिळत नाहीं. इतर पशु श्रीमंत लोकांच्या दारीं बांधलेले पाहून व त्यांना खाण्यापिण्याचा बंदोबस्त पाहून त्यांना जबरदस्त मानसिक दुःख होत असतें. दुसऱ्याच्या कडब्याच्या गंजींत अथवा गवतांत अथवा शेतांत तोंड घातलें तर मागाहून धनी पाठींत लाकडाचा सोडगा लगावतो. याप्रमाणें क्षुधेची तीव्र वेदना पशुयोनींत सोसावी लागते. याचप्रमाणें तहानेची, रस्त्यानें ओझें घेऊन चालण्याची वेदना व रोगाची वेदना सोसावी लागते. बैल, कुतरा वगैरे पशूंच्या डोळ्यांत व कानांत तीव्र दुःख देणारे रोग उत्पन्न होतात. त्यांच्या मर्मस्थानापासून त्या रोगांचे किडे रक्त शोषण करतांना जें दुःख होतें तें सांगतां येत नाहीं. कित्येकांना तर गवत अथवा कडबा खावयाला व पाणी पिण्याला देखील मिळत नाहीं. त्यामुळें होणारी वेदना सोशीत ग्रीष्मकाल पूर्ण करावा लागतो. वर्षाऋतु प्राप्त झाला असतां पुष्कळसें गवत खाण्याकरितां उत्पन्न होत, परंतु त्यांत कोट्यवधि डांस, मच्छर उत्पन्न

होतात. जेथें चरावयाला जावें तेथें डांस चावतात, त्यामुळें शांतचित्तानें पुढें असलेलें गवत देखील खाववत नाहीं. सर्वांगाला डांस डसल्यानें इकडून तिकडे तिकडून इकडे एकसारखें फिरावे लागतें. गवताकडे तोंड देखील घालवत नाहीं. जेथें बसावें तेथें जळू पुनः अंगाला चिटकून रक्त शोषण करावयाला तयार आहेतच. याप्रमाणें भयंकर दुःख पंचेंद्रियपशूंना सोसावें लागतें. हत्ती, घोडे, उंट, बैल वगैरे प्राण्यांवर ओझें लादून नेत असतां ते ओझ्याच्या भारानें, म्हातारपणामुळें, रोगांमुळें थकून जातात. त्यांच्यानें पुढें पाऊल ठेववत नाहीं. चालतां चालतां रस्त्यांत बसतात. हातपाय तुटून जातो. वरून एकसारखा असूडाचा मार चालू असतो, परंतु चालण्याची शक्ति उरलेली नसते अशा स्थितींत त्यांचे मालक त्या निर्जन अरण्यांत, पर्वतावर अथवा पाण्यांत तसेंच टाकून आपण निघून जातात. निर्जन वनांत एकटे हे पशु राहिल्यानें त्यांनीं कोणास शरण जावें? कोणास पाणी मागावें? गवत कोणी आणून घालावें? उन्हांत थंडींत, पावसांत तसेंच पडून रहावें लागून क्षुधा-तृषेची वेदना सहन करावी लागते. हे प्राणी अशक्त झालेले पाहून गिधाड वगैरे दुष्टपक्षी लोखंडा-सारख्या आपल्या अणीदार खूर चोंचीनें यांचे डोळे फोडतात. मर्मस्थानीं चोंच मारून मांसाचे लचके तोडून नेतात. नरकासारखी तीव्र वेदना सहन करीत व दुःखानें कित्येक काल तडफडून त्यांना प्राण सोडावा लागतो.

हें दुःख पूर्वजन्मीं अन्यायानें धन हरण करण्यानें, लोकांना फसवून दान घेण्यानें, विश्वास-घात करण्यानें, अभक्ष्य भक्षणानें, रात्रौ भोजन करण्यानें, देवद्रव्य [ निर्माल्य ] भक्षण करण्यानें, तिर्यंच योनींत उत्पन्न होऊन भोगावें लागतें. दुसऱ्यावर विनाकारण दोषा-रोप करून त्याला कलंक लावणें, आपली प्रशंसा करून दुसऱ्याची निंदा करणें, दुसऱ्याला कपट करून फसविणें, मिष्टान्न भक्षण करण्याच्या तीव्र इच्छेनें कपट करणें, यामुळें तिर्यंच योनींत उत्पन्न व्हावें लागत असून अनेक प्रकारचें असह्य दुःख भोगावें लागतें. असंख्यात, अनंतभव तिर्यंच गतींत वारंवार धारण करून पुनः मायाचार करून तीव्र पापबंधानें नवीन तिर्यंच योनीचा अथवा नरक गतीचा बंध करीत ह्या जीवानें अनंतकाल पूर्ण केला आहे. मिथ्या श्रद्धान, मिथ्या ज्ञान व मिथ्या आचरणाचें हें फल आहे.

तिर्यंच योनींत कां जन्मावें लागतें?

आतां मनुष्य गतींतील दुःखासंबंधानें थोडेसें पाहूं. या गतींत देखील कांहीं जीव पशूसारखें ज्ञानरहित आहेत. कित्येक उत्पन्न होतांच आईबाप मरण पावल्यामुळें दुसऱ्याचें उष्टें भक्षण करून क्षुधातृषेची वेदना व तिरस्कार सहन करीत वाढतात. कित्येक दुसऱ्याची नौकरी करतात. कित्येक गाढवासारखें जबरदस्त ओझें वाहून आपलें आयुष्य पुरें करितात. एक शेर अन्न पोटाला मिळावें म्हणून कांहीं ओझें डोकीवर, कांहीं पाठीवर व कांहीं हातांत घेऊन दहाबारा कोस चालून जातात. कित्येक तर सर्व दिवस पाणी वाहण्याचें काम करीत असतात. कित्येक पोटाकरितां परगांवीं रात्रंदिवस पायांनीं चालत जातात. दररोज चालण्यांत अतिशय दुःख येतें. वीस, पंचवीस, तीस कोसपर्यंत पायांनीं चालत

मनुष्यगतींतील दुःख.

जावें लागतें, त टीचभर पोटाची खळगी भरण्याकरितांच. कित्येकांना दगड माती वाहण्याचें काम निरंतर करावें लागतें. कित्येकांचा जन्म पराधीन राहून सेवा करण्यांत जातो. कित्येक लोहाराचा, तर कित्येक भांडीं मडकीं घडण्याचा धंदा करून पोट भरतात. कोणी वस्त्र धुवून, कोणी वस्त्र रंगवून, कोणी वस्त्रें छापून, कोणी शिवून, कोणी वस्त्रें विणून, कोणी मोतद्दाराच काम करून पोट भरतात. कित्येक तर गवतांचे व लाकडांचे भारे जन्मभर वाहून पोट भरतात, कित्येक लोकांचें मलमूत्र काढून, कित्येक कातडें कमावून, कित्येक दळून, कित्येक खोदून, कित्येक स्वयंपाक करून, कित्येक अग्निसंस्कार करून, कित्येक विटांची भट्टी घालून व कित्येक तेल तूप विकून आपला उदर-निर्वाह करितात. कित्येक दीनवाणी मुद्रा करून घरोघर भीक मागून पोट भरतात. कित्येक रंक होऊन फिरतात. कित्येक आपलें ऐश्वर्य गेल्यामुळें शोक करीत असतात. सारांश सर्व लोक कर्माच्या स्वाधीन झाल्यामुळें आत्मस्वरूपाला विसरून मनुष्य जन्म दुःखांत घालवितात. कित्येक चोरी करतात. कित्येक कपटयुक्ति लढविण्यांत प्रवीणपणा संपादन करतात. कित्येक असत्य भाषण करतात. कित्येक व्यभिचार, व कित्येक चहाडी करतात. कित्येक लुटारूचा धंदा करतात. कित्येक समरांगणावर लढाई करितां जातात. कित्येक समुद्रांत खलाशांचें काम करतात. कित्येक नदींतून पार करून नेण्याचें काम करून पोट भरतात. कित्येक विहिरीवर मोट मारून पाणी वर काढण्याचें काम करतात. कित्येक शेतकी करून, कित्येक नावाड्याचा धंदा करून, कित्येक शेतें नांगरून व पेरून, कित्येक हिंसेचा व्यापार करून,कित्येक जमाखर्च लिहून, कित्येक चित्रें करून, कित्येक मातीच्या विटा तयार करून,कित्येक घरें बांधून, कित्येक सट्टा व द्यूत खेळून,धन संपादन करतात.कित्येक दारू पिण्यांत गुंग होतात. कित्येक राजाची सेवा करतात. कित्येक नीच लोकांची सेवा करतात. कित्येक गाऊन, कित्येक वाजवून व कित्येक नाचून उपजीविका चालवितात. याप्रमाणें अनेक प्रकारचें दुःख सोसून मनुष्य जन्म व्यर्थ घालवितात. आपापल्या पुण्यपापाप्रमाणें सर्वांना आपल्या कर्माचें फल भोगावें लागतें. कित्येक धान्य विकून, कित्येक गूळ, साखर, तेल, तूप वगैरे विकून आपली उपजीविका चालवितात. कित्येक लोखंड, पितळ, तांबे वगैरे धातु व कित्येक लाकूड फांटा, दगड, माती विकून उदरनिर्वाह करतात. कित्येक मेवा, मिठाई, जिलेबी, बर्फी, घेवर, लाडू वगैरे अनेक पक्वान्नें तयार करून पोट भरीत असतात. कित्येक औषधें तयार करून विकतात. याप्रमाणें अनेक क्रिया करून सर्वांना आपली उपजीविका चालवावी लागतें. जगांत कित्येक व्यापारी आहेत. कित्येक सेवक आहेत. कित्येक दलाल आहेत. कित्येक सदैव उद्योग करीत आहेत. तर कित्येक निरंतर आळसी व निरुद्योगी बसून आहेत. कित्येक मनसोक्त वस्त्राभरणें वापरण्याचे शोकी आहेत. तर कित्येक मोठ्या परिश्रमानें आपलें पोट भरण्यास असमर्थ आहेत. कित्येकांना बिलकुल दुःख न येतां सुखानें भोजन प्राप्त होतें. तर दुसरें कित्येकाना घरोघर भिक्षा मागून खावें लागतें. कित्येक सर्वांना पूज्य असे गुरु बनून आहार घेतात तर कित्येक दैन्य दाखवून आपलें पोट भरीत असतात. कित्येक अनेक प्रकारच्या स्वादिष्ट मिष्ट भोजनाचा आहार दिवसांतून अनेक वेळेला घेतात तर कित्येकांना नीरस भोजन पण

पोट भरून मिळत नाहीं. कित्येकांना एक दिवसा आड तर कित्येकांना दोन दोन तीन तीन दिवस गेले तरी अन्न मिळत नाहीं. त्यामुळें क्षुधातृषेची वेदना होऊं लागतें व त्यांतच प्राण निघून जातो. कित्येक कारागृहांत राहून तेथील दुःख सहन करीत असतात. कित्येक इष्ट पदार्थांच्या वियोगरूपी अग्नीनें आपलें शरीर जाळून घेत असतात. कित्येक रोगापासून होणाऱ्या तीव्र वेदना सर्व पर्यायांत भोगीत असतां आर्तध्यानांत मरण पावतात. कित्येकांना ज्वर, खोकला व वात, पित्त, कफाच्या अनेक विकारांनीं म्हणजे उदर, जलोदर वगैरेची तीव्र वेदना सोसावी लागते. कोणाला कर्णशूल, दंतशूल, नेत्रशूल, मस्तकशूल, उदरशूल यांच्या वेदनेनें मरावें लागते. कित्येक जन्मापासून आंधळे, कित्येक बहिरे व कित्येक लुले असल्यानें पुष्कळ दुःख सहन करून आपला जन्म पुरा करतात. कित्येक कांहीं वय झाल्यानंतर आंधळे, लंगडे, पांगळे होऊन पराधीनतेनें मानसिक व शारीरीक दुःख भोगतात. कित्येक रक्तविकाराचे रोग म्हणजे कोड, खरूज व महारोगांनीं पीडित होतात. त्यामुळें कोणाचा पायाचा आंगठा, तर कोणाचें हाताचें बोट, कोणाचें नाक याप्रमाणें नाहींसें होतात. कर्मोदयाची गति फार विचित्र आहे. अंतरायकर्माच्या उदयानें कित्येक निर्धन होऊन अनेकविध दुःख भोगतात. कधीं पोट भरतें तर कधीं भरतच नाहीं. कधीं अन्न मिळालेंच तर तें सडलेलें, नासकें, कुजक, कोणी टाकलेलें असें मिळावयाचें. अन्नाकरितां याचना करीत असतां तिरस्कार सोसावा लागतो. राहावयाचें घर अतिशय जुनें झालेलें, ज्यावर गवताचें छप्पर देखील पुरेसें नाहीं व जेथें राहण्याची व्यवस्था पुरीशी नाहीं. जें अतिशय संकुचित, इतकेंही असून ज्या घरांत साप, विंचू वगैरे विषारी प्राण्यांची चाहोकडे बिळ असलेलीं, नेहमीं जेथें घाण पदार्थ पडलेले असल्यामुळें दुर्गंध सुटलेली, असें घर असावयाचें. तेंहीं पुनः जेथें नेहमीं चांडाल वगैरे नीच लोक राहतात अशांच्या शेजारी असावयाचें. बरें, इतकी सर्व अडचण सोसून गृहिणीचें सुख तरी असावें. पण त तरी कुठलें आणावें ? कलह करणारी, नेहमीं तोंडावाटें लाखों अभद्र शिव्या उच्चारून पतीची पूजा करणारी, महान् भयंकर व कुरूप अशी स्त्री प्राप्त व्हावयाची. मग त्या संसारांतील सुखाला काय पारावार ! पापाच्या उदयानें पुष्कळशा रोगी, कुरूपें व रडक्या मुलांची प्राप्ति व्हावयाची. अशा दुष्ट व व्यसनी, महापापी मुलांचा संयोग हाडवैऱ्याहून ही अधिक वाईट. याप्रमाणें दुष्ट भावाचा, अन्यायी, बलिष्ठ, पापी, दुराचारी, व्यसनी शेजाऱ्याचा; लोभी, दुष्ट, अवगुणग्राही, कृपण, क्रोधी व मूर्ख मालकाचा संयोग हा फार दुःख देणारा असून तो पापाच्या उदयानें प्राप्त होतो. याचप्रमाणें दुष्ट, कृतघ्नी, वर्मे पहाणारा, बलिष्ट असा सेवक मिळणें हेंही पापाचेंच कार्य आहे. धर्मरहित, अन्याय मार्गी व क्रूर राजाच्या राज्यांत राहणें, दुष्ट मंत्री, दुष्ट प्रधान, दुष्ट कोतवाल अशाशीं संयोग जडणें, आपल्या कीर्तिला कलंक लागून जगांत अपकीर्ति होणें, धन नष्ट होणें, या सर्व गोष्टी पंचमकालांतील मनुष्यास बहुतेक प्राप्त होतात. या दुःखमा कालांत जे मनुष्य जन्म घेतात ते पूर्वजन्मीं मिथ्यादृष्टी व व्रतसंयम न पाळणारे असतात. असेच लोक भरतक्षेत्रांत येऊन जन्म घेतात. कोणा मिथ्यामागा माणसांना कुतप, कुदान व मंदकषायाच्या प्रभावानें येथें जन्म घेऊन राज्य, ऐश्वर्य, भोग,

संपत्ति, निरोगता वगैरे गोष्टी प्राप्त होतात तरी ते त्याचाच उपभोग घेण्यांत मग्न होण्यानें असन्मार्ग-प्रवृत्तिपासून पराङ्मुख होत नाहींत. यामुळ संसारपरिवर्तन करीत फिरावें लागतें. या कालांत सम्यग्दर्शन, व्रत, संयम, तपश्चरण धारण करणारे पुरुष विरळा. ज्यांनीं आपले कषाय मंद केले आहेत व जे नेहमीं आत्मनिंदा करीत असतात त्यांचा मनुष्यजन्म सफल होऊन ते स्वर्गांत महान् ऋद्धिधारक देव होऊन जन्म घेतात. कोणी या संसारांत मनुष्यजन्मामध्यें पूर्वजन्मकृत मंद-कषाय, निर्मलदान या पुण्यानें उत्पन्न झाला तरी त्यास इष्टवियोग व अनिष्ट संयोग प्राप्त व्हावयाचाच.

संसारांत दुःख कसें आहे याविषयीं विचार करूं लागलों असतां असें दिसून येतें कीं, भरत-चक्रवर्तीच्या धाकट्या भावानें आपल्या भावाचा मानभंग केला. न्यायदृष्टीनें पाहतां थोरला भाऊ पित्याचे जागीं मानला पाहिजे व त्याला नमस्कार करावयास पाहिजे. पण चक्रवर्तीचा उच्चपणा धाकट्या भावाला सहन झाला नाहीं. भरतानें खऱ्या प्रेमानें आपल्या धाकट्या भावाला राज्योपभोग घेण्यास बोलाविलें परंतु त्यानें ईर्षेनें तें आमंत्रण नाकारून त्याचा अपमान केला. अशी स्थिति

संसारांतील दुःखाचें वर्णन

जेथें चक्रवर्तीसारख्या अतुल पुण्यधारी गृहस्थाची घडते तेथें इतरांची काय कथा ? संसारांत कित्येकांना स्त्री नाहीं त्यामुळें ते फार दुःखी. रात्रंदिवस त्याच चिंतेनें आपलें जीवन व्यर्थ मानून निराश होतात. कित्येकांना स्त्री आहे पण ती मोठी दुष्ट, कजाग, व्यभिचारी, कलह करणारी, मर्मभेदक शब्द बोलणारी, रोगी, निरंतर संताप करणारी असल्यानें फार दुःख होतें. कित्येकांना आज्ञा पाळ-णारी व सद्गुणी स्त्री असूनही ती मरण पावल्यामुळें फार दुःख होतें. कित्येकांची स्त्री निर्धन स्थितींत अथवा म्हातारपणीं मरण्यानें फार दुःख होतें. कित्येकांना वृद्धपणीं लग्न करण्याची इच्छा होऊन त्या प्रमाणें स्त्री न मिळाल्यानें फार दुःख होतें. कोणाला मुलगा नाहीं म्हणून, तर कित्येकांना मुलगा असून तो दुर्व्यसनी निघाला म्हणून तर कोणाला मोठ्या कीर्तिमान् मुलाच्या मरणामुळें दुःख होत आहे. कोणाला दुष्ट, दुर्वचन उच्चारून मारूं पाहणारा भाऊ प्राप्त झाला यामुळें दुःख होत आहे. कोणी मोठमोठ्या असाध्य रोगानें व तीव्र दारिद्र्यानें दुःखी आहेत. कित्येकांना पुष्कळ मुली असल्या-मुळें त्या सर्वांचीं लग्नें करण्याइतका पैसा जवळ नाहीं म्हणून दुःख होत आहे. कित्येकांना मुलगी मोठी झाली, तिच्या योग्य वर न मिळाल्यानें दुःख होत आहे. कित्येकांना आपली मुलगी आंधळी पांगळी, लंगडी, बहिरी, वेडी, कुरूप व विकलांगी असल्यामुळें दुःख होत आहे. कित्येकांना आपली मुलगी थोड्या कालांत विधवा झाल्याचें दुःख आहे. कोणाला मुलीच्या घरीं धन नसून अत्यंत गरिबी पाहून दुःख होत आहे. कित्येकांना आपली मुलगी व्यभिचारिणी निघालेली ऐकून मरणप्राय दुःख आहे. कित्येकांना नुकताच विवाह केलेल्या मुलीच्या मरणाचें दुःख आहे. कित्येकांना मातापित्याच्या वियोगाचें दुःख आहे. कित्येकांना बाप मागें आपल्या माथीं लोकांचें कर्ज ठेऊन गेल्याचें दुःख आहे. ऋणासारखें दुसरें दुःख नाहीं, म्हणून पिता ऋण करून गेला हें दुःख, त्यांत आई, बहिण जर व्यभिचारी निघाली तर तें महादुःख. दुसऱ्या कोणी बलवान् दुष्ट माणसानें आपल्या आया-

बहिणींना जबरीनें हरण करून नेलें तरी दुःख. आपल्या मुलांना कोणी चोरून नेलें अथवा मारून टाकिलें त्याचें दुःख. दुष्ट लोकांच्या समागमाचें दुःख. लबाड, चोर, अन्यायी अशा लोकांच्या सोबतीनें उपजीविका करण्याचा प्रसंग आला त्याचें दुःख. मनुष्य जन्मांत येऊन पहिल्यांदा श्रीमंत असून मागाहून दारिद्र्य प्राप्त झाल्याचें दुःख. मानभंगाचें दुःख. प्रथमतः आपल्या जीवाचा मित्र असून तोच मागाहून आपलीं छिद्रें प्रगट करून असत्य भाषणानें कलंक लावूं पाहणारा शत्रु होतो त्याचें दुःख. याप्रमाणें संसार सर्व दुःखानेंच भरलेला आहे. क्षणांत राजा रंक होतो तर एखादा क्षुद्र मनुष्य रंकाचा रावही बनतो. याप्रमाणें मनुष्ययोनींत दुःखाशिवाय दुसरें कांहींही नाहीं.

आतां कदाचित् पूर्व पुण्याईमुळें देवपर्याय प्राप्त झाला तरी तेथें देखील सुख नाहीं. देवांना मानसिक दुःख नेहमीं होत असतें. यद्यपि देवांना निर्धनता, म्हातारपण, रोग, क्षुधातृषा, मारण, ताडन यांच्या वेदना नाहींत तथापि आपल्याहून अधिक ऋद्धि व ऐश्वर्य-संपन्न दुसऱ्या देवांना पाहून आपणाला तसें ऐश्वर्य नाहीं अशा विचारानें तीव्र दुःख होतें. कित्येक देवांना आपल्या देवांगनेच्या वियोगामुळें दुःख प्राप्त होतें. स्वर्गांत देवांगनांचें आयुष्य

देवपर्यायांतलि दुःख.

देवापेक्षां कमी असल्यानें त्या देवापेक्षां आधीं मरण पावल्या तरी त्याजागीं दुसऱ्या उत्पन्न होतात व त्या पूर्व देवाला प्राप्त होतात. तरी पूर्व देवांगनांवरील प्रेमामुळें त्या देवाला पूर्व देवीच्या वियोगाचें दुःख होत असतें तें नाहींसें होत नाहीं. पुण्यहीन देवांना इतर इंद्रादिक महर्द्धिक देवांच्या सभेंत प्रवेश करतां येत नाहीं, यामुळें त्यांना मानसिक दुःख होतें. आयुष्य पूर्ण होतांच आपणांस येथून जावें लागणार असा विचार मनांत येऊन अत्यंत दुःख होतें. त्याचें प्रमाण भगवान् केवलीच जाणूं शकतील. इत-रांना तें समजूं शकणार नाहीं. संसारांत स्वर्गांतील महर्द्धिक मरून एकेंद्रिय जीव होऊन जन्मतो अथवा मलमूत्रानें भरलेल्या रक्तमांसाच्या गर्भांत येऊन जन्म घेतो. तसेंच कुत्रा वगैरे पशु स्वर्गांत देव होऊन जन्मतात, तर ब्राह्मण चांडाल होऊन जन्मतो अथवा तिर्यंच होऊनही जन्मतो. कर्माच्या स्वाधीन झाल्यानें जीव चारी गतींत परिभ्रमण करीत असतो. संसारांत राजाचा रंक व रंकाचा राव एका क्षणांत होतो. स्वामी असेल तो सेवक; व सेवकाचा स्वामी, पिता असेल तो पुत्र, व पुत्र असेल तो पिता; पितापुत्र हे कधीं आई तर कधीं बायको; कधीं बहिण तर कधीं दासदासी असे उत्तरोत्तर जन्मांत होतात. आपणच आपल्या मुलाच्या पोटीं तर कधीं देवयोनींत व कधीं तिर्यंच-योनींत जन्म घेतों. रोगी व कुरूप असलेला कधीं सुदृढ व सुरूप होतो. आत्म्याला प्राप्त झालेलें शरीर मोठें ओझें आहे. एखाद्याच्या डोकीवर पुष्कळसें ओझें दिलें तर तो तें क्षणभर एकीकडे ठेवून विश्रांति तरी घेतो. पण शरीराचें ओझें वाहणाऱ्या आत्म्याला कोठेंही विश्रांति घेतां येत नाहीं. जेव्हां औदारिक, वैक्रियक शरीराचा अंत होतो तेव्हां ओझें उतरल्याचा भास होतो. पण आत्म्यावर या शरीराहून अनंतपटीनें अधिक अशा तैजस व कार्मण शरीराचा भार असतोच. या तैजसकार्मण शरीरांनींच आत्म्याच्या अनंत ज्ञानदर्शनवीर्याला दाबून टाकलें आहे. म्हणून त्याला अनंतशक्ति व केवलज्ञान यांचा अभाव झाल्यासारखें वाटत आहे. अरण्यांत भटकणाऱ्या आंधळ्या पुरुषाप्रमाणें

मोहानें हा जीव चतुर्गतीमध्यें भ्रमण करतो. संसारांतील जीव रोग, दारिद्य, वियोग इत्यादि दुःखांनीं सदैव व्याकुळ असतात. धन संपादन करून तें दुःख नाहींसें करावें अशी त्यांना विपरीत बुद्धि होऊन त्याप्रमाणें ते उपाय योजीत असतात. सुख प्राप्त व्हावें म्हणून अभक्ष्य भक्षण करतात. कपट करतात. हिंसा करतात. धन प्राप्त व्हावें म्हणून चोरी करतात. रस्ते लुटतात. पण पुण्यहीनाच्या हातीं द्रव्य येत नाहीं. वास्तविक सुख पंचपापांचा त्याग केल्यानें होणारें असून अज्ञानी लोक त्याच पंचपापांनीं आपल्या धनाची, कुटुंबाची व सुखाची वृद्धि व्हावी अशी इच्छा करतात. इंद्रियांचे विषय प्राप्त झाले म्हणजे आपणास सुख प्राप्त झालें अशी त्यांची समजूत असते. पण तेंच मोहाचें कार्य आहे. संसारी जीवांना जें अनेक प्रकारचें दुःख प्राप्त झालेलें आपण पाहतों तें सर्व परजीवांचा घात करण्यापासून, असत्य भाषणापासून, चोरीपासून, व्यभिचारापासून व परिग्रहाची अपरिमित इच्छा ठेवल्यापासून, कपटापासून, अभिमानापासून, रागापासून, लोभापासून व अन्यायाचरणापासूनच प्राप्त होतें. याशिवाय इतर मार्ग दुःख होण्याचे नाहींत. हें आपण प्रत्यक्ष पाहत असूनही त्याच पापमय मार्गांचें अनुकरण करतों. या विपरीत मार्गामुळेंच संसार हा अनंतदुःखाला कारण होतो. दुःखापासून दुःखच उत्पन्न व्हावयाचें. अग्नीपासून अग्नीच उत्पन्न होणार. याप्रमाणें संसाराचें सत्यार्थ स्वरूप आहे. याचें वारंवार चिंतन करणाऱ्याला व अनुभव करणाऱ्याला संसारापासून उद्वेग ( चिळस ) उत्पन्न होऊन परिणाम विरक्त होतात व तेच संसारपरिभ्रमण दूर करण्याच्या उद्योगांत तत्पर राहतात. याप्रमाणें तिसऱ्या संसारभावनेचें वर्णन केलें.

यानंतर एकत्वभावनेचें स्वरूप सांगतात—

## ४ एकत्वभावना.

हा जीव कुटुंब, स्त्री, पुत्र वगैरेकरितां, शरीर पुष्ट करण्याकरितां व शरीराचें संरक्षण करण्याकरितां अनेक प्रकारचीं पापकार्यें करतो. अभक्ष्य भक्षण करून अपरिमित परिग्रह धारण करतो. त्यामुळें त्याला नरकादिक-पर्यायांत भयंकर दुःख भोगावें लागतें. ज्या कुटुंबाकरितां अथवा ज्या शरीराकरितां यानें पाप उपार्जन केलें, तें कुटुंब व तें शरीर जळून गेलें. त्याची राख आकाशांत उडून गेली. आतां त्यांचेकरितां केलेल्या कार्याचें दुःख भोगण्याची याला वेळ आली तेव्हां त्यांना कोठें शोधावें? आपापल्या उपार्जित कर्माप्रमाणें प्राप्त झालेल्या रोगवियोगादि दुःखाचा अनुभव घेणाऱ्या जीवाला सर्व कुटुंबी जन पाहत असूनही दुःखाचा भार कमी करणें त्यांच्यानें होत नाहीं. मग नरकादिक कुगतींत प्राप्त झालेल्या दुःखांत भाग घेण्यास तेथें कोण येणार ? तेथील दुःख जीवानें स्वतः एकटेंच भोगलें पाहिजे. आयुष्य संपल्याबरोबर मरण ठेवलेलें. त्यावेळीं रक्षण करण्यास कोणीही समर्थ नाहीं. अशुभकर्माचें फल भोगीत असतांना आपणास कोणी सहाय होत नाहीं. इहलोक सोडून परलोकीं गमन करण्याच्या वेळीं आत्म्याला स्त्री, पुत्र, मित्र, धन परिग्रहादिकांपैकीं कोणीही बरोबर येत नाहींत. एकटें कर्मच त्या जीवाला परलोकीं घेऊन जातें. इहलोकीं जे तुमचे पुत्र, मित्र, बांधवादिक

आहेत तेच दुसऱ्या जन्मीं तुमचे इष्टमित्रभाऊबंद होणार नाहींत. जें द्रव्य, शरीर, परिग्रह, राज्य, नगर, महाल, शय्या, अलंकार, वस्त्रप्रावरण, नोकरचाकर वगैरे इहलोकीं आहेत तेही परलोकीं तुमच्या बरोबर येणार नाहींत. ते सर्व या शरीराच्या संबंधामुळें येथें तुमचेजवळ आहेत. त्या शरीराचा नाश झाला कीं त्यांनीं तुमचा संबंध तोडलाच म्हणून समजा. आपण कर्माच्या अधीन असल्यानें कर्म देईल तें सुखदुःखं आपणा एकट्यालाच भोगलें पाहिजे. जीव हा एकटाच गमन करील म्हणून इष्टमित्रांवर ममता करून परलोकाचा बिघाड करणें अनर्थकारक आहे. इहलोकीं सम्यक्त्व, व्रत, संयम, दान व शुभ भावना यांहींकरून उपार्जन केलेला धर्म हाच जीवाला कोणत्याही स्थितींत साहायी होणारा आहे. धर्माच्या प्रभावानें या जीवाला स्वर्गांत इंद्रश्रेष्ठत्व, महर्द्धिकत्व, चक्रवर्तित्व, उत्तमरूप, अतुलबल, विद्या, संहनन, उत्तम जाति, उत्तम कुल, जगांत मान व तीर्थंकरत्व प्राप्त होऊन शेवटीं निर्वाण प्राप्त होतो. तुरुंगामध्यें मजबुत दोऱ्यांनीं अथवा लोखंडाच्या साखळींनीं बांधून घातलेल्या पुरुषाला जसें त्या तुरुंगावर प्रेम नसतें, तद्वत् सम्यग्ज्ञानी पुरुषाचें देहरूपी तुरुंगावर प्रेम नसतें. या शरीरामुळें धनकुटुंबाविषयीं अभिमान उत्पन्न होऊन घोर बंधनामध्यें पराधीन होऊन दुःख भोगावें लागतें व आपलें यथार्थ स्वरूप टाकून परद्रव्यपरिग्रहांना आपले जाणून अनंतकाल संसारांत भ्रमण करावें लागतें व एकटेंच इतर गतींत जाऊन जन्मावें लागतें. त्यावळीं कर्माशिवाय दुसरें कोणीही बरोबर येत नाहीं. फक्त पापपुण्यकर्म हेंच राजा, रंक, नीच, उंच वगैरे गर्भांत नेऊन उत्पन्न करवितें. तेथून आयुष्य पूर्ण झाल्यानंतर एकटेंच सर्व कुटुंबाला सोडून परलोकीं जावें लागतें. मग पुनः त्या ठिकाणीं येतां येत नाहीं. गर्भांत राहण्याचें दुःख, योनींतून बाहेर पडण्याचें दुःख, रोगी शरीर प्राप्त होण्याचें दुःख, दारिद्र्याचें दुःख, वियोगाचें दुःख, क्षुधातृषेच दुःख इष्टानिष्ट संयोगवियोगाचें दुःख, वगैरे सर्व या जीवाला एकट्यालाच भोगावें लागतें. याचप्रमाणें स्वर्गांत असंख्यात कालपर्यंत सुख म्हणजे अप्सरांचा संयोग, असंख्यात देवांचें प्रभुत्व, हजारों ऋद्धींचें सामर्थ्य हें पुण्याच्या उदयानें प्राप्त होतें. त्याचें सुखही एकटा जीवच भोगतो. पापाच्या उदयानें नरकांत गेला तर तेथें मारण, ताडन, छेदन, भेदन, शूलारोहण, कुंभीपाचन, वैतरणीनिमज्जन, वगैरे दुःख, याचप्रमाणें क्षेत्रजनित, शरीरजनित, मानसिक व परस्पर-कृत घोर दुःखें एकट्यालाच भोगावीं लागतात. तिर्यंच योनींत पराधीनपणाचें, अधिक ओझें वाहण्याचें, मर्मस्थानीं घाव सहन करण्याचें, क्षुधातृषेची वेदना सहन करण्याचें, रोगाची पीडा भोगण्याचें, ऊन, थंडी, पाऊस या पासून होणाऱ्या त्रासाचें, नाकांत वेसण घालून होणाऱ्या वेदनेचें, वगैरे सर्व दुःख एकट्यालाच भोगावें लागतें. त्यावेळीं भाऊबंद, बायकापोरें कोणीही भाग घेण्यास येत नाहींत. जीवाबरोबर जर कोणी येणारा असेल तर तो धर्मच होय. म्हणून त्याचें सेवन करावें. याप्रमाणें एकत्वभावनेचें चिंतन करीत राहिल्यानें आपलें इष्टमित्रांवर फाजील प्रेम होत नाहीं व इतर नोकरचाकरांवर द्वेष करण्याची बुद्धि होत नाहीं. अशा रितीनें आपल्या आत्म्याची शुद्धि करण्याचा यत्न करीत रहावें.

यापुढें अन्यत्व-भावनेचें चिंतन करण्यासाठीं त्याच स्वरूप सांगतों.

## ५ अन्यत्वभावना.

या भावनेच्या स्वरूपाचा विचार करतांना मनुष्यानें पुढील विचार मनांत आणावा. संसारांत स्त्री, पुत्र, मित्र, धन, राज्य, ऐश्वर्य व भोगादिकांशीं तुझा संबंध जडलेला आहे. तो वास्तविक तुझ्या स्वरूपाहून भिन्न आहे. तूं कोणाच्या दुःखांत इतका गढून गेला आहेस? अनंतानंत जीवांचा व पुद्गलांचा आजपर्यंत तुझ्याशीं संबंध होऊन गेला आहे, तो विसरून अज्ञानी तूं या ठिकाणीं स्त्रीपुत्रादिकांच्या संयोग-वियोगाचा व त्यांच्या सुखदुःखाचाच रात्रंदिवस विचार करीत आहे. जवळ येऊन ठेपलेल्या स्वतांच्या मरणाचा अथवा स्वतःला नरकतिर्यंचादि–गतींत ज्यामुळें उत्पन्न व्हावें लागेल त्याचा हा मुळींच विचार करीत नाहींस. प्रत्येक समयाला तुझें आयुष्य कमी होत आहे. या जन्मांत जर तूं आपलें हित पाहिलें नाहींस, पाप–पराङ्मुख झाला नाहींस व कुगतीला पोहों-चविणाऱ्या रागद्वेषमोहकामक्रोधाधिक विकारापासून आत्म्याला सोडविलें नाहींस, तर पुढें नरक-तिर्यंच गतींमध्यें पराधीन होऊन रहावें लागेल. त्या अज्ञान–स्थितींत तुला काय करतां येईल? पंचपरिवर्तन स्वरूपी ह्या संसारामध्यें अनंतानंत काल परिभ्रमण करणाऱ्या जीवाचे कल्याण कर-णारें असें कोणीही नाहीं. नोकरचाकर, भाऊबंद, स्त्रीपुत्र वगैरेंना तूं आपले मानलें तें केवळ खोट्या मोहामुळें. असें मानणें यालाच मिथ्यात्व म्हटलें आहे. या सर्वांचा संबंध कर्मामुळें प्राप्त झालेला आहे व तो थोडावेळ टिकणारा आहे. यांचा अचानक वियोग होणारा आहे. या सर्वांचा संबंध जडल्यापासून विषयकषायांची वृद्धि व स्वस्वरूपाचा विसर मात्र पडलेला आहे हें खरें.

सर्व पदार्थ अनित्य आहेत.

संसारांतील सर्व जीवांशीं आपलें शत्रुमित्रत्वाचें नातें अनेकवेळां होऊन गेलें आहे व पुढेंही परद्रव्याशीं संबंध राहील तोंपर्यंत होणारें आहे. यामुळेंच आपणाला एकेंद्रियादि अवस्था प्राप्त होऊन अनंतकाल संसारांत परिभ्रमण करावें लागत आहे. अनेक देशाहून आलेले वेगवेगळे प्रवासी रात्रीं विश्रांतिकरितां म्हणून धर्मशाळेंत एकत्र जमतात, अथवा एका झाडावर अनेक ठिकाणाहून विश्रांति करितां अनेक पक्षी येऊन राहतात व पहाट होतांच सर्व आपापल्या मार्गानें निघून जातात. तद्वत् स्त्री, पुत्र, मित्र, बांधवादि अनेक गतींतून पापपुण्य घेऊन या कुलरूपी धर्मशाळेंत येऊन राहिले आहेत. आयुष्य पूर्ण होतांच सर्व आपापल्या पुण्यपापानुसार नरकतिर्यंचमनुष्यादि अनेक गतींमध्यें जाऊन जन्मतील. म्हणून कोणी कोणाचा मित्र नव्हे. पुण्यपापाच्या अनुकूलते-प्रमाणें हे लोक दोन दिवस आपल्यावर उपकार किंवा अपकार करून निघून जातील.

वृक्षावरील पक्ष्या-प्रमाणें हा संबंध आहे.

संसारांत सर्वांचे स्वभाव वेगवेगळे असलेले आढळून येतात. कोणाचा स्वभाव कोणाशीं मिळत नाहीं. जो तो आपापला मतलब साधण्याच्या नादांत येतो व त्याकरितांच लोक परस्पर एक-

मेकांवर प्रीति करतात. प्रयोजनाशिवाय फुकटची प्रीति कोठें आढकून येत नाहीं. वाळूच्या

वाळूच्या गोळ्या-प्रमाणें प्रीति संबंध आहे.

कणाचा जसा परस्परांचा संबंध नसतो, पण त्यांत पाणी टाकलें असतां त्यांचा गोळा होऊन मुठींत धरतां येतो; जर त्याला थोडे अधिक दाबलें तर फुटून त्याचे कण विखरून जातात, तद्वत् इहलोकीं मित्र, पुत्र, स्त्री, बांधव, सेवक स्वामी वगैरेंचा संबंध आहे. कोणी आपले विषयकषाय पुष्ट व्हावें म्हणून तर कोणी लोभानें आपणांवर प्रीति करतात. जेव्हां आपणापासून कांहींही प्राप्त होण्याची त्यांना आशा रहात नाहीं तेव्हां त्यापैकीं कोणीही प्रीति करण्यास पुढें येत नाहीं. कांहीं प्रयोजन नसतांनाही कित्येक ठिकाणीं प्रीति केल्याची उदाहरणें दिसून येतात. पण तींही लोकलज्जेमुळें अथवा अभिमानामुळें अथवा पुढें कांहीं प्रयोजन सिद्ध व्हावयाचें असेल ह्या हेतूनें घडलेलीं असतात.

दुसरी एक भीति त्याच्या मनांत अशी उत्पन्न होते कीं, यानें मजवर पूर्वी फार उपकार केले आहेत ते जर मी आतां विसरलों तर जगांत माझी छीः थूः होईल, लोक मला कृतघ्न म्हणतील,

लोकलज्जेमुळें प्रीति केली जाते

यामुळेंच मनांत नसतांना पण प्रीति कधीं कधीं निष्कारण वहून येते. विषयकषायांच्या संबंधाशिवाय प्रीति होणें शक्यच नाहीं. यांचीं उदाहरणें व्यवहारांत दररोज आपणांस पाहावयास मिळतात. जेथें आपला अभिमान शेवटास जाण्याचा प्रसंग असेल, जेथें द्रव्य-प्राप्ति होण्याचा संभव असेल, जेथें विषयोपभोग घेण्यास सांपडत असेल, जेथें आपला मोठा आदरसत्कार होत असेल, जेथें आपली कीर्ति होण्याचा संभव असेल, अथवा एखाद्याला नाराज केल्यापासून कांहीं संकट उद्भवणार असेल अशाच ठिकाणीं आपण प्रीति करतों. विषयकषायांचा दाब असल्याशिवाय प्रीतीचा संभव होतच नाहीं.

सर्व पदार्थ परस्पराहून भिन्न आहेत. आईदेखील आपल्या मुलाचें पोषण करते, ती वृद्धपणीं अथवा संकटकालीं हा आपला आधार होईल, आपणांस दुःख येऊं देणार नाहीं असा हेतु

शत्रूचा मित्र व मित्राचा शत्रु बनतो.

धरूनच. मुलगा आईला सांभाळतो यांत तरी असाच हेतु आहे, " जर मी माझ्या आईची सेवा, चाकरी करून तिचा सांभाळ केला नाहीं तर सर्व जग मला कृतघ्न म्हणूं लागेल व माझी चार शिष्ट लोकांत मान्यता रहाणार नाहीं " हा अभिमान मुलाच्या मनांत उत्पन्न होतो म्हणून तो आपल्या मातेचें पोषण करतो. एरव्हीं निवळ निष्काम बुद्धीनें कोणी कोणावर प्रीति करीत नाहीं. सदैव उपकार, दान, सन्मान करीत राहिल्यानें वैरी देखील आपला मित्र बनतो व लाडक्या मुलाला चुकीच्या मार्गानें न जाण्याचा अथवा दुर्व्यसनापासून पराङ्मुख करण्याचा प्रयत्न केला तर तो कट्टा शत्रु बनतो. यावरून कोणी कोणाचा मित्र व शत्रु नाहीं. उपकार-अपकाराच्या अपेक्षेनें हा शत्रु-मित्रपणा आहे. मनुष्यमात्राच्या विषयकषायाला पुष्ट करणारा तो त्याचा मित्र व त्यापासून परावृत्त करणारा

शत्रु अशी जगाची राहणी आहे. म्हणून इतराविषयीं रागद्वेष उत्पन्न न होईल असा यत्न करीत रहा.

अतिशय प्रिय असणारे स्त्री, पुत्र, मित्र, बांधव हे सर्व स्वर्गमोक्षाला कारण व्रत, संयम, वीतरागता वगैरे ज्या धर्मक्रिया त्यांत विघ्न आणणारे आहेत. त्यांच्या निमित्तानें हिंसा, असत्य, चोरी, कुशील व अपरिमित परिग्रह हीं पंच पापें करावीं लागतात. त्यामुळें नरकादिक कुगतीचा बंध पडतो. म्हणून हे बांधव नसून कट्टे शत्रु आहेत असें समजा. जे जीवाला मिथ्यात्व व विषयकषायापासून परावृत्त करून व्रतसंयमाकडे प्रवृत्ति करवितील तेच मित्र. असे मित्र फक्त निर्ग्रंथ गुरु हेच होत. आत्मा हा स्वभावतःच शरीराहून उलट म्हणजे चैतन्यमय आहे. शरीर हें अचेतन व जड आहे. त्याअर्थीं शरीरांशीं संबंध ठेवणारे स्त्री, पुत्र, मित्र, कुटुंब, धन, धान्य, स्थान वगैरे सर्व वेगळेंच असणार. शरीर हें अनेक पुद्गलपरमाणूंचा समूह एकत्र जमून बनलेलें आहे. ते परमाणु वेगवेळे होतांच शरीर नाहींसें होईल व आत्मा चैतन्यस्वभावी अखंड अविनाशी असा राहील. म्हणून या सर्व परसंबंधांत आपले कोणीही नाहीं असा निश्चय करावा.

खरा मित्र कोण ?

कर्माच्या उदयानें होणारे रागद्वेषमोहादिक विकार हेही आत्म्याहून भिन्न व विनाशिक आहेत. मग शरीराशीं संबंध असणारे नाशवंत असतील यांत नवल काय ? सारांश-आपल्या ज्ञानदर्शनमयी निजस्वभावाशिवाय इतर जे ज्ञानावरणादिक द्रव्यकर्म, रागद्वेषादिक भावकर्म व शरीरपरिग्रहादिक नोकर्म हे सर्व भिन्न आहेत. हे पुत्र वगैरे अन्य गतींतून पापपुण्य, स्वभाव, कषाय, आयु व शरीर वगैरे धारण करून आलेले आहेत. आत्मस्वभाव पापपुण्याहून वेगळा आहे. म्हणून सदैव अन्यत्व-भावनेचें चिंतन करा. यापासून परवस्तूवरील ममत्व नाहींसें होऊन घोर बंध होण्याचें बंद होईल.

रागद्वेषही आपले नव्हत.

या नंतर अशुचि-भावनेच्या स्वरूपाचा विचार करूं.

### ६ अशुचिभावना.

अशुचिभावनेंत पुढील चिंतन करावें. प्रथमतः शरीराच्या स्वरूपाचा विचार करावा. शरीर हें अतिशय मलिन असून मातेचें रुधिर व पित्याच्या वीर्यापासून उत्पन्न झालेलें आहे. रक्तमांसानें भरलेल्या जरायुपटलामध्यें गर्भांत नऊ महिने पूर्ण करून हें उत्पन्न होतें. त्यावेळीं त्याला भयंकर दुःख सहन करावें लागतें. रक्त, मांस, हाडें, चर्म, वीर्य, मज्जा, स्नायु या सप्तधातूंनीं हें बनलेलें आहे. मलमूत्र, किडे, अळ्या वगैरेनीं हें सदैव भरलेलें असल्यानें अत्यंत अपवित्र आहे. याला नऊ द्वारें आहेत. यांतून निरंतर दुर्गंधी मल वाहत असतो. विष्ठेनें भरलेलें गाडगें फुटलें असतां त्यांतून चोहोंकडे मल वाहतो त्याला वरून पाण्यानें धुतलें तरी तें स्वच्छ होत नाहीं, तद्वत् जगांतील सर्व सुगंधी पदार्थ कापूर, चंदन,

शरीराचें स्वरूप.

फुलें, तीर्थोदक वगैरेनीं जरी शरीराला माखलें तरी तें शुद्ध न होतां उलट तेच पदार्थ दुर्गंधित होतात. जगांत सर्व वस्तु शरीराच्या एकेका अवयवाच्या स्पर्शामुळें घाण झाल्या आहेत. मल, मूत्र, हाड, चर्म, रक्त, मांस, वीर्य, स्नायु, केश, नख, कफ, लाळ, शेंबूड, दांत, डोळे, कान या सर्वांच्या मलाचा स्पर्श होतांच त्या वस्तु अपवित्र होतात. द्वींद्रियादिक प्राण्यांच्या शरीरासारखी दुसरी अपवित्र वस्तूच जगांत नाहीं. शरीराचा संबंधच जर नसता तर जगांत अपवित्रता उत्पन्न झाली नसती. शरीराला पवित्र करणारी वस्तु त्रैलोक्यांत नाहीं. पाण्यानें कोट्यवधि वेळां जरी धुतलें तरी त्यापासून काय होणार ? शेवटीं पाणीच अपवित्र होऊन जातें. कोळसा जसा उगळावा तसा काळेपणाच बाहेर यावयाचा, असा शरीराचा स्वभाव आहे. म्हणून शरीराला पवित्र मानणें हें मिथ्यादर्शन आहे.

शरीर ज्यावेळीं रत्नत्रय व उत्तम क्षमादिक धर्म धारण करितें त्याचवेळीं फक्त तें देवादिकांकडून वंद्य होतें. त्याशिवाय इतर कोणत्याही स्थितींत तें पवित्र व पूज्य मानलेलें नाहीं. धनधान्यादि परिग्रह, पंचेंद्रियांचे विषय, मिथ्यात्व आणि क्रोध, मान, माया, लोभादिक हे अमूर्त आत्म्याच्या स्वभावाला अपवित्र करून सोडतात, अधम दशेला पोंचवितात, जगांत निंद्य ठरवितात व दुर्गतीला पोंचवितात. याकरितां क्रोधादि कषायांचा त्याग करून आत्म्याला पवित्र करा. देह पवित्र करण्याच्या नादीं लागूं नका. तो कधींही पवित्र होणार नाहीं. याप्रमाणें शरीराचा स्वभाव जाणून जे यावरील ममत्व टाकून, आत्म्याशीं अनादिकालापासून संबंध ठेवणाऱ्या रागद्वेषादिक कर्ममलाला दूर करण्याचा प्रयत्न करतात त्यांना अशुचित्व भावनेचें चिंतन करणें फारच उपयोगी आहे.

रत्नत्रयानेंच शरीर पवित्र होतें.

धनसंपदादि परिग्रह पंचेंद्रियांचे भोग व शरीरावर प्रीति या गोष्टी आत्म्याला मलिन करणाऱ्या आहेत. म्हणून होईल तितक्या प्रयत्नानें यांचा अभाव होईल असा प्रयत्न करणें इष्ट आहे. द्रव्यापासून आत्म्यामध्यें काम, क्रोध, लोभ, मद, कपट, प्रीति, वैर, कलह, मोठा आरंभ, ईर्षा, मूर्छा, अतृप्ति वगैरे दोष उत्पन्न होतात. याशिवाय इहलोकसंबंधीं व परलोकसंबंधीं सर्व प्रकारचे दोष, अतिचिंता, दुर्ध्यान, महाभय वगैरे उत्पन्न होण्याचें कारणही द्रव्यच आहे. पंचेंद्रियांचे विषय आत्म्याला स्वत्व विसरावयाला लावून अतिनिंद्य कर्म करण्याला प्रवृत्त करतात. जगांत जें काम अतिशय निंद्य म्हणून कोणी करीत असेल तर तें इंद्रियांच्या विषयपूर्तिकरितां केलें जातें. शरीरावरील प्रेम म्हणजे मांस, हाड, पू, रक्त यांनीं भरलेल्या व सडलेल्या दुर्गंधयुक्त शरीरावरील प्रीति. हिच्यापासून अतिशय मलिन परिणाम उत्पन्न होतात. सारांश, फक्त दशलाक्षणिक धर्माशिवाय इतर कशानेंही शरीराची शुद्धि होणें शक्य नाहीं.

परिग्रहामुळेंच अपवित्रता येते.

या शुद्धीचेही दोन प्रकार आहेत. एक लौकिक शुद्धि व दुसरी लोकोत्तर शुद्धि. कर्ममलाचा

नाश करून आत्म्याच्या शुद्ध स्वरूपांत स्थिर होणें हिला लोकोत्तरशुद्धि म्हणतात. ही रत्नत्रया-पासून उत्पन्न होते. अथवा रत्नत्रय धारण करून सर्वोत्कृष्ट अशा शांत-भावाला धारण करणाऱ्या साधूंच्या संगतीपासून प्राप्त होते. लौकिक शुद्धीचे आठ भेद आहेत. त्यांपैकीं—

शुद्धीचे प्रकार

१ **कालशौचः**— म्हणजे कांहीं ठराविक मुदत उलटल्यानंतर जगांत तो पदार्थ शुद्ध झाला असें मानणें.

२ **अग्निशौचः**— विस्तवाच्या संस्कारानें शुद्ध मानणें.

३ **पवनशौचः**— वाऱ्याच्या स्पर्शानें शुद्ध मानणें.

४ **भस्मशौचः**— राखेच्या संमार्जनानें पदार्थ शुद्ध मानणें.

५ **मृत्तिकाशौचः**— मातीच्या स्पर्शानें शुद्ध मानणें.

६ **जलशौचः**— पाण्याच्या स्पर्शानें शुद्ध मानणें.

७ **गोमयशौचः**— शेणानें जमीन सारवली असतां शुद्ध झाली असें मानणें व

८ **ज्ञानशौचः**— ज्ञानांतील ग्लानि नाहींशी होणें.

याप्रमाणें व्यवहारांत लोक आपल्या मनांत शुद्धतेचा संकल्प करीत असतात. वास्तविक शरीराला शुद्ध करण्यास कोणीच समर्थ नाहीं. शरीराच्या संसर्गानें पाणी, राख वगैरे पदार्थच उलट अशुद्ध होतात. शरीर आदि, अंतीं व मध्यें कोठेंही शुद्ध नाहीं. शरीराच्या आंत मलमूत्रादि दुर्गंधी पदार्थ हाडें, मांस, रक्त, पू भरलेले असून बाहेरून हें अपवित्र अशा कातड्यांनीं वेष्टिलेलें आहे. याचें उपादान कारण रक्त व वीर्य असल्यामुळें हें शुद्ध म्हणतां येत नाहीं. याला जगांतील सर्व तीर्थांचें पाणी आणून स्नान घातलें अथवा धुतलें तरी हें शुद्ध न होतां उलट त्या पाण्याला अपवित्र करील. हें सदैव रोगांनीं भरलेलें आहे. सदैव विनाशिक असून दुःख देणारें आहे. याला शुद्ध करण्याचा उपाय धूप, चंदन, गंध, विलेपन, पुष्प, जल, कापूर वगैरेंपैकीं कोणताही नाहीं. या शरीराच्या स्पर्शानेंच कोणताही पदार्थ अग्नीच्या स्पर्शानें जसा राख होतो तसा अपवित्र होऊन जातो. याप्रमाणें शरीर अपवित्र आहे असें चिंतन करीत गेल्यानें त्याला नटविणें, सजविणें व आपल्या सौंदर्याविषयीं अभिमान उत्पन्न होणें वगैरे विकार उत्पन्न होत नाहींत. त्यामुळें मनुष्याची प्रवृत्ति वीतरागभाव वाढविण्याकडे होतें म्हणून या भावनेचें चिंतन करणें योग्य आहे.

### ७ आस्रवभावना

आस्रव म्हणजे कर्म येण्याचीं कारणें. जसें समुद्रांत नावेला भोंक पडलें असतां त्यांतून आंत पाणी येतें तसें मिथ्यात्व-भावांनीं व पांच इंद्रियें व सहावें मन यांची विषयाकडे प्रवृत्ति झाल्यानें षट्काय जीवाच्या हिंसेचा त्याग न होण्यानें, अनंतानुबंधी क्रोधमानमाया-लोभादिक पंचवीस कषायाच्या उदयानें; मनवचनकायेच्या भेदांनीं होणाऱ्या पंधरा योगांनीं, एकूण सत्तावन द्वारांनीं आत्म्यांत कर्म येत असतें. यांतून

आस्रवाचें स्वरूप.

मिथ्यात्व, कषाय, अव्रतादिकांनुसार मनवचनकायेच्या प्रवृत्तिप्रमाणें शुभाशुभ कर्माचें आगमन होतें. पुण्यपापानुकूलतेप्रमाणें प्राप्त होणाऱ्या विषयामध्येंच संतोष मानून राहणें; विषयापासून विरक्त असणें; परोपकार करण्याचे विचार नेहमीं अंतःकरणांत ठेवणें; दुःखितावर दया करणें; तत्त्वांचें चिंतन करणें; सर्व जीवांविषयीं मित्रभाव मनांत बाळगणें; पंचपरमेष्ठीची भक्ति करणें; धर्मवान् पुरुषाविषयीं मनांत प्रेम बाळगणें; व्रत, संयम, तप, शील याविषयीं मनांत आदरबुद्धि ठेवणें या सर्व प्रवृत्तीपासून पुण्याचें आस्रव होतात. याउलट परिग्रहांविषयीं अभिलाषा, इंद्रियांच्या विषयांविषयीं अत्यंत आसक्ति, परद्रव्य हरण करण्याचे विचार; अन्याय प्रवृत्ति, भक्ष्याभक्ष्याचा अविचार; सप्तव्यसन-तत्परता; परापवाद, असंतोष, परस्त्री, पुत्र, धन, आजीविकाच्या अपहरणाचा आनंद; परतिरस्कारेच्छा, स्वसत्कारेच्छा वगैरे मनांतील विचारांनीं अशुभ कर्माचे आस्रव होतात. सत्य, हित, मधुर व शास्त्रानुकूल भाषण करण्यानें, परमेष्ठीचें स्तवन केल्यानें, सिद्धांताच पठण व व्याख्यान करण्यानें व न्यायाला अनुसरून बोलण्यानें पुण्याचे आस्रव होतात. याच्या उलट परनिंदा, आत्मप्रशंसा, अन्यायाचरण ज्या भाषणानें होईल व जें भाषण विषयावरील प्रीति वाढविणारें, कषायरूप अग्नीला प्रज्वलित करणारें, कलह, विसंवाद, शोक व भय उत्पन्न करणारें, धर्मविरुद्ध, मिथ्यात्व व असंयमाला पुष्ट करणारें, इतर जीवांना दुःख व अपमान उत्पन्न करून उपजीविकेचा वा धनाचा नाश करणारें असेल त्यापासून पापाचे आस्रव होतात. पंचपरमेष्ठीचें पूजन, प्रणाम, जिनायतनाचें सेवन, धर्मवान् पुरुषाचें वैयावृत्य, परजीवांवर दया ठेऊन सावधानतेनें बसणें, उठणें, निजणें, ठेवणें, उचलणें, खाणें, पिणें, हालणें चालणें वगैरे क्रिया करण्यापासून शुभास्रव होतात. याउलट सावधानी न ठेवतां व करुणा मनांत न बाळगतां शरीराची स्वच्छंद प्रवृत्ति करीत राहणें, मोठमोठ्या आरंभादिक क्रिया करणें, शरीराला नटविण्यांत सदैव तत्पर असणें या सर्व देहाच्या क्रियांनीं अशुभ आस्रव होतात. मनवचनकायेची शुभाशुभ प्रवृत्ति तीव्रमंद कषायापासून तीव्रमंद वगैरे अनेक प्रकारच्या कर्मबंधाला कारण अशी होत असते. हें समजल्यानें आत्म्याला अशुभप्रवृत्तिपासून दूर ठेऊन शुभप्रवृत्तीकडे लावतां येते.

पापपुण्यास्रवांचीं कारणें.

आत्म्याच्या सर्व गुणांचा घात करणारे ते कषाय होत. यांतून क्रोध हा परजीवांचा घात करण्यांत व त्यांना बांधून घालण्यांत आपल्या मनाला प्रवृत्त करितो. मान हा आत्म्यांत अशाप्रकारचा उद्धतपणा उत्पन्न करितो कीं, आई, बाप, गुरु, उपाध्याय वगैरे सर्व त्याचा तिरस्कार करूं लागतात. हा विनयाचा विध्वंस करून टाकतो. मायाकषायापासून अनेक प्रकारचें कपट योजून धूर्ततेनें लोकांना फसवितां येतें. यायोगानें मनांतील सरळपणा नाहींसा होतो. लोभकषायापासून सुखाचें कारण जो संतोष तो नाहींसा होतो. काम हा मर्यादेचा व लज्जेचा व हिताहित-प्रवृत्ति, व उच्चनीच-कर्माचा विचार इत्यादिकांचा पण लोप करवितो. मोह हा दारूप्रमाणें स्वस्वरूपाचा विसर पाडतो. शोक हा अतिशय दुःखाच्या प्रसंगीं मुखावाटें हाःहाःकार शब्द वदवितो व रुदन वगैरे

कषायापासून आत्म्याचा घात.

क्रियांनी आत्मघात करवितो. हास्य हें दुसऱ्याचें अज्ञान प्रगट करतें. स्नेह हा दारू न पितांच आत्म्यांत अचेतना उत्पन्न करितो व त्याला हितप्रवृत्तीपासून दूर ठेवतो. निद्रा ही आत्म्याच्या संपूर्ण चैतन्य-गुणाचा घात करून त्याला अचेतनपणा आणितें. तृषेपासून जें पिण्यायोग्य नाहीं तें पण पिण्याची इच्छा उत्पन्न होते. क्षुधेपासून चांडालाच्या घरीं भीक मागण्याचा प्रसंग येतो, त्यावेळीं आपलें कुल, जात, मर्यादा वगैरे सर्व नष्ट होतें. नेत्र हे सुंदर व सुस्वरूप लावण्य पाहण्यासाठीं उडी घेत असतात. जीभ ही मिष्टान्न भोजनासाठीं लज्जा, विनय, श्रेष्ठत्व व संयम यांचा नाश करून नीच प्रवृत्ति करविते. नाक सुगंधित पदार्थाकडे निश्चेष्ट होऊन ओढ घेत असतें. स्पर्शनेंद्रिय स्त्रीच्या कोमल अंगाच्या स्पर्शाकरितां अति उत्सुक झालेलें असतें. कान हे अनेक प्रकारच्या रागरागिणींतील सुस्वर मनोहर गाणीं ऐकण्यांत तल्लीन होतात, त्यावेळीं त्याला स्वतःचा देखील विसर पडतो. मन हें चंचल माकडाप्रमाणें स्वच्छंद कल्पना करून शुभध्यान व शुभप्रवृत्तीमध्यें स्थिर रहात नाहीं. अतिलोभामुळें मुखावाटें असत्यवाणी निघून ती आपली चतुरता प्रगट करीत असतें. हात हे हिंसा करण्याचें मुख्य साधन आहेत. पाय हे पाप करण्याच्या मार्गावर जाण्याकडे तयार असतात. कवित्व हें प्रेमाच्या कविता रचण्यांत कुशलता दाखवितें. पांडित्य हें अनेक तऱ्हेचे कुतर्क लढवून खोट्या थापा मारून लोकांना भुलविण्यांत आपली पराक्रमपारंगतता दाखवितें. अतिपराक्रमी योद्धापुरुष आपला पराक्रम अनाथ पशूंची हिंसा करून दाखवितो. बाल्यावस्थेंत यथार्थ ज्ञान नसतें म्हणून ती अज्ञानदशा म्हणविली जाते. तरुणपणा हा इच्छितविषयांचा उपभोग घेण्याकडे धांव घेत असतो. वृद्धपणा हा भयंकर कालाच्या मुखांत जाण्याच्या संनिध येऊन ठेंपलेला असतो. श्वासोच्छ्वास निरंतर शरीरांतून निघून जाण्याचा प्रयत्न करीत असतात. जरा ही काम, भोग, तेज, रूप, सौंदर्य, उद्यम, बल, बुद्धि वगैरे हरण करणारी चोरांची दासी आहे. रोग हे यमराजाचे मंत्री आहेत. इतकी सामग्री आत्म्याला स्वस्वरूपाचा विसर पाडण्यास सज्ज होऊन बसलेली आहे. या सामग्रीपासून कर्मांचे आस्रव होत असतात. याप्रमाणें इंद्रियांचा व विषयकषायांचा संयोग झाला व तदनुरूप आपण मनवचनकायेची प्रवृत्ति केली कीं कर्मबंध होतो. हें आस्रवाचें स्वरूप आहे.

## ८ संवरभावना

समुद्रांतील जहाजाला पडलेलें भोंक बंद केलें म्हणजे त्यांत पाणी येण्याचें थांबतें तद्वत् कर्म येण्याचीं द्वारें बंद केलीं म्हणजे कर्म येण्याचें थांबतें याला संवर म्हणतात. सम्यग्दर्शन झालें असतां मिथ्यात्व आस्रवाचें द्वार रोकलें जातें. इंद्रियें व मन ताब्यांत ठेवल्यानें तद्द्वारें येणारीं कर्में बंद होऊन संवर होतो. षट्कायजीवांचा घात करण्याचा त्याग केल्यानें परजीवांचा घात होत नाहीं व त्यामुळें हिंसा करण्यापासून ज्या कर्मांचा बंध होत होता तो न झाल्यानें संवर होतो. व्रतयुक्त आचरण न ठेवल्यामुळें ज्या कर्मांचे आस्रव होत होते ते व्रती झाल्यानें होत नाहींत. कषायांना जिंकून दशलाक्षणिक धर्म धारण करण्यानें, सच्चरित्र ठेविल्यानें व कामक्रोधादिकांचा अभाव केल्यानें संवर होतो. ध्यान, स्वाध्याय,

संवराचीं कारणें.

तप यायोगें कर्माचें आगमन होत नाहीं म्हणून यापासून संवर होतो. तीन गुप्ति, पांच समिति दशलक्षण धर्म, द्वादशानुप्रेक्षा, बावीस परीषह सहन करणें व पंच प्रकारचें चारित्र पाळणें यापासून नवीन कर्माचा बंध होत नाहीं. मनवचनकायेच्या प्रवृत्तीला आपल्या ताब्यांत ठेवणें याला गुप्ति म्हणतात. परपीडा न व्हावी म्हणून सावधानतेनें, प्रमाद न आणतां पांच प्रकारची क्रिया करीत रहाणें याला समिति म्हणतात. दया ज्यांत मुख्य असेल तो धर्म म्हणावा. स्वतत्त्वाचें वरचेवर चिंतन करणें ही अनुप्रेक्षा. कर्माच्या उदयानें प्राप्त झालेली क्षुधातृषा इत्यादिकांची वेदना न भीतां सोसणें याला परीषहजय म्हणतात. रागद्वेषादि-दोषरहित आपल्या ज्ञानस्वभावी आत्म्याचे ठायीं प्रवृत्ति करणें याला चारित्र म्हणतात. याप्रमाणें विषयकषायापासून पराङ्मुख होऊन, सर्व क्षेत्र कालांत प्रवर्तन करणाऱ्याला वरील करणांनीं नवीन कर्में येत नाहींत, हाच संवर होय. याप्रमाणें संवर होण्याचीं कारणें आहेत. याचा सतत विचार करीत राहिल्यानें मनुष्याला नवीन कर्माचा बंध होत नाहीं.

## ९ निर्जराभावना.

निर्जराभावनेचें स्वरूप असें आहे. ज्ञानी पुरुष निदान न बांधतां बारा प्रकारचें तपश्चरण करतात. त्यांच्या कर्माचा क्षय होतो. याप्रमाणें कर्में उदयाला येऊन आपला रस जें सुखदुःखादिक फल देऊन नाहींशीं होणें याला निर्जरा म्हणतात. हिचे दोन भेद आहेत.

१ कर्म उदयाला आल्यानंतर आपलें फल देऊन नाहींसें होतें याला सविपाक निर्जरा म्हणतात. ही निर्जरा चारी गतींत होत असते. २ व्रत, संयम, तपश्चरण करून कर्म उदयाला येण्यापूर्वींच त्याला नाहींसें करणें याला अविपाक-निर्जरा म्हणतात. कषाय मंद होत गेल्यानें वरचेवर तपश्चरणाची शक्ति वाढत जाते तशी कर्माची निर्जरा अधिक होते. जे पुरुष कषायरूप शत्रूला जिंकून दुष्ट लोकांचीं दुर्वचनें, उपद्रव, अनादर वगैरेनीं मनांत कलुषता उत्पन्न होऊं न देतां सहन करितात त्यांची अधिक निर्जरा होते. ते त्यावेळीं असा विचार मनांत आणितात, "म्यां पूर्वजन्मीं पाप संपादन केलें होतें त्याचें हें फल आहे. तें शांतपरिणाम ठेऊन सोशिलें तरच कर्मरूपीं ऋण फिटण्याजोगें आहे, एरव्हीं फिटणार नाहीं. या प्रसंगीं जर दुःख करीत राहीन तर कर्म सोडणार नाहींच, उलट असंख्यातपटीनें अधिक नवीन कर्माचा बंध होईल. उत्तम पुरुष शरीराला केवळ मोह उत्पन्न करणारें, विनाशी, अशुद्ध व दुःखदायक मानतात. सम्यग्दर्शन, ज्ञान-चारित्राला सुख देणारे, निर्मल, नित्य, अविनाशी असें जाणून, आपली स्वतःची निंदा करून गुणवान् पुरुषाचा अत्यंत आदर करितात व त्याला आपल्याहून उच्च मानीत असतात. तसेंच मनाला व इंद्रियाला जिंकून आपल्या ज्ञानस्वभावांत सदैव लीन होतात. अर्थात् अशाच सत्पुरुषांना मनुष्य जन्म प्राप्त झाल्याचें सार्थक्य होय. त्यांच्याच पापकर्माची निर्जरा होते, संसाराचा नाश करणाऱ्या सातिशय पुण्याचा बंध होतो व त्याच पुरुषांना परम अतींद्रिय, अविनाशी, अनंत सुख पण प्राप्त होतें. जे समभाव रूप सुखांत लीन होऊन वारंवार आपल्या निर्मलस्वरूपाचा विचार

मनांत आणितात आणि इंद्रियें व कषायांना दु:खदायक जाणून त्यांना जिंकतात, त्या महापुरुषांची कर्मनिर्जरा होते, म्हणून आपणही तसें होण्याचा प्रयत्न करावा."

## १० लोकभावना

या भावनेंत लोक म्हणजे काय, त्याची व्यवस्था कशी आहे, त्यांत जीव कोठें कोठें राहतात, स्वर्ग, मोक्ष, नरक वगैरे कोठें आहेत या सर्व गोष्टींचा विचार करावा लागतो.

प्रथमतः लोक म्हणजे काय हें पाहूं. चोहोंकडे अनंतानंत आकाश व्यापून राहिलेलें आहे. या आकाशाच्या अत्यंत मध्यभागीं हा लोक विराजमान आहे. जेवढ्या आकाशांत जीव, अजीव, धर्म, अधर्म आणि काल हीं पांच द्रव्यें दिसून येतात तेवढ्या आकाशाच्या प्रदेशाला लोक अशी संज्ञा आहे. या लोकांत अनंतानंत जीव आहेत. जीवाहून अनंतपटीनें अधिक पुद्गल आहे. धर्मद्रव्य, अधर्मद्रव्य व आकाशद्रव्य हीं एकेक आहेत. कालद्रव्य असंख्यात आहे. या सर्वांचें स्वरूप, आकार, अवगाहना (राहण्याचें ठिकाण) वगैरे वर्णन करण्यानें विस्तार होऊन ग्रंथ वाढेल.

[माझें शरीरबल कमी झाल्यामुळें त्यांचें थोडें थोडें वर्णन लिहूं म्हटलें तरी हातीं घेतलेल्या या ग्रंथाचें काम पूर्ण होईल असा भरंवसा वाटत नाहीं. म्हणून येथें त्यांचें स्वरूप विस्तारानें सांगितलें नाहीं. यावर दुसरे अनेक मोठमोठे ग्रंथ आहेत त्यांतून समजून घेण्याची वाचकांनीं कृपा करावी. असें पं. सदासुखजी लिहितात.]

## ११ बोधिदुर्लभभावना

या भावनेचें स्वरूप थोडक्यांत असें आहे कीं, अनादिकालापासून हा जीव निगोदांत राहिलेला आहे. एका निगोदी जीवाच्या शरीरांत भूतकालीं जितके सिद्ध जीव होऊन गेले त्याहून अनंतपटीनें अधिक जीव असतात. ते आपापल्या कार्मण शरीराची अवगाहना धारण करून एकाच शरीरांत रहातात. अशा प्रकारच्या बादर (स्थूल) व सूक्ष्म निगोद जीवांनीं हा लोक सर्व बाजूंनीं खालीं, वर, आंत, बाहेर भरलेला आहे. याचप्रमाणें पृथ्वीकाय वगैरे पंचस्थावर जीवांनींही भरलेला आहे. यांतून त्रसपर्याय प्राप्त होणें हें रेतीच्या मैदानांत पडलेल्या बारीक हिरकणीसारखें दुर्लभ आहे. कदाचित् यांतूनही मोठ्या प्रयासानें त्रसपर्याय प्राप्त झाला तरी सर्व इंद्रियें परिपूर्ण प्राप्त होऊन पंचेंद्रियत्व प्राप्त होणें हें दुर्लभ आहे. विकलत्रयांत जन्म होऊन पुन: तेथून निगोदांत जावें लागतें. तेथें अनंतकाल राहून मग पंचस्थावर पर्याय प्राप्त होतो. तेथें असंख्यात किंवा संख्यात काल पूर्ण करून पुन: निगोद प्राप्त होतो. याप्रमाणें परिभ्रमण करतां करतां अनंतपरिवर्तनें पूर्ण होतात. यांतून पंचेंद्रियपणा प्राप्त होणें फार कठिण. दैवयोगानें तो प्राप्त झाला तरी तो मनसहित प्राप्त होणें कठिण. पंचेंद्रिय-पर्याय प्राप्त झाला पण सारासार विचार करणारें मन प्राप्त झालें नाहीं तर त्याचा काय उपयोग ? पुन: अज्ञान कायम राहिल्यानें नरकनिगोदांत जाऊन अनंतकाल परिभ्रमण करावें लागणारच. अशा कठिण अवस्थेंतून सुदैवानें पार पडून जर मनसहित पंचेंद्रियपर्याय प्राप्त झाला व त्यांत सिंह, वाघ या सारखे भयंकर क्रूर, रौद्र परिणामी, अशुभलेश्याधारक होऊन जन्मलों तर

धन असूनही कांहीं उपयोग नाहीं. रात्रंदिवस क्रूर परिणामामुळें पुनरपि नरक ठेवलेला. याप्रमाणें नरकांत, पशूयोनींत अथवा स्थावरयोनींत परिभ्रमण करीत अनंतकाल क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, मारण, ताडण सहन करावें लागतें. त्यांतून चौहाठ्यावर सांपडलेल्या मूल्यवान् रत्नाप्रमाणें दुर्लभ असा मनुष्यजन्म प्राप्त झाला व जर तो नीच कुलांत जन्मला तर सर्व व्यर्थच होणार. कारण त्या कुलांत जन्म घेतल्यामुळें पापाचा संचय होऊन पुनः नरक प्राप्ति आहेच. पुनः नरजन्म सहजासहजीं प्राप्त होणें कठिण. त्यांतून आर्यखंडांत जन्म होणें हें फार दुर्लभ. आर्यखंडांत कदाचित् कांहीं पुण्याईमुळें जन्म झाला तरी त्यांत उत्तम जाति व उत्तम कुल प्राप्त होणें कठिण. भिल्ल, कोळी, चांडाळ, चांभार, कलाल, परीट, न्हावी, लोहार वगैरे पुष्कळशीं कुलें आहेत. कदाचित् उत्तम कुलांत उत्पन्न झाला तरी धन जवळ नसलें तर काय करावयाचें ? पशूसारखें ओझें वाहावयाचें किंवा नीच कुलांत उत्पन्न झाले असतील त्यांची सेवा करावयाची व दिवसाच्या आठ प्रहरांत नीच कर्म करून पराधीन राहून पोट भरावयाचें. अशा स्थितींत उत्तम कुलांत जन्म होऊन तरी काय फायदा ? कदाचित् उत्तम कुल व श्रीमंती या दोन्ही गोष्टींची अनुकूलता झाली तरी शरीराचीं सर्व इंद्रियें परिपूर्ण असणें कठिण. पुष्कळ श्रीमंती असून कान नसलें तर काय करावें ? इंद्रियपूर्णताही कदाचित् प्राप्त झाली पण ज्याचें शरीर रोगी त्याला स्वास्थ्य मिळून आयुष्य कसें टिकणार ? दीर्घायुष्यही प्राप्त झालें तरी त्यांत शील म्हणजे मनवचनकायेची न्यायपूर्वक प्रवृत्ति नसली तर त्या आयुष्याचा काय उप-योग ? न्यायप्रवृत्ति असली तरी सत्संगति प्राप्त होणें दुर्लभ. सत्संगति असूनही सम्यग्दर्शन प्राप्त होणें दुर्लभ. सम्यक्त्व असूनही चारित्र लाभणें कठिण. चारित्र असूनही तें मरेंपर्यंत स्थिर राहून अखेर समाधिमरण साधणें दुर्लभ. रत्नत्रय प्राप्त होऊनही जो तीव्रकषायांच्या स्वाधीन होईल तो संसारसमुद्रांत बुडेल, त्याला समुद्रांत पडलेल्या रत्नाप्रमाणें पुनः रत्नत्रय प्राप्त होणें कठिण होईल. मनुष्यगतींत मात्र हें प्राप्त होतें व याच गतींत तपव्रतसंयम धारण करून निर्वाण प्राप्त करून घेतां येतो. याप्रमाणें दुर्लभ मनुष्य जन्म प्राप्त झाला असतांही जे विषय सुखाच्या नादीं लागतात ते आपल्या जवळ असलेल्या अमूल्य प्रभावशाली रत्नाला भस्म करण्याकरितां जाळून टाकतात असें समजावें.

## १२ धर्मभावना

धर्मभावनेचें थोडक्यांत स्वरूप सांगावयाचें म्हणजे प्रथमतः धर्म कशाला म्हणतात याचा विचार करावयास पाहिजे. याचें स्वरूप दशलाक्षणिक धर्माचें वर्णन करतांना विस्तारानें सांगितलें आहेच. धर्म म्हणजे आत्म्याचा स्वभाव. हा सर्वज्ञ वीतराग देवांनीं दश-लक्षण, रत्नत्रय व जीवदयारूप सांगितलेला आहे. याचें विवेचन प्रसंगा-नुसार या ग्रंथांत येऊन गेलें आहे. संसारांत अशा प्रकारच्या धर्माला जाणण्याची सामग्री प्राप्त होणें हेंच कठिण आहे. त्यापेक्षां धर्मश्रवण करण्याचा लाभ प्राप्त होणें कठिण. त्याहून धर्मवान् पुरुषांची संगति प्राप्त होणें कठिण. धर्मावर श्रद्धा, धर्माचें यथार्थ ज्ञान व धर्मयुक्त आचरण हीं क्वचित् एखाद्या विरळ्या पुरुषाला मोहकर्माच्या मंदतेनें व कर्मांच्या उपशमानें प्राप्त होतील. हा

धर्माचा प्रभाव

जीव इंद्रियांच्या विषयांवर आणि आपल्या स्त्री, पुत्र, मित्रादिकांवर प्रीति करीत असतो तशी प्रीति जर एका जन्मांत धर्मावर करील तर संसारांतील सर्व दुःखांचा अभाव होऊन अक्षय्य सुख प्राप्त होईल. संसारी जीव रात्रंदिवस सुख प्राप्त व्हावें अशी इच्छा करीत असतात. पण धर्माचरणाविषयीं त्यांच्या मनांत आदर नसल्यानें सुख कोठून प्राप्त होणार ? बीं पेरल्याशिवाय धान्य कोठून उत्पन्न होणार ! संसारांत इंद्रपणा, अहमिंद्रपणा, तीर्थकरत्व, चक्रवर्तित्व, बलभद्रत्व, नारायणत्व वगैरे प्राप्त होतात तें सर्व धर्माच्या प्रभावाचें फल आहे. त्याचप्रमाणें इहलोकीं उत्तम कुल, उत्तम रूप, बल, ऐश्वर्य, राज्य, संपत्ति, आज्ञा, सत्पुत्र, सुस्वभावी स्त्री, हितकर्ता मित्र, इच्छित कार्ये सिद्धीस नेणारा सेवक, निरोगी शरीर, उत्तम भोगोपभोग, देवासारखे राहण्यास सुंदर घर, सत्संगति, क्षमा, विनय, शांतवृत्ति, मंद-कषाय, पांडित्य, कवित्व, चातुर्य, हस्तकला, पूज्यत्व, लोकमान्यत्व, कीर्ति, दातृत्व, औदार्य, शौर्य वगैरे उत्तम सामग्री, उत्तम गुण, उत्तम बुद्धि, उत्तम प्रवृत्ति वगैरे जें आपल्या पाहण्यांत व ऐकण्यांत येतें तें सर्व धर्माच्या प्रभावामुळें प्राप्त झालेलें आहे. धर्माच्या प्रभावानें विषम तें सुगम होतें. मोठमोठे उपद्रव दूर होतात उद्योग न करणारालाही लक्ष्मी येऊन माळा घालते. अग्नीचें जल होतें. वाऱ्याचें, पावसाचें, रोगाचें, देवींचें, सिंहाचें, वाघाचें, नदीचें, समुद्राचें, विषाचें, परचक्राचें, दुष्टराजाचें, वैऱ्याचें व चोराचें भय रहात नाहीं. आत्म्याला अनेक प्रकारची सुखशांति व सौख्य प्राप्त होतें. म्हणून सर्वज्ञाच्या वचनावर भरंवसा ठेवणारांनीं धर्माला शरण जाऊन तो ग्रहण करावा व त्याप्रमाणें आचरण करावें हेंच योग्य आहे.

याप्रमाणें येथवर संस्थानविचय नामक धर्मध्यानांत बारा भावनांचें स्वरूप थोडक्यांत वर्णिलें. धर्मध्यानाचें सविस्तर वर्णन ' ध्यान ' नामक अंतरंग तपाच्या भेदांत केलें आहे. धर्मध्यानाचे ज्ञानार्णव नामक ग्रंथांत पिंडस्थ, पदस्थ, रूपस्थ व रूपातीत असे चार भेद केले आहेत त्यांचा येथें थोडक्यांत विचार करूं.

## धर्मध्यानाचें स्वरूप

**पिण्डस्थ ध्यान.** पिंडस्थ ध्यानांत पांच प्रकारच्या धारणा धारण कराव्या असा भगवंताचा उपदेश आहे. या धारणांचें यथार्थ स्वरूप जाणणारा संयमी पुरुष संसाराचा नाश करूं शकतो. त्या पार्थिवी धारणा, आग्नेयी धारणा, पवन धारणा, वारुणी धारणा, व तत्त्वरूपवती धारणा अशा पांच आहेत. त्यांतून पार्थिवी धारणेचें स्वरूप असें आहे.

**पार्थिवी धारणा.** एका उज्ज्वल, क्षोभरहित, शब्दरहित, मध्यलोकप्रमाण विस्तीर्ण, क्षीरसमुद्रांत जंबूद्वीपा एवढें, तप्तसुवर्णाप्रमाणें ज्याची कांति आहे अशा पद्मरागमण्याचे केसर ज्यांत आहेत व ज्याला एक हजार पाकळ्या आहेत अशा कमलाची कल्पना करावी. त्या कमलाच्या मध्यभागीं मेरू पर्वतासारखी तेजःपुंज कर्णिका कल्पून, तीमध्यें शरत्कालीन चंद्राप्रमाणें निर्मल सिंहासनावर क्षोभरहित, रागद्वेषरहित, कर्म-

नाशोयुक्त,निश्चल विराजमान असलेल्या आपल्या आत्म्याचें चिंतन करावें.हिला पार्थिवी धारणा म्हणतात.

इचा दृढ अभ्यास झाला म्हणजे त्या स्फटिकमय सिंहासनावर बसून आपल्या नाभिमंडलाचें ठायीं सोळा पाकळ्याचें मनोहर एक कमल आहे असें चिंतन करावें. त्या कमलाच्या एकेका पाकळीवर सोळा स्वरांची पंक्ति म्हणजे अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः स्थापन करावी. त्या कमलाच्या कर्णिकेमध्यें असणारें 'ह्' अक्षर, रेफ, बिंदु व अर्धचंद्राकार कलेनें युक्त अशा एका बिंदूतून कोटिकांतियुक्त दहा दिशा व्यापणारे "र्ह्ँ" या मंत्राचें चिंतन करावें. यानंतर त्या रेफांतून हळू हळू धूर निघत आहे. मग अग्नीचे कण त्यांतून निघत आहेत, पुढें त्या महामंत्राच्या ध्यानापासून ज्वालांचा समूह निघत आहे अशी क्रमानें कल्पना करावी. तो ज्वालासमूह वरच्या बाजूस एकसारखा वाढत आहे. तो वाढत वाढत आपल्या हृदयांत अधोमुख असणाऱ्या अष्टकर्मरूपी आठ पाकळीच्या कमलाला भस्म करून बाहेर येत असून, तो त्रिकोण अग्निमंडळ अग्नीचें बीजाक्षर रकार व स्वस्तिक चिन्हांनीं युक्त बनून आपल्या ज्वालांनीं शरीराला दग्ध करीत आहे. यानंतर तो सुवर्णासारखा तेजःपुंज निर्धूम अग्नि प्रज्वलित होऊन अंतरंग भार्गीं मंत्ररूपानें कर्माचें दहन करीत आहे व बाह्यतः शरीराला दग्ध करीत आहे असें मानून, त्याला दग्ध करण्या योग्य कांहीं न राहिल्यामुळें हळू हळू तो आपोआप शांत होत आहे अशी कल्पना करावी. याला अग्निधारणा म्हणतात.

अग्नि धारणा.

पवनधारणेमध्यें पवन (वायु) महान् वेगवान् व बलवान् आहे अशी कल्पना करून तो देवसमूहाला चलायमान् करणारा, मेघाला हलवून सोडणारा, समुद्रांत अनेक लाटा उत्पन्न करणारा, त्रिभुवनांत संचार करणारा, दिशांच्या मुखांत प्रवेश करणारा, जगाच्या मध्यभागीं फैलणारा व पृथ्वीच्या खालीं गमन करणारा सर्व आकाशभर व्यापलेला आहे अशी कल्पना करावी. यानंतर तो प्रबल वायु कर्मरूपी धूली व शरीर नाहींसें करून हळूहळूं शांत होत आहे असें चिंतावें.

पवन धारणा.

वारुणीधारणेंत आकाश हें सर्वतः इंद्रधनुष्य, विजा, गर्जना करणाऱ्या मेघांनीं भरलेलें असून मोत्यासारखी निर्मल वृष्टि करीत आहेत अशी कल्पना करावी. त्यानंतर वरुण बीजाक्षरांनीं मंडित व अमृतासारख्या पाण्यानें भरलेल्या आकाशांत अर्द्धचंद्राकार वरुणपुर आहे असें मनांत आणून तो अचिंत्यप्रभावी व दिव्यध्वनिरूपी पाण्यानें शरीरांतून उत्पन्न होणाऱ्या सर्व रजाचें (धूलीचें) प्रक्षालन करीत आहे असें चिंतन करावें. यास वारुणीधारणा म्हणतात.

वारुणी धारणा.

यापुढें तत्त्वरूपवतीधारणेचें चिंतन करावें. यांत सिंहासनावर विराजमान, दिव्य अतिशयांनीं युक्त, पंचकल्याणिकाची महिमा धारण करणारा, चार प्रकारच्या देवसमूहाकडून वंद्य, संपूर्ण कर्मरहित, अतिशय निर्मल, प्रगट पुरुषाकार, सप्तधातुरहित शरीर असणारा, पौर्णिमेच्या चंद्रासारखी कांति धारण करणारा, सर्वज्ञरूप आपला आत्मा आहे. असें चिंतन करावें.

तत्त्वरूपवती धारणा.

याप्रमाणें पांच धारणा ज्यांत आहेत अशा पिंडस्थध्यानाचें चिंतन करण्यांत जो जोगी आपलें मन निश्चल करतो त्याला संसार नाहींसा करतां येतो. या पिंडस्थध्यानांत आपल्या अप्रतिम तेजानें जगाला आल्हाद उत्पन्न करणारा, सर्वज्ञतुल्य, मेरुपर्वताच्या शिरोभागीं असलेल्या सिंहासनावर विराजमान, सर्व देवाकडून वंद्य असा आपला आत्मा आहे असें दृढ चिंतन केल्यानें तो जिनागम-रूप महासमुद्राचा पारगामी होतो. या ध्यानाच्या प्रभावानेंच दुष्टकृत विद्यामंत्रयंत्रादि क्रूर क्रियांचा नाश होतो. सिंह, वाघ, साप, गेंडा, हत्ती वगैरे क्रूर जीव शांत होतात. ते कोणताही उपद्रव करूं शकत नाहींत. भूत, पिशाच, राक्षस, ग्रह, शाकिनी वगैरे दुष्ट व क्रूर देवांच्या क्रूर वासनांचा अभाव होतो.

## पदस्थध्यान.

यापुढें पदस्थध्यानाचें स्वरूप पाहूं. पूर्वाचार्यांनीं प्रसिद्ध सिद्धांतांत जीं मंत्रपदें लिहिलीं आहेत त्यांचें चिंतवन करणें याला पदस्थध्यान म्हणतात. प्रथमतः नाभिकमलाच्या ठिकाणीं सोळा पाकळ्यांचें एक कमल आहे अशी कल्पना करावी. नंतर त्याच्या प्रत्येक पानावर सोळा स्वरांची भ्रमण करणारी एक पंक्ति आहे. ते सोळा स्वर म्हणजे अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः हे होत. यानंतर आपल्या हृदयांत चोवीस पाकळ्याचें एक कमल कल्पावें. चोवीस पाकळ्या व एक कर्णिका मिळून पंचवीस स्थानें कल्पून त्यांवर क ख ग घ ङ, च छ ज झ ञ, ट ठ ड ढ ण, त थ द ध न, प फ ब भ म हीं अक्षरें कल्पावीं. त्यानंतर मुखांत आठ पाकळ्याचें एक कमल आहे अशी कल्पना करून त्याच्या आठ पाकळ्यावर 'य र ल व श ष स ह' हीं आठ अक्षरें प्रदक्षिणेसारखीं फिरत आहेत असें चिंतन करावें. या अनादि सिद्ध वर्णमातृकेचें स्मरण करणाऱ्या पुरुषाला श्रुतज्ञानाचें पूर्ण ज्ञान होतें. या वर्णमातृक ज्ञानाच्या प्रभावानें हरवलेल्या वस्तूचें ज्ञान होतें. क्षयरोग, अरुचि, मंदाग्नि, कोड, उदर, श्वास, खोकला वगैरे रोग असतील तर ते नाहींसे होतात. याशिवाय असामान्य वक्तृत्व व महंतपुरुषाकडून पूज्यपणा प्राप्त होऊन उत्तम गति प्राप्त होते. परमागमांत पसतीस अक्षरी मंत्र 'णमो अरहंताणं, णमो सिद्धाणं, णमो आयरियाणं, णमो उवज्झायाणं, णमो लोए सव्वसाहूणं' व षोडशाक्षरी मंत्र 'अर्हत्सिद्धाचार्योपाध्यायसर्वसाधुभ्यो नमः' याप्रमाणें सांगितले आहेत त्यांचें ध्यान करावें. याचप्रमाणें 'अरहंतसिद्ध' या षडाक्षरी अथवा 'णमो सिद्धाणं' या पंचाक्षरी, अथवा 'अरहंत' या चतुराक्षरी, अथवा 'सिद्ध' या द्व्यक्षरी, अथवा 'ॐ' या एकाक्षरी मंत्राचें ध्यान करावें. 'णमो अरिहंताणं' हा सप्ताक्षरी मंत्र अथवा 'असिआउसा' हा पंचाक्षरी मंत्र पंचपरमेष्ठीचा वाचक आहे. याचप्रमाणें अनेक मंत्र आहेत ते सर्व गुरूपदेशावरून समजून घेऊन त्यांचें ध्यान करावें. 'चत्तारि मंगलं, अरिहंत मंगलं, सिद्ध मंगलं, साहू मंगलं, केवलिपण्णत्तो धम्मो मंगलं' हीं मंगलपदें आणि 'चत्तारि लोगुत्तमा, अरिहंत लोगुत्तमा, सिद्ध लोगुत्तमा, साहू लोगुत्तमा, केवलिपण्णत्तो-धम्मो लोगुत्तमा' हीं चार उत्तमपदें व 'चत्तारि सरणं पवज्जामि, अरिहंत सरणं पवज्जामि,

पदस्थध्यानाचें स्वरूप

सिद्ध सरणं पव्वजामि, साहू सरणं पव्वजामि, केवलिपण्णत्तो धम्मो सरणं पव्वजामि' हीं चार शरणपदें यांचें कर्मपटल नाहींसें होण्याकरितां नित्य ध्यान करावें. त्रैलोक्यांत सर्व पदार्थांत हीं चार पदेंच मंगल आहेत. हीं चारच उत्तम आहेत व हीं चारच शरण जाण्यायोग्य आहेत. यांचें विस्मरण कधींही होऊं देऊं नये. याप्रमाणें अनेक मंत्र जीवांचे रागद्वेष मोहादिक विकार नाश करण्यास व वैरविरोधदुर्ध्यानादिक नाहींसे करून परमशांत भाव उत्पन्न करणारे आहेत. त्या सर्वांचें, विषय प्रीति कमी व्हावी, पंचेंद्रियांच्या विषयांना जिंकतां यावें, वीतरागता वृद्धिंगत व्हावी, परवस्तूवरील इच्छा नष्ट व्हावी एतदर्थ गुरूपदेशावरून ध्यान करावें. याप्रमाणें ध्यान, जपजाप्य करणाऱ्याच्या कर्मांची निर्जरा होऊन क्रमानें संसारपरिभ्रमणाचा अभाव प्राप्त होतो. या उलट रागद्वेषाच्या वश होऊन जे जारण, मारण, उच्चाटण, वशीकरण वगैरे करतात, विषयोपभोगाकरितां शत्रूंचा नाश करतात, राज्यैश्वर्य प्राप्त व्हावें म्हणून जपजाप्य, मंत्रध्यान, तपश्चरण करतात ते घोर संसारपरिभ्रमणाला कारण अशा मिथ्यादर्शनादिक अशुभ कर्मांचा बंध करतात. खोटी वासना, खोटें ध्यान, व्यंतर देव, देवी, यक्षिणी वगैरे कुदेवांचें ध्यान करून आपले परिणाम ज्ञानश्रद्धानापासून पराङ्मुख करणें यामुळें संसारबंधन होतें. कदाचित् एखाद्याला चित्ताची एकाग्रतारूप तपश्चरणाच्या प्रभावानें अथवा मंदकषायाच्या प्रभावानें अथवा शुभकर्माच्या उदयानें खोटी विद्या सिद्ध झाली, तरी त्यापासून त्याला विषय कषायांची वृद्धि व अभिमान याचीच प्राप्ति होते व त्यामुळें सम्यक् श्रद्धानज्ञान आचरणाचा घात होऊन पापप्रवृत्तीमुळें दुर्गतीला जावें लागतें. म्हणून वीतरागता नष्ट करणारे खोटे मंत्र, यंत्र, मुद्रा, मंडल वगैरे कृतींचा त्याग करावा. मोहरूपी अग्नीनें दग्ध होणाऱ्या या जगांत कषायांचा त्याग करून आत्मकल्याण करून घेणारा प्राणी क्वचित् आढळून येतो व जे याप्रमाणें कषायांना जिंकतात तेच संसारांतून मुक्त होतात. एरव्हीं हजारों काबाडकष्ट करून दुःख सोसणाऱ्या अनेक प्रकारच्या आधिव्याधींनीं व्यापून, रागद्वेषमोहरूपी मदिरा प्राशन करून, अतिनिंद्य अशा घरांत राहणाऱ्या मोठ्या बुद्धिवान् पुरुषाला देखील प्रमाद जिंकून चंचल मनाला वश करून घेतां येणार नाहीं. गृहस्थाश्रमांत अनेक प्रकारच्या परिग्रहांचा संयोग असतो. त्यांतून प्रत्येक वस्तूवरील प्रेमानें व आशारूप पिशाचीनें ग्रासिलेला, स्त्रीच्या प्रेमानें अंध झालेला जीव, आत्म्याचें हित कशांत आहे हें जाणून घेण्यास समर्थ होत नाहीं. त्याचप्रमाणें गृहस्थाश्रमांत रात्रंदिवस आर्तध्यान हाच कोणी एक अग्नि, त्यायोगें प्रज्वलित झालेला कुवासनारूप धूर, त्यानें ज्ञानरूपी नेत्र ज्यांचे झांकून गेले व नानाविध चिंताज्वरानें ज्यांचा आत्मा निश्चेष्ट बनून गेला, त्यांना कधींही ध्यानाची सिद्धि होत नाहीं. हा प्राणी आपदारूप चिखलांत फसून प्रबल रागरूपी पिंजऱ्यांत परिग्रहरूपी विषानें मूर्च्छित होऊन अनेक पीडा भोगीत आहे, त्यास आपल्या आत्म्याचें हित करणारें ध्यान कसें करितां येईल? हा आरंभपरिग्रहामध्यें ममत्वबुद्धि ठेऊन स्वतः स्वतःलाच बांधून घेऊन पराधीन होत आहे. रागद्वेषादिक वैऱ्यांचा नाश गृहत्यागी तपस्व्याशिवाय इतरांना करितां येणार नाहीं. तपस्वी होऊनही जर यथार्थ तत्त्वांचें ग्रहण न केलें तर तो मिथ्यामार्गी

होतो. त्यालाही ध्यानसिद्धि होत नाहीं. यतिपणा धारण केला पण पूर्वापराला विरोधक अशाप्रकारचें तत्त्वज्ञान मनांत बाणलें तर त्यालाही ध्यानसिद्धि होऊं शकणार नाहीं. सर्वथा एकान्त ग्रहण करणाऱ्या पाखंडी लोकांना अनेकान्तस्वरूपी वस्तूचें ज्ञान होणें शक्य नाहीं. त्यांना ध्यान कोठून होणार ? जिनेंद्राच्या आज्ञेला अनुसरून न वागणाऱ्यांनीं मुनिलिंग धारण केलें व मन-वचन-कायेची कुटिलता सोडिली नाहीं, शिष्य वगैरे वाढवून त्यायोगें आपली उच्चता होते असा विचार मनांत असला, स्वतःची कीर्ति, पूज्यता, अभिमान, सत्कार हे सर्व पुष्ट व्हावेत अशी मनांत इच्छा असली, लोकरंजन करण्याकडे मनाची अधिक प्रवृत्ति असली, ज्ञाननेत्र उघडे ठेवण्याकडे लक्ष्य कमी असलें, गर्वानें अंगांत ताठपणा भरलेला असला, गोड गोड खाण्याची लालसा अंतःकरणांत वरचेवर उत्पन्न होत असली, पक्षपात करण्याची संवय सुटत नसली व स्वभावांतून हलकटपणा नाहींसा झाला नसला, त्यानें मुनिवेष धारण केला तरी त्याला ध्यानसिद्धि कदापि होणार नाहीं. कारण काम, क्रोध, लोभ, मोह, ज्याचे ठायीं ओतप्रोत भरलेले व कुशास्त्राकडे ज्याची प्रवृत्ति आहे त्याला ध्यान कसें व्हावें ? याचप्रमाणें रात्रंदिवस रागभाव मनांत उत्पन्न होत आहे, सदैव इंद्रियांचे विषय भोगण्याची तयारी चाललेली आहे, मनांत करुणाभाव न धारण करितां अनेक प्रकारच्या हास्य, कौतुक, मायाचार, युद्ध, कामशास्त्रादिकांच्या गोष्टी व उपदेश चालू आहे अशा पुरुषाला ध्यान स्वप्नांतही प्राप्त होणार नाहीं ! जिनदीक्षा धारण करूनही जे आपलें महत्त्व वाढविण्यासाठीं वशीकरण, आकर्षण, मारण, उच्चाटण, जलस्तंभन, अग्निस्तंभन, विषस्तंभन, रसकर्म, रसायन, पादुकाविद्या, अंजनविद्या, पुरक्षोभ, इंद्रजाल, बलस्तंभन, हारजीत, विद्याछेद व भेद, वैद्यविद्या, ज्योतिषविद्या, यक्षिणीसिद्धि, पातालसिद्धि, कालवंचना, जांगुली, सर्वमंत्र, भूतपिशाचक्षेत्रपालसाधन, जलमंथन-सूत्रबंधन इत्यादि कर्माकरितां ध्यान, मंत्रसाधन व घोरतपश्चरण करितात, त्यांना मिथ्यात्वकषायांच्या वश होण्यानें घोर कर्माच्या बंधाचें कारण दुर्ध्यान घडतें. या दुर्ध्यानाच्या प्रभावानें त्यांना नरकतिर्यंचादि कुगतीमध्यें अनंतकाल भ्रमण करावें लागतें. अशा प्रकारच्या पाखंडी लोकांच्या नादीं लागून त्यांची उपासना करणाऱ्यांना व अनुमोदन देणाऱ्यांना देखिल त्याबरोबर दुर्गतीला जावें लागतें हें पक्कें मनांत बाळगून खोटे मंत्र, तंत्र, यंत्रादिकांच्या नादीं लागूं नये हा सर्वोत्कृष्ट मार्ग आहे. यावर कोणी म्हणेल कीं, खोटे मंत्रतंत्रादिकांचा व जारणमारणउच्चाटणादिकांचा द्वादशांग वाणींतच समावेश होत आहे ना ! मग त्याचा निषेध करण्याचें काय प्रयोजन ? याचें समाधानः- जरी द्वादशांगवाणींत संपूर्ण त्रैलोक्यांत असणारे द्रव्यक्षेत्रकालभाव, विष, अमृत यांचें वर्णन असलें तरी विष हें त्याग करण्यायोग्य व अमृत हें ग्रहण करण्यायोग्य आहे असें त्यांत प्रतिपादन केलें आहे, म्हणून खोटे मंत्र, खोटी विद्या वगैरे सर्व त्याज्य आहेत. अर्थात् अशा सर्व कुविद्यांचा त्याग करून कर्मसमूहाचा नाश करणाऱ्या व वीतरागता उत्पन्न करणाऱ्या पंचपरमेष्ठी पदांचेंच ध्यान करणें योग्य आहे. याप्रमाणें धर्मध्यानांतील पदस्थध्यानाचें वर्णन केलें.

## रूपस्थ ध्यान.

यानंतर रूपस्थ ध्यानांत, भगवान् अरहंत परमेष्ठी समवसरणांत विराजमान होऊन असंख्यात इंद्रादिक देवाकडून वंद्य होत्साते बारा प्रकारच्या सभेंतील सर्व जीवांना उत्कृष्ट धर्माचा उपदेश करीत आहेत असें मनांत आणून त्यांचें ध्यान करावें. भगवंताचें धर्मोपदेश देण्याचें स्थान ( समवसरण ) जमिनीपासून पांच हजार धनुष्य उंच असून त्याला वीस हजार पायऱ्या आहेत. त्याची भूमि हिरव्या पांचूंनीं व नील मण्यांनीं बनविलेली, त्यावर गोल सिंहासन असून त्यास झालर लावलेली आहे. तें सिंहासन त्रैलोक्यरूप लक्ष्मीचा मुखावलोकन करण्याचा आरसा आहे कीं काय असा भास होतो. त्या सभास्थानाचें वर्णन करणें अशक्य आहे. तें प्रत्यक्ष कुबेरानें रचिलेलें आहे. जो कुबेर साक्षात् आपल्या रचनाचातुर्यानें तें स्थान बनविण्यास सिद्ध झाला त्याचें वर्णन आमच्या सारख्या मंदबुद्धि माणसाच्या हातून कसें होऊं शकणार ? तरी पण त्याचें यथामति वर्णन केलें असतां त्यापासून शुभध्यानाची उत्पत्ति व भव्य जीवांना त्याचें श्रवण, चिंतन केल्यापासून अतिशय आनंद होतो म्हणून येथें थोडक्यांत वर्णन केलें आहे.

समवसरणाचें स्वरूप.

त्या सभेची बारा योजन प्रमाण इंद्रनील रत्नाची गोल जमीन आहे, त्यापुढें अनेक रत्न समूहांनीं बांधलेला धूलिशाल नामक कोट आहे. त्या कोटांतील हिरव्या पांचूच्या प्रभेनें कोठें आकाश हिरवें झाल्याचा भास होतो, तर कोठें पद्मराग रत्नाच्या प्रभेनें तें पिंवळसर असल्यासारखें वाटतें. कोठें मेचक [ अनेक रंगांच्या ] रत्नांची प्रभा, तर कोठें चंद्रकांत मण्याची प्रभा आकाशावर पडल्यामुळें तें तद्रूप भासतें. याप्रमाणें अनेक कांतिमान् रत्नांच्या प्रभेनें तो धूलिशाल कोट आकाशांत जणूं इंद्रधनुष्याचा भास उत्पन्न करतो. कोठें कोठें त्या धूलिशाल कोटांत असलेल्या सुवर्णाच्या प्रभेनें आकाश ही सुवर्णमय दिसूं लागतें. याप्रमाणें अतिशय कांतिमान् अशा धूलिशाल कोटाच्या चार दिशेला सोन्याचे दोन दोन खांब आहेत. त्या खांबाच्या अग्रभागीं मकराकृति तोरणें व त्या तोरणांत रत्नमाला लाविलेल्या आहेत.

धूलिशाल कोट.

कोटाभोंवतीं चोंहोबाजूला एक योजन रुंद असा आंत प्रवेश करण्याचा एक मोठा रस्ता आहे. त्या रस्त्यावरून बरेंचसें दूर गेल्यानंतर मधोमध सुवर्णाचे चार मानस्तंभ आहेत. ते अतिशय उंच आहेत. मानस्तंभासभोंवतीं चारी बाजूला चार दरवाजे असलेले तीन कोट आहेत. त्या कोटांत सोळा पायऱ्या असलेला एक चबूत्रा आहे. त्यावर मध्यभागीं हे मानस्तंभ उभारलेले आहेत. त्या मानस्तंभाला दूरून पाहतांच कोणी कसाही तीव्र अभिमानी मिथ्यादृष्टी असला तरी त्याचा मान गळून जातो. मानस्तंभाच्या मूळाशीं सिंहासनावर सुवर्णाची जिनप्रतिमा आहे. त्या प्रतिमेचा क्षीरसमुद्रांतील पाण्यानें इंद्रादिक देव अभिषेक करितात. अभिषेकाच्या जलानें तें सिंहासन पवित्र झालें

सुवर्णाचे चार मानस्तंभ.

आहे. सिंहासनापुढें त्याठिकाणीं नेहमीं देव व मनुष्यें नृत्यवादित्रासह भगवंताचें स्तवन करीत असतात. सिंहासन त्या जागेच्या अगदीं मध्यभागीं आहे. त्याच्या वरच्या बाजूला तीन कटनी (थर) आहेत. त्यावर सोन्याचे मानस्तंभ आहेत. मानस्तंभाच्या अग्रभागीं तीन छत्रें आहेत. तीं पाहिल्यानें मिथ्यादृष्टींचा मान नाहींसा होतो म्हणून त्यांना मानस्तंभ म्हटलें आहे.

त्या मानस्तंभाच्या चारीबाजूला चार विहिरी स्वच्छ पाण्यानें भरलेल्या आहेत. त्यांत अनेक प्रकारचीं कमळें प्रफुल्लित झालेलीं आहेत. विहिरीचे तट स्फटिकमण्याचे आहेत. त्या तटांवर अनेक प्रकारचे पक्षी मधुर शब्द करीत असतात. पक्ष्यांच्या शब्दांनीं व भ्रमरांच्या गुंजारवांनीं पक्षी देखील भगवंताची स्तुति करूं लागले कीं काय असा भास होतो. पूर्वदिशेच्या मानस्तंभाच्या पूर्वबाजूला नंदा, नंदोत्तरा, नंदवती व नंदघोषा, दक्षिणेच्या मानस्तंभाभोंवतीं विजया, वैजयंती, जयंती व अपराजिता; पश्चिमेला अशोका, सुप्रभा, सिद्धा व कुमदा; उत्तरेला नंदा, महानंदा, सुप्रबुद्धा, प्रभंकरी याप्रमाणें चारी दिशांच्या मानस्तंभाभोंवतीं सोळा विहिरी आहेत. प्रत्येक विहिरीच्या दोन तटांजवळ दोन दोन पाण्याचें कुंड आहेत. त्या कुंडांतील पाण्यानें पादप्रक्षालन करून मानस्तंभाचें पूजन करण्याकरितां जावें लागतें.

मानस्तंभाजवळील विहिरी.

या कुंडापुढें कांहीं मार्ग आक्रमण केल्यानंतर मोठा रस्ता सोडून चोंहोंबाजूंनीं कमलपुष्पांनीं व पाण्यानें भरलेला खंदक आहे. तो खंदक नसून प्रभूला वंदन करण्याकरितां गंगानदीच आली आहे कीं काय असें वाटतें. तो खंदक हेंच कोणी एक आकाश व त्यांत प्रतिबिंबित झालेलीं पुष्पें हीं नक्षत्राप्रमाणें शोभतात. त्या खंदकाच्या रत्नखचित तटांवर अनेक जातीचे पक्षांनीं आपल्या मधुर शब्दांनीं व आपल्या नानाविध रंगाच्या प्रतिभेनें पाण्यांत प्रतिबिंबित होऊन त्याला मनोहर शोभा आणिली आहे. खंदकाभोंवतीं एक योजन रुंदीची गोलाकार बाग आहे.

खंदक.

त्या खंदकाच्या आंतील जमिनीचा भाग चारीबाजूंनीं अनेक प्रकारच्या मनोहर वेलीच्या वनांनीं व्यापलेला आहे. त्या वनांत अनेक लहान गुल्मवृक्ष--झुडपें व समस्त ऋतूंतील फलें–पुष्पें फुललेलीं आहेत. त्यायोगें जणूं काय तें वन देवांगनांच्या मंद हास्यांनीं प्रफुल्लित झालें आहे असा भास होतो. ज्याठिकाणीं मंद सुगंध वाऱ्याच्या लहरींनीं भ्रमर लुब्ध होऊन गेले आहेत अशा वेलांच्या वनांत क्रीडा करण्याचे पुष्कळसे लहान लहान पर्वत आहेत. रमणीय मनोहर शय्येनें युक्त असे ठिकठिकाणीं लतामंडप तेथें आहेत. त्याठिकाणीं अनेक देवांगना जाऊन भगवंताची स्तुति करीत असतात. त्या लतामंडपांत चंद्रकांतमण्याच्या अतिशय थंड अशा शिला देवांना विश्रांति घेण्याकरितां ठेवलेल्या आहेत.

वनें.

धूलीशाल कोटापासून पुष्पवाटिकेपर्यंत दोन योजन प्रमाणाचा वलयविस्तार आहे. यावरून

दोहोंबाजूचें मिळून चारयोजन क्षेत्र झालें. येथून महावीथीच्या ( मोठ्यारस्त्याच्या ) मध्यभागापासून बरेच दूर जावें म्हणजे तेथें तापविलेल्या सोन्यासारख्या रंगाचा एक कोट असलेला दृष्टीस पडतो. त्या कोटानें तेथील क्षेत्र, मानुषोत्तर पर्वतानें जसा मनुष्यलोक वेढलेला आहे तद्वत् वेढलेलें दिसतें. तो कोट सुवर्णमयी असून अनेक प्रकारच्या रत्नांनीं चित्रविचित्र दिसतो. त्या कोटावर कोठें हत्तीचीं, वाघाचीं, सिंहाचीं, हंस-मयूराचीं, मनुष्यदेवांचीं सुंदर जोडपीं चित्रांत दाखविलेलीं आहेत. कोठें कोठें वेली, पुष्पें, पानें, वृक्ष वगैरे पण सुंदर तऱ्हेनें त्या कोटावर रत्नखचित मण्यांत दाखविलीं आहेत. खालीं व वर जे गलथे आहेत त्यावर मोत्याच्या व रत्नाच्या माळा व झालरी लावलेल्या आहेत. याप्रमाणें त्या कोटाची जी अप्रतिम कांति, त्यायोगें आकाशांत इंद्रधनुष्यच उत्पन्न होऊन शोभूं लागल्यासारखें वाटतें.

सुवर्णमयी कोट.

अशा त्या सुवर्णमयी प्रथम कोटाच्या चारी दिशांना अतिशय उंच रुप्याचे चार दरवाजे ( गोपुर ) आहेत. ते विजयार्द्ध पर्वताच्या शिखरासारखे उंच आहेत. ते दरवाजे तीन खणांत असून अतिशय तेजःपुंज आहेत. जणूं काय त्रैलोक्यांतील संपत्तीकडे पाहून ते हंसू लागले आहेत. त्या चांदीच्या तीन खणांतील दरवाज्यावरील पद्मरागमण्याचें शिखर आपल्या कांतीनें आकाशाला शोभवित आहे. त्या गोपुरांत गाणारे कांहीं देव त्रिभुवनाचा गुरु जो जिनेंद्र त्याचे गुण गात आहेत. कित्येक ती स्तुति श्रवण करीत आहेत. जिनेंद्राच्या गुण-गानांत तल्लीन होऊन भक्तिरसानें ओथंबलेले कित्येक नृत्य करीत आहेत. प्रत्येक दरवाज्यांत एकशें आठ झाऱ्या, कलश, दर्पण, ( ठोणा ) स्थापना, चमर, छत्र, ध्वजा, पंखे अशीं आठ मंगलद्रव्यें ठेवलेलीं आहेत. व त्यावर अप्रतिम कांतिमान् अशीं रत्नाचीं तोरणें लावलेलीं आहेत. त्यावरून असा भास होतो कीं, स्वभावतः अतिशय कांति धारण करणाऱ्या जिनदेवाच्या शरीरावर त्या आभर-णाचा समावेश झाला नाहीं म्हणून तीं दरवाजाच्या तोरणावर येऊन लोंबून राहिलीं आहेत.

गोपुर.

प्रत्येक दरवाजाच्या बाहेर नऊ निधि त्रिभुवनाला उल्लंघून असणाऱ्या जिनेंद्राचा प्रभाव वर्णित आहेत. वीतराग भगवंतांनीं त्यांचा तिरस्कार केला म्हणून कीं काय ते दरवाजाबाहेर येऊन राहिले आहेत असें वाटतें. दरवाजाच्या आंतील बाजूला जी एक कोस रुंद महावीथी ( मोठा रस्ता ) आहे त्याच्या दोन्ही भागांत दोन नाट्यशाला आहेत. याप्रमाणें चारी दिशेला दोन दोन नाट्यशाला आहेत. त्या तीन तीन खणाच्या आहेत जणूं काय त्या आपल्या तीन खणांनीं जीवांना रत्न-त्रयाचा मार्गच दाखवीत आहेत असा भास होतो. त्या नाट्यशालेच्या भिंती शुभ्र स्फटिकमण्याच्या आहेत. खांब सुवर्णाचे आहेत. जमीन स्फटिकाची आहे व शिखरें अनेक जातींच्या रत्नांनीं बन-विलेलीं आहेत. त्या नाट्यशाळेंत विद्युत्प्रभेची कांति धारण करून नृत्यगायन करणाऱ्या कित्येक देवी भगवंताचें गुणस्तवन करीत पुष्पांजलि क्षेपण करीत आहेत. कित्येक देवी वीणा तर कित्येक मृदंग वाजवीत आहेत व कित्येक या सर्व गानसाहित्यासह जिनेंद्रगुणगान करण्यांत तल्लीन

नऊनिधि व नाट्यशाला.

होऊन गेल्या आहेत. याप्रमाणें मनोहर गायन करीत असतांना तें पाहण्याकरितां जे किन्नर देव येत असत त्यांचें मन हरण होतें.

दोन धूपघट.

नाट्यशाला सोडून थोडें पुढें गेलें असतां महावीथीच्या बाजूला दोन दोन धूपघट ठेवलेले दिसून येतात. त्यांतून निघणारा सुगंधी धूर आकाशांत सर्वत्र पसरून दाही दिशा सुगंधित करीत आहे व तो धूर आकाशांतून खालीं उतरणाऱ्या देवांना हे मेघच आहेत कीं काय अशी शंका उत्पन्न करीत आहे.

चारवनें.

महावीथीच्या बाजूला जें मधलें अंतर आहे त्यांत चोहोंबाजूंनीं वनांत जाण्याचे रस्ते आहेत. ते एक योजन रुंद विस्ताराचे आहेत. त्यांत एक पंक्ति अशोकवृक्षांची, दुसरी सप्तपर्णवृक्षांची, तिसरी चंपकवृक्षांची, चौथी आम्रवृक्षांची अशा ओळीनें वृक्षांचीं वनें आहेत. तीं वनें फलपत्रांनीं सुशोभित झालेलीं पाहून जणूं काय भगवंताला अर्घ्य उत्तारण करीत आहेत असें वाटतें. अशा प्रकारचीं वनें दोहोंबाजूला दोन योजनांत आहेत.त्यांत मनोहर असे अनेक पक्षी मधुर शब्द करीत आहेत. भ्रमर गुंजारव करीत आहेत. नंदनवनाप्रमाणें हजारों देव-देवी उत्कृष्ट वस्त्राभरणांनीं अलंकृत होऊन साक्षात् तेजाचा पुंजच कीं काय असे विहार करीत आहेत. कोकिल मधुर शब्दांनीं जिनपूजन करण्याचें देवेंद्रांना जणूं आमंत्रणच करीत आहेत. ज्या वनांत शीतल, मंद, सुगंध अशा वायूंनीं वृक्षाच्या शाखा जणूं नृत्यच करीत आहेत कीं काय असा भास होतो. त्या वनांतील जमीन सोन्याच्या धूळीनें व्यापलेली आहे. त्या वनांत वृक्षांच्या तेजामुळें दिवसरात्रीचा भेद नाहीं. तेथें निरंतर प्रकाश विद्यमान असतो. वृक्षांतील शीतलतेच्या प्रभावामुळें सूर्याचे किरण संताप उत्पन्न करूं शकत नाहींत.

वनांतील कूपिका क्रीडापर्वत व महाल.

त्या वनांत कोठें त्रिकोणी, कोठें चौकोनीं अशा निर्मल व निर्जंतुक पाण्यांनीं भरलेल्या विहिरी आहेत. तिच्या पायऱ्या रत्नाच्या व तट सोन्याचे आहेत. कोठें कोठें त्या वनांत रत्नखचित अनेक क्रीडापर्वत व रत्नमयी महाल आहेत. कोठें अनेक प्रकारचे क्रीडामंडप व प्रेक्षागृहें आहेत. कोठें एक मजली, द्विमजली, त्रिमजली असे अनेक महाल आहेत. कोठें हिरव्या पांचूची भूमि इंद्रगोपरूपीं रत्नांनीं मढविलेली आहे. कोठें अतिशय निर्मल सरोवर तर कोठें नदी व कोठें अनेक जीवांचें दुःख हरण करणाऱ्या अशोकवृक्षांचें वन, तें जणूं जिनेंद्रसेवनानें आपल्या तांबड्या पानांच्या रूपानें आपल्यांतील क्रोध ओकून टाकीत आहे तर कोठें सप्तच्छद वन जणूं आपल्या सात पानांनीं भगवंताच्या सात परमस्थानाचें दिग्दर्शन करीत आहे. कोठें चंपकवन आपल्या दीपासारख्या प्रकाशमान पुष्पांनीं जणूं दीपांग जातीच्या कल्पवृक्षाच्या वनरूपानें प्रभूची सेवा करीत आहे. कोठें आम्रवन आहे तें आपल्या फांद्यावर बसून मनोहर शब्द करणाऱ्या कोकिल पक्षाच्या मिषानें जिनवराचें स्तवन करीत आहे, असा भास होतो.

अशोकवनाच्या मध्यभागीं अशोक नांवचा एक चैत्यवृक्ष आहे. तो तीन सुवर्णपीठाच्यावर आहे. त्या पीठाच्या चोहोंबाजूला तीन कोट आहेत. एकेक कोटाला चार चार दरवाजे आहेत. ते दरवाजे आठ प्रकारच्या मंगलद्रव्यांनीं व मकराकार मोत्यांच्या तोरणांनीं व माळांनीं शोभायमान दिसत आहेत. ज्याप्रमाणें जंबूद्वीपाच्या मध्यभागीं जंबूवृक्ष शोभतो तसें वनाच्या मध्यभागीं तीन पीठावर अशोक वृक्ष शोभतो. त्याच्या शाखा दशदिशांत पसरलेल्या आहेत. त्यांना पाहतांच शोक नाहींसा होतो. त्या वृक्षाच्या पुष्पांच्या सुगंधानें व वृक्षाच्या विस्तारानें सर्व आकाश भरून गेलें आहे. त्याचीं पानें मरकत मण्याचीं असून हिरवीगार आहेत. पद्मरागमण्याचीं पुष्पें आहेत. सोन्याच्या शाखा आहेत. वज्राचे [ हिऱ्याचे ] बुंध आहेत. याप्रमाणें तेथील वृक्षांनीं आपल्या प्रभेनें सर्व आकाशमंडल व दाहीदिशा व्यापलेल्या आहेत.

अशोकवृक्ष.

शब्दायमान घंटांच्या नादानें भगवंताची विजयघोषणा सर्व जगाला जाहीर होत आहे. ध्वजेवरील वस्त्र वाऱ्यानें हलतांना पाहून प्रभूचें दर्शन करणाऱ्या लोकांचें पाप नाहींसें होत आहे असें दर्शित होत आहे. मोत्यांच्या घोसांनीं युक्त असें छत्रत्रय भगवंताच्या शिरावर फिरत आहे. त्यावरून भगवान् त्रैलोक्याचे ईश्वर आहेत हें वचनानें न सांगतांच दृग्गोचर होत आहे.

घंटा, ध्वजा व छत्रत्रय.

त्या अशोक वृक्षाच्या बुंधाशीं चार दिशांना चार जिनबिंबें विराजमान आहेत. त्या बिंबांचें इंद्रादिक देव येऊन प्रक्षालन व अभिषेचन करीत आहेत व इतर देव गंध, दीप, धूप, नैवेद्य, फल, अक्षत यांहीं करून पूजन करीत आहेत. त्या प्रतिमांचें प्रक्षालन क्षीरसमुद्रांतील जलानें केलें जातें. त्या प्रतिमा सुवर्णाच्या असून त्यांचे नेहमीं सुर, असुर, देवेंद्र, इंद्र, पूजन, अर्चन, स्तवन, वंदन करीत असतात. कित्येक देव अरिहंतप्रभूचें गुणस्मरण करून आनंदानें गाणीं गातात. ज्याप्रमाणें अशोकवनांत एक अशोक चैत्यवृक्ष आहे, त्याचप्रमाणें चंपक, सप्तच्छद व आम्र या वनांतही एकेक चंपक नांवचा चैत्यवृक्ष आहे. चैत्य म्हणजे जिनप्रतिमा, ही ज्याच्या मूलाशीं असते तो चैत्यवृक्ष होय. म्हणून याला चैत्यवृक्ष असें सार्थक नांव आहे. या वनाच्या शेवटल्या भागांत चारी बाजूला वेदी आहेत. ज्याला कंगुरे असतात. ज्याला कोट व कंगुरे असूनही चोहोंबाजूंनीं तट असतो त्याला वेदी म्हणतात. अशा प्रकारची वेदी त्या वनाच्या शेवटापर्यंत सोन्याची आहे. त्या वेदीला अतिशय उंच असे चार दिशांना चार रूप्याचीं दारें आहेत. त्या दरवाजावर व वेदीवर अनेक मौल्यवान् रत्नें जडलेलीं आहेत. दरवाजावर अनेक घंटा लटकाविलेल्या असून मोत्याच्या माला, झालरी व फुलांच्या माला पण लाविलेल्या आहेत. त्या द्वारांत एकशें आठ मंगलद्रव्यें रत्नांचीं आभरणें व तोरणें असल्यानें अप्रतिम शोभा प्राप्त झाली आहे. ते दरवाजे तीन खणांत असून त्यांत अनेक देव गायन, वादन व नृत्य करून प्रभूचे यश गाण्यांत तल्लीन झालेले आहेत.

अशोकवृक्षाखालीं चार जिनबिंबें.

त्या दरवाजांपुढें वेदीला चिकटूनच एक रत्नजडित सिंहासन आहे. त्याला सोन्याचे खांब असून त्यांवर अनेक रंगाच्या ध्वजा लाविलेल्या आहेत. रत्नजडित सिंहासनावरील ते सोन्याचे अप्रतिम कांतिमान् खांब अठ्यांऐंशी अंगुळ मोठे व जाड आहेत. प्रत्येक खांबांत पंचवीस धनुष्याचें अंतर आहे.

**समवसरणांतील वृक्ष वगैरेंची उंची.**

समवसरणांत असलेले सिद्धार्थवृक्ष, चैत्यवृक्ष, कोट, वन, वेदी, स्तूप, तोरणयुक्त मानस्तंभ, ध्वजा, वनांतील वृक्ष, महाल, पर्वत वगैरेंची उंची तीर्थकराच्या शरीराच्या उंचीहून बारापट अधिक आहे. कोट वेदी वगैरेंची रुंदी त्यांच्या उंचीच्या चतुर्थांशा इतकी आहे.

**ध्वजेचें प्रमाण.**

ध्वजा दहा प्रकारच्या आहेत. माला, वस्त्र, मयूर, कमल, हंस, गरुड, सिंह, बैल, हत्ती, चक्र हीं दहा चिन्हें त्यावर असतात. यापैकीं प्रत्येकी एकशें आठ एकेक दिशेला आहेत. दहा प्रकारच्या ध्वजा मिळून एक हजार ऐंशी एका दिशेच्या ध्वजा झाल्या. याप्रमाणें चार दिशांच्या चार हजार तीनशें वीस आहेत. समुद्रांतील लाटेप्रमाणें ध्वजांचीं वस्त्रें चंचल असतात. याप्रमाणें जें नांव असेल त्या आकाराचें ध्वजेवरील वस्त्र असतें. मयूर ध्वजेचें वस्त्र मयूराकार, कमल ध्वजेचें वस्त्र हजार पाकळीच्या कमलाकार, हंसाचें हंसाकार, गरुडाकार, सिंहाकार, वृषभाकार, गजाकार व चक्राकार याप्रमाणें दहा प्रकारच्या ध्वजा एका दिशेला एकशें आठ असतात. चारी दिशेला ४३२० असतात. मोहकर्माला जिंकून ज्यांनीं त्रिभुवनांत कीर्ति संपादन केली आहे अशा जिनाचीं या ध्वजा प्रशंसा करतात कीं काय असा भास होतो. या ध्वजा जेथें लाविलेल्या आहेत त्या जागेचा वलयविष्कंभ ( गोल विस्तार ) एक योजनाचा, दोहों बाजूला मिळून दोन योजन रुंदीचा आहे.

**दुसरा अर्जुन कोट.**

यानंतर अर्जुन नांवचा दुसरा सोन्याचा कोट आहे. या कोटालाही पहिल्या कोटाप्रमाणें रुप्याचे चार दरवाजे चारी बाजूला आहेत. त्या दरवाजांतही पहिल्या कोटांतील दरवाजाप्रमाणें मंगलद्रव्यें, रत्नांचीं तोरणें, पुष्पांच्या माळा, मौल्यवान् वस्त्रें वगैरे सर्व आहे. हे दरवाजेही तीन खणात असून आंतल्या बाजूला दोहों बाजूला दोन नाट्यशाला व दोन धूपघट महावीथीच्या मागच्या बाजूला आहेत.

**कल्पवृक्ष.**

यापुढें दोन्ही बाजूनें एक योजन रुंद जमिनीचा विस्तार महावीथीचा आहे. तेथें अनेक रत्नमयी कल्पवृक्षांचें वन चोहोंबाजूनीं आहे. त्याला थंडगार सावली व फलपुष्पें यांनीं अप्रतिम शोभा प्राप्त झाली आहे. दहा प्रकारच्या कल्पवृक्षांच्या वनाचें स्वरूप धारण करून देवकुरु व उत्तरकुरु भोगभूमीच त्याठिकाणीं भगवंताची सेवा करण्याकरितां प्राप्त झाली कीं काय असा भास होतो. कल्पवृक्षाचीं आभरणें, फुलें वगैरे पदार्थांची जगांत फार महती आहे. त्या वृक्षाच्या खालीं बसणारे देव आपल्या स्वर्ग स्थानाला विसरून चिरकाल तेथेंच राहूं इच्छितात. ज्योतिरंग, जातीच्या कल्पवृक्षाखालीं ज्योतिषवासी

दीपांग-कल्पवृक्षाखालीं कल्पवासी, स्रगङ्ग-कल्पवृक्षाखालीं भावनेंद्र हे यथायोग्य बसून विश्रान्ति घेत आहेत. या चार बाजूंच्या वनांत सर्वांच्या मध्यभागीं एकेक सिद्धार्थ वृक्ष आहे. त्याच्या मूलाशीं सिद्धप्रतिमा विराजमान आहे. जसें पूर्वी चैत्यवृक्षाचें वर्णन केलें तसेंच या वृक्षाचेंही समजावें. यांत फरक इतकाच आहे कीं, या कल्पवृक्षांत संकल्पित पदार्थ पुरविण्याची शक्ति आहे. या कल्पवृक्षाच्या वनांत कोठें विहीर, कोठें नदी, कोठें रत्नांच्या धूळीचें वाळूसारखें मैदान, कोठें सभागृह, कोठें मोठमोठे वाडे, इत्याद्यनेक विश्रामस्थानें आहेत.

या वनवीथीच्या आंतल्या बाजूला एक रुप्याची वनवेदी आहे. तिला उंच असे तीन तीन खणाचे चार दरवाजे आहेत व पूर्ववेदिप्रमाणें तोरण, आभरण, मंगलद्रव्यें वगैरे सर्व सामग्री पण आहे. त्या दरवाजाच्या आंत गेले असतां चोहोंबाजूला देवशिल्पकारांनीं रचिलेले सर्वांगसुंदर मोठमोठे प्रासाद आहेत. त्यांत सुवर्णाचे खांब व हिऱ्याची भूमि आहे. चंद्रकान्त मण्याच्या त्या प्रासादाच्या भिंती असून त्यांवर नाना तऱ्हेचीं रत्नें जडवून अप्रतिम शोभा आणिली आहे. त्या प्रासादांपैकीं कित्येक दोन खणाचे, कित्येक तीन व कित्येक चार खणाचे आहेत. कित्येक प्रासादावर चंद्रशाला म्हणजे अतिशय उंच असा शिखराकार मजला आहे. याप्रमाणें ते प्रासाद आपापल्या निर्मल प्रभेमध्यें जणूं बुडून गेले आहेत. कित्येक आपल्या उज्ज्वल शिखराच्या द्वारें चंद्राच्या चांदणीचीच जणूं शोभा उत्पन्न करीत आहेत. त्याठिकाणीं पुष्कळ शिखरें असलेले कांहीं महाल आहेत. कांहीं सभागृह आहेत. कांहीं नाट्यशाला आहेत. कांहीं शयन गृहें आहेत. त्या गृहाला चंद्रकान्त मण्याच्या पायऱ्या आहेत. अशा त्या अनेक महालामध्यें विद्याधर, सिद्ध, गंधर्व, पन्नग, किन्नर या जातीचे देव मोठ्या आदरानें जिनेंद्रगुणसंकीर्तन करीत आहेत. कित्येक वाद्यें वाजवीत आहेत. नाना तऱ्हेचीं वाद्यें तेथ विद्यमान आहेत. त्या वाद्यांनीं तें स्थल शब्दमय होऊन गेलें आहे. कोणी तेथें नृत्य करीत आहे. कोणी मुखावाटें जयजयकार शब्दाचें उच्चारण करीत आहेत.

**प्रासाद.**

त्या अनेक प्रासादांच्या मध्यभागीं नऊ स्तूप (बुरूज) आहेत. ते पद्मराग मण्याचे असून आकाशाला भेदूं पाहणारे फार उंच आहेत. त्यावरून सर्व देवमनुष्यांच्या मनांतील अनुराग हाच स्तूपाकार होऊन जन्मला कीं काय असा भास होत आहे. त्या स्तूपावर दोंहीबाजूला अरिहंतांचीं व सिद्धांचीं प्रतिबिंबें आहेत. ते स्तूप इतके उंच आहेत कीं त्यांनीं आपल्या उंचीनें आकाशाला देखील प्रतिबंध करण्याचा बेत केला असावा. अशा प्रकारच्या त्या स्तूपाला देवविद्याधर सुमेरु पर्वतासारखें पूज्य मानतात. दुसऱ्या उच्च प्रकारच्या देवांकडून व चारण ऋद्धि धारण करणाऱ्या मुनीकडूनहि ते वंद्य आहेत. अथवा हे नऊ स्तूप नसून जिनेश्वराच्या नऊ केवललब्धीच स्तूपरूप घेऊन निर्माण झाल्या आहेत. त्या स्तूपाच्या परस्पराच्या अंतरालभागीं रत्नांची व तोरणांची पंक्ति लाविलेली आहे. ती पाहून इंद्रधनु-

**स्तूप.**

घ्याची शोभा त्या ठिकाणीं प्राप्त झाल्यासारखा भास होतो. त्या रत्नांच्या तोरणांच्या प्रभेनं आकाश-रूपी अंगण जणूं चित्रविचित्रित झालें आहे असें वाटतें. त्या स्तूपावर छत्र, पताका, ध्वजा वगैरे लाविल्या आहेत. बाजूला सर्व मंगलद्रव्यें मांडलेलीं आहेत. त्यावरील जिनप्रतिमेचा अभिषेक, पूजन, स्तवन करून भव्य जीवांना हर्षाचें भरतें येतें.

याप्रमाणें अर्द्ध योजन प्रमाणाची गोल अशी प्रासादाची व स्तूपाची भूमि उल्लंघून पुढें गेलें असतां आकाश स्फटिकमण्याचा तिसरा कोट लागतो. तो आपल्या नांवाप्रमाणें निर्मल आहे. त्याव-रून असा भास होतो कीं, जिनेंद्राच्या जवळ राहून सेवा करण्यानें जसें भव्याचें अंतःकरण निर्मल होतें, तद्वत् हा कोटही प्रभूच्या सांनिध्यानें स्फटिकासारखा निर्मळ झाला असावा. त्या स्फटिककोटाच्या चार दिशांना पद्मरागमण्याचे चार उंच दरवाजे आहेत. ते दरवाजे जणू भव्यजनांच्या अंतःकरणांतील रागाचे पुंजच असावेत असें वाटतें. या द्वारांत पूर्वी वर्णिल्याप्रमाणें मंगलद्रव्यें वगैरे आहेत. दरवाजाच्या जवळच देदीप्यमान व गंभीर असे नऊ निधि आहेत. तीन्ही कोटांच्या दरवा-जांत हातांत गदा धारण करून देव उभे आहेत. पहिल्या कोटाचे व्यंतरदेव, दुसऱ्या कोटाचे भवनवासी देव व तिसऱ्या स्फटिककोटाचे कल्पवासी देव द्वारपाल आहेत.

तिसरा स्फटिक मण्याचा कोट.

या कोटापासून गंधकुटीच्या पहिल्या खालच्या भागाच्या सिंहासनापर्यंत लांब सोळा भिंती आहेत. त्या भिंतीही स्फटिकाच्या रचिलेल्या आहेत व त्यांची कांति फारच देदीप्यमान आहे. पहिल्या सिंहासनाच्या खालच्या भागापासून स्फटिककोटापर्यंत असलेल्या सोळा भिंती इतक्या निर्मल आहेत कीं, त्या अतिशय स्वच्छ असल्यामुळें आपल्या डोळ्याला दिसत नाहींत. चोहोंकडे आकाशच पसरलें आहे असें वाटतें. त्या भिंतीला हाताचा स्पर्श करावा तेव्हांच त्याचें ज्ञान व्हावयाचें. त्या ठिकाणची भूमि ही भगवंताच्या ज्ञानबिंबाप्रमाणें निर्मल व सर्व वस्तूंचें प्रतिबिंब दाखविणारी आहे. या सोळा भिंतीच्या मध्यमार्गीं सोळा दारें असून, त्यांतून चार मोठे रस्ते (महावीथ) गेले आहेत. त्या महावीथीच्या मध्यभागीं बारा सभास्थानें आहेत. स्फटिकमण्याच्या अतिशय निर्मल भिंतीमुळें सभास्थान व भिंती यांचा भेद दिसून येत नाहीं. त्या भिंतीवर रत्नाचे सोळा खांब असलेला स्फटिकमण्याचा अतिशय उंच असा श्रीमंडप आहे. तो एक योजन लांबरुंद असून गोल व शोभायमान आहे. त्या मंडपांत सुरासुर-मनुष्यादिकांना वंद्य श्रीपरमेश्वर विराजमान आहेत, म्हणून त्याला श्रीमंडप नांव यथार्थ आहे. तो मंडप स्फटिकमण्याचा असल्यामुळें त्यांतून आकाशाचा सर्व भाग दिसून येतो. त्या मंडपानें त्रिज-गांतील लोकसमूहाला निर्बाध स्थान दिल्यामुळें मोठें वैभव संपादन केलें आहे. त्या मंडपावर गुह्यकदेवांनीं पुष्पांच्या माला लटकाविल्या आहेत. मंडपाच्या मध्यभागीं त्या सोडलेल्या असल्यानें देवमनुष्यांना त्या माला नसून तो तारासमूह असावा अशी शंका उत्पन्न

स्फटिकाच्या सोळा भिंती.

श्रीमंडप.

होत आहे. एक योजन प्रमाण त्या श्रीमंडपांत देव, मनुष्य, परस्परांना अडथळा न आणतां आनंदानें बसतात.

त्या मंडपाच्या मध्यभागीं एक वैडूर्यमण्याचें [ वैडूर्यमणि हा मोराच्या कंठाच्या वर्णासारखा निळा असतो ] आठ धनुष्य उंच असें सिंहासन आहे. त्याला सोळा कोन आहेत. प्रत्येक कोन्यांत चढण्या करितां सोळा सोळा पायऱ्या आहेत. या पहिल्या सिंहासनाच्या चोहों-बाजूला चार महावीथी [ रस्ते ] एकेक कोस रुंद व धूलिशाल कोटापासून नीट या सिंहासनापर्यंत लांब गेलेले आहेत. सोळा पायऱ्या चढून पहिल्या सिंहासनावर जावें लागतें. नंतर देवमनुष्यांना आपापल्या स्थानीं जाऊन बसण्याकरितां पुनः सोळा पायऱ्या उतरून आपल्या कोठ्याकडे जावें लागतें. पहिल्या पीठाभोंवतीं आठ मंगलद्रव्यें ठेऊन त्याला शोभा आणली आहे. त्या पीठावर अतिशय उंच असें यक्षांनीं आपल्या डोक्यावर चतुर्मुख धर्मचक्र धारण केलें आहे. त्या धर्मचक्राच्या एक हजार रत्नमयी आऱ्यांच्या प्रभेनें जणूं काय प्रथम पीठ हाच एक उदयाचल पर्वत असून त्यावर सूर्याचें प्रतिबिंब उदयाला आलें आहे असा भास होतो. त्या प्रथम पीठावर दुसरें सोन्याचें पीठ आहे. ते सूर्यकांतीप्रमाणें सर्व आकाशाला प्रदीप्त करीत आहे. त्या दुसऱ्या पीठावर आठ ध्वजा आहेत. चक्र, हत्ती, वृषभ, कमल, वस्त्र, सिंह, गरुड व माला यांचीं चिन्हें असलेल्या आठ ध्वजा आहेत. वाऱ्यानें त्या हलत असून पापरूपी रजाला उडवून देत आहेत. त्या पीठावर आपल्या रत्नकांतीनें अंधकाराला दूर करणारें तिसरें रत्नाचें पीठ आहे. याप्रमाणें संपूर्ण रत्नमयी त्रिमेखलमय पीठाचें रूप धारण करून भगवंताची उपासना करण्याकरितां जणूं सुमेरु पर्वतच आला आहे कीं काय असें वाटतें.

मध्य भागांतील वैडूर्य सिंहासन.

आतां समवसरणाचा विस्तार पहा. धूलिशाल कोटापासून खंदकापर्यंत गोल व्यास एक योजनाचा. पूर्व विहीरीच्या वेदीपर्यंत वलयव्यास एक योजन, अशोक वगैरे वनांचा वलयव्यास एक योजन, ध्वजेच्या तलभूमीचा व्यास एक योजन, कल्पवृक्षाच्या वनांचा वलयव्यास एक योजन, प्रासादपंक्तीचा वलयव्यास अर्द्ध योजन, एकूण एका दिशेला साडेपांच योजन व्यास झाला. दोन्ही दिशांला अकरा योजन व्यास झाला. याशिवाय स्फटिक कोटांत असलेल्या श्रीमंडपांतील भूमीचा विस्तार एक योजनाचा मिळून बारा योजन समवसरणाच्या भूमीचा विस्तार आहे. श्रीमंडपांतील स्फटिकमय कोटापासून गंधकुटीच्या खालच्या सिंहासनापर्यंत सभेची भूमि एक कोस, दोन्ही दिशांची मिळून दोन कोस. मध्यभागीं तीन कटनी (थर) असलेलें सिंहासन दोन कोस रुंदीचें, त्यांत वरल्या तिसऱ्या पीठाची रुंदी १००० धनुष्य, दुसऱ्या पीठाची ७५० धनुष्य एका बाजूला, दोंहोबाजूची मिळून रुंदी १५०० धनुष्य व तिसऱ्या पीठाची एका बाजूची ७५० धनुष्य व दोहोंबाजूची मिळून १५०० धनुष्य आहे व मधला विस्तार एक योजन आहे. पहिलें सिंहासन जमिनीपासून आठ धनुष्य उंच असून त्यावर चार धनुष्य उंचीचें दुसरें सिंहासन, त्यावर चार धनुष्य उंचीचें

समवसरणाचा विस्तार.

तिसरें सिंहासन आहे. बाजूला चाहोंबाजूंनीं एक योजन रुंदीचा मोठा रस्ता आहे. त्याच्या दोन बाजूच्या भिंती पहिल्या सिंहासनाच्या उंची इतक्या आहेत. त्या भिंतीची जाडी उंचीच्या आठव्या भागाइतकी म्हणजे एक धनुष्याची आहे. बारा सभेच्या बारा भिंतीही आठ धनुष्य उंचीच्या व एक धनुष्य रुंदीच्या आहेत. तिसऱ्या सिंहासनावर अनेक प्रकारच्या रत्नांचे ढीग पडलेले असल्यानें त्यांतून इंद्रधनुष्याची शोभा उत्पन्न होत आहे. तसेंच इंद्रांनीं अनेक रंगांचीं पुष्पें टाकून अपूर्व शोभा आणिली आहे. एक हजार धनुष्य प्रमाणाच्या त्या तिसऱ्या गोल सिंहासनावर सहाशें धनुष्य लांबरुंद चौकोनी रत्नखचित गंधकुटी कुबेरानें बनविली आहे. ती रुंदीहून अधिक उंच असून तिचें रचनेच प्रमाण फारच उत्तम साधलेलें आहे. तिच्या सभोंवती उंच कोट असून अनेक प्रकारच्या रत्नप्रभेनें आकाशाला शोभविणारें शिखर आहे. अतिशय उंच अशा त्या शिखरावर ध्वजा उभारलेली आहे. ती जणूं देवांना आमंत्रणच करीत आहे. मोठमोठ्या वाटोळ्या पाणीदार मोत्यांच्या झालरी चोंहोंकडे लाविलेल्या आहेत. मधून मधून कोठें रत्नाच्या झालरी लटकाविलेल्या दिसून येतात. चोंहोंबाजूंनीं भरजरीचे उंची वस्त्राचे रत्नजडित पडदे सोडले आहेत. कल्पवृक्षाच्या सुगंधित फुलांच्या माळा चोंहोंबाजूंनीं लाविल्या आहेत. जगांतील सर्व सुगंधी पदार्थ, फुलें, धूप, वगैरे पदार्थांहून अधिक अशा जिनेश्वराच्या अंगच्या सुगंधानें दाही दिशा भरून गेल्या आहेत व म्हणूनच इला गंधकुटी असें नांव आहे. ही गंधकुटी म्हणजे शोभेची व सुगंधाची त्रैलोक्यांतील शेवटची मर्यादा आहे. याहून उत्कृष्ट पदार्थ दुसरा नाहीं. सहाशें धनुष्य प्रमाणाच्या चौकोन गंधकुटीच्या मध्यभागीं एक योजन उंचीचें एक सिंहासन आहे. त्याची कांति व सौंदर्य अवर्णनीय आहे. त्या सिंहासनावर चार अंगुळें अधर; सिंहासनाला स्पर्श न करितां जिनेंद्र भगवान् विराजमान आहेत. त्यांना इंद्रादिक देव परमभक्तीनें साष्टांग नमस्कार करून पूजन–स्तवन करितात. त्या द्वादशयोजन सभेंत देव हेच कोणी मेघ, हे कल्पवृक्षाच्या पुष्परूपानें वृष्टि करीत आहेत. एक योजन प्रमाणाच्या श्रीमंडपावर रत्नांचा अशोकवृक्ष चोंहोंबाजूंनीं पसरलेला आहे. त्या अशोकवृक्षाला मरकतमण्याचीं हिरवीगार पानें व नानाप्रकारच्या रत्नांचीं फुलें आहेत. वाऱ्यानें हळु हळु हालणाऱ्या त्या वृक्षाच्या शाखा पाहून जणूं त्या नृत्य करीत आहेत असा भास होतो. मदोन्मत्त कोकिलांचा व भ्रमरांचा शब्द जणूं जिनेंद्राचें गुणस्तवन करीत आहे. कल्पवृक्ष आपल्या एक योजन प्रमाणाच्या शाखांनीं संपूर्ण जीवांचें जणूं दुःख नाहींसें करीत आहे. दाही दिशा त्या वृक्षाच्या डहाळ्यांनीं आच्छादिल्या आहेत. त्या वृक्षांचें बुंध हिऱ्याचें असून रत्नांचीं फुलें त्यास आलेलीं आहेत. दैदीप्यमान् छत्रत्रयांनीं आपल्या निर्मलतेनें सूर्यचंद्राच्या प्रभेचा तिरस्कार करून त्रैलोक्यांतील अद्‌भुत पदार्थांच्या प्रभेला जिंकलें आहे. त्या छत्राला मोत्याच्या झालरी लाविलेल्या आहेत. तें छत्र जणूं त्रैलोक्याच्या लक्ष्मीचें हास्य आहे, अथवा धर्मरूप राजाचा त्रैलोक्याला आनंद देणारा हर्ष आहे, अथवा मोहाचा नाश केल्यामुळें उत्पन्न झालेला प्रभूच्या यशाचा समूह आहे अशी कल्पना उत्पन्न करीत आहे. जिनेंद्राच्या बाजूला उभे राहून यक्ष ६४ चवऱ्या वारीत आहेत.

त्या चवऱ्या जणूं क्षीरसमुद्रांतील लाटांची पंक्ति किंवा अमृताचे थेंब किंवा चंद्राच्या किरणांचे समूहच आहेत कीं काय असा भास उत्पन्न करीत आहेत. अथवा चामराचें रूप धारण करून भगवंताची सेवा करण्याकरितां गंगानदीच आली आहे अथवा ती जिनेश्वराच्या अंगाची कांतीच आहे अथवा क्षीरसमुद्राच्या फेसांची पंक्ति वाऱ्यानें हालत आहे, अथवा आकाशांतून खाली येणाऱ्या हंसाची पंक्ति आहे, अथवा प्रभूचें निर्मल यश जणूं चोंहों दिशांना पसरलें आहे असें वाटतें. त्या समवसरणांत वाजत असलेले देवदुंदुभि पाहून आकाशांत कोणी मेघच आले असावेत अशी शंका उत्पन्न होत आहे व ते आपल्या अमृतासारख्या मधुर शब्दांनीं कानाला तृप्त करीत आहेत. देवलोकांतील अनेक जातींचीं वाद्यें अनेक प्रकारच्या ध्वनीनें सर्व दिशा दणाणून टाकीत असतां मेघाची गर्जनाच जणूं सर्व लोकांत होत असावी असा भास उत्पन्न होत आहे. अथवा भगवंतांनीं मोहाला जिंकिलें त्याचा हा विजयध्वनि असावा असें वाटून सर्व लोकांचीं अंतःकरणें आनंदानें भरून येत आहेत. जिनेश्वराच्या शरीराच्या अद्भुत शोभेनें सर्व समवसरण व्यापून गेलें आहे व ती प्रभा पाहून सुर, असुर, मनुष्य, इंद्र या सर्वांना अतिशय आश्चर्य उत्पन्न होत आहे. त्या प्रभेनें सूर्याच्या तेजाला लोपून टाकलें आहे, ती प्रभा कल्पवासी कोट्यवधि देवांच्या प्रभेला आच्छादून टाकीत असतां तिची सर्व जगांत ख्याति व्हावी व तिला अप्रतिम उत्कृष्टता प्राप्त व्हावी यांत आश्चर्य कसलें! जिनेश्वराच्या देहरूपी अमृतसमुद्रांमध्यें देव, दानव, मनुष्य आपापले सात जन्म पाहत आहेत. चंद्राची कांति थंडी उत्पन्न करते. सूर्याची कांति संताप देते. पण जिनदेवाच्या देहाच्या कांतीनें जडता नाहींशी होऊन संताप न होतां ज्ञानाचा प्रकाश होतो व अद्वितीय सुखाची प्राप्ति होते. भगवंताच्या मुखकमलापासून मेघगर्जनेप्रमाणें दिव्यध्वनि प्रगट होत असतो. तो भव्य जीवांच्या अंतःकरणांत वसत असलेला मोहांधकार सूर्यासारखा दूर करून अनेकान्तस्वरूपीं पदार्थाचा प्रकाश करतो. याशिवाय त्या वाणींतला विशेष म्हणजे, ती एकरूपाने भगवंताच्या मुखावाटे निघून सर्व प्रकारच्या मनुष्यांना व पशूंना त्यांच्या स्वभाषेसारखी बनून अंतःकरणांत प्रवेश करते हा होय. तिचा अंतःकरणांत प्रवेश होतांच विपरीत ज्ञान नाहींसें होऊन यथार्थ तत्त्वज्ञानाचा प्रकाश पडतो. जसें पाण्याचा प्रवाह एकस्वरूपाचा असून तो अनेक प्रकारच्या वृक्षांच्या मूलाशीं पोंचला असतां अनेक प्रकारच्या फलांना उत्पन्न करतो, तसें सर्वज्ञाचा ध्वनिही अनेक श्रोत्यांच्या कर्णपुटांत जाऊन जसजशी पात्रता असेल तदनुरूप अनेक फल घेऊन फलीभूत होतो. कित्येक या ध्वनींत नाना भाषा-स्वभाव पाहून हा देवकृत गुण असावा असें म्हणतात, परंतु तें योग्य नाहीं. कारण दिव्यध्वनि अक्षरयुक्त आहे. अक्षरसमूहाशिवाय अक्षरज्ञान कसें होईल? असो. याप्रमाणें आठ प्रातिहार्यांच्या विभूतीनें युक्त गंधकुटीवर अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतवीर्य, अनंतसुखाला धारण करणारे पूर्व-दिशोन्मुख वा उत्तर दिशोन्मुख भगवान् अरिहंत परमेष्ठी विराजमान आहेत.

गंधकुटीच्या (प्रदक्षिणारूप) पहिल्या सभेंत गणधर व मुनीश्वर बसतात. दुसऱ्या सभेंत कल्पवासी

देवांच्या स्त्रिया; तिसऱ्या सभेंत (गणिनीयुक्त) अर्जिका व मनुष्य स्त्रिया; चौथ्या सभेंत चक्रवर्ती व मनुष्य पांचव्या सभेंत ज्योतिषवासी देवांच्या स्त्रिया; सहाव्या सभेंत व्यंतरदेवांच्या स्त्रिया; सातव्या सभेंत भवनवासी देवी; आठव्या सभेंत भवनवासी देव; नवव्या सभेंत व्यंतरदेव; दहाव्या सभेंत ज्योतिषवासी देव; अकराव्या सभेंत कल्पवासी देव आणि बाराव्या सभेंत तिर्यंच. याप्रमाणें बारा सभेंतील सर्व जीव जिनेंद्राच्या भक्तिरसानें नम्र होऊन उपदेशरूप धर्मामृताचें पान करतात. भगवंतांनीं घाति-कर्मांचा नाश केल्यामुळें त्यांना क्षुधा, तृषा, जन्म, मरण, जरा, रोग, शोक, भय, विस्मय, अरति, चिंता, स्वेद, खेद, मद, मोह, निद्रा, राग आणि द्वेष या अठरा दोषांचा अभाव झालेला आहे. ज्या अठरा दोषांनीं संसारांत यच्चयावत् प्राण्यांना व्यापून टाकिलें आहे त्या दोषांचा नाश झाल्यामुळें अनंतसुखरूप परमात्मा, परमपूज्य जिनेश्वर, अनंतगुणांनीं कोट्यवधि सूर्यासारखे प्रकाशणारे, अनेक अतिशयांनीं युक्त, अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतवीर्य व अनंतसुख धारण करून विराजमान आहेत. याप्रमाणें अरहंताच्या स्वरूपाचें ध्यान करणें याला रूपस्थध्यान म्हणतात.

बारा सभेची रचना.

जो पुरुष स्वतः वीतराग बनून वीतरागपरमेष्ठीचें स्मरण करतो तो कर्मबंधनापासून मुक्त होतो. पण जो स्वतः रागद्वेषयुक्त बनून सरागी परमेश्वराच्या स्वरूपाला अवलंबून त्यांचें ध्यान करतो अथवा मंत्र, मंडल, मुद्रा वगैरे अनेक प्रयोगांनीं ध्यान करूं इच्छितो, त्याला आत्म्याची एकाग्रता केल्यामुळें फार मोठें सामर्थ्य प्राप्त होतें. तो एका क्षणांत सुर, असुर, मनुष्यांच्या समूहाला क्षोभित करून टाकतो. विद्यानुवादामध्यें अनेक विद्या, मंत्र, मंडल वगैरेंच्या अक्षरांशीं आत्म्याची एकाग्रता झाल्यानें त्या अक्षरांत तशी शक्ति उत्पन्न होतें. त्यापासून अनेक अद्भुत चमत्कार करून दाखवितां येतात. पदार्थांचा आत्म्याशीं संयोग होऊन एकाग्रता झाली असतां, त्या संयोगांत असें अलौकिक सामर्थ्य उत्पन्न होत असतें. हा वस्तुस्वभाव असल्यामुळें तो कोणी दूर करूं शकत नाहीं.

एकाग्रतेचें सामर्थ्य.

कांहीं पुद्गल परमाणूंचा संयोग झाला असतां कित्येक पदार्थांत विषशक्ति उत्पन्न होते व कित्येक पदार्थांत अमृतशक्ति उत्पन्न होते, कित्येक पदार्थांत शरीराचा स्पर्श होतांच विकार दूर करण्याची शक्ति उत्पन्न होते, कित्येक पदार्थ भक्षण केलें असतां प्राण हरण केले जातात. कित्येक पदार्थांच्या भक्षणानें अमृतासारखी जीवनशक्ति प्राप्त होते. याचप्रमाणें वचनामध्येंही अचिंत्य सामर्थ्य आहे. त्यायोगानें आत्म्यांत क्रोधादिक विकार उत्पन्न होतात अथवा त्या भाषणाचें श्रवण करण्यापासून आजन्म कषाय नाहींसे होतात. मंत्रोच्चारणापासून विषबाधा नाहींशी होते, अथवा उत्पन्न करता येते.

वचनशक्तिचें सामर्थ्य.

याचप्रमाणें मनाच्या एकाग्रतेनें ध्यान उत्पन्न होतें. त्यांतही अकल्पित सामर्थ्य आहे. स्वर्ग-

मोक्षाला कारण ध्यानच आहे. असंख्यात ध्यानें अशीं आहेत कीं तीं मौजेकरतां केलीं जातात. पण त्यापासून इष्ट फलप्राप्ति न होतां कुमार्ग-प्रवृत्तीची वृद्धि होते. अतएव तीं सर्व दुर्गतीचीं कारण बनून कुध्यानें म्हणविलीं जातात. आत्मा हा स्वभावतः अनंतशक्ति धारण करणारा आहे. त्याला जसजसें बाह्य निमित्त प्राप्त होईल तसतसें त्यांत परिणमन होत जातें. म्हणून जिनधर्मानुयायांनीं खोटें ध्यान, कुमंत्र, मंडल, साधनादि क्रिया करण्याचें स्वप्नांत देखिल मनांत आणूं नये. कुध्यानाच्या प्रभावानें यथार्थ मार्गापासून भ्रष्ट व्हावें लागतें. एकदा कुबुद्धि प्राप्त झाली कीं सद्बुद्धिचा नाश होतो. मग अनेक जन्म गेले तरी निर्मलबुद्धि प्राप्त होत नाहीं व मिथ्यामार्ग जो गळ्यांत अडकला तो सुटत नाहीं. सन्मार्गापासून च्युत झाले असतां असंख्यात जन्मांत सम्यक्बुद्धि प्राप्त होत नाहीं. जिनसिद्धान्ताचा निर्मल उपदेश, अंतःकरणांत विपरीत बुद्धि जागृत असल्यामुळें लागू पडत नाहीं. खोटे मंत्र, तंत्र वगैरे सर्व आत्म्याचा नाश करणारे असून रागद्वेषांची वृद्धि करणारे आहेत. गृहीतमिथ्यात्वी जीव, कुध्यान, खोटे मंत्र, मंडल, मुद्रा, यंत्र, तंत्रप्रयोग यांहींकरून रागी, द्वेषी, कामी, क्रोधी अशा व्यंतरवासी, भवनवासी, ज्योतिषवासी देव–देवी, यक्षिणी वगैरेची आराधना करीत असतात. संसारांत विषयोपभोग प्राप्त व्हावें, धन मिळावें व अभिमान वाढावा वगैरे कषायांच्या खोट्या आशा पूर्ण होण्याकरितां आर्तध्यान करून पूर्वी संपादन केलेलें सर्व पुण्य नाहींसें करतात.

कुध्यान करूं नका.

विषयकषायाची इच्छा हीच दुर्गतीला पोहोंचविणारी आहे. पुनः त्यांत खोट्या विद्या, खोटे मंत्र वगैरेचें ध्यान करण्याची भर पडलीं म्हणजे आत्म्यामध्यें मिथ्यात्व कषायांचें दृढ आरोपण होतें. यापासून निगोदामध्यें अनंतकाल भ्रमण करावें लागतें. बुद्धिमान् पुरुषांनीं असें ध्यान, चिंतन व आचरण करावें कीं, त्यापासून जीव कर्मबंधनापासून मुक्त होईल. जे शांतचित्त, मंदकषायी, निर्वांछक, संतोषी व मोक्षमार्गावलंबी आहेत त्यांना विद्यामंत्रतंत्रमंडलादिकांच्या साधनाशिवाय स्वयमेव अनेक ऋद्धि व सिद्धि प्राप्त होतात. या उलट ज्यांना तीव्र इच्छा आहे त्यांना पुण्यसंचय नसल्यानें इच्छित वस्तुफल प्राप्ति होत नाहींच, पण मंत्रतंत्राचें साधन करीत असूनही अनेक संकटें प्राप्त होतात. याकरितां वीतरागधर्मावर भरंवसा असणाऱ्या लोकांनीं कधीही खोट्या मंत्रतंत्रादिकांचा विचार मनांत आणूं नये व त्यांची प्रशंसा करूं नये.

खोट्या मंत्रतंत्राच्या नादीं लागूं नका.

शरीरादि नोकर्म व ज्ञानावरणादि अष्टकर्म–रहित, चैतन्य स्वरूपात्मक, निजानंदमय, शुद्ध, अमूर्त, अविनाशी, अजन्मा, स्पर्शरसगंधवर्णादि पुद्गल–विकार–रहित, अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतसुख व अनंतशक्ति-चतुष्टय युक्त, स्वस्वभावाधीन, निराकुल, अतीन्द्रिय, सिद्ध व कृतकृत्य अशा आत्म्याच्या स्वभावाचे मनांत चिंतन करणें हें रूपातीत ध्यान आहे. यद्यपि चित्ताची एकाग्रता करणें याला ध्यान म्हटलें आहे तथापि सिद्धपरमेष्ठीचे गुण व स्वरूप ध्यानामध्यें अवलोकून अनन्यशरण होऊन तत्स्व-

रूपातीत ध्यान.

रूपांत लीन होऊन जाणें हें देखिल धर्मध्यान आहे. सिद्धपरमेष्ठीचे गुण आपल्या स्वभावांत उत्त-रविणें अथवा तत्स्वरूपी आपण आहोंत अशी भावना करणें हेंच परमात्मचिंतनांत लीन होणें आहे. परमात्म्यांत व आपल्यांत गुणदृष्टीनें समानता आहे. आमचे गुण कर्मांनीं आच्छादिलेले आहेत. कर्मांचा अभाव झाल्यानें सिद्धपरमेष्ठींचे सर्व गुण प्रगट झाले आहेत. याप्रमाणें ध्यान करण्याचा निरंतर अभ्यास ठेवल्यानें आत्म्यांत पूर्ण निश्चलता प्राप्त होते व सिद्धांचा स्वभाव त्याला प्रत्यक्ष भासूं लागतो. अशी एकतानता करणाऱ्यालाच रूपातीत ध्यान होतें.

## शुक्लध्यान

यापुढें शुक्लध्यानाचा विचार करूं. जरी शुक्लध्यानांत होणाऱ्या निर्मल परिणामांचा अंश देखिल आपणांस प्रत्यक्ष होत नाहीं तरी शास्त्रानुसार त्यांचें थोडक्यांत स्वरूप वर्णन करण्याचें योजिलें आहे. शुक्लध्यानाचे चार प्रकार आहेत. त्यांतून पहिलीं दोन ध्यानें चौदापूर्व व द्वादशांग वाणीला धारण करणाऱ्या मुनीला होतात व दुसरीं दोन ध्यानें केवली भगवंताला होतात. पृथक्त्व वितर्कवीचार, एकत्ववितर्कावीचार, सूक्ष्मक्रियाप्रतिपाति आणि व्युपरतक्रियानिवर्ति अशीं तीं चार होत. यांतून

शुक्लध्यानाचे चार प्रकार.

पहिलें शुक्लध्यान हें मनवचनकायेचे तीन्ही योग असतांना होणारें आहे. दुसर फक्त एकच योग असतांना होतें. तिसरें ध्यान एक काययोग असतांना होतें व चौथें ध्यान अयोगी केवलींना होतें. पहिलें शुक्लध्यान सवितर्क म्हणजे श्रुतज्ञानाचे शब्द व अर्थ यांना अवलंबून होत असतें. त्यांत सवी-चार म्हणजे अर्थाची पलटणी, शब्दाची पलटणी, योगाची पलटणी होत असते. म्हणून त्याला सवितर्कसवीचार म्हटलें आहे. याप्रमाणें अनेक शब्द व अर्थ व योगांची पलटणी ज्यांत होते त्याला पहिलें पृथक्त्ववितर्कवीचार शुक्लध्यान म्हणतात.

दुसरें शुक्लध्यान श्रुताचा एक शब्द, एक अर्थ व एक योग याला अवलंबून होतें. एक वेळ जो अर्थ अथवा शब्द अवलंबिला त्यांत पलटणी होत नाहीं. म्हणून याला एकत्ववितर्कावीचार म्हणतात. यांत वितर्क हें श्रुतज्ञानाला व वीचार हें अर्थाच्या, व्यंजनाच्या व योगांच्या संक्रान्तीला म्हणजे पलटणीला म्हटलें आहे. अर्थ म्हणजे ध्यान करण्यायोग्य पदार्थ अर्थात् ध्येय, म्हणजे द्रव्य वा पर्याय हे होत. व्यंजन म्हणजे वचन. योग म्हणजे मनवचनकायेची हलनचलन क्रिया. संक्रान्ति म्हणजे परिवर्तन. द्रव्याला सोडून पर्यायाचा विचार करणें, पर्याय सोडून द्रव्याचा विचार करणें याला अर्थसंक्रान्ति म्हणतात. श्रुताच्या एका शब्दाला ग्रहण करून पुनः श्रुताच्या दुसऱ्या शब्दाला ग्रहण करणें, दुसरा शब्द सोडून तिसऱ्या शब्दाचें अवलंबन करणें ही व्यंजनसंक्रान्ति होय. याच प्रमाणें काय-योगाशिवाय इतर योग ग्रहण करणें ही योगसंक्रान्ति आहे. अशा प्रकारचें परिवर्तन होणें याला वीचार म्हणावयाचें. याप्रमाणें सामान्य विशेष प्रकारानें सांगितलेलें चार प्रकारचें शुक्ल-ध्यान, संसाराचा पूर्णपणें अभाव होण्यासाठीं मुनीश्वरांना होत असतें.

असाध्य रोग उत्पन्न झाला नसेल, स्मरणशक्ति, ज्ञान वगैरेंना नष्ट करणारें म्हातारपण ज्याला प्राप्त झालें नसेल, दशलाक्षणिक धर्म पाळण्याची शरीरांत ताकत असेल, त्यानें आहाराचा त्याग करून सल्लेखना धारण करूं नये. शरीरानें धर्मसाधन होत असूनही जो अन्नपाणी सोडून मरण ओढून घेतो तो धर्मपराङ्मुख होतो. मनुष्यपर्यायांत व्रत, शील, संयम वगैरे साधनें मोक्ष प्राप्त करून घेण्यासाठीं उपलब्ध झालीं असूनही शरीरावर वैतागून, आयुष्य असतांना जो धर्मसेवनापासून पराङ्मुख होऊन आहाराचा त्याग करितो त्याला आत्मघात घडतो. कारण, शरीर हें धर्माचें परमसाधन आहे. त्याचें संरक्षण काळजीपूर्वक केलें पाहिजे, अशी भगवंताची आज्ञा आहे. धर्माचें साधनरूप शरीराला जर अन्नपाणी न देतां मारून टाकलें, तर पुढें देवनरकतिर्यंच यांतून कोणत्याही योनींत याची प्राप्ति होणारी नाहीं. देवनरकतिर्यंच योनींत शरीर प्राप्त झालें तरी तें संयम, व्रत, शील, धर्म साध्य करून घेण्यास उपयोगी पडेल अशी त्याची रचना नाहीं. ती अनुकूलता फक्त मनुष्य शरीरामध्येंच आहे. अशा स्थितींत शरीराचें योग्यरीतीनें पोषण न करतां विनाकारण आहाराशिवाय नाहींसें करून टाकलें तर त्यांत कोणतीही कार्यसिद्धि होणार नाहीं. हें शरीर गेलें तर पुनः ज्यांत व्रतधर्म साधतां येणार नाहीं असें दुसरें प्राप्त होईल, म्हणून धर्मसाधन न करतां शरीराचा नाश करूं नये.

सुदृढ स्थितींत शरीराचा त्याग करूं नये.

अनंतानंत शरीरें धारण करविण्यास कारणीभूत असें जें कर्ममय शरीर ( कार्मण देह ) त्याला व मिथ्यात्व, असंयम, कषाय वगैरे विकारांना आधीं नाहींसें केलें पाहिजे. आहारादिकांचा त्याग केल्यानें हाडामांसानें भरलेला हा औदारिक देह नाहींसा होईल, पण पुनः दुसरा प्राप्त होईलच. त्याऐवजीं अष्टकर्मरूप देहाचा नाश केला तर जन्ममरणापासून सुटका होईल. म्हणून तो कर्ममय देह अगोदर नाहींसा करावा व व्रत, तप, संयमादिकांत दृढता धारण करून आत्म्याचें कल्याण करावें. ज्यावेळीं हें शरीर धर्मपालन करण्यास असमर्थ आहे असें दिसून येईल त्यावेळीं त्यावरील प्रेम सोडावें. कारण नाशवंत पदार्थावरील प्रेम करण्यांत मतलब नाहीं.

कर्ममय शरीराचा त्याग आधीं करावा.

याप्रमाणें कायसल्लेखना कशी व कोणत्या तऱ्हेनें करावी हें सांगितलें. याचप्रमाणें रागद्वेष-मोहादिक कषायांनाही शरीराबरोबर कृश करणें याला कषायसल्लेखना म्हणतात. कषायसल्लेखना करतां आल्याशिवाय अथवा केल्याशिवाय कायसल्लेखना करणें व्यर्थ आहे. शरीर कृश करणें हें रोगी, दरिद्री व पराधीन पुरुषांना देखिल साध्य आहे. यांत मोठासा पुरुषार्थ नाहीं. शरीर कृश करीत असतां त्याबरोबरच रागद्वेष-मोहादिकांना कृश करीत जाणें म्हणजे हे विकार अंतःकरणांत उत्पन्न होऊं न देणें यांतच खरा पुरुषार्थ आहे. हा पुरुषार्थ जे साधतात ते व इहपरलोकसंबंधीं सर्व इच्छांचा अभाव व मरणकालीं शरीर, कुटुंब, परिग्रहादिक संपूर्ण पदार्थावरील ममत्व नाहींसें करितात व वीतरागभावानें

कषाय सल्लेखना.

संयम धारण करून मरण प्राप्त करून घेतात. हीच खरी कषायसल्लेखना म्हणावी.

विषयकषायांना जिंकणारा असेल त्यालाच समाधिमरण साधण्याची योग्यता आहे. जो विषयासक्त व कषायाधीन आहे त्याला कधींही ती प्राप्त होणार नाहीं. संसारी जीवांमध्यें विषय आणि कषाय हेच मुख्यत्वेंकरून वास करीत असतात. अचाट सामर्थ्य धारण करणाऱ्या पराक्रमी पुरुषांना देखिल यांना जिंकता येत नाहीं. या विषयकषायांनीं आजपर्यंत या पृथ्वीवर अतुलबल धारण करणाऱ्या बलभद्र, नारायण, चक्रवर्ती पुरुषांना दुर्बल करून ठेवलें आहे व सर्वांना आपल्या अंकित करून ठेवलें आहे. हे दोन महान् बलिष्ठ आहेत. संसारांतील यच्चयावत् दुःखें विषयलंपटी, लोभी व अभिमानीं पुरुषांना प्राप्त होतात. कित्येक जीव जिनदीक्षा धारण करून विषयांच्या संतापानें त्यापासून भ्रष्ट होतात. त्यांचा अभिमान व लोभ सुटत नाहीं. अनादिकालापासून या विषयांची वासना चालत आली असल्यानें त्यापासून क्षणमात्रही त्यांना पराङ्मुख होणें अतिशय दुःखदायक वाटतें. वरचेवर कषायांची प्रज्वलता वाढत जाते त्यामुळें स्वस्वरूपाचा विसर पडतो.

विषयकषाय जिंकावे.

आत्मस्वरूपाचें व विषयांच्या स्वरूपाचें सविस्तर वर्णन 'भगवती आराधना' नामक ग्रंथांत सांगितलें आहे तेथून विशेष जिज्ञासूंनीं पाहावें. तो ग्रंथ 'शिवायन नामक' आचार्यांनीं रचलेला आहे. वीतरागी होऊं इच्छिणाऱ्या पुरुषाला त्या ग्रंथाच्या अवलोकनानें फार फायदा होणार आहे. समाधिमरणाच्या प्रसंगीं जीवाचें कल्याण करणाऱ्या उपदेशरूप अमृताचा सहस्र धारांनीं वर्षाव करणारा तो ग्रंथ आहे. त्याचा अवश्य स्वाध्याय करावा. येथें त्याच ग्रंथाच्या आधारानें थोडक्यांत समाधिमरणाचें स्वरूप सांगितलें आहे.

भगवती आराधना ग्रंथ अवश्य वाचावा.

साधूंना रत्नत्रयधर्माचें रक्षण करण्यास सहायभूत असा आचार्यांचा संघ आणि वैयावृत्य करून धर्मोपदेश देणाऱ्या निर्यापक मुनींचा फार मोठा उपयोग आहे. कारण त्यांचें साहाय्य मिळालें तरच कर्माला जिंकून आराधनेंत सावधानचित्त राहतां येतें. याचप्रमाणें गृहस्थांनाही धर्मवान्, श्रद्धाळू व ज्ञानवान् अशा श्रावकाचें साहाय्य अवश्य असलें पाहिजे व त्यानें मोठा प्रयत्न करून तें मिळविलें पाहिजे. पंचमकालांत विषयानुरागी व कषायी जीवांची संगतीच विपुल असल्यानें नेहमीं राग, द्वेष, शोक, भय उत्पन्न करणाऱ्या आर्तरौद्रध्यानाची उत्पत्ति होणें फार सुलभ झालें आहे. कारण स्त्री, पुत्र, मित्र, बांधवादिक सर्व आपापल्या मतलबांत राजी असल्यानें ते दुसऱ्यांना आपणाकरितां पाप करावयास लावून आत्मस्वरूपाची भुरळ पाडतात. सर्व आपापले विषयकषाय पुष्ट करण्यांत मग्न झालेले आहेत म्हणून धर्मप्रेमी, परोपकारी, वात्सल्य धारण करणारे आणि करुणरसानें ओथंबलेल्या गृहस्थांचा संयोग प्राप्त होणें ही मोठ्या पुण्यसंचयाची गोष्ट आहे. तथापि हरप्रयत्न करून अशा पुरुषांची संगति प्राप्त करून घ्यावी.

धर्मवान् व्रती गृहस्थांचा श्रावकानें सहवास घ्यावा.

मोहपाशांत गळा अडकावून आपण मोकळे राहणाऱ्या धर्मभ्रष्ट कुटुंबीजनांचा संगम होईल तितक्या त्वरेनें सोडावा. पराधीनपणामुळें जर कुसंगत येऊन मिळाली व तिचा प्रतिकार करणें आपणांस अशक्य दिसलें, तर त्या पुरुषाशीं भाषण करण्याचें टाळून मौन धारण करून बसावें. आपल्या कर्मानुसार व देशकालानुरूप आपणांस जें स्थान राहण्यास प्राप्त झालें असेल त्याठिकाणीं आसन, शयनादिक करावें. नेहमीं अंतःकरणांत जिनसूत्राचें चिंतन करून परम वीतराग गुरूला शरण जावें.

धर्मभ्रष्टांची संगति सोडावी.

सिद्धान्ताचा उपदेश धर्मवान् गृहस्थाच्या मुखानें श्रवण करावा. व्रत, उपोषणें, संयम, ध्यान व भावना यांचें चिंतन करण्याचें सोडूं नये. धर्मात्मा जीव स्वतःची व इतरांची धर्मपुष्टि करण्याची इच्छा बाळगतात व धर्माची प्रभावना व्हावी म्हणून धर्मोपदेश, वैयावृत्य वगैरे क्रिया करण्यांत तत्पर असतात. याविषयीं ते कधींही आळस करीत नाहींत. त्याग, व्रत, संयम, शुभध्यान व शुभभावना यांतच इतरांचें व आपलें लक्ष्य लावतात. कदाचित् एखाद्याला असें चिंतन करीत असतां कर्माच्या तीव्र उदयानें रोग, क्षुधा, तृषा, वगैरे परीषह प्राप्त झाले व ते त्यास सहन होत नसल्यानें त्यापासून ढळण्याच्या बेतांत असला तर त्यावेळीं त्यास ते धर्मभावनेंत स्थिर करतात.

धर्मवान् गृहस्थाचा उपदेश श्रवण करावा.

कदाचित् कोणी रोगवेदनेनें व्याकुळ होऊन रडूं लागला तरी त्यावेळीं त्याचा तिरस्कार करून त्याला मर्मी लागेल असें भाषण न करतां मिष्टभाषणांनीं संतुष्ट करावें. अगोदरच वेदनेनें त्याचे परिणाम चंचल झालेले व त्यांत तिरस्काराचे शब्द जर त्याच्या कानीं पडले तर त्याला तीव्र मानसिक दुःख होऊन दुर्ध्यान घडतें. तो आपल्या व्रतापासून ढळून उलट वाईट आचरणाकडे प्रवृत्त होतो. अथवा कधीं कधीं तर आत्मघात देखील करण्यास तयार होतो. म्हणून आराधक पुरुषाचा धिक्कार किंवा तिरस्कार करूं नये. उपदेश देणाऱ्यानें धैर्य धरून त्याला मोठ्या प्रेमानें वागवावें. गोड बोलून त्याचें अंतःकरण आपल्याकडे आकर्षण करून घ्यावें. सहज रीतीनें असा उपदेश करावा कीं, तो ऐकतांच त्याला सर्व दुःखाचीं क्षणभर तरी विस्मृति व्हावी. नेहमीं करुणरसानें भरलेलें व उपकारबुद्धि दिसून येईल असेंच भाषण मुखावाटे उच्चारावें तें असें—

रोगपीडितांचा तिरस्कार करूं नये.

" हे आराधक पुरुषा ! धर्मेच्छु ! सावध ऐस. पूर्व कर्माच्या उदयानें तुला रोगवेदना होत आहेत. तुला परीषह प्राप्त झाल्यामुळें तीव्र दुःख होत आहे. तुझें शरीर अतिशय निर्बल झालें आहे. आयुष्य पूर्ण होण्याची वेळ जवळ आली आहे. त्याअर्थी तूं आतां घाबरूं नकोस. भय सोडून धैर्य धारण कर. भयभीत झालास अथवा दैन्य धारण केलेंस म्हणून असाता कर्माला थोडीच दया येणार आहे ? तुला प्राप्त झालेलें दुःख कोणासही नाहींसें करतां येणार नाहीं. असाता कर्माचा उदय नाहीसा करून साता कर्माचा उदय आणून देण्यास कोणी इंद्र, धरणेंद्र, अहमिंद्र किंवा साक्षात्

रोग्याला असा उपदेश द्यावा.

जिनेंद्र देखिल समर्थ नाहीं. असें असतां विनाकारण ही भीति तूं आपल्या मनांत बाळगली आहेस ती व्यर्थ आहे. या भित्रेपणामुळें तुझे दोन्ही लोक बिघडून जातील व धर्मापासून पराङ्मुख व्हावें लागेल. त्याऐवजीं धैर्य ठेवशील व व्याकुलता न करतां आलेलें कर्म भोगशील तर पूर्वकर्माची निंजरा होऊन नवीन कर्म बांधलें जाणार नाहीं.

प्रतिज्ञाभंग करूं नये.

तूं जैनधर्म धारण केला असें म्हणवितोस. त्यागी, व्रती पुरुषांमध्यें श्रेष्ठ म्हणून तुझी मान्यता आहे, सर्व लोक तुला मोठा ज्ञानी समजतात. सध्यां अस्तित्वांत असलेल्या धर्मधारक पुरुषांत तुझी प्रख्याति आहे. त्वां व्रत ग्रहण केलें आहेस. यथाशक्ति व्रतसंयमाची प्रतिज्ञा त्वां धारण केली आहेस. आतां ती प्रतिज्ञा रोगवेदनेनें व्याकुळ होऊन मोडूं पाहतोस. यामुळें तुझी जगांत अपकीर्ति होईल व परलोकही बिघडेल. याशिवाय इतर जे तुझे धर्मबंधु व धर्म यांवरही अपकीर्तिचा ठपका येईल, तुझें आचरण पाहून दुसरे भोळे लोकही याचप्रमाणें संकटसमयीं प्रतिज्ञाभंग करूं पाहतील. ज्याप्रमाणें क्षत्रिय कुलांत उत्पन्न झालेला महान् सेनापति रणसंग्रामाच्या मोठमोठ्या गोष्टी सांगून, शत्रु समोर येतांच घाबरून पळूं लागला तर इतर सैन्याची काय अवस्था होईल ? त्यांनीं सेनापति गेल्यावर कोठवर धैर्य धरावें ? कदाचित् या संकटांतून प्रतिज्ञाभंग करून जगलास तरी ज्यांत लोकनिंदा व धिक्कार सहन करावा लागेल. तरी असें जिणें काय उपयोगाचें ? याचप्रमाणें प्रथमतः त्वां त्यागसंयमव्रताची प्रतिज्ञा ग्रहण केली व ती आतां सोडण्यास तयार झाल्यानें तुझी जगांत मोठी अपकीर्ति होईल.

वेदनेचें भय बाळगूं नये.

याशिवाय अशुभकर्म नाहींसें होईल असेंही नाहीं. पुढें याहूनही अधिक दुःख देणाऱ्या अशुभ कर्माचा बंध बांधला जाईल. त्याची असंख्यात कालाची मर्यादा असेल व तोपर्यंत याहूनही अधिक दुःख भोगावें लागेल. यापूर्वी तूं,'मी जैनधर्माचा परमभक्त आहे, जिनेंद्राची आज्ञा पालन करणें हें माझें कर्तव्य आहे व म्हणून ह्या व्रताचरणादिक क्रिया मी ग्रहण करणार. जें ज्ञान, आचरण अनंत जन्मांत दुर्लभ तें मला वीतराग गुरूंच्या प्रसादानें यावेळीं प्राप्त झालें आहे तें मी कसें टाकूं !' असा निश्चय केला होता. असें असून आतां रोगापासून वेदना होऊं लागल्यामुळें मन चंचल होऊं देणें लाजिरवाणें आहे. ज्या वेदनेचें इतकें भय वाटतें आहे त्यापासून अखेर काय होणार ? मरण प्राप्त होईल ! एवढेंच ना ! तें कधींतरीं एकवेळीं येणारच आहे. ज्यानें देह धारण केला आहे त्याला मरण हें अवश्य यावयाचेंच. परंतु या प्रसंगीं वीतराग गुरूंनीं उपदेशिलेल्या व्रतसंयमाचा भयानें त्याग न करतां चार आराधनांना शरण जाऊन मरण प्राप्त करून घेतलें तर यासारखा दुसरा फायदा नाहीं. त्रैलोक्याची विभूति जरी एकवेळ प्राप्त झाली तरी तीही नाशवंत असून पराधीन आहे. पण ही आराधनेची विभूति अथवा संपत्ति अविनाशी असून अनंतसुख प्राप्त करून देणारी आहे. *जें समाधिमरण प्राप्त व्हावें म्हणून मुनि, आचार्य, उपाध्याय इच्छा करीत असतात व सम्यग्दृष्टी जीवांनाही तसेंच वाटत असतें व तुम्हीही पण इच्छित आहां, तें प्राप्त होण्याचा काळ नजीक*

आला आहे तरी याहून श्रेष्ठ आनंद तो कोणता ? त्यांतून वरचेवर या रोगाच्या वेदना वाढत आहेत ही मोठी कृपाच समजावी. कारण यापासून तुमचें शरीरावरील प्रेम नाहींसें होत जाईल. पूर्वी ज्या असाता कर्माचा बंध केलेला होता त्याचा थोड्यावेळांत नाश होऊन जाईल आणि दुःख व रोगांनीं भरलेल्या या शरीररूपीं कैदखान्यांतून तुमची सुटका होईल. विषयोपभोगादिकांपासून विरक्ति उत्पन्न होईल, परद्रव्यावरील ममत्व घटेल, मरणाचें भय राहणार नाहीं, पुत्रमित्रबांधवादिकांवरील ममता कमी होईल. याप्रमाणें अनेक उपकाराच्या गोष्टी वेदनेपासून उत्पन्न होतील. वेदनेमुळें भयभीत झालांत तरी त्यापासून उलट दुःखच वाढणार, कर्माचा उदय टळणार नाहीं. मग विनाकारण धैर्य सोडून काय उपयोग ? याप्रसंगीं धैर्य धारण केलें तर कर्म जिंकतां येईल.

ज्याला कर्माला जिंकतां येईल तोच शूर म्हणविला जाईल. या प्रसंगीं तुम्ही रडाल, तडफड कराल, कासाविस कराल तर कर्म तुम्हाला मारून टाकून तिर्यंचादिक कुगतीला नेऊन पोंचवील.

**शूर कोण ?**

तेथें अनंत दुःख भोगावें लागेल. ज्यायोगें तुमचें कुल, जाति आणि धर्म यांची कीर्ति वाढेल व तुम्हाला दुःख होणार नाहीं असेंच वर्तन यावेळीं तुम्ही ठेवलें पाहिजे. जे शौर्यशाली क्षत्रिय कुलांत उत्पन्न झाले आहेत ते रणभूमीवर शत्रूकडून कसाही जोराचा आघात झाला तरी तो सहन करतात. शत्रूला पाठ दाखवून रणांतून पळून जात नाहींत. प्रसंगीं आपला प्राण देखिल देतात पण पाठ दाखवीत नाहींत. याचप्रमाणें परमवीतराग गुरूला शरण गेलेल्या शूर पुरुषानें अशुभ कर्माचा प्रहार झाला म्हणून देह सोडावा, पण दैन्य दाखवून अशुभ कर्माला हार जाऊं नये. कित्येक जैन साधूंना दुष्ट वैऱ्यांनीं अरण्यामध्यें समाधिस्थ असतांना चोहोंबाजूनीं अग्नि लावून दिला. त्याप्रसंगीं ते साधु त्या अग्नींत अनेक प्रकारच्या वेदना भोगिते झाले. त्यावेळीं त्यांनीं मनांत असा विचार आणला कीं, " आपल्यामागें हें कर्माचें ऋण लागलें आहे, त्याचा यावेळीं फडशा होत आहे, म्हणून आपण घाबरून धैर्य सोडूं नये. " याप्रमाणें वचनाला अगोचर अशा वेदना त्यांनीं सोशिल्या. पंचपरमगुरूला शरण जाऊन मोठ्या धैर्यानें त्या वेदना सहन करीत अग्नींत जळून भस्म झाले, पण भयभीत होऊन व्रताचा त्याग करून पळून गेले नाहींत. असा आत्मज्ञानाचा प्रभाव आहे.

ज्यानें या शरीराहून भिन्न, अविनाशी, अखंड, ज्ञानस्वभावी आत्म्याचा अनुभव घेतला आहे त्यालाच अशी निष्कंप निर्भय वृत्ति प्राप्त होत असते. अज्ञानी लोकही परलोक प्राप्त व्हावा एतदर्थ

**निर्भय बना.**

मोठमोठ्या संकटाच्या प्रसंगीं धैर्य ठेवतात. कितीही भयंकर वेदना शरीरांत होत असल्या तरी त्या जुमानीत नाहींत. मग तुम्ही तर संसारांतील सर्व दुःखांचा नाश व्हावा म्हणून जैनधर्म धारण केला आहे. *तुम्हांला भय वाळगून आपल्या आत्म्याचें अकल्याण करून, जगांत अपकीर्तिला पात्र होऊन, दुर्गतीला पात्र कसें होतां येईल ? याचा विचार करून आतां सावध व्हा.* धर्माला शरण जाऊन कर्मजनित वेदनेला जिंका. असा प्रसंग पुनः अनंत जन्मांत कधीं प्राप्त होणार नाहीं. सध्यां तुमची नाव तीराला

लागलेली आहे असें समजा. यावेळीं यांतून उतरण्याचा आळस कराल तर ती संसारसमुद्रांत बुडून जाईल. सर्व आयुष्यभर मोठमोठे ग्रंथ वाचून जें ज्ञान आजवर संपादन केलें, आपले विचार निर्मल केले, तप, त्याग, नियम धारण केले ते सर्व ह्या प्रसंग प्राप्त व्हावा म्हणूनच. आतां तो प्रसंग प्राप्त झाला असतां वेदनेनें घाबरें होऊन भ्रष्ट व्हाल तर रोग किंवा वेदना नाहींशा होणार नाहींत. मरण हें तर टळणार नाहींच. मग आपल्या आत्म्याला दुर्गतिरूप अंधकूपांत विनाकारण कां बुडवितां !

संन्यास–मरण दुर्धर रोगांत संन्यास घ्यावा.

ज्यावेळीं देशांत एखाद्या रोगाची साथ उत्पन्न होते, भयंकर दुष्काळ पडतो, क्वचित् प्रसंगीं एखाद्या निर्जन अरण्यांत आपला चुकून प्रवेश होतो, कधीं अनिवार्य संकट प्राप्त होतें, भयंकर रोग शरीरांत उत्पन्न होतो त्यावेळीं उत्तम कुलांत उत्पन्न झालेले लोक संन्यास करण्यास उद्युक्त होतात. हवेचा उपद्रव शहरांत सुरू झाला असतां त्याचें आपणाला भय वाटूं नये म्हणून दारु पिणें, दुर्भिक्ष प्राप्त झालें असतां अन्नाच्या अभावीं मांस भक्षणास तयार होणें, कंदमूल वगैरे अभक्ष्य पदार्थ भक्षण करणें, कोणी जबरदस्ती केली असतां भिऊन धर्मांतर करणें, हिंसादिक पंचमहापापासारखीं कुकर्मे करणें वगैरे प्रकारचें आचरण करूं नये. असें आचरण नीच पुरुषानींच करणें योग्य आहे. जैनधर्मानुयायी श्रावकानें रोगादिकांपासून तीव्र वेदना होत असतांनादेखिल आपल्या विचारांत फेर पडूं देऊं नये. अनंतकालपर्यंत ग्रहण केलेला धर्म, व्रत, त्याग, नियम हे निःसंशय यथाविधि पाळले जातीलच असा मनाचा पक्का निश्चय ठेवावा. मरणकालीं देखिल आपले विचार पवित्र राहिले, आचरणांत, ज्ञानांत फरक पडला नाहीं असें सर्व लोकांस आपल्या कृतीवरून दिसून आल, तरच तुमची जगांत खरी कीर्ति होईल. अशा निर्मल क्रियेपासून उच्च अशा देवकुलांत जन्म होईल. ज्यानें अनेक प्राणविघातक संकटप्रसंगीं आपले विचार बदलले नाहींत, आचरणांत दोष येऊं दिला नाहीं, उलट मेरुपर्वताप्रमाणें निश्चल वृत्ति धारण केली किंवा समुद्राप्रमाणें गंभीरता धरिली त्यांचीच जगांतील उत्तम पुरुषांत गणना होते. म्हणून समाधिमरण साधू इच्छिणारांना आचार्यांनीं निक्षून सांगितलें आहे कीं, 'तुम्ही रोगवेदनेन व्याकुळ होऊं नका. या शरीराहून आत्मा अत्यंत भिन्न आहे, त्याच्या ज्ञानस्वभावाचें स्मरण करा. तीव्र वेदनेच्या व्यथा होऊं लागल्या असतां पूर्वीं होऊन गेलेल्या धर्मवान् पुरुषांनीं धैर्य धारण करून कस आचरण ठेविलें होतें त्याचा विचार मनांत आणा.

पूर्वीं अनेक साधूंना, मुनींना सिंह, वाघ वगैरे दुष्ट व क्रूर पशूंनीं आपल्या नखांनीं विदीर्ण केलें तरी ज्यांनीं आपल्या आत्म्याचें चिंतन सोडिलें नाहीं, त्याहून कोणत्या अधिक वेदना तुम्हाला सोसाव्या लागत आहेत हें तरी ताडून पहा. अतिशय कोमल ज्याचें शरीर व तत्काल दीक्षा ग्रहण केलेल्या सुकुमार स्वामीला एका कोल्हणीनें आपल्या दोन पिलांसह तीन दिवसरात्रिपर्यंत पायापासून भक्षण करण्यास प्रारंभ केला व जेव्हां कोल्हणीन लांडगीनें पोट फाडिलें तेव्हां सुकुमार स्वामींनीं प्राणोत्सर्ग केला. तोंपर्यंत आपलें ध्यान सोडिलें नाहीं. अशा प्रकारचे भयंकर उपसर्ग

पूर्वकालीन महात्म्यांचीं उदाहरणें.

सहन केले व अचाट धैर्य धारण करून आपलें कल्याण करून घेतलें. अशा पुरुषापुढें तुम्हांला ज्या यत्किंचित् वेदना होतात त्याचा काय पाड ?

सुकोशल स्वामीला, त्यांच्या आईचा जीव जो वाघीण होऊन जन्मला होता, त्यानें भक्षण केलें असतां ते आपल्या व्रतापासून ढळले नाहींत, त्यापुढें तुमच्या वेदना किती दुःसह असतील ?

गजकुमार स्वामीला त्यांच्या शत्रूंनीं सर्वांगांत खिळे ठोकिले तरी ते आपल्या व्रतापासून ढळले नाहींत, त्याहून तुम्हांस वेदना जास्त होत आहेत काय ?

सनत्कुमार नामक मुनींच्या शरीरांत खोकला, ज्वर, शोष, क्षुधेची तीव्र वेदना, ओकारी, नेत्रशूल, उदर वगैरे अनेक रोग उत्पन्न झाले. त्यांची वेदना त्यांनीं शंभर वर्षेपर्यंत साम्यभावानें सोशिली पण धैर्य सोडून घेतलेल्या व्रतापासून डगले नाहींत. त्याहूनही तुम्हांला अधिक वेदना होत आहेत काय ?

एणिकपुत्रांना कोणी दुष्टानें गंगानदींत नावेंत बसवून बुडविलें तरी त्यांनीं आराधना सोडिली नाहीं त्याहून तुम्हाला अधिक दुःख आहे काय ?

भद्रबाहु मुनींना तीव्र क्षुधेची व्याधि जडली. त्यांनीं अवमोदर्य तपाची प्रतिज्ञा केली होती. क्षुधेचें दुःख होत असून तें आपल्या आराधनेपासून रतिमात्र ढळले नाहींत. त्यापुढें तुमच्या वेदना कितीशा असतील ?

ललितघटा नावान प्रसिद्ध असणारे बत्तीस मुनि कौसांबी नदीच्या प्रवाहांत वाहून गेले तरी ध्यानच्युत झाले नाहींत.

चंपानगरीच्या बाहेरच्या बाजूला असणाऱ्या गंगानदीच्या तीरावर धर्मघोष मुनींनीं एक महिन्याच्या उपोषणाची प्रतिज्ञा केली होती. त्यांचें क्षुधेच्या तीव्र वेदनेनें प्राणोत्क्रमण झालें, पण त्यांनीं व्रतभंग केला नाहीं. त्यापुढें तुमच्या वेदना कितीशा होतील ?

श्रीदत्त मुनींना पूर्वजन्मीच्या वैरामुळें एका देवानें विक्रियाऋद्धीनें भयकर शीत वेदना दिली, तरी ते मुनि न डगतां आपलें ध्यान न सोडतां निश्चल राहिले त्यामुळें मोक्षाला गेले.

वृषभसेन मुनींना उन्हानें तापलेल्या दगडावर बसून ऊष्णवायूच्या लहरींनीं व प्रखर सूर्य-किरणांनीं अतिशय त्रास झाला, तरी त्यामुळें त्यांनीं आपली आराधना सोडिली नाहीं.

रोहेड नामक शहरांत अग्निराजाच्या कार्तिकेय पुत्राला क्रौंच नामक त्याच्या शत्रूंनीं शस्त्रांनीं मारिलें, त्यावेळीं त्यान कायोत्सर्ग ध्यान धरून त्या वेदना अत्यंत शांतभावानें सोशिल्या.

काकंदी शहरांतील अभयघोष नामक मुनीच्या शरीराचे चंडवेग नामक वैऱ्यानें तुकडे केले, तरी त्या वेदनेमुळें ते भयभीत होऊन आराधना सोडण्यास उद्यक्त झाले नाहींत म्हणून मुक्तिला गेले.

विद्युच्चर नामक चोराला तपश्चरणाचे वेळीं डांस आणि मच्छरांनीं सर्वांगाला भयंकर दंश केला तरी दुःखानें कातर होऊन त्यांनीं ध्यान सोडिलें नाहीं म्हणून त्यांची सद्गति झाली.

चिलातिपुत्र नामक मुनीला पूर्वजन्मीच्या वैऱ्यांनीं शस्त्रांनीं शरीरावर आघात केले. त्या आघा-

ताच्या घावेंत मोठमोठे किडे उत्पन्न झाले व त्यांनी सर्वांगाला चाळणीसारखी भोकं पाडिलीं तरी त्या सर्व वेदना त्यांनीं अत्यंत शांत परिणामांनीं सोसून उत्तम गति प्राप्त करून घेतली.

दंड नामक मुनीला यमुनावक्र नामक त्यांच्या शत्रूनें बाणांनी वेधिलें. त्या बाणाची शरीरांत तीव्र वेदना होत असतांही त्यांनीं शांतभावानें ती सोसून आराधना साधिली.

कुंभकारकट नामक शहरांत अभिनंदनादि पांचशें मुनींना घाण्यांत घालून पिळिलें, तरी त्यांनीं आपल्या समाधीचा भंग केला नाहीं. त्यापुढें तुम्हाला होणाऱ्या वेदना किती !

चाणक्य नामक मुनीला सुबंधु नामक त्याच्या वैऱ्यानें गाईच्या गोठ्यांत कोंडून बाहेरून आग लावून जाळून टाकिलें पण त्यावेळींही त्या मुनींनीं प्रायोपगमन संन्यास धारण केला होता. त्यापासून ते ढळले नाहींत.

कुलाल नामक एका गांवच्या बाह्य वनामध्यें वृषभसेनादि मुनि आपल्या संघासह उतरले होते. त्या वनाला रिष्टाम नामक कोणी दुष्ट शत्रूनें आग लाविली व त्यामुळें ते सर्व मुनि दग्ध झाले. पण आपल्या व्रतापासून ढळले नाहींत.

सारांश, याप्रमाणें अनेक भयंकर वेदना आजपर्यंत मोठमोठ्या वीरपुरुषांनीं सोसल्या आहेत. त्यांची उदाहरणें तुम्हांस ग्रंथांतून दाखवितां येतील. त्या सर्वांहून तुम्हांस ज्या वेदना होत आहेत त्या कितीशा अधिक असतील ? यावरून समाधिमरण साधू इच्छिणारांना बोध घेण्यासारखा आहे.

वर वर्णिलेले सर्व मुनि ज्यांना कोणीही साहाय्य नव्हतें, ते एकटे असून त्यांनीं आलेल्या संकटापासून परावृत्त होण्याचा विचारही मनांत आणिला नाहीं. त्यांचें दुःख दूर व्हावें म्हणून कोणी प्रयत्न करण्यासही जवळ नव्हतें. तशा प्रसंगीं न घाबरतां धैर्यानें व परमशांतभावानें त्यांनीं आराधनेचें चिंतन केलें. आतां यावेळीं तुम्हांला असह्य असा कोणता उपसर्ग येऊन प्राप्त झालेला आहे ? तुमच्या सेवेकरितां तुमचे सहधर्मी बांधव कमर कसून तयार आहेत, मग तुम्ही कां घाबरे होतां ? मागें जे मोठमोठे पुरुष होऊन गेले त्यांची सेवा करण्यास अथवा संकटकालीं साहाय्य करण्यास तरी कोण होतें काय ? त्या साधुपुरुषांवर दुष्टांनीं भयंकर उपसर्ग केले, त्यांना अग्नींत जाळलें, पर्वतावरून ढकललें, शस्त्रांनीं घाव केले, पशूंनीं भक्षिलें, पाण्यांत बुडविलें, अनेक प्रकारचे अपशब्द बोलून मन दुखविण्याचे प्रयत्न केले, तरी ज्यांनीं आपला शांत स्वभाव सोडिला नाहीं. त्यांच्या एका अंशाइतकाही उपसर्ग अद्यापि तुम्हांस प्राप्त झाला नाहीं. तुम्हाजवळ मनांत करुणा बाळगणारी, परमधर्मोपदेश देणारी सर्व मंडळी हजर आहेत. परिणामांत आकुलता उत्पन्न होईल अशी आजुबाजूची परिस्थिति नाहीं. थंडी, ऊन, पाऊस, वारा यांचा उपद्रव नाहीं, तरी तुम्ही इतके घाबरे झालां आहां, याला काय म्हणावें ? तुम्हांला फक्त कांहीं रोग व अशक्तता यापासून क्षुधातृषेची वेदना होत आहे त्याकडे तुम्ही लक्ष लावूं नका. सहधर्मीजनांच्या मुखावाटें निघणाऱ्या जिनवाणीरूपी अमृताचें पान करण्याकडे मन वळवा म्हणजे त्यापासून वेदनारूपीं विषाचें शमन होऊन मनास शांति प्राप्त होईल, परिणाम निर्मळ होतील, धर्माविषयीं उत्साह उत्पन्न होईल, पापाची

निर्जरा होईल व भय वाटणार नाहीं.

यां उलट, वेदना होत असतां तळमळ करून जो पापबंध होणार त्यापासून चतुर्गतींत कोणकोणतीं दुःखें प्राप्त होतील याचा विचार करा म्हणजे तुमच्या लक्षांत येईल कीं, संसारांत परिभ्रमण करीत असतां जीवाला कोणत्या वेदना प्राप्त झाल्यावांचून राहिल्या आहेत? अनेकवेळां क्षुधा, तृषा, वेदनेनें व्याकुळ होऊन मरावें लागलें. अनेकवेळां अग्नींत दग्ध होऊन, पाण्यांत बुडून, विषभक्षण करून, सिंह, व्याघ्र, सर्पादिक दुष्ट पशूंच्या भक्ष्यस्थानीं पडून, पर्वताच्या अत्युच्च शिखरावरून पडून व शस्त्रघातांनीं मरावें लागलें आहे. आतां कितीसें दुःख! याहीपेक्षां नरक-तिर्यंचगतीमध्यें जें दुःख भोगिलें आहे त्याची अवस्था फक्त सर्वज्ञच जाणण्यास समर्थ आहेत. त्याहून येथें ज्या वेदना तुम्हांस भोगाव्या लागत आहेत त्या फार कमी व थोडावेळ टिकणाऱ्या आहेत म्हणून यापासून भयभीत होऊन धैर्य सोडूं नका. कर्माच्या वश होण्यानें भयंकर वेदना चारी गतींत भोगल्या आहेत. त्याचें कोटिजिह्वांनीं वर्णन करणें अशक्य आहे. नरकांत जें दुःख प्राप्त होतें त्या नमुन्याचें दुःखच मुळीं येथें नाहीं. शास्त्रांत त्याचें वर्णन आहे त्यावरून त्याची कल्पना होते. पांचव्या नरकापर्यंतच्या बिळांत ऊष्णतेची इतकी तीव्र वेदना आहे कीं, मेरूपर्वताएवढा लोखंडाचा गोळा येथून सोडिला तर तो त्या जमिनीवर पोंहोंचण्याचे अगोदरच विरघळून जाईल. त्याहून तुम्हाला तेथें रोगाची वेदना किती अधिक होत असेल तें पहा. पांचव्या नरकाचा तिसरा भाग व सहाव्या, सातव्या पृथ्वीच्या बिळामध्यें शीत वेदना इतकी भयंकर आहे कीं त्याच लोखंडाच्या गोळ्याचे आटून बर्फाचे घट्ट दगड होतील. इतकी तीव्र वेदना जीवानें अनंतकाल तेथें भोगिली आहे. मनुष्ययोनींत ज्वर, श्वास, कास इत्यादि रोगाची व क्षुधातृषेची वेदना, ऊष्णकाळांत होणारी व शीतकालांत शीतज्वरापासून होणारी वेदना कितीशी असणार? ती थोडावेळ राहून नाहींशी होणारी आहे. म्हणून धर्मधारक व ममत्व त्याग केलेल्या पुरुषांनीं ती अल्पवेदना शांत-भावानें सोशिली पाहिजे. हा प्रसंग प्राप्त झालेल्या वेदना समभावानें सहन करण्याचा आहे. यावेळीं जर परिणामांत क्लेश उत्पन्न होऊं दिला तर कर्माचा उदय तुम्हाला सोडील असें नाहीं. सुखदुःखाच्या वेदना तर सोसल्याच पाहिजेत. वेदनेनें चिडून तुम्ही अपघाताला प्रवृत्त व्हाल तर नरकांत याहून अनंतपट व असंख्यातकालपर्यंत त्या सोसाव्या लागतील.

*नरकतिर्यंच गतींतील वेदनेचें स्मरण करा.*

नारकी जीवांच्या शरीरांत पापाच्या उदयानें स्वभावतः अनेक रोगांचें वास्तव्य असतेंच. नरकांतील जमिनीचा स्पर्श हाच प्रथमतः कोट्यवधि विंचवाच्या दंशाहून अधिक भयंकर आहे. नारकी जीवांना क्षुधातृषा इतकी अचाट आहे कीं, पृथ्वींतील सर्व अन्न भक्षण केलें किंवा सर्व समुद्र प्राशन केले तरी तृप्ति होत नाहीं. पण अन्नाचा एक कण किंवा पाण्याचा एक थेंब मिळेल तर शपथ! नरकांतील पहिल्या पटलांतील मातीची इतकी भयंकर दुर्गंधी येते कीं त्यांतून एक कण जर मनुष्यलोकांत आणला तर अर्धा कोसाच्या आजुबाजूचे पंचेंद्रिय मनुष्यतिर्यंच सर्व मरण पाव-

*नरकदुःखाची कल्पना.*

तील. दुसऱ्या पटलाच्या मातीच्या दुर्गंधीनें एक कोसाच्या आजूबाजूचे मरून जातील. याप्रमाणें प्रत्येक पटलाला अर्धा अर्धा कोस वाढत वाढत सातव्या पृथ्वीच्या एकोणपन्नासव्या पटलाच्या मातींत इतकी दुर्गंधी आहे कीं त्याचा एक कण येथें आला तर साडेचोवीसकोसाच्या आजूबाजूचे पंचेंद्रिय मनुष्यतिर्यंच मरून पडतील. याचप्रमाणें नरकांतील रूपरसशब्द भयंकर आहेत. त्या सर्वांपासून होणारें दुःख सर्वज्ञाशिवाय इतरास कळणें अशक्य. अशा प्रकारचें दुःख अतिशय परिग्रह, अमर्याद आरंभ यामुळें व सप्तव्यसन, अभक्ष्यभक्षण, हिंसादिक पंचपापप्रवृत्ति, निर्माल्यभक्षण वगैरे क्रियेपासून प्राप्त होते. नारकी जीवांना मानसिक दुःखही अपार आहे. त्यांचे शरीरांत होणारें, क्षेत्रांत होणारें व परस्परांत असुराकडून उत्पन्न करविलें जाणारें दुःख वाणीनें वर्णन करण्यासारखें नाहीं. नरकांत आयुष्य पूर्ण झाल्याशिवाय मरण प्राप्त होत नाहीं. या सर्व गोष्टींचा विचार मनांत आणा.

तिर्यंच आणि मनुष्यांना पापाच्या उदयानें जें दुःख सोसावें लागतें तें तर तुम्हांला प्रत्यक्ष दिसतच आहे. त्याचें वर्णन करण्याची जरूरी नाहीं. पराधीन अशा पशूंचें दुःख म्हणजे त्यांना बोलतां न येणें, क्षुधा, तृषा, शीत-उष्ण, मारण-ताडन, अतिभारारोपण, नासिकाछेदन, रज्जुबंधन वगैरेपासून होणारें दुःख भोगावें लागतें. त्यांना स्वेच्छेनें हिंडतां, फिरतां, बसतां, उठतां येत नाहीं अथवा कोणालाही दुःख सांगण्याचा किंवा दाखविण्याचा मार्ग नाहीं; अमक्याच्या घरीं राहीन, अमक्याच्या घरीं राहणार नाहीं हें त्याच्या स्वाधीन नाहीं; चांडाल, म्लेंच्छ, कसाई वगैरे निर्दयी लोकांच्या घरीं किंवा ब्राह्मण वैश्यादिकांच्या घरीं त्यांना बांधा, दोन्ही गोष्टींत त्यांना कांहींच सांगतां येण्याचें साधन नाहीं; कोणी त्यांना अनेक प्रकारांनीं मारून पीठ पाडतात, तर कोणी त्यांना आहार-पाणी देत नाहींत; 'कोणी अगदीं थोडा आहार देऊन पुष्कळ ओझें वाहावयास लावतात. अशा स्थितींत आपल्यावर होत असलेला जुलूम कोणाजवळही जाऊन सांगण्याचें त्यांना सामर्थ्य नाहीं. कोणी दयार्द्रबुद्धीनें त्या दुःखापासून रक्षण करणारा भेटत नाहीं. नाकांत वेसण असल्यामुळें ती वरचेवर जोरानें ओढण्यांत कधीं कधीं नाक चिरून जातें, अति ओझें ओढण्यानें खांदा सडून त्यांतून मांस दिसूं लागतें, कोरड्याच्या मारानें पाठ फुटून त्यांतून रक्त वाहूं लागतें, जखमेंत कधीं कधीं किडे पडून तीव्र वेदना होऊं लागतात, तरी ओझें लादण्याचें कोणी कमी करीत नाहीं. अतिशय ओझें पाठीवर लादल्यामुळें किंवा गाडींत घातल्यामुळें तें घेऊन चालण्याची ताकद नाहीं, त्यामुळें गाडी ओढवली नाहीं किंवा चालवलें नाहीं कीं, मर्मस्थानीं कातड्याच्या वादीच्या चाबकानें किंवा लोखंडाच्या अणीनें टोंचून काठीनें घाव घातलाच समजावें. याशिवाय मुखावाटें दुःशब्द उच्चारण्याची तर सीमाच नाहीं. निष्कारण रागांत येऊन ज्या पशूला चालण्याचें सामर्थ्य नाहीं त्यांस बळेंच चालविण्यास उद्युक्त व्हावयाचें. नाकांत वेसण एवढी जबरदस्त अडकावयाची अथवा मोठ्या साखळदंडानें त्यास असें मजबूत बांधून टाकावयाचें कीं त्यांस बिलकुल हलन-चलन करतां येऊं नये. याप्रमाणें तिर्यंचांना

पशूंच्या दुःखाची कल्पना.

होणारें दुःख तुम्हांला प्रत्यक्ष दिसत आहे. त्यापुढें तुम्हांला कितीस दुःख होत असेल !

आकाशांत फिरणारे, पाण्यांत राहणारे व अरण्यांत वास्तव्य करणारे पशु–पक्षी वगैरे जीव परस्परांना भक्षण करतात. आपलें भक्ष्य शोधीत असतां कोणी पशु व कीटकपक्षी वगैरे कोठें छपून बसला असेल तर त्याला शोधून काढतात. निर्बल प्राणी बलवान् प्राण्यांच्या भक्ष्यस्थानीं पडतात. शिकार करणारे भिल्ल, पारधी वगैरे लोक अरण्यांत जाऊन हरिण वगैरे प्राणी धरून आणितात. त्यांचा वध करतात. त्यांचें मांस शिजवितात व मसाल्यांत घालून भक्षण करतात. सारांश अशा प्राण्यांवर कोण दया करतो ? पूर्वी ज्यांनीं दयाधर्म स्वीकारिला नाहीं व द्रव्यलोभानें अनेक प्रसंगीं खोटें बोलून, मायाचार योजून, विश्वासघात करून, द्रव्यसंपादन केलें त्याचें फल तिर्यंच-योनींत जन्म घेऊन भोगावें लागतें. असा मनांत विचार आणून प्राप्त झालेल्या संकटांत दुःख करण्याचें सोडून द्या.

अरण्य पशु-पक्ष्यांच्या दुःखाची कल्पना.

मनुष्ययोनींत इष्ट वियोग व अनिष्ट संयोगापासून अनंत दुःख प्राप्त होतें. याशिवाय निर्धनता, पराधीनता, बंदीगृह, अपमान, मारण, ताडन, रोग, जरा, अंधत्व, बहिरेपणा, लंगडेपणा, क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, नीचकुलांत जन्म, नीच-क्षेत्रांत जन्म, अंगोपांग झडून जाणें, इच्छित आहार प्राप्त न होणें वगैरे गोष्टीमुळें आजपर्यंत जें घोर दुःख भोगिलें त्याचें चिंतन करा व त्याहून यावेळीं तुम्हांस कोणतें दुःख अधिक आहे तें पहा.

मनुष्य दुःखाची कल्पना.

याप्रमाणें नरकतिर्यंच गतींतील दुःखाला पार नाहीं. पण पापाचा उदय प्राप्त झाला असतां मनुष्य गतींतही फार दुःख सोसावें लागतें. अज्ञानामुळें, कषाय व अभिमानाच्या वश झाल्यामुळें होणारें मानसिक दुःख कल्पना करतां येण्यासारखें नाहीं. कर्मांची शक्ति अपरिमित आहे. ज्यांचा शब्द ऐकल्याबरोबर मस्तकांत तिडिक उठते अशा महादुष्ट, अधम, निर्दयी, अन्यायमार्गी लोकांच्या संगतींमुळें रात्रंदिवस त्रास सोसावा लागतो. मनांतून भीति नाहींशी होत नाहीं. आपणावर उपकार करूं पाहणारे, आपल्यावर प्राणाहूनही अधिक प्रीति करणारे व ज्यांच्या संयोगापासून परस्परांना आपलें जीवन सार्थक झालें असें वाटतें अशा स्त्रीपुत्रमित्रांचा वियोग होण्यानें, बाल्यावस्थेंत आपल्या मुली-वर विधवा होण्याचा प्रसंग आल्यानें, आपली उपजीविका नाहींशी होण्यानें, आपलें धन लुटिलें जाण्यानें, अतिनिर्धनता प्राप्त झाल्यानें, दिवसभर कष्ट करून पोटभर अन्न देखिल न मिळण्यानें, कर्कशा स्त्री, दुराचारी पुत्र व भावाभावामध्यें वैर होण्यानें, गुणवान् मालकांचा वियोग होण्यानें, निष्कारण आपणावर खोटा कलंक आल्यानें अतिशय दुःख होतें. हे धीर पुरुषा ! याहून तुला या संन्यासप्रसंगीं जी वेदना होत आहे त्याचें दुःख अधिक वाटतें काय !

मानसिक दुःख.

कर्मोदयानें मनुष्यजन्मांत उत्पन्न होऊन अग्नींत जळून मरावें लागलें. सिंह, वाघ, सर्प वगैरे

दुष्ट प्राण्यांनीं अनेक प्रसंगीं तुम्हांला भक्षण केलें. अनेकवेळां हात, पाय, कान, नाक कापून, सुळावर चढवून डोळे व जीभ उपटून काढली आहे. याप्रमाणें मनुष्य जन्मांत अनेक प्रकारचें दुःख भोगलें. बलवान् शत्रूंनीं काठीनें, वेतानें, मुष्टिप्रहारानें, मुद्गरानें, चाबकानें, लोखंडाच्या साखळीनें व शस्त्रानें पुष्कळदां विदारण केलें. कधीं लाथा बुक्या पण खाव्या लागल्या. कधीं कधीं दळण कांडण वगैरे क्रिया पण कराव्या लागल्या. या सर्व गोष्टी पराधीनतेमुळें घडून आल्या. आतां धैर्य धरून कर्मोदयानें प्राप्त होणाऱ्या दुःखाला शांतपणानें एकवेळां भोगाल तर पुनः तुम्हाला असें पराधीनपणाचें दुःख सोसावें लागणार नाहीं.

पराधीनतेचें दुःख.

आजपर्यंत सर्व प्रकारचें रोग तुम्ही अनेकवेळां भोगले आहेत. या समयीं तुम्हाला प्राप्त झालेला रोग लौकरच नाहींसा होईल. रोगाशिवाय हें जीर्ण झालेलें व मलमूत्रांनीं भरलेलें शरीर नाहींसें होणार नाहीं व त्याशिवाय तुमची या देहावरून ममता पण कमी होणारी नाहीं. या रोगामुळेंच तुमची धर्मावर अचल प्रीति बसेल व रोगजनित वेदना हीच तुम्हांवर उपकार करण्याकरितां प्राप्त झाली आहे असें पाहून तुमचा हर्ष गगनांत मावेनासा होईल. बाबानो ! तुम्ही आजपर्यंत संसारांत जें दुःख भोगलें आहे त्याच्या अनंताव्या भागाइतकेंही सांप्रतचें दुःख नाहीं. मग यासमयीं भयभीत होऊन धर्मपराङ्मुख कां होतां ?

रोगपीडा सहन करा.

तुम्ही कर्माच्या वश होऊन चतुर्गतींत भयंकर दुःखें भोगिलीं आहेत. आतां हा धर्म धारण करून व्रतसंयम धारण केलें आहे. अशा प्रसंगीं वेदना प्राप्त होऊन दुःख होत आहे म्हणून त्याचें भय कां बाळगतां ? कर्मावेशानें आजपर्यंत जीं दुःखें सोशिलीं तींच दुःखें जर धर्म रक्षणाकरितां एकवेळ शांतभावानें भोगिलीं असती तर कर्माची निर्जरा होऊन असा प्रसंग पुनः न येता. म्हणून हे धीर पुरुषांनो ! आतां तुम्ही या समाधिमरणप्रसंगीं प्राप्त झालेल्या वेदनेमुळें भयभीत होऊं नका. निर्भय होऊन आलेला प्रसंग साम्यभावानें पार पाडा. वेदनेला भिऊन ती नाहींशी व्हावी म्हणून इलाज करूं लागाल तरी ती वेदना जोपर्यंत कर्माचा उदय प्रबल आहे तोपर्यंत नाहींशी होणार नाहीं. तुम्ही इलाज योजा वा न योजा, वेदनेवर केलेले अनेक उपाय कर्माचा उदय मंद असेल तरच उपयोगी होतात, एरव्ही होत नाहींत.

वेदनेला भिऊं नका.

कर्माच्या उदयाचा जोर असला तर मोठी शक्तिमान् औषधें देखिल आपला गुण दाखवूं शकत नाहींत. ज्यांना व्रततपश्चरणादिक क्रिया नाहींत असे लोक योग्यायोग्य आणि भक्ष्याभक्ष्य याचा विचार न करतां रात्रंदिवस मनास वाटेल तें भक्षण करीत असतात. त्यांना रोग प्राप्त झाला असतां अनेक उपाय करीत असूनही उपयोग होतो असें दिसून येत नाहीं. मग तुम्ही तर व्रततपश्चरण धारण करून अयोग्य

शक्तिमान् औषध गुण देत नाहीं.

क्रियेचा त्याग केलेले आहांत. तुम्हाला रोगामुळें वेदना होत असतां व्याकुळ होऊन त्याचा प्रति-कार करावा अशी इच्छा कां होते ? आहे ! इहलोकीं राजासारखी अनुकूल सामग्री तर दुसऱ्या कोणास उपलब्ध नाहींना ? राजे लोकांना व्रत, उपोषणें, भक्ष्याभक्ष्य, योग्यायोग्य हें पाहण्याचेंही कारण नसतें. अनेक प्रकारची हिंसा व आरंभ करण्याचीही त्यांना भीति नाहीं. त्यांच्या अंतः-करणांत दया नसते. त्यांचे पदरीं मोठमोठे धन्वंतरी असतात. हजारों रुपये खर्चून अचुक गुण दाखविणारीं अनेक औषधेंही त्या वैद्याजवळ तयार असतात. पण जेव्हां राजाला कर्माच्या प्रबल उदयानें एखादा जबरदस्त रोग प्राप्त होतो तेव्हां त्याचा उपशम करण्याचें वैद्यांचे हातून होत नाहीं. मग तुम्ही त्यागी व व्रती आहांत. तुमच्या अंतःकरणांत दया भरलेली आहे. अनेक वैयावृत्य करणारे लोक तुमच्या सेवेला हजर आहेत. ते सर्व तुमच्या वेदना नाहींशा करूं शकत नाहींत. तुम्हांस वेदना नाहींशी करण्याची इच्छा असेल तर फक्त जिनेंद्राच्या वचनरूपी औषधाचें सेवन करून परम साम्यभाव हेंच कोणी एक परम रसायन ग्रहण करा व पूर्व कर्माच्या उदयरूप रसाला शांतभावानें सहन करा, त्यामुळें अशुभकर्माचा रस नाहींसा होऊन नवीन कर्माचा बंध होणार नाहीं.

मरण हें एका पर्यायांत एक वेळ केव्हां तरी होणार आहे. पण संयमयुक्त मरण प्राप्त होण्याचा समय याच ठिकाणीं प्राप्त झाला आहे, यामुळ या प्रसंगाच फार माहात्म्य आहे. यावेळीं सावधान

**संयमयुक्त मरण पत्करा.**

पाहून हर्षानें मरण साधल्यास अनेक जन्मांत वरचेवर मरण करण्याचें कारण पडणार नाहीं व अल्पायुष्यामध्यें आर्तपरिणामांत मरण येणार नाहीं. अशुभ-कर्माच्या उदयाला प्रतिबंध करण्यास इंद्रादिक देव देखिल समर्थ नाहींत. मग हे अल्पशक्ति धारण करणारे लोक तुम्हाला कसें बचावूं शकतील ?

जो वृक्ष तोडण्याला हत्ती देखिल समर्थ नाहीं तो एखाद्या अशक्त अशा सशाकडून कसा तोडला जाईल ? ज्या नदीच्या भयंकर प्रवाहांत मोठा बलवान् हत्ती वाहून जातो त्या प्रवाहांतून

**कर्मोदय आजिंक्य आहे.**

एखादें ससें वाहत गेलें तर त्यांत आश्चर्य कसलें ? जो कर्माचा उदय तीर्थ-कर, चक्रवर्ती, नारायण, बलभद्र व इंद्रादिक देव अशा पुण्यशाली पुरु-षांनाही अजिंक्य, तो उदय तुम्हां आम्हां सारख्या सामान्य माणसाला कसा जिंकता येईल ? सारांश, अजिंक्य कर्मोदय असाता कर्माच्या उदयानें रस देत असतां क्लेश करूं नका. धैर्य धारण करून साम्यभावानें त्याची निर्जरा करा. कर्मो-दयानें दुःखी होऊन रडाल, विलाप कराल, दैन्य दाखवाल, तरी वेदना नाहींशी होणार नाहीं. ती कमी न होतां वरील उपायांनीं उलट वाढतच जाईल व व्रत, संयम, धर्म व कीर्ति यांचा नाश होईल. शिवाय आर्तध्यानांत मरण आलें तर तिर्यंचयोनींत उत्पन्न व्हावें लागेल हें निराळेंच. असा-ताचा उदय प्राप्त झाला असतां तो नाहींसा होऊन सुख प्राप्त व्हावें म्हणून विलाप करण, रडणें, दीनभाषण करणें म्हणजे वाळूंतून तेल काढण्यासारखें, पाण्यांतून लोणी काढूं पाहण्यासारखें, अथवा तांदळाकरितां भूस कांडणें यासारखें निरुपयोगी आहे. यापासून उलट तीव्र बंध होणार आहे.

एखाद्या माणसानें पूर्वावस्थेंत कोणापासून कर्ज घेतलें व तें मुदत संपतांच देऊन टाकलें म्हणजे आपल्या डोकीवरील भार कमी झाला असें तो मानतो. त्याप्रमाणें धर्मवान् पुरुषही कर्मोदयानें प्राप्त झालेले रोग, दारिद्र्य, उपसर्ग व परीषह वगैरे आले असतां त्यांची पीडा शांतपणें सहन करील व त्यापासून ऋणमुक्त झाल्यासारखें मानून दुःख न करतां आनंद मानील.

धर्मात्म्याचें संकटांत चिंतन.

'मला यावेळीं पूर्वकृत कर्म उदयाला येऊन दुःख देत आहे हें फार चांगलें झालें. कारण या प्रसंगीं मजजवळ ज्ञानरूपी धन पुष्कळ आहे. माझ्या अंतःकरणांत पंचपरमेष्ठीचें चिंतन सतत चाललेलें आहे. माझे धर्मबांधवही मला साहाय्य करण्याकरितां सज्ज आहेत. अशा समयीं माझ्या डोकीवरील कर्जाचा बोजा काढून मी सुखी होईन. कामक्रोधादि कषायापासून बांधलेलें कर्म इतकें बलवान् असतें कीं तें ऋद्धीच्या, विद्येच्या, बंधूच्या, धनसंपदेच्या, शरीराच्या व देवदानवाच्या साहाय्याला अथवा बलाला क्षणार्धांत नष्ट करून टाकतें. असें हें कर्मरूपी ऋण आहे. तें लौकर सुटत नाहीं.'

उदय अटळ आहे.

रोग, शोक, जीवन, मरण वगैरेचा दुसऱ्या कोणालाही उदय न येतां जर तुम्हालाच त्याचा उदय भोगावा लागला असतां तर दुःख करणें योग्य म्हणविलें असतें. क्षुधा, तृषा, रोग, वियोग, जन्म, जरा, मरण वगैरेचा कोणाला उदय येत नाहीं व कोणाला त्यापासून त्रास होत नाहीं ? या सर्वांचा उदय सर्व संसारी जीवाला येतो व तो सर्वांना भोगावा लागतो. एवढेंच नव्हे पण चारी गतींत कर्माचा उदय कोणालाही सुटत नाहीं. म्हणून पूर्वावस्थेंत जो बंध केला गेला त्याचा उदय प्राप्त झाला असतां आकुलता करूं नये. धैर्य धारण करून शांत परिणामांनीं कर्माला जिंकावें. सर्व दुःखांचा विजय करण्याच्या प्रसंगीं आतां कोणत्या गोष्टीबद्दल तुम्ही दुःख करीत आहां समजत नाहीं.

समाधिमरणाची इच्छा करा.

सम्यग्दृष्टी जीव तर जन्मापासून समाधिमरण प्राप्त व्हावें अशीच इच्छा करीत असतात. आतां असा कठिण व दुर्लभ अवसर प्राप्त झाला असून सर्व दुःखांचा नाश होण्याची वेळ प्राप्त झाली असतां या प्रसंगीं विषाद मनांत आणणें योग्य नाहीं. एकवेळ हा प्रसंग गेला कीं मग तो अनंत काल गेल्यानें ही पुनः प्राप्त होणारा नाहीं. अरिहंत, सिद्ध, आचार्यादिक पंचपरमेष्ठी व इतर सर्व धर्मबांधवांच्या साक्षीनें जें व्रत, संयम धारण केलें, त्याचा भंग केल्यानें पंचपरमेष्ठीवरील तुमच्या भक्तींत बट्टा लागेल, तुमच्या धर्माला दूषण लागेल, धर्ममार्गाची विराधना होईल व स्वतःचे इहपरलोक बिघडून जातील. बरें, इतकें करून तरी खात्रीपूर्वक जगण्याची तरी खात्री आहे काय ? ती तर शक्य नाहीं. एकवेळ मरण हें अवश्य प्राप्त व्हावयाचेंच. मरण आणि दुःख, व्रतसंयमाचा भंग केला म्हणून थोडेच चुकावयाचे आहेत ? जें कार्य राजाच्या, पंचाच्या व देवाच्या साक्षीनें करण्याचा अंगीकार केला तें प्रसंगीं न केलें तर त्याबद्दल राजापाशीं गुन्हा घडतो, जगांत तिरस्कार होतो, परलोकीं अनंतकाल-

पर्यंत जन्ममरण, रोग, शोक, वियोग वगैरे दुःखाला पात्र व्हावें लागतें. जी गोष्ट सोडिली अथवा जें व्रत ग्रहण केलें त्याचा भंग करणें हा महान् अपराध समजला जातो. ज्यानें कोणतेंही व्रत पत्करिलें नाहीं तो अनादि संसारीच असतो. त्याला व्रतसंयमाची कधीं प्राप्ति झालेलीच नसते. पण ज्यानें व्रतसंयम ग्रहण करून त्याचा भंग केला त्याला धर्मवासना पुनः अनंतानंत कालांत उत्पन्न होणें कठिण पडतें.

**आहाराच्या आसक्तीचे दोष.**

आहाराविषयीं अतिशय आसक्ति असणें हें देखिल अत्यंत निंद्य आहे. उत्तम पुरुष क्षुधेला प्राण हरण करणारी वेदना जाणून फक्त धर्मसाधनाकरितां शरीर टिकावें याच हेतूनें अल्प आहार ग्रहण करीत असतात. त्यांत देखिल त्यांना फार लज्जा वाटत असते. आहाराच्या गोष्टी बोलण्यापासून देखील पापबंध होतो म्हणून ते अशा गोष्टी मुखावाटें उच्चारूं इच्छित नाहींत. हाड, मांस, पू, रक्तांनीं बनलेला देह आहारांवाचून निभत नाहीं व देहावांचून तप, व्रत, संयम, स्वरूपात्मक रत्नत्रय मार्ग पाळतां येत नाहीं. म्हणूनच सरस–नीरस, मधुर–कडू जसा वेळेवर कर्मानुसार प्राप्त होईल तसा, निर्दोष रीतीनें ग्रहण करून पोटाची खळगी भरतात. रसनेंद्रियाच्या वश कधींही होत नाहींत. आहाराविषयीं उत्पन्न होणारी तीव्र इच्छा रोंकली तरच मनुष्यजन्मांत येऊन साफल्य झालें. नाहीं तर पशुयोनींत ती जिंकण्याचें सामर्थ्य नसतें. त्याठिकाणीं ती प्रबल असल्यानें सबल निर्बलाला भक्षण करतात. इतकेंच नव्हे पण आई आपल्या पिलाला आहाराच्या तीव्र इच्छेनेंच खाऊन टाकते. मनुष्यगतींत देखिल नीच, उच्च, कुलीन, अकुलीन वगैरे भेद आहारावरूनच झालेले आहेत. जगांत जेवढीं म्हणून निंद्य आचरणें घडून येतात तीं सर्व आहाराचा विचार नसणाऱ्या पुरुषाकडूनच. या उलट ज्यांची आहारावर आसक्ति नाहीं ते निर्मल असून निर्वांछकतेमुळें उत्तम गणले जातात. आहारलंपटी पुरुष बागबगीच्यामध्यें जाऊन आनंदानें वनभोजन करण्याच्या इच्छेनें कोट्यवधि त्रस जीवांचा घात करण्यास प्रवृत्त होतो. मोठमोठ्या पापाला याच कारणामुळें अनुमोदन देतो, अभक्ष्य भक्षण करण्यास तयार होतो, असत्य आणि पाप उत्पन्न करणारें दुर्वचन बोलण्यास उद्युक्त होतो, चोरी करण्यास तयार होतो, व्यभिचार करूं लागतो, अतिशय परिग्रह ठेवण्याची त्याला इच्छा होते, केवळ मिष्टान्न सदैव भक्षण करण्यास मिळावें याच हेतूनें तो इतर जीवांचा घात करितो व खोटें बोलून देखिल धन संपादन करूं लागतो. याच हेतूनें तो क्रोध, मान, माया, लोभ, चोरी वगैरे करूं लागतो. आपला कुलक्रम सोडून नीच जातीच्या आहारविहारांत आपण होऊन जाऊन मिळतो. त्यांचें दास्य पत्करतो. निर्लज्ज बनून, आपला दर्जा सोडून, निंद्य आचरण करूं लागतो. त्यावेळीं त्याला आपण स्वतः कोण याचा विसर पडतो. केवळ गोड पदार्थावरील लालसेनें आपलें मन विघडून घेतो. पुष्कळ श्रीमान् माणसांना आपल्या घरीं यथेच्छ सुंदर भोजन नित्य मिळत असूनही नीच अशा अंत्यजाकडे अथवा म्लेंच्छाचें घरीं जाऊन जेवावें अशी इच्छा उत्पन्न होते. याचप्रमाणें ज्यांना स्पर्श देखील करीत नाहींत अशा अधम, नीच पुरुषांनीं उदरंभरणाकरितां

तयार केलेले पदार्थ ज्यांना मुसलमान, मांग, महार वगैरे देखील स्पर्श करतात असे विकत घेऊन खातो. आहारलंपटी माणसाळा व्रत, उपोषण, शील, संयम यापैकीं कांहींही घडत नाहीं. त्याला आपल्या मानापमानाचें दुःख नसतें. वेळेवर अभक्ष्य, उच्छिष्ट अथवा मद्यमांस जें सांपडेल तें खाण्याशीं गांठ. याप्रमाणें हीं माणसें आपला कुळक्रम सोडण्यास तयार होतात. यावरून जिव्हालंपटी पुरुषांच्या हातून कोणते अनर्थ घडणार नाहींत तें पहा. त्याला कोणतेंही पदार्थ पाहून, शोधून खावें ही कल्पनाच मनांत येत नाहीं. कारण पदार्थ मिळतो कधीं व आपण तो तोंडांत टाकतो कधीं, इतकी जबरदस्त अधाशी वृत्ति बनलेली, तेथें विचार कोठला ? अधाशी पुरुषाची बुद्धि तीव्र असली तरी पुढें ती मंद होते, पुढें पुढें त्या बुद्धींत विपरीतता प्राप्त होते. सन्मार्ग सोडून ती दुर्मार्गाकडे धाऊं लागते व धर्मापासून परावृत्त होते असें आपण पाहतों. कित्येक माणसें पुष्कळ शास्त्रपुराणांचें अध्ययन करतात व आपल्या अमृतासारख्या रसाळ वाणीनें लोकांना सन्मार्गाचा उपदेश देत असतात. कित्येक पुष्कळ दिवसापासून सिद्धान्तश्रवण करीत असतात आणि त्यांना खरें काय, खोटें काय व आपलें आचरण कसें ठेवावें हें कळतें. पण अयोग्य मार्गापासून परावृत्त होतां येत नाहीं. याचें कारण अन्यायाचरण व अभक्ष्यभक्षण आहे. मुनीश्वरांना मुख्यत्वें करून आहारशुद्धि सांगितलेली आहे. श्रावकांनाही शुद्ध बुद्धि राहण्याकरितां तिची अवश्यकता आहे.

आहारलंपटी पुरुषाला योग्यायोग्य पाहून, शोधून पाहण्याइतकी स्थिरता रहात नाहीं. त्याला होईल तितकें लौकर कसें तरी खावयास मिळावें अशीच इच्छा असते. त्याला आपला कोणी सन्मान करावा, उच्चस्थानावर बसवावें असें वाटत नसतें. जेथें कोठें मिष्टभोजन मिळेल तेथें त्याला नवनिधि-प्राप्तिसारखा लाभ झालासें वाटतें. तो नेहमीं मिष्ट भोजन देणाऱ्या पुरुषाचा दास असतो. आई, बाप, गुरु, स्वामी या सर्वांचे उपकार विसरून, होतां होईल तितकें त्यावर अपकार करण्यास तयार होतो. अशा पुरुषाचा मान त्याच्या घरांत स्त्रीपुत्र देखिल ठेवीत नाहींत. आहारलंपटी पुरुषांना धर्मावरही श्रद्धान नसतें. कारण सम्यग्दृष्टी पुरुष आत्मिक सुखाला खरें सुख मानतात. त्यांना इंद्रियजनित विषयसुखाविषयीं अत्यंत अरुचि असते. याला तर मिष्टभोजनाशिवाय दुसऱ्या कोठेंही सुख दिसत नाहीं. अर्थात् याला यथार्थ ज्ञान नाहीं म्हणून सुख कोठलें ? जिव्हालंपटी मनुष्य उच्चकुलीन, नीचकुलीन, महाअभिमानी या सर्वांची पोटाकरितां सारखीच स्तुति करीत असतो. दीन मुद्रेनें इतरांच्या मुखाकडे पाहून याचना करतो. फक्त एका भोजनाच्या इच्छेनें तंदुलमत्स्य सातव्या नरकाला जातो पण अनेक जंतूंना भक्षण करणारे मोठमोठे मासे त्याहून कमी दुःखें असणाऱ्या नरकाला जातात. सुभौम नामक चक्रवर्तीला देवांनीं दिलेल्या दशांगकल्पवृक्षाच्या भोगापासून तृप्ति वाटली नाहीं. तो कोणा एका परस्थ माणसानें आणलेल्या फलांतील रसाच्या आसक्तिमुळें आपल्या कुटुंबासह समुद्रांत बुडून सातव्या नरकाला गेला. मग इतरांची काय कथा ? यावेळीं जिनवचनरूपी अमृतरसानें तुम्हांला प्राशन करवीत असूनही जर तुमची आहार, रस वगैरे मधील आसक्ति कमी होत नसेल तर तुम्हांला

आहारलंपटी पुरुषाची अवस्था.

आहून अनंतानंत काळ संसारांत निःसंशय भ्रमण करावयाचें आहे व क्षुधा, तृषा, रोग, वियोग, जन्म, मरण यांचें अनंतकाळ दुःख भोगावयाचें आहे असें समजलें पाहिजे.

आहारानें क्षुधा वेदना शमत नाहीं.

आहार ग्रहण करून क्षुधेची वेदना नाहींशी होईल, अशी तुमची समजूत असेल तर ती खोटी आहे. आहारापासून क्षुधेची वेदना नाहींशी होत नाहीं. क्षुधारूपेची वेदना असाता नामक कर्माचा उदय नाहींसा होण्यानें मिटणारी आहे. भूक लागेल तसें खात गेल्यानें ती मिटणारी नाहीं. उलट बरोबर वाढेल. अग्नींत लांकडें घालीत गेल्यानें तो शांत होत नाहीं. समुद्रांत हजारों नद्या येऊन मिळाल्या म्हणून तो तृप्त होत नाहीं. याचप्रमाणें आहारापासून तृप्ति होत नाहीं. लाभान्तराय कर्माच्या क्षयोपशमानें उत्पन्न होणारें अत्यंत बल, तेज, वीर्य व कांति यांना वाढविणारा मानसिक आहार असंख्यात कालपर्यंत स्वर्गांत इंद्र घेत असतात, म्हणून त्यांना क्षुधेच्या अभावरूपीं तृप्तीचें सुख थोडेंच प्राप्त होतें ! चक्रवर्ती, नारायण, बलिभद्र, प्रतिनारायण व भोगभूमींतील माणसेंही लाभान्तराय व भोगान्तराय कर्माच्या क्षयोपशमापासून प्राप्त होणारा उत्तम आहार ग्रहण करीत असूनही त्यांच्या क्षुधेची वेदना दूर होत नाहीं. मग यत्किंचित् अन्नापासून तुमची शांति कशी होईल ! यासाठीं धीर धरून आहाराची इच्छा जिंकण्याचा प्रयत्न करा. विचार करा कीं, यावेळीं जर तुम्ही आहार घेतला तर तो कितीसा घ्याल ! त्याचा स्वाद कितीवेळ टिकेल ! जिभेचा स्पर्श होईतोपर्यंत काय तो स्वाद. पुढें गिळून गेल्यावर स्वादही नाहींसा होतो. पहिल्यांदा तरी स्वाद कोठें असतो ! केवळ तुमची अत्यंत तृष्णाच सर्व प्रकारच्या भावना उत्पन्न करते. हे सर्व प्रकारचे आहार तुम्ही अनादिकालापासून भक्षण करीत आला. अजून जर तुमची तृप्ति झाली नाहीं तर आतां कंठाला प्राण येऊन ठेपला, यावेळीं यत्किंचित् आहारानें तुमची तृप्ति कशी होणार ! म्हणून आतां व्रताविषयीं दृढ निश्चय कायम ठेऊन आपण आत्महित साधून घ्या. आजपर्यंत तुम्ही ज्याचा स्वाद घेतला नाहीं असा एखादा अपूर्व आहारही जगांत उरलेला नाहीं. जो संपूर्ण समुद्राचें पाणी पिऊनही तृप्त झाला नाहीं त्याला पाण्याचा थेंब चाटविण्यानें कशी तृप्ति होईल ! यापूर्वी तुम्ही रात्रंदिवस आहाराकरितां दुःखी होऊन अनेक जन्म घालविले आहेत. पुष्कळ कालपर्यंत आहार ग्रहण करण्याची इच्छा टिकते हें एक दुःख. तो आहार प्राप्त होण्याकरितां सेवा, वाणिज्य वगैरे उपाय योजून धन प्राप्त करून घेणें हें दुसरें दुःख. धन संपादन करण्याकरितां दैन्य धारण करून पराधीन रहावें लागतें हें तिसरें दुःख. इतकें कष्ट करून मिळविलेलें सर्व धन खर्च होत असलेलें पाहून होणारें दुःख, आपण अशक्त झालों किंवा अप्रबुद्ध ठरलों असतां स्त्रीपुत्रादिक धनसंपादन करूं लागतात त्यावेळीं त्यांच्या अधीन राहण्याचें दुःख, स्वतः अन्न तयार करूं लागणें व तें तयार होईपर्यंत भुकेची वेदना सहन करण्याचें दुःख, अन्नसामग्री स्वयंपाकाकरितां नसली तर ती बाजारांत जाऊन आणण्याचें दुःख, आपल्या इच्छेप्रमाणें सर्व पदार्थ न मिळण्याचें दुःख, गोड जेवण मिळूं लागलें म्हणजे आंबटतिखट भोजन मिळावें म्हणून इच्छा होणें व तिखट आंबट मिळूं लागलें असतां मिष्ट भोजन मिळावें म्हणून इच्छा होणें यांचें दुःख,

याप्रमाणें अनंत दुःखें एकामागें एक होत असतात. क्षणमात्रही इच्छा जेथें कमी होत नाहीं तेथें सुख कसलें ! स्वाद घेत असतां सुख आहे म्हणावें तर जिभेला स्पर्श होतांच तो घास घशांत उतरूं लागतो. एका क्षणांत तो घास जिभेच्या मूलाशी जाऊन पोंचतो. फक्त जिभेच्या अग्र भागालाच पदार्थाचा काय जो थोडा वेळ स्वाद मिळतो तोच. जिह्वेला जोंपर्यंत स्पर्श झाला नाहीं तोपर्यंत तर स्वाद नसतो. जिभेच्या खालीं गेल्यावरही तो नसतो. फक्त निमेषमात्र त्याची काय ती सत्ता. एवढ्याकरितां असलें भयंकर दुर्ध्यान करून संकट भोगणें हें केवढें अज्ञान म्हणावें ! बरें, आहार ग्रहण करून जरी शांति प्राप्त होती तर एवढी लालसा करणें एकपक्षी इष्ट असें म्हणतां आलें असतें. परंतु वांछेचा अभाव वरचेवर आहार घेत असूनही झालेला दिसून येत नाहीं. म्हणून सदैव भयंकर दुःख देणाऱ्या आहाराचा त्याग करण्याचा प्रसंग सध्यां अनायासें प्राप्त झाला आहे. हा प्रसंग अतिशय दुर्लभ व अक्षय्य निधीच्या लाभासारखा समजून आहाराविषयीं लालसा सोडा. जर यावेळीं परिणामाची दृढता ठेऊन आहाराविषयी विरक्ति कायम ठेवाल, तर तुम्ही स्वर्गलोकीं जन्म घ्याल. त्याठिकाणीं हजारों वर्षें क्षुधातृषेची वेदना उत्पन्न होणार नाहीं. कारण स्वर्गांत जितक्या सागरवर्षांचें आयुष्य असतें तितकीं हजार वर्षेंपर्यंत क्षुधेची वेदना होत नाहीं. त्यानंतर किंचित् होते. त्यावेळीं कंठांत अमृत स्रवूं लागतें व तत्काल क्षुधेची शांति होते. हा सर्व प्रभाव म्हणजे असंख्यात वर्षें क्षुधा नाहींशी होणें, हें पूर्व जन्मांत आहारावरील आसक्ति सोडून अनशन, अवमोदर्य व रसपरित्यागादिक तपश्चरण केलें त्याच फल आहे. तिर्यंच व मनुष्य गतीमध्यें क्षुधातृषेच्या वेदनेचें व असंख्य रोगांचें भयंकर दुःख अनंत काल भोगावें लागतें याचें कारण आहारासक्ति होय. ज्यांनीं ही आसक्ति सोडिली ते क्षुधातृषावेदना व कवलाहार रहित देव झाले. आतां ज्या क्षुधेच्या वेदनेनें तुम्ही दुःखी होत आहां, ती वेदना सहन करून आहार त्याग करण्याचा निश्चय कायम ठेवा म्हणजे फारच थोड्या वेळांत वेदनारहित कल्पवासी देवांत जाऊन जन्म घ्याल. यावेळीं वेदना नाहींशी व्हावी म्हणून जरी अन्न ग्रहण केलें तरी त्यापासून तुमची वेदनेची कीड गेली असें होत नाहीं.

सर्व दुःखाचें मूल कारण या जीवाचें शरीरावरील ममत्व आहे. या ममतेमुळें व याचें रक्षण करण्यामुळें तर अनंतानंत काल या जीवानें दुःख भोगलें आहे. क्षुधा, तृषा, रोग, परीषह हीं सर्व दुःखें फक्त एका शरीरावर प्रेम केल्यामुळें उत्पन्न होतात. सत्पुरुष देहावरील प्रेम सोडून देतात तें याच कारणामुळें. त्यांना या हाडमांसचर्ममयी दुर्गंधी शरीराची पुनः प्राप्ति नको असते. जोंपर्यंत संसाराचा अंत आलेला नसतो तोंपर्यंत इंद्रादिक देवाचें शरीर प्राप्त होत असतें. जेव्हां त्याचा अंत येतो तेव्हां शील, संयमाची सामग्री उपलब्ध होऊन जीव निर्वाणपदीं पोंचतो. जर तुम्हाला शरीराच्या वेदनेचें दुःख असेल तर तत्काल या शरीरावरील ममता सोडा. पुनः देह नको असेल व आहाराच्या इच्छेचें तीव्र दुःख होत असेल तर आहारच सोडून द्या, म्हणजे पुनः क्षुधातृषेची वेदना होऊन आहार ग्रहण करण्याचें कारण पडणार नाहीं. अशा क्रमानें शरीराला असें कृश करीत चला कीं, वातपित्तकफादि विका-

शरीरममत्व सोडा.

यांची वृद्धि न होतां ते मंद होत जातील व दिवसेंदिवस परिणामांची शुद्धि वाढत जाईल. याचा क्रम पूर्वी सल्लेखनेत सांगितलाच आहे.

अंतकाळीं आपणांत जितकी शक्ति असेल तितकी एकत्र करून शेवटीं पाण्याचा देखिल त्याग करावा. मुखावाटें शब्दोच्चारणाची शक्ति उरेपर्यंत पंचनमस्कार मंत्र म्हणून बारा भावनांचें चिंतन करीत जावें. शब्दोच्चार करण्याचीही शक्ति कमी झाली तर अरिहंत सिद्धांचें फक्त ध्यान करावें. याहीपेक्षां शक्ति कमी झाल्यास धर्मात्मा व वात्सल्य अंगाला धारण करणारे व स्थितीकरण अंगाविषयीं सावधान अशा धर्मबांधवांनीं चार आराधना व पंचनमस्कार मंत्र मोठ्या मधुर आवाजांनीं श्रवण करवावा. आराधना करणाऱ्या अशक्त माणसाच्या शरीरांत किंवा मस्तकांत त्रास होणार नाहीं अशा मंजुळ शब्दांनीं धर्मश्रवण करवावें म्हणजे त्याचें चित्त त्याठिकाणीं स्थिर राहील. पुष्कळ माणसांनीं एकत्र होऊन एकदम ओरडून गोंधळ करूं नये. प्रत्येकानें एका-मागून एक अशा क्रमानें जिनेंद्रनामाचें स्मरण करवावें. याशिवाय आराधक पुरुषाजवळ पुष्कळ माणसें किंवा त्याच्या प्रेमाचीं आप्त इष्ट माणसें अथवा निरर्थक बडबड करणारीं माणसें न येऊं देण्याचा बंदोबस्त करावा. त्याजजवळ बसून मायेच्या, मोहाच्या, क्रोधाच्या किंवा लोभाच्या गोष्टी न बोलतां ज्या भाषणांनीं त्याचा मोह सुटून वीतरागभाव वाढेल अशाच गोष्टी बोलाव्या. त्या ठिकाणीं दोन चार धर्मवान् पुरुषाखेरीज इतर लोकांची गर्दी होऊं देऊं नये.

महामंत्र स्मरणांत देह सोडावा.

आराधक पुरुषानें सल्लेखना करतांना त्याचे पांच दोष टाळले पाहिजेत ते असे—

**जीवितमरणाशंसे भयमित्रस्मृतिनिदाननामानः ।**
**सल्लेखनातिचाराः पंच जिनेन्द्रैः समादिष्टाः ॥ १२९ ॥**

**अर्थ**—सल्लेखना धारण केल्यानंतरही दोन दिवस आपण अधिक जगलों तर बरें असें वाटणें हा जीविताशंसा नामक पहिला दोष. मरण लौकर यावें अशी इच्छा करणें हा मरणातिशंसा नांवाचा दुसरा दोष. मरण प्राप्त झालें असतां इतकें तीव्र दुःख येतें ना ! तें मला कसें सहन होईल अशी भीति वाटणें हा तिसरा दोष. मरतांना आपल्या इष्टमित्रपुत्रदारादिकांचें स्मरण करणें हा मित्रस्मृति नांवचा चौथा दोष आणि भविष्यकालीं अमुक तपश्चरण मी केलें आहे त्याचें अमुक फल मला प्राप्त व्हावें अशी इच्छा करणें हा निदान नांवचा पांचवा दोष आहे. याप्रमाणें हे पांच दोष टाळावे असें भगवंतानीं सांगितलें आहे.

**विशेषार्थ**—सल्लेखनामरण साधीत असतां सर्व गोष्टींचा त्याग करून फक्त आपल्या शुद्ध ज्ञायक स्वभावाचें अवलंबन करावें. देहादिक सर्व परवस्तुवरील ममत्व सोडून संन्यास धारण केला. तथापि पुनः जगण्याची व मरण्याची इच्छा करणें, भय बाळगणें, मित्रावर प्रेम करणें आणि पुढें अमुक सुख प्राप्त व्हावें म्हणून इच्छा करणें यापासून परिणामांत प्राप्त झालेली उज्ज्वलता नाहींशी होते व पुनः रागद्वेष उत्पन्न होतात म्हणून सल्लेखनेला मलिन करणाऱ्या या दोषांचा त्याग करावा. निर्दोष

समाधिमरण प्राप्त झालें असतां गृहस्थांना स्वर्गांत महान् ऋद्धिधारक देवपदाची प्राप्ति होते व पुढें क्रमानें संयम धारण करून त्या जीवाला निःश्रेयस ( मोक्ष ) प्राप्त करून घेतां येतो.

निःश्रेयसमभ्युदयं निस्तीरं दुस्तरं सुखाम्बुनिधिम् ।
निःपिबति पीतधर्मा सर्वैर्दुःखैरनालीढः ॥ १३० ॥

**अर्थ**–धर्मामृत प्राशन करणारा सल्लेखनाधारी कोणी जीव स्वर्गातील अहमिंद्रपदाच्या सुखपरंपरेला पुष्कळ काळपर्यंत भोगतो व कोणी जीव संपूर्ण दुःखापासून मुक्त होत्साता अपार सुखरूपी निर्वाणपदाचा अनुभव घेतो.

मोक्षाचें लक्षण

जन्मजरामयमरणैः शोकैर्दुःखैर्भयैश्च परिमुक्तम् ।
निर्वाणं शुद्धसुखं निःश्रेयसमिष्यते नित्यम् ॥ १३१ ॥

**अर्थ**–जन्म, वृद्धपणा, रोग, मरण, शोक, भय आणि दुःख हीं जेथें नाहींत व उपाधिरहित सुख हेंच जेथें नेहमी असतें त्याला निर्वाण किंवा निःश्रेयस म्हणजे मोक्ष असें म्हणतात.

विद्यादर्शनशक्ति-स्वास्थ्यप्रह्लादतृप्तिशुद्धियुजः ।
निरतिशया निरवधयो निःश्रेयसमावसन्ति सुखम् ॥ १३२ ॥

**अर्थ**–अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतवीर्य, परमौदासीनता, अनंतसुख, विषयाविषयीं निर्वांछकता, द्रव्य भावकर्मरूपी मलाचा अभाव या गुणांनीं युक्त असे पुरुष हीनाधिकतारहित अनंतकालपर्यंत मोक्षस्थानीं राहतात.

**भावार्थ**–धर्माच्या प्रभावानें आत्मा मोक्षांत जाऊन राहतो. तेथें केवलज्ञान, केवलदर्शन, अनंतशक्ति, परमवीतरागता, निराकुल सुख, विषयांची अनिच्छा, कर्ममलरहितपणा, वगैरे गुण प्रगट होऊन, त्या गुणांत हीनाधिकता व कालाची मर्यादा रहात नाहीं. अशा स्थितींत अनंतानंत काल आत्म्याला रहावयास सांपडतें हाच मोक्ष होय.

काले कल्पशतेऽपि च गते शिवानां न विक्रिया लक्ष्या ।
उत्पातोऽपि यदि स्यात्रिलोकसंभ्रान्तिकरणपटुः ॥ १३३ ॥

**अर्थ**–अनंतानंत कल्पकाळ उलटून गेले तरी देखिल मुक्त जीवामध्यें कोणताही विकार म्हणजे त्यांचें अन्यथा स्वरूप होत नाहीं. सर्व त्रैलोक्याला हलवून सोडणारा असा भयंकर उत्पात झाला तरी त्यामुळें सिद्धजीवांमध्यें कांहींही गडबड होत नाहीं.

सिद्धाचें स्वरूप

निःश्रेयसमधिपन्नास्त्रैलोक्यशिखामणिश्रियं दधते ।
निष्किट्टकालिकाच्छविचामीकरभासुरात्मानः ॥ १३४ ॥

**अर्थ**–सोन्यांतील मळ आणि काळिमा अगदीं नाहींशी झाल्यामुळें त्याच्या दैदीप्यमान कांतीसारखें मोक्षवासी जीव त्रैलोक्यांतील शिरोभागच्या सर्वोत्कृष्ट शोभेला प्राप्त होतात.

पूजार्थाज्ञैश्वर्यैर्बलपरिजनकामभोगभूयिष्ठैः ।
अतिशयितभुवनमद्भुतमभ्युदयं फलति सद्धर्मः ॥ १३५ ॥

**अर्थ**— ह्या सल्लेखना नामक सद्धर्मानें अद्भुत इंद्रादि उत्कृष्ट वैभवाचें फल प्राप्त होतें. तेथें सन्मान, द्रव्य, आज्ञा, ऐश्वर्य, शक्ति, नोकर व कामभोग हे विपुल आहेत.

## श्रावकधर्माच्या अकरा प्रतिमांचें स्वरूप.

श्रावकपदानि देवैरेकादश देशितानि येषु खलु ।
स्वगुणाः पूर्वगुणैः सह संतिष्ठन्ते क्रमविवृद्धाः ॥ १३६ ॥

**अर्थ**— सर्वज्ञदेवांनीं श्रावकाच्या पायऱ्या म्हणजे प्रतिमा अकरा सांगितल्या आहेत. ज्या प्रतिमांमध्यें जे गुण असले पाहिजेत ते असून पूर्वीच्या प्रतिमेपैकीं सर्व गुण क्रमानुसार त्यांत वाढत असतात. त्या अकरा प्रतिमा अशा– १ दर्शन, २ व्रत, ३ सामायिक, ४ प्रोषधोपवास, ५ सचित्त-त्याग, ६ रात्रिभोजन, ७ ब्रह्मचर्य, ८ आरंभत्याग, ९ परिग्रहत्याग, १० अनुमतित्याग आणि ११ उद्दिष्टाहारत्याग, ह्या होत. जो अनुक्रमानें पुढची पायरी धारण करील, त्याला मागच्या पायरींतील सर्व गुणक्रियांची अवश्यकता आहे. पुढची पायरी धारण केली व मागच्या पायरीचे गुण सोडले असें होतां कामा नये. जसें ब्रह्मचर्य प्रतिमा कोणी धारण करील तर त्याला त्यापूर्वीच्या सहा प्रतिमेंतील आचरण, नेम, क्रिया या सर्व पूर्ण पाळल्याच पाहिजेत. तरच तो आठवी प्रतिमा धारण करण्यास योग्य होईल.

दर्शनप्रतिमा

सम्यग्दर्शनशुद्धः संसारशरीरभोगनिर्विण्णः ।
पंचगुरुचरणशरणो दर्शनिकस्तत्त्वपथगृह्यः ॥ १३७ ॥

**अर्थ**—सम्यग्दर्शनाच्या पंचवीस दोषांनीं रहित व नेहमीं संसार, देह, आणि इंद्रियांचे विषय या विषयीं विरक्त, पंचपरमेष्ठींना सदैव शरण जाणारा आणि जीवादिक सर्वज्ञभाषित–तत्त्वांचें–सत्यार्थ श्रद्धान करणारा पहिला दर्शनप्रतिमाधारी श्रावक होय.

**भावार्थ**— स्याद्वादरूप परमागमाच्या प्रसादानें व निश्चय व्यवहाररूप दोन्ही नयांच्या अवलंबनानें निर्णयपूर्वक स्वतत्त्व परतत्त्वाला जाणून पक्के श्रद्धान करणारा, जातिकुलादिकांचा गर्व सोडून निरभिमानी बनलेला, आपणाहून गुणवान् असतील त्यांचे गुण पाहून त्यापुढें आपणाला तुच्छ लेखणारा, अप्रत्याख्यानावरण कर्माच्या उदयामुळें विषयांवरील प्रीति कमी होत नसली व गृहकुटुंबांतील सर्व पापक्रिया घडत असल्या तरी, तें सर्व मोहकर्माच्या उदयामुळें घडून येत आहे असें जाणून सदैव “ हा माझा सर्व अज्ञानभाव केव्हां नाहींसा होईल, मी यापासून केव्हां सुटेन, जबरदस्त कर्माच्या उदयानें गांठल्यामुळें मला समजत असूनही त्याग करणें घडत नाहीं ” असें चिंतन करून पश्चात्ताप करणारा, धर्मवान् पुरुषाचे गुण ग्रहण करणारा, रत्नत्रय धारण करणाऱ्या पुरु-

यांचा सन्मान करणारा व धर्माला पुण्याला पाहून हर्षानें रोमांचित होणारा, जो असेल तोच खरा सम्यग्दृष्टी श्रावक म्हणावा.

**विशेषार्थ**– राग, द्वेष, मोह आणि शरीर या सर्वांशीं आपल्या ज्ञायक स्वभावरूप आत्म्याचें तादात्म्य झालेलें असून परम पवित्र आत्म्याहून रागद्वेषादि विकार अत्यंत भिन्न आहेत असें अनुभवणें, जीवाशीं दृढसंयोग-संबंधानें रहात असलेल्या शरीराला वस्त्राप्रमाणें भिन्न मानणें, अठरा दोष रहित सर्वज्ञ वीतराग परमेष्ठीलाच यथार्थ देव मानून त्या ठायीं पूज्यपणा ठेवणें, इतर दोषयुक्त देवांमध्यें देवत्वबुद्धि न ठेवणें, दया हाच श्रेष्ठ धर्म मानून हिंसेमध्यें कालत्रयीं धर्म घडणार नाहीं असा मनाचा निश्चय ठेवणें, आरंभ व परिग्रह ज्यांना नाहींत तेच गुरु, त्याशिवाय इतर गुरु नव्हेत असें दृढ श्रद्धान करणें, जीवाला कोणी मारणारा किंवा तारणारा नसून, सुखदुःख, उपकार, अपकार, गरीब, श्रीमंत वगैरे विकार उत्पन्न करणारा कोणी नाहीं, जीव आपल्याच परिणामांनीं सर्व परपदार्थांना सुखदुःख उत्पन्न करणारे जाणून कर्मबंध बांधून घेतो व परिपाककालीं कर्म उदयाला आलें असतां आपण सुखी व दुःखी झालों असें मानतो, याप्रमाणें कर्मोदयानुसार सुखदुःख भोगणें प्राप्त आहे हें जाणून त्याविषयीं माध्यस्थ्यभाव ठेवणारा सम्यग्दृष्टी जाणावा. व्यंतर देवांची अतिशय भक्तीनें आराधना करणारे व मंत्रतंत्रयंत्रादिकांवर विश्वास ठेवणारे जर पुण्यहीन असले तर त्यापासून त्यांचा कांहींही उपकार होत नाहीं. पुण्य नाहींसें झालें म्हणजे सर्व आप्तबांधव, इष्टमित्र वगैरे शत्रु होतात. पुण्याचा उदय असला तर मातीचें सोन होतें व दगडाच्या आकाराचा देव प्रत्यक्ष खरें रूप धारण करून त्यावर उपकार करण्यास तयार होतो. ज्या जीवाचें ज्या ठिकाणीं, ज्यावेळीं, ज्या निमित्तांनीं जन्म वा मरण, लाभ व अलाभ, सुखदुःख होणार असें जिनेंद्र भगवंतांनीं आपल्या दिव्यज्ञानांत जाणलेलें असतें, त्या जीवाचें, त्याठिकाणीं, त्यावेळीं, तन्निमित्तानें जन्म, मरण व लाभालाभादिक नियमपूर्वक होणार. तें टाळण्याचें इंद्र-धरणेंद्र, क्षेत्रपाल अथवा खुद्द जिनेंद्रामध्यें देखिल सामर्थ्य नाहीं, अशी सम्यग्दृष्टी पुरुषाची खात्री असते. याप्रमाणें द्रव्याचे सर्व पर्याय जाणून श्रद्धान करणारा पहिल्या प्रतिमेचा धारक दर्शनिक श्रावक म्हणावा.

### व्रत प्रतिमा

**निरतिक्रमणमणुव्रतपञ्चकमपि शीलसप्तकं चापि ।**
**धारयते निःशल्यो योऽसौ व्रतिनां मतो व्रतिकः ॥ १३८ ॥**

**अर्थ**– जो अतिचाररहित पांच अणुव्रतें व सात शील अशीं बारा व्रतें, माया, मिथ्यात्व, निदान या तीन शल्यांनीं रहित होऊन पाळतो त्याला व्रती पुरुषांतील व्रतीश्रावक म्हटलें आहे.

### सामायिक प्रतिमा

**चतुरावर्तत्रितयश्चतुःप्रणामः स्थितो यथाजातः ।**
**सामयिको द्विनिषद्यस्त्रियोगशुद्धस्त्रिसंध्यमभिवन्दी ॥ १३९ ॥**

**अर्थ**– सकाळीं, दोनप्रहरीं व सायंकाळीं मनवचनकाया शुद्ध करून, बाह्याभ्यंतर परिग्रह

सोडून, दोन्ही हात जोडून तीन वेळां चारी दिशांना उभें राहून चार नमस्कार करणें व दोन वेळां (प्रारंभीं व शेवटीं) बसून नमस्कार करणें ही तिसरी सामायिक प्रतिमा जाणावी. याचा विशेषविधि गुरूपरिपाटी जाणणाऱ्या अधिक ज्ञानी पुरुषाजवळून समजून घ्यावा.

प्रोषधोपवास प्रतिमा

पर्वदिनेषु चतुर्ष्वपि मासे मासे स्वशक्तिमनिगुह्य ।
प्रोषधनियमविधायी प्रणधिपरः प्रोषधानशनः ॥ १४० ॥

**अर्थ**– एका महिन्यांच्या दोन अष्टमी व दोन चतुर्दशी अशा चार पर्वतिथी असतात. त्या दिवशीं आपली शक्ति न लपवितां आहारपानाचा त्याग करावा अथवा नीरस आहार ग्रहण करावा अथवा अल्पाहार वा कांजी ग्रहण करून शुभध्यानांत मन लावावें. या 'विधीला' प्रोषधानशन नामक चवथी प्रतिमा म्हणतात.

सचित्तत्याग प्रतिमा

मूलफलशाकशाखाकरीरकंदप्रसूनबीजानि ।
नामानि योऽत्ति सोऽयं सचित्तविरतो दयामूर्तिः ॥ १४१ ॥

**अर्थ**– जो दयाळू गृहस्थ मूळ, फल, भाजी, डाहाळी, उसाच्या किंवा वेळूच्या गांठी, कंद, फूल आणि बीं हीं न पिकलेलीं अथवा न शिजविलेलीं खात नाहीं तो सचित्तत्याग प्रतिमाधारी श्रावक म्हणावा.

रात्रिभोजनत्याग प्रतिमा

अन्नं पानं खाद्यं लेह्यं नाश्नाति यो विभावर्यां ।
स च रात्रिभुक्तिविरतः सत्त्वेष्वनुकम्पमानमनाः ॥ १४२ ॥

**अर्थ**– जो प्राणिमात्रावर दया करणारा रात्रीं अन्न, पाणी, फराळ व पानसुपारी अशा चार प्रकारच्या आहारापैकीं कांहींही खात नाहीं, तो रात्रिभुक्तित्याग नांवच्या सहाव्या प्रतिमेचा धारक श्रावक होतो.

ब्रह्मचर्य प्रतिमा

मलबीजं मलयोनिं गलन्मलं पूतिगन्धिबीभत्सम् ।
पश्यन्नङ्गमनङ्गाद्विरमति यो ब्रह्मचारी सः ॥ १४३ ॥

**अर्थ**–जो पुरुष आपलें शरीर, रक्त आणि वीर्य अशा घाणेरड्या पदार्थापासून उत्पन्न झालेलें, मलिनतेचें कारण, मलप्रवाही आणि दुर्गंध व किळस उत्पन्न करणारें आहे असें पाहून कामविकाराचा त्याग करतो तो ब्रह्मचर्यप्रतिमाधारी श्रावक म्हणावा.

**विशेषार्थ**– ब्रह्मचारी पुरुषानें आपल्या विवाहित स्त्रीचा देखिल उपभोग घेतां कामा नये. तिच्याशीं एकत्र शयन करूं नये. पूर्वी जे भोग भोगिले असतील त्यांचें स्मरण करूं नये. कामोद्दीपन करणारा पौष्टिक आहार घेऊं नये. राग (मोह) उत्पन्न करणारीं वस्त्रप्रावरणें व अलंकार अंगावर घालूं नयेत. नाच, रंग, वाद्यें अवलोकन व श्रवण करूं नये. फुलांच्या माळा, सुगंधी उट्या व अत्तरें

हीं अंगाला लावूं नयेत. शृंगाराच्या कथा, अश्लील वाङ्मय, काव्यें, नाटकें यांचें वाचन व श्रवण करूं नये. पानसुपारी वगैरे पदार्थ विषयवासना वाढविणारे आहेत म्हणून ते भक्षण करूं नयेत. याप्रमाणें आचरण करणाराला वरील सातवी ब्रह्मचर्यव्रत प्रतिमा घडते.

आरंभत्याग प्रतिमा

**सेवाकृषिवाणिज्यप्रमुखादारम्भतो व्युपारमति।**
**प्राणातिपातहेतोर्योऽसावारम्भविनिवृत्तः॥ १४४॥**

**अर्थ**– हिंसेचें कारण अशा शेतकी, व्यापार, नोकरी वगैरे आरंभाचा जो त्याग करतो तो आरंभत्याग प्रतिमाधारी श्रावक जाणावा.

**भावार्थ**– द्रव्य उपार्जन करण्याचीं कारणें म्हणजे व्यापार, नोकरी, शेतकी वगैरे आहेत. त्यांत पाप अवश्य घडावयाचेंच. ती सर्व आरंभक्रिया सोडावी व आपलें द्रव्य स्त्री, पुत्र, मित्रादिकांना विभागून द्यावें. थोडेसें आपल्याजवळ ठेऊन नवीन उपार्जन करूं नये. आपल्याजवळ ठेवलेल्या थोड्याशा द्रव्यांतून दुःखित, बुभुक्षित कोणी असेल तर त्यावर उपकार करण्याकरितां तें द्यावें अथवा आपल्या शरीरांत कांहीं रोग उत्पन्न झाला तर तो योग्य औषधांनीं बरा करण्याकरितां खर्चावें. आपणाला लागणारीं वस्त्रप्रावरणें त्यांतूनच घ्यावीं. आपल्यासारखेच दुसरे कोणी दुःखी असतील, अथवा आपल्या प्रीतिचे असतील तर त्यांचें दुःख निवारण करावें. इतर पापक्रियेमध्यें आपल्या द्रव्याचा उपयोग करूं नये. आपण मर्यादा करून ठेवलेलें थोडें द्रव्य चोरानें लुटून नेलें अथवा एखाद्या दुष्ट राजानें हरण केलें, तर त्याबद्दल शोक करूं नये व तें पुनः मिळविण्याचा प्रयत्न पण करूं नये. " गेलें तें गेलें, कधीं तरी त्याचा मला त्याग करावयाचाच होता. मोहानें थोडासा परिग्रह ठेवला होता तो कर्मानें नाहींसा करून माझ्यावर मोठा उपकारच केला. आतां रागद्वेष, आरंभ, रक्षण, भय वगैरे सर्व क्लेशापासून मुक्त झालों हा मोठा सुदिन म्हणावयाचा. आजपासून द्रव्यासंबंधी दुर्ध्यान करावयाचें सुटलें " असे उच्च विचार मनांत आणून शांत व्हावें. अशा प्रकारचे विचार मनांत ठेऊन वागणाराला आठवी आरंभत्याग प्रतिमा घडते.

परिग्रहत्याग प्रतिमा

**बाह्येषु दशसु वस्तुषु ममत्वमुत्सृज्य निर्ममत्वरतः।**
**स्वस्थः संतोषपरः परिचित्तपरिग्रहाद्विरतः॥ १४५॥**

**अर्थ**–बाह्य दहा प्रकारच्या परिग्रहांवरील ममत्व सोडून जगांत आपले कोणीही नाहीं असे परिणाम ठेवावे. शरीरादिक सर्व परपदार्थांवरील मोह सोडून अविनाशी ज्ञायकस्वरूपाचा विचार करण्यांत स्थिर व्हावें. भोजन, वसन, स्थान, वगैरे आपल्या कर्मानुसार प्राप्त होईल तेवढ्यांत संतोष मानून अधिक मिळावें म्हणून इच्छा न करतां दैन्याचा त्याग करून रहावें आणि जेवढ्या परिग्रहांचा आपण सध्या उपभोग घेत आहोंत त्यांत देखिल आसक्ति न ठेवतां विरक्ति धारण करावी. याप्रमाणें राहणाराला परिग्रहत्याग नांवची नववी प्रतिमा घडते.

**भावार्थ**—नवव्या प्रतिमाधारी श्रावकानें रुपये, मोहरा, सोनें, रुपें, अलंकार, वस्त्राभरणें, वगैरे सर्व वस्तूंचा त्याग करावा. थंडीची किंवा उन्हाची वेदना नाहींशी करण्याकरितां हलक्या किंमतीचें मर्यादित प्रमाणाचें वस्त्र ठेवावें. हातपाय धुण्याकरितां अथवा पाणी पिण्याकरितां लागणारें एखादें पात्र एवढाच काय तो त्यानें परिग्रह ठेवावा. अशा प्रकारच्या वृत्तीला परिग्रहत्याग प्रतिमा म्हणतात. याशिवाय घरांत अथवा दुसऱ्या एखाद्या एकान्त जागीं शयन करणें, बसणें, उठणें, भोजन-वस्त्र घरच्या माणसांनीं आणून दिलें तर ग्रहण करणें, औषध, आहार पान, वस्त्र घेण्याची इच्छा झाल्यास अथवा आपलें अंग दुखत असल्यास त्याचें वैयावृत्य करविण्याची इच्छा झाल्यास आपल्या स्त्रीपुत्रादिकांना सांगून त्यांनीं त्याप्रमाणें केलें ठीक, न केलें तरी त्याबद्दल मनांत विकार उत्पन्न होऊं न देणें व ' हें माझें घर आहे, हें सर्व धन मी संपादन करून तुमच्या हवालीं केलें आहे असें असून तुम्ही माझी आज्ञा मानीत नाहीं ना!' वगैरे शब्दांनीं त्यांना दुखवून आपल्या परिणामांत क्लेश उत्पन्न करून घेऊं नये. अशा वृत्तीनें राहणाऱ्या गृहस्थाचा या प्रतिमेंत समावेश होतो.

अनुमतित्याग प्रतिमा

**अनुमतिरारम्भे वा परिग्रहे वैहिकेषु कर्मसु वा ।**
**नास्ति खलु यस्य समधीरनुमतिविरतः स मन्तव्यः ॥ १४६ ॥**

**अर्थ**—आरंभ म्हणजे शेतकी, व्यापार वगैरे क्रिया, परिग्रह म्हणजे धनधान्यादिक, आणि ऐहिक कार्यें म्हणजे लग्नकार्यादिक क्रिया. याविषयीं समबुद्धि म्हणजे यांना जो संमति देत नाहीं त्याला अनुमतित्याग प्रतिमाधारी श्रावक म्हणतात.

**भावार्थ**— जेवण कडू, आंबट, गोड, तिखट असो, स्वादिष्ट अथवा स्वादरहित असो, त्याविषयीं रागद्वेषाचा विकार मुळींच उत्पन्न होऊं द्यावयाचा नाहीं व आपल्या मुखानें त्याला बरें वाईट म्हणावयाचें नाहीं; याचप्रमाणें आपल्या मुलाच्या अथवा मुलीच्या लाभालाभ, हानिवृद्धि, सुख-दुःख वगैरे कार्यामध्यें आपण हर्षविषाद मानावयाचा नाहीं व अनुमोदन द्यावयाचें नाहीं. याप्रमाणें वागणाराला दहावी प्रतिमा घडते.

उद्दिष्टाहारत्याग प्रतिमा

**गृहतो मुनिवनमित्वा गुरूपकण्ठे व्रतानि परिगृह्य ।**
**भैक्ष्याशनस्तपस्यन्नुत्कृष्टश्चेलखण्डधरः ॥ १४७ ॥**

**अर्थ**—घरांतून निघून मुनि राहतात अशा वनांत जाऊन जो गुरूजवळ व्रतें घेतो, भिक्षेनें आहार घेऊन तपश्चरण करण्यांत लीन होतो व फक्त लंगोटी व अपुरतें वस्त्र ठेवतो तो अकरावी उद्दिष्टत्याग प्रतिमाधारी श्रावक म्हणविला जातो.

**विशेषार्थ**—संपूर्ण गृहकुटुंबाविषयीं विरक्ति धारण करून अरण्यांत जाऊन जो मुनीश्वराजवळ दीक्षाग्रहण करतो व एक कोपीन ( लंगोटी ) व अपुरें वस्त्र, ज्यापासून अंग झाकलें तर डोकें उघडें राहील व डोकें झाकलें तर पाय उघडे राहतील असें ठेवून, बाकीच्यांचा त्याग करतो. अपुरें

वस्त्र देखिल ठेवण्याचें प्रयोजन हेंच कीं डांस, मच्छर, थंडी, उन्ह, पाऊस, वारा वगैरेपासून होणाऱ्या परीषह सहन करण्याची शक्ति प्राप्त झाली नाहीं. भिक्षाभोजन करावें पण तेंही अयाचकवृत्ति धारण करून व मौनव्रत घेऊन. त्यावेळीं आपणासाठीं मुद्दाम कोणी तें तयार केलें आहे असें समजल्यास घेऊं नये. कोणी आमंत्रण देण्यास आला तर त्याचें घरीं जाऊं नये. आपणाकरितां कोणी आरंभ करीत आहे असें समजतांच जेवण सोडून द्यावें. वनांत किंवा गांवाबाहेरील एखाद्या जागेंत रहावें. तेथें कांहीं उपसर्ग प्राप्त झाला तरी तो निर्भयपणें सहन करावा. त्यावेळीं घाबरून दीनवाणें होऊं नये. ध्यानस्वाध्यायांत सदैव मग्न असावें. गृहस्थाचे घरीं भिक्षेकरितां आमंत्रणाशिवाय जावें. गृहस्थानें स्वतःकरितां जें अन्न तयार केलें असेल त्यांतून तो जें भक्तिपूर्वक देईल तें सरस, नीरस, कडू, गोड, आंबट, खारट, कसेंही असो साम्यभावानें ग्रहण करावें. प्रतिदिवशीं एकवेळच आहार घ्यावा. अंतराय येईल तर उपोषण करावें. अनशनादिक तपश्चरणही शक्तिप्रमाणें करीत रहावें. याप्रमाणें वागणाराला उद्दिष्टाहारत्याग नामक अकरावी प्रतिमा घडते. याप्रमाणें श्रावकधर्माच्या अकरा पायऱ्या आहेत. त्या आपापल्या शक्तिप्रमाणें धारण कराव्या.

**पापमरातिर्धर्मो बंधुर्जीवस्य चेति निश्चिन्वन् ।**
**समयं यदि जानीते श्रेयो ज्ञाता ध्रुवं भवति ॥ १४८ ॥**

**अर्थ**–पाप हा जीवाचा शत्रु आहे व धर्म हा बंधु आहे असा निश्चय करून जो शास्त्राला जाणतो त्याचें निःसंशय कल्याण होतें.

**भावार्थ**–संसारांत जीवाला दुःख देणारा पापाशिवाय दुसरा कोणीही प्रबल शत्रु नाहीं. तें पाप आपण विषयकषायांचें अमर्याद सेवन केल्यापासून उत्पन्न होतें. इतर सर्व पदार्थ बाह्य निमित्तात्मक आहेत. कोणी तोंडावाटें दुर्वचन उच्चारिलें, कोणी आपणांत असलेले दोष जगांत प्रसिद्ध केले, कोणी आपल्या उपजीविकेचें साधन हरून नेलें किंवा द्रव्यापहार केला तरी तें सर्व पापाचा उदय झाला असतां आपोआप घडून येणारें आहे. आपल्या पापकर्माशिवाय इतर पदार्थांना आपला शत्रु समजणारे मूर्ख समजावेत. त्यांना जिनागमाचें रहस्य मुळींच समजलें नाहीं. याचप्रमाणें जीवावर बंधुप्रमाणें उपकार कराणारें पुण्यकर्म धर्म आहे. धर्माशिवाय इतरांना उपकारक जाणील त्यालाही भगवंताच्या आगमाचें यथार्थ ज्ञान झालें नाहीं असेंच समजावें.

याप्रमाणें श्रावकाला उपदेश देणारीं वचनें समाप्त करून श्रीसमंतभद्रस्वामी या ग्रंथाचें फल पुढील एका श्लोकांत प्रतिपादन करून ग्रंथ संपूर्ण करतात.

समारोप

**येन स्वयं वीतकलङ्कविद्यादृष्टिक्रियारत्नकरण्डभावम् ।**
**नीतस्तमायाति पतीच्छयेव सर्वार्थसिद्धिस्त्रिषु विष्टपेषु ॥ १४९ ॥**

**अर्थ**–जो पुरुष आपल्या आत्म्याला निर्मल ज्ञानदर्शनचारित्ररूप रत्नें ठेवण्यासाठीं करंडकाप्रमाणें करतो, त्या पुरुषाला त्रिभुवनांत त्याच्या इच्छेनुरूप अर्थाची सिद्धि हीच कोणी एक स्त्री

पतीच्या म्हणून वरमाळ घालते.

भावार्थ– ज्या पुरुषानें आपला आत्मा सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र एतत्स्वरूप रत्नें ठेवण्याला करंडकासारखा केला त्याला त्रैलोक्यांतील सर्वोत्तम पदार्थांची प्राप्ति होते असा नियम आहे.

ग्रन्थकर्त्याची अन्तिम प्रार्थना—

**सुखयतु सुखभूमिः कामिनं कामिनीव । सुतमिव जननी मां शुद्धशीला भुनक्तु ।।**
**कुलमिव गुणभूषा कन्यका संपुनीताज्जिनपतिपदपद्मप्रेक्षिणी दृष्टिलक्ष्मीः ।। १५० ।।**

अर्थ– जिनेन्द्र भगवंताच्या चरणकमलाला अवलोकन करणारी सम्यग्दर्शनरूपी लक्ष्मी ही, कामी पुरुषाला सुखाची खाण अशी स्त्री जशी सुख देते, तद्वत् मला सुख देवो, अथवा शुद्धमनाची आई आपल्या मुलाचें जसें पालन करितें तसें ती माझें पालन करो, अथवा शील हाच अलंकार धारण करणारी कन्या आपल्या कुलाला जशी पवित्र करिते, तद्वत् ही लक्ष्मी माझ्या अन्तःकरणाला पवित्र करो.

भावार्थ– जसें कामवेदनेनें व्याकुळ झालेल्या पुरुषाला स्त्री सुखी करते, अथवा शुद्धस्वभावी आई आपल्या पुत्राचें पालन करिते, अथवा शीलवती कन्या आपल्या कुलाला पवित्र करिते तद्वत् शुद्ध आत्मस्वभावाला अवलोकन करणारी सम्यग्दर्शनरूपी लक्ष्मी ही माझ्या मिथ्याज्ञानजनित संतापाला दूर करून माझ्या अनन्तचतुष्टय स्वरूपाला पुष्टि करो व रागद्वेषमोहरूपी दोषांना नाहींसें करून माझें आत्मस्वरूप निर्मल करो.

याप्रमाणें श्रीसमन्तभद्राचार्य–विरचित रत्नकरण्ड श्रावकाचाराचें मराठी भाषान्तर समाप्त झालें.

सोलापूर
चैत्र वद्य १० वि. सं. १९६९
वीर सं. २४३९

अनुवादक—
जीवराज गौतमचंद दोशी.

# शुद्धिपत्र.

| | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | पंक्ति |
|---|---|---|---|---|
| १ | वितराग | वीतराग | १६ | ६ |
| २ | अशा परिणामांना | असा परिणाम | ६४ | ३० |
| ३ | प्रकृतींची | प्रकृतींच्या | ६७ | १७ |
| ४ | पवित्राग | पवित्राङ्ग | १४६ | २० |
| ५ | परिणामाला | परिणामांनीं | १५२ | १४ |
| ६ | म्हणाव | म्हणावें | १८० | ११ |
| ७ | रंगाच | रंगाचे | २०२ | ८ |
| ८ | वदीनें | वेदीनें | २०२ | १० |
| ९ | सांगितल | सांगितलें | २०२ | १८ |
| १० | कटार्नीनीं | कटनींनीं | २०३ | ६ |
| ११ | तापान | तापानें | २१२ | ३१ |
| १२ | धम | धर्म | २२२ | १२ |
| १३ | पांचवी | पांचव्या | २३५ | १९ |
| १४ | जें | हें | २७४ | १६ |
| १५ | दहावरील | देहावरील | २७५ | १ |
| १६ | दुर्वचन | दुर्वचनें | २८२ | २४ |
| १७ | विषयापासन | विषयापासून | २९६ | १३ |
| १८ | अप्रत्याखानावरणीय | अप्रत्याख्यानावरणीय | २९६ | १८ |
| १९ | सवत्र | सर्वत्र | ३०९ | १ |
| २० | क्षुधातृषेच | क्षुधातृषेचें | ३९५ | १८ |
| २१ | कुभीपाचन | कुंभीपाचन | ३९५ | २२ |
| २२ | आजपयंत | आजपर्यन्त | ३९६ | ६ |
| २३ | सिद्धान्ताच | सिद्धान्ताचें | ४०१ | ११ |
| २४ | दरवाजापुढ | दरवाजापुढें | ४१६ | १ |
| २५ | प्रभावान | प्रभावानें | ४२६ | १ |
| २६ | तपःफल | तपःफलं | ४२८ | ६ |
| २७ | कर्मवशान | कर्मवशानें | ४२९ | ४ |
| २८ | झाल | झालें | ४३५ | २१ |